# अनुक्रमणिका



## भाग १ ला

## भांडवलशाहीचे रूपांतर

भाषांतरमाला क्र. ५७

# समाजवादाचे भवितव्य

सी. ए. आर. क्रॉसलंड लिखित

THE FUTURE OF SOCIALISM

या ग्रंथाचा अनुवाद

: अनुवादक :

**माधव लिमये**

मूल्य : २३ रुपये




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

मुंबई

## भाग २ रा

## समाजवादाची उद्दिष्टचे



## भाग ३ रा

## समाजवादाचे संवर्धन

## भाग ४ था

## समानतेचा शोध

# प्रास्ताविक

हे पुस्तक अँथनी क्रॉसलंड याने १९५६ साली लिहिले. इंग्रजी मजूर पक्षातील एक विचारवंत म्हणून त्याने अगोदरच लौकिक संपादन केला होता. या पुस्तकाने तो लौकिक वाढला आणि तत्वांच्या बरोबरीने तपशिलांचाही विचार करणारा कुशाग्र बुद्धीचा निष्ठावंत समाजवादी म्हणून क्रॉसलंडचे नाव जगभर विख्यात झाले.

लंडन येथील एका मध्यमवर्गीय कुटुंबात क्रॉसलंड याचा जन्म झाला. त्याचा बाप एक सनदी सरकारी नोकर होता व आई स्त्री–शिक्षणाच्या कार्यातील एक अग्रेसर कार्यकर्ती होती. निरलस उद्योग आणि स्वतंत्र बुद्धीने विचार करणे हे गुण क्रॉसलंडने आईबापांपासून उचलले आणि ते त्याने आमरण सांभाळले.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात इतरांप्रमाणे क्रॉसलंडही सैन्यात होता. युद्धानंतर त्याने आपले ऑक्सफर्ड येथील शिक्षण पुरे केले आणि तत्वज्ञान, अर्थशास्त्र आणि राजकारण या विषयांत पदवी संपादन केली. शिक्षण आटोपल्यानंतर त्याने ऑक्सफर्ड येथेच १९४७ ते १९५० अशी तीन वर्षे व्याख्याता (Lecturer) म्हणून काम केले.

ऑक्सफर्ड येथे क्रॉसलंडची ह्यू डाल्टन या मजूर पक्षाच्या पुढाऱ्याशी ओळख झाली आणि तो त्या पक्षाच्या चळवळीत ओढला गेला. १९५० साली तो निवडणुकीला उभा राहिला. ही निवडणूक त्याने जिंकली, पण पाच वर्षानंतर झालेल्या दुसऱ्या निवडणुकीत तो पडला. पहिल्या निवडणुकीतील विजयानंतर पार्लमेन्टमध्ये आणि पक्षामध्ये त्याचे जे कार्य झाले त्यामुळे एक उदयोन्मुख पुढारी म्हणून सर्वांचे त्याच्याकडे लक्ष गेले. गेटस्केल, विल्सन, कलाहन वगैरे मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांशी त्याचे स्नेहसंबंध प्रस्थापित झाले.

१९५९ साली तो पुन्हा पार्लमेंटमध्ये निवडून आला आणि १९६४ साली त्याचा मंत्रीमंडळात प्रथम प्रवेश झाला. तेव्हापासून आयुष्याच्या अखेरीपर्यंत प्रत्येक मजूर मंत्रीमंडळामध्ये तो सभासद होता. मंत्रीमंडळामध्ये त्याने वेळोवेळी अनेक खाती सांभाळली. मृत्यूसमयी तो परराष्ट्र मंत्री होता. पण अर्थशास्त्राचा अभ्यासक म्हणून त्याचे लक्ष होते अर्थ खात्यावरच. ते मात्र त्याला कधी मिळाले नाही. विरोधी पक्ष म्हणून मजूर पक्षाला ज्यावेळी पार्लमेन्टमध्ये बसावे लागे त्यावेळी क्रॉसलंडची विरोधी नेत्यांत गणना होई आणि एखादा विषय त्याच्याकडे सोपविला जाई.

विद्वान आणि निष्ठावंत समाजवादी म्हणून क्रॉसलंडचा सर्वजण आदर करीत, पण पक्षामध्ये त्याला विशेष पाठिंबा नव्हता. १९७६ च्या मार्चमध्ये पक्ष-नेत्याच्या निवडीसाठी जेव्हा निवडणूक झाली त्यावेळी क्रॉसलंडला फक्त १७ मते मिळाली आणि त्याचे नाव पहिल्याच फेरीत बाद झाले. कलाहन याची पक्षनेता म्हणून निवड झाली. त्याने क्रॉसलंडचे कर्तृत्व लक्षात घेऊन आपल्याविरुद्ध तो निवडणुकीला उभा होता याबद्दल राग न मानता, परराष्ट्र मंत्री म्हणून त्याची नेमणूक केली.

परराष्ट्र मंत्र्याचे काम मोठे जबाबदारीचे होते. इंग्लंडने नुकताच युरोपीय समाईक बाजारपेठेत प्रवेश केला होता. इंग्लंडचे जगातील स्थान ढासळत चालले होते. अशावेळी राष्ट्रहिताची जपणूक करणे व राष्ट्राची प्रतिष्ठा वाढविणे सोपे नव्हते. या कार्यात व्याप्त असताना क्रॉसलंडवर एकाएकी मृत्यूचा घाला पडला. २० फेब्रुवारी १९७७ रोजी क्रॉसलंड एकदम आजारी झाला आणि त्यातच तो मृत्यू पावला. मृत्यूसमयी त्याचे वय फक्त ५८ वर्षांचे होते. क्रॉसलंडच्या मृत्यूमुळे इंग्लंड एका कर्तबगार मंत्र्याला मुकले. इंग्लंडची ही हानी मोठी आहे. पण त्याच्याहीपेक्षा मोठी हानी जागतिक लोकशाही समाजवादी चळवळीची झाली. क्रॉसलंड लोकशाही समाजवादाचा खंदा पुरस्कर्ता होता. लोकशाही समाजवादावर दुहेरी हल्ला होतो. एक उजवीकडून भांडवलदारांचा दुसरा डावीकडून साम्य-वाद्यांचा. हा दुहेरी हल्ला परतवून लोकशाही समाजवादाची बाजू समर्थपणे जनते-पुढे ठेवण्यासाठी व्यापक बुद्धीची ज्वलंत निष्ठेची माणसे लागतात. अशी माणसे फार आढळून येत नाहीत. म्हणून क्रॉसलंड यांच्या मृत्यूने घडून आलेली हानी लवकर भरून येणे कठीण आहे.

## समाजवादाचे भवितव्य

या पुस्तकामध्ये लोकशाही समाजवादाचे प्रभावी समर्थन आहे. १९५६ साली, ज्यावेळी ते प्रसिद्ध झाले, त्यावेळी अशा समर्थनाची फार आवश्यकता होती. दुसऱ्या महायुद्धानंतर भांडवलशाही कोलमडून पडेल अशी जी अपेक्षा होती ती खरी ठरली नाही. उलट ती नव्या जोमाने उभी राहिली आणि जगभर आपले वर्चस्व फैलावू लागली. तसेच साम्यवाद आणि समाजवाद यांच्यामधील भांडण मिटून दोघे गुण्या-गोविंदाने एकत्र नांदतील ही आशादेखील फलद्रूप झाली नाही. साम्यवादाने समाज-वादावरील हल्ले पुन्हा सुरू केले आणि समाजवादाचे निर्दालन करण्याचा त्याने चंग बांधला, म्हणजेच महायुद्धाच्या अंतानंतर लोकशाही आणि समाजवाद यांचा शांततेने जलद विकास होईल ही जी उमेद होती ती खोटी ठरली. रशिया आणि अमेरिका यांच्यामधील वाढत्या वैमनस्यामुळे तिसऱ्या महायुद्धाचे भीषण संकटही डोळ्यापुढे येऊन ठाकले.

लोकशाही समाजवादाला ही परिस्थिती अत्यंत प्रतिकूल होती. भडक मार्ग लोकांच्या डोळ्यात लवकर भरतो, विशेषेकरून आणीबाणीच्या वा संकटाच्या काळात म्हणूनच पुष्कळांना साम्यवादाचे आकर्षण वाटू लागले, तर पुष्कळांना समाजवाद अशक्य तर बदललेली भांडवलशाही बरी असे वाटू लागले. युरोप खंडातील सर्व समाजवादी पक्षांचे बळ त्यामुळे कमी झाले आणि इतर देशांतील समाजवादी चळवळींचीही तीच गत झाली. अशावेळी समाजवादी व्यक्तींना व समुदायांना समाजवादी उद्दिष्टांची पुन्हा आठवण करून देणे व त्यांच्यातील आत्मविश्वास जागृत करणे आवश्यक होते. समाजवाद हे केवळ एक स्वप्न नसून तो शांततेच्या आणि मतपरिवर्तनाच्या मार्गाने प्रत्यक्षात आणणे शक्य आहे हे जनतेला पटवून देणे जरुरीचे होते.

आपल्या पुस्तकाच्या रूपाने क्रॉसलंड याने हे कार्य चांगल्यारीतीने केले आहे. त्याचे पुस्तक इंग्लंडमधील घटनांवर आधारलेले आहे हे खरे, पण ते उदाहरण इतर देशांना मार्गदर्शक ठरेल, अशी त्याची अपेक्षा होती. इंग्लंड त्याने निवडले त्याची दोन कारणे असावी. एक तर इंग्लंडबद्दल त्याला पुरी माहिती होती, आणि दुसरे म्हणजे इंग्लंडमध्ये समाजवाद प्रत्यक्षात उतरविण्याचा प्रयोग चालू होता आणि त्यामध्ये तो स्वतः सहभागी होता. स्वीडनसारखा देश त्याला चर्चेसाठी निवडता आला असता. पण ते उदाहरण विशेष परिणामकारक ठरले नसते. स्वीडन हे कधीही पहिल्या दर्जाचे राष्ट्र नव्हते आणि आंतरराष्ट्रीय राजकारण उद्योग आणि व्यापार यामध्येही त्याला कधी महत्व प्राप्त झाले नव्हते.

युद्धजन्य परिस्थितीमुळे इंग्लंडमध्ये हलके हलके सामाजिक क्रांती घडून आली होती. लोकांचे विचार बदलले होते, सामान्य जनता अधिक जागृत झाली होती, जुने आचार व रूढी बदलत होत्या आणि सामाजिक व आर्थिक समतेबद्दलची आकांक्षा वाढली होती. या सामाजिक परिवर्तनामुळेच युद्धानंतर झालेल्या पहिल्या निवडणुकीत मजूर पक्षाचा विजय झाला आणि समाजवादी कार्यक्रमाचा त्याला श्रीगणेशा घालता आला.

हे पहिले पाऊल टाकल्यानंतर मजूर पक्षाने हलके हलके पुढे बरीच पावले टाकली. त्या सर्वांचे क्रॉसलंड याने आपल्या पुस्तकात विवेचन केले आहे. पाऊले टाकताना ज्या अडचणी आल्या त्याचेही त्याने दिग्दर्शन केले आहे. अडचणी आर्थिक होत्या, तशाच सामाजिक व मानसिकही होत्या. तसेच शक्य तितक्या अधिक लोकांना बरोबर घेऊन जावयाचे म्हणून व लोकशाही व्यवस्था अभंग ठेवावयाची म्हणून प्रगती व्हावी तितकी जलद झाली नाही हे देखील त्याने काही ठिकाणी दाखविले आहे. पण लोकशाहीमध्ये ते अपरिहार्य होते असाच एकंदरीत त्याचा रोख दिसतो. आस्ते आस्ते का होईना, पण इंग्लंडमध्ये समाजवादाच्या दिशेने वाटचाल चालू आहे आणि शांततेच्या व सनदशीर मार्गाने लवकरच समाजवाद प्रस्थापित होईल अशी अपेक्षा त्याने पुस्तकामध्ये व्यक्त केली आहे.

इंग्लंडमधील या वाटचालीचे वर्णन करताना क्रॉसलंड याने समाजवादा-बद्दलच्या काही रूढ कल्पनांचे विश्लेषण केले आहे. त्यापैकी दोन मुद्यांचा येथे उल्लेख करणे योग्य ठरेल. पहिला मुद्दा हा की, उद्योगांचे राष्ट्रीयीकरण म्हणजे समाजवाद हे समीकरण चुकीचे आहे. राष्ट्रीयीकरण साम्यवादी देशांतही होते, पण त्याच्या योगाने कामगारांचे हक्क अगर कल्याण वाढत नाही. उलट शासनाची सत्ता अमर्याद वाढते आणि कामगार व जनता अधिक परवश बनते. म्हणून शासन लोक-नियंत्रित असले पाहिजे ही पहिली अट आणि त्या शासनाने देखील जरूर त्यावेळीच राष्ट्रीयीकरण करावे ही दुसरी अट. राजकीय आणि आर्थिक सत्तेचे एकीकरण जनतेच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने अनिष्ट अशी एकंदरीत क्रॉसलंडची धारणा आहे. दुसरा मुद्दा हा की, समाजवादाला केवळ एकाच तऱ्हेची आर्थिक व्यवस्था अभिप्रेत आहे ही कल्पना खरी नव्हे. समाजवादाची मूळ प्रेरणा नैतिक होती. नीतीवर आधारलेला समाज उभारणे हे त्याचे खरे उद्दिष्ट; नीतीमध्ये स्वातंत्र्य येते व समताही येते. कारण स्वातंत्र्य व समतेखेरीज नीतिमान् समाज उभाच राहू शकत नाही. म्हणून केवळ आर्थिक सुधारणांवर सारे लक्ष केंद्रित न करता समाजाच्या व व्यक्तींच्या सांस्कृतिक व नैतिक विकासाकडेही समाजवादी चळवळीने लक्ष पुरविले पाहिजे असा क्रॉसलंडचा आग्रह आहे.

१९४५ साली अधिकारारूढ झाल्यापासून मजूर पक्षाने जो सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक सुधारणांचा कार्यक्रम कार्यान्वित केला त्याची क्रॉसलंडने सविस्तर माहिती दिली आहे. माहिती देताना त्या कार्यक्रमातील उणीवांचाही त्याने उल्लेख केला असून त्याने घडून आलेल्या आर्थिक व सामाजिक परिणामांचे उत्तम दिग्दर्शन केले आहे, मजूर पक्षाचा कार्यक्रम क्रांतीवादी कार्यक्रम नव्हता. तो उत्क्रांतीचा कार्यक्रम होता. सशस्त्र बंड उभारून राज्ययंत्र काबीज केल्याखेरीज समाज परिवर्तन घडवून आणता येत नाही हा साम्यवादी सिद्धांत मजूर पक्षाला मान्य नव्हता. उलट लोकशाही मार्गाने जनतेला बरोबर घेऊन जाऊन, तिला सुबुद्ध करून, तिच्या हक्कांचा विकास करून व तिला कार्यप्रवण बनवूनच अधिक व्यापक व चिरस्थायी स्वरूपाची सामाजिक क्रांती घडवून आणता येते असा त्याचा विश्वास होता. क्रॉसलंडचाही तोच विश्वास होता. इंग्लंडमध्ये समाजवादी परिवर्तन सुरू झालेले असून ते यशस्वी झाल्यावाचून राहणार नाही अशी त्याला खात्री होती. म्हणून समाजवादाच्या भवितव्याबद्दल तो निःशंक होता. मनाच्या त्या निःशंक अवस्थेतच त्याने प्रस्तुतचे पुस्तक लिहिले आणि समाजवादी चळवळीपुढे मार्गदर्शक असा एक नकाशा उभा केला. नकाशा मार्गदर्शक तसाच उत्साहवर्धकही आहे.

क्रॉसलंडने पुस्तक लिहिले त्याला वीस वर्षे उलटून गेली. या वीस वर्षात समाजवादाचे पाऊल पुढे पडले की मागे, त्याचे भवितव्य निश्चित झाले की अनिश्चित हा प्रश्न मनात उद्भवणे साहजिक आहे. प्रश्नाचे स्पष्ट आणि खुलासे-

वार उत्तर देणे शक्य नाही आणि ते देण्याची ही जागाही नव्हे. पण उत्तर देण्यासाठी उपयुक्त ठरतील अशा काही गोष्टींचा स्थूलमानाने उल्लेख करता येईल. पहिली गोष्ट ही की, समाजवाद या कल्पनेचा जगभर मोठ्या प्रमाणावर फैलाव झाला आहे. स्वत:ला समाजवादी म्हणवून घेण्याची राजकारणी पुरुषांमध्ये, विशेषेकरून दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या देशांत, अहमहमिका लागलेली दृष्टीस पडते. त्यांच्यापैकी पुष्कळ देश स्वत:ला समाजवादी म्हणवतात. उद्योगांचे राष्ट्रीयीकरण आणि शासनामार्फत आर्थिक विकास एवढाच जर समाजवादाचा अर्थ असेल तर त्यांचा दावा अनाठाई आहे असे म्हणता येणार नाही. पण दु:खाची गोष्ट ही की, त्यांच्यापैकी पुष्कळांमध्ये समाजवादाचा पाया अशी जी लोकशाही ती दृष्टीस पडत नाही. मग ही समाजवादाची प्रगती की पीछेहाट ?

दुसरी गोष्ट ही की, ज्या पश्चिम युरोपमध्ये समाजवादाचा उदय झाला तेथे त्याचे पाऊल पुढे पडलेले दिसत नाही. युद्धोत्तर काळात समाजवादी पक्ष जोरात वाढतील आणि शासनकर्ते बनतील अशी जी अपेक्षा होती ती खरी ठरली नाही. त्यामानाने भांडवलदारी पक्ष व साम्यवादी पक्ष यांचीच अधिक वाढ झाली. स्वीडनमध्ये अनेक वर्षे समाजवादी पक्षाचे राज्य होते. पण १९७६ मधील निवडणुकीत त्या पक्षाला बहुमत मिळाले नाही. जर्मनीमध्ये समाजवादी पक्षाचे राज्य आहे, पण निर्णायक बहुमत नसल्यामुळे दुसऱ्या एका पक्षाशी त्याला युती करावी लागली आहे. फ्रान्समध्ये निवडणुका जिंकण्यासाठी म्हणून समाजवादी पक्षाला साम्यवादी पक्षाबरोबर युती करावी लागते. १९७७ मध्ये इंग्लंडमधील मजूर पक्षाचे पार्लमेंटमधील बहुमत इतके कमी झाले की, सत्तेवर राहण्यासाठी म्हणून त्याला उदारमतवादी ( Liberal ) पक्षाबरोबर सहकार्याचा करार करावा लागला. या घटना तात्पुरत्या स्वरूपाच्या आहेत असे मानणे कठीण आहे. मग समाजवादी पक्ष निवडणुकीत बहुमत मिळवून राज्यकर्ते बनतील आणि शांततेच्या व सनदशीर मार्गाने समाजवाद प्रस्थापित करतील ही ग्वाही खोटी ठरणार आहे का ?

तिसरी गोष्ट : ज्या इंग्लंडमधील घटनांच्या आधाराने क्रॉसलंडने आपले पुस्तक लिहिले आणि समाजवादाचे आशापूर्ण भवितव्य रंगविले तेथील परिस्थितीने तर वेगळीच कलाटणी घेतली आहे. आज तेथे बेकारी वाढते आहे, आणि तशीच भाववाढ. उत्पादन कसे वाढवावे आणि जागतिक बाजारपेठेतील चढाओढीला तोंड कसे द्यावे हा इंग्लंडपुढील सध्याचा मोठा प्रश्न आहे. एकेकाळी जगाचा सावकार असलेले इंग्लंड आता ऋणको बनलेले आहे. आयात–निर्यात व्यापारातील देणी देऊन टाकण्यासाठी नुकतेच त्याला जागतिक बँकेकडून मोठे कर्ज काढावे लागले. या परिस्थितीच्या रेट्यामुळे कामगारांना व सामान्य लोकांना दिलेल्या सवलती कमी करण्याचा अगर मागे घेण्याचा विचार सध्या तेथे चालू आहे. समाजवादाच्या दिशेने पाऊल पुढे पडण्याऐवजी मागे पडत चालले आहे. आयुष्याच्या शेवटच्या

वर्षात क्रॉसलंडला ही परिस्थिती दिसत होती. पण त्याला त्याबाबतीत काही करता आले नाही. मग इंग्लंडमध्ये यापुढे समाजवादाला काही भवितव्य नाही का ?

इंग्लंडचा मार्ग हा लोकशाही समाजवादाचा मध्यम मार्ग आहे. तो अयशस्वी ठरला असे आजच म्हणता येत नाही. मार्गामध्ये अनेक अनपेक्षित अडचणी आल्या आहेत. पण त्या दूर करता येणारच नाहीत असे नाही. तसेच दुसरा तरी कोणचा मार्ग यशस्वी ठरला आहे ? एकोणिसाव्या शतकातील व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात अनियंत्रित भांडवलशाही होती ती आता कुठेही दृष्टीस पडत नाही. तिला किती तरी समाजवादी स्वरूपाची नियंत्रणे स्वीकारावी लागली आहेत. तिचे आजचे स्वरूप कमी अधिक प्रमाणात, कल्याणकारी राज्याचे ( Welfare State ) आहे. मिश्र अर्थव्यवस्था, सहकार, कामगारांचा संचालनातील सहभाग वगैरे गोष्टी तिला मानाव्या लागल्या आहेत. याला समाजवादी तत्वांचा विजय असे म्हणता येणार नाही का ?

दुसऱ्या बाजूला साम्यवाद तरी कुठे यशस्वी ठरला आहे ? रशियात व इतर काही देशात प्रबळ राज्ये निर्माण झाली आहेत, पण त्यांना समाजवादी अगर साम्यवादी हे विशेषण लावणे कठीण आहे. त्यांचा विकास होतो आहे तो राष्ट्रवादाच्या ढाच्यानुसार. तात्पुरती म्हणून जी हुकूमशाही आली ती चिरस्थाई झाली. सर्वसामान्य जनतेचे हक्क आणि कल्याण यावर सुरुवातीला जो वरवंटा फिरला तो अद्याप तसाच फिरत आहे. या दडपशाहीविरुद्ध व जनतेच्या स्वातंत्र्यासाठी हंगेरी, पोलंड, झेकोस्लोव्हिया यासारख्या ठिकाणी लहानमोठे उठाव झाले. रशियाने ते शस्त्रबळाने दडपून टाकले. पण स्वातंत्र्याची आकांक्षा केव्हाही कायमची दडपून टाकता येत नाही. साम्यवादी राष्ट्रांतही आता तिचा प्रादुर्भाव होऊ लागला आहे आणि त्यामुळे काही बंधने ढिली होऊ लागली आहेत. त्या राष्ट्रांच्या कक्षेबाहेरील काही साम्यवादी पक्षांना जनतेच्या मनातील स्वातंत्र्यवादी प्रवृत्तीची दखल घ्यावी लागली. त्यामुळे त्यानी एकपक्षीय हुकूमशाहीबद्दलच आग्रह सोडला आणि बहुपक्षीय लोकशाहीवादी राज्यपद्धतीला मान्यता दिली. फ्रान्स, इटली, स्पेन, पोर्तुगाल आदि राष्ट्रांतील साम्यवादी पक्षांत हा बदल घडून आलेला आहे. बदल कितपत प्रामाणिक आहे आणि कितपत संधिसाधूपणाचा, निवडणुका जिंकण्यासाठी टाकलेला पवित्रा आहे हे सांगणे शक्य नाही. पण साम्यवादी पक्षांना समाजवादाच्या अशा काही मूलभूत मूल्यांचा स्वीकार केल्याची घोषणा करावी लागणे हा देखील समाजवादाचा विजयच नव्हे का ?

एकेकाळी केवळ समाजवादी असे समजल्या गेलेल्या अनेक गोष्टी आज सर्वमान्य झाल्या आहेत. भांडवलदारी वा गतानुगतिक पक्षांनाही त्यांना मान्यता द्यावी लागली आहे. समाजवादी पक्ष राज्यारूढ असो वा नसो, कोणत्याही शासनाला जनतेला त्या गोष्टी नाकारता येत नाहीत. त्या गोष्टी आता समाज

जीवनाचा एक अविभाज्य भाग बनल्या आहेत. आर्थिक व सामाजिक विषमता कमी करणे, सर्वांना समान संधी उपलब्ध करून देणे, सर्वांचा विकास साधणे, दलितांना खास सवलती देऊन त्यांना इतर गटांच्या बरोबरीला आणणे, बेकारी व दारिद्र्य नष्ट करणे वगैरे आता समाजवादी कार्यक्रम राहिले नसून ते आता जनतेचे कार्यक्रम बनले आहेत. समाजवाद हे आता वर्गीय उद्दिष्ट उरले नसून सबंध समाजाचे उद्दिष्ट बनले आहे. लोकशाहीचे परिवर्तन समाजवादामध्येच झाले पाहिजे असे आता सर्व पुरोगामी विचारवंत मानतात.

त्या विचारवंतांना जो समाजवाद हवा, तो ठोकळेबाज, समुदायवादी अर्थ-कारणावर दृष्टि केंद्रित करणारा, सत्तेचे राजकारण खेळणारा समाजवाद नको. त्यांना समाजवाद हवा तो व्यक्तीचे स्वातंत्र्य व विकास यावर भर देणारा, व्यक्तींच्या प्रयत्नांनी स्वतंत्र व्यक्तींचा स्वतंत्र समाज उभारू पाहणारा, नीतिवादी व विवेकवादी असा समाजवाद हवा. त्या समाजवादाचे मानवतावादामध्ये रूपांतर होते. मग आठवतो तो महात्मा गांधींचा सर्वोदयवाद किंवा कॉ. एम्. एन्. रॉय यांचा शास्त्रीय नवमानवतावाद. विसाव्या शतकाच्या या चतुर्थ खंडात समाजवादाला आपले भवितव्य शोधावे लागेल ते अशा मानवतावादी विचारसरणीमध्ये व कार्य-प्रणालीमध्ये. क्रॉसलंड याने आपल्या पुढील आयुष्यात समाजवादाच्या भवितव्याचा शोध चालू ठेवला असता तर तो या निर्णयाप्रत येऊन पोचला असता असे मानायास या पुस्तकात बरीच जागा आहे.

'अभंग',
साहित्य सहवास,
मुंबई ४०००५१.

**व. भ. कर्णिक**

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य–संस्कृती मंडळाने वाङ्मय निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, मराठी वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती–विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व राहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगत स्वरूप व दर्जा देण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्यावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटीन, इत्यादी पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून, ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, एरिकलस, ॲरिस्टोफेनीस, युरिपिडिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, थॉमस ॲक्वाइनस, न्यूटन, डार्विन, रूसो, कान्ट. हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीअर, टॉलस्टॉय, दोस्तएवस्की, कॅसिरेर, गार्डन व्ही चाईल्ड इत्यादिकांचा या भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत,

रामायण, भरताचे नाटयशास्त्र, संगीत रत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथा-सप्तशती, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यंत १८ अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिल्चे " On Liberty ", रूसोचे " Social Contract ", एम्. एन्. रॉयचे " Reason, Romanticism & Revolution" व " Letters from Jail ", स्तानिस्लाव्स्कीचे "An Actor Parepares" व " Building a character," तुर्गेनिव्हचे "Father & Sons", रायशेनबासचे "Rise of Scientific Philosophy", गन्नर मिरदासचे " Economic Theory and Under developed Region," कै. पां. वा. काणे यांचे " History of Dharmashastra", कोपलँडचे " Music and Imagination ", बर्ट्रान्ड रसेलचे "Religion and Science ", तेरझागीचे "Theoretical Soil Mechanics," विशाखादत्ताचे " मुद्राराक्षसम् ", भरतमुनींचे " भरतनाटयशास्त्र " (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मनुचीचे "Storia Do Mogor", ऑ. से. पिगु लिखित " Socialism Vs. Capitalism ", इझाडोरा डंकनचे " My Life ", स्ट्रॅविन्स्कीचे " Poetics of Music ", इत्यादी ग्रंथांची भाषांतरे मंडळाने प्रकाशित केली आहेत.

६. मंडळाच्यां भाषांतरमालेतील सी. ए. आर. क्रॉसलंड लिखित " The Future of Socialism " या ग्रंथाचा मराठी अनुवाद श्री. माधव लिमये, नासिक यांनी केला असून तो मंडळाच्या भाषांतरमालेत प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे. या ग्रंथाच्या मराठी आवृत्तीचे प्रकाशन–हक्क मंडळास दिल्याबद्दल सी. ए. आर. क्रॉसलंड यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

मुंबई– ४०००३२
मार्गशीर्ष वद्य ७, शके १८९९
१ जानेवारी १९७८

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ.

# अनुवादासंबंधी थोडेसे–

'समाजवादाचे भवितव्य' (Future of Socialism) हे पुस्तक क्रॉसलंड यांनी १९५६ साली म्हणजे तब्बल वीस वर्षांपूर्वी लिहिले. त्याचा अनुवाद आता इतक्या विलंबाने का होईना प्रकाशित होत आहे. पुस्तकातील प्रतिपाद्य विषय समाजवादी आंदोलनाच्या दृष्टीने जितका महत्त्वाचा तितकाच जिव्हाळयाचाही असल्याने खरे तर हा अनुवाद यापूर्वीच मराठी वाचकांच्या हाती पडावयास हवा होता. परंतु एकपरीने या विलंबाने पुस्तक ऐन मोक्याच्या वेळी प्रकाशित होत आहे असे म्हटले तर ते वावगे ठरणार नाही.

गेल्या तीस वर्षातील एकसाची सत्ता जावून आज भारतात नवी विचारसरणी धारण करणारांच्या हाती मध्यवर्ती सत्तेची सूत्रे गेली आहेत. नवा सत्ताधारी पक्ष विचारांची एक नवी चाकोरी पाडू पहात आहे; संपूर्ण क्रांतीचे ध्येय त्याने आपल्या डोळयापुढे ठेवले आहे. त्या दिशेने मार्गक्रमण करताना क्रॉसलंड यांच्या विचारांचा मागोवा घेणे अपरिहार्य ठरणार आहे.

साम्यवादापेक्षा निराळी अशी 'लोकशाही समाजवादी' विचारसरणी पुढे येऊन तिला शासकीय व वैचारिक पातळीवर बऱ्याच प्रमाणात सुस्थिर अधिष्ठान प्राप्त झाले असले तरी निदान भांडवलशाहीच्या संदर्भात तरी ती आपले पूर्वग्रह आजही कवटाळून धरीत असल्याचे दिसून येते. त्यामुळेच राष्ट्रीयीकरण, खाजगी मालमत्ता धारण करण्याचा अधिकार, करपद्धती, शिक्षणक्षेत्रातील समता अशा अनेक क्षेत्रांसंबंधीच्या विचारांत बराच ठोकळेबाजपणा डोकावतो. यांपैकी अनेक प्रश्नांवरील क्रॉसलंड यांचे विवेचन केवळ मौलिकच नव्हे तर विचारांना धक्का देणारे असून त्या बाबतीतील पूर्वग्रह सोडल्याशिवाय त्याचे मर्म नीट ध्यानात येवूच शकणार नाही. हिंसाचाराचा व हुकूमशाहीचा मार्ग त्याज्य ठरवून शांततामय मार्गाची कास धरणाऱ्या व नैतिक अधिष्ठानाचा आग्रह धरणाऱ्या 'संपूर्ण क्रांतीच्या' उपासकांना क्रॉसलंड यांच्या या ग्रंथात भरपूर वैचारिक खाद्य मिळण्यासारखे आहे व त्याच अर्थाने हा अनुवाद ऐन मोक्याच्या वेळी प्रकाशित होत आहे असे मी वर म्हटले आहे.

इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद करताना मराठी सातवीपर्यंत शिकलेला वाचक सर्वसाधारणपणे माझ्या डोळयापुढे असतो. त्याला लेखकाचे प्रतिपादन समजले म्हणजे अनुवादाचा हेतू सफल झाला असे मानावयास हरकत नाही. विषय चटकन वाचकापर्यंत जाऊन भिडण्याच्या दृष्टीने अनुवादकाला थोडेसे स्वातंत्र्य असावे अ श

मताचा मी आहे. उदाहरणार्थ, या पुस्तकात एके ठिकाणी लंडनमधील सधन लोकांच्या व कामगारांच्या वस्तीचा उल्लेख आहे. त्याठिकाणी मराठी वाचकांच्या कानावरूनही न गेलेली नावे जशीच्या तशी ठेवण्याऐवजी मुंबई शहरातील वाळकेश्वर आणि परळ असा उल्लेख केला तर मराठी वाचक त्याच्याशी चटकन समरस होऊ शकला असता असे मला वाटते. पण अनुवादक म्हणून तेवढे स्वातंत्र्य मला उपलब्ध नसल्याने मी मूळचेच शब्द अनुवादात कायम ठेवले आहेत. एखाद्या पुस्तकाचे भाषांतर वाचताना ते भाषांतर आहे असे लक्षातही न येता आपण पुस्तक मुळातूनच वाचतो आहोत असे वाटणे ही मी उत्तम भाषांतराची किंवा अनुवादाची कसोटी समजतो. महाराष्ट्र राज्य साहित्य – संस्कृती मंडळाच्या नियमात राहून मी त्या कसोटीला उतरण्याचा प्रयत्न केला आहे. तो सफल झाला आहे की नाही हे अर्थातच वाचकांनी ठरवावयाचे आहे.

क्रॉसलंड यांच्या पुस्तकाचा अनुवाद करण्याची संधी मला दिल्याबद्दल साहित्य संस्कृती मंडळाचा व विशेषत: भाषांतर विभागाचे मानसेवी संपादक व माझे ज्येष्ठ स्नेही श्री. बा. रं. सुंठणकर यांचा मी ऋणी आहे. पुस्तकाचा अनुवाद करताना येथील एच्. पी. टी. कॉलेजचे माजी प्राचार्य कै. श्री. प. सोहोनी यांचे जे अमोल सहाय्य मला लाभले त्याचा अत्यंत कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे. पुस्तक प्रकाशनाला इतका विलंब न लागता ते त्यांच्या हयातीत प्रसिद्ध झाले असते तर बरे झाले असते अशी रुखरुख आज हे पुस्तक प्रकाशित होत असताना माझ्या मनाला लागून राहिली आहे. अनुवादाची मुद्रण प्रत तयार करताना श्री. व. भ. कर्णिक व श्री. सुंठणकर यांचे उपयुक्त मार्गदर्शन लाभले त्याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहे.

पुस्तकासाठी आकर्षक मुखपृष्ठ अत्यंत थोडया वेळात करून दिल्याबद्दल माझे तरुण मित्र उदयोन्मुख चित्रकार भास्कर मांडगे यांचा मी आभारी आहे. त्याचप्रमाणे हस्तलिखिताच्या वह्यांवरून मुद्रण प्रत तयार करून दिल्याबद्दल श्री. औटी महाराज यांचेही आभार मानले पाहिजेत. यशवंत प्रिंटिंग प्रेसच्या सर्व कर्मचाऱ्यांचेही आभार.

नासिक,
दिनांक १ जानेवारी १९७८

माधव लिमये

# प्रस्तावना

अनेक डाव्या गटाच्या लोकांकडून समाजवादी उद्दिष्टांसंबंधी फेरमांडणी करणाऱ्या साध्या आणि संक्षिप्त निवेदनाची मागणी केली जात असताना या पुस्तकाच्या इतक्या मोठ्या आकाराबद्दल सुरुवातीलाच मला दिलगिरी व्यक्त केली पाहिजे.

समाजवादासंबंधी 'फेरविचार' व्हावयास हवा अशी जी इच्छा पुनः पुन्हा व्यक्त केली जात आहे त्याला आतापर्यंत जो प्रतिसाद मिळाला तो केवळ लहान लहान निबंधांच्या स्वरूपात. परंतु अशा त्रोटक निबंधांबद्दलचे माझे असमाधान उत्तरोत्तर वाढतच गेले व त्यामुळे मला ही विस्तृत ग्रंथरचना करावी लागली. मजूर पक्षाने युद्धपूर्व काळात देशापुढे जो कार्यक्रम ठेवला होता त्यापैकी बराच भाग तडीला गेला असल्याने मजूर पक्षाने आता एका नव्या अवस्थेत प्रवेश केला आहे हे खरेच आहे. परंतु या नव्या परिस्थितीशी इतक्या घाईगर्दीने जुळवून घेता येणे शक्य होईल असे मला वाटत नाही.

'आता समाजवादाचे स्वरूप काय राहणार ?' या प्रश्नाचे उत्तर द्यावयाचे असेल तर त्यासाठी दोन गोष्टी केल्या पाहिजेत. १९३९ पासून घडून आलेल्या बदलांचे आधी विस्तृत विवेचन केले पाहिजे. आणि त्या अनुषंगाने समाजवादाची नव्याने मांडणी केली पाहिजे. आणि या नव्या मांडणीच्या संदर्भात व्यवहार्य धोरणाची आखणी केली पाहिजे. त्रोटक निबंधात यापैकी एखादी तरी गोष्ट वगळली जाते. एक तर समाजवादाच्या एखाद्या अंगाविषयी खूप तपशीलवार विचार केलेला असतो परंतु त्यांत समाजवादी विचाराच्या व्यापक दृष्टीकोणातून उहापोह केलेला नसतो. किंवा दुसरा प्रकार असा असतो की, 'समाजवादाचा अर्थ' अशासारख्या एखाद्या सर्वसाधारण त्रोटक निबंधात प्रत्येक विभागाच्या शेवटी 'अर्थात यासंबंधी व्यवहार्य धोरणाचा अवलंब करणे सोपे नाही; परंतु आपला निर्धार पक्का झालेला असेल तर अशा अडचणींवर मात करणे कठीण जावू नये' असे म्हटलेले असते. या दोन्ही तऱ्हेचे लेखन करणारांना बरेचसे श्रेय दिले पाहिजे हे खरे असले तरी त्यापैकीच कोणाचे लिखाण संपूर्ण समाधान करू शकत नाही.

तथापी या दोन्ही गोष्टींना एकदम हात घालण्याचा आणि अंतर्गत समाजवादी धोरणाचा सर्वांगिण विचार करण्याचा प्रयत्न करणाराला सर्वप्रथम कोणत्या अडचणीला तोंड द्यावे लागणार असेल तर ते म्हणज आवश्यक त्या विशेष ज्ञानाच्या अभावाला. पाच वर्षे मी पार्लमेन्टचा सभासद होतो ही बाब सोडली तर

अर्थशास्त्रज्ञ म्हणून मला विशेष ज्ञानाचा जो काय थोडा फार दावा सांगता येईल तेवढाच. परंतु आज समाजवादावर पुस्तक लिहावयाचे म्हणजे लेखकाला राजकारण, समाजशास्त्र, औद्योगिक मानसशास्त्र, इतिहास इतकेच नव्हे तर अर्थविचार असे निरनिराळे विषय हाताळावे लागतात. केवळ आर्थिक समस्यांचीच नव्हे तर शिक्षण, सामाजिक-सेवा, औद्योगिक संबंध, वर्गाचे स्वरूप, आणि इतरही अनेक विषयांचा लेखकाला ऊहापोह करावा लागतो. परंतु त्यासंबंधीचे माझे ज्ञान अगदीच जुजबी आणि मोडकेतोडके आहे.

या विषयातच अंतर्भूत असलेली ही अडचण टाळता येण्यासारखी नाही. समाजवादावर एकाच विशिष्ट अंगाचा विशेषज्ञाच्या दृष्टीकोणांतून सांगोपांग ऊहापोह करणारे पुस्तक लिहिले गेले तर अशा संकुचित पुस्तकात कोणाला फारसा रस वाटणार नाही. त्यामुळे समाजवादाचा ऊहापोह करणारे पुस्तक लिहिण्याचा विचारच निराशेने सोडून द्यावयाचा नसेल तर या विषयाला वाहून घेवून समाजवादाचा सर्वंकष विचार मांडण्याचा प्रयत्न करणे आणि त्यातील विवेचनाबद्दल विशेषज्ञांनी काही दुरुस्ती सुचविली किंवा नवे मुद्दे मांडले तर ते स्वीकारण्याची तयारी ठेवणे व त्याबद्दल आधीच दिलगिरी व्यक्त करून ठेवणे एवढा एकच पर्याय शिल्लक राहतो.

समाजशास्त्रामुळे तर विशेषच कूट समस्या उभ्या राहतात. राजकारण आणि अर्थशास्त्र या परंपरागत क्षेत्रापेक्षाही समाजशास्त्र हे असे क्षेत्र आहे की समाजवाद आणि सामाजिक कल्याण यासंबंधीचे अनेक महत्वाचे प्रश्न अधिकाधिक प्रमाणात समाजशास्त्राच्या कक्षेत मोडू लागणार आहेत. त्यामुळे अलिकडील समाजशास्त्रविषयक लिखाणाचा मी भरपूर उपयोग करून घेतला आहे. परंतु मी धंदेवाईक समाजशास्त्रज्ञ नव्हे; शिवाय ही नवी समाजशास्त्रे अद्याप बरीच बाल्यावस्थेत आहेत, त्यांतील अनेक मुद्यांवर तज्ज्ञांचे मतभेद आहेत, निदान ब्रिटनमध्ये तरी क्षेत्र संशोधन (Field Research) विशेष झालेले नाही; आणि या विषयात ठोकळेबाज विधाने करून भागत नाही. त्यामुळे या क्षेत्रांतील निष्कर्ष, त्याचप्रमाणे सुचविण्यात येणारे उपाय हे तात्पुरत्या स्वरूपाचे असणे अपरिहार्य आहे. एखादी आपत्ती जितकी कमी उघड आणि डोळ्यात भरण्यासारखी तितकी त्यावरील उपाययोजना अधिक गुंतागुंतीची ही समाजवादापुढील व्यापक समस्येची एक बाजू झाली.

हे पुस्तक ब्रिटनमधील समाजवादासंबंधीचे आहे. (अर्थात इतर काही देशांतील– विशेषत: स्वीडन आणि अमेरिका– अनुभवाचा विषय परिपोषासाठी अनेकदा आधार घेतलेला आहे.) परराष्ट्रीय किंवा वासाहतिक धोरणाचे किंवा अविकसित भागांतील समस्येसंबंधीचे विवेचन या पुस्तकात नाही. यापुढे ब्रिटनमधील अंतर्गत वर्गीय संबंधांपेक्षाही इतर गरीब देशांबरोबरचे ब्रिटनचे संबंध कसे राहणार हेच समाजवादाचे गमक राहणार आहे. जागतिक प्रमाणावर पाहिले तर ब्रिटनमधील

कामगार विशेषाधिकार उपभोगणाऱ्या उच्च वर्गात मोडतो. आणि अधिक समानतेची मागणी करीत असतांना त्याने ती इतरांनाही लाभू दिली पाहिजे.

या प्रश्नावर किती तरी वाङमय लिहिले गेले आहे. तथापी बाह्य जगा-बरोबरचे आपले संबंध कसेही असले, तरी मजूर पक्ष आपल्या देशात ज्या तऱ्हेचा समाज निर्माण करू इच्छितो त्यासंबंधीची स्पष्ट कल्पना आणि ती प्रत्यक्षांत उतर-विण्यासाठी देशांतर्गत कार्यक्रमाची रूपरेषा पक्षाजवळ असली पाहिजे. या पुस्तकात यासंबंधीचा उहापोह करण्यात आलेला आहे. अर्थात देशांतर्गत प्रश्नांपेक्षाही आपल्यापेक्षा कमी प्रगत असलेल्या समाजाबरोबरचे आपले संबंध कसे आहेत यालाच आज नैतिकदृष्टया अधिक महत्त्व प्राप्त झाले आहे.

या पुस्तकांत राहून गेलेल्या त्रुटींचाही मला उल्लेख केला पाहिजे. हे पुस्तक लिहावयास घेतल्यानंतर सहकारी चळवळीसंबंधीची चौकशी करण्यासाठी नेमण्यात आलेल्या चौकशी आयोगाचे चिटणीसपद माझ्याकडे आले आहे. या चळ-वळीची व्याप्ती, तिच्या मुळाशी असलेले लोकशाही तत्वांचे अधिष्ठान आणि नफेबाजी न करण्याचे या चळवळीचे वैशिष्टय, यामुळे ब्रिटनमध्ये समाजवादी विचारसरणीचे पाऊल पुढे पडण्यास तिचे पुष्कळच साहाय्य होण्यासारखे होते. परंतु सहकारी चळवळीतील समस्या आणि त्यासंबंधीचे धोरण याविषयी चर्चा करण्याचे मी येथे कटाक्षाने टाळले आहे. कारण मी त्याचा उल्लेख केला असता तर आयोगाच्या निष्कर्षांबद्दल ते प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्यांची वाच्यता केली असे झाले असते.

या पुस्तकाच्या रचनेचे स्वरूप थोडक्यात असे आहे : पहिल्या भागात नव्या अवस्थेच्या सुरवातीचे वर्णन आले आहे. म्हणजे युद्धपूर्व काळात समाजवादी कार्यक्रमाची आखणी करण्यात आल्यापासून जी जी स्थित्यंतरे घडून आली त्यांचे विवेचन या भागात आहे. या स्थित्यंतरांच्या संदर्भात समाजवादाच्या संकल्पनेचा अर्थ काय घ्यावयाचा त्याची चर्चा दुसऱ्या भागांत केली आहे. समाजकल्याणाच्या उद्दिष्टासंबंधीचा उहापोह तिसऱ्या भागात केला असून चौथ्या भागातील पहिली चार प्रकरणे सद्यः परिस्थितीत समाजवादाची आवश्यकता कशी आहे ते दाख-विण्यात खर्ची पडली असून त्या पुढील प्रकरणात, आजच्या परिस्थितीत सामाजिक समतेचा अर्थ कसा लावावयाचा, याहून जास्त फेरवितरण केल्यानंतरही आर्थिक सुबत्तेत वाढ होवू शकणार नाही हे उघड असताना अधिक समानता समर्थनीय कशी ठरते आणि ती साध्य कशी करावयाची या तीन प्रश्नांची चर्चा केली आहे. पाचव्या भागांत इतर क्षेत्रांतील समाजवादी धोरणांचे आर्थिक परिणाम काय घडून येवू शकतील त्याची आणि विकासाच्या जलद वाढीचे प्रमाण टिकवून कसे धराव-याचे त्यासंबंधीचे विवेचन केलेले आहे. (आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाचा प्रश्न याठिकाणी मी हाताळलेला नाही. त्यासंबंधीचे सविस्तर विवेचन मी अन्यत्र

केले आहे.) शेवटच्या प्रकरणात आधीच्या प्रकरणांत येऊन गेलेल्या शिफारसींचा थोडक्यात आढावा घेण्यात आला आहे. त्याचबरोबर सामाजिक आणि आर्थिक प्रश्नांना खाजगी आयुष्य आणि फुरसदीचा वेळ यासंबंधीच्या समस्यांच्या मानाने भविष्यात जे गौणत्व प्राप्त होणार आहे त्याचा आणखी वेध घेण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे.

या पुस्तकाचे संपूर्ण हस्तलिखित सर्वश्री ह्यू डाल्टन, पी. डी. हेंडरसन, आय्. एम्. डी. लिटल आणि पी. एम्. विल्यम्स यांनी वाचून काढले आहे. त्याचप्रमाणे त्यांतील काही प्रकरणे सर्वश्री जे. एच्. स्मिथ, श्री. मिचेल यंग आणि माझे जुने शिक्षक सर रॉबर्ट हॉल यांनी वाचून पाहिली आहेत. हे सर्वचजण साक्षेपी टीकाकार. त्यांनी या पुस्तकांत सुधारणा घडवून आणण्याच्या कामी जे परिश्रम घेतले आणि मला बहुमोल सहाय्य केले त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. परंतु त्यांची राजकीय मते भिन्न भिन्न स्वरूपाची असून केवळ औपचारिकपणाने नव्हे तर अगदी मनापासून पुस्तकांत व्यक्त झालेल्या विवाद्य मतांबद्दल त्यांना कोठल्याही प्रकारे जबाबदार धरू इच्छित नाही हे मी स्पष्ट करू इच्छितो.

माझ्या दिवंगत चिटणीस श्रीमती हॉर्सले आणि श्रीमती लारा किलकॉवले यांनी हस्तलिखिताचे टंकलेखन करण्याच्या कामी जे अपरिमित कष्ट घेतले त्याबद्दलचे त्यांचे ऋण कधीही न फिटणारे आहे. याबाबतीतील त्यांची सहनशीलता आणि त्यांची विश्वसनीयता ही शब्दाने व्यक्त करण्याच्या पलीकडची आहे. सरतेशेवटी कु. बिॲट्रिस बेकन आणि श्री. बॅरी यांनी मुद्रिते तपासण्याचे आणि सूची तयार करण्याचे अत्यंत किचकट काम हातावेगळे करण्याच्या कार्यांत मला जे सहाय्य केले त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

लंडन,

फेब्रुवारी १९५६.

सी. ए. आर. क्रॉसलंड

## प्रकरण पहिले

# आर्थिक सत्तेतील बदल

### १. युद्धपूर्वकालीन समाजवादी गृहीततत्वे

१९३० च्या सुमारास समाजवादातील दूरगामी प्रश्नांबाबत कितीही मतभेद असले तरी बहुमतात असलेल्या मजूर पक्षाच्या सरकारपुढील तावडतोबीच्या उद्दिष्टांबाबत त्या सर्वांचे एकमत होते. दारिद्र्याचे उच्चाटन करून समाजकल्याणकारी राज्य स्थापन करावयाचे हे एक; संपत्तीच्या बाबतीत व्यापक प्रमाणावर समानता प्रस्थापित करावयाची हे दुसरे आणि सर्वांना रोजगार मिळावा, स्थैर्य निर्माण व्हावे म्हणून आर्थिक नियोजन घडवून आणावयाचे ही ती तीन उद्दिष्टे होत.

परंतु अनेक समाजवादी, तत्व म्हणून ही उद्दिष्टे मान्य करीत असले तरी मनातून त्याबाबत ते निश्चितच निराश असत. कारण प्रचलित आर्थिक चौकट कायम असेतोपर्यंत ही उद्दिष्टे साध्य करता येणार नाहीत अशीच बहुधा त्यांची धारणा असे. मार्क्सवादी विवेचनावर त्यांचा मुख्य भर असल्यामुळे सर्वप्रथम भांडवलदारी पद्धतीचेच, हिंसात्मक मार्गाचा अवलंब करून, संपूर्ण उच्चाटन करावे लागेल असे ते मानीत. अन्यथा सुधाराणा घडून येऊच शकणार नाहीत अशी त्यांची समजूत असे. कारण एकतर सबंध भांडवलशाही पद्धतीच मोडकळीच्या पंथास लागली आहे किंवा अद्यापही ती कशीबशी टिकून राहिली असली तरी प्रतिगामी वृत्तीच्या 'सत्ताधारी भांडवलशाही वर्गा' च्या हाती सारी सत्ता एकवटली आहे अशी त्यांची धारणा होती.

ठोकळेबाजीपासून परंपरेने आणि तितक्याच कडवेपणाने अलिप्त असलेल्या ब्रिटिश कामगार चळवळीच्या इतिहासातील १९३० च्या दशकात मर्क्सवादी विवेचनाचा केवढा जबरदस्त पगडा बुद्धीवाद्यांवर पडलेला होता ते दर्शविणारे अनन्यसाधारण असे हे एक उदाहरण आहे. १९३१ साली आलेली मंदीची लाट आणि फासिझमची वाढ यामुळे आधिकाधिक लोक केवळ तात्पुरत्या स्वरूपाच्या सुधारणावादी दृष्टिकोनाबद्दल संशय व्यक्त करू लागले आणि जागतिक भांडवलशाहीवर

कोसळू पहाणाऱ्या गंडांतराचे विवेचन करावयाचे असेल तर यापेक्षा अधिक मूलगामी विश्लेषण करावयास पाहिजे असे प्रतिपादू लागले.

या खळबळजनक गोष्टी घडत असतांनाही अधिकृत कामगार चळवळीवर तिचे पडसाद फारसे उमटलेच नाहीत. नाही म्हणावयाला, राष्ट्रीय कार्यकारिणीच्या वर्तुळांत मात्र अधून मधून तसे सूर उमटत असत. परंतु बुद्धीवाद्यांची तरुण पिढी मात्र सैद्धांतिक सत्य शोधून काढण्याच्या मागे लागलेली होती.ब्रिटनमधील डाव्या विचारसरणीच्या लोकांवर जवळजवळ शंभर वर्षात मार्क्सवादाचा पगडा बसू शकला नव्हता. तो या काळात बसला आणि तरुण पिढीतील बुद्धीवाद्यांनी मार्क्सवादाचा बव्हंशी स्वीकार केला. मार्क्सवादाला प्रभावी पर्याय म्हणून फेबियनवादी विचारसरणीचे आकर्षण उरले नाही; इतकेच नव्हे तर फेबियनवाद्यांपैकी विख्यात नेत्यांनीच त्या विचारसरणीचा त्याग करून मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा अंगीकार केला. 'इंडिपेंडंट लेबर पार्टी' वर अद्यापही हॉबसनच्या विचारसरणीचा प्रभाव होता. हॉबसनची विचारसरणी मार्क्सवादाशी पुष्कळ मिळती जुळती होती. त्यामुळे ती मार्क्सवादाला प्रतिस्पर्धी असणे शक्यच नव्हते. फार काय, स्वतः लेनिनने देखील हॉबसनला शिफारसपत्र देवून टाकले नव्हते काय? समाजवादी विचारवंतांपैकी फारच थोडेजण मार्क्सवादी प्रवाहापासून अलिप्त राहिले होते आणि तरीही सैद्धांतिक विवेचनाचा अभाव असलेली सुधारणावादी स्वरूपाची पुस्तके प्रसिद्ध होतच होती. परंतु वैचारिक क्षेत्रांत मार्क्सवाद हेच प्रभावी तत्त्वज्ञान होते आणि युद्धपूर्वकाळात माझ्या पिढीतील समाजवाद्यांची मनोभूमिका तयार होत असतांना त्यांच्यावर मार्क्सवादाचा चांगलाच पगडा बसलेला होता.

समाजवादी विचारवंतांवरील मार्क्सवादी विचारसरणीचा हा पगडा, त्याचप्रमाणे जे स्वतःला मार्क्सवादी म्हणवून घेत नव्हते त्यांच्या मनात वर म्हटल्याप्रमाणे निराशावादाने केलेले घर, यामुळे भांडवलशाहीच्या ऱ्हासासंबंधीचा सिद्धांत आणि सत्ताधारी भांडवलशाहीच्या वर्गात घडून येणारे स्थित्यंतर यासंबंधी मी प्रथम ऊहापोह करणार आहे. त्यायोगे सध्याच्या संमिश्र अर्थव्यवस्थेत अर्थसत्तेचे स्थान नेमके कोठे आहे त्याची स्पष्ट कल्पना येऊ शकेल असे मला वाटते. या प्रकरणाच्या सुरुवातीला ज्या तीन तावडतोबीच्या उद्दिष्टांचा उल्लेख करण्यात आला आहे ती साध्य करण्याच्या बाबतीत मजूर सरकारने केलेल्या कार्यासंबंधीचे विवेचन पुढील प्रकरणात येणार आहे.

परंतु त्यापूर्वी मला एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही की, माझ्या मते व्यवहार्य धोरण आखण्याच्या बाबतीत असो, आपल्या समाजाचे अचूक विश्लेषण करण्याच्या बाबतीत असो, इतकेच नव्हे तर समाजस्थित्यंतरासाठी योजावयाच्या सैद्धांतिक उपायांच्या बाबतीत देखील आजच्या समाजवाद्यांना मार्क्सपासून शिकण्यासारखे काहीही नाही. त्याने वर्तविलेली जवळजवळ सर्वच्या सर्व भाकिते खोटी ठरलेली

आहेत आणि त्याने सुचविलेले सैद्धांतिक मार्ग हेही आता अप्रस्तुत ठरलेले आहेत.

मार्क्स या व्यक्तीचा किंवा त्याने बजावलेल्या कामगिरीचा उपहास करावा असा याचा अर्थ नाही. समाजवादी विचारवंतांपैकी सर्वात बुद्धिमान म्हणून त्याचा उल्लेख करावाच लागेल. गेल्या शंभर वर्षात अन्य क्षेत्रात फ्रॉइड किंवा केन्स यांसारख्या ज्या अगदी थोड्या व्यक्तींनी विशेष कर्तृत्व गाजवले त्यातच मार्क्सची गणना करावी लगेल. एकोणिसाव्या शतकातील भांडवलशाहीच्या गतिमान स्वरूपाचा त्याने घेतलेला वेध, त्याने हाताळलेल्या विषयांचा प्रचंड आवाका, वरवरच्या संघर्षामागे दडलेल्या उघड्या नागड्या वास्तवतेचे त्याचे अचूक ज्ञान, स्वतःबद्दलची त्याची नितांत खात्री आणि भाषेवरील त्याचे जबरदस्त प्रभुत्व या सर्व गोष्टींचा आजहि वाचकांच्या मनावर विजेसारखा परिणाम घडून येतो. त्यामुळे त्याच्या समकालीन अर्थशास्त्रज्ञांनी लिहिलेली पुस्तके ओढून ताणून लिहिलेली आणि अत्यंत मामुली स्वरूपाची वाटू लागतात आणि विशेष म्हणजे हे असामान्य कर्तृत्व असणारा मार्क्स हा सदैव दुःखात पिचत होता. दारिद्र्य त्याच्या पाचवीला पुजलेले होते. दोन वेळच्या जेवणाचीही त्याला कित्येकदा भ्रांत असे आणि कर्जबाजारीपणामुळे सावकाराची टाच कधी येईल त्याचा नेम नसे. इतक्या विपत्तीत असूनही त्याच्या हातून इतकी अलौकिक ग्रंथनिर्मिती झाली हे खरोखरीच लोकोत्तर नव्हे काय?

स्वार्थत्याग आणि समर्पणाच्या भावनेमुळेच केवळ मार्क्सच्या हातून इतकी असामान्य कामगिरी बजावली गेली. वाङ्मयीन इतिहासांत अशी उदाहरणे विरळाच. मार्क्सच्या स्वभावात काही उणीवा निश्चितच होत्या. त्याचप्रमाणे ज्या परिस्थितीवरून मार्क्सने आपले सिद्धांत बसविले ती आता भूतकाळात विलीन झालेली असल्यामुळे त्याच्या शिकवणुकीलाही आज फारसा अर्थ उरलेला नाही. परंतु तरीही एक गोष्ट मान्य केलीच पाहिजे की, तो समर्पित जीवनाचा आणि असामान्य बुद्धीमत्तेचा असा होता. कल्पनाशून्य आणि नीतिमत्तेच्या बाबतीत कोत्या मनोवृत्तीची माणसेच केवळ त्याचा उपहास करू धजतील.

## २. भांडवलदारी पद्धतीच्या विनाशाचा सिद्धांत

भांडवलशाहीतील 'अंतर्विरोधा'मुळे प्रथम जनता हळूहळू आधिकाधिक गरीब होत जाईल आणि शेवटी संबंध भांडवलशाही समाजपद्धतीच कोसळून पडेल हा सिद्धांत खोटा असल्याचे आता जवळजवळ सिद्धच झाले आहे. एकूण उत्पादन, त्याचप्रपाणे कामगार वर्गाचे राहणीमान या दोहोतही हळूहळू वाढ होत आहे. ब्रिटनचे १९३८ सालचे निव्वळ राष्ट्रीय उत्पन्न १८७० पेक्षा ३·५ पटीने तर दर डोई उत्पन्न २·५ पटीने जास्त होते. त्याचप्रमाणे कामगारांच्या प्रत्यक्ष वेतनातही जवळपास दरडोई उत्पन्नाइतकीच वाढ झालेली दिसून येते.

उत्पन्नात होत असलेली ही वाढ नाकारणे शक्य नसल्याने मार्क्सवादी विद्वानांनी आपल्या गुरूच्या मूळ सिद्धांताला मुरड घालून तो सावरून धरण्याचे प्रयत्न सुरू केले. त्यांपैकी कांहींनी असे प्रतिपादन करण्यास सुरुवात केली की, मार्क्सला अभिप्रेत असलेली भांडवलशाही समाजरचनेतील वाढतीं दुःखे भांडवलशाहीच्या विनाशाच्या अखेरच्या अवस्थेतच दृग्गोचर होऊ लागतात. आणि विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत आणि विशेषतः दोन युद्धांच्या मधल्या काळांत त्याच्या काळ्या सावल्या प्रकर्षाने जाणवू लागल्या होत्या. परंतु या मल्लीनाथीलाही प्रत्यक्ष वस्तुस्थितीचा आधार असल्याचे आढळत नाही. १९०० ते १९३८ च्या दरम्यान प्रत्यक्ष राष्ट्रीय उत्पन्नात ५५ टक्क्यांनी वाढ झाली तर दोन युद्धांच्या मधल्या काळांत ती वाढ ३१ टक्के होती. शिवाय या वाढीत कामगार वर्गालाही पूर्णतया वाटा मिळाला आणि त्यांच्या वेतनांतही त्या प्रमाणांत वाढ होत गेली. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापेक्षा युद्धाच्या दरम्यानच्या काळांतील वाढीचे प्रमाण कमी होते. आणि १९३१ साली आलेली मंदीची लाट त्यापूर्वीच्या मानाने अतिशय तीव्र स्वरूपाची होती हे खरे; परंतु तरीही राष्ट्रीय उत्पन्नांत वाढ ही होतच होती; त्यांत घट कधीच झाली नाही.

मार्क्सच्या प्रतिपादनाचे समर्थन करण्यासाठी दुसरा मुद्दा असा मांडला जाई की, मार्क्सला कामगार वर्ग अजिबात गरीब होत जाईल असे म्हणावयाचे नव्हते तर तुलनात्मक दृष्ट्या त्याची परिस्थिती खालावत जाईल इतकेच त्याला सुचवावयाचे होते. किंवा त्याने प्रत्यक्ष तसे म्हटलेले नसले तरी त्याच्या प्रतिपादनाचा खरा गर्भितार्थ तोच होता. परंतु या विधानालाही वस्तुस्थितीचा कसलाच आधार नाही. उलट उपलब्ध पुराव्याशी ते विसंगतच आहे. राष्ट्रीय उत्पन्नातील वेतनाच्या प्रमाणांत युद्धापूर्वीच्या काळांत फारच थोडा चढउतार झाला होता. आणि १९३९ पासून तर राष्ट्रीय उत्पन्नाच्या वितरणांत कामगार वर्गाला कसे महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे त्याचे विवेचन पुढील प्रकरणांत आले आहे.

यावरून हे स्पष्ट होईल की, अगदी १९३९ साली देखील दारिद्र्य वाढीस लागले नव्हते. त्याचप्रमाणे भांडवलशाही व्यवस्था एकंदरीने यातनामय आणि असमाधानकारक असली, तरी एक अर्थव्यवस्था म्हणून ती विनाशाप्रत येऊन ठेपलेली नव्हती. आणि दुसऱ्या महायुद्धानंतरच्या गेल्या दहा वर्षांत ब्रिटनमधील अर्थव्यवस्थेमध्ये--मग तुम्ही तिला भांडवलशाही अर्थव्यवस्था म्हणा अथवा म्हणू नका--पुष्कळच सुधारणा झाली आहे. आर्थिक मंदी जाऊन सर्वांना रोजगार उपलब्ध झालेला आहे. अस्थिरता पुष्कळच कमी झाली असून आर्थिक विकासही खूप वेगाने होत आहे.

१९४८ ते १९५४ च्या दरम्यान इंग्लंडच्या राष्ट्रीय उत्पन्नात प्रत्यक्ष स्वरूपात २० टक्क्यांनी वाढ झाली. जगांतील सर्वांत उत्पादक अर्थव्यवस्था म्हणून

लौकिक असलेल्या अमेरिकेपेक्षा (२२ टक्के) हे प्रमाण फारसे कमी नाही. १९४८ पासून श्रमवर्षाचे दरडोई उत्पन्न प्रतिवर्षी २.२५ टक्क्यांनी वाढले असून पक्क्या मालाच्या उत्पादनात प्रतिवर्षी ३ टक्के वाढ झालेली आहे. युद्धपूर्व काळांतील वाढीपेक्षा ही वाढ जास्त आहे. १९०७ ते १९२४ या दरम्यानच्या काळांत इंग्लंड-मधील उद्योगधंद्यातील श्रमवर्षाचे दरडोई उत्पादन प्रतिवर्षी ०.५ टक्क्यांनी वाढले आणि १९३३ ते १९३९ या आर्थिक मंदीच्या तडाख्यातून सावरण्याच्या काळातही ही वाढ प्रतिवर्षी जवळजवळ २.५ टक्के इतकी होती.

ब्रिटनचे युद्धोत्तर काळातील उत्पादनाचे आकडे बघितले तर ते इतर देशांच्या मानाने बरे असल्याचे आढळून येईल. ओ. ई. ई. सी.चा सहावा अहवाल असे दर्शवितो की, कदाचित एक स्वीडनचा अपवाद वगळता युरोपातील इतर कोणत्याही देशापेक्षा इंग्लंडमधील औद्योगिक उत्पादकता युद्ध काळाच्या आधीपासूनच जास्त आहे आणि युद्धोत्तर काळांतील वाढ जवळजवळ अमेरिकेइतकी झालेली आहे.

यावरून हे स्पष्ट होईल की, ब्रिटिश अर्थव्यवस्था आता अगदी सुदृढ व उत्पादनक्षम झालेली आहे आणि जवळपासच्या काळात ती कोलमडून पडेल अशी चिन्हे दिसत नाहीत. माझे स्वतःचे असे मत आहे की, उत्पादन वाढीची गती तरी निदान खासच टिकून राहील आणि भविष्यकाळात बेकारीपेक्षा चलनवाढ अधिक दृष्टीस पडेल. या संबंधीचा उहापोह मी अर्थविषयक प्रकरणात केला आहे.

आर्थिक परिस्थितीत घडून आलेले हे स्थित्यंतर आणि त्यामुळे भविष्य-काळासंबंधीच्या विश्लेषणाचे बदललेले आरंभस्थान यामुळे युद्धपूर्व काळांतील यासंबं-धीचे बहुतेक वाङ्मय कालविसंगत वाटू लागते. भांडवलशाहीचा विनाश होणार यासंबंधी सर्व समाजवादी लेखकांत एकमत होते इतकेच नव्हे तर त्यांची विश्लेषण पद्धती, त्यांनी वर्तविलेले अंदाज आणि त्यांनी सुचविलेले उपाय या सर्वांच्या मुळाशी हे एकच मध्यवर्ती प्रमेय होते हे आज विसरले जाणे साहाजिक आहे. या भयानक परंतु आशादायक परिस्थितीमुळेच भविष्याविषयी त्यांना साहजिकच धास्ती वाटत होती हे खरे; परंतु प्रत्यक्ष निर्णय घेण्याच्या वेळी तोपर्यंत भेडसावणाऱ्या सर्व समस्या मागे पडलेल्या असल्या म्हणजे मनावरचा ताण नाहीसा होऊन मनोवृत्ती उल्हसित होतात तशीच त्या समाजवादी लेखकांची त्यावेळची मनोवृत्ती होती. पण तेव्हा-पासून त्यांना भेडसावणाऱ्या शत्रूने काढता पाय घेतला आहे इतकेच नव्हे तर त्याने आपले स्वरूपही बदलले आहे. आणि त्यामुळे सर्वस्व पणाला लावून त्याचा प्रतिकार करण्याचा आदेश मागे घेऊन कमी चित्तथरारक परंतु अधिक तपशीलवार अशी योजना आखणे त्यांना भाग पडले आहे.

## ३. व्यापारीवर्गाची युद्धपूर्वकाळातील सत्ता

सत्ताधारी भांडवलदार वर्गाच्या हातांत समाजाच्या सर्व नाड्या असतात

आणि सत्तेची जवळजवळ सर्व स्थान त्याच वर्गाने पटकावलेली असतात हे मार्क्सचे दुसरे गृहीतकृत्य असून युद्धपूर्व काळातील समाजवाद्यांनी केलेले बहुतेक विश्लेषण या गृहीतकृत्यावरच आधारलेले होते. पुढील कांही प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे मार्क्सचा वरील सिद्धांत वर्गीय पद्धती किंवा सत्तेचे वाटप यासंबंधीच्या विश्लेषणाच्या दृष्टीने आधारभूत म्हणून फारसा समाधानकारक नाही. त्याची व्याप्ती अत्यंत मर्यादित असून त्याने केलेले वर्गीकरणही अतिशय संकुचित स्वरूपाचे आहे.

तथापी आपण आर्थिक सत्तेचा फक्त एक विशिष्ट पैलूच तेवढा विचारात घ्यावयाचा असे ठरविले आणि आधुनिक समाजातील सत्तेचा सर्वकष विचार आपल्याला अभिप्रेत नाही हे स्पष्ट केले तर आपल्याला असे म्हणता येईल की युद्धपर्वकाळातील भांडवलदार वर्गाच्या हाती ही सत्ता खूप मोठ्या प्रमाणात केन्द्रित झाली होती आणि त्या वर्गाकडून तिचा वापरही बऱ्याच निर्घृणपणाने केला जात होता. ही सत्ता म्हटली म्हणजे उत्पादनविषयक ( उत्पादन करावयाचे किंवा नाही, करावयाचे झाल्यास ते किती, कसे, कोणत्या प्रकारचे आणि कोठे करावयाचे) आणि वितरणविषयक ( राष्ट्रीय उत्पन्नाचे निरनिराळ्या सामाजिक गटात करावयाचे वाटप) निर्णय घेण्याची, निदान त्याबाबत दडपण आणण्याची सत्ता होय. यापैकी वितरणापेक्षा उत्पादन विषयक निर्णय घेणे हे अर्थातच कितीतरी सोपे असते. अशा तऱ्हेची सत्ता गाजविण्यासाठी कारखाने किंवा उत्पादन केन्द्रे आणि सरकार म्हणजे परिमिती आणि केन्द्र या दोहोवरही परिणामकारक नियंत्रण असावे लागते.

युद्धपूर्व काळातील भांडवलदार वर्गाच्या हाती सर्वसामान्यपणे असे नियंत्रण होते. त्या वर्गाच्या हाती असलेली आर्थिक सत्ता कालांतराने लोकशाही भावना आणि सामाजिक जागृती, त्याचप्रमाणे राजकीय व औद्योगिक क्षेत्रातील डाव्या विचारसरणीच्या वाढत्या प्रभावामळे काही बाबतीत कमी होत गेली हे खरे; तथापी तांत्रिक आणि आर्थिक क्षेत्रात घडून आलेल्या स्थित्यंतरामुळे इतर बाबतीत तिची वाढ झालेली होती. मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंदे सुरू करण्याची प्रवृत्ती, त्याचप्रमाणे दोन युद्धांच्या दरम्यान वाढीस लागलेली मक्तेदारी यामुळे एकाच कारखान्याने किंवा एकवटलेल्या कारखान्यांच्या समूहाने घेतलेल्या निर्णयांचा समाजावर अधिकाधिक परिणाम घडून येऊ लागला होता. म्हणजेच काही मोठ्या व्यक्तींनी घेतलेल्या निर्णयाचे परिणाम त्यांच्या बहुसंख्य नागरिक बांधवांवर होऊ लागले होते. त्याचबरोबर स्पर्धेमुळे काही प्रमाणात टिकून राहणारा ग्राहकांचा प्रभाव मक्तेदारी पद्धतीमुळे कमी होऊ लागला होता.

परिमिती आणि केंद्र या दोन्ही ठिकाणी व्यापारी वर्गाची आर्थिक सत्ता कितपत प्रभावी होती त्याचा अंदाज १९३० साली घडलेल्या जेरो प्रकरणावरून येऊ शकेल. हे उदाहरण जसे काही बाबतीत प्रतीकात्मक तआहे तसेच काही बाबतीत

ते अत्यंत अपकारकही आहे. जेरो नावाच्या शहरावर दहा वर्षेपर्यंत शारीरिक दृष्ट्या बेकारीची आपत्ती कोसळलेली होती आणि दहा वर्षे मानसिक दृष्ट्या ते गाव निराशेने ग्रासलेल्या अवस्थेत होते. त्याची अशी अवस्था होण्याची कारणे दोन. एक : जवळजवळ सबंध गावाची उपजीविका ज्या गोदीवर अवलंबून होती ती गोदीच बंद करून टाकण्याचा घेण्यात आलेला निर्णय; आणि दोन : सर्वस्वी स्वतःच्या नियंत्रणाखाली असलेल्या घरच्या बाजार पेठेत खात्रीची माल विकण्याची संधी देण्यास नकार देऊन अद्ययावत स्वरूपाचा पोलाद निर्मितीचा कारखाना उभारण्यास केलेला मज्जाव.

निव्वळ आर्थिक दृष्टीने पाहता हा निर्णय चूक होता की बरोबर हा प्रश्न येथे महत्त्वाचा नसून आर्थिक सत्तेच्या वितरणावर त्याचे काय परिणाम घडून आले त्याला या ठिकाणी महत्त्व आहे. नॅशनल शिपबिल्डर्स सेक्युरिटी लि. आणि दि आयर्न अ‍ॅण्ड स्टील फेडरेशन या मक्तेदारी असलेल्या खाजगी कंपन्यांनी हे निर्णय घेतले होते. आणि ते घेतांना या कंपन्यांना तेथील कामगारांकडून, तसेच स्थानिक जनतेकडून तीव्र विरोध झाला होता. त्याचप्रमाणे जेरोच्या सुप्रसिद्ध मूक मोर्चासारखे नाट्यपूर्ण प्रसंग आणि स्थानिक जनतेला सहन कराव्या लागणाऱ्या हालअपेष्टांसंबंधी प्रसृत झालेल्या शेकडो हकीगती यामुळे जनमत चांगलेच प्रक्षुब्ध झाले होते. या सगळ्याला तोंड देऊन त्या कंपन्यांनी असे निर्णय घेतले ते केवळ अल्पकालीन नफ्यावर दृष्टी ठेवून. प्रतिपक्षाकडून केले जाणारे सामाजिक व मानवतावादी आवाहन आणि युक्तिवाद किंवा उत्पादनक्षमता आणि कारखान्याची जागा या दोन्ही दृष्टीने अत्यंत मोक्याच्या असलेल्या या महत्त्वाच्या उद्योगधंद्यामुळे सार्वजनिक हितावर होणारे दूरगामी परिणाम यापैकी कोणतीच गोष्ट विचारात घेण्याची त्यांना गरज वाटली नाही. आणि अखेर सर्व अर्ज विनंत्या आणि निषेध धाब्यावर बसवून सरकारच्या अनुमतीने ते निर्णय घेण्यात आले.

मंदीच्या प्रचंड लाटेमुळे जनमानसात चीड निर्माण झालेली असतानाही शासनकर्ते व्यापारी वर्गाच्या हितसंबंधापुढे कसे नमत होते ते सरकारने या प्रकरणी हस्तक्षेप करण्यास दिलेल्या नकाराने चांगलेच प्रत्ययास आणून दिले. उजव्या प्रवृत्तीच्या सरकारात मुख्यतः व्यापारी वर्गाचाच भरणा होता आणि खाजगी उद्योगधंद्यांच्या वैध ' राखीव कुरणात ' हस्तक्षेप न करण्याच्या ' स्थितिप्रिय ' धोरणास ती बांधलेली होती. आणि कधी हस्तक्षेप करण्यात आलाच तर तो खाजगी उद्योगधंदेवाल्यांच्या आर्थिक सत्तेवर मर्यादा घालण्यासाठी न करता उलट त्यांचे धोरण उचलून धरण्याला मदत करण्याच्या दृष्टीनेच करण्यात येई. संरक्षक जकाती, उद्योगधंद्यांना देण्यात येणारी मदत व ' मार्केटिंग बोर्डस् ' इत्यादींच्या स्वरूपात केला जाणारा हस्तक्षेप मुख्यतः संबंधित उत्पादकांच्या दडपणामुळेच करण्यात येई व त्यामागील उद्देशही त्या वर्गाच्या हातातील मक्तेदारी सत्ता दृढमूल करण्याचाच

असे. रोजगार उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत सरकारकडून कोठलेही प्रभावी धोरण– मग ते इतर राष्ट्रांनी मोठ्या प्रमाणावर हाताळून पाहिलेले मंदीची लाट थोपविण्यासाठी उद्योगधंद्यांचा विस्तार करण्याचे असो किंवा संकटग्रस्त विभागात नवे कारखाने उघडण्यापुरते मर्यादित धोरण असो– अंगिकारले जात नसे. यावरू-नच सरकार व्यापारी वर्गाच्या (तथाकथित) हितसंबंधांनाच कसे प्राधान्य देत असे त्याचे विदारक प्रत्यंतर येऊ शकेल.

## ४. व्यापारी वर्गाच्या हातातील सत्तेचे शासनाकडे संक्रमण

आज मात्र भांडवलदार व्यापारी वर्ग हे मोक्याचे सत्तास्थान गमावून बसला आहे. आर्थिक सत्तेच्या संतुलनात झालेला बदल पुढील तीन घटनात प्रतिबिंबित झाला असून तो कसकसा घडून आला त्याचा अंदाजही त्यावरून बांधता येतो. पहिली गोष्ट म्हणजे आर्थिक सत्तेची काही महत्त्वाची साधने आणि सूत्रे खाजगी भांडवलवाल्यांकडून इतरांच्या हाती गेली आणि काही नवीच सत्तास्थाने निर्माण झाली व तीही पुन्हा भांडवलदार वर्गाच्या हाती न राहता इतरांच्या हाती एक-वटली. दुसरी गोष्ट म्हणजे निरनिराळ्या गटात किंवा वर्गात होणाऱ्या संघर्षाची फलनिष्पत्ती पूर्वी इतकी खाजगी मालकांना फायदेशीर ठरेनाशी झाली. व तिसरी बाब म्हणजे भांडवलदार वर्गाच्या सामाजिक दृष्टिकोणात आणि वर्तनात महत्त्वपूर्ण परिवर्तन घडून आले असून त्यामुळे त्या वर्गाचे सामर्थ्य आणि आत्मविश्वास फार मोठ्या प्रमाणात कमी झाला आहे.

आर्थिक सत्तेच्या बाबतीत युद्धपूर्व काळापेक्षा आज शासनाचे कितीतरी अधिक नियंत्रण प्रस्थापित झालेले असल्यामुळे आर्थिक सत्तेवरील ताबा कमी होणे ही भांडवलदारांच्या दृष्टीने झालेली सर्वात मोठी हानी होय. एकूण नोकरदारांपैकी २५ टक्के लोकांची भरती सध्या शासनाधिकाऱ्यांकडून केली जाते आणि भांडवल गुंतवणुकीपैकी ५० टक्क्यांहून अधिक भांडवल गुंतवणुकीस तेच जबाबदार असतात. इतकेच नव्हे तर उद्योगधंदे हे नाममात्र खाजगी व्यक्तींच्या हातात असले तरी त्या बाबतचे निर्णय घेण्याची सत्ता ही मुख्यत्वेकरून शासनाधिकाऱ्यांच्याच हाती राहते. शासनाधिकाऱ्यांत शासनातर्फे चालविल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यांचाही समावेश होतो.

सर्वांना रोजगार उपलब्ध करून देणे, विकासाची गती ठरविणे, आयात निर्यातीतील फेरफारावद्दलचे पैसे देणे (Balance of Payment) आणि उत्पन्नाचे वितरण करणे या सर्वांची जबाबदारी शासनाने उचलल्यामुळेच हे घडून आले. ही जबाबदारी पार पाडण्याचे सरकारच्या हातातील मुख्य साधन म्हणजे सरकारचे अर्थविषयक धोरण. इतरही काही साधने सरकारच्या हाती असली तरी मुख्यत: अंदाजपत्रकाच्याद्वारा संपत्तीच्या वितरणावर सरकार हवे तेवढे नियंत्रण ठेवू शकते. त्याचप्रमाणे ठोकळमानाने एकूण उत्पादनाची विभागणी, विनिमय, गुंतवणूक, निर्यात

आणि सार्वजनिक खर्च यात कसे भागवावयाचे तेही निश्चित करू शकते.

फार मोठ्या प्रमाणावर अप्रत्यक्ष (विशेषत: खरेदीवरील) कर बसवूनच केवळ नव्हे तर (या करामुळे मागणीचे स्वरूप बदलते आणि त्यामुळे निरनिराळ्या प्रवृत्तीच्या उत्पादकांना त्याविषयी काहीसे आकर्षण वाटू लागते) त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे आर्थिक, कायदे विषयक, भौतिक व हप्तेबंदीच्या व्यवहारांवर नियंत्रण बसवून सरकार खाजगी उद्योगधंद्यांतील उत्पादनविषयक निर्णयावरही आपली जबरदस्त पकड ठेवते. अनेकदा या नियंत्रणाची अंमलबजावणी सरकारला कार्यक्षमतेने करता येत नाही आणि त्याबद्दल सरकारवर टीकेची झोड उठविली जाते. तथापी युद्धपूर्व काळांतील भांडवलशाहीच्या मानाने खाजगी भांडवलवाल्यांच्या स्वायत्ततेवर या नियंत्रणाच्या पद्धतीने सरकार पुष्कळच मर्यादा घालू शकते.

सरकार म्हणजे भांडवलदार वर्गाची 'कार्यकारी समिती' असे मार्क्सवादी मानीत असतात. त्या दृष्टीने सरकारचे धोरण जर केवळ खाजगी भांडवलवाल्यांच्या सत्तेला टेकू देणे किंवा त्यांच्या कृत्यांचा पाठपुरावा करणे येवढेच असते व त्यासाठीच जर सरकार आपले वजन खर्च करीत असते तर साहजिकच सरकारच्या वाढत्या वर्चस्वाला फारसा अर्थ उरला नसता. परंतु वस्तुस्थिती अर्थातच फार वेगळी आहे. सरकारचे धोरण किंवा दृष्टीकोण १९३० साली होता तसा आज खासच राहिलेला नाही. निवडणुकीद्वारे व्यक्त होणारे जनमत डाव्या विचारसरणीकडे झुकू लागले असल्यानेच मुख्यत: सरकारच्या धोरणात हा बदल घडून आला आहे. युद्धोत्तरकाळात सहा वर्षेपर्यंत मजूर पक्ष अधिकारावर होता यावरुन ज्या प्रमाणे हे दिसून येते त्या प्रमाणेच युद्ध पूर्वकाळाच्या मानाने हुजूरपक्षाच्या सरकारच्या मताधिक्यात जी घट होत गेली त्यावरुनही हे स्पष्ट होते. या दोन पक्षांच्या संख्याबलात आता फारच थोडे अंतर असल्याची सरकारला जाणीव असते. त्याचप्रमाणे नागरिकांच्या रोजगारीचे प्रश्न आणि समाजकल्याण याविषयी जनमानसात घडून आलेले मलभूत स्थित्यंतरही प्रकर्षाने जाणवत असल्यामुळे हुजूर पक्ष अधिकारावर आला तरी त्या पक्षाच्या सरकारकडून मजूर पक्षाच्या सरकारचे बदललेले धोरण तसेच चालू ठेवले जाते, त्यात पुन्हा बदल केला जात नाही. त्यासाठी अर्थातच सरकारला आर्थिक सत्तेचा ज्या प्रमाणात व ज्या दिशेने वापर करावा लागला तसा तो करण्याचे युद्धपूर्व काळातील हुजूर पक्षीय सरकारच्या कधी मनातही आले नसते.

निरनिराळ्या आर्थिक हितसंबंधांच्या गटांतील संघर्षाचा निकाल पूर्वीपेक्षा वेगळ्या प्रकारे लागू लागला हेच वस्तुत: हा बदल खरोखरीच घडून येत असल्याचे द्योतक आहे. संपत्तीच्या वाटपाबाबत निर्माण होणारे तंटे हेच मुख्यत: या संघर्षाचे स्वरूप असते. व्यक्तिगत उत्पन्नाचे फार मोठ्या प्रमाणावर पुनर्वितरण होऊ लागले असून फायद्याचा फार मोठा भाग कामगार वर्गात वाटला जातो आणि कारखान्याला तोटा आला तर त्याची झळ मात्र खाजगी संपत्तीवरील उत्पन्नाला

लागते, विशेषत: निव्वळ नफ्याच्या प्रमाणांत खूप घट होते हे पुढील प्रकरणात दाखवून देण्यात आले आहे. शिवाय उद्योगपतींकडून सतत विरोध होत असूनही युद्धपूर्व काळापेक्षा नफ्यावरील कराचे प्रमाण आता कितीतरी वाढले आहे. नफ्याच्या प्रमाणात घट होण्याचे ते देखील एक महत्त्वाचे कारण आहे. ज्याअर्थी खाजगी क्षेत्रांतील उद्योगपतींना कर आकारणी कमी करण्याची मागणी देखील सरकार-कडून मान्य करवून घेता येत नाही त्याअर्थी परिस्थितीत खरोखरीच कांहीतरी महत्त्वाचे स्थित्यंतर घडून आले आहे हे निश्चित.

मंदीच्या काळांत आर्थिक झळ कोणाला किती प्रमाणात बसली ते बघणे देखील महत्त्वाचे आहे. कारण अन्य कशापेक्षांही त्यावरूनच आर्थिक सत्ता नेमकी कोणाच्या हाती आहे त्याची कल्पना येऊ शकेल. युद्धपूर्वकाळात आर्थिक मंदीचा भार नेहमी कामगार वर्गालाच सहन करावा लागे. परंतु या बाबतींतील युद्धोत्तर परिस्थिती मात्र अगदी निराळी आहे. कामगार वर्गाविषयी विशेष पक्षपाती नसलेल्या एका चाणाक्ष निरीक्षकाने १९४७ च्या आर्थिक आरिष्टाच्या संदर्भात असे म्हटले आहे की, 'कामगार वर्गाला आर्थिक मंदीची झळ न पोहोच-ल्याची इंग्लंडच्या इतिहासांतील ही पहिलीच वेळ होय.' सुस्थितीत असलेल्या वर्गांत सरकारी धोरणाला निर्माण झालेला तीव्र विरोध हे देखील युद्धोत्तर काळांत, निदानपक्षी मजूर पक्षाच्या कारकिर्दीत घडून आलेल्या स्थित्यंतराचेच निदर्शक आहे. याबाबत 'तीव्र असंतोषापासून तो सखेदाश्चर्यापर्यंत' मध्यम वर्गाकडून सरकारबद्दल ज्या निरनिराळ्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या गेल्या त्याचे रहस्य देखील यांतच साठवलेले आहे. १९२१ सालच्या मंदीतही मध्यम वर्गाला तडाखा बसला होता, पण त्यावेळी कामगार वर्गालाही तशीच झळ सोसावी लागली होती... १९३१ मध्येही तीच परिस्थिती होती....परंतु आता मजूर सरकार 'समान त्यागाची' भाषा करीत असतांना कामगार वर्गाला मात्र कसलाही त्याग करावा लागत नव्हता. फार काय कामगारवर्गापैकी कोणावर बेकार होण्याची देखील पाळी आलेली नव्हती. टोरी सरकारच्या आमदानीत मध्यमवर्गीयांची परिस्थिती निश्चितच चांगली होती. तथापी १९२१ किंवा १९३१ ची पुनरावृत्ती होईल अशी आज कल्पनाही करता येणार नाही. संबंध राष्ट्रच आता डावीकडे झुकलेले असून त्यामुळे सत्ता समतोलावर घडून आलेला परिणाम हा कायम स्वरूपाचा राहणार आहे हे आता धरूनच चालले पाहिजे.

याचा दुसरा निकष म्हणजे सामाजिक आणि राष्ट्रीय दृष्टिकोन. याबाबत १९३० च्या काळांतील घटना आणि अपेक्षा या अगदी निरनिराळ्या होत्या. मजूर सरकारच्या काळांत तर त्यांत नि:संदिग्ध फरक होता. खाजगी उद्योधंदेवाल्यांकडून घटनाबाह्य विरोध झाला नाही तरी हिंसात्मक प्रतिकार झाल्यावाचून राहणार नाही अशी युद्धपूर्वकालीन समाजवाद्यांची समजूत होती. भांडवल एक तर परदेशांकडे

वळविले जाईल किंवा स्वदेशांत भांडवलाचा संप होईल म्हणजेच भांडवल गुंतवणूक हाणून पाडली जाईल असा जो सिद्धांत मांडला जात असे तो देखील वरील समजुतीवरच आधारलेला होता. परंतु प्रत्यक्षात घडले ते मात्र अगदीच निराळे. भांडवल इतक्या मोठ्या प्रमाणावर गुंतविले जाऊ लागले की, शेवटी त्यावर निर्बंध बसवावे लागले. राष्ट्रीयीकरणाच्या विरोधकांनी आरडाओरडा जरी खूप केला तरी त्यांनी हिंसक मार्गाचा अवलंब कधीच केला नाही. व्यापारी संस्था व कंपन्यांकडून मजूर सरकारला समंजसपणे सहकार्य मिळत गेले. घातपाती कृत्ये करण्याचे कोणाच्या मनांतही आले नाही आणि एकंदरीने वातावरण सहकार्याचे आणि सामंजस्याचेच राहिले. मात्र त्यांत भयग्रस्ततेची छटा कधी कधी दृष्टीस पडे.

एक परीने युद्धपूर्वकाळांत मार्क्सवाद्यांनी केलेल्या विश्लेषणाच्या असंभाव्यतेची ही प्रतिक्रिया होती. परंतु त्याबरोबर सत्तेचा समतोल बदलल्याची उद्योगपतींना जी जाणीव झाली होती त्याचाही त्यांत भाग होता. उद्योगधंदेवाल्यांना झालेल्या या जाणीवेचा (त्याचप्रमाणे उद्योगधंद्यावरील भांडवलदारी पगडा कमी होत चालल्याचा) प्रत्यय प्रकर्षाने आला तो क्रिप्सच्या अमदानीत भाडवलदारांनी नफ्यावरील निर्बंध स्वीकारण्यास आपणहून संमती दिली तेव्हा. भांडवलदारी वृत्तपत्रातून त्याविरुद्ध खूप ओरड झाली. परंतु प्रत्यक्षांत मात्र भांडवलदारांकडून विलक्षण सहकार्य मिळत गेले. भांडवलदार वर्गाचा आत्मविश्वास नष्ट होत चालल्याचेच हे द्योतक होते. कंपन्यांचे अध्यक्ष वार्षिक सभांच्या वेळी केलेल्या अध्यक्षीय भाषणांतून याविरुद्ध तावातावाने बोलत असले तरी प्रत्यक्षांत मात्र त्यांची पावले आक्रमक कृतीच्या नेमकी उलटी पडत असत.

सरकारकडून व्यापक अशा आर्थिक सत्तेचा वापर केला जाऊ लागला आणि तो सुद्धा खाजगी उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्याऐवजी अन्य हेतूने करण्यात येऊ लागला ही वस्तुस्थिती युद्धपूर्व काळांतील वर्गीय सत्तेचा अर्ध–मार्क्सवादी सिद्धांत कालविसंगत आणि टाकाऊ झाल्याचे सिद्ध करण्यास पुरेशी आहे. 'शासनाचे स्वरूप कोणतेही असले तरी आर्थिक सत्ता ज्यांच्या हातात असेल त्यांच्याच हाती राजकीय सत्ता राहणार' असे लास्कीने १९३७ साली लिहून ठेवले आहे. नाझीवाद किंवा फासिझम यांचा इतिहास लक्षांत घेता त्यावेळी देखील हे विधान पटण्यासारखे नव्हते. परंतु अशा तऱ्हेची दिशाभूल करणारी साधी विधाने करावयाचेच ठरले तर लास्कीचेच विधान उलट करून असे म्हणता येईल की, आर्थिक उत्पादनाची पद्धत कोणतीही जरी असली तरी प्रत्यक्षात आर्थिक सत्ता ही ज्यांच्या हातांत राजकीय सत्ता असेल त्यांच्याच हाती राहणार. आणि राजकीय सत्ता आज पूर्वीच्या भांडवलदारांच्या हाती निश्चित राहिलेली नाही.

## ५. राष्ट्रीयीकरणाचे सत्तावितरणावरील परिणाम

मूलभूत उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणामुळे आर्थिक सत्तेचे हस्तांतर

होण्यास आणखी चालना मिळाली. त्यामुळे भांडवलदार वर्गाच्या हातातील सत्ता पुष्कळच कमी झाली. परंतु सत्तांतराबाबत यापेक्षा अधिक स्पष्टीकरण करता येणार नाही. कारण राष्ट्रीयीकरणामुळे सत्ता कोणाच्या हातातून गेली याबाबत सर्वांचे एकमत होऊ शकले तरी ती कोणाला मिळाली याबाबत मात्र सर्वांचे एकमत होईलच असे नाही. सध्या राज्यकर्त्यांच्या हाती मंत्रालयातर्फे आदेश देण्याचे, संसदीय चर्चा घडवून आणण्याचे आणि प्रवर समित्यांच्या द्वारा एखाद्या प्रश्नाची चौकशी घडवून आणण्याचे अधिकार आहेत हे खरे; परंतु त्याचबरोबर राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगधंद्यांची अनेक महामंडळे सतत अगदी स्वतंत्रपणे आपला कारभार चालवीत असतात आणि त्यामुळे कामगार, राजकीय नेते आणि अर्थशास्त्रज्ञ या सर्वांकडून त्यांच्या विरुद्ध आवाज उठविला जातो. काही मंडळींना असे वाटत असते की, ही महामंडळे सरकारला जेवढी जबाबदार असावयास पाहिजेत तेवढी ती असत नाहीत आणि त्यांच्यावर सरकारची पुरेशी सत्ता चालू शकत नाही. खाजगी उद्योगधंद्यांच्या व्यवस्थापनावरही सरकारचे यापेक्षा अधिक नियंत्रण असते.

यावरून असे दिसून येईल की, व्यवहारतः मूलभूत उद्योगधंद्याच्या क्षेत्रात आर्थिक निर्णय घेण्याची सत्ता भांडवलदार वर्गाकडून सामाजिक उद्योधंद्यातील स्वायत्त व्यवस्थापकांच्या वर्गाकडे हस्तांतरित झाली आहे. परंतु त्याचबरोबर या नव्या व्यवस्थापकांवरही राज्यकर्त्यांचा निःसंदिग्ध कायदेशीर अधिकार चालतो. पुष्कळवेळा ते त्या अधिकाराचा उपयोग करीत नाहीत ही गोष्ट वेगळी. युद्धोत्तर काळात घडून आलेल्या स्थित्यंतरानुसार शासनाच्या हाती अधिक आर्थिक सत्ता आलेली आहे हे निश्चित—आर्थात ही आर्थिक सत्ता मिळविण्याचा राष्ट्रीयीकरण हाच एकमेव किंवा सर्वोत्कृष्ट मार्ग आहे किंवा नाही हा भाग निराळा.

## ६. व्यवस्थापक वर्गाकडून सत्तेचे कामगार वर्गाकडे हस्तांतर

तिसरी गोष्ट म्हणजे उद्योग धंद्यात सत्ता निश्चतपणे व्यवस्थापकांकडून कामगार वर्गाकडे सरकू लागली आहे. सर्वांना रोजगार मिळू लागल्यामुळे आपली श्रमशक्ती कोणाला व कधी विकावयाची ते ठरविण्याची संधी कामगार वर्गाच्या हाती आली असल्याचाच हा मुख्यतः परिणाम आहे.

अर्थात कामगार किंवा मालक यांचे बलाबल हे काही केवळ मजुरांच्या बाजारपेठेतील परिस्थितीवरूनच ठरत नाही. राजकीय समतोल, सामाजिक वातावरण, दोन्ही पक्षांची संघटनात्मक ताकद तसेच एका बाजूला कामगार वर्गाचे वेतनमान आणि दुसऱ्या बाजूला नफा, रोजगाराची उपलब्धता किंवा गंगाजळी यांच्या परस्पर संबंधांवरही ते अवलंबून असते. १९३९ पूर्वीही या सर्व बाबतीत कामगार वर्गाच्या दृष्टीने फायदेशीर असे स्थित्यंतर घडून आले होते. परंतु तरी देखील मोठ्या प्रमाणावरील बेकारीमुळे कामगार संघटनांची ताकद फारच मर्यादित होती.

त्यामुळे संघर्षातील दोन बाजूंपैकी कामगार वर्गाचे पारडे उघडच हलके होते आणि याची त्यांनाही जाणीव होती.

ग्राहकांना अनुकूल असलेली कामगारांची बाजारपेठ विक्रेत्यांना अनुकूल झाल्याबरोबर दोन्ही बाजूंच्या वृत्तीत आणि हितसंबंधात अदलाबदल घडून आली आणि त्यामुळे साहजिकच औद्योगिक संबंधाच्या प्रत्येक पातळीवर सत्ता समतोलात नाट्यपूर्ण स्थित्यंतर घडून आले.

व्यक्तिगत कामगारांच्या बाबतीत घडून आलेला निर्णयात्मक बदल हा त्यांच्या बडतर्फीच्या संबंधातील होता. युद्धपूर्व काळात एकाद्या कामगाराला नोकरी-वरून काढून टाकण्यात आले तर त्याला दीर्घकालपर्यंत बेकार रहावे लागत असे. पण आता त्याला चटकन अन्यत्र नोकरी मिळू लागली. परिणामतः त्याला नोकरीवरून काढून टाकले तर कसे होईल अशी भीती वाटेनाशी झाली. त्यामुळे साहजिकच नरमाईही नष्ट झाली. त्याच्या उलट युद्धपूर्वकाळात एकाद्या कामगा-राला काढून टाकले तर त्याच्या जागी शेकडो कमागार नोकरीसाठी अर्ज घेऊन उभे असत. त्यामुळे कामगार मिळण्याबाबत मालक बेफिकीर असे. परंतु आता काढून टाकलेल्या कामगारांच्या जागी भरती करण्यासाठी मालक वर्गाला दुसरा माणूस मिळेनासा झाला असल्यामुळे मालक कामगाराला कढून टाकावयास सहसा तयार नसतो आणि कामगाराऐवजी मालकावरच आता नरमाईची पाळी येते. अशा तऱ्हेने फायद्या–तोटयाच्या बाजू नेमक्या उलटया झाल्या असून त्यामुळे कारखान्यातील परस्पर संबंधातही स्थित्यंतर घडून आले आहे.

कारखाना किंवा कंपनीच्या पातळीवरून या प्रश्नाचा विचार केला तर असे दिसून येईल की मुख्य फरक पडला आहे तो संप आणि टाळेबंदी या दडपण आण-ण्याच्या अंतिम हत्यारांचा वापर करण्याच्या बाबतीतील दोन पक्षांच्या बदललेल्या मनोवृत्तीत. बेकारी असेल तर मालकवर्ग संपाला तोंड देऊ शकतो, इतकेच नव्हे तर टाळेबंदीही करू शकतो. अशावेळी कामगार आणि मालक यांच्या लढतीत परि-स्थिती मालक वर्गाला अधिक अनुकूल असते. कारण गुदामात माल पडून असतांना आणि बाजार अनुकूल नसतांना संप होऊन कारखान्याचे काम बंद पडले तरी फारसे नुकसान होत नाही. परंतु या उलट हव्या तेवढ्या नोकऱ्या मिळू शकत असतील तर मात्र हे चित्र पार बदलून जाते. कारण मग कामगार वर्ग आपले संप–लढे दीर्घकालपर्यंत चालवू शकतो. परंतु मालाचा साठा कमी असल्यामुळे व बाजारभाव चढे असल्यामुळे मिळावयाचा नफा हातचा गेल्यामुळे मालक वर्गाला अतोनात नुकसान सोसावे लागते. त्यामुळे मालक वर्गाकडून कामगार संपावर जाऊ नयेत म्हणून अधिकाधिक धडपड चाललेली असते तर तितक्याच प्रमाणात संपात कामगारांचा विजय होण्याची शक्यता वाढलेली असते. सत्ता सम-तोलावर याचे परिणाम घडून येतात ते अगदी उघड आहे.

उद्योगाच्या पातळीवरही हे निष्कर्ष लागू पडतात व सहाजिकच वेतन निश्चितीवरही त्याचा परिणाम घडून येतो. शिवाय पुऱ्या रोजगारीमुळे भरपूर नफा मिळत असल्यामुळे मालक वेतनाचे बाबतीत आधिकाधिक सवलती देण्यास सहाजिकच तयार होतात. कारण वाढीव वेतनाचा बोजा ग्राहकांवर टाकला जातो किंवा उत्पादकता वाढीत सामावला जातो. आर्थिक मंदीच्या काळात हे होऊ शकत नाही. पुऱ्या रोजगारीमुळे निर्माण झालेली बाजारातील वाढती मागणी पुरी करण्यासाठी कामगारांची इतकी प्रचंड मागणी असते की, मालक स्वतःच अनेकदा कामगारांचे पगार कधी कधी गुप्तपणे वाढवून देतात.

युद्धपूर्वकाळापेक्षा कामगार–व्यवस्थापक लढ्याचे निकाल नंतरच्या काळात वेगळे लागू लागले यावरून सत्तेचे केन्द्र बदलत असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. बहुतेक महत्त्वाच्या उद्योगधंद्यात आता कामगार वर्गाकडून दरवर्षी करण्यात येणाऱ्या पगारवाढीच्या मागण्या मालक वर्गाकडून सतत मान्य केल्या जातात. अर्थिक बाबीवरील टीकाकार त्याबाबत एकसारखी चिंता व्यक्त करू लागले आहेत. पुन्हा पुन्हा केल्या जाणाऱ्या नवनव्या पगारवाढीच्या मागणीबद्दल अर्थविषयक नियतकालिकातून टीकेची झोड उठविण्यात येते व ही मागणी अवास्तव आणि धोकादायक असल्याचे प्रतिपादण्यात येते. परंतु काही आठवड्यांचा काळ लोटल्यानंतर विशेष गडबड न करता मालक कामगारांच्या मागण्या उदारपणे मान्य करून टाकतात. भरभराटीच्या दोन टोकाला असलेल्या एंजिनियरिंग आणि रेल्वे या दोन प्रमुख उद्योगधंद्यांचा विचार केला तर औद्योगिक सत्तेचा केन्द्रबिंदू नेमका कोठे आहे याविषयी त्या धंद्यांतील कामगार संघटनांना फारशी शंका आहे असे दिसत नाही. पूर्ण रोजगाराच्या शाश्वतीमुळे कामगार संघटनांना सौदा पटविण्याचे जे सामर्थ्य प्राप्त झाले आहे त्याचा ते दुरुपयोग तर करणार नाहीत ना या भीतीने सामान्य जनता खरोखरीच अधिक अस्वस्थ झाली आहे.

संप आणि टाळेबंदी यांची परिणतीही युद्धपूर्व काळापेक्षा आता अगदी वेगळ्या प्रकारे होऊ लागली आहे. खरे म्हणजे मालक वर्गाने आता टाळेबंदीचा अवलंब करण्याचे जवळ जवळ सोडून दिले आहे तर पहिल्यापेक्षा कितीतरी जास्त संपात व्यवस्थापक नरमाईची भूमिका स्वीकारून खाली आलेले दिसतात. वस्तुस्थिती अशी आहे की, मालक वर्गाने कोणाला आणि कितीजणांना कामावर घ्यावयाचे यासंबंधीचे आपले मूलभूत अधिकारच काही प्रमाणात सोडून दिले आहेत. अनेकदा या दोन्ही बाबतीत व्यवस्थापकांनी घेतलेले निर्णय संपाची लाट उसळेल किंवा एकाद्या विशिष्ट कामगाराला काढून टाकल्याच्या कारणावरून सारा कारखाना बंद पडेल या भीतीने फिरवले जातात. कामगार वर्गाची वेतनगुलामी या परिस्थितीत कुठे उरली असे आता विचारावे लागेल.

कामगार संघटना आणि हुजूर पक्षीय सरकार यांच्या संबंधात प्रत्यक्ष धोरण

आणि सामाजिक दृष्टीकोन यांच्या संदर्भात तर हा फरक विशेषच जाणवतो. शांतता-पूर्ण क्रांतीचे उदाहरण म्हणून त्याचा उल्लेख केला तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही. १९२१, १९२५–२६ किंवा २७ साली ज्याप्रमाणे कामगारांच्या संघटना मोडून काढण्यासाठी सरकार आणि मालक यांच्यात जाणून बूजून आक्रमक दोस्ती झाली आणि त्या दोघांनी मिळून पगार कपात, राष्ट्रीय स्वरूपाची टाळेबंदी आणि संघविरोधी कायदे यांचा सर्रास उपयोग केला किंवा खाणकामगारांचा तीव्र विरोध असतांना कोळशाबाबत कामगार विरोधी धोरण अवलंबिण्यासारख्या ज्या अनेक घटना १९२० ते १९३० च्या दरम्यान घडल्या त्यांची यापुढे पुनरावृत्ती होईल असे आता कोणाच्या मनातही येणार नाही.

उलट सध्याचे व्हाईट हॉलमधील वातावरण कामगार वर्गाला मानाची वागणूक देण्याचे असून त्याला न दुखावण्याचे धोरण स्वीकारल्याचे अगदी स्पष्ट दिसत आहे. पंतप्रधानांच्या निवासस्थानी अत्यंत स्नेहपूर्ण वातावरणात बैठकी होत असल्याचे पहावयास मिळत आहे. संघाबरोबर सल्लामसलत न करता आपल्या कारखान्यात जरूरीपेक्षा जास्त कामगार कामावर आहेत असे जाहीर केल्याबद्दल एका हुजूर पक्षीय मंत्र्याने त्या कारखान्याच्या चालकांना जाहीरपणे धारेवर धरले होते. दुसऱ्या एका मंत्र्यांपुढे खाण कामगारांची राष्ट्रव्यापी संघटना आणि आपल्याच पक्षातील मागे बसून टीका करणाऱ्या सभासदांचा दबाव गट यापैकी कोणाचे ऐका-वयाचे असा पेच उभा राहिला असता त्याने यूनियनच्या शब्दाला मान देण्याचा निर्णय अगदी निःसंदिग्धपणे घेऊन टाकला. कामगार संघटनांकडून योजल्या जाणाऱ्या निर्बंधात्मक उपायांचा 'मोनॉपोलीज कमिशन'च्या (मक्तेदारी विषयक आयोग) आधिकार क्षेत्रात समावेश करण्यास मंत्रीमंडळाने सक्त विरोध दर्शविला आहे. कामगार संघटनांबरोबर अत्यंत आस्थापूर्वक वाटाघाटी केल्यानंतरच औद्योगिक कायदे करण्यासंबंधीचा निर्णय घेतला जातो. १९५५ साली म्हणजे 'ट्रेड डिस्प्यूट अॅक्ट' (औद्योगिक विवाद कायदा) पास झाल्यानंतर बरोबर अठ्ठावीस वर्षांनी आजचे हुजूर पक्षीय सरकार लोकांमध्ये खूप ओरड चालली असतांना अनधिकृत संप 'बेकायदेशीर' ठरविण्याच्या सूचनेला विरोध करण्यास सज्ज झाले आहे.

## ७. उद्योगधंद्यातील मानसिक क्रांती आणि नफ्याचे बदललेले स्थान

आतापर्यंत आपण उद्योगपतींच्या हातातील आर्थिक सत्ता त्या वर्गाच्या बाहेरील घटकांकडे कशी गेली ते पाहिले. परंतु उद्योगधंद्यात घडून आलेल्या अंतर्गत स्थित्यंतरामुळेही अन्य क्षेत्रातील व्यवस्थापकीय वर्गाच्या तुलनेने भांडवलदार वर्गाच्या सत्तेलाच अधिक कात्री लागली आहे. युद्धापूर्वीही या बदलाची चिन्हे स्पष्टपणे दिसू लागली होती, परंतु गेल्या दहा वर्षात तर त्याला चांगलीच चालना मिळाली आहे.

आधुनिक काळातील उद्योगधंद्यांचा वाढता व्याप, त्यातील गुंतागुंत आणि

तांत्रिक कौशल्याची गरज यामुळे उद्योगधंद्याबाबतच्या निर्णयांना एक विशिष्ट स्वरूप प्राप्त झाले आहे. एखादा माणूस बुद्धिमान असला परंतु त्या धंद्याच्या व्यवहाराबाबत तज्ञ नसला तर तो निरुपयोगी ठरू लागतो आणि कित्येकदा अगदी उच्चपदस्थ तज्ञ प्रशासकाला देखील आपले निर्णय (विशेषत: भांडवल गुंतवणुकीच्या बाबतीतील) तांत्रिक किंवा संशोधनात्मक बाबींच्या विचारांवर अवलंबून ठेवावे लागतात. याचा परिणाम असा होतो की, अंतिम सत्ताही त्या उच्चपदस्थ 'सामान्य' (तज्ञ नसलेल्या) व्यवस्थापकांच्या हाती असली तरी तंत्रज्ञ आणि विशेषज्ञ म्हणजेच संघटनेच्या प्रमुखस्थानी असलेल्या (किंवा आजकालच्या अमेरिकन परिभाषेत बोलावयाचे तर 'लाँग हेअर्ड नो हौंचे') यांत्रिकी अभियंता, रसायन शास्त्रातील संशोधक, बाजार पेठांसंबंधीचा तज्ञ, कंपनीचा वकील या सारख्यांना भांडवलदार किंवा व्यवस्थापक यांच्याहूनही अधिक महत्त्व प्राप्त होते. निर्णय घेण्याच्या कार्यास काही प्रमाणात घडून आलेल्या या स्थित्यंतरामुळे नवीन तऱ्हेचा दृष्टीकोण आणि गुणवत्ता असलेली माणसे असावी लागतात. सहाजिकच पूर्वापार परंपरेतील भांडवलदारांपेक्षा त्यांचे हितसंबंध आणि उद्देशही निराळे असावे लागतात. या स्थित्यंतराचे एक दृश्यस्वरूप म्हणजे वैज्ञानिक आणि तंत्रविशारद यांच्या संचालक मंडळावर होणाऱ्या वाढत्या नेमणुका.

पण उच्चपदस्थ व्यवस्थापकीय वर्गाच्या मन:प्रवृत्तीत आणि उद्दिष्टात जो बदल घडून येतो तो कितीतरी अधिक महत्त्वाचा आहे. अर्थात अनेक समाजवादी हे मान्य करावयास तयार नसतात. उद्योगधंद्यातील प्रशासकीय वर्गाच्या धाटणीत जो बदल निश्चितपणे घडून आलेला दिसतो तो पूर्णांशाने नसला तरी काही प्रमाणात तरी याचाच परिणाम म्हटला पाहिजे. मालक आणि व्यवस्थापक वर्गाची झालेली फारकत आणि अनेक जणांत विभागलेल्या भाग भांडवलावर उभारलेल्या जॉइंट स्टॉक कंपन्यांची तुलनात्मक वाढ ही अर्थात युद्धपूर्व कालापासूनच जाणवू लागली होती. परंतु या वाढीच्या प्रक्रियेला आता अधिक वेग आला आहे. त्याचप्रमाणे उद्योगधंद्यांसाठी भासणारी अधिकाधिक पैशाची आवश्यकता पुरी पाडण्यासाठी सार्वजनिक कंपन्यांपेक्षा छोट्या भांडवलदारांवर अधिक बोजा पडणारी करपद्धती, त्याचप्रमाणे खाजगी कंपन्यांचे सार्वजनिक कंपन्यात रूपांतर घडवून आणणारा मृत्यू–कर यामुळे हा वेग आला आहे. उद्योगधंद्यातील प्रमुख व्यक्तींना पूर्वी नफा मिळत असे त्याऐवजी आता मुख्यत्वेकरून वेतन मिळते. आणि त्यांच्या हातातील अधिकारही मालकीपेक्षा व्यवस्थापन क्षेत्रातील त्यांच्या स्थानावरून ठरत असतो. युद्धपूर्व काळात मालकवर्ग आपले जे अधिकार टिकवून होता तेही आताच्या तथाकथित मालकांच्या हाती राहिलेले नाहीत.

उद्योगधंद्यातील आजच्या वरिष्ठ व्यवस्थापकांवर त्यांच्या कारखान्यातील भागधारकांचा ताबा राहिलेला नाही. इतकेच नव्हे तर एकंदरीनेच भांडवल पुर-

विणाऱ्या संस्थांप्रमाणेच भांडवलदार आणि संपत्तीधारकांपासून ते अधिकाधिक प्रमाणात स्वतंत्र होऊ लागले आहेत. दोन युद्धांच्या मध्यंतरीच्या काळाशी तुलना करता आज नफ्यातील अधिकांश भाग पुन्हा त्याच धंद्यात गुंतविला जातो आणि धंद्यासाठी लागणाऱ्या भांडवली खर्चासाठी बाहेरून भांडवल आणण्यापेक्षा जास्त करून त्या धंद्यातील पैशातूनच तो भागविला जातो. उद्योगधंद्यांना अधिकाधिक प्रमाणात शहरे आणि तेथील पतपेढ्या यावर विसंबून राहणे भाग पडू लागल्याने भांडवलशाहीचे रूपांतर 'आर्थिक भांडवलशाहीत' होईल असे जे भाकित मार्क्सने वर्तविले होते तसे इंग्लंडमध्ये पूर्णांशाने कधीच घडून आले नाही. परंतु मंदीमुळे निर्माण झालेल्या आर्थिक अडचणीमुळे युद्धपूर्वकाळात तशी चिन्हे दिसू लागली होती आणि काही महत्त्वाच्या उद्योगधंद्यात तर व्यवस्थापक वर्गावर बाह्य आर्थिक दड-पणाचा ताबडतोब परिणाम घडून येत असे.

गेली दहा वर्षे उद्योगधंद्यांना उपभोगावयास मिळालेली सुबत्ता आणि वाढते नफे आणि त्याच्या जोडीला भाग भांडवलदारांना कमी प्रमाणात वाटावा लागलेला लाभांश त्यामुळे बहुतेक सार्वजनिक कंपन्यांची आर्थिक स्थिती खूपच मजबूत झाली असून पहिल्यापेक्षा अधिक स्वतंत्रपणे त्यांना काम करता येऊ लागले आहे. करांचा बोजा वाढला असला तरी वाटून न टाकला गेलेला नफा (सबंध उद्योगधंद्यांचा विचार करता) सामान्यतः त्या देशातील सर्व उद्योगधंद्यातील भांडवल उभारणी-साठी पुरेसा होतो इतकेच नव्हे तर त्यातील बरीच रक्कम शिल्लक राहते. काही कंपन्यांना अर्थातच कर्ज उभारण्याची किंवा नवीन भाग भांडवल विक्रीस काढण्याची आवश्यकता भासते. परंतु अशा भांडवलापेक्षा त्या कंपनीची स्वतःची शिल्लक युद्ध-पूर्व काळापेक्षा आता अधिक असते. साहजिकच भांडवलाची बाजारपेठ किंवा भांडवलाचा पुरवठा करणाऱ्या मोठमोठ्या पेढ्या या आता पुष्कळ कमकुवत झालेल्या आहेत आणि त्यामुळे भांडवलदारांचे उद्योगधंद्यांवरील आर्थिक प्रभुत्वही पहिल्या-इतके राहिलेले नाही. या एका बदलामुळे देखील सत्ताधारी भांडवलदार वर्ग असा शब्दप्रयोग करणे हे असमंजसपणाचे होऊन बसले आहे.

भांडवलदार वर्गाचे प्रभुत्व कमी झाले असले तरी अर्थातच नफ्याची प्रवृत्ती नष्ट झाली आहे किंवा नफ्याला आता महत्त्व राहिलेले नाही असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. खर्चावरील वाढावा यादृष्टीने नफ्याचे भांडवलशाहीशी काही विशेष नाते किंवा संबंध असतो असे मानणे चूक आहे. उलट वर्धिष्णू आणि गतिमान अशा कुठल्याही समाजातील, मग तो समाज भांडवलदारी असो वा समाजवादी असो, औद्यो-गिक व्यवहाराचा मूलाधार नफा हाच असतो. परंतु उद्योगधंद्यावरील मालकी आणि त्याचे व्यवस्थापन या बाबी सर्वस्वी भिन्न झाल्यामुळे नफ्याचे कार्यही बदलते आणि त्याचा परिणाम म्हणून पुन्हा नफ्याची विभागणी आणि जास्तीत जास्त नफा कमा-वण्यासाठी आटापीटा करण्याची प्रवृत्ती यातही बदल घडून येतो.

सध्याच्या काळातील उद्योगपती नफ्याकडे व्यक्तिगत उत्पन्नाचे किंवा उपभोगाचे साधन म्हणून बघत नाहीत. उद्योगधंद्यावर त्यांची मालकी नसल्याने पूर्वीच्या भांडवलदारांप्रमाणे स्वतःच्या चैनीसाठी ते मोठमोठ्या रकमांची उचल करू शकत नाहीत. तसेच जास्त नफा कमाविण्यासाठी भागधारकांना जास्तीत जास्त नफा वाटता यावा असाही त्यांचा उद्देश नसतो. दूरवर पाहता कंपनीच्या यशावरच त्यांचा स्वतःचा मेहनताना किंवा पगारमान अवलंबून असल्यामुळे तो जास्तीत जास्त नफा मिळविण्याच्या मागे असतो हे काही प्रमाणात खरे असले तरी कंपनीला मिळणाऱ्या नफ्याच्या प्रमाणावरच आपली सामाजिक प्रतिष्ठा, अधिकार आणि लौकिक प्रत्यक्षपणे अवलंबून असल्याची जाणीवही प्रामुख्याने त्यामागे असते. नफा हा ज्याप्रमाणे उद्योगधंद्याची यशस्विता अजमावण्याचा रूढ निकष आहे त्याचप्रमाणे औद्योगिक सत्ता प्राप्त करून घेण्याचे ते एक साधनही आहे. नफ्यावरून त्या कारखान्याची ताकद आणि प्रतिष्ठा ठरविली जाते, तशीच त्या कारखान्याच्या प्रशासकांची प्रतिष्ठा आणि सत्ता ही देखील नफ्यावरूनच ठरविली जाते. अशा तऱ्हेने नफा ही मूलतः व्यक्तिगत आणि सामुदायिक प्रेरणा असली तरी सामर्थ्य आणि सत्ता यांचेही ते फार प्रभावी असे साधन आहे. भांडवलदारांच्या खास उपभोगाचे एक साधन म्हणून त्याकडे बघता येणार नाही. उत्पन्नाच्या वितरणावरही त्याचे फार दूरगामी परिणाम घडून येतात. हे भागधारकांच्या पुरस्कर्त्यांच्या सहज लक्षात येईल किंवा भागधारकात वाटल्या जाणाऱ्या नफ्याच्या आकड्यावरूनही त्याची कल्पना येऊ शकेल.

या स्थित्यंतराचा आणखी एक परिणाम असा घडून येतो की, जास्तीत जास्त नफा कमाविण्यासाठी काय वाटेल ते करण्याच्या प्रवृत्तीला आळा बसतो. सामाजिक प्रतिष्ठेचे एक साधन म्हणून नफ्याकडे बघितले जाते. परंतु कल्याणकारी राज्यात नफा हे सामाजिक प्रतिष्ठेचे एकमेव साधन मानले जात नाही. कामगारांना आपल्या कारखान्यात भागीदारी देणारा किंवा नफ्यात वाटेकरी करून घेणारा पुरोगामी मालक असा लौकिक प्राप्त करून घेण्यानेही उद्योगपतींची समाजातील प्रतिष्ठा वाढते. त्याचबरोबर 'व्हाइट हॉल'मध्ये वजन असणे किंवा मंत्र्यांबरोबर ऊठबस करणे, 'रॉयल कमिशन' अथवा एखाद्या राष्ट्रीय सल्लागार समितीवर वर्णी लागण्याची पात्रता असणे, किंवा स्थानिक राजकारणात अत्यंत ख्यातनाम असणे, विश्वविद्यालयाच्या 'कोर्टा'चा सभासद असणे, त्याचप्रमाणे देशभक्त म्हणून प्रसिद्धी पावणे, 'ब्रिटिश प्रॉडक्टिव्हिटी कौन्सिल'सारख्या संस्थांच्या कामात पुष्कळसा वेळ खर्च करणे इतकेच नव्हे तर 'बँक रिव्ह्यू'सारख्या नियतकालिकांतून लेख लिहून किंवा 'ब्रिटिश इंस्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट'सारख्या संस्थांतून अथवा ऑक्सफर्डच्या 'नफिल्ड अधिवेशनात' भाषणे देऊन विचारवंत म्हणवून घेणे ही देखील सामाजिक प्रतिष्ठेची साधने होऊन बसली आहेत. अशा प्रकारचे कार्यक्रम मोठ्या प्रमाणावर

घडून येऊ लागले असून ते अधिकाधिक मान्यता पावत आहेत.

सामाजिक वातावरणात फार मोठे स्थित्यंतर घडून येत असून औद्योगिक क्षेत्रातील निर्णयावरही त्याचे पडसाद उमटत आहेत हेच या सर्व घटनांवरून सिद्ध होते अशी माझी समजूत आहे. खाजगी उद्योगधंदेवाल्यांना आजकाल जनमताची फार धास्ती वाटते आणि सरकार किंवा कामगार यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे दडपण येण्याची भीती नसताना देखील आपण केलेली एखादी गोष्ट जनतेच्या दृष्टीने सार्वजनिक हिताची ठरेल की नाही याचाच त्यांना घोर लागलेला असतो. किंमतविषयक धोरणाच्या बाबतीतही याचा प्रत्यय येतो. जास्तीत जास्त नफा कमावणे किंवा ग्राहकाची जास्तीत जास्त लुबाडणूक करणे हे आता किंमती निश्चित करण्याचे निकष राहिलेले नाहीत. रूढ संकेताप्रमाणे योग्य आणि वाजवी किंमत असे संबोधले जाऊन त्या भरमसाठ असल्यामुळे सार्वजनिक हिताच्या नाहीत असा आक्षेप ज्यामुळे घेतला जाणार नाही अशा बाबी देखील भाव निश्चितीच्या बाबतीत फार महत्त्वाच्या समजल्या जातात. उदाहरणार्थ युद्धानंतर दीर्घकाळपर्यंत मोटारीसारख्या अनेक वस्तूंना बाजारात साचून राहिलेली फार मोठी मागणी होती आणि खुल्या किंवा अनिर्बंध बाजारपेठेत अशा मालाला किंमतही हवी तेवढी मिळू शकली असती. परंतु जवळजवळ सर्वच कारखानदारांनी अशा वस्तूंच्या किंमती त्यांच्या दृष्टीने वाजवी आणि योग्य पातळीवर रोखून धरल्या आणि जास्तीत जास्त नफा मिळविण्याची दृष्टी न ठेवता खुल्या बाजारातील किंमतीपेक्षाही स्वस्त दराने त्या विक्रीस काढल्या. त्यामागे ग्राहकांची सदिच्छा मिळविण्याची दूरगामी दृष्टी काही प्रमाणात तरी होती हे खरे असले तरी तत्कालीन सामाजिक वातावरणही त्याला बऱ्याच अंशी कारणीभूत होते हे नाकारता येणार नाही.

इतर क्षेत्रातून देखील भांडवलदार वर्गाची नेहमीची निर्घृणता अस्तंगत झाली आहे. उदाहरणार्थ त्यांचे भांडवल गुंतवणुकीसंबंधीचे धोरण घेतले तर असे दिसेल की सरकार निश्चितच हस्तक्षेप करील हा भाग क्षणभर बाजूला ठेवला तरी आता जेरोची पुनरावृत्ती बहुधा कोणतीच कंपनी होऊ देणार नाही किंवा आपल्या बरोबरीने विक्री किंवा पुरवठा करण्याच्या बाबतीत आपल्याशी स्पर्धा करणाऱ्यांचे दिवाळे वाजविण्याची जी ईर्षा तीस वर्षापूर्वी होती ती आज दिसणार नाही. भांडवलदार वर्गाच्या कामगार विषयक धोरणात घडून आलेला बदल तर वर दर्शविल्याप्रमाणे अगदी उघड आहे.

उद्योगधंद्यावरही काही सामाजिक जबाबदारी आहे. कामगार, ग्राहक, ज्या भागात तो कारखाना असेल तेथील परिसर, सेवानिवृत्त होणारे किंवा पंगू झालेले कामगार आणि उद्योगधंद्यातील नफ्याचे प्रमाण जेथे अवाढव्य असते अशा अमेरिकेसारख्या देशात विश्वविद्यालये, संशोधन करणाऱ्या संस्था इतकेच नव्हे तर वाद्यवृंदांचे ताफे यांच्याबाबत देखील उद्योगधंद्याचे सामाजिक कर्तव्य म्हणून काही असते अशी

भाषा आज बोलली जाते, आणि त्यात काही सत्यांशही आहे. आक्रमक व्यक्तिवाद मागे पडून त्याची जागा नम्रता आणि समाजाभिमुखता घेऊ लागल्या आहेत. 'लोक गेले खड्ड्यात ' या वृत्तीऐवजी आता जनतासंपर्क साधण्यासाठी भरपूर कर्मचारी असलेल्या खास जनतासंपर्क कचेऱ्या उघडल्या जात आहेत. स्वकर्तृत्वाने पुढे आलेल्या अरेरावांच्या जागी पदवीधर किंवा वैज्ञानिक येऊ लागले आहेत, आणि रिसमन यांच्या शब्दात सांगावयाचे तर इतके दिवस अदृश्य असलेला हात आता हस्तांदोलनासाठी पुढे केला जात आहे. खाजगी उद्योगधंद्यांना अखेर माणुसकीचा स्पर्श होऊ लागला आहे.

आजचे सारेच अद्योगपती दानशूर आणि समाजसुधारक बनले आहेत असे मला म्हणावयाचे नाही. त्यांच्यापैकी अनेकजण तसे नाहीत हे सत्य आहे. परंतु मी वर वर्णन केलेल्या दिशेने वारे वाहू लागले आहेत. बहुतेक उद्योगपतींना या सामाजिक दृष्टिकोणाची आणि उद्दिष्टांची निदान पुसट तरी जाणीव झाली आहे आणि ज्यांना हा बदल जाणवू लागला आहे तेच सबंध उद्योगधंद्याला नवे वळण लावण्यासाठी पुढे येऊ लागले आहेत याविषयी मात्र माझ्या मनांत शंका नाही. ते कसेही असो, गेल्या पिढीत आणि या पिढीत फार मोठी तफावत पडलेली आपल्याला दिसत आहे हे निश्चित.

या मानसिक स्थित्यंतरामुळे शासन आणि कामगार संघटना या विषयीचा वर वर्णन केलेला व केवळ आर्थिक सत्ता हातातून गेल्यामुळे घडून आलेला दृष्टिकोणातील बदल एकमेकांत मिसळून जातात व त्यामुळे पहिले स्थित्यंतर अधिक प्रभावी ठरते. प्रत्यक्षात या दोन शक्ती अलग करून, स्थित्यंतर घडवून आणावयास त्यापैकी कोणती शक्ती कारणीभूत झाली व कोणती शक्ती त्या कारणाचा परिणाम म्हणून निष्पन्न झाली, ते सांगता येणार नाही. आणि त्याला तसे महत्त्वही नाही. मालक वर्गाच्या या मुत्सद्देगिरीच्या आणि मानवतावादी आचरणामागे आपल्या दुर्बलतेच्या जाणीवेपोटी उद्भवलेला अत्यंत संकुचित आणि स्वार्थी हेतू दडलेला असतो असे मानले तरी त्यामुळे आपल्या विवेचनाला कोणताही बाध येत नाही. उलट सत्ता केन्द्रात बदल घडून आल्याचे यावरून आधिकच सिद्ध होते. या स्थित्यंतराचा बराचसा उलगडाही त्यामुळे होऊ शकतो. आजच्या उद्योगधंद्यांत निर्णय घेण्याची जबाबदारी जास्तजास्त प्रमाणात व्यक्तीकडून गटाकडे जात आहे आणि त्यामुळे आक्रमक व्यक्तिवादाचा ऱ्हास होत आहे असे दिसून येत असतांनासुद्धा वरच्या युक्तिवादाने सर्व गोष्टींचा खुलासा होऊ शकेल किंवा नाही याबद्दल मी साशंक आहे.

उद्योगधंद्यातील निरनिराळ्या घटकांचे वाढते प्रमाण आणि त्यांना उत्तरोत्तर प्राप्त होत असलेले विशेषज्ञतेचे स्वरूप यासारख्या तांत्रिक प्रभावामुळेच हे स्थित्यंतर घडून आले आहे असे म्हणता येणार नाही. निर्णय घेण्याच्या बाबतींत बदल घडून आल्याकारणाने तो घेताना व्यक्तिशः न घेता गटागटाने म्हणजेच सामुदायिकपणे

घेणे आता अपरिहार्य होऊन बसले आहे. व्यक्तिवादाऐवजी संघभावना दृढमूल होऊ लागल्याने, घडून आलेला बदलही या स्थित्यंतराला कारणीभूत आहे. 'सहकार', 'सहभाग', सहयोग', 'लोकशाही नेतृत्व' 'सुसह्य व्यवस्थापन' या आणि यासारख्या व्यवस्थापनासंबंधीच्या 'पुरोगामी' घोषणांवर एवढा भर का दिला जातो त्याचा उलगडा यावरून होऊ शकतो. जुन्या पठडीतील भांडवलदारांची मनोवृत्तीच जुलमी आणि अरेरावी असे व ते कधीच कोणाची पर्वा करीत नसत. या उलट नव्या वातावरणांत वाढलेला प्रशासक हा समितीत बसून सर्वांच्या विचाराने निर्णय घेण्यात धन्यता मानतो आणि समाजशास्त्रज्ञांनी आपल्याला चांगले म्हणावे अशी त्याची मनातून इच्छा असते. आपल्याला कोणी अरेरावीने वागतो असे म्हटले किंवा सहकाऱ्यांबरोबर सल्लामसलत करण्याच्या बाबतीत आपण टाळाटाळ केली असे नुसते कोणी सूचित केले तरी तेवढ्यानेही तो अस्वस्थ होतो. आता कारखान्याचा सारा व्यवहार संघभावनेने चालवावा लागतो. पूर्वी उद्योधंद्यांतील वर्तणुकीला युद्धाची उपमा देत असत. त्याऐवजी आता खेळाची किंवा सामन्याची उपमा दिली जाते हे लक्षांत घेण्यासारखे आहे. 'आता आपला समाज कोसळून पडलाच तर त्यावेळी मोठा दणका बसणार नाही की मोठी किंकाळीही ऐकू येणार नाही. बैठकीच्या टेबलावर पडलेल्या चष्म्याच्या कांचेची नाजुकशी किणकिण काय ती ऐकू येईल' असे अमेरिकेतील उद्योगधंद्यांच्या एका चाणाक्ष निरीक्षकाने म्हटले आहे.

## ८. खाजगी उद्योगधंद्यांची राजकीय सत्ता

व्यवस्थापकीय मानसशास्त्राच्या क्षेत्रांत कांहीही घडून येत असो वा येत नसो. एक गोष्ट निर्विवाद आहे की भांडवलदार (औद्योगिक संपत्ती धारण करणाऱ्या) वर्गाची आर्थिक सत्ता गेल्या पिढीपेक्षा कितीतरी पटीने कमी झालेली आहे एवढेच नव्हे तर संघटित कामगार वर्गाची वाढती ताकद आणि आर्थिक क्षेत्रांतील सरकारच्या नव्यानव्या हालचाली यामुळे व्यवस्थापकीय वर्गाच्या हातातील सत्तादेखील खूप मर्यादित होत चालली आहे.

खाजगी उद्योगधंदेवाल्यांच्या हाती असलेल्या तथाकथित राजकीय सत्तेचीही मला स्वत:ला एवढी धास्ती वाटत नाही. धंद्याचे राष्ट्रीयीकरण होण्याचा धोका निर्माण झाल्यामुळे १९५० साली टेट अँड लीले या कंपनीने किंवा १९५५ साली आय्.सी. आय्.ने हाती घेतल्या होत्या तशा प्रचार मोहिमा खाजगी धंदेवाल्यांनी सुरू केल्या तरी, गेल्या दहा वर्षात 'खाजगी उद्योगधंदे' आक्रमक प्रचाराची फार मोठी मोहीम उघडू शकले नाहीत. उलट त्यांचा प्रचार परिणामकारक व प्रभावी ठरण्याऐवजी तो अगदी निष्प्रभ ठरला हे देखील एक मोठे आश्चर्यच मानावे लागेल. वर उल्लेखिलेल्या दोन धंद्यांच्या बाबतीत वरील विधानाला अपवाद करावा लागेल. कारण

त्यांनी आपली प्रचार मोहीम अत्यंत निर्धाराने आणि प्रभावीपणाने चालविली व त्यामुळे ती परिणामकारक ठरली हे खरे; परंतु त्याचे कारण असे की, त्यांच्या प्रचारास तोडीस तोड असे उत्तर देऊन सरकार साखरेचे राष्ट्रीयीकरण १९५० साली (१९५१ किंवा १९५५ साली मात्र नव्हे) आणि रासायनिक उद्योगधंद्याचे राष्ट्रीयीकरण १९५५ सालीच का करू मागत होते ते मजूर पक्ष जनतेला (इतकेच नव्हे तर संबंधित कारखान्यातील कामगारांनासुद्धा) पटवून देऊ शकला नाही. राष्ट्रीयीकरणाची टांगती तलवार डोक्यावर असतांना एखाद्या खाजगी क्षेत्रातील उद्योगधंदेवाल्यांनी स्वतःच्या सुरक्षिततेसाठी घटनात्मक मार्गांनी काही हालचाली केल्या तर त्याबद्दल त्या उद्योग-धंदेवाल्यांना क्वचितच दोष देता येईल. परंतु तोच प्रसंग कामगार संघटना (वस्तुतः हुजूर पक्षीय सरकारच्या कारकिर्दीत कामगार संघटनांना जेवढी राजकीय सत्ता असते तितकी सत्ता खाजगी उद्योगधंद्यांना मजूर सरकारच्या कारकीर्दीत उपभोगता येत नाही हे लक्षात घेतले पाहिजे) किंवा सहकारी चळवळ यांच्यावर आला आणि हुजूर पक्षाने निवडणुकीबाबत काही डावपेच करून त्यांना नेस्तनाबूद करण्याचा घाट घातला तर त्यावेळी तरी निदान या संघटनांनी स्वसंरक्षणासाठी भांडवलदारां-प्रमाणे जिवाचे रान करावे एवढीच कोणी झाले तरी अपेक्षा करील.

१९५०–५१ साली पोलादाच्या कारखानदारांकडूनही असाच प्रतिकार झाला आणि मजूर पक्षातील काही लोकांना त्यामुळे आश्चर्याचा मोठा धक्का बसला. परंतु त्यांनी केलेल्या प्रतिकारावरूनही वरील विचाराला बळकटीच येते. कारण राष्ट्रीयीकरणाचा प्रतिकार करण्यासाठी म्हणून देखील कामगार संघटनांच्या चळ-वळीत रूढ असलेल्या कार्यक्रमाव्यतिरिक्त कारखानदारांनी कोणतेही राजकीय पाऊल उचलले नाही. आर्थिक दृष्टयाही त्यांचा प्रतिकार प्रभावी ठरू शकला नाही. कारण त्या धंद्यातील उद्योगपतींनी सरकारने नेमलेल्या ‘ राष्ट्रीय समिती ’ बरोबर असहकार पुकारून त्यावर काम करण्याचे नाकारले असतानाही राष्ट्रीयीकरणानंतर पोलादाचे उत्पादन एकसारखे वाढतच राहिले. राष्ट्रीयीकरणाच्या बाबतीत जी चमत्कारिक परिस्थिती उद्‌भवली आणि त्याच्या अंमलबजावणीला जो विलंब लागला त्याला कारखानदारांपेक्षा मजूर सरकारच जबाबदार आहे. कारण एक तर मजूर पक्षाला फक्त साताचे बहुमत होते आणि त्यामुळे ते सरकार फार काळ टिकू शकेल की नाही याची शंका होती. शिवाय राष्ट्रीयीकरण करावे की करू नये यावर मजूर पक्षातच मतभेद होते आणि त्यामुळे पक्षच दुभंगण्याचा धोका निर्माण झाला होता. मजूर सरकारचा हा कमकुवतपणा लक्षात घेता (शिवाय कारखानदारांनी हा धंदा चांगला चालविला आहे अशी समजूत पसरलेली असतांना) भांडवलदारांच्या सर्वात सामर्थ्यशाली अशा बालेकिल्ल्यावर धडक मारून राष्ट्रीयीकरण प्रत्यक्ष घडवून आणण्यात मजूर सरकारचे जे कर्तृत्व दिसून आले त्यावरून हेच सिद्ध होते की, खाजगी उद्योगधंदेवाल्यांची सत्ता आहे त्यापेक्षा निष्कारणच जास्त समजून आपण

तिचा बागुलबुवा करतो. पोलादाच्या धंद्याचे पुन्हा राष्ट्रीयीकरण करावे असे म्हणणारांचे मुद्दे खोडून काढता येण्यासारखे नाहीत असे मला वाटते. त्यासंबंधीचा उहापोह बावीसाव्या प्रकरणात आला आहे. परंतु १९३० च्या काळात जनतेचे राजकीय किंवा आर्थिक भवितव्य ठरविण्याची कर्तुमकर्तुम सत्ता खाजगी मालकीच्या पोलादाच्या धंदेवाल्यांजवळ होती आणि सरकारही त्या सत्तेवर मर्यादा घालू शकत नव्हते. परंतु आज मात्र ती परिस्थिती राहिलेली नाही.

या प्रकरणातील विवेचन हे केवळ आधुनिक समाजातील सत्तेच्या एका अंगापुरतेच मर्यादित असून माझ्यामते त्याचे महत्त्वही कमी कमी होत चालले आहे. या प्रकरणात ज्या अर्थाने आर्थिक सत्तेचे विवेचन आले आहे त्या अर्थाने, तसेच भांडवलशाही संबंधीचे विश्लेषण करतांना युद्धपूर्व कालीन समाजवादी साहजिकपणेच ज्याचे बरेच स्तोम माजवीत असत त्या अर्थसत्तेमुळे आजच्या काळात अन्य स्वरूपाच्या सत्तेच्या मानाने पहिल्या इतक्या समस्या निर्माण होत नाहीत. आर्थिक सत्तेव्यतिरिक्त अन्य सत्तेचा उद्योगधंद्यावरील खाजगी मालकीशी तसा काहीही संबंध येत नाही आणि भांडवलशाही विरुद्ध समाजवाद यामधील संघर्ष बाजूला पडतो. या अन्य स्वरूपाच्या सत्ता म्हटल्या म्हणजे एक: नोकरशाहीचा पगडा असलेल्या विस्तारित शासनाची सत्ता; दोन : न्यायालये, धर्मपीठ आणि प्रमुख वर्तमानपत्रे या त्रिकुटाच्या हाती असलेली सत्ता—समाजसुधारणा अडवून धरण्यासाठी किंवा व्यक्ती आणि गट यांच्यावर सामाजिक आणि नैतिक मूल्यांबाबतचे स्वत:चे मानदंड लादण्यासाठी वापरली जाणारी सत्ता; आणि तीन : 'बी. बी. सी.', कोल बोर्ड आणि कामगार संघटना यांसारख्या सार्वजनिक स्वरूपाच्या किंवा 'आय्.सी.आय्.' किंवा 'युनीलिव्हर' यासारख्या खाजगी स्वरूपाच्या नोकरशाही प्रवृत्तीच्या सामुदायिक संस्थांवर नियंत्रण ठेवणाऱ्या व्यक्तींच्या हातातील सत्ता. यापैकी काहींची चर्चा पुढे आली आहे.

'क्रिचेल डाऊन' 'एस्टॅब्लिशमेंट' आणि 'व्यवस्थापकीय क्रांती' यापासून फार मोठा धोका निर्माण होण्याचा संभव आहे अशी जी हाकाटी केली जाते तिच्याशी मी संपूर्णपणाने सहमत नाही. तथापी उत्पादन आणि वितरण यांचे नियंत्रण करणाऱ्या आर्थिक सत्तेपेक्षा तिचे हे इतर पैलू अधिक महत्त्वाचे आहेत असे मात्र मी मानतो. कारण आर्थिक सत्ता ही आज युद्धपूर्वकाळाइतकी केन्द्रीभूत राहिलेली नाही त्याचप्रमाणे पहिल्यासारखी ती बेजबाबदारपणे वापरलीही जात नाही.

शिवाय भांडवलदार वर्गाच्या हातातील आर्थिक सत्ता कमीकमी होत चालली आहे असे ज्यावेळी म्हटले जाते त्यावेळी 'सामाजिक' वर्गाच्या संदर्भात त्याकडे बघावयाचे नसते. इंग्लंडमधील सामाजिक वर्गाचे महत्त्व पूर्वीच्या मानाने कमी झालेले आहे किंवा त्याचे क्षेत्र पहिल्याइतके राहिलेले नाही असा याचा अर्थ नव्हे. तसेच समाजात एकप्रकारचा विशिष्ट दर्जा किंवा प्रतिष्ठा उपभोगणारा वरिष्ठ

वर्गच अस्तित्वात राहिलेला नाही असेही म्हणता येणार नाही. आर्थिक सत्ता हा सामाजिक वर्गाचा केवळ एक पैलू आहे, आणि त्याचे महत्व कमी झाले असले तरी जे इतर पैलू आहेत तेही तितकेच महत्त्वाचे राहू शकतील. इंग्लंडचा समाज हा फार मोठ्या प्रमाणात वर्गाधिष्ठित आहे आणि त्याचबरोबर संकुचित मार्क्सवादी किंवा आर्थिक दृष्टिकोणांतून पाहता तेथे सत्ताधारी असा वर्गच आस्तित्वात नाही या दोन विधानांत विसंगत असे कांहीच नाही.

या प्रकरणांत इतकेच दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे की, युद्धपूर्व-कालीन समाजवादी जे बौद्धिक घटपट करीत असत ते आता कालविसदृश आणि गैरलागू झालेले आहे. कारण एकतर अत्यंत तीव्र गतीने अर्थव्यवस्थेचा विकास होत आहे आणि दुसरे म्हणजे आर्थिक सत्तेचा आजचा ढाचाच पार बदलून गेला आहे. या दोन महत्त्वाच्या स्थित्यंतरांमुळे कामगार वर्गाच्या तातडीच्या उद्दिष्टां-वरही जे परिणाम घडून आले आहेत त्यांचा विचार करता समाजवादी भूमिकेचे अगदी नव्याने मूल्यमापन करणे अपरिहार्य झाले आहे. त्यासंबंधीचा उहापोह पुढील प्रकरणांत केला आहे.



## प्रकरण दुसरे

# दारिद्र्य, विषमता आणि अस्थिरता यांविरुद्ध चढाई

### १. प्राथमिक अवस्थेतील दारिद्र्यात घट

पहिल्या प्रकरणाच्या सुरवातीला ताबडतोबीच्या उद्दिष्टांची म्हणून जी एक यादी देण्यात आली होती त्यातील सर्वप्रथम उद्दिष्ट दारिद्र्याचा नाश करणे हे होते. अधिकृत मजूर पक्षाचे लक्ष देखील समाजवादासंबंधी प्रदीर्घ विश्लेषण करीत बसण्यापेक्षा या तातडीच्या उद्दिष्टांवरच खिळून राहिले होते. १९३६ साली यॉर्क शहराची पाहणी केल्यानंतर रौन्ट्री यांनी आपल्या सुप्रसिद्ध अहवालात असे दाखवून दिले आहे कीं, त्या शहराच्या एकूण लोकसंख्येपैकी १८ टक्के आणि कामगारवर्गापैकी ३१ टक्के लोक दारिद्र्याने पछाडलेले होते. आणि लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही की यॉर्क शहर हे आपदग्रस्त किंवा गलिच्छ वस्त्यांचे शहर म्हणून ओळखले जात नाही. त्याचवेळी करण्यात आलेल्या सामाजिक पहाणीवरून त्याचप्रमाणे त्या शहराचे आरोग्यमान आणि राहत्या घरांची परिस्थिती याविषयी केलेल्या खास पहाणीवरूनही रौन्ट्री यांच्या अहवालांतील निष्कर्षांनाच पुष्टी मिळते. उदाहरणार्थ, आरोग्य विषयक पहाणीत असे आढळून आले की जवळजवळ एकतृतियांश लोकसंख्येला अत्यंत निकृष्ट दर्जाचे, पुरेशी जीवनसत्वे नसलेले अन्न खावे लागते. आणि निम्म्याहून आधिक लोकांना यापेक्षा जरा बरे अन्न मिळते इतकेच. अर्थात त्यांतही जीवनसत्वांचा समावेश कमीच असतो.

एकतर साधन सामुग्रीचा संपूर्ण अभाव या परिस्थितीला जबाबदार असावा असे मानले पाहिजे, नाहीतर प्रचलित समाजपद्धती सदोष असली पाहिजे या निर्णयाला तरी आले पाहिजे. हिंदुस्तानांतील शेतकऱ्यांच्या गरिबीचे खापर सर्वस्वी तेथील राजकीय परिस्थितीवर फोडून मोकळे होता येणार नाही. कारण सबंध देशांत पसरलेल्या दारिद्र्याचाच तो एक भाग आहे. परंतु इंग्लंडची परिस्थिती

अशी नव्हती. इंग्लंडमध्ये मोठ्या प्रमाणावरील बेकारी (दोन युद्धांदरम्यानच्या काळात बेकारीचा विमा उतरलेल्यांचे प्रमाण १४ टक्के इतके होते) आणि विषमता या दोन्ही गोष्टी होत्या. 'उत्पन्नाचे फेर वाटप केले असते तर युद्धापूर्वी सर्वांच्या गरजा भागवता आल्या असत्या' किंवा संपूर्ण रोजगाराच्या धोरणाचा अवलंब करूनही हे साधता आले असते. आणि असे असूनही परिस्थिती अशीच चालू रहावी आणि ती देखील भौतिक साधनसामुग्रीच्या अभावामुळे नव्हे तर जरूर ते उपाय योजण्याची जिद्द दाखविली न गेल्याने ती चालू रहावी हे लांछनास्पद होय. १९३६ सालच्या पद्धतीचाच अवलंब करून (अर्थात किंमतीच्या पातळीत झालेला बदल योग्य तऱ्हेने लक्षांत घेऊन) रौन्ट्री यांनी १९५० मध्ये यॉर्कची जी आणखी पहाणी केली त्यावरून युद्धोत्तर काळांत या क्षेत्रांत झालेल्या प्रगतीचा आढावा घेणे सहज शक्य आहे. त्यांनी केलेल्या दोन्ही पहाणींचे निष्कर्ष ताडून पहाण्यासारखे आहेत. या पहाणीत त्यांना असे आढळून आले की या दोन दशकांत दारिद्र्याच्या रेषेखाली येणाऱ्या कामगार वर्गातील लोकसंख्येत ३१% वरून ३% पेक्षा थोडी कमी इतकी घट झाली आहे. एकूण लोकसंख्येच्या बाबतीत ही घट १८% वरून १.६% इतकी झालेली आहे. म्हणजे १९३६ साली असलेल्या दारिद्र्यापैकी नऊ दशांश दारिद्र्य आता राहीलेले नाही. शिवाय खालच्या पातळीवरील लोकांची परिस्थिती दारिद्र्य रेषेपेक्षा जराशी सुधारलेली होती, असे नव्हे तर त्यांच्या राहणीमानांतही वाढ झालेली होती. कामगार वर्गात मोडणाऱ्या लोकसंख्येचे उपन्नाच्या प्रमाणावर पाच गट पाडण्यात आले तर त्यातील खालचे तीन गट १९५० च्या दारिद्र्य रेषेच्या बरेच वर होते (१९३६ साली मात्र अशी परिस्थिती नव्हती) इतकेच नव्हे तर एकूण लोकसंख्येशी असलेले त्यांचे प्रमाणही २८% वरून १३% पर्यंत खाली आले होते. यावरून हे स्पष्ट होते की कामगार वर्गाची वाटचाल वरच्या दिशेने होती व त्यांच्या राहणीमानात जाणवण्यासारखी वाढ झाली होती.

दारिद्र्यावर ही जी मात करण्यात आली त्याचे श्रेय मात्र कधी कधी मजूर सरकारला दिले जात नाही. १९३६ ते १९५० च्या दरम्यान झालेल्या प्रगतीचा वेग मोठा नव्हता किंवा तसा तो असला तरी त्याचा संबंध मजूर सरकारच्या कारभाराशी नव्हता या सबबीवर मजूर सरकारला हे श्रेय दिले जात नाही.

गेल्या ५० वर्षात दारिद्र्य हळूहळू कमी होत आहे हे खरे; परंतु दुसरे महायुद्ध सुरू होईपर्यंत या दिशेने झालेली प्रगती मात्र कमालीची मंद गतीची होती. श्री. रौन्ट्री यांनी असे दाखवून दिले आहे की १८९९ आणि १९३६ च्या दरम्यान यॉर्कमधील दारिद्र्य निम्मे ते दोन तृतियांशाने कमी झाले. लंडनच्याबाबतीत 'न्यू सर्व्हे ऑफ लंडन लाईफ अँड लेबर'ने काढलेले निष्कर्षही असेच आहेत; इतरत्र केलेल्या पहाणीतही असे दिसून आले की दुसऱ्या महायुद्धाच्या

आधीच्या तीन ते चार दशकांत दारिद्र्याचा बोजा त्या काळाच्या सुरवातीच्या मानाने एक तृतियांश होता. ही सुधारणा स्वागतार्ह असली तरी १९३६ ते १९५० या काळांत दारिद्र्य जे फक्त १०% उरले त्या मानाने ती फार मंद गतीची होती.

परंतु ही जी अधिक झपाट्याने प्रगती घडून आली ती मजूर सरकारच्या धोरणामुळे की त्याला दुसरी काही कारणे जबाबदार आहेत? दुर्दैवाने यापैकी पहिला पक्ष घेणारे आपल्या समर्थनार्थ जी बाजू मांडतात ती टिकण्यासारखी नाही. मजूर सरकारचे अनेक पुरस्कर्ते रौंन्ट्री यांनी स्वीकारलेली भूमिका उचलून धरतात. ती भूमिका अशी की, विशिष्ट कल्याणकारी योजना मागे घेतली गेली तर किती प्रमाणांत दारिद्र्यांत वाढ होईल ते प्रथम काढावयाचे आणि मग त्याप्रमाणांत दारिद्र्य दूर करण्याचे श्रेय त्या विशिष्ट योजनेला द्यावयाचे. उदाहरणार्थ असे सांगितले जाते की १९५० साली अन्नधान्यासाठी अनुदान दिले गेले नसते तर कामगार वर्गातील आणखी ११% टक्के लोक दारिद्र्य रेषेच्या खाली गेले असते. यावरून असा निष्कर्ष काढण्यांत येतो की या ११% लोकांची दारिद्र्यातून मुक्तता करण्याचे श्रेय अन्नधान्यासाठी दिल्या जाणाऱ्या अनुदानाकडे जाते.

परंतु या ठिकाणी असे गृहित धरण्यात आले आहे की, ज्यावेळी अन्नधान्याच्या अनुदानांत वाढ किंवा घट केली जाते त्यावेळी इतर सर्व बाबी जशाच्या तशाच असतात; त्यात कसलाही बदल होत नाही. आणि कामगार वर्गाच्या उत्पन्नात जो फेरफार होतो तो फक्त या अनुदानामुळे होणाऱ्या फरकावर अवलंबून असतो. अर्थात प्रत्यक्ष परिस्थिती मात्र निराळीच असते. कारण कामगार वर्गाला कराच्या रूपानेही फार मोठी रक्कम खर्च करावी लागते आणि अनुदानांत होणाऱ्या फेरबदलाबरोबरच कर आकारणीतही अनेकदा फेरबदल होत असतो. अनुदानांतील कपातीबरोबर त्याच प्रमाणांत फक्त मध्यम आणि वरिष्ठ वर्गाच्याच पदरांत पडणारी घट करातही होत असती तर वरील अंदाज निश्चितच खरा ठरला असता. तथापी कामगार वर्गाला समाजकल्याणाच्या रूपाने जेवढा पैसा मिळतो त्यापेक्षा अधिक रक्कम त्याला कर म्हणून भरावी लागत असल्याने वरील अंदाज असमर्थनीय ठरतो. यावरून असे अनुमान निघू शकते की, कामगार वर्गाच्या करांत थोडीशी घट झाली आणि त्यामुळे खर्च करता येण्याजोग्या पैशाच्या रूपांतील उत्पन्नात जी वाढ होईल तेवढी रक्कम कामगार वर्गाच्या उत्पन्नातील फेरफाराचा विचार करताना छोट्या छोट्या अनुदानाच्या रकमेशी ताडून पहावी लागेल.

तथापी मजूर सरकारचे धोरण आणि दारिद्र्याची पीछेहाट यामधील सूत्र अधिक निश्चितपणे दाखवून देता येण्यासारखे आहे. पहिली गोष्ट अशी की उत्पन्नात झालेल्या वाढीपैकी मोठा भाग (निर्यात वाढ, गुंतवणूक इ. सारख्या) दुसऱ्या महत्वाच्या व तातडीच्या बाबींवर खर्च करावा लागल्यामुळे १९३८ ते १९५० च्या दरडोई वस्तूंच्या उपभोगात जवळपास कसलीच व्यक्तिगत वाढ झाली

नाही हे दाखवून देणे शक्य आहे. तरीही युद्धोत्तर आर्थिक धोरणानुसार उत्पन्नात झालेल्या लक्षात येण्यासारख्या महत्त्वपूर्ण ऊर्ध्वगामी फेरवितरणामुळे कामग।र वर्गाच्या सरासरी व्ययाच्या प्रमाणात वाढ झाली आणि कामगार वर्गाच्या राहणीत झालेल्या या सर्वसाधारण वाढीमुळे दारिद्र्याचा भार कमी होण्यास पुष्कळच मदत झाली.

दुसरे असे की, सबंध कामगार वर्गाला मिळून कराच्या रूपाने जादा सामाजिक सेवेबद्दल मोबदला द्यावा लागला असला तरी त्याचा बोजा त्या सर्वांवर सारख्या प्रमाणात बसला होता असे मुळीच नव्हे. करात आणि सामाजिक सेवेत झालेली वाढ ही दोन्ही एकत्र घेतल्यास कामगार वर्गात उत्पन्नाचे हस्तांतर मोठ्या प्रमाणावर झालेले आहे असे दिसून येते. आणि त्याचा निव्वळ फायदा ज्यांना दारिद्र्याची जास्त झळ लागते अशा (म्हणजे वृद्ध, आजारी आणि मोठाली कुटुंबे) गटांच्या पदरात पडला.

हुजूरपक्षीय मंडळींकडून कधी कधी असा दावा केला जातो की, सरकार कोणत्याही पक्षाचे असते तरी हे फेरफार घडून आलेच असते. काही नव्या समाज-कल्याण योजना अस्तित्वात आल्या असत्या याबद्दल शंका न।ही. परंतु हुजूरपक्षीयांना तिरस्कारणीय वाटणारी कराची चढी पातळी आणि सरकारी खर्चात कपात करण्याचे त्यांनी पुनः पुन्हा दिलेले आश्वासन विचारात घेता हुजूरपक्षीय सरकारने आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या टाळेबंदातील अडचणींच्या सबबीखाली या सुधारणांपैकी अधिक महत्त्वाकांक्षी सुधारणांच्या बाबतीत आपले पाऊल मागे घेतले नसते असे हमखास सांगता येणार नाही.

या दृष्टीने १९१९ नंतरच्या काळातील घटना लक्षात घेण्यासारख्या आहेत. युद्धामुळे उजव्या पक्षांनाही पुष्कळदा जहाल भूमिका स्वीकारावी लागते. वातावरण राष्ट्रीय ऐक्याच्या भावनेने भरलेले असते. जहाल पक्ष संयुक्त सरकारात सामील होतात. आघाडीवरील जवानांना कशाचीच फिकीर नसते. जुने जग जणू कायमचे अस्तंगत होण्याच्या मार्गावर असते. आणि नव्या जगात फार मोठे बदल अभिप्रेत असतात. अशा वातावरणात हुजूरपक्षीय मंडळीदेखील समाज – परिवर्तनाच्या दूरगामी योजनांना पाठिंबा देण्याच्या मनःस्थितीत असतात. पुनर्निर्माणाचे स्वतंत्र खातेच निर्माण केले जाते. 'फिशर एज्युकेशन अॅक्ट'सारखे कायदे पास केले जातात. संयुक्त औद्योगिक समित्या स्थापन करण्याची शिफारस केली जाते. आणि युद्धावरून परतणाऱ्या लक्षावधी वीरांसाठी लक्षावधी घरे बांधण्याच्या योजना आखल्या जातात. परंतु युद्ध समाप्तीनंतर याच्या उलट प्रतिक्रिया सुरू होते. युद्धाच्या झंझावातात साऱ्या जगाची आहुती पडलेली नाही हे लक्षात आल्याबरोबर परंपरावादी शक्ती पुन्हा सावरू लागतात. त्यांचा आत्मविश्वास जागृत होतो. यद्धकाळातील आश्वासनांपैकी फारच थोड्या योजना १९१८ नंतर पुऱ्या करण्यात आल्या. कदाचित १९४५ नंतर अधिकारावर आलेल्या हुजूर सरकारने

यापेक्षा आधिक चांगली कामगिरी करून दाखविली असती, परंतु अर्थातच ॲटलींच्या सरकारातील मंत्री कल्याणकारी राज्याची स्थापना करण्याच्या कामी जितके उत्सुक होते तितकीच उत्सुकता हुजूरपक्षीय मंत्र्यांनी निश्चितच दाखविली नसती. वस्तुतः हुजूर पक्षीय मंडळींना जर या विषयी इतकी तळमळ वाटली असती तर १९३० सालीच त्यादृष्टीने थोडी तरी अधिक प्रगती त्यांनी करून दाखविली नसती का? कारण त्यावेळची आर्थिक परिस्थिती तर अत्यंत अनुकूल होती.

हे खरे की, १९५१ नंतर अधिकारावर आलेल्या हुजूर मंत्रीमंडळांनी कल्याण-कारी राज्याची घडी विस्कटून टाकली नाही आणि पुढेही त्यांच्याकडून तसे काही होण्याचा अजिबात संभव नाही. पण यावरून १९४५ साली काय घडले असते त्यासंबंधी कसलाही निर्वाळा देता येत नाही. तीव्र स्वरूपाच्या प्रतिक्रिया व्यक्त होण्याच्या दृष्टीने दोन पक्षांच्या संख्याबळात आता फारच थोडे अंतर राहिले आहे. त्याचप्रमाणे मतदारांची मनःस्थितीही प्रतिगामी वृत्तीला अत्यंत प्रतिकूल अशीच आहे. शिवाय डाव्या पक्षाच्या सरकारानंतर आलेले उजव्या पक्षाचे सरकार पूर्वीच्या सुधारणा कधीही रद्द करीत नाही हे तर शेवटी ब्रिटिश राजकारणाचे पुनः पुन्हा दृष्टोत्पत्तीस येणारे वैशिष्ठ्य आहे. परंतु त्यामुळे सुधारणा प्रथम सुरू करण्याचे श्रेय मात्र त्यांना स्वतःकडे घेता येणार नाही.

त्यामुळे मजूर सरकारने जो फार मोठा टप्पा गाठला त्याबद्दल त्याला जरूर शाबासकी दिली पाहिजे. परंतु ऊर्वरित दारिद्र्याचे वर जे आकडे दिले आहेत त्यावरून तो प्रश्न आता निकालात निघाला आहे असा मात्र ग्रह करून घेता कामा नये. कारण एक तर त्यात फक्त 'प्राथमिक' स्वरूपाच्या दारिद्र्याचाच (म्हणजे अपुऱ्या उत्पन्नामुळे निर्माण झालेले आणि घरखर्च कितीही चातुर्याने चालविला तरी टाळता न येणाऱ्या प्रत्यक्ष दारिद्र्याचा) तेवढा विचार केलेला आहे. मिळ-कतीचा विनियोग शहाणपणाने केला तर ती जेमतेम पुरी पडू शकेल. ती अडाणी आणि अदूरदृष्टीपणाने खर्च केल्याने निर्माण होणाऱ्या 'दुय्यम' स्वरूपाच्या दारिद्र्याची त्यात दखलच घेतली गेलेली नाही. आणि सामाजिक सर्वेक्षणावरून हे स्पष्ट झालेले आहे की, अशा प्रकारचे दुय्यम स्वरूपाचे दारिद्र्य अद्यापही मन अस्वस्थ करून टाकण्या इतक्या मोठ्या प्रमाणावर आस्तित्वात आहे.

दुसरे असे की, दारिद्र्यरेषा अत्यंत काटेकोरपणाने निश्चित करण्यात आलेली होती हेही लक्षात घ्यावयास हवे. उदाहरणार्थ, ती रेषा ठरविताना पाच जणांच्या कुटुंबाला मद्य, तंबाखू, सुट्या, प्रवास, देणग्या, पुस्तके इत्यादींसाठी आठ-वड्याला फक्त ६ शि. ८ पे. येवढीच रक्कम धरली आहे. या रेषेखाली येणारे कुटुंब हे त्या वेळच्या राहाणी मानाच्या अनुषंगाने बघता असंस्कृत वातावरणात नांदत होते. आणि त्यापेक्षा जरा बरी परिस्थिती असणारे लोक त्यापेक्षा थोडे अधिक बऱ्या परिस्थितीत रहात होते.

तिसरा मुद्दा असा की, अशा प्रकारच्या पहाणीतून फक्त तात्कालिक चित्रच पहावयास मिळते. सततची परिस्थिती त्यावरून ध्यानात येऊ शकत नाही. एकाद्या विशिष्ट वेळी दारिद्र्यात राहणाऱ्यांच्या संख्येवरून आयुष्यात केव्हा ना केव्हा तरी दारिद्र्य भोगलेल्यांच्या संख्येचा बोध होऊ शकत नाही. आजही अनेक लोक असे दिसतील की जे त्यांची मुलेबाळे लहान असताना किंवा पुढे म्हातारपणी दारिद्र्य रेषेच्या खालचे जीवन जगत असतील. म्हणून या आकडेवारीतून निष्पन्न होणारे ठळक निष्कर्ष निखालस खोटे आहेत किंवा १९३६ नंतर झपाट्याने प्रगति झाली असे म्हणणे अजिबात चूक आहे असे ज्याप्रमाणे कोणालाही म्हणता येणार नाही त्याचप्रमाणे दारिद्र्य ही आता इतिहासजमा झालेली समस्या आहे असेही म्हणून चालणार नाही. या दारिद्र्याचा मुकाबला करण्यासाठी अमलात आणावयाच्या कल्याणकारी उपाययोजनांसंबंधीचा उहापोह पुढील प्रकरणात आला आहे.

## २. उत्पन्नाचे फेरवाटप

खालच्या पातळीवरील लोकांचे जीवनमान उंचवावयाचे म्हणूनच केवळ नव्हे तर व्यापक स्वरूपाच्या नैतिक आणि सामाजिक कारणास्तव समाजवाद्यांना अत्यंत तीव्र विषमता असणे पसंत नसल्यामुळेही उत्पन्नाचे फेरवाटप करणे हे त्यांच्यापुढील दुसरे उद्दिष्ट होते आणि युद्धपूर्व काळातील भांडवलशाहीत निश्चितच कमालीची विषमता होती.

शतक उलटल्या नंतरच्या काळात एकूण खाजगी उत्पन्नातील मजुरीचे प्रमाण ४० टक्क्याच्या आसपास होते. आणि १९११ च्या मानाने १९३५ साली त्यात विशेष अशी वाढ झालेली नव्हती. उरलेले ६० टक्के उत्पन्न पगार, भाडे, व्याज किंवा नफा यावर जगणाऱ्या अत्यंत थोड्या लोकांना मिळत असे. उत्पन्नाच्या गटाच्या भाषेत बोलावयाचे तर १९३७ साली सुमारे ८००० लोकांचे वार्षिक उत्पन्न सालीना १०,००० पौंडाच्या वर होते. १०२,००० लोक २ हजार ते १० हजार पौंडाच्या गटातील होते तर जवळजवळ २०,०००,००० लोकांचे (किंवा ११,०००,००० कुटुंबांचे) वार्षिक उत्पन्न २५० पौंडापेक्षाही कमी होते. कॉलिन क्लार्क यांच्या अंदाजाप्रमाणे १९२९ ते १९३५ च्या दरम्यान एकूण व्यक्तिगत उत्पन्नापैकी २३ टक्के उत्पन्न काम करणाऱ्या जनतेपैकी १·५ टक्के लोक घेत. त्या उत्पन्नाचा जवळजवळ निम्मा भाग १० टक्के लोकांकडे जाई व ९० टक्के लोकांना उरलेल्या निम्म्या उत्पन्नावर समाधान मानून रहावे लागत असे.

कर आकारणीमुळे पुनर्वितरणाचा ओघ श्रीमंतांकडून गरीबांकडे वळतो अशी सर्वसाधारण समजूत असली तरी वस्तुतः तसे घडले नाही. डॉ. बर्नी यांनी केलेल्या पहाणीत त्यांना असे आढळून आले की, कामगार वर्गाने कराच्या रूपाने जेवढी रक्कम भरली त्यापेक्षा अवघ्या ७३ दशलक्ष पौंडांच्या जास्त सवलती त्यांना मिळाल्या.

अशा तऱ्हेने सधन वर्गाने विभागणी करता न येण्यासारख्या "सामुदायिक" खर्चाचा (संरक्षण, शासनव्यवस्था राष्ट्रीय कर्जावरील व्याज इ.) सर्वच्या सर्व बोजा उचललेला असला तरी करपद्धतीमुळे उत्पन्नाच्या हस्तांतरावर व्यापक स्वरूपाचे परिणाम घडून आले नाहीत.

मालमत्तेच्या क्षेत्रातील विषमता तर याहूनही भयानक होती. १९३६ साली खाजगी मालमत्तेपैकी निम्म्याहून अधिक मालमत्ता २५ हून अधिक वयाच्या १% लोकांच्या हाती होती, ५% लोकांच्या ताब्यात ७५ ते ९०% मालमत्ता होती, तर ७५ % लोकांत मिळून अवघी ५ % मालमत्ता होती. मृत्यूकरामुळेही या परिस्थितीत फारसा फरक पडला नाही. १९१३ साली याबाबतीत जी परिस्थिती होती तीच जवळपास १९३६ सालीही कायम होती.

सर्वांना रोजगार आणि वाढलेली कर आकारणी यामुळे, युद्धकाळात कर भरून उरलेल्या उत्पन्नातील विषमता डोळयात भरण्याइतकी कमी झाली. परंतु १९१८ नंतर इंग्लंडमध्ये सहजपणे ज्या घटना घडत गेल्या, किंवा इतर देशात १९४५ नंतर ज्यांची पुनरावृत्ती झाली, त्यामुळे युद्धकाळातील आणीबाणीच्या परिस्थितीत लादले गेलेले कर हळूहळू कमी होत गेल्याने वितरणाच्या बाबतीत हलके हलके युद्धपूर्व काळातील परिस्थिती निर्माण होत गेली असती. याला आळा घालण्याची जबाबदारी मजूर सरकारची होती. ती जबाबदारी त्यांनी कितपत पार पाडली ते आता तपासून पाहिले पाहिजे.

निव्वळ उत्पन्नातील फेरबदल हा कर आकारणी, किंमतीची तुलनात्मक पातळी आणि एकूण (कर भरण्यापूर्वीच्या) उत्पन्नातील फेरबदलावर अवलंबून असतो. सुरुवातीला आपण एकूण व्यक्तिगत उत्पन्नाचा आढावा घेतला तर आपणाला असे आढळून येईल की, १९३८ ते १९५० च्या दरम्यान एकूण उत्पन्नातील मजूरीच्या प्रमाणात ३७ % पासून ४४ % पर्यंत वाढ झाली; पगार आणि व्यावसायिक उत्पन्नाची पातळी होती तीच राहिली. शेतकऱ्यांच्या उत्पन्नाचे प्रमाण दुपटीने वाढले (म्हणजे १·५ % वरून ते ३ % वर गेले). घाऊक व्यापारी आणि भागिदारी संस्था यांच्या उत्पन्नात थोडीशी घट झाली तर लाभांश, भाडे आणि व्याज मात्र २४% वरून १५ % पर्यंत घसरले. अशा तऱ्हेने कर आकारणीतील फेरफारामुळे हे घडून आले असे म्हणण्यापूर्वी बऱ्याचशा अनुत्पादित उत्पन्नाचा ओघ मजूरीकडे वळला होता हे लक्षात घ्यावे लागेल.

या संबंधीची निश्चित कारणे विशद करून सांगता येण्यासारखी नसली तरी खाली नमूद केलेल्या घटनांचा त्यावर महत्त्वपूर्ण प्रभाव पडल्याचे दिसून येईल. त्यापैकी पहिली गोष्ट अशी की, सेवा आणि वितरक व्यापार (जेथे उत्पन्नातील मजुरीचे प्रमाण कमी असते) हे सोडून तुलनात्मक दृष्टया अधिक कामगार (जेथे मजुरीचे प्रमाण जास्त असते अशा) कारखानदारी उद्योगात शिरले. आता कमी

पगार असलेले गुमास्ते किंवा घरगडी यांच्या मानाने चांगला पगार मिळविणारे अभियंते (इंजिनियर्स) किंवा यंत्रज्ञ (मेकॅनिक्स) अधिक आहेत. दुसरे असे की, सर्वांना रोजगार उपलब्ध झाल्यामुळे पूर्वी बेकार असलेल्या कामगार वर्गाच्या गटाच्या उत्पन्नात त्या प्रमाणात (बेकार विम्यापासून संपूर्ण वेतनापर्यंत) सरासरी वाढ झाली आहे.

तिसरे म्हणजे युद्ध आणि युद्धोत्तर काळातील वैशिष्ट्य असे की, अन्य देशा-प्रमाणेच ब्रिटनमध्येही पैशाची किंमत जवळजवळ सातत्याने घसरत राहिली. त्याचे एक कारण असे की, १९४५ पासून आयात मालाच्या किंमती चढत्या राहिल्या. आजकाल कामगार संघटना खूप सामर्थ्यशाली बनलेल्या असल्यामुळे या परि-स्थितीत पैशाची किंमत घसरत असली तरी प्रत्यक्ष वेतन कायम टिकविण्या इतकी पगारवाढ मिळवून घेण्याच्या कामी त्या यशस्वी ठरलेल्या आहेत. परंतु मासिक वेतन, व्यावसायिक उत्पन्न, भाडी आणि व्याजाचे दर सहसा बदलत नाहीत आणि त्यामुळे चढत्या किंमतींशी त्यांचा मेळ बसत नाही. भाड्यावरील सरकारी नियं-त्रणामुळे या नैसर्गिक प्रवृत्तीत भर पडली.

चौथे कारण हे की, वेतनाच्या दराचे स्वरूप कसेही असले तरी कामगारांचे अल्प कालच्या पातळीवरील उत्पन्न हे उत्पादनात होणाऱ्या बदलाच्या मानाने अत्यंत लवचिक असते. उत्पन्नात झालेली वाढ, मग ती मागणी वाढल्यामुळे झालेली असो किंवा उत्पादन क्षमतेत सुधारणा झाल्यामुळे असो, किंमतवाढीमुळे मिळणारे उत्पन्न, वाढलेल्या दराने मिळणारी जादा कामाची भरपाई आणि वाढीव बोनस यात ते [illegible] प्रतिबिंबित होते. इतर उत्पन्नाच्या बाबतीत मात्र तसे घडून येत नाही. अशा तऱ्हेने युद्धसमाप्तीपासूनच्या जलदगतीने होणाऱ्या उत्पादन-वाढीच्या काळात [illegible] दृष्ट्या वेतनात वाढ होण्याची प्रवृत्ती दिसून येते आणि वेतनाच्या दरात होणारी वाढ ही इतर उत्पन्नाच्या बरोबरीनेच होत असते (अर्थात नेहमी ती होत नाहीच).

[illegible] मुद्दा असा की, आर्थिक दडपण (यंत्रसामुग्रीत फेरफार करण्यासाठी लागणारा जादा खर्च आणि वाढलेले दर) आणि राजकीय वातावरण [illegible] ही वास्ती आणि लाभांशाच्या प्रमाणावर येणारे निर्बंध यामुळे कंपन्यांनी लाभांशाबाबत युद्धपूर्वकाळापेक्षा अधिक संकुचित धोर-णाचा अवलंब केल्यामुळे एकूण उत्पन्नाचा भाग म्हणून लाभांशाच्या प्रमाणात [illegible] घट झालेली आहे.

[illegible] परिणामांचा विचार करू लागलो म्हणजे तर [illegible] अधिकच अधिक उठून दिसतो. कर भरण्यापूर्वीच्या [illegible] आकडेवारी दिली आहे तशी कर भरल्यानंतरच्या [illegible] अधिकृत आकडेवारी उपलब्ध नाही. परंतु राष्ट्रीय उत्पन्ना-

संबंधीच्या श्वेतपत्रिकेतील ठळक बाबींचा विचार करता असे दिसून येते की, १९५० साली कर भरल्यानंतरच्या व्यक्तिगत उत्पन्नापैकी ४७% रक्कम वेतनात सामावलेली असे. १९३८ साली हेच प्रमाण ३९ % होते. युद्धपूर्वकाळातील मासिक पगाराचे प्रमाण जे २५% होते त्यात बदल झालेला दिसत नाही. 'भाडेतोडे, लाभांश आणि व्याज' या बाबी असलेल्या संकलित सदरात या ठिकाणी शेतकरी, व्यावसायिक, घाऊक व्यापारी आणि भागीदारी संस्था यांचा समावेश करण्यात आला असून त्यांच्या उत्पन्नात ३४ % पासून २५ % पर्यंत घट झालेली दिसते. डडलेसीर्स यांनी असे दाखवून दिले आहे की, यापैकी जवळजवळ सर्व घट मालमत्तेवरील उत्पन्नधारकांनाच सहन करावी लागली. व्यावसायिक शेतकरी किंवा छोटे व्यापारी यांना त्याची फारशी झळ लागली नाही. या संपत्तीधारकांचे कर भरल्यानंतरचे युद्धपूर्वकाळात असलेले १९% उत्पन्न १९४९ साली ११% वर आले.

निरनिराळ्या श्रेणीतील उत्पन्नधारकांचे कर भरल्यानंतरचे एकूण उत्पन्न आणि किंमतीतील बदल लक्षांत घेता त्यांच्या वाट्याला येणारे निव्वळ उत्पन्न यांचे आकडे उपलब्ध असून ते खालील तक्त्यांत दिले आहेत.

| | करोत्तर एकूण व्यक्तिगत उत्पन्नाची टक्केवारी | | प्रत्यक्ष निव्वळ उत्पन्नाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| | १९३८ | १९४९ | १९३८ |
| पहिले एक लाख उत्पन्न | ७.९ | ३·३ | ४४ |
| पहिले पाच लाख उत्पन्न | १६·८ | ९.८ | ६२ |
| पहिले दहा लाख उत्पन्न | २३·० | १५·१ | ७० |
| पहिले पन्नास लाख उत्पन्न | ४८·६ | ३९·८ | ८७ |
| दुसरे पन्नास लाख उत्पन्न | १८·३ | २०·८ | १२१ |
| ऊर्वरित | ३३·१ | ३९.४ | १२७ |

जास्त उत्पन्न असलेल्यांच्या जिवावर कमी उत्पन्नवाल्यांचा कसा फायदा झाला ते वरील आकड्यांवरून स्पष्ट होते. ठोकळमानाने वरची तीस लाख उत्पन्ने ही खऱ्या अर्थाने युद्धपूर्वकाळापेक्षा कमीच होती. उरलेली सर्व मात्र जास्त होती.

कर आकारणीमुळे उत्पन्नात आणखी समानता आणली गेली. त्याची दोन कारणे संभवतात. एक : प्रत्यक्ष करांचे निव्वळ राष्ट्रीय उत्पन्नांतील प्रमाण १९३८ साली ९% होते ते १९५० साली १८% झाले आणि एकूण कर आकारणीमधील प्रमाण ३५%वरून ६७% वर गेले. दोन : निश्चितपणे प्रमाणतः अधिकच वाढलेली प्रत्यक्ष कर आकारणी. १९३८ आणि १९५० सालची तुलना केली तर असे दिसून येईल की, एका माणसाचे स्वतः मिळविलेले उत्पन्न ५०० पौंड असेल तर त्याला केवळ

२८ पौंड कर रूपाने आधिक भरावे लागत. एक हजार पौंड उत्पन्न असलेल्याला ९८ पौंड आधिक आणि दहा हजार पौंडवाल्याला २२८८ पौंड आधिक भरावे लागत. म्हणजे त्याच्या निव्वळ उत्पन्नांत ५८६७ पौंडापासून ३५८७ पौंडाइतकी घट होत असे. मृत्यूकराच्या दराचे आकडेही असेच वाढत्या श्रेणीचे आहेत. वाढलेल्या संयुक्त करआकरणीमुळे कंपन्यांच्या वितरण करता येण्यासारख्या नफ्यांत आणखी घट झाली व त्यामुळे लाभांशाचे वाटप आणि भाग भांडवलाच्या किंमती या दोहोंवरही निर्बंध पडले.

काही वेळा असे प्रतिपादन केले जाते की, अधिक पुरोगामी आणि चढ्या प्रत्यक्ष करामुळे निव्वळ उत्पन्नाच्या वितरणांत अधिक समानता गाठता आली तरी ती करपद्धती युद्धपूर्वकाळापेक्षा अधिक वितरणक्षम आहे असे नव्हे; म्हणजे त्यामुळे श्रीमंतांकडून गरिबांकडे मोठ्या प्रमाणांत उत्पन्नाचे प्रत्यक्ष हस्तांतर होत नाही हे प्रतिपादन बरोबर आहे. मुख्यत्वे करून कामगार वर्गाला मिळणाऱ्या सामाजिक फायद्यांना कामगार वर्गाला भराव्या लागणाऱ्या जादा करामुळे छेद बसतो. आणि मध्यम व वरिष्ठ वर्गाकडून वसूल केल्या जाणाऱ्या मोठेमोठ्या जादा रकमा 'वाटून देता न येण्यासारख्या' वाढत्या सामाजिक खर्चामध्ये ( संरक्षणावरील खर्च, अंदाज पत्रकातील शिल्लक, सरकारी नोकर वर्ग, राष्ट्रीय कर्जावरील व्याज इत्यादी ) खर्ची पडतात.

तथापी हेही लक्षांत ठेवले पाहिजे की, प्रत्यक्ष कर कमी प्रमाणांत आकारण्यात आले असते तर वितरण विषयक परिस्थिती फारशी अनुकूल राहिली नसती याची जाणीव ठेवली नाही तर चुकीची समजूत होऊन बसण्याचा संभव आहे. जुन्या पठडीतील अर्थशास्त्रज्ञांच्या वर्तुळातून प्रत्यक्ष करांमुळे 'जीव घेणारा बोजा' सहन करावा लागतो अशी जी तक्रार सतत केली जाते त्यावरून असे दिसते की, हुजूर पक्षीय सरकार प्रत्यक्ष करांत मोठ्या प्रमाणावरील कपात करील आणि त्यामुळे येणारी तूट भरून काढण्यासाठी 'वाटून देता न येण्यासारख्या' सामाजिक खर्चांत त्या प्रमाणांत कपात घडवून न आणता ती तूट कामगार वर्गाला मिळणाऱ्या सामाजिक सवलतीत कपात करून भरून काढली जाईल.

त्या परिस्थितीत मग कामगार वर्गाला मिळणाऱ्या सवलतीच्या मानाने करांच्या रूपाने कितीतरी आधिक रक्कम भरलेली असेल आणि कामगार वर्गाकडून सर्वांना लागू पडणाऱ्या सरकारी सेवेमध्ये महत्त्वाचा भाग उचलला गेला असेल.

शिवाय लिट्ल यांनी दाखवून दिल्याप्रमाणे कामगार वर्गात केल्या जाणाऱ्या करपूर्व उत्पन्नाच्या फेरवितरणामुळे देशाच्या अर्थव्यवस्थेत एक नवीन समस्या निर्माण होते. सुस्थितीतील माणसांपेक्षा कामगार सर्वसाधारणपणे कमी शिल्लक टाकीत असल्यामुळे चलनवाढ टाळावयाची असेल तर अंदाजपत्रकातील शिलकीच्या द्वारा राष्ट्रीय बचतीची पातळी वाढवावी लागते. सुस्थितीतील वर्गावर प्रत्यक्ष

करांचा जादा बोजा लादून ती उभी करता येते. अशी शिल्लक राखण्यात आली नाही-आणि अर्थमंत्री हुजूर पक्षाचा असेल तर बहुधा तो ती ठेवणारच नाही—तर, एक-तर शिल्लक अपुरी पडून भरमसाट चलनवाढ करावी लागेल किंवा येणारी तूट भरून काढण्यासाठी कामगार वर्गावर जादा प्रत्यक्ष कर बसवावे लागतील. परंतु त्यामुळे करपूर्व उत्पन्नाच्या फेरवितरणामुळे त्यांच्या पदरात पडणारे बहुतेक फायदे जादा करांच्या रूपाने त्यांना गमावून बसावे लागेल. अशा तऱ्हेने कामगार वर्गाला पूर्ण रोजगारीमुळे मिळू शकणारे फेरवितरणाचे फायदे आर्थिक धोरणामुळे टिकवून ठेवता येतात, अन्यथा ते वाया गेले असते.

म्हणून, फेर वितरणाचा आर्थिक धोरणावर कसलाही परिणाम घडून आला नाही असे म्हणणे काहीसे दिशाभूल करणारे ठरेल. युद्धोत्तर काळातील बदललेल्या परिस्थितीत कामगार वर्गावर निव्वळ करांचा फार मोठा बोजा सहज लादता आला असता. परंतु प्रत्यक्षात मात्र तो त्यांच्यावर लादला गेला नाही आणि एकूण उत्पन्नाच्या समान विभागणीमुळे त्यांच्या राहणीमानात झालेली वाढ टिकून राहिली. त्याचबरोबर प्रत्यक्ष करात वाढ केल्यामुळे कर उभारणीमुळे साध्य होणारी समानताही द्विगुणित झाली. त्याचा परिणाम असा झाला की, युद्धपूर्व काळापेक्षा युद्धोत्तर काळातील करोत्तर उत्पन्नाचे वितरण देखील फार मोठ्या प्रमाणात समानतेच्या भूमिकेवरून होऊ लागले.

## ३. आजची उत्पन्नातील समानता

किमतीतील काही प्रमाणावरील तफावतीचा प्रभाव आणि एकूण उत्पन्न व कर आकारणीतील चढउतार या दोन गोष्टी लक्षात घेता सीअर्सच्या आकडे-वारीच्या आधारे आपल्याला युद्धोत्तर काळातील निव्वळ उत्पन्नात किती घट झाली त्यासंबंधीचे निष्कर्ष काढता येतील. १९३८ सालच्या मानाने १९४९ सालची प्रत्यक्ष मजुरी १२२%, पगार ९६%, व्यावसायिक उत्पन्न ८९%, घाऊक व्यापाऱ्यांचा नफा ७८% आणि भाडेतोडे, लाभांश आणि व्याज यांचे उत्पन्न ५१% होते.

व्यक्तिगत निव्वळ उत्पन्नाच्या विभागणीतील टक्केवारी लक्षात घेता असे दिसून येईल की, वेतनात ३७% वरून ४०% इतकी वाढ झाली तर भाडे, लाभांश आणि व्याज २०% वरून १०% पर्यंत घसरले. आणि दरम्यानच्या इतर बाबींचे प्रमाण जवळपास तेच राहिले. म्हणजेच जो महत्वपूर्ण बदल घडून आला तो असा की, देऊन टाकता येण्यासारख्या उत्पन्नापैकी दहा टक्के उत्पन्न संपत्तीधारकांकडून कामगार वर्गाकडे वर्ग झाले. १९४९ साली अनुत्पादित उत्पन्न एकूण उत्पन्नाच्या एक दशांश इतके होते. शेतकरी, व्यावसायिक आणि छोटे व्यापारी यांच्याकडे आणखी एक दशांश उत्पन्न होते आणि मजुरी, पगार, समाजसेवा सवलती आणि लष्कर यावर एकूण उत्पन्नाचा ८०% भाग खर्ची पडत होता. यावरूनच एका

निराळ्या दृष्टीने सीअर्सने असा निष्कर्ष काढला आहे की, प्रत्येक बाबतीत एकूण लोकसंख्येशी वरच्या वर्गात मोडणाऱ्या उत्पन्नधारकांचे प्रमाण एकषष्ठांश होते आणि या गटाचे सरासरी प्रत्यक्ष उत्पन्न १९३८ च्या मानाने साडेतीन पट, तर १९४८ च्या मानाने दुप्पट होते.

हे बदल लक्षात घेण्यासारखे असून वैयक्तिक निरीक्षणाशी मिळते जुळते आहेत. परंतु या ठिकाणी दोन गोष्टींबाबत इशारा देऊन ठेवला पाहिजे. पहिली गोष्ट अशी की, अमलात आलेल्या सुधारणांपैकी काही भाग हुजूर पक्षीय सरकार अधिकारावर आल्याने रद्द होण्याचा संभव असला तरी त्यातील महत्त्वाच्या सुधारणा रद्द होणे असंभवनीय आहे. या संबंधीचा उहापोह पुढील प्रकारणात केला आहे. दुसरी बाब अशी की, विशेषतः सधन वर्गाचे राहणीमान आणि प्रत्यक्ष व्यय या गोष्टी प्रत्यक्ष करपात्र उत्पन्नावरच सर्वस्वी अवलंबून असतात असे नव्हे तर आणखीही दोन घटक त्याच्या मुळाशी असतात. खर्च करण्यावर पडणारी भौतिक मर्यादा आणि खर्चाच्या करमुक्त बाबी हे ते दोन घटक होत व त्यांचे परिणाम परस्पर विरोधी असतात.

युद्ध संपल्यानंतर लगेचच्या काही वर्षांत काही भौतिक निर्बंधामुळे श्रीमंत वर्गाचा खर्च त्यांना परवडण्यासारख्या पातळीच्या खाली गेला. कामगारांची तीव्र टंचाई भासू लागल्यामुळे घरगड्यांची संख्या युद्धपूर्वकाळाच्या मानाने जवळजवळ एक चतुर्थांशापर्यंत घटली. शिधा वाटप पद्धतीमुळे अन्नधान्याच्या खर्चाबाबत समानता येण्यास खूपच मदत झाली. घरबांधणीसाठी लागणारे परवाने व त्यावरील नियंत्रणे, परकीय चलनावरील निर्बंध आणि यासारखी इतर अनेक नियंत्रणे यामुळे सुखवस्तू माणसांना आपल्या उत्पन्नातील पैसा मनमानेल तसा खर्च करता येईनासा झाला. अशा तऱ्हेने खर्चावर बंधने टाकणाऱ्या नियंत्रणामुळे कर आकारणीबरहुकूमच तऱ्हेचा परिणाम घडून आला. आणि त्यामुळे खर्च आणखी समान पातळीवर आला.

परंतु टंचाई कमी होऊन अनिर्बंध अर्थव्यवस्था सुरू झाल्याबरोबर खर्चाच्या पातळीत समानता घडवून आणण्याचे जे कार्य साधले जात असे ते होईनासे झाले आणि त्याच्या नेमका उलट जो दुसरा परिणाम घडून आला तो असा की, करपात्र नसलेल्या उत्पन्नातून खर्च करण्याचे एक साधन उपलब्ध झाले.

लोकसंख्येच्या इतर गटापेक्षा श्रीमंत गटाला कारखान्याच्या किंवा धंद्याच्या नावावर टाकता येईल असा बराचसा करमुक्त खर्च करता येतो आणि स्वतःचे राहणीमान टिकवून धरण्यासाठी भांडवली गुंतवणुकीचा काही भाग विकून टाकणे त्याला केव्हाही शक्य असते. बरीचशी मालमत्ता धारण करणारा माणूस आपल्या करमुक्त भांडवलापैकी थोडा थोडा भाग दरवर्षी काढून घेऊन स्वतःसाठी [illegible] मोठ्या खर्चाची तरतूद करू शकतो. त्याच्या भावी उत्पन्नात मात्र त्यामानाने

फारच थोडी घट होते. एखाद्या व्यक्तीजवळ भांडवलाच्या स्वरूपात २,००,००० पौंड असतील आणि त्यामधून तो (सरासरी दर ५% धरून) १०,००० पौंडाचे एकूण उत्पन्न घेत असेल तर अगदी अलीकडील काळापर्यंत त्याच्याजवळ कर भरल्यानंतर ३,५८७ पौंड रहात असत. परंतु चालू खर्चात मात्र त्याला दुप्पटीने वाढ करता येत असे व त्यासाठी सरटॅक्सचे खूप वाढलेले प्रमाण जमेस धरूनही त्याच्या निव्वळ उत्पन्नातून मात्र त्याला अवघ्या पन्नास पौंडाची घट पत्करावी लागत असे. तरी त्यात भांडवली फायदा मिळण्याची शक्यता गृहित धरलेली नाही. या भांडवली फायद्यामुळे उत्पन्नात झालेली वाढ करमुक्त असेल तर भाग भांडवल धारकांच्या वर्गाची आणखीच चंगळ होते. यावरून हे लक्षात येईल की, निव्वळ करपात्र उत्पन्नाचे हे आकडे खर्चासंबंधीचे सर्वस्वी विश्वसनीय असे गमक होऊ शकत नाही. आणि सधन वर्गापैकी विशेषत: शहरी विभागातील आणि व्यापाऱ्यांशी संबंध असलेल्या गटाला काही प्रमाणात तरी वाढीव कर आकारणीचे परिणाम टाळता येतात.

परंतु हे सर्व मान्य केल्यानंतरही एक महत्त्वाचा मुद्दा शिल्लक उरतोच आणि तो असा की, श्रीमंत हे पहिल्यापेक्षा निश्चितच कमी श्रीमंत राहिले आहेत. आणि गरिबांची गरिबीही पहिल्यापेक्षा मोठ्या प्रमाणात कमी झालेली आहे. खर्च करण्याच्या ऐपतीच्या संदर्भात बोलावयाचे झाले तरी देखील समानता साधण्याची प्रक्रिया सुरू झालेली आहे ही वस्तुस्थिती आहे. मजूर पक्षाच्या सहा वर्षांच्या कारकीर्दीनंतर इंग्लंडमध्ये निश्चितच युद्धपूर्व काळापेक्षा अधिक समानता असलेला समाज पहावयास मिळतो. इतर कोणत्याही परिस्थितीत तसा तो पहावयास मिळाला नसता. अद्याप बरीच मजल मारावयाची राहिली असली तरी आतापर्यंत जो टप्पा गाठला गेला आहे तो उपेक्षणीय मानून चालणार नाही.

## ४. पूर्ण रोजगार आणि स्थैर्य

तातडीच्या उद्दिष्टांपैकी शेवटचे उद्दिष्ट आर्थिक स्थैर्य हे होते. अर्थात या उद्दिष्टांचा किंबहुना आर्थिक नियोजनाच्या संपूर्ण बाबीचाच विचार बेकारीच्या समस्येच्या संदर्भात करावा लागेल आणि त्याबाबतीत फार मोठ्या अडचणी उत्पन्न झालेल्या नाहीत. १९४५ साली ब्रिटन तीव्र आणि दीर्घ मुदतीच्या चलन वाढीच्या कचाट्यात सापडले होते. त्यावेळी तेथील नियोजनकारांपुढे मागणी वाढवावयाची कशी यापेक्षा ती काबूत कशी ठेवावयाची हाच खरा प्रश्न होता.

याचा अर्थ असा नव्हे की, पूर्ण रोजगार उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत मजूर सरकारच्या धोरणाचा काहीच परिणाम घडला नाही. युरोपातील काही देशात बेकारीची समस्या निर्माण झाली तशी ती मजूर सरकारने ब्रिटनमध्ये होऊ दिली नाही व त्यासाठी जाणूनबुजून पैशाच्या व्यवहारावर निर्बंध लादण्यात आले. परंतु सरकारच्या या कृत्यामुळे सर्वसाधारण बेकारीपेक्षा आर्थिक व्यवस्थेतील बदलामुळे

जी संरचनात्मक (Structural) बेकारी निर्माण झाली असती ती टाळता आली. दोन युद्धांच्या दरम्यानच्या काळात विशेष मंदीत आलेले काही मूलभूत उद्योग विशिष्ट प्रदेशात केंद्रित झाल्यामुळे त्या तथाकथित "संकटग्रस्त" विभागात बेकारीचे प्रमाण कमालीचे वाढले. आणि मंदी असो की तेजी असो ही परिस्थिती तशीच कायम राहिली. उदाहरणार्थ १९३७ साली देखील अशा विभागातील बेकारीचे प्रमाण राष्ट्रीय पातळीच्या सरासरीच्या मानाने जवळजवळ दुप्पट होते.

युद्धकाळानंतर देखील बेकारीचा मुख्य गड्डा तसाच कायम राहू शकला असता. या उद्योगात आता मंदी राहिलेली नव्हती तर ते चांगले भरभराटीस आले होते हे खरे. परंतु केवळ त्यांच्या बळावर सर्वच्या सर्व कामगारांना (विशेषत: कामाच्या शोधात असलेल्या स्त्रियांच्या फार मोठ्या संख्येला) पुरेसा रोजगार उपलब्ध करून देणे शक्य झाले नसते. घरटंचाईमुळे कामगारवर्गाच्या स्थलांतराचे प्रमाणही फार कमी होते. इटलीत असे दिसून आले की, चलनवाढ आणि संरचनात्मक बेकारी एकमेकांशी मिळतीजुळती होती. आणि जर बेकारी टाळावयाची असेल तर नवेनवे उद्योग मोठ्या प्रमाणावर त्या विभागात हलवणे जरूरीचे होते.

आणि उद्योग अशा तऱ्हेने खरोखरीच हलवले गेले. इतर विभागात कामगारांची तीव्र टंचाई भासत असल्यामुळे, ज्या भागात त्यामानाने कामगार मोठ्या प्रमाणावर उपलब्ध होते, अशा विभागात कारखानदारांकडून त्यांचे कारखाने काही अंशी आपोआपच हलविले गेले. परंतु सरकारने निश्चित पावले उचलली नसती तर इष्ट त्या प्रमाणावर मात्र ते खासच हलवले गेले नसते. पूर्वीचे सरकारी मालकीचे दारूगोळ्याचे कारखाने खाजगी उद्योगपतींकडे सोपविण्यात आले. सरकारने नवे कारखाने बांधून ते खाजगी कंपन्यांना कराराने दिले आणि यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे घरबांधणीच्या परवाना पद्धतीनुसार मिळालेले अधिकार अशा विभागात नवे खाजगी कारखाने बांधणीसाठी वापरण्यात आले. १९३६ साली एकूण ५५१ कारखान्यांपैकी आठ नवे कारखाने या संकटग्रस्त विभागात उभारले गेले. १९४५ पासून १९४७ पर्यंत नव्या औद्योगिक इमारतींपैकी ५० % इमारती (काहीशा मोठ्या) विकास गटात बांधल्या गेल्या. याचा परिणाम असा झाला की, संरचनात्मक बेकारीचे संकट कधीच ओढवले नाही.

तरीही इतके मात्र खरे की, युद्धोत्तर काळातील वैशिष्ट्यपूर्ण समस्या जर कोणती असेल तर ती बेकारीची नसून चलनवाढीचीच होती. म्हणूनच पूर्ण रोजगार उपलब्ध करून देण्याच्या उद्दिष्टासंबंधी यापेक्षा अधिक उहापोह मी केलेला नाही. कारण ते उद्दिष्ट पूर्णपणे साध्य झालेलेच होते– अर्थात मजूर सरकारच्या धोरणामुळेच केवळ नव्हे. चलनवाढीसंबंधीचे विवेचन अन्यत्र आलेले आहे. अर्थात व्यक्तिगत स्वास्थ्य आणि वर्गीय सत्तेचा समतोल या दोन्ही दृष्टीनेच केवळ नव्हे तर सरकारने स्पष्टपणे याबाबतची जबाबदारी स्वीकारली असल्यामुळेही पूर्ण

रोजगाराच्या उद्दिष्टाला जे विशेष महत्त्व प्राप्त होते ते मी कमी लेखतो असा याचा अर्थ नाही. यासंबंधीची युद्धपूर्व कालीन चर्चा आठवली तर गेल्या दोन शतकात सामाजिक क्रांतीच्या बाबतीत डाव्या गटांनी जे विजय संपादन केले त्यांच्याच तोडीचा हा विजय आहे हे सहज लक्षात येईल.



## प्रकरण तिसरे

# तरीही ही भांडवलशाहीच का?

### १. परिवर्तनाची व्याप्ती

गेल्या दोन प्रकरणात ज्यांचा उहापोह करण्यात आला आहे आणि ज्यांचे विवेचन झालेले नाही अशा फेरबदलांमुळे ब्रिटिश समाजात फार मोठे परिवर्तन घडून आलेले आहे. आणि त्यामुळे चांगले परिणामच घडून आलेले आहेत हे कोणतीही उदारमनस्क व्यक्ती नाकारू शकेल असे मला वाटत नाही. पहिल्यापेक्षा अधिक मानवतावादी न्याय्य दृष्टिकोनातून आता सर्व व्यवहार चालविले जातात. पूर्वीच्या लढ्याबद्दलचे आकर्षणही आता खूप कमी झाले आहे. १९१८ साला नंतरच्या कालखंडातील हिंसाचार किंवा त्यांच्या आगे मागे झालेले संप आणि टाळेबंदी यांचा अलिकडील काळात मागमूसही राहिलेला नाही. बेकार भत्त्यासाठी लागलेल्या रांगा, अन्नछत्रे आणि भूक मोर्चे व त्यामुळे निर्माण होणारी कटुता यांनी १९३० सालचे औद्योगिक क्षेत्रातील वातावरण भरून गेलेले असे. आता ती परिस्थितीही राहिलेली नाही. राजकीय क्षेत्रातही आता फार करून कोणी आत्यंतिक भूमिका घेत नाही हे देखील सामाजिक तणाव कमी झाल्याचेच द्योतक आहे.

अर्थात परिस्थितीत घडून आलेल्या या सुधारणेचे सर्व श्रेय युद्धोत्तर काळातील मजूर सरकारला देणे वेडेपणाचे ठरेल. या शतकाच्या सुरवातीपासूनच भांडलवशाहीत अगदी गोगलगाईच्या गतीने का होईना पण स्थित्यंतर घडून येऊ लागले होते. हे स्थित्यंतर खुषीने स्वीकारले जात नव्हते तर ते बव्हंशी लादले जात होते. म्हणजेच औद्योगिक क्षेत्रात अनिर्बंधतेच्या तत्वाला मिळालेली मोकळीक व तिच्या घातुक परिणामाविरूद्ध बिगर भांडवलदार वर्गाने उभारलेला बंडाचा झेंडा आणि औद्योगिक व राजकीय क्षेत्रातील डाव्यांचे वाढते सामर्थ्य यामुळे हे स्थित्यंतर एकपरीने भांडवलदारांवर लादले जात होते. भांडवलदारी विकासासंबंधी मार्क्सने वर्तविलेली भाकिते इंग्लंडमध्ये किंवा तसे पाहिले तर कोणत्याच लोकशाही देशात कधीच खरी ठरली नाहीत ती मुख्यत: यामुळेच. मी दुसऱ्या एका ठिकाणी म्हटल्या-

प्रमाणे राष्ट्रीय संघर्षाचे चुकीचे मूल्यांकन केल्यामुळे मार्क्सवाद्यांकडून एक चूक नेहमी केली जात असे ती अशी की, राजकीय लोकशाहीमुळे जे सामाजिक आणि राजकीय परिणाम घडून येतात त्याची मुळी ते कधी दखलच घेत नसत.

परंतु केवळ भांडवलशाही विरोधी वर्गांनाच तेवढे स्थित्यंतर घडून यावयास हवे होते असे नाही. युद्धपूर्व काळातील समाजवादासंबंधीच्या विचित्र कल्पनांना चिकटून बसून कमी प्रमाणावरील नफा आणि आर्थिक मंदीची झळ अमर्याद काल-पर्यंत सहन करीत बसण्यापेक्षा काही सुधारणा मान्य करण्याची व्यापारी वर्गाची तयारी होती. त्याचप्रमाणे भांडवलदार वर्गाबद्दलची त्यांची भक्ति व निष्ठा हळू-हळू कमी होऊ लागली होती. तसेच आर्थिक क्षेत्राच्या जोडीला इतर क्षेत्रातही महत्त्वपूर्ण बदल घडून येत होते. भांडवलदार वर्गातील पूर्वीचा दुर्दम्य आत्मविश्वा-सही हळूहळू नष्ट होऊ लागला होता. अनियंत्रित भांडवलशाही हीच सर्वोत्कृष्ट अर्थपद्धती आहे या त्यांच्या आजवरच्या श्रद्धेलाही तडे जाऊ लागले होते; त्याच-बरोबर भांडवलशाहीची परिणती नैतिक आणि शारिरिक अवनती होण्यात झाल्या-शिवाय रहात नाही याची मनापासून लागलेली टोचणीही वाढत चालली होती. १९३० ते ४० च्या दरम्यान मध्यम वर्ग राजकारणात आधिकाधिक प्रमाणात रस घेऊ लागला होता व त्याचे पर्यवसन ' लेफ्ट बुक क्लब 'सारख्या संस्थांच्यामार्फत जन जागृतीचे लोकविलक्षण कार्य होण्यातच झाले होते. अर्थात या संदर्भात पहिल्या प्रकरणात ज्याचे विवेचन येऊन गेले आहे ते सामाजिक स्थित्यंतर आणि त्याच्या जोडीला उद्योगातील व्यवस्थापकीय वर्गाकडून भांडवलदारांना हळूहळू बसू लाग-लेला खो याचाही उल्लेख करावा लागेल. या सर्वांचा परिणाम असा झाला की, फाटाफूट आणि पराभूत मनोवृत्ती यामुळे आधीच ढासळू लागलेल्या भांडवल-शाहीच्या बालेकिल्ल्यावर भांडवलशाही विरोधी वर्गाकडून निकाराचे हल्ले चढविले जाऊ लागले.

भावी काळाच्या दृष्टीने ही स्थित्यंतरे कितीही अर्थगर्भ ठरणारी असली तरी त्याचे प्रत्यक्षात घडून आलेले परिणाम मात्र काहीसे नगण्य असेच होते. आणि त्यामुळे १९३९ च्या ब्रिटनमधील समाजाचे वर्णन मूलतः पुनर्रचना न झालेला भांड-वली समाज असेच करावे लागेल.

या उलट महायुद्ध हे सामाजिक स्थित्यंतराचे अत्यंत प्रभावी असे साधन ठरले. मुख्यत्वेकरून हुजूरपक्षाच्या सरकारला देखील लष्करी परिस्थितीच्या रेटयामुळे मजूर पक्ष वर्षानुवर्षे ज्या सुधारणांसाठी निष्फळ कंठशोष करीत आला होता अशा अनेक सुधारणांचा अवलंब करावा लागला. सरकारी नियोजन, बेकारीचे संपूर्ण उच्चाटन, कराच्या ओझ्याचे फेरवाटप करणारी कर आकारणी आणि सामाजिक सेवेच्या नव्या बाबी यांचा या संदर्भात उल्लेख करावा लागेल. अशी पावले उचलणे म्हणजे ध्येयवेड्या डाव्या गटाचे नुसतेच दिवास्वप्न

नसून ते सर्वस्वी व्यवहार्य आहे हे मतदारांच्या मनावर पक्के बिंबले आणि त्यामुळे युद्धकाळांत ज्या सुधारणा सहजपणे हाती घेतल्या गेल्या त्याबाबत शांततेच्या काळांत कसलीही हालचाल न करणाऱ्या हुजूर पक्षाला १९४५ च्या सार्वत्रिक निवडणुकीत मतदारांनी साफ झिडकारले.

तरी देखील आज घडून आलेल्या सर्व घटना युद्धाच्या परिणामामुळेच घडून आल्या आहेत अशी समजूत करून घेणे चुकीचे ठरेल. मागच्या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे युद्धकाळांत जनता आणि सरकार या दोघांचाही कल 'डावी'-कडे झुकलेला असतो. मुख्य प्रश्न निर्माण होतो तो हा की, युद्ध समाप्तीनंतर त्यांची ती भूमिका कायम राहू शकते की नाही. इंग्लंडच्या बाबतीत पहिल्या महायुद्धानंतर आणि इतर अनेक देशांत दुसऱ्या महायुद्धानंतर युद्धकालीन मनोवृत्ती टिकून राहिली नाही. झपाट्याने ती पुन्हा पूर्वीच्या वळणावर गेली. युद्धानंतर देशांत डाव्या विचारसरणीचे सरकार अधिकारावर आले तरच ते युद्ध कायमचे क्रांतिकारी ठरू शकते. कारण असे सरकार युद्धकालीन स्थित्यंतराचा पुरेपूर फायदा घेऊन त्याचा पाया मजबूत बनवते आणि प्रगतीचे पुढील टप्पे गाठण्या-साठीही त्याचा जास्तीत जास्त उपयोग करून घेते.

ॲटली सरकारवर हीच ऐतिहासिक जबाबदारी येऊन पडली होती. ती पार पाडण्याच्या बाबतीत ते सरकार कितपत यशस्वी झाले त्याची कदाचित आजच्या जनतेला जाणीवही नसेल. कारण जनतेची स्मरणशक्ति फार तोकडी असते. झालेली स्थित्यंतरे चटकन गृहीत धरून चालण्याची प्रवृत्तीच असते. त्यामुळे बदललेली परिस्थिती पूर्वीपासून तशीच चालत आलेली आहे. अशीच समजूत करून घेतली जाते. त्यामुळे पूर्वीची मनस्थिती किंवा आशा आकांक्षा लक्षांत घेणे अशक्य होऊन बसते.

त्यामुळे युद्धपूर्व कालीन आशा आकांक्षांशी ॲटली सरकारने बजावलेली कामगिरी ताडून पहाणे उपयुक्त ठरेल. त्यासाठी मजूर पक्षाने १९३७ साली मांड-लेल्या 'अल्प मुदतीच्या कार्यक्रमांचा' आढावा घेणे संयुक्तिक ठरेल. मजूर पक्षातर्फे अत्यंत तपशीलवार असा हा कार्यक्रम मांडण्यात आला होता आणि पक्षाने स्वतःला त्या कार्यक्रमाला बांधून घेतले होते· 'समाजवाद आणि सामाजिक सुधारणा यासाठी तातडीने हाती घ्यावयाच्या कलमांची यादी' असे त्या कार्यक्रमाचे वर्णन केले जात असे आणि मतदारांनी निवडून दिल्यास आपल्या पांच वर्षाच्या कारकिर्दीत तो संपूर्णपणे अमलात आणला जाईल अशी पक्षातर्फे ग्वाही दिली जाई.

त्या कार्यक्रमातील ठळक बाबी पुढील प्रमाणे होत्या :

१) आर्थिक : बँक ऑफ इंग्लंडचे राष्ट्रीयीकरण, नव्या भांडवल गुंतवणुकीवर नियंत्रण; कर आकारणीच्या द्वारा संपत्तीचे फेरवाटप २) शेती आणि उद्योगधंदे : सरकारला सक्तीने जमीन ताब्यात घेण्याचे अधिकार, आगगाड्या व इतर वहातुक

कंपन्या तसेच कोळसा, गॅस आणि वीज यांचे राष्ट्रीयीकरण ३) सामाजिक सवलती: पगारी रजा, शाळा सोडण्याची वयोमर्यादा सोळाव्या वर्षापर्यंत वाढवणे, निवृत्ती-वेतन, कामगारांना मिळणारी नुकसान भरपाई आणि आरोग्य सेवा यात सुधारणा. ४) संकटग्रस्त विभाग : कारखाना उभारण्याच्या जागेबाबत नियंत्रणे.

'ट्रॅन्स्पोर्ट हाऊस' या तीव्र टीकेचा विषय बसलेल्या मजूर पक्षाच्या मुख्य कचेरीतून प्रसृत झालेला हा कार्यक्रम नेमस्तपणे पावले टाकणाऱ्या पुढाऱ्यांनी बिचकबिचकतच बनवलेला होता व त्यात जहाल गटाची सर्वसाधारण विचारसरणी प्रतिबिंबित झालेली नव्हती असे समजण्याचे कारण नाही. उलट पार्लमेंटमध्ये नसलेल्या मजूर पक्षातील निरनिराळ्या गटातील समाजवादी विचारवंतांच्या मतप्रणालीशी तो अधिक मिळता जुळता होता. प्रो. कोल डग्लस जे, आणि ई. एफ्. एम्. डर्बीन यांनी समाजवादावरील आपल्या लिखाणांतून मजूर सरकारला आपल्या पहिल्या कारकीर्दीत साधारणपणे एवढाच कार्यक्रम पार पाडता येईल अशी अपेक्षा व्यक्त केलेली होती. स्ट्रॅची हा त्यावेळी बराच जहाल म्हणून ओळखला जात असे. लेफ्ट बुक क्लबसाठी त्याने 'जनता आघाडी'चा म्हणून एक कार्यक्रम प्रसृत केला होता. तो तर वरील कार्यक्रमापेक्षाही मवाळ होता. अर्थात हा कार्यक्रम आखतांना पार्लमेंटमध्ये बहुमत मिळविण्यासाठी मजूर पक्षाला बिगरसमाजवाद्यांशी हात मिळवणी करावी लागेल असे स्ट्रॅचीने गृहीत धरले होते हे खरे; तथापी त्या कार्यक्रमामुळे 'भांडवलशाहीचा चेहरा मोहरा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर बदलला' जाईल आणि शेवटी त्याची परिणती समाजवादात होईल असे सांगण्यात आले होते. त्या कार्यक्रमात मुख्यत: खलील सहा कलमांचा समावेश होता.

१) सरकारी किंवा मिश्र स्वरूपाच्या गुंतवणुकीस उत्तेजन देणे.
२) खासगी भांडवल गुंतवणुकीस उत्तेजन मिळावे म्हणून व्याजाचा दर कमी करणे.
३) फेर वितरणात्मक कर आकारणी
४) सामाजिक सेवांत वाढ
५) बँकिंगच्या राष्ट्रीय पद्धतीचे राष्ट्रीयीकरण
६) आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या समतोलावर सरकारी नियंत्रण.

या कार्यक्रमावरून हे स्पष्ट होईल की, मजूर मंत्रीमंडळाने बजावलेली कामगिरी अपेक्षेहून जास्त यशस्वी ठरली. वर उल्लेखिलेल्या कलमांची अंमलबजावणी जितपत होईल असे मानले गेले होते, त्यापेक्षा ती अधिक झाली. उदाहरणार्थ, अधिकृत कार्यक्रमात नमूद केलेल्या उद्योगांच्या जोडीला नागरी विमानवहातूक, पोलाद, परिवहन, केबल आणि बिनतारी तारायंत्र यांचाही राष्ट्रीयीकरणात समावेश करण्यात आला. समाजसेवांच्या योजनेची व्याप्ती वाढविण्यात येऊन कुटुंबभत्ता, सर्वसमावेशक राष्ट्रीय आरोग्य योजना आणि राष्ट्रीय विमा व्यवहारात किरकोळ

सुधारणा करण्यासाठी संपूर्णपणे नव्याने करण्यात अलेली त्याची उभारणी यांचाही त्यात अंतर्भाव करण्यात आला. तसेच करआकारणीचे फेरवितरण, बेकारी निर्मूलन, संकटग्रस्त भागातील समस्या, कामगारवर्गाचे राहणीमान आणि आर्थिक व्यवहारावरील सरकारी नियंत्रणे या सर्वच बाबतीत युद्धपूर्व लेखकांच्या कल्पनेच्या टप्प्यातही न आलेल्या गोष्टी साध्य झाल्या.

अर्थात याचा अर्थ असा नव्हे की, झाले ते सर्व योग्य होते किंवा याहून अधिक काही करता आले नसते, किंवा आणखी करण्यासारखे असे फारसे काही उरलेच नव्हते. अर्थात युद्धामुळे सुधारणांचा मार्ग मोकळा होण्यास मदत झाली हेही खरे. याचा अर्थ इतकाच की युद्धपूर्वकाळातील ज्वलज्जहाल विचारवंतांच्या अपेक्षेपेक्षाही जास्त कामगिरी पहिल्या मजूर मंत्रीमंडळाने आपले बहुमत संपुष्टात येण्यापूर्वी करून दाखविली हे आज कोणी विचारातच घेत नाही.

## २. हुजूर पक्षाची धोकादायक प्रतिक्रिया

परंतु हे सर्व स्थित्यंतर अगदी डळमळीत आहे का ? कांही वर्षे हुजूरपक्षीय सरकार अधिकारावर आल्याबरोबर हा सबंध डोलारा ढासळून पडणार का ? हुजूर पक्षाकडून या सर्व सुधारणांवर बोळा फिरविला जात असताना मजूर पक्षाला विरोधी बाकावर बसवून त्याकडे नुसते अगतिकपणे पहात बसावे लागणार म्हणून एवढे अस्वस्थ होण्याचे कारण नाही. १९५१ मध्ये अशा तऱ्हेच्या अनेक आशंका व्यक्त केल्या जात होत्या. मला त्या खऱ्या वाटल्या नाहीत हे मी कबूल करतो. अर्थात हुजूर पक्षाचे सरकार प्रतिगामी पावले उचलणार आणि मजूर पक्षाने घडवून आणलेल्या अनेक सुधारणा खणून काढणार हे उघडच होते. हुजूरपक्ष, मजूर पक्षाने ठरवून दिलेल्या अग्रक्रमात फेरबदल करणार, सामाजिक नियंत्रण आणि मालकी यांच्या कक्षा आखडून घेणार आणि मुख्य म्हणजे गरिबांचे निव्वळ उत्पन्न कमी होत जावून ते श्रीमंत वर्गात विभागले जावे यासाठी हुजूर पक्ष कर पद्धतीत बदल, अनुदानात कपात आणि निर्नियंत्रण या मार्गांचा अवलंब करणार याची खात्रीच होती. आणि या सर्व गोष्टी करण्यात आल्या आहेत इतकेच नव्हे तर भविष्य काळात आणखीही केल्या जातील. परंतु मजूर पक्षाने अंमलात आणलेल्या सुधारणांच्या गाभ्यालाच ते हात घालतील अशी शक्यता नाही. आणि मी तर असे म्हणेन की आणखी अनेक वर्षे पर्यंत हुजूरपक्ष आधिकारावर राहिला तरी मजूरपक्षाच्या कारकीर्दितील ७५% सुधारणा कायमच राहतील.

याचे एक कारण असे की काही बदल कोणत्याही व्यवहार्य मार्गाने कधी नष्टच करता येत नाहीत. कारण ते पार्लमेंटच्या कोठल्याही कायद्याने घडून आलेले नसतात तर सामाजिक चौकटीत मूलभूत स्थित्यंतर घडून आल्यामुळेच ते अस्तित्वात आलेले असतात. म्हणून पहिल्या प्रकरणात उल्लेखिलेले सत्तांतर कोणत्याही

सरकारला नष्ट करून परिस्थिती पूर्ववत् करता येणार नाही. कारण ते सत्तांतर कायद्यापेक्षाही सामाजिक मनोवृत्ती, नैतिक जागृती, तांत्रिक प्रगती आणि उद्योग-धंद्याची अंतर्गत व्यवस्था यात झालेल्या बदलामुळे घडून आलेले होते.

वस्तुस्थिती अशी नसती तरी देखील संपूर्णपणे प्रतिक्रांतिकारक वर्तन करणे जवळपास अशक्यच झाले असते. त्याचे मुख्य कारण असे आहे की, ब्रिटिश कॉंझर्वेटिव्ह पार्टीचा तो पिंडच नाही, आणि प्रतिगामीपणाचा तो पक्ष कितीही जरी टेंबा मिरवीत असला तरी तो आपले नेतृत्व सर्वसाधारणपणे अत्यंत वास्तववादी आणि सावध म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पीलवाद्यांच्या हातीच सोपवितो. निष्ठा, सिद्धांत आणि तत्त्वज्ञान ही जी अस्सल प्रतिक्रांतिकारक पक्षाची प्रधान वैशिष्ठ्ये त्यांचाच मुळी त्या पक्षाजवळ अभाव आहे. भूतकालाचे पुनरुज्जीवन करण्याची खरोखरीची तळमळ लागायची असेल तर त्या काळाबद्दल नैतिक आणि सैद्धांतिक आत्मीयता किंवा ओढ असावी लागते. आणि ब्रिटनमधले हुजूरपक्षीय हे अगदी अस्सल व्यवहारवादी आणि अनुभववादी असल्यामुळे हुजूर पक्षात ती अभावानेच पहावयास सापडते. हुजूरपक्षीय हा स्थितिप्रिय असतो. मग ती 'स्थिती' कोणतीही असो. आणि भूतकाळाची प्रतिष्ठापना करण्यापेक्षाही विद्यमान परिस्थिती टिकवून धरणे हेच तो आपले प्रधान कर्तव्य मानतो.

आजच्या परिस्थितीत तर हे आधिकच खरे ठरते. कारण कायमची मंदी, कमालीची अस्थिरता आणि परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतीत आत्यंतिक भेदरटपणा ही अलिकडेच उलटून गेलेल्या कालखंडाची वैशिष्ठ्ये होती. पुनरुज्जीवनाच्या ओढीने हुजूर पक्षीय मंडळींना खालच्या पातळीवरील कर आकारणीसारख्या त्या युगांतील वैशिष्ठ्यांची आवड वाटली आणि स्वतःची कितीही आत्मवंचना त्यांनी करून घेतली तरी युद्धपूर्व काळातील एकूण परिस्थितीबद्दल सैद्धांतिक अगर भावनिक जिव्हाळा त्यांना वाटणार नाही किंवा १९३० ते ४० च्या दरम्यानचा काळ हे सुवर्णयुग होते आणि त्यापासून बाजूला सरणे जितके अनैतिक तितकेच मूर्खपणाचे ठरेल असे ते सुद्धा म्हणू शकणार नाहीत.

शिवाय मतदारांची मनोवृत्ती ही देखील व्यापक प्रमाणावर प्रतिक्रांति होऊ शकणार नाही याची खात्री देऊ शकेल. पूर्ण रोजगार, समाजकल्याणकारी योजनांची व्याप्ती आणि सामाजिक सुरक्षितता या गोष्टी सहज कायम ठेवता येण्यासारख्या आहेत, अशी मतदारांची खात्री होऊन चुकलेली असल्याने त्यावर तिलांजली सोडण्यास ते कधीच तयार होणार नाहीत. कोणतेही सरकार जर पूर्ण रोजगाराच्या कल्पनेवर आधारलेल्या कल्याणकारी राज्याच्या पायाला जबरदस्त हादरा देण्याचा प्रयत्न करील तर मतदार निवडणुकीच्या वेळी त्याला धूळ चारल्याशिवाय राहणार नाहीत. आणि ही जाणीव असल्यामुळेच राजकारणी त्या फंदात पडत नाहीत. हे लक्षात घेतले तरच वीस वर्षांपूर्वी सहज नट समाजकल्याणाच्या योजनात वाढ,

पूर्ण रोजगारावर जास्तीत जास्त भर, पगारदार कर्मचाऱ्यांची भरभराट इतकेच नव्हे तर प्रसंगी उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणाची यशस्विता अशा ज्या कार्यक्रमांचा पुरस्कार करीत आणि उजवे गट ज्याला विरोध करीत असत त्याच कार्यक्रमावर हुजूरपक्ष आता निवडणूक लढवू पाहातो, या एरवी विचित्र वाटणाऱ्या परिस्थितीचा उलगडा होऊ शकतो. डाव्या गटाला अनुकूल असलेल्या मुद्यावरच आज राजकीय लढा लढवला जात आहे, हा राष्ट्राच्या तत्त्वप्रणालीत बदल घडून आल्याचा स्पष्ट पुरावाच आहे.

विशेषतः निवडणुकांमुळे युद्धोत्तर काळातील समाज राजकीय प्रतिक्रियांना बळी पडणार नाही हे महत्त्वाचे आहे. कारण पूर्ण रोजगार ही सत्तासमतोलाच्या बाबतीत निर्णायक ठरणारी अशी एक बाब आहे आणि तिच्यावर हल्ला करणे कोणालाही सोपे जाणार नाही. गेल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे पूर्ण रोजगारीबद्दलचा हा आग्रह, हेच व्यापारी वर्गाच्या हातातून आर्थिक सत्ता काढून घेतली जाण्याचे प्रमुख कारण आहे आणि जोपर्यंत ही परिस्थिती कायम आहे तोपर्यंत वेस्ट मिनिस्टरवर कोणाचीही जरी सत्ता असली तरी औद्योगिक क्षेत्रातील सत्तेची खरी सूत्रे संघटित कामगार वर्गाच्याच हाती राहतील.

त्यामुळे हुजूर पक्ष भावी प्रगतीच्या मार्गात अडथळे आणण्याचा प्रयत्न तर करीलच पण त्याचबरोबर नवीन आर्थिक व सामाजिक परिस्थितीतही बदल घडवून आणण्याचा त्या पक्षाकडून सतत प्रयत्न होत राहील. विशेषतः सधन वर्गाला शक्यतोवर पाठीशी घालण्याचा प्रयत्न केला जाईल. परंतु नव्या समाजाची चौकट ते निश्चितच उध्वस्त करून टाकणार नाहीत.

## ३. ब्रिटनमध्ये भांडवलशाही समाज आहे काय ?

नव्या स्वरूपातील समाज हा देखील भांडवलशाही स्वरूपाचा आहे असे म्हणण्यात काही अर्थ आहे का ? अर्थात भांडवलशाही समाजाच्या व्याख्येवर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून राहील. मात्र त्यामुळे त्याचे महत्त्व कमी होते असे नाही. भांडवलशाही, समाजवाद, लोकशाही किंवा साम्यवाद यासारख्या शब्दांना भावनात्मक आणि प्रचारात्मक असा आशय प्राप्त झाला आहे. त्यामुळे एखाद्या समाजावर ( किंवा व्यक्तीवर ) तो समाजवादी, साम्यवादी, लोकशाहीवादी किंवा असा काही तरी असल्याचा शिक्का बसणे याला देखील काही महत्त्व प्राप्त होते. कारण अशा शिक्क्यावरूनच त्या समाजाकडे (किंवा व्यक्तीकडे) बघण्याचा जनतेचा दृष्टीकोन ठरत असतो. मात्र त्यामुळे शब्दांचा कीस काढीत बसणे कमी महत्त्वाचे आहे असे मानण्याचे कारण नाही. भांडवलशाही या शब्दाचा सर्वसाधारणपणे खाली दिलेल्या दोन अर्थांपैकी एक अर्थ संभवतो. एक: ऐतिहासिक दृष्टीने पाहिले तर भांडवलशाही म्हणजे औद्योगिक क्रांतीनंतर एकोणिसाव्या शतकात विकसित

होत गेलेला इंग्लंडमधील समाज; यात फार फरक झाला असला तरी १९३० मध्येही त्याची ढोबळ वैशिष्ठ्ये तशीच कायम होती. हा शब्द सर्वत्र वापरला जाऊ लागला तो याच अर्थाने. अशा प्रकारे हा शब्द रूढ होण्याचे कारण असे की औद्योगिकरणावर आधारलेला समाज आणि मध्ययुगीन किंवा सरंजामशाही समाज यातील तफावत डोळ्यात भरण्यासारखी होती. आणि ती मुख्यत्वेकरून औद्योगिक क्षेत्रातील भांडवलामुळेच घडलेली होती. म्हणून या भांडवलामुळे झालेल्या तांत्रिक क्रांतीच्या आधारे उभारल्या गेलेल्या सर्व समाजालाच ती संज्ञा दिली गेली.

या ऐतिहासिक व्याख्येच्या दृष्टीने ब्रिटनमधील आजच्या समाजाला भांडवलशाही समाज म्हणून संबोधणे उघड उघड चुकीचे ठरेल. सरतेशेवटी ज्यावरून सामाजिक स्वरूप निश्चित होते अशी त्या समाजाची खास वैशिष्ठ्ये तरी कोणती होती?

(१) आर्थिक व्यवहारातील स्वायत्तता, अगदी व्यक्तिगत उत्पादनापर्यंत आर्थिक निर्णयांच्या बाबतीत विकेंद्रीकरण आणि मुख्यतः बाजारपेठेतील स्पर्धेची त्या निर्णयांवरील हुकूमत. यालाच ढोबळमानाने आर्थिक अनिर्बंधता असे म्हणतात. पहिल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे आजची परिस्थिती याच्या उलट आहे. म्हणजे मोक्याचे आर्थिक निर्णय घेण्याबाबत बाजारपेठेचे जे महत्त्व होते ते राजकीय सत्ताधाऱ्यांनी मोठ्या प्रमाणावर कमी केले असून हेतुपुरस्सर बनविण्यात आलेल्या राजकीय नियंत्रणाचे प्रभुत्व त्यांनी प्रस्थापित केले आहे. अर्थविषयक धोरण आणि निरनिराळ्या स्वरूपाच्या वस्तुगत, वैधानिक आणि आर्थिक नियंत्रणाच्या द्वारा आताचे सरकार रोजगाराची शाश्वती, उत्पन्नाचे वाटप, धनसंचयाचे प्रमाण आणि आंतरराष्ट्रीय देवघेवीचा ताळेबंद यांचे जाणीवपूर्वक नियमन करते (किंवा नियमन करण्याचा प्रयत्न करते). तसेच सरकारच्या कृतीचा उद्योगांची व्याप्ती, उत्पादन पद्धती आणि भांडवलगुंतवणुकीबाबतच्या निर्णयाचे दिग्दर्शन यावर फार मोठा परिणाम घडून येतो. पूर्वी सरकार निष्क्रीय असे, त्याऐवजी ते आता निरनिराळ्या क्षेत्रात पदार्पण करू लागले आहे. किंवा असे म्हणता येईल की, निदानपक्षी ते जबाबदार सरकार बनले आहे. आर्थिक व्यवहाराचे नियंत्रण करण्यामध्ये राजकीय सत्ता निर्णायक बनली असून बाजारांवर कसलीही बंधने नसलेला इतिहासातील अपवादभूत असा अल्पकालीन जमाना आता मागे पडला आहे.

(२) घटक पातळीवरील उत्पादनाविषयक निर्णयाच्या बाबतीत खाजगी मालक–व्यवस्थापक वर्गाचे किंवा भांडवलदारांचे प्रभुत्व असे आणि आर्थिक सत्तेवर (आर्थिक अनिर्बंधतेच्या पार्श्वभूमीवर) पहिल्या प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे त्यांची मक्तेदारी असे. उत्पादनाच्या घटक पातळीवरही अशी परिस्थिती आता राहिलेली नाही. मूलभूत उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणामुळे भांडवलदार वर्गाच्या हाती असलेली निर्णयसत्ता संपूर्णपणे हिरावून घेण्यात आलेली आहे. परंतु इत

बरोबर अनेक खाजगी उद्योगधंद्यांच्या क्षेत्रातील भांडवलदारांची सत्ताही अशीच काढून घेण्यात आली आहे. व्यवस्थापक वर्गाकडून चालविल्या जाणाऱ्या संयुक्त भांडवल ( जॉईंट स्टॉक ) कंपन्यांच्या वाढीमुळे निर्णय घेण्याची जबाबदारी मुख्यत अशा कंपन्यांवर मालकी नसलेल्या पगारदार अधिकाऱ्यांकडे गेली आहे आणि नाममात्र मालकी असलेल्यांकडून आता त्यांच्या कामात क्वचितच हस्तक्षेप होतो. काही अंशी सरकारच्या नव्या भूमिकेमुळे परंतु मुख्यत: कामगारवर्गाच्या ताकदी-मुळे ( सर्वसाधारणपणे कामगार संघटनांचे सामर्थ्य वाढल्यामुळे आणि विशेषत: कामगार बाजारातील मागणी पुरवठ्याची परिस्थिती बदलल्यामुळे कामगार-वर्गालाही ताकद प्राप्त झालेली आहे) या नव्या वर्गाच्या वृत्तीस्वातंत्र्यावरही इतक्या मर्यादा पडतात की, पूर्वी भांडवलदारांवरही त्या पडत नसत. अशा तऱ्हेने खाजगी उद्योगधंद्यातील पूर्वीचा आर्ष भांडवलदार वर्ग हा आता जवळपास अस्तंगतच झाला आहे आणि त्याच्या जागी आलेल्या व्यवस्थापकीय वर्गाच्या हाती व्यक्तिश: त्यांच्या कारखान्यापुरतीदेखील आर्थिक सत्तेची मक्तेदारी राहिलेली नाही.

(३) वर सूचित केल्याप्रमाणे पूर्वी औद्योगिक भांडवलावर खाजगी मालकी असे. आजही बऱ्याच उद्योगांचे बाबतीत तीच परिस्थिती आहे; परंतु सामाजिक आणि आर्थिक संबंधांच्या संदर्भात त्याचे स्थान संपूर्णपणे बदललेले आहे. त्याची कारणे वर दिली असून त्याचे परिणाम काय झाले ते खाली दिले आहे.

(४) संपत्तीचे वाटप कमालीचे असमान असे. कारण एक तर आर्थिक सत्ता एकाच वर्गाच्या हातांत केंद्रीभूत झाल्यामुळे संपत्तीच्या वाटपात त्याच वर्गाचा महत्त्वपूर्ण भाग असे. आणि सहाजिकच शक्यतोवर आपल्याला अनुकूल होईल असेच वाटप करण्याकडे त्या वर्गाची प्रवृत्ती असे. दुसरे असे कीं, हा भांडवल-दारांचा वर्ग असल्याने नवीन भांडवल उभारणी आणि उत्पादनासंबंधीचे निर्णय घेणे त्यांच्याच हाती असे. निरनिराळ्या वर्गात सत्ता समतोल साधण्याचा प्रश्न सोडला तरी केवळ आर्थिक कारणामुळेही त्या वर्गाला म्हणजेच औद्योगिक भांड-वलदारांना उत्पन्नाचा हिस्सा इतर वर्गापेक्षा आधिक मिळणे क्रमप्राप्त होत असे.

मागच्या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे उत्पन्नाचे वाटप आज कितीतरी पटीने अधिक समान बनले आहे. आणि हा जो बदल घडून आला आहे तो जवळ-जवळ सर्वस्वी संपत्तीवरील उत्पन्नांत घट होऊनच घडून आलेला आहे. यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट अशी की, औद्योगिक भांडवलदारांना मिळणाऱ्या उत्पन्नांत, एकूण उत्पन्नाच्या मानाने ते अगदी क्षुल्लक ठरावे इतकी घट झाली आहे. सर्व कर भर-ल्यानंतर उरणाऱ्या व्यक्तिगत उत्पन्नाच्या सुमारे तीन टक्क्याइतकाच भागावरील लाभांश मिळू शकतो आणि वसूल भांडवलावर भरपूर नफा सुटतो असे गृहित धरले तरी. "भांडवलदार" वर्गाला मिळणारी एकूण बिदागी काय ती एवढीच हे लक्षांत घेतले म्हणजे अर्थव्यवस्था आता भांडवलदाराभिमुख राहिलेली नाही,

त्याचप्रमाणे भांडवलशाही पद्धतीप्रमाणे खाजगी भागभांडवल हे आजच्या समाज-पद्धतीचे अधिष्ठान राहिलेले नाही हे विशेषत्वाने प्रत्ययास येते. या एकाच गोष्टीवरून भांडवलशाही अस्तंगत होऊ लागली असल्याचा कयास बांधता येईल.

(५) ऐतिहासिक दृष्ट्या भांडवलशाहीची सांगड निःसंदिग्ध, निश्चयात्मक व असाधारण अशा विचारसरणीशी घातली जात असे. व्यक्तित्ववाद आणि स्पर्धा यांच्यावद्दलचा आदरभाव, खाजगी मालमत्ता धारण करण्याच्या अनिर्बंध हक्का-संबंधीचा आग्रह आणि आर्थिक स्पर्धेच्या 'अदृश्य हाता'च्या योगाने अनिर्बंध खाजगी हक्क हेच समाजाचे जास्तीत जास्त हित साधू शकतात असा बौद्धिक विश्वास ही भांडवलशाहीची तीन मूलभूत वैशिष्ठ्ये मानली जात.

आजच्या ब्रिटनमधील सत्ताधाऱ्यांच्या विचारसरणीत यापैकी एकही कलम बसत नाही. भांडवलदार वर्ग तर व्यक्तित्ववादाविरुद्ध सहकार्य, सामाजिक कृती आणि सामुदायिक जबाबदारी या उद्दिष्टांचा सदोदित प्रचार करीत आले आहेत. आणि जसजशी त्यांची सत्ता वाढत गेली तसतशी ही त्यांची विचारसरणी दृढ-मूल होत गेली. आजच्या कल्याणकारी राज्यांत स्वावलंबन किंवा आक्रमक व्यक्तित्ववादाची तत्त्वप्रणाली प्रभावी आहे असे कोणीच म्हणणार नाही. आणि मी पहिल्या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे प्रत्यक्ष व्यापारी वर्गांतही व्यक्ति-त्ववादाच्या जागी सामूहिक कार्य आणि संघभावना यांनाच महत्त्व प्राप्त होऊ लागले आहे.

त्याचप्रमाणे आता खाजगी मालमत्तेच्या अधिकाराचेही कोणी फाजील स्तोम माजवीत नाही. खुद्द हुजूरपक्षीय मंडळी देखील आपल्या प्रतिपादनात खाजगी हक्कांची भाषा येऊ देत नाहीत. उलट डाव्या गटाकडून पुरस्कारल्या जाणाऱ्या नैतिक मूल्यांची आणि निकषांचीच ते उसनवारी करतांना आढळतात. राष्ट्रीयी-करणाला विरोध होतो तो देखील खाजगी मालमत्तेच्या अधिकारासंबंधीच्या भूमिकेवरून होत नाही तर तो राष्ट्रीयीकरणामुळे कार्यक्षमता कमी होईल या मुद्यावर केला जातो हे लक्षांत घेण्यासारखे आहे. आणि खाजगी मालमत्ता धारण करण्याच्या हक्काला जो वर्ग आजही चिकटून बसला आहे तो वर्ग देखील कर्तृत्व आणि आर्थिक विकास यांचे पाठबळ असलेल्या औद्योगिक व्यवस्थापकांपैकी नव्हे.

'अदृश्य हाता'च्या सिद्धांतासंबंधी किंवा खाजगी नफ्यामुळे समाजाचे हितच होईल या समजुतीविषयी बोलावयाचे तर 'मोठ्या आर्थिक मंदी' पुढे ही विचार-सरणी मुळीच तग धरू शकली नाही. आणि हुजूर पक्षीय व व्यापारी वर्ग देखील आता अर्थव्यवस्थेच्या बाबतीत सरकारच्या सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वाला मान्यता देऊ लागले आहेत.

(६) आणि शेवटी, या वेगळ्या वैशिष्ट्यांमुळे तीव्र वर्गविरोध हे भांड-वलशाहीचे लक्षण समजले जात असे व नव्याने पुढे येणाऱ्या औद्योगिक कामगा-

रांच्या वर्गाकडून वाढत्या प्रमाणांत विरोध होऊ लागल्यामुळे आर्थिक दृष्ट्या आक्रमक अशा सत्ताधारी पक्षाचा प्रभाव असलेल्या समाजांत ते अपरिहार्यच होते. पीटरलूची कत्तल, चार्टिझम आणि १९१४ पूर्वीच्या सिंडिकॅलिझमच्या चळवळीमुळे झालेले हिंसाचार यापासून तो १९२० ते १९३० च्या दरम्यान घडून आलेले कोळसाखाणीतील तीव्र स्वरूपाच्या संप यामुळे औद्योगिक क्षेत्रांतील वातावरण सतत तणातणीचे असे आणि अनेकवेळा वर्गसंघर्षाचा परिस्फोट होण्याइतके ते तीव्र बनत असे.

वातावरणांतील ही तणातणी आज पुष्कळ प्रमाणात कमी झाली आहे. अर्थात संपविरोध आणि मधून मधून होणारे भावनांचे उद्रेक हे चालूच राहणार. कदाचित त्यांची तीव्रता एखादेवेळी वाढण्याचाही संभव आहे. परंतु असे असले तरी हे संघर्ष आता पहिल्याइतके प्रदीर्घ शत्रुत्वाची भावना निर्माण करणारे आणि कडवट स्वरूपाचे असणार नाहीत. काहीशा सौम्य स्वरूपातच ते लढवले जातात. आणि त्यात तडजोडीही लवकर घडून येतात. वर्ग संघर्षाची आणि बंड किंवा उठाव व प्रति-उठाव असली भाषा आता मागे पडू लागली आहे.

समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या सामाजिक आणि राजकीय भूमिकेत जो बदल घडून आला आहे त्यामुळे सत्ता मिळविण्यासाठी चाललेल्या लढ्याचे स्वरूपही अधिकाधिक शांततापूर्ण होऊ लागले आहे. सर्वसाधारणपणे राजकीय विरोधाची धारही आता पहिल्याइतकी तीव्र राहिलेली नाही. वीस वर्षांपूर्वी भांडवलशाहीचे वर्णन करतांना लास्कीने लिहिले होते की, " भांडवलशाही शक्तीचे एकत्रीकरण झाले आहे आणि त्यांच्या सत्तेला अद्यापपर्यंत कोणीही आव्हान देऊ शकत नसल्यामुळे भांडवलशाही शक्तीत आत्मविश्वासाची भावना दृढ होऊ लागली आहे....सत्ता आणि संपत्तीची सारी साधने त्यांच्या हाती एकवटली आहेत....लोकशाही त्यांच्या मार्गांत आडवी येऊ पाहील तर ते लोकशाहीलाच घातक ठरेल....लोकशाही जर गरिबी आणि बेकारी फार काल खपवून घेणार नसेल तर....लोकशाहीचाही काटा काढून टाकण्याची त्यांची तयारी आहे...." अशा तऱ्हेची भडक भाषा आता ऐकायला मिळणार नाही.

कामगार आणि त्यांचे पुढारी यांची वृत्तीही आता पहिल्यासारखी हिंसक किंवा आक्रमक राहिलेली नाही. त्यांच्यातील काही लढाऊ कामगार अद्यापही वर्ग-संघर्षाची भाषा करतात. परंतु सामाजिक बाबतीत ते जी भूमिका स्वीकारतात त्यावरून त्यांची ही भाषा वरपांगी असल्याचे प्रत्ययास येते. जनता तिच्यावर होणाऱ्या खऱ्याखुऱ्या जुलमाविरुद्ध किंवा पिळवणुकीविरुद्ध बंड करून उठते त्यावेळी तिचे नेते तिला नुसता बौद्धिक आणि नैतिक पाठिंबा देऊनच थांबत नाहीत तर ते आपल्या खाजगी आणि सार्वजनिक जीवनांत जनतेशी एकरूप झालेले असतात. खऱ्याखुऱ्या वर्ग संघर्षाच्या काळाचे ते वैशिष्ठ्य असते. त्या काळात जनतेचे ने

कमालीच्या साधेपणाने रहात, सत्ताधारी वर्गाबरोबर सभासमारंभात सहभागी होण्यास नकार देत आणि आपले सारे जीवन, अगदी फुरसतीचा काळ देखील, भांडवलशाही विरोधी लढा नेटाने चालविण्यासाठी वाहून घेत. त्यामानाने आजचे पुढारी – डाव्या गटातील लढाऊ पुढारी देखील – अधिक सौजन्यशील आणि मनमिळाऊपणाने वागतात हे त्यांच्या मनोवृत्तीत घडून आलेल्या बदलाचे आणि अर्थातच त्यांच्या ठिकाणी आत्मविश्वास निर्माण झाल्याचे महत्त्वपूर्ण द्योतक आहे. आणि सर्वसामान्य कामगारांच्या मनोवृत्तीसंबंधी बोलावयाचे तर एंगल्सने द्रष्टेपणाने काढलेले खालील उद्‌गार उधृत करण्यासारखे आहेत, " इतक्या प्रदीर्घ सुबत्तेनंतर जनता, लेकाची पार आळशी बनून गेलेली आहे. " पण हे वाईट झाले असे त्याच्यासारख्या इतरांना वाटणार नाही.

अशा तऱ्हेने १९१४ पूर्वीच्या पारंपारिक भांडवलशाहीतील बहुतेक सर्व मूलभूत ठळक वैशिष्ठ्यांत एकतर आमूलाग्र बदल तरी झालेला आहे किंवा ती मोठ्या प्रमाणात सौम्य तरी बनलेली आहेत. अशा परिस्थितीत ऐतिहासिक दृष्ट्या ज्याला भांडवलशाही समाज म्हणून संबोधतात असाच ब्रिटनमधील आजचाही समाज आहे असे बोलण्यात काही अर्थ आहे का ? अर्थातच नाही. आर्ष भांडवलशाही समाजापेक्षा आजचा आपला समाज सामाजिक व आर्थिक दृष्ट्याच केवळ नव्हे तर कौटुंबिक संबंध, लोकसंख्या, लैंगिक नीतिकल्पना, व्यक्तिगत धर्म, स्त्रियांचे स्थान, साहित्य आणि कला विषयक मूल्ये या व अशासारख्या कल्पनेच्या टप्प्यांत येणाऱ्या सर्वच बाबतीत अगदी भिन्न आहे. मार्क्स ज्याला 'सुपर स्ट्रक्चर' (आधिसंरचना) असे म्हणतो त्या सर्वच क्षेत्रात इतके महत्त्वपूर्ण बदल घडून आल्यानंतर त्यामागील सामाजिक आणि आर्थिक शक्तीत तसेच मूलभूत स्थित्यंतर घडून आले नसते तर ते आश्चर्यच म्हणावे लागले असते.

म्हणून ब्रिटनमध्ये आजही भांडवलशाही विद्यमान आहे, आणि तिच्याविरुद्धच्या लढ्याचे स्वरूप एका पिढीपूर्वी होते तसेच ते आजही कायम आहे असे म्हणणे दिशाभूल करणारे ठरेल. परंतु अडचण अशी आहे की लोकांना प्रत्येक गोष्टीवर कसला ना कसला तरी शिक्का मारला की बरे वाटते, आणि नवा शिक्का मान्यता पावल्याशिवाय जुने शिक्के पुसून टाकायला ते तयार नसतात. परंतु या बाबतीत नवीन परिभाषा अद्याप सर्वत्र रूढ झालेली नाही. " मिश्र अर्थव्यवस्था " यासारखा शब्द किंवा " कल्याणकारी राज्य " यासारखा आकर्षक शब्दप्रयोग त्यातल्या त्यात मान्यता पावला आहे. परंतु ब्रिटनमधील विद्यमान समाजाचे यथार्थ वर्णन त्यापैकी कशानेच होऊ शकणार नाही.

नवीन शब्दप्रयोग शोधून काढण्याच्या या मोहिमेत एकेकाळी मीही सामील झालो होतो आणि 'न्यू फेबियन एसेज' या पुस्तकात या नव्या समाजाला मी 'स्टेटिझम' असा शब्दप्रयोग वापरला होता. परंतु मागाहून माझ्या असे लक्षात

आले की, तो शब्द योग्य नव्हता. आता तो शब्द मोठ्या प्रमाणावर वापरला जाऊ लागला आहे. विशेषत: अमेरिकेत तर तो सर्रास वापरला जातो. परंतु तेथे तो शब्द 'सामुदायिकीकरण' या अर्थाने वापरला जातो. मला अभिप्रेत असलेल्या अर्थाने नव्हे. त्यानंतर आतापर्यंत मला दुसरी चांगली कल्पना सुचलेली नसल्याने मी दुसरा एखादा शब्द बनविण्याच्या फंदातच पडलो नाही. तथापि माझी खात्री होऊन चुकली आहे की, आर्ष भांडवलशाहीपेक्षा आपला समाज अगदी निराळा आहे आणि त्याचे तपशीलवार वर्णनही येऊन गेलेले आहे. त्याला निराळे नाव देण्याची जरूर राहिलेली नाही. अर्थात ज्यावेळी एखादा नव्याने उदयास येणारा समाज संपूर्ण उलथापालथ होऊ देत नाही त्यावेळीं त्या संख्यात्मक बदलांचे गुणात्मक बदलात रूपांतर झाले आहे किंवा प्रमाणांतील बदलामुळे स्वरूपातच बदल घडून आलेला आहे असे म्हणावयाचे किंवा नाही हा ज्याच्या त्याच्या वैयक्तिक अनुमानाचा प्रश्न बनतो. शंभर टक्के सरंजामशाहीचे शंभर टक्के भांडवलाशाहीत रूपांतर होण्या-साठी सहाशे वर्षांच्या उत्क्रांतीचा काळ जावा लागला हे बहुतेक सर्व इतिहासकार मान्य करतील; परंतु सरंजामशाहीची वैशिष्ठ्ये नेमकी कोणत्या तारखेला लोप पावली आणि भांडवलशाही समाजाची ठरलेली वैशिष्ठ्ये केव्हापासून अस्तित्वात आली या संबंधाने मात्र त्यांचे एकमत होऊ शकणार नाही.

त्याचप्रमाणे (सामाजिक स्थित्यंतराचा वेग पूर्वीपेक्षा अधिक असला तरी) आजच्या सामाजिक स्थित्यंतराबाबतही एकवाक्यता होऊ शकणार नाही. आणि त्यामुळे भांडवलशाही समाजातील वैशिष्ठ्ये किंवा मनोवृत्ती आज प्रभावी राहिलेली नसून प्रमाणांतील बदलाचे रूपांतर स्वरूपात बदल होण्यात झाले आहे किंवा नाही याबाबतचे प्रत्येकाचे मत निराळे असू शकेल. अर्थात या विधानाच्या पुष्टयर्थ दाख-वता येण्यासारखा जबरदस्त पुरावा उपलब्ध आहे.

## ४. उत्पादन साधनावरील मालकीला महत्त्व उरले नाही

यावर असा आक्षेप घेतला जाणे शक्य आहे की, भांडवलशाहीतील इतर अनेक वैशिष्ठ्ये ज्यामुळे निर्माण झाली असे मानले जाते—मग ते चूक असो की बरोबर असो—त्या मोठ्या प्रमाणावरील उत्पादन साधनांची खाजगी मालकी येवढ्या अर्थानेच तो शब्द वापरला जातो. परंतु ही व्याख्या प्रमाण मानावयाची म्हटले तर खाजगी मालकीचे प्रभुत्व असलेल्या कोणत्याही औद्योगिक समाजाला भांडवलशाही समाज म्हणून संबोधावे लागेल, मग त्या समाजाची इतर वैशिष्ठ्ये काहीही असोत. आणि मग इंग्लंडमधील समाज हा ७५% भांडवलशाही आणि २५% समाजवादी आहे असे धीपटपणे म्हणावे लागेल (अर्थात उलट अर्थाने समाजवादाचीही अशीच संकुचित व्याख्या करण्यात आली आहे असे क्षणभर गृहीत धरले तर).

भांडवलशाही या शब्दाची "योग्य" व्याख्या कोणती, सर्वसाधारणपणे तो

शब्द या संकुचित अर्थाने वापरला जातो की, वर सूचित केलेल्या व्यापक अर्थाने तो वापरला जातो याबाबत मतभेद होऊ शकेल. परंतु एखाद्याने संकुचित व्याख्येचा आग्रह धरला तर ती व्याख्या चूक आहे असे अर्थातच आपल्याला सिद्ध करता येणार नाही. आपण फार तर एवढेच म्हणू शकू की त्यामागील गृहीत कल्पना जर बरोबर नसेल तर त्या व्याख्येला काय अर्थ राहातो ? म्हणजेच मालकीहक्क हे जर समाजाचे स्वरूप निश्चित करणारे सर्वप्रथम लक्षण उरलेले नसेल तर ती व्याख्या निरर्थकच ठरते.

एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला हे गृहीतकृत्य कदाचित बरोबर ठरले असते; पण आज मात्र ते बरोबर ठरणार नाही हे उघड आहे. मार्क्सने केलेल्या भांडवलशाहीच्या विवेचनावर आधारूनच आजही कित्येक समाजवादी भांडवलशाहीचे आपले चित्र रेखाटतात. भांडवलशाहीच्या एका विशिष्ट लक्षणावरून सबंध समाजाला लागू पडणारी भांडवलशाहीची व्याख्या बनविण्याची जबाबदारी मुख्यतः मार्क्सकडेच जाते. म्हणून या संबंधातील त्याची विचारसरणी काय आहे ते आता पाहू.

मार्क्सचे यासंबंधीचे विवेचन ज्या उत्पादन संबंधांवर आणि प्रकारांवर आधारलेले आहे ते दोन तऱ्हेचे आहेत. एक : औद्योगिक भांडवलसंचयामागील तांत्रिक बाजू– या तांत्रिक बाबीमुळेच कारखानापद्धती अपरिहार्य बनते. "हातचक्कीमुळे सरंजामशाही समाज निर्माण होतो तर बाष्पचक्की भांडवलशाही समाजाला जन्म देते." दोन : हे भांडवल म्हणजेच उत्पादन साधने प्रत्यक्ष उत्पादन करणाऱ्या कामगार वर्गाच्या हातून काढली जाऊन त्यांच्यावर मालकी असणाऱ्या स्वतंत्र वर्गाच्या हाती जातात. अशा तऱ्हेने श्रमशक्तीची मालकी असलेला आणि भांडवलाची मालकी असलेला असे दोन स्वतंत्र आणि आर्थिक दृष्ट्या परस्परविरोधी असलेले ( आणि उत्पादन सुरू होण्यासाठी त्यांपैकी एका वर्गाला दुसऱ्या वर्गाला कामावर ठेवणे भाग पडते ) असे दोन आर्थिक वर्ग निर्माण होऊन ते एकमेकांसमोर उभे ठाकतात ही "सामाजिक" बाजू. अशा तऱ्हेने 'कामगारांची त्यांच्या उत्पादनापासून ज्यावेळी फारकत केली जाते त्याचवेळी भांडवलशाही उत्पादनाची खरी सुरुवात होते.' भांडवलशाही उत्पादनाचा तो केंद्रबिंदू असतो. त्याचप्रमाणे भांडवलशाही उत्पादनामुळे पुन्हा श्रमिक शक्ती आणि उत्पादन साधने यांची आपोआपच फारकत होत जाते.

ही फारकत म्हणजेच भांडवलदार आणि कामगार यांनी खरेदीदार आणि विक्रेते म्हणून बाजारात परस्परांविरुद्ध उभे ठाकणे, ही जी वस्तुस्थिती त्यातूनच भांडवलशाहीची व्यवच्छेदक लक्षणे ( मार्क्सच्या दृष्टीने ) प्रकट होतात. कामगारांची पिळवणूक ( म्हणजे मालकाने अतिरिक्त मूल्य बळकावून बसणे ) ही आर्थिक बाब आणि रोजगार मिळविणारा कामगार यांच्यातील परस्पर संबंध ही

सामाजिक बाब, ही ती लक्षणे होत. या दोन बाबींतून आपोआपच मालक वर्गाचे राजकीय प्रभुत्व, वर्ग संघर्ष, जनतेत पसरत जाणारे दारिद्र्य, विषमता आणि भांडवलशाहीची इतर लक्षणे उद्भवतात.

कामगाराची उत्पादन साधनांपासून होणारी फारकत, त्यावरील नियंत्रणाचे हस्तांतर आणि श्रमशक्ती खरेदी करणारे आणि ती विकणारे यांच्यातील परस्पर विरोध हाच चर्चेचा प्रमुख विषय होऊन बसतो. अनेक सामाजिक आणि आर्थिक संबंधांच्या बाबतीत निर्णायक म्हणून या बाबींकडे मार्क्सने केलेला अंगुलीनिर्देश योग्यच होता, हे आता समाजशास्त्रज्ञही मान्य करतात. परंतु या बाबतीत खरा प्रश्न निर्माण होतो तो असा की, उत्पादनसाधनांवरील प्रत्यक्ष मालकी आणि वर उल्लेखिलेली फारकत यांचा अर्थाअर्थी काही संबंध तरी आहे का ? की गुंता-गुंतीच्या आणि व्यापक प्रमाणावरील कारखानदारी पद्धतीमधील तांत्रिक बाजूमुळे ही फारकत अपरिहार्यपणे घडून येते ?. अर्थात दुसऱ्या प्रश्नाच्या बाजूनेच कौल द्यावा लागेल.

असा एकच समाज अस्तित्वात असू शकतो की ज्यात असे घडू शकत नाही आणि ज्यात मालक वर्गाशी संघर्ष नसल्याने श्रमशक्ती कोणत्या शर्तीवर वापरू द्यावयाची आणि उत्पादन साधने कशासाठी वापरावयाची ते फक्त कामगारच ठरवीत असतो आणि तो समाज म्हणजे कृषिप्रधान किंवा कारूनारूंचा समाज किंवा फार तर लघुउद्योगप्रधान समाज. पण एकदा का समाज भांडवलशाही प्रधान बनला म्हणजे अक्षरशः भांडवलाचा संचय होऊ लागतो. उत्पादनसाधनांपासून कामगार वर्गाची फारकत अपरिहार्य होऊन बसते. मग त्या भांडवलावर मालकी कोणाचीही असो. कामावर ठेवलेल्या कामगारांची प्रचंड संख्या आणि गुंतागुंतीची श्रमविभागणी यामुळेच केवळ कामगार म्हणून कोणाला किती संख्येने आणि कोणत्या शर्तीवर कामावर घ्यावयाचे व त्यांच्या श्रमशक्तीचा उपयोग कसा करून घ्यावयाचा ते ठरवणारी एखादी मध्यवर्ती संघटना असावीच लागते. त्याचप्रमाणे केवळ गुंतागुंतीच्या व्याप्तीमुळे व्यवस्थापकीय नियंत्रणाचे केंद्रही असावे लागते, तसेच नियमितपणे भरणाऱ्या कामगारांच्या जाहीर सभांव्यतिरिक्त अन्य मार्गाने उत्पा-दन आणि वितरण यासंबंधीचे निर्णय घेणारी जवळपास केंद्रानुवर्ती अशी अधि-काऱ्यांची मालिका असावी लागते.

अशा तऱ्हेने कायदेशीर दृष्ट्या उत्पादन साधनांवरील मालकी कोणाकडेही जरी असली तरी ‘संघर्ष’ आणि ‘फारकत’ या दोन्ही गोष्टी अटळ असतात आणि कामगारांच्या समुदायापेक्षा अन्य कोणाला तरी उत्पादनासंबंधीचे निर्णय घ्यावे लागतात. म्हणून महत्त्वाचा मुद्दा उत्पादन साधनांवरील मालकी हा नसून मोठ्या प्रमाणावरील उत्पादन हा आहे. आणि सामुदायिक अर्थव्यवस्थेत खाजगी मालकीला जागा नसली तरी कामगारांच्या हातून नियंत्रणे काढून घेण्याचे भांड-

वलशाही वैशिष्टच या समाजातही आढळतेच. वस्तुत: भांडवलशाही समाजांत देखील नियंत्रणापुढे मालकीच्या प्रश्नाचे महत्त्व कमीकमी होत जाते. मोठ्या प्रमाणावरील यंत्रसामुग्री आणि त्यांतील गुंतागुंत यातून ज्याप्रमाणे कामगारांची उत्पादन साधनांपासून फारकत होते त्याचप्रमाणे ती मालकवर्गाचीही होते. भांडवलाची गरज इतकी मोठी असते की, संपूर्ण मालकी जाऊन त्याजागी छोटयाछोटया भागधारकांची पद्धत अस्तित्वांत येते. आणि आज अनेक मोठमोठ्या कंपन्या अशा आहेत की ज्यांच्या भागभांडवलदारांची संख्या कामगारांच्यापेक्षाही जास्त असते. साहजिकच कामगारांच्यापेक्षांही हे असंख्य भागभांडवलदार उत्पादनविषयक निर्णय घेऊ शकणाऱ्या अत्यंत तांत्रिक आणि व्यवस्थापकीय अशा यंत्रणेवर नियंत्रण ठेवण्याच्या बाबतीत किंवा त्यांत सुसूत्रता घडवून आणण्याच्या बाबतीत असमर्थ ठरतात. दोन स्वतंत्र कारणांसाठी मालकीचे महत्त्व कमी कमी होत जाते आणि ही दोनही कारणे मूलत: मोठ्या प्रमाणावरील उत्पादन पद्धतीमुळे संभवतात. ती कारणे अशी : एक–उत्पादन साधनांवरील मालकी भांडवलदारांची असो की सामुदायिक स्वरूपाची असो कामगारांची त्यापासून फारकत ही होतेच आणि दुसरे कारण असे की, भांडवलशाही मालकीचा देखील प्रभावी नियंत्रणाशी उत्तरोत्तर कमी कमी संबंध पोहोचू लागतो.

अर्थात अर्थविषयक जे निर्णय घेतले जातात–ते अद्यापही मालकी कशा पद्धतीची आहे त्यावर काही अंशी अवलंबून असतात. मात्र खाली स्पष्ट केल्या-प्रमाणे त्याला विशिष्ट अशी दिशा असते असे नाही. इतके खरे की, उत्पादन साधनापासून कामगार वर्गाची जी फारकत होते तिच्याशी त्याचा कसलाही संबंध नसतो. अमेरिकेप्रमाणेच रशियातही मालक आणि मजूर यांच्यांत खरेदीदार आणि विक्रेते म्हणून तितकाच संघर्ष असतो. नियंत्रणाचे केंद्र कामगारांपासून विभक्त असते. आणि पिळवणुकीची शक्यता व 'भांडवलशाही'ची इतर लक्षणे त्या समा-जातही संभवतातच.

कामगारांच्या हातांतील नियंत्रण नष्ट होण्याशी खाजगी मालकीचा कस-लाही संबंध नसल्याने त्याचप्रमाणे जेथे खाजगी मालकी अद्याप टिकून राहिलेली आहे तेथेही नियंत्रणाचे ते मुख्य साधन राहिलेले नसल्याने मालकीच्या स्वरूपा-वरून कोणतीही गोष्ट निर्णायक स्वरूपांत निश्चित होऊ शकेल हे संभवनीय वाटत नाही. समाजवादी म्हणून ऐतिहासिक दृष्टया ज्या समाजाचे आपल्याला महत्त्व वाटत आले आहे त्या समाजाची लक्षणे विचारात घेऊन त्या निकषावर वरील मुद्दा कितपत टिकतो ते पाहू.

प्रथम राजकीय स्वातंत्र्य आणि संसदीय लोकशाही यांचा विचार करू. अलिकडच्या इतिहासावरून असे दिसते की, बव्हंशी खाजगी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेत या बाबी टिकून राहतात (वस्तुत: तसे असण्याचे कारण नाही) तशा

त्या समाजस्वामित्ववादी समाजात रहात नाहीत. ब्रिटनमध्ये त्या अस्तित्वात होत्या परंतु सोशॅलिस्ट यूनियनमध्ये मात्र नव्हत्या हे बहुधा कोणी नाकारणार नाही.

दुसरे असे की, पहिल्या प्रकरणात आलेल्या विवेचनाप्रमाणे आर्थिक सत्तेच्या क्षेत्रातील असो किंवा आठव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे व्यापक क्षेत्रातील असो, खाजगी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेपेक्षा समाजस्वामित्ववादी समाजातील वर्गीय विभागणी कमी किंवा अधिक स्पष्ट असू शकेल. सरकारी मालकी म्हणजे वर्गविहीन समाज हे एकेकाळचे लोकप्रिय समीकरण एक तर टयुटॉलॉजिकल पुराव्यावर (म्हणजे वर्गाची व्याख्या खाजगी मालकीचा संपूर्ण अभाव किंवा संपूर्ण अस्तित्व कल्पून केलेली असते आणि ह्यावरून असे निष्पन्न होते की, खाजगी मालकी नसेल तर त्या समाजात वर्गही अस्तित्वात असू शकणार नाहीत) आधारलेले असते किंवा सर्व उद्योगांची मालकी सरकारने स्वतःकडे घेतली म्हणजे कोणत्याही एका वर्गाचे नियंत्रण शासनसंस्थेवर राहू शकणार नाही या गृहीत–कृत्यावर तरी ते आधारलेले असते. परंतु हे पटण्यासारखा कोणताही तर्क सुसंगत मुद्दा पुढे येत नाही. रशियातही अशी परिस्थिती विद्यमान नाही. तेथेही स्वतंत्र असा एक सत्ताधारी वर्ग आहे व शासन यंत्रणेवरील नियंत्रणातच त्याचे सामर्थ्य सांठवलेले आहे. आणि बिगर समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्थेसंबंधी बोलावयाचे तर वर्गीय सत्तेची विभागणी मालकीच्या स्वरूपावर अवलंबून असते हे मत पहिल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे बरोबर नसल्याचे सिद्ध होते (मालकीच्या संदर्भात). रशिया आणि अमेरिका ही अगदी कडेची दोन टोके घेतली तर आर्थिक सत्तेचे विभाजन आणि समाज वर्गीकरणाचे प्रमाण या दोन्ही गोष्टी उत्पादन साधनावरील मालकी व्यतिरिक्त इतर अनेक बाबींवर अवलंबून असतात हे स्पष्ट होते. अर्थात १९५६ आणि १८५६ मधील ब्रिटनची तुलना केली तरी देखील हेच प्रत्ययास येईल.

तिसरा मुद्दा असा की, पिळवणुकीचे प्रमाण म्हणजेच कामगार जेवढे उत्पादन करतो त्या सर्वांबद्दल त्याला दाम मिळून ते खर्च करण्याऐवजी अतिरिक्त मूल्याच्या स्वरूपात त्यापैकी किती भाग तो मालकाला परत करतो ते सर्वस्वी मालकावर अवलंबून असत नाही, तर सरकारचे आर्थिक धोरण आणि नफ्याची विल्हेवाट लावण्यासंबंधी घेण्यात आलेले व्यवस्थापकीय निर्णय यावरच ते मुख्यतः अवलंबून असते. समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्था देखील कराचे प्रमाण वाढवून आणि होणारा नफा पुन्हा सरकारी उद्योगात गुंतवून हवे तेवढे अतिरिक्त मूल्य उकळू शकेल. अर्थात भांडवलाचा संचय आणि आर्थिक विकास यासाठी खाजगी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेइतकीच समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्थेतही ही गरज राहील. सोव्हिएट यूनियनच्या समर्थकांवर विश्वास ठेवावयाचा आणि रशियातील भांडवल गुंतवणुकीचा जो वेग आहे म्हणून सांगतात तो खरा मानावयाचा म्हटले

तर समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्था असलेल्या जगातील पहिल्या राष्ट्राने आपल्या जनतेकडून इतके अतिरिक्त मूल्य उकळले आहे की त्याची बरोबरी आजपर्यंतच्या इतिहासात जगातील कोठल्याही भांडवलशाही राष्ट्राने केली नसेल.

चार : व्यक्तिगत उत्पन्नाचे विभाजन हे निरपवादपणे मालकीहक्काच्या प्रकारावर अवलंबून असतेच असे नाही. राष्ट्रीय उत्पन्नातील वेतनाचे प्रमाण, सरकारचे करविषयक धोरण आणि किंमतीतील तौलनिक चढउतार यावर ते अवलंबून असते आणि या गोष्टी पुन्हा रोजगाराचे प्रमाण, चढाओढीची तीव्रता, कामगार संघटनांचे सामर्थ्य आणि मुख्य म्हणजे सरकारचे राजकीय स्वरूप यासारख्या अनेक भिन्न भिन्न घटकांवर अवलंबून असते. मालकीहक्काच्या स्वरूपात फार मोठा बदल न होताही उत्पन्नाच्या विभाजनात फार मोठे बदल घडून येणे अगदी शक्य आहे. मागील प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे ब्रिटनमध्ये तसे घडूनही आलेले आहे; ब्रिटन किंवा स्कॅंडेनेव्हियासारख्या खाजगी मालकी असलेल्या अर्थ-व्यवस्थेपेक्षा रशियासारख्या समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्थेत उत्पन्नाच्या विभाज-नातील विषमता अधिक आढळते. आणि अगदी 'भांडवलशाही' देशांत देखील व्यक्तिगत उत्पन्नाचे प्रमाण एकूण उत्पन्नाच्या मानाने अगदी नगण्य असते.

भांडवलाच्या विभाजनाच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. व्यक्तीच्या हयातीत धनसंचय करण्याची शक्यता आणि वारसा कराचे स्वरूप यावर ते अव-लंबून असते. अर्थात यापैकी पहिली बाब राजकीय अधिकाऱ्यांच्या अखत्यारीतील असते. भांडवलाचा पुरेसा पुरवठा होणे हे भांडवलाचे झपाट्याने वाढत जाणारे मूल्य आणि वाढता नफा यावर अवलंबून असते. खाजगी मालकी असलेल्या अर्थ-व्यवस्थेत व्यक्तीच्या हयातीत फार मोठा धनसंचय होणे अपरिहार्य ठरते असे काही वेळा प्रतिपादन केले जाते. परंतु मोठमोठ्या कंपन्यांच्या आधुनिक अर्थव्यवस्थेतील भागधारकांचे महत्त्व फुगवून दाखविण्यासाठी असे विधान केले जाते अशी माझी समजूत आहे. परंतु एका बाजूला जर्मनीसारख्या देशात, जेथे भागधारकांचे महत्त्व अत्यंत कमी आहे आणि भांडवलाची बाजारपेठ आपल्यापेक्षा अगदी निराळी असते व दुसऱ्या बाजूला भांडवल गुंतवणुकीची पातळी खूपच वरची असते पण त्याबरोबरच भांडवलाच्या मूल्यात केवळ नाममात्रच वाढ होते, अशा स्वीडनसारख्या देशात येणाऱ्या अनुभवावरून असे आढळून येते की, खाजगी मालकीच्या अर्थव्यवस्थेतही फार मोठा खाजगी धनसंचय होऊ न देणे शक्य आहे.

पाच : सरकारी नियोजन हे सर्वस्वी मालकीहक्कावर अवलंबून नाही. युद्धो-त्तर काळांत आलेला अनुभव असे सांगतो की, खाजगी उद्योगधंद्यावर सरकारी नियंत्रण जारी करता येते त्याचप्रमाणे ज्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण झालेले आहे ते उद्योग काहीसे स्वतंत्रपणाने चालविले जातात आणि त्यांच्या बाबतीत नियोजन तितकेसे सुलभ असत नाही. सर्वसाधारणपणे समाजस्वामित्ववादी अर्थव्यवस्था

सरकारी हस्तक्षेपाशिवाय सर्वस्वी किंमत यंत्रणेच्या प्रभावाखाली का असू नये किंवा खाजगी मालकी असलेली अर्थव्यवस्था नाझी अर्थव्यवस्थेप्रमाणे बहुतेक सर्व आर्थिक निर्णयाच्या बाबतीत सरकारी नियंत्रणाखाली का असू नये याला कोणतेही व्यवहार्य किंवा सैद्धांतिक कारण आहे असे म्हणता येणार नाही.

आणि शेवटचा मुद्दा असा की, खाजगी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेपेक्षा समाज स्वामित्ववादी अर्थव्यवस्थेत कामगारांचा दर्जा चांगला असू शकेल किंवा वाईट असू शकेल. प्रत्यक्ष उत्पन्नासंबंधी बोलायचे तर ते काही अंशी राष्ट्रीय उत्पन्नातील वेतनाच्या प्रमाणावर अवलंबून असले तरी एकंदरीने पाहता अर्थव्यवस्थेच्या विकासाच्या गतीवरच ते अवलंबून असते; आणि आर्थिक विकासाची ही गती समाजस्वामित्ववादी समाजात अधिक असते असे निश्चितपणे म्हणता येणार नाही. काम करतांना दर्जासंबंधी असे म्हणता येईल की, बहुतेक सर्व कामगार मजुरी मिळविण्यासाठी मोठ्या प्रमाणावरील कारखान्यातून काम करीत असतात. यादृष्टीने त्यांना 'कामगार वर्गाच्या' पायरीवर आणून बसविले जाते ही मार्क्सची टीका अमेरिकेइतकीच रशियाच्याबाबतीतही लागू पडण्यासारखी आहे. परंतु महत्त्वाचा मुद्दा जर कोणता असेल तर तो हा की, व्यवस्थापकीय अधिकारी किती प्रमाणात लोकशाहीवादी किंवा 'हम करेसो'वादी आहेत, कामगारांबरोबर विचारविनिमय कितपत केला जातो किंवा त्यांना व्यवस्थापनेत कितपत सहभागी करून घेतले जाते आणि कामगाराला आपली नोकरी सोडून जाण्याचे किंवा संप करण्याचे स्वातंत्र्य कितपत उपभोगावयास मिळते, या प्रत्येक बाबतीत सोव्हिएट यूनियनमधील कामगारांचे ब्रिटनमधील कामगारांपेक्षा देखील अधिक '**कामगारीकरण**' झालेले आढळेल. त्यांचे संरक्षण करण्यासाठी त्यांच्या पाठीशी स्वतंत्र कामगार संघटना असत नाही. त्यांना संप करण्याचा किंवा नोकरी सोडून जाण्याचा हक्क नसतो. तंटा झाल्यास तो सोडविण्याची तपशीलवार अशी लवाद यंत्रणा नाही, किंवा लोकशाहीवादी संस्थातून त्यांच्या मागण्यांना वाचा फोडणारा राजकीय पक्ष असत नाही. वैयक्तिक हक्क हिरावून घेतलेला आणि मन मानेल तसे वागणाऱ्या व्यवस्थापनेच्या दावणीला बांधलेल्या या कामगाराला ब्रिटनमधील कामगारांचा, तेथील स्वतंत्र कामगार संघटना आणि शिस्तीतील ढिलेपणा याबद्दल हेवा वाटला तर नवल नाही. त्याचप्रमाणे सोव्हिएट यूनियनमधील कामगाराला मधूनमधून आपल्या कामाची गती सक्तीने वाढवावी लागत असल्याने, कामाचे कमी तास आणि अधिक स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या अमेरिकन कामगारांचाही त्याला हेवा वाटणे अगदी साहजिक आहे. यापूर्वीच उल्लेखिलेल्या इतर क्षेत्रांप्रमाणेच या क्षेत्रातही उत्पादन साधनांवरील स्वामित्वापेक्षाही तेथील राजकीय पद्धतीचे स्वरूप अधिक निर्णायक ठरते.

एकूण समाजावरून आपण उत्पादनाच्या व्यक्तिगत घटकासंबंधी विचार करू लागलो तर अद्यापही इतर बाबींच्या मानाने स्वामित्वाचा प्रश्न गौण आहे असे

आपल्याला आढळून येईल. राष्ट्रीयीकरणाच्या अनुभवावरून आपल्याला असे दिसून आले आहे की, खाजगी आणि सार्वजनिक क्षेत्रातील कंपन्यांच्या समस्या अगदी सारख्या असतात. खरे म्हणजे मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या सर्वच औद्योगिक संघटनांच्या समस्या सारख्या असतात. अशा तऱ्हेने केवळ कोलबोर्ड आणि आय्. सी. आय्.च नव्हे तर सोव्हिएट स्टेट ट्रस्ट, जनरल मोटर्स आणि फॉक्स् वॅगन यासारख्या सगळ्याच कंपन्यांना घ्याव्या लागणाऱ्या आर्थिक आणि तांत्रिक निर्णयाचे बाबतीत मजुरीचे दर कसे ठरवावयाचे, तंटे कसे मिटवावयाचे, सहभागाची भावना कशी निर्माण करावयाची, खालच्या पातळीवर निर्णय घेण्याची पद्धत कशी ठरवावयाची पुरेसा वाढावा कसा साठवावयाचा आणि टीका करणाऱ्या जनतेचे समाधान कसे करावयाचे यासारख्या समस्या सगळीकडे सारख्या असतात.

त्याचप्रमाणे या समस्यांबाबत ते जे धोरण स्वीकारतात ते नेहमी अगदी भिन्न असते असेही नाही. ( स्वामित्वाच्या भिन्नभिन्न स्वरूपानुसार त्यांचे निर्णय निरपवादपणे घेतले जातात हे येथे अभिप्रेत आहे. ) या सर्वांवर व्यवस्थापकीय नियंत्रण असते तसेच त्यामागे मालकांना संपन्न बनविण्याचा कोणताच हेतू नसतो. आणि त्यांचे आर्थिक उद्देशच केवळ नव्हे तर त्यांचा सामाजिक तोंडवळा देखील पुष्कळदा सारखाच असतो. याचे कारण असे की, त्या सर्वांचे नियंत्रण सारख्या स्वरूपाचे काम करणाऱ्यांच्या हाती असते. खाजगी आणि सार्वजनिक अशा दोन्ही क्षेत्रांतील कंपन्यांतील कार्यकारी अधिकाऱ्यांना वेतनाच्या स्वरूपात मोबदला दिला जातो. नोकरीची शाश्वती, नियमित स्वरूपात उत्पन्नाची वाढ, बढतीची नियमबद्ध यंत्रणा आणि निवृत्ती वेतन इ. सवलती त्यांना उपभोगावयास मिळतात. त्या सर्वांची नेमणूक झालेली असते म्हणजे निवडणुकीने किंवा स्वतःहून कोणाचीही नियुक्ती झालेली नसते. वरपासून खालपर्यंत अधिकाऱ्यांची उतरंड आणि निश्चित स्वरूपाचे नियम असलेल्या कंपन्यांतून ते कामाला असतात. त्यामुळे भांडवलशाही उद्योगांपेक्षा अशा ठिकाणी त्यांना स्वाभाविक आत्मीयता वाटावी यात नवल नाही. हे इष्ट असो वा अनिष्ट असो, एक गोष्ट खरी की, व्यापक प्रमाणावरील राष्ट्रीयीकरणामुळे समाजवाद्यांची कल्पना होती त्याहूनही कमी बदल घडून आलेले आहेत.

यावरून हे स्पष्ट होईल की, उत्पादनावरील मालकी ही महत्त्वाची बाब राहिलेली नसून ते समाजाचे व्यवच्छेदक लक्षणही असत नाही. समाजस्वामित्व-वादी त्याचप्रमाणे खाजगी मालकी असलेली अर्थव्यवस्थाही स्वातंत्र्य, लोकशाही, समानता, पिळवणूक, वर्गभावना, नियोजन, कामगारांचे नियंत्रण आणि आर्थिक सुबत्ता यात सतत जी बदघट होत असते, त्याच्याशी सुसंगत अशी असते. आणि ही अंगे ज्या प्रमाणात समाजात विद्यमान असतील किंवा त्यांचा अभाव असेल त्या प्रमाणात लोकसमाजा—समाजात फरक करतात.

अर्थात याचा अर्थ असा नव्हे की, समाजाच्या स्वरूपावर कसलाही परिणाम घडून येत नाही किंवा निरनिराळ्या क्षेत्रात जे निर्णय घेतले जातात त्यावर त्याचा प्रभाव पडलेला नसतो. त्यामुळे राष्ट्रीयीकरण चांगले की वाईट हा प्रश्न शिल्लकच राहतो. उत्पन्नातील समानता, सत्तेचे विस्तारण किंवा कामगारांचे उच्च स्थान यांसारखी काही उद्दिष्टे साध्य करण्याच्या बाबतीत खाजगी स्वामित्व इष्ट की अनिष्ट याची चर्चा पुढील काही प्रकरणात आली आहे. याचा इत्यर्थ इतकाच की स्वामित्वाचे स्वरूप काही प्रमाणात परिणामकारक ठरत असले तरी वरील उद्दिष्टे किती प्रमाणात साध्य होतात ते ठरण्याइतके स्वामित्व निर्णायक असू शकत नाही. आणि परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीनेही उद्यो-गांचा व्यवस्थापकीय ढाचा, रोजगाराचे प्रमाण, कामगार संघटनांचे सामर्थ्य, एकं-दरीत सामाजिक वातावरण आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे राजकीय सत्तेचे स्वरूप या अन्य बाबींच्या मानाने आता स्वामित्वाचा मुद्दा अजिबात महत्त्वाचा राहिलेला नाही.

त्यामुळे या एकाच निकषावरून समाजा–समाजात फरक करणे किंवा त्याची व्याख्या बनविणे हे आता जवळपास निरर्थक होऊन बसले आहे. त्यावरून काढलेले निष्कर्ष समाजाचे स्वरूप ठरविण्याच्या दृष्टीने दिशाभूल करणारे ठरतील, इतकेच नव्हे तर समाजवादी चांगल्या–वाईटाचे जे निकष मानतो त्यांच्याशी स्वामित्वाचा परस्पर संबंधही दाखवता येणार नाही. भांडवशाहीची व्याख्या खाजगी स्वामित्वा-वरून आणि समाजवादाची व्याख्या समाज स्वामित्ववादी अर्थरचनेवरून करण्याचा आग्रह आपण धरीत असू आणि भांडवलशाही विरोधी या अर्थाने स्वतःला समाजवादी म्हणवून घेत असू, भांडवलशाहीपेक्षा समाजवादी समाजात राहणे मनापासून पसंत करीत असू व बहुसंख्य कामगारही तेच पसंत करीत असतील व तेच अधिक नैतिक व न्यायाचे आहे असे मानीत असू तर सोव्हिएट यूनियनपेक्षा ब्रिटन, स्वीडन किंवहुना अमेरिकेत राहणेच आम्ही अधिक पसंत करू, बहुसंख्य कामगार वर्गाचीही तशीच भावना असेल व तेच न्यायाचे व नैतिक ठरेल असे आपल्याला म्हणावे लागेल. यावरून हे शब्द ज्यावेळी मुळात वापरले गेले त्यावेळी लोकांना अभिप्रेत असलेल्या कल्पनांपेक्षा त्यासंबंधीच्या आजच्या व्याख्या किती वाहवत गेल्या आहेत ते लक्षात येईल.

सारांश, आता स्वामित्वावरून सामाजिक संबंधाची कल्पना येऊ शकत नस-ल्याने त्या निकषावरून केलेली भांडवलशाहीची व्याख्या आज सर्वस्वी निरर्थक ठरली आहे–मग शंभर वर्षांपूर्वी ती भली उपयुक्त ठरलेली असो. यापुढे समाजाचे स्वरूप निश्चित करताना समानता किंवा वर्गीय संबंध किंवा तेथील राज्यपद्धती हे निकष मानणे अधिक उचित ठरेल आणि वर प्रतिपादन केल्याप्रमाणे भांडवलशाही म्हणजे सामाजिक; आर्थिक आणि सैद्धांतिक वैशिष्ठ्ये असलेला १८३० ते १९३०

पर्यंतचा ग्रेट ब्रिटनमधील समाज हीच भांडवलशाही या शब्दाची व्याख्या बरोबर ठरेल असे मला स्वतःला वाटते. १९५६ मधील ग्रेट ब्रिटन निश्चितच तसे राहिलेले नाही आणि म्हणूनच आजही त्याला भांडवलशाही म्हणावयाचे का याचे उत्तर मी 'नाही' असेच देईन.



## प्रकरण चौथे

# ब्रिटिश समाजवादाच्या परंपरा

### १. भूतकाळाला आवाहन

अद्यापही याला भांडवलशाही म्हणावयाचे असेल तर समाजवाद म्हणजे तरी काय असतो ? मजूर पक्षाने या प्रश्नाचे स्पष्ट उत्तर दिलेले नाही. १९५१ पासून जे त्या पक्षाचे निरीक्षण करीत आले आहेत आणि जे पक्षाच्या हरवलेल्या आत्म्याचा कसून शोध करीत असतील त्यांना पक्षाच्या गोंधळलेल्या मनःस्थितीची कल्पना आल्यावाचून राहणार नाही. आणि त्यात काही बदनामीकारक आहे असेही नाही. संसदीय कामगिरी लक्षात घेता 'ट्रॅन्सपोर्ट हाऊस' मधले दप्तर चाळत बसल्याने काही निष्पन्न होण्यासारखे नाही. आर्थिक सत्तेच्या समतोलात घडून आलेला बदल लक्षात घेता युद्धपूर्व काळातील बहुतेक सर्व विश्लेषण आता गैरलागू झाले असून त्यासंबंधीचे अनेकदा हाताळले गेलेले पूर्वीचे संदर्भग्रंथ आता टाकून देण्याच्या लायकीचे झाले आहेत. अशा परिस्थितीत नव्या धोरणाचा अवलंब करतांना पावले अडखळली किंवा मनाचा गोंधळ उडाला तर त्यात विशेष नवल नाही तसेच कोणी 'नव्या दृष्टीकोनांचा' आग्रह धरला आणि त्या दिशेने विचार चालू झाला तर मनस्ताप व्हावा हेही स्वाभाविक आहे.

अशावेळी आपण 'समाजवादाच्या मूळ तत्त्वांचा अंगीकार करू या" अशी हाकाटी करणे हा अडचणीतून सुटण्याचा सर्वात सोपा मार्ग. कारण तो जितका सोपा तितकाच लोकांच्या दृष्टीने आकर्षकही असतो परंतु दुर्दैवाने "मूलतत्त्वे" हा शब्द. प्रयोग फार संदिग्ध आहे. मूलभूत असे म्हणताना नैतिक आकांक्षा अभिप्रेत आहे की- भावनात्मक ? कदाचित भूतकाळात जमा झालेल्या परिस्थितीत त्यांचा उगम असेल, किंवा धोरणाविषयीच्या विशिष्ट उद्दिष्टांकडेही त्याचा रोख असेल. कदाचित ती मूलतत्त्वे साध्य झालेली असतील व त्यामुळे आता ती गैरलागू ठरली असतील. या

उद्दिष्टांमागील विचारसरणी किंवा सैद्धांतिक समर्थन करण्यासाठी तर त्यांचा हवाला दिला जात नसेल ? परंतु सामाजिक आणि आर्थिक विचारसरणीत झालेल्या बदलांमुळे ती आता विसंगतही झाली असतील. ही उद्दिष्टे साध्य करण्याचा मार्ग म्हणूनही कदाचित त्यांचा उल्लेख केला जात असेल; परंतु एका पिढीला जे मार्ग सोयीचे वाटतात ते पुढच्या पिढीलाही तितकेच सोयिस्कर का वाटू नयेत याचा उलगडा होत नाही.

कोणत्याही नव्या धोरणाचा अवलंब न करता किंवा जुन्या धोरणाची नव्याने मांडणी न करताही समाजवादाच्या मूलतत्त्वांची चर्वीत पारायणे कशी केली जातात ते या काळातील खूप खप असलेल्या एका समाजवादावरील पुस्तकात स्पष्टपणे दाखवून दिले आहे. 'मूलतत्त्वे' हा शब्दप्रयोग कोणत्या प्रकारच्या विधानाला अनुलक्षून केला आहे त्याचे स्पष्टीकरण झाले नाही तर साहजिक त्याचा परिणाम असा नकारात्मक होणार. विशिष्ट उदाहरणच द्यावयाचे झाले तर उत्पादन साधनांचे राष्ट्रीयीकरण (विशिष्ट उद्दिष्ट साध्य करण्याचे साधन), मालमत्तेच्या स्वरूपातील उत्पन्न सरकारने ताब्यात घेणे (उद्दिष्ट), श्रममूल्य सिद्धांत (ज्या योगे अनेकदा वरील उद्दिष्टांचे समर्थन केले गेले) किंवा या सर्वांच्या मुळाशी असलेली समतेची आकांक्षा यापैकी मूलतत्त्व म्हणून सर्वात पवित्र कशास मानावयाचे ? ऐतिहासिक दृष्टया एकमेकांवर अवलंबून असलेल्या वरील मूलतत्त्वांपैकी शाश्वत सत्य म्हणून ज्याचे रक्षण करावयास पाहिजे अशा कोणत्या मूलतत्त्वाची भावी धोरण म्हणून निवड करावयाची या प्रश्नाची अगदी भिन्न भिन्न उत्तरे संभवतील.

याबाबत आणखी एक अडचण आहे आणि ती अशी की समाजवादी सिद्धांताचा कायम स्वरूपाचा आणि सुसंगत असा एखादा आराखडा अस्तित्वात नाही. आर्. एच्. टोनी यांनी लिहून ठेवले आहे की, 'इतर गुंतागुंतीच्या राजकीय शक्तींच्या संक्षिप्त नामाभिधानाप्रमाणे समाजवाद या शब्दाच्या अर्थाच्या छटा बदलत असतात. त्यात एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपर्यंत बदल होतो इतकेच नव्हे तर दर दहा वर्षांनीही तो होऊ शकतो.' तसेच त्यामागील सिद्धांतात कालानुसार फरक पडत जातो. फार काय पण पुढे दाखवून दिल्याप्रमाणे समाजवादावर जी निरनिराळी भाष्ये केली जातात तीही परस्पर विसंगत असतात.

ब्रिटिश लेबर पार्टीची या बाबतीतील परिस्थिती तर अधिकच गुंतागुंतीची आहे. कारण कोणत्याही एका सिद्धांतावर अशी त्या पक्षाची स्थापना झालेली नाही. आणि ठोकळेबाजी किंवा सैद्धांतिक पूर्वग्रह यापासून तो नेहमीच अलिप्त राहिलेला आहे. पक्षाच्या एका प्रमुख इतिहासकाराने पक्ष बांधणीच्या सुरुवातीच्या काळासंबंधी लिहितांना असे म्हटले आहे की, "त्यांचा समाजवाद जवळ जवळ सिद्धांतविरहितच होता. पायाभूत सिद्धांतासंबंधी इतकी संदिग्धता होती की अगदी निरनिराळ्या प्रकारच्या थरातून सहजासहजी रंगरूट मिळविणे सहज शक्य

होई." बरे असो वा वाईट असो, वस्तुस्थिती तशी होती एवढे खरे. आणि ज्यापासून आता आपण स्फूर्ती मिळवू पाहतो असे अचूक सिद्धांत कोणते याचा नक्की निर्णय करणे या वस्तुस्थितीमुळे अधिकच कठीण होऊन बसते.

परंतु परंपरेला केलेले आवाहन लोकांची मने विलक्षण आकर्षून घेते. त्यामुळे वर उल्लेखिलेल्या अनेक अडचणी असूनही आपल्या प्रश्नांची योग्य उत्तरे मिळावीत म्हणून या प्रकरणात समाजवादाच्या पारंपारिक सिद्धांतांचा थोडक्यात आढावा घेतला आहे. सुरुवातीच्या ख्रिश्चनांपासून तो लेव्हलर्सच्या पंथापर्यंत विकसित होत गेलेल्या भांडवलशाहीपूर्व प्रदीर्घ परंपरागत साम्यवादाचा या ठिकाणी मी अजिबात उहापोह केलेला नाही; कारण आधुनिक समाजवादाची कल्पना औद्योगिक समाजाशी निगडीत असून सर्वस्वी कृषिप्रधान समाजाविषयी बसविलेले सिद्धांत त्याला लागू पडण्यासारखे नाहीत. तरीही ठोकळमानाने कालानुक्रमाने दिलेले खालील सिद्धांत गेली दीडशे वर्षे अत्यंत प्रभावी ठरलेले आहेत.

## २. समाजवादी सिद्धांतांचा गोषवारा

(१) **निसर्गदत्त (प्राकृतिक) कायद्याचे तत्त्वज्ञान** :– तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या सुरुवातीपासूनच्या काळात याचे धागेदोरे सापडत असले तरी त्याच्या प्रेरणा लॉकच्या लिखाणात सापडतात. परंतु लॉकच्या लिखाणामुळेच (त्याचा योग्य अर्थ लावल्यानंतर) फ्रेंच क्रांतीमुळे आनंदित झालेले इंग्लंडमधील जहाल मतवादी आणि औद्योगिक क्रांतीचा पुरस्कार करणारे सुरुवातीच्या काळातील भांडवलशाहीविरोधी लेखक यांच्या विचारांना सैद्धांतिक पाया उपलब्ध झाला. मुळात जमीन सामाजिक मालकीची असे आणि श्रम हीच संपत्तीची खरी जननी होती हे दाखविण्यासाठी लॉकच्या लिखाणाची मदत घेतली गेली. सामाईक मालकी ही नैसर्गिक असल्यामुळे ती न्याय्यही असते. म्हणून खाजगी मालमत्ता नष्ट करून टाकली पाहिजे. तसेच व्याज, भाडे किंवा नफा यांच्या रूपाने श्रमातून निर्माण होणाऱ्या उत्पादनातील काही भाग काढून घेणे असमर्थनीय असल्याने समाजाने तो भाग परत मिळविला पाहिजे. या क्रांतिकारी सिद्धांताच्या समर्थनार्थ वरील दोन तत्त्वांचा आधार घेतला जाई.

(२) **ओवेनवाद** :– स्वभाववैशिष्ट्ये किंवा मनोवृत्ती ही आर्थिक वातावरणावर अवलंबून असते अशी रॉबर्ट ओवेनची धारणा असल्यामुळे जोपर्यंत स्पर्धेवर आधारलेली अर्थव्यवस्था अस्तित्वात असेल तोपर्यंत चांगली स्वभाववैशिष्ट्ये किंवा सर्वसाधारण समाधान नांदूच शकणार नाही असे तो प्रतिपादीत असे. म्हणून उद्योगधंद्यांची उभारणी ही सत्तास्पर्धेऐवजी सहकारी तत्त्वांवर करण्यात आली पाहिजे. त्याचप्रमाणे मालमत्ता सामाईक मालकीची केली पाहिजे आणि सर्व कामगारांना समान दर्जाची वागणूक मिळाली पाहिजे असे त्याचे म्हणणे होते.

हे स्थित्यंतर घडवून आणण्यासाठी वर्ग संघर्ष, औद्योगिक संप इतकेच काय पण राजकीय कारवाई यापैकी कशाचीही गरज नाही. नवी सामाजिक व्यवस्था निर्माण करणे आवश्यक आहे हे पटवून देऊन वरिष्ठ वर्गाचे त्यासाठी मन वळवले की,–आणि वास्तव परिस्थितीचे त्यांना एकदा आकलन झाले की त्यांचे मतपरिवर्तन होण्यास वेळ लागणार नाही–की स्थानिक पातळीवरील सहकारी प्रयोगांची एक मालिका सुरू होऊन सर्व वर्ग त्यात आनंदाने सहभागी होतील असे तो प्रतिपादीत असे.

(३) **श्रममूल्य सिद्धांत :–** रिकार्डोच्या विचारसरणीवर आधारलेला हा सिद्धांत हॉग्स्किन, ब्रे इत्यादी मार्क्सपूर्व इंग्रज समाजवाद्यांचे समाजवादी प्रचाराचे हत्यार बनले आणि भांडवलशाही विरोधी चळवळीत विशेषत: चार्टिस्टवादी आंदोलनात कामगार वर्गाला त्यापासून बौद्धिक स्फूर्ती मिळाली. श्रम हे सर्व विनिमय मूल्यांचे उगमस्थान असले तरी कामगाराला जेमतेम जगण्यापुरतीच मजुरी मिळते. त्यामुळे पुढे लासेलने ज्याला 'आयर्न लॉ ऑफ वेजेस्' असे म्हटले आहे त्या सिद्धांतानुसार कामगारांचे वेतन खालच्या पातळीवरच राहात असल्याने उत्पादनात सतत वाढ होत गेली तरी कामगाराला मात्र त्यापासून कसलाही लाभ मिळत नाही आणि संपत्तीत होणारी सगळीच्या सगळी वाढ नफा किंवा भाडे यांच्या (नफेखोर) स्वरूपात भांडवलदार आणि जमीनदार यांच्या पदरात पडते. परिणामी उत्पादनाच्या वाटपाबाबत भांडवलदार आणि कामगार यांच्यात बिनतोड संघर्ष उभा राहातो आणि शेवटी उत्पादन केलेल्या वस्तूचे सर्वच्या सर्व मूल्य कामगाराला मिळू लागेल त्याचवेळी तो संघर्ष मिटू शकेल. लढाऊ वर्गीय भूमिकेवरून संघटित झालेल्या कामगार वर्गाने परिस्थित्यनुरूप औद्योगिक किंवा राजकीय कार्यक्रम हाती घेण्याची तयारी ठेवूनच हा लढा लढविला पाहिजे. (ही विचारसरणी ओवेनच्या वर्ग सहकार्यावर आधारलेल्या सुधारणावादी आणि स्वप्नदर्शी विचार-सरणीच्या सर्वस्वी विरुद्ध आहे हे चटकन लक्षात येईल.)

(४) **ख्रिश्चन सोशॅलिझम :–** ख्रिश्चन सोशॅलिस्टांचे उद्दिष्ट ओवेनच्या विचारसरणीशी पुष्कळसे मिळतेजुळते आहे. अर्थात त्या दोन पंथांचे स्फूर्ति-स्थान मात्र भिन्न भिन्न आहे. एक पंथ बेंथमाइट पंथाच्या सार्वत्रिक सुखवादाचा पुरस्कर्ता आहे तर दुसरा पंथ ख्रिश्चन धर्म तत्वाविषयी आस्था बाळगणारा आहे. परंतु खाजगी फायद्यासाठी स्पर्धेच्या मागे लागणे दोन्ही पंथांना सारखेच निंद्य वाटते आणि म्हणून स्पर्धेवर आधारलेल्या भांडवलशाहीत अपरिहार्य ठरणारे परस्परातील स्वार्थमूलक वैमनस्य नष्ट करून त्याजागी एकमेकांबद्दल प्रेमाची व बंधुत्वाची भावना असलेला, सामुदायिक मालकीवर आधारलेला सहकारी समाज निर्माण करणे हे उद्दिष्ट दोघांना समान होते.

(५) **मार्क्सवाद :–** सुरुवातीच्या काही समाजवादी तत्त्वप्रणालींप्रमाणे मार्क्स-प्रणीत अर्थशास्त्र हे देखील रिकार्डोच्या श्रममूल्य सिद्धांतावर आणि त्यापेक्षा काहीशा

आर्थिक शुद्ध स्वरूपातील अतिरिक्त मूल्य आणि पिळवणूक या सिद्धांतावर आधारलेले आहे. कामगाराला वस्तुतः 'क्ष' तास काम करून स्वतःची गुजराण करता येतं असली तरी त्याला 'क्ष' अधिक 'य' तास काम करावयास लावण्यात येते. आणि या 'य' तासांचे संपूर्ण मूल्य अतिरिक्त उत्पादनाच्या रूपाने भांडवलदाराच्या पदरात पडते. त्यामुळे कामगार आणि भांडवलदार यांच्यात मूलभूत संघर्ष निर्माण होतो आणि वर्ग लढ्याची सर्व साधने वापरूनच त्याचा मुकाबला करावा लागतो. भांडवलशाही सत्तेचे मूळ उत्पादन साधनावरील मालकीत असते. त्यामुळे ही उत्पादन साधने ताब्यात घेणे ही कामगार वर्गाच्या यशाची अपरिहार्य शर्त होऊन बसते. उत्पादन साधनावरील मालकीहक्काचा लढा हा उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्र होत जाणार. कारण भांडवलशाहीतील काही अनिवार्य आंतरविरोधामुळे जनता अधिकाधिक दरिद्री बनत जाते व अंती क्रांती व भांडवलशाहीचा शेवट अटळ होऊन बसतो.

या सिद्धांतातील सर्वांस अभिनव आणि सर्वात प्रभावी असल्याचे सिद्ध झालेले वैशिष्ठ्य जर कोणते असेल तर ते म्हणजे भांडवलदारांच्या उत्पादन साधनांवरील मक्तेदारीला देण्यात आलेले मध्यवर्ती स्थान आणि कामगारांनी कामगार वर्गाची सत्ता प्रस्थापित केल्याबरोबर भांडवलदारांच्या मक्तेदारीऐवजी सरकारची मालकी प्रस्थापित करण्यावर देण्यात आलेला भर हे होय.

पूर्वीच्या सामुदायिक किंवा सहकारी मालकी हक्काच्या अगदी विरोधी अशा सरकारी समाजवाद किंवा साम्यवादी समाजवाद यांचा मार्क्स हाच खरोखरी जनक ठरतो.

(६) **भाडे म्हणजे अनुत्पादित वाढ** :– रिकार्डोच्या भाड्यासंबंधीच्या सिद्धांतावरून जॉन स्टुअर्ट मिलने हा नवा सिद्धांत बनवला आणि पुढे हेन्री जॉर्जने तो लोकप्रिय केला. काही काल तो अत्यंत यशस्वीही ठरला होता. या सिद्धांताचा रोख मुख्यतः जमीनदार वर्गाविरुद्ध होता. आर्थिक विकासाबरोबर जमिनीचे मूल्य सतत वाढत जाते. त्यामुळे जमीनमालक श्रीमंत बनत जातात. अर्थात या वाढीसाठी त्यांनी कसलेही श्रम केलेले नसतात. म्हणजेच जमीन मूल्यातील ही वाढ 'अनुत्पादित' असते. जमिनीचा पुरवठा मर्यादित असतो. आणि तिच्यावर विद्यमान मालकांनी प्रभावीपणे आपली मक्तेदारी प्रस्थापित केलेली असते, म्हणूनच केवळ ही वाढ त्यांना उपभोगावयास मिळते. समाजाने निर्माण केलेली जादा संपत्ती जमीनदारांनी बळकावून बसावी आणि त्यामुळे श्रमिकांना त्यांचा वाटा मिळू नये हे सारासार न्यायाला सर्वस्वी सोडून असल्यामुळे जमिनीचे राष्ट्रीयीकरण केले पाहिजे, निदानपक्षी जमिनीच्या मूल्यावर जबरदस्त कर तरी बसविले पाहिजेत म्हणजे भविष्यकाळात जमिनीच्या किंमतीत होणाऱ्या वाढीचा फायदा सबंध समाजाला मिळू शकेल.

(७) **विल्यम मॉरिस आणि व्यापारवादाला विरोध:–** स्पर्धेवर आधारलेल्या व्यापारामुळे कामगाराची उत्पादक म्हणून अवनती होते. कामगाराचे कौशल्य आणि समाधान त्यामुळे हिरावून घेतले जाते. कलाकुसर मारली जाते. आणि भ्रष्ट बनलेला वरिष्ठ वर्ग निर्माण होऊन श्रीमंत आणि गरीब यांच्यात असह्य अशी दरी उभी राहते. शासन संस्था, संसद, किंबहुना सामुदायीकरणाचा पुरस्कार करणाऱ्या समाजवाद्यांकडूनही याबाबतीत काही सहाय्य मिळू शकेल ही आशा फोल ठरते. कारण त्यांच्याकडून नवी नोकरशाही आणि जुलूम यांनी कामगार जखडला जाण्याचाच संभव असतो. म्हणून चढाओढ बंद करून त्या जागी लहान प्रमाणावरील सहकारी संस्था संघटित करण्यात आल्या पाहिजेत आणि सर्व आर्थिक व्यवहार अगदी स्थानिक पातळीपर्यंत विकेंद्रित केले पाहिजेत. तसे झाले म्हणजे मध्यवर्ती शासन संस्था लोप पावेल आणि राष्ट्राचे म्हणून जे कार्य असते त्याचीही गरज उरणार नाही. मध्यवर्ती शासन संस्थेची दंडशक्ती आणि व्यापारवाद या दोन अनिष्ट गोष्टी एकदा दूर करण्यात आल्या म्हणजे सारी संपत्ती सामाइक मालकीची होईल. स्पर्धेमुळे निर्माण होणारे वैमनस्य लोप पावेल आणि श्रमाला–तेसुद्धा केवळ नफ्यासाठी नव्हे तर आनंद मिळविण्यासाठी केलेले असतील– कारागिरांची पहिली प्रतिष्ठा प्राप्त होईल.

(८) **फेबियन वाद :–** सुरुवातीच्या फेबियन विचारांचे दायित्व पूर्वीच्या समाजवादी विचारवंतांकडे फार करून जात नाही. ओवेन किंवा मार्क्स यांच्याकडे तर ते अजिबातच जात नाही. रिकार्डो, मिल, जेव्हन्स आणि हेन्री जॉर्ज यासारख्या समाजवादी नसलेल्या विचारवंतांकडून त्यांना वैचारिक खाद्य पुरविले गेले होते.

विशेषतः जमिनीव्यतिरिक्त उत्पादनाच्या इतर बाबींपैकी भाडे हा अनुत्पादित वाढीव उत्पन्नाचा भाग आहे – या मिल व जॉर्ज यांच्या सिद्धांताचा त्यांनी अधिक विस्तार केला. ज्यांना कोणत्याही कारणामुळे नैसर्गिक फायदा मिळत असतो अशा मालकांच्या बाबतीत जसजशी त्यांची भरभराट होत जाते तसतसे त्यांना अधिकाधिक आर्थिक भाडे मिळत जाते. साधारणाच्या कारखान्यापेक्षा अधिक अनुकूल परिस्थिती असलेल्या कारखान्याच्या नैसर्गिक श्रेष्ठतेनुसार व्याजाचे हे प्रमाण ठरत असते. परंतु हे लाभ बहुधा संबंधित उत्पादनाच्या बाबतीत सामान्यतः अंगभूतच असतात, त्यामुळे भेदजनक भाडे हा शुद्ध अनुत्पादित वाढीचा प्रकार ठरतो. स्वतः भांडवलदारांनी काही खास प्रयत्न केल्यामुळे तो प्रकार निर्माण होतो असे नव्हे तर सामाजिक श्रम आणि विकास यामुळे तो आपोआप घडून आलेला परिणाम असतो. म्हणून जमीन आणि औद्योगिक भांडवल खाजगी व्यक्तींच्या किंवा एखाद्या वर्गाच्या मालकीतून मुक्त करून राष्ट्रीयीकरणाच्या योगाने ते सबंध समाजाच्या सुपूर्द केले पाहिजे म्हणजे मग भाडे आणि व्याज सरकारला मिळू लागेल. (अर्थात सर्वांना समान हिस्सा मिळेल असे मात्र नाही, कारण कामगारांना

त्यांनी केलेले 'सगळेच्या सगळे उत्पादन' देऊन टाकावयाचे म्हटले तर कार्यक्षमते-वर त्याचा अनिष्ट परिणाम घडून येईल.)

फेबियन विचारवंतांनी सामुदायिक कृतीचे (सरकारी किंवा स्थानिक स्वराज्य पातळीवर) गोडवे गायले ते केवळ मालकी हक्कांचे बाबतीतच नव्हे. सर्वच क्षेत्रांत सामुदायिक कृतींचा अवलंब केला जावा अशा मताचे ते होते. व्यक्तिऐवजी कोणतीही गोष्ट सामुदायिक पद्धतीने केली तर समाजवादाच्या रोखानेच ते पाऊल पडते. म्हणून पत्त्यांचे कारखाने, फेरीवाले, कुत्री, घोडागाड्या, उपासनास्थाने आणि नृत्यगृहे या बाबी देखील सरकारी मालकीच्या असल्या पाहिजेत असे त्यांचे मत होते. भांडवलशाही सरकार उखडून त्याजागी कामगार वर्गाची सत्ता प्रस्थापित केल्यावाचून सामुदायिकीकरणांतून काहीही निष्पन्न होणार नाही असे जे मार्क्सचे प्रतिपादन होते त्याच्याशी फेबियन समाजवाद्यांचा दृष्टिकोन सर्वस्वी विरोधी असा होता हे यावरून अधोरेखितच सूचित होते. फेबियन्स हे मूलतः 'आस्ते कदम' प्रवृत्तीचे असल्याने मार्क्सच्या उलट त्यांचा असा विश्वास होता की विद्यमान भांडवलशाही [illegible] क्रमाक्रमाने या सुधारणा घडून येऊ शकतील.

(१) आय्एल्पी परंपरा :– इंडिपेन्डन्ट लेबर पार्टीच्या परंपरा अत्यंत प्रभावी असल्या तरी त्यांची नेमकी व्याख्या करणे अवघड आहे. '[illegible] कोणतेही सिद्धांत नसलेले.... [illegible] येणारे व्यापक आंदोलन' म्हणून समाजवादाचा उल्लेख [illegible] प्रा. कोल यांनी मुख्यातोंनी इंडिपेंडेंट लेबर पार्टीच अभिप्रेत होती. जरी इंडिपेन्डन्ट लेबर पार्टीचे सिद्धांत म्हणून काही [illegible] निश्चित होते. तरी देखील [illegible] आय्एल्-पीची ही [illegible] नाही. मुळांत परं[illegible] परस्पर सहकार्य, सेवा आणि हित [illegible] विचारसरणी होती. स्वदेशापुरताच नव्हे तर इतर देशांच्या बाबतीतही [illegible] आग्रह धरला जातो. [illegible] आंतरराष्ट्रीय दृष्टीकोन हा आय्एल्पी-च्या 'मानवातील आंतरराष्ट्रीय बंधुभावाच्या' आवाहनांतून निर्माण झालेला आहे. मार्क्सवाद्यांच्या 'जगातील कामगारांनो एक व्हा' या घोषणेत त्याचे मूळ सापडणार नाही. परस्परांतील बंधुभाव आणि दुसऱ्याचे हित यावर उदार ध्येय-वादी आणि प्रगाढ धार्मिक निष्ठेतून देण्यात येणारा भर यामुळे एक स्वतंत्र विचारसरणी म्हणून आय्एल्पीला मान्यता देणे समर्थनीय ठरते. [illegible] बोअर युद्धाचे बाबतीत आय्एल्पी आणि फेबियन्स यांच्या ज्या भिन्नभिन्न प्रतिक्रिया दिसून आल्या त्यावरून फेबियन विचारसरणीपेक्षा आय्एल्पीची विचारसरणी कशी भिन्न होती हेही लक्षांत येते.

**१० : कल्याणकारी राज्य किंवा पैतृकवादी परंपरा :–** (मालमत्तेच्या संरक्षणाव्यतिरिक्त) नागरिकांसंबंधी सरकारची इतर कसलीही जबाबदारी नसते. इतकेच नव्हे तर निष्क्रीय राहणे हेच सरकारचे कर्तव्य ठरते हा अनिर्बंध अर्थव्यवस्थेचा सिद्धांत अग्राह्य मानला जातो. आणि त्याउलट दारिद्र्य आणि दुःख यांच्या निवारणासाठी तसेच गरजू नागरिकांना निदान जगण्यापुरती तरी कमीत कमी मदत देण्याची जबाबदारी शासनाने स्वीकारली पाहिजे या दृष्टीकोनाचा पाठपुरावा केला जातो.

कल्याणकारी राज्याची विचारसरणी ही दरवेळी स्पष्टपणे समाजवादाचा सिद्धांत स्वीकारतेच असे नाही. वस्तुतः चढाओढीवर आधारलेल्या आर्ष भांडवलशाहीच्या युगांतच सरकारबद्दलचा (लासेल याचे शब्द वापरावयाचे तर) 'रात्रीचा पहारेकरी' हा दृष्टीकोन प्रचारांत होता. औद्योगिक क्रांतीपर्यंत याच्या उलट दृष्टीकोनच रूढ होता आणि समाजवादी पक्षांत नसलेल्यांकडून आज पुन्हा तो मोठ्या प्रमाणावर मान्यता पावला आहे. परंतु 'अनिर्बंध' अर्थव्यवस्थेचा सिद्धांत सबंध एकोणिसावे शतकभर प्रचलित होता आणि त्या कालापासून समाजवादी आंदोलन हीच काय ती महत्त्वाची अशी भांडवलशाही विरोधी शक्ती असल्यामुळे सरकारसंबंधीच्या पैतृक दृष्टीकोनाची त्याच्याशी सांगड घातली जाऊ लागली. वर उल्लेखिलेल्या, त्याचप्रमाणे ज्यांचा उल्लेख करण्यात आलेला नाही अशा, सिद्धांतात या विचारसरणीचे धागेदोरे सापडतात. कदाचित त्याचे एक मूळ लुई ब्लँकसारख्या समाजवादी विचारवंताच्या विचारांत सापडू शकेल. परंतु लासेल आणि जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या विचारांत तर त्याचे धागेदोरे नक्कीच आढळतात. ब्रिटनमध्ये सार्वत्रिक मताधिकारासाठी झालेल्या प्रचार मोहिमेत याची बीजे होती. त्याचप्रमाणे एस्. डी. एफ्. आणि आय्. एल्. पी. यांच्या लिखाणांतही त्याचे धागेदोरे सापडतात असे म्हणता येईल. परंतु त्याला प्रथम जाहीर अभिव्यक्ती दिली ती फेबियनवाद्यांनी. तेव्हापासून सामाजिक सुरक्षितता आणि किमान उत्पन्नाची राष्ट्रीय हमी या मागण्यांच्या स्वरूपांत मजूर सरकारच्या धोरणांत त्यांना महत्त्वाचे स्थान मिळाले आहे.

**(११) सिंडिकॅलिझम आणि गिल्ड सोशॅलिझम :–** युरोप खंडात सिंडिकॅलिझमची अशी एक स्वतंत्र परंपरा होती (विशेषतः लॅटिन देशात) आणि त्याची पाळेमुळे अराजकवादात खोलवर रुजलेली होती. सिंडिकॅलिझमसंबंधी बरेच साहित्य उपलब्ध असून नामवंत लेखकांनी त्याचा पुरस्कार केलेला आहे. परंतु ब्रिटनमध्ये मात्र १९१४ च्या आधीच्या काही वर्षांतच युरोप खंडातील सिंडिकॅलिझमचा बोलबोला झालेला होता. आणि ब्रिटनमधील गिल्ड सोशॅलिझमचे दायित्व सी. जी. टी. किंवा आय्. डब्ल्यू. डब्ल्यू. इतकेच रास्किन आणि मॉरिस यांच्याकडेही जाते.

समाज स्वामित्ववादी ( कलेक्टिव्हिस्ट ) सरकारी समाजवादाविरुद्धची तीव्र प्रतिक्रिया म्हणून गिल्ड सोशॅलिझमची विचारसरणी पुढे आली. भांडवलशाही पद्धतीतील सर्वांत संकटदायक गोष्ट खाजगी मालमत्तेतून मिळणारे उत्पन्न ही नसून वेतनपद्धती ही आहे हे लक्षात न आल्यामुळे सरकारी समाजवादाच्या पुरस्कर्त्यांना खऱ्या समस्येचे आकलनच झाले नाही. सामुदायिकीकरणाने हे संकट टळणार नाही. उलट त्यामुळे जुन्या नोकरशाहीइतकीच अनिष्ट अशी नवी औद्योगिक नोकरशाही मात्र समाजाच्या डोकांडी बसेल. सिंडिकॅलिस्ट पद्धतीचे औद्योगिक गट करून त्यामार्फत उद्योगधंद्यावर कामगारांचे नियंत्रण बसवले तरच ही आपत्ती दूर होऊ शकेल. उत्पादक म्हणून कामगारांना न्याय द्यावयाचा म्हटले तर तो केवळ याच मार्गाने देता येईल. हे स्थित्यंतर घडवून आणण्यासाठी पार्लमेंट किंवा शासनसंस्था यांच्याकडे डोळे लावून बसल्याने काहीही साध्य होऊ शकणार नाही. कामगार संघटनांच्या क्रांतिकारी संपाच्या कार्यक्रमातूनच ते घडून येऊ शकेल. सिंडिकॅलिझममध्ये सगळा भर कशावर असेल तर तो कामगार हा ग्राहक असण्यापेक्षाही उत्पादक आहे यावर आहे. उत्पन्नाची विभागणी करण्यापेक्षा त्यावर कामगारांचे नियंत्रण असले पाहिजे यावर आणि प्रगतीचा अग्रदूत म्हणून सरकारपेक्षा कामगार संघटनांकडे पहाणे यावर आहे.

(१२) **नियोजनाचा सिद्धांत** :– समाजवादी विचारात बऱ्याच उशिरा पडलेली ही भर आहे. १९१४ पूर्वी त्याकडे कोणाचे फारसे लक्ष गेलेले नव्हते. दोन युद्धांच्या दरम्यान बेकारीचा ताण तीव्रतेने भासू लागला होता. त्यावर तोडगा म्हणून हा सिद्धांत पुढे आला. त्याचबरोबर सोव्हिएट यूनियनच्या पंचवार्षिक योजना यशस्वी ठरल्याचे दिसत होते त्याचीही त्यात भर पडली—त्यातूनच पुढे केन्स प्रणित क्रांतीचा विचार विकसित झाला (तसे तर या विचारसरणीचे श्रेय हॉबसनकडे जाते). विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकाच्या अखेरीस नियोजनाच्या समर्थनार्थ निरनिराळे मुद्दे पुढे मांडण्यात येत होते. 'अपूर्ण चढाओढ' पिगू प्रणित कल्याणकारी अर्थशास्त्र, उत्पन्नाची विषम विभागणी, 'उपभोगासाठी उत्पादन' आणि 'नफ्यासाठी उत्पादन' यातील भिन्नता इत्यादी पुस्तकी सिद्धांतांचा या संदर्भात उल्लेख करता येईल. परंतु सर्वांत महत्वाचा मुद्दा बेकारीवर आधारलेला होता. आणि १९३१ पासून बेकारीचे संपूर्ण निर्मूलन करण्यासाठी नियोजन करणे हे मजूर पक्षाच्या धोरणाचे प्रधान उद्दिष्ट होऊन बसले.

## ३. प्रधान बाबी

वर दिलेल्या त्रोटक यादीवरून काय निष्पन्न होते ? मुख्यतः विविधता आणि वैधर्म्य. यामुळेच भावी काळाच्या मार्गदर्शनासाठी जुन्यापुराण्या सिद्धांतांपैकी कोणत्याही एकाची निवड करता येणे अशक्य आहे.

मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंदे जसजसे वाढत आहेत तसतसा सामुदायिकीकरणाचा दृष्टीकोन अधिक प्रभावी बनत आहे.

कालानुसार या उद्दिष्टाचे सैद्धांतिक समर्थन वेगवेगळ्या प्रकारे करण्यात आले असले तरी कामगारांच्या श्रमातून निर्माण झालेल्या परंतु मालमत्ताधारी वर्गाने बळकावून ठेवलेल्या अतिरिक्त उत्पादनाचा सिद्धांत सर्वत्र समान आहे. कामगारांच्या पिळवणुकीचा मुद्दा, रिकार्डोच्या मूल्यासंबंधीच्या सिद्धांतावरून काढण्यात आलेली अनुमाने, मार्क्सचा अतिरिक्त मूल्याचा सिद्धांत, मिल, जॉर्ज यांचा खंडासंबंधीचा सिद्धांत आणि अनुत्पादित वाढीव उत्पन्नासंबंधीची सर्वसाधारण फेबियन विचारसरणी यासारख्या प्राकृतिक नियमावर आधारलेल्या सर्वच विचारप्रणालीत आढळतो.

त्या त्या विचारसरणीच्या समर्थनार्थ पुढे आलेल्या मुद्यांपैकी फारच थोडे मुद्दे कालौघात टिकून राहिले आहेत. 'इयुस नेचराल'ची विचारसरणी, रिकार्डो, मार्क्स यांचा श्रममूल्यासंबंधीचा सिद्धांत किंवा हेन्री जॉर्जने मांडलेले सिद्धांत आज फारच थोडेजण मान्य करतात. तथापि त्याला फार महत्त्व देण्याचे कारण नाही; कारण मालमत्तेवरील फाजील उत्पन्न कमी करण्याची इच्छा ही समानतेविषयी नैसर्गिकपणे वाटणाऱ्या आपलेपणातून उदित झालेली असते. विषमतेमुळे सामाजिक असंतोष उद्भवतो असे ज्यावेळी रॉबर्ट ओवेन म्हणतो किंवा मोठमोठ्या अनुत्पादित उत्पन्नावर नैतिक भूमिकेतून आक्षेप घेतो त्यावेळी त्याची हीच भूमिका असते.

पण यापेक्षाही गंभीर गोष्ट कोणती असेल तर ती ही की, हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी सध्या ब्रिटनमध्ये ज्या साधनांची निवड केली जाते ती सर्वस्वी योग्य अशी असतातच असे नाही. मजूर पक्षाने संपूर्ण नुकसानभरपाई देण्याचे ठरविल्यामुळे उत्पन्नाच्या विभाजनावर फार मोठ्या प्रमाणावरील किंवा तात्कालिक परिणाम घडून येत नाहीत. अर्थात् दूरवर दृष्टी ठेवून विचार केला तर त्याचा एकमेकांशी संबंध असल्याचे दिसून येईल. परंतु फेरवाटपाच्या इतर पद्धतीही अधिक प्रभावी आणि सोप्या होत्या असे दिसून येईल. एकूण उत्पन्नातील तौलनिक भाग किती ते ठरविण्याच्या दृष्टीने औद्योगिक मालमत्तेवरील मालकी फारशी महत्त्वाची नसते. त्यापेक्षा रोजगाराचे प्रमाण, किंमतीतील चढउतार, सरकारी नियंत्रणे (उदा. जादा खंड किंवा लाभांश) आणि त्याहीपेक्षा करविषयक धोरण या बाबी अधिक महत्त्वाच्या ठरतात आणि सरकार खंबीर असेल तर संपूर्ण भरपाई देऊन उद्योगांचे सामुदायिकीकरण न करताही ते मालमत्तेवरील उत्पन्नावर सहज निर्बंध घालू शकते. शिवाय राष्ट्रीयीकरणामुळे काही अत्यंत कठीण आणि अगदी अनपेक्षित अशा समस्या निर्माण झाल्या असून जोपर्यंत त्यांचे निराकरण होत नाही तोपर्यंत मालमत्तेवरील उत्पन्नापेक्षा वेतनाच्या रूपाने मिळणारे उत्पन्न वाढविण्याचे एक साधन म्हणून सामुदायिक मालकीवर विसंबून राहणे केव्हाही अव्यवहार्य ठरेल.

वस्तुत: इच्छित उद्दिष्ट गाठण्याच्या दृष्टीने इतर उपायांनी थोडाफार पल्ला गाठता आला आहे. १९३९ पासून मालमात्तेवरील उत्पन्नाचे वेतनांत महत्त्वपूर्ण परिवर्तन घडून आले आहे. आणि संपत्तीचे वाटप हे आतां पहिल्यापेक्षा कितीतरी अधिक समान प्रमाणावर होत आहे. अर्थात् अद्याप खूप मोठी मजल मारावयाची आहे. परंतु सरसकट सामुदायिकीकरणापेक्षा आजच्या आर्थिक धोरणामुळे ते अधिक सुलभतेने आणि चटकन साध्य करता येईल.

याचा अर्थ असा नव्हे की इतर कारणासाठी राष्ट्रीयीकरण समर्थनीय ठरू शकणार नाही किंवा उत्पन्नाच्या विभाजनावर दूरवरच्या काळांत कसलाही परिणाम घडून येणार नाही. त्याचप्रमाणे समाजांत समानता प्रस्थापित करण्याचे राष्ट्रीयीकरणाचे उद्दिष्ट आता कालविसंगत ठरले आहे असेही नव्हे. याचा मतितार्थ इतकाच की गेल्या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे उत्पादन साधनावरील मालकी उत्पन्नाच्या विभाजनच्या दृष्टीने आता पहिल्यासारखी एकमेव निर्णायक राहिलेली नाही. मोठ्या प्रमाणावरील समता प्रस्थापित झालेली असली तरी देखील खाजगी मालकी टिकून राहू शकते. उलट रशियांतील अनुभवावरून असे दृष्टोत्पत्तीस येते की सरकारी मालकीचा देखील तीव्र स्वरूपाची विषमता टिकवून धरण्यासाठी वापर होऊ शकतो.

(२) सहकारी तत्त्वांचा अवलंब करून किंवा सरकारी मालकी प्रस्थापित करून अनिर्बंध चढाओढ आणि व्यक्तिगत स्वार्थ साधण्याचा हेतू बाजूस सारून काही नव्या सामाजिक संघटना स्थापन करण्याचे आणि काही नवे हेतू प्रस्थापित करण्याचे उद्दिष्ट. ( याबाबतीत अधिकारी समजला जाणारा आर. एच्. टॉनी असे मानतो की हे उद्दिष्ट हीच समाजवादातील मूळ प्रेरणा आहे.) या उद्दिष्टांची स्फूर्तिस्थाने दोन आहेत.

(अ) त्यापैकी पहिले स्फूर्तिस्थान नैतिक असून स्पर्धेवर आधारलेल्या सामाजिक संबंधाऐवजी परस्पर सहकार्य आणि सामाजिक ऐक्य प्रस्थापित करण्याची व व्यक्तिगत नफा कमावण्याच्या वृत्तीऐवजी परहितैशी आणि दुसऱ्याची कदर करण्याची वृत्ती रुजविण्याची इच्छा त्याच्या मुळाशी असते. स्पर्धा आणि नफ्याची दृष्टी या दोन गोष्टी रॉबर्ट ओवेनप्रमाणे ( कारण त्या मानवी सुखाच्या आड येतात ) ख्रिश्चन सोशालिस्टांना ( कारण त्या ख्रिश्चन नीतितत्त्वाच्या विरुद्ध आहेत), रस्किन आणि मॉरिस यांना (त्यामुळे सौंदर्य हानी आणि बनियेगिरी निर्माण होऊन श्रमाचा दर्जा खालावत असल्यामुळे ) तसेच ( त्यामुळे माणसामाणसातील बंधुभावनेला बाधा येत असल्यामुळे ) आय्. एल्. पी. च्या संस्थापकांनाही सारख्याच आक्षेपार्ह वाटतात.

अधिक प्रमाणावर बंधुभाव आणि सहकार्य असलेल्या समाज निर्माण करण्याच्या या नैतिक आकांक्षेबद्दल कोणीच वाद घालणार नाही. अनेक समकालीन

समाजशास्त्रज्ञांच्या लिखाणांतही ते गृहीत धरले आहे हे विशेष. अडचण आहे ती ही आकांक्षा पुरी करणारी यंत्रणा कशी उभी करावयाची याचीच. सामाजिक संघटनेबाबत बोलावयाचे तर केवळ औद्योगिक स्पर्धेला पायबंद घालून ही आकांक्षा फलद्रुप होणार नाही हे उघड आहे. कारण आधुनिक समाजांत सर्वत्र पसरलेल्या स्पर्धेचा तो केवळ एक लहानसा भाग असून तोही कमीकमी होत आहे. कोठल्याही देशांत समान संधी असल्याचे भासविण्यात येत असले तरी असूया, हेवे-दावे आणि स्पर्धेची भावना वसत असते याची आपल्याला चांगली जाणीव आहे. आणि समान संधी उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत डाव्या गटांना जो जो यश मिळत आहे तो तो स्पर्धेची भावना (नोकऱ्या, बढती, सामाजिक प्रतिष्ठा यासाठी) अधिकाधिक व्यापक बनत आहे— मग उद्योगांची उभारणी औपचारिकरित्या स्पर्धेच्या तत्त्वावर झालेली असो वा नसो.

शिवाय वरील सिद्धांत ऐन भरात होते त्यावेळच्या मनाने उद्योगातही आता तेवढी स्पर्धा राहिलेली नाही. त्याबाबतीत परिस्थिती आता अशी निर्माण झाली आहे की, खाजगी क्षेत्रांत अधिक स्पर्धा निर्माण व्हावी हे सरकारी धोरणाचे सर्वमान्य व प्रशस्ती पावलेले सूत्र बनलेले आहे. ब्रिटिश धंदेवाला हा स्पर्धेच्या बाबतीत जात्याच सौम्य प्रकृतीचा आणि सुस्वभावी असल्यामुळे अशी स्पर्धा चालू दिली तर नागरिकांचा राग अनावर होऊन ते एकमेकांचा गळा धरू लागतील अशी भीती बाळगण्याचे मुळीच कारण नाही. यावरून हे स्पष्ट होते की भांडवलदारामधील परस्परांतील वितुष्टाची कारणेपेक्षा इतर अनेक महत्त्वाची कारणे असून त्यांच्याकडे लक्ष देणे आवश्यक आहे.

सामाजिक संघटन आणि व्यक्तिगत चारित्र्य यांच्यातील परस्पर संबंधाविषयीच्या रॉबर्ट ओवेनच्या दृष्टीकोनाबद्दलही आता बहुतेक लोकांच्या मनात संदेह निर्माण झालेला आहे. एका बाजूला केवळ व्यक्तिगत संबंधांऐवजी एखाद्या गटाचे किंवा सामुदायिक संबंध प्रस्थापित केल्याने जनता अधिक समाधानी आणि प्रेमळ बनते किंवा तिच्यात बंधुभाव निर्माण होतोच असे नाही याची प्रचीती आपल्याला येऊन चुकली आहे तर दुसऱ्या बाजूला आपल्याला अभिप्रेत असलेले हे ईप्सित साध्य करण्यासाठी गट कशा तऱ्हेने संघटित करावेत किंवा मुळात ते करावेत किंवा नाही याबद्दल निश्चित आडाखे बांधण्याच्या दृष्टीने आपले ज्ञान फारच तोकडे पडते. आणि पारंपारिक साधनाविषयी बोलावयाचे तर एक तर, ती सर्वथैव अयोग्य ठरणारी तरी असतात नाही तर ती पुरी पडणारी तरी असत नाहीत. लहान प्रमाणावरील सहकारी घटक सध्याच्या परिस्थितीत व्यवहार्य ठरत नाहीत त्याचप्रमाणे राष्ट्रीयीकरण करण्यात आलेल्या महामंडळाच्या स्वरूपातील सरकारी मालकी प्रस्थापित केली तरी तेवढ्याने सहकार्याची वृत्ती किंवा सामाजिक ऐक्याची भावना निर्माण होत नाही— निदान अद्याप तसे सिद्ध तरी झालेले नाही.

वैयक्तिक हेतूचा प्रश्न घेतला तर आपल्याला असे आढळून येते की, गल्या शतकातील घटनांमुळे या प्रश्नांतील गुंतागुंत अधिकच वाढली आहे. माणसाने सामाजिक कर्तव्याच्या भावनेने किंवा प्रेमाच्या पोटी दयाळूपणाने काम न करता ते पैशाकरता करावे हे ज्या समाजवाद्यांना अनैतिक आणि कमीपणाचे वाटते त्यांना आता नफ्यावर टीकेची झोड उठवता येणार नाही. कारण नफा आणि अंगावर काम घेण्याची प्रवृत्ती, लाभांश पद्धती इतकेच नव्हे तर पगारवाढीमागील प्रेरणा यांच्या स्वरूपांत तसा फरक राहिलेला नाही. आणि प्रोत्साहक मोबदला देण्याची प्रवृत्ती हळू हळू इतकी वाढत चालली आहे की त्यामुळे भेददर्शक श्रमासाठी तशाच प्रकारचा मोबदला देण्याची पद्धत फार मोठ्या प्रमाणावर रूढ होऊ लागली आहे. केवळ औद्योगिक क्षेत्रातील स्पर्धा किंवा खाजगी मालकी नष्ट केल्याने परिस्थिती बदलणे अशक्यप्राय आहे. एकाधिकार पद्धतीत किंवा सार्वजनिक मालकी प्रस्थापित केल्यानंतरही पैशाचे प्रोत्साहक स्वरूप पहिल्याइतकेच सर्वव्यापी राहाते. शिवाय लोक केवळ व्यक्तिगत स्वार्थासाठी काम करीनासे झाले म्हणजे ते अधिक चांगल्या तऱ्हेने काम करू लागतील व सुखी बनतील किंवा त्यामुळे समाजाची नैतिक प्रवृत्ती सुधारेल असे गृहीत धरले तरी, वाढत्या प्रमाणावरील सामुदायिक उत्पादन लक्षात घेता व्यक्तीच्या प्रेरणेत बदल घडवून आणणारी संस्थापक यंत्रणा उभी करणे अधिकाधिक अवघड बनत जाणार आहे. तसेच पारंपारिक साधनेही या प्रश्नाचे पुरेसे उत्तर देऊ शकत नाहीत. गिल्डस् आणि कम्यून्स तांत्रिक कारणास्तव बाद ठरतात तर सरकारी मालकीतून अपेक्षित परिवर्तन घडून येऊ शकत नाही. त्यामुळे जरी आपल्या आकांक्षांची परिपूर्ती झालेली नसली तरी देखील तांत्रिक बदल आणि अधिक ज्ञान यांच्या अनुषंगाने यापेक्षाही अधिक व्यापक प्रमाणावरील सहकारी समाज प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत राहिले पाहिजे.

(ब) खाजगी नफा आणि स्पर्धा यावरील दुसरा आक्षेप आर्थिक स्वरूपाचा होता आणि तो आर्ष भांडवलशाहीच्या भौतिक परिणामांशी निगडीत होता. दारिद्र्य, गलिच्छ वस्त्या, सकस अन्नाचा अभाव या तीन गोष्टींवरून असे प्रतिपादण्यात येत असे की, उत्पादन हे उपभोगाकरिता न होता ते नफ्याकरिता केले जाते आणि त्यामागे गरिबांपेक्षा श्रीमंतांच्या गरजा भागवण्याचीच दृष्टी असते. सार्वजनिक मालकी प्रस्थापित झाली तरच साधनसंपत्तीची वाटणी अधिक समानतेवर आधारलेली आणि सामाजिक दृष्ट्या इष्ट अशी होऊ शकेल.

आता हे अगदी खरे की अत्यंत असमान उत्पन्नाच्या चौकटीत आणि केवळ नफ्यासाठी उत्पादन होत असेल तर त्या परिस्थितींत होणारे साधनसामुग्रीचे वाटप समाजवाद्यांना मुळीच पसंत पडत नाही. कारण त्यात गरजा कितीही निकडीच्या असल्या तरी त्या विचारात न घेता केवळ आर्थिक बाजूच तेवढी विचारात घेतली जाते. त्याचप्रमाणे हेही खरे की सरकारी मालकी सारखी साधने निवडली तर

साधनसामुग्रीचे निराळ्या प्रकारे आणि अधिक समान असे वाटप करण्याचे उद्दिष्ट तत्वत: साध्य होऊ शकेल.

परंतु अन्य मार्गानेही हे उद्दिष्ट साध्य करता येईल आणि प्रत्यक्षात आज तसे ते साध्य झालेलेही आहे. नफ्यासाठी करण्यात आलेल्या उत्पादनामुळे साधन सामुग्रीचे वाटप योग्य प्रकारे होत नाही (गरीबांसाठी दुधाचे पुरेसे उत्पादन करण्यापूर्वी श्रीमंतांसाठी कॅन्व्हियरसारख्या चैनीच्या वस्तूंचे उत्पादन केले जाते) हे विधान संक्षिप्त आहे. त्यात अभिप्रेत असलेला खरा अर्थ आहे तो हा कीं, उत्पादन नफ्यासाठीच केले जाते. क्रयशक्तीचे वाटप कशा तऱ्हेने झालेले आहे त्यावरून कोणते उत्पादन फायद्याचे होईल ते ठरत असते; आणि जर क्रयशक्तीचे वाटप अतिशय असमान असेल तर गरिबांच्या आधी श्रीमंतांच्या गरजा पुरविल्या जातात. परंतु क्रयशक्तीचे वाटप अधिक समान पातळीवर झालेले असेल तर चैनीच्या वस्तूंपेक्षा आवश्यक गरजेच्या वस्तूंचे उत्पादन करणे अधिक किफायतशीर ठरते. मागणीची विभागणी व्यक्त करणे ही नफ्याची भूमिका असते. परंतु आक्षेप घेतला जातो तो मूलत: या भूमिकेसंबंधी नसतो तर मागणीच्या विभागणीवरच असतो. म्हणजेच श्रीमंतांच्या जवळ चैनीच्या वस्तू घेण्याइतका वारेमाप पैसा असतो तर गरिबांजवळ दूध विकत घेण्यासाठीही पैसा नसतो—या परिस्थितीवर तो आक्षेप घेतला जातो.

परंतु उत्पान्नांचे फेरवाटप आणि कामगार वर्गाच्या क्रयशक्तीत झालेली वाढ यामुळे नफ्यासाठी केलेल्या उत्पादनामुळे पूर्वी जे अत्यंत अनिष्ट परिणाम घडून येत असत त्यांना फाटा देण्यात आला आहे. आता त्यासाठी उत्पादित वस्तूंचा प्रकारच पार बदलून टाकण्यात येतो. आता कामगार वर्गातील लोकांना मोठ्या प्रमाणावर लागतील अशाच वस्तूंचे उत्पादन केले जाते—मग त्या वस्तु आवश्यक गरजेच्या असोत वा चैनीच्या असोत. स्वदेशात अशा बाजारासाठी निर्माण केल्या जाणाऱ्या वस्तूंपैकी फार मोठा भाग या प्रकारात मोडतो. शिवाय आणखीही एक हत्यार आजकाल हाताशी असते आणि ते म्हणजे आर्थिक आणि भौतिक नियंत्रणे. किमतीवर कोणत्याही तऱ्हेचे नियंत्रण नसते तर खाजगी उद्योगांनी ज्या वस्तु उत्पादन केल्या असत्या त्यापेक्षा त्यांना अगदी निराळ्या वस्तूंचे उत्पादन करावयास भाग पाडण्यासाठीही या साधनाचा उपयोग करून घेता येईल—नव्हे मजूर सरकारने फार मोठ्या प्रमाणावर तसा तो केलाही होता. अशा तऱ्हेच्या नियंत्रणामुळे साधन सामुग्रीचे वाटप बहुसंख्य लोकांना हवे असेल तशाच प्रकारचे होऊ लागते. म्हणजे नव्वद टक्के लोकांच्या गरजा भागविण्यासाठी आता पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक साधन-सामुग्री खर्ची पडते आणि उरलेल्या दहा टक्के श्रीमंत लोकांसाठी त्या मानाने कितीतरी कमी साधनसामुग्री वापरली जाते; आणि याही पुढे जाऊन अगदी 'आदर्श' असे वाटप व्हावे असे वाटत असेल तर सरकारी मालकीचे क्षेत्र न वाढवताही ते सहज करून दाखविता येईल.

अशा तऱ्हेने स्पर्धाविरोधी ऐतिहासिक भूमिकेचा दोन्ही बाजूंनी विचार करता असे दिसते की इतके स्थित्यंतर घडून आल्यानंतर परंपरागत सिद्धांताला एक प्रकारच्या ठोकळेबाजीचे स्वरूप प्राप्त झाले आहे आणि आकांक्षापूर्तीची नवी साधने एक तर उपलब्ध झाली आहेत किंवा तशी ती झाली नसतील तर उपलब्ध होणे शक्य तसेच अत्यावश्यक झाले आहे.

(३) **कामगारांच्या नियंत्रणाचे उद्दिष्ट :–** सिंडिकॅलिस्ट, मॉरिस पंथी आणि गिल्ड सोशॅलिस्टस् या सर्वांची कामगार वर्गाची पिळवणूक हे भांडवलशाहीचे प्रधान वैशिष्ठ्य आहे. अशी धारणा असल्यामुळे प्रत्यक्ष उत्पादकांच्या हाती उद्योगधंद्याचे नियंत्रण सोपविणे हे त्या सर्वांचे समान उद्दिष्ट होते. त्यासाठी निवडण्यात आलेले मार्ग मात्र निरनिराळे होते. उदा. कामगार संघटना, समाजवादी गिल्ड किंवा मॉरिस प्रणित कम्यून्स यांचे नियंत्रण. परंतु या निरनिराळ्या पंथांकडून या भूमिकेचे समर्थन केले जात असे ते मात्र मजुरीची पद्धत गुलामगिरीसारखीच आहे (इतर कोठल्याही वस्तुप्रमाणेच कामगाराकडेही एक विक्रीची वस्तु म्हणून पाहिले जाते. त्यामुळे एका प्रमुख समाजवाद्याने म्हटल्याप्रमाणे कामगाराला 'थेट खतासारखा' दर्जा प्राप्त होतो आणि मजुरीबाबतची सौदेबाजीही परिणामी गुलामगिरीसारखीच ठरते ) आणि सुधारणा घडवून आणण्याचे साधन म्हणून राजकीय कृती निरुपयोगी आहे या मार्क्सप्रणीत दोन कल्पनांचा सिंडिकॅलिस्टांकडून जो अर्थ काढला जातो त्यावर आधारलेले असे. औद्योगिक क्षेत्रात काही हालचाल केली तरच कामगारांची भांडवलशाही जोखडातून मुक्तता होऊ शकेल आणि एकदा त्याची मुक्तता झाली म्हणजे (पुन्हा गुलामगिरी लादली जाऊ नये म्हणून सामुदायिकीकरणाचे प्रयत्न त्याने हाणून पाडले असल्याने) तो स्वयंनियंत्रित गिल्डस्च्या आधारावर उत्पादनाची फेररचना निश्चितच करील.

या तात्त्विक विवेचनांत पन्नास वर्षांपूर्वी कितीही सत्यांश असला तरी आज मात्र ते अगदी निरर्थक वाटते. कामगार हा कसलेही सामर्थ्य नसलेला केवळ पगारी गुलाम आहे, अत्यंत निर्घृणपणे आणि तुच्छतेने त्याची पिळवणूक केली जाते, या कामगारांसंबंधीच्या समजुतीचा आधुनिक परिस्थितीशी कसलाही मेळ बसत नाही. त्याचप्रमाणे सरकारकडून त्याला कधीच कसले सहाय्य मिळू शकणार नाही ही कल्पनाही बरोबर ठरत नाही. गेल्या काही वर्षांत व्यक्तिगत कामगारांची ताकद त्यांच्या मालकाच्या मानाने हळूहळू वाढत चालली आहे. त्याचप्रमाणे सबंध समाजाच्या तुलनेने कामगार संघटनेची ताकदही वाढली आहे. एका बाजूला आपल्या कामगाराला शिस्त लावता येत नाही अशी व्यक्तिगत मालकाकडून सतत केली जाणारी तक्रार आणि दुसऱ्या बाजूला हुजूर पक्षीय सरकारच्या अमदानीत औद्योगिक क्षेत्रात कामगार संघटनांचीच सत्ता चालते अशी सर्वत्र दिली जाणारी कबुली यावरून वरील विधानाची प्रचीती येते. एका पिढीपूर्वी एकादा मालक जितक्या सहज-

पण आपल्या कामगाराला काढून टाकीत असे किंवा त्याला आकसाने वागवीत असे तितक्याच सहजपणाने मालकवर्गाकडून संयुक्तपणे पगार कपातीचे सत्रही सुरू केले जात असे. आज पहिली गोष्ट ही क्वचितच घडते आणि दुसरी तर अशक्य कोटीतीलच आहे. सत्ता समतोलात क्रांतिकारी स्थित्यंतर घडून आले आहे, हे अगदी उघड आहे आणि त्यामुळेच सिंडिकॅलिस्टांचे मूळचे प्रतिपादन जसे अर्थशून्य ठरते तसेच त्यांचे उद्दिष्ट काही प्रमाणात साध्य होते हेही तितकेच खरे.

अर्थात सुचविण्यात आलेली विशिष्ट प्रकारची कामगार वर्गाची नियंत्रणे कोठल्याही परिस्थितीत अव्यवहार्यच ठरली असती. कारण मोठ्या प्रमाणावरील उत्पादनामुळे झालेल्या क्रांतीकारी बदलामुळे, त्याचप्रमाणे अवाढव्य स्वरूप आणि गुंतागुंतीच्या तांत्रिक बाबींमुळे ती नियंत्रणे जुनाट होऊन गेली होती. साहजिकच मध्ययुगीन परिस्थिती डोळ्यासमोर ठेवून त्यासारखी कारागिरांची किंवा उत्पादकांची कोणतीही संघटना आजच्या परिस्थितीत सर्वथैव अप्रस्तुत ठरणार हे उघड आहे. त्यासाठी कार्यक्षमता आणि राहणीमान यांच्या संदर्भात फार मोठी किंमत मोजावी लागेल. सर्व स्वप्नदर्शी योजनांप्रमाणे गिल्ड सोशॅलिझममधील सर्व कल्पना देखील स्थितिनिष्ठ असतात, आर्थिक विकास आणि तांत्रिक शोध यामुळे निर्माण होणाऱ्या गतिमान समस्यांची त्यात दखलच घेतली जात नाही.

पारंपारिक मार्गाव्यतिरिक्त अन्य मार्गांनी महत्त्वाची मजल मारण्यात आली असून कामगारांचा दर्जा सुधारण्याची इच्छाही काही प्रमाणात फलद्रूप झालेली आहे. तथापी ते उद्दिष्ट अद्यापी पूर्णांशाने साध्य झालेले नाही आणि त्यामुळे साहजिकच ते आजही आपले लक्ष वेधून घेत आहेत. त्यासंबंधी होणारा गोंधळ टाळावयाचा असेल तर समाजवादी विचारसरणीत ऐतिहासिक दृष्ट्या ज्या सिद्धांत आणि धोरणाशी त्यांची सांगड घालण्यात आली होती त्यापासून ते अलग करण्यात आले पाहिजे. कार्यक्षमता आणि नवे नवे शोध, त्याचप्रमाणे लोकशाही, यांच्याशी सुसंगत अशी नव्या स्वरूपाची यंत्रणा ही आजची गरज असून त्याची कारणे अगदी उघड आहेत. परंतु परंपरागत कल्पना ती गरज भागवू शकत नाहीत.

(४) **कल्याणकारी उद्दिष्ट** :– खालच्या पातळीवरील दारिद्र्याचे उच्चाटन आणि सार्वत्रिक सामाजिक सेवांच्या द्वारा किमान गरज भागण्याची हमी. कोणत्याही विशिष्ट सैद्धांतिक पंथाचे अनुयायित्व न पत्करलेल्या बहुसंख्य ब्रिटिश समाजवाद्यांना मजूर पक्षाच्य सुरुवातीच्या काळापासून दारिद्र्याविरुद्ध करण्यात येणाऱ्या व्यवहार्य, मानवतावादी आणि सिद्धांताच्या ठोकळेबाजीपासून अलिप्त अशा या मोहिमेचे आकर्षण वाटत आलेले आहे. आपल्या बांधवांना मदत करण्याची नैतिक किंवा धार्मिक प्रवृत्ती असणारांना त्याचप्रमाणे कार्यक्षम सामुदायिकीकरणाच्या धर्तीवर सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या फेबियन प्रेरणेलाही या उद्दिष्टांबद्दल आकर्षण होते.

ही प्रेरणा ज्याप्रमाणे अत्यंत खोलवर रुजलेली होती त्याचप्रमाणे मजूर सरकार अधिकारावर आल्यावर ऐतिहासिक स्वरूपातील बहुतांशी फलद्रूप झालेले तेच पहिले उद्दिष्ट होते. खालच्या पातळीवरील दारिद्र्याचे बहुतांशी उच्चाटण झालेले आहे, 'वेव्हरीज क्रांती' घडून आलेली आहे आणि सामाजिक सेवेचे क्षेत्र जगात ब्रिटनइतके व्यापक अन्य कोठेच नाही असा सार्थ अभिमान आता ब्रिटन बाळगू शकते. यावरूनच 'कल्याणकारी राज्य' हे नामाभिधान रूढ झाले. केवळ तळच्या पातळीवरील दारिद्र्यामुळे जे निर्माण झालेले नाही किंवा युद्धपूर्व काळातील समाजवाद्यांना ज्याची अटकळ येऊ शकली असे सामाजिक विपत्तीचे बरेच मोठे क्षेत्र अद्यापही शिल्लक आहे हे खरे. परंतु तो अगदी नवा आणि निराळा प्रश्न आहे. ब्रिटनमध्ये हे ऐतिहासिक उद्दिष्ट ब्ऱ्याच प्रमाणात साध्य झाले असून सार्वत्रिक आणि कसलाही भेदाभेद न करता सर्वांना उपयोगी पडणाऱ्या सार्वजनिक सेवा ही जी पारंपारिक साधने ती अद्यापही शिल्लक असलेल्या कूट सामाजिक समस्या सोडविण्याच्या दृष्टीने सर्वतोपरी योग्य ठरू शकतील असे नाही.

(५) **बेकारीच्या समूळ उच्चाटनाचे उद्दिष्ट** :– सरकारी नियोजन आणि विशेषत: आर्थिक आणि चलनविषयक धोरणाचे द्वारा साध्य करणे. हुजूरपक्ष अधिकारावर राहून ते करीत आहे तोपर्यंत सुस्पष्ट अशा समाजवादी कार्यक्रमात याचा अंतर्भाव होऊ शकणार नाही. अर्थात स्वदेशातील मागणी कमी झाल्याने बेकारीने पुन्हा डोके वर काढले तर मात्र सुस्पष्ट कार्यक्रमावर मजूर पक्ष पुन्हा अधिकारा रूढ होण्यासाठी आवश्यक असलेली गतिमानता बेकारी उच्चाटनाच्या मुद्यामुळे मिळवू शकेल. परंतु जोपर्यंत हुजूर सरकार इतके अकार्यक्षम ठरत नाही तोपर्यंत हे उद्दिष्ट साध्य झाले आहे असेच मानले पाहिजे. आणि माझी स्वत:ची समजूत अशी आहे की– ज्यासंबंधीचे विवेचन पुढे आले आहे– दोन युद्धांच्या दरम्यानची चलन संकोचाची प्रवृत्ती ही अपवादात्मक होती आणि पुढील काळात बेकारीपेक्षाही चलनवाढीलाच तोंड द्यावे लागणार आहे.

## ५. पुनर्प्रतिपादनाची आवश्यकता

पारंपारिक उद्दिष्टांपैकी बव्हंशी साध्य झालेल्या किंवा अभिप्रेत असलेल्या परिणामांशी आता विसंगत ठरलेल्या, त्याचप्रमाणे एव्हाना संपूर्णपणे उपयोगात आणल्या गेलेल्या किंवा उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने आता ज्यांचा उपयोग राहिलेला नाही किंवा आजच्या काळात जी अव्यवहार्य ठरणारी आहेत किंवा ज्यांच्याऐवजी आता अधिक कार्यक्षम साधने उपलब्ध झाली आहेत अशा पारंपारिक मार्गांचे किंवा धोरणाचे विवेचन येथवर येऊन गेलेले आहे. या सर्वांचा निष्कर्ष परंपरावाद्यांच्या विरुद्ध आणि सुधारणावाद्यांना अनुकूल असाच निघालेला आहे.

असे सांगतात की हरझेन, हेने आणि त्याचे मित्र यांच्याविषयी असे म्हणत की, त्यांची मने इतकी विशाल होती आणि तत्कालीन परिस्थितीबाबतचा अभ्यास त्यांच्या दृष्टीने इतका नावडता होता आणि "आजच्या कोलाहलात हरवून बसलेल्या मानवतेच्या आक्रंदनाचे आकलन करून घेण्यासाठी त्यांना प्रथम लॅटीनमध्ये त्याचे भाषांतर करून घ्यावे लागे आणि ग्रँची व रोममधील कामगारांवरून आपल्या कल्पना त्यांना निश्चित कराव्या लागत." त्याचप्रमाणे आजही हुजूर पक्षीय किंवा डाव्या गटातील रिकामटेकडया लोकांना देखील विद्यमान परिस्थिती अत्यंत गुंता-गुंतीची आणि कूट आहे असे वाटते, आणि त्यांना तिचे पूर्वीसारखे साधे सरळ वर्गीकरण करता येत नाही, त्यामुळे अर्धशतकापूर्वीच्याच कल्पनांचा आणि घोषणांचा ते आजही आसरा घेत असतात. परंतु ग्रँचीप्रमाणेच केर हार्डी हा देखील विसाव्या शतकाच्या माध्यावर असलेल्या जगाच्या वास्तव परिस्थितीवर काबू मिळविण्याची गुरुकिल्ली दाखवू शकणार नाही.



प्रकरण पाचवे

# समाजवादाचा अर्थ

## १. सुधारणावादाला मानसिक विरोध

तेव्हा आता नव्याने स्फूर्ती प्राप्त करून घेण्यासाठी जुने सनातनी सिद्धांत धुंडाळत बसण्याची किंवा आर्ष ग्रंथ चाळीत बसण्याची आवश्यकता उरलेली नाही. कारण त्यांच्याकडून भवितव्याबद्दल दैवी मार्गदर्शन मिळण्याचा कसलाही संभव नाही. आर. एच्. टोनीच्या शब्दांत सांगावयाचे तर आज सर्वप्रथम गरज कशाची असेल तर ती ' पवित्र मानले गेलेले जुने सिद्धांत व्यवहारतः कालविसदृष ठरवून अंती काय साध्य करावयाचे आहे त्याचा निश्चित निर्णय घेण्याची.

त्यामुळे जुन्या सिद्धांताची फेरमांडणी करण्याची गरज भासावी हे साहजिकच आहे. जुने सिद्धांत देखील एखाद्या पोकळीतून किंवा मठात बसून केलेल्या चिंतनातून स्फुरलेले नव्हते. विशिष्ट प्रकारचा समाज आणि त्या समाजाविषयीच्या मानसिक प्रतिक्रिया यामधूनच ते सिद्धांत पुढे आलेले होते. हे बाह्य घटक स्थिर किंवा अपरिवर्तनीय नसल्याकारणाने ते सिद्धांतही कायद्यानुसार बदलत गेले आणि युद्धपूर्व कालापासून पुन्हा समाजांत स्थित्यंतर घडून आलेले असल्यामुळे उद्दिष्टांची फेरमांडणी करणे आवश्यक होऊन बसले आहे. हे अगदी सहजपणे करता येण्यासारखे आहे. पारंपारिक समाजवादांत मुख्यतः पारंपारिक भांडवलशाहीचे अरिष्ट आणि ती भांडवलशाही नष्ट करण्याच्या आवश्यकतेसंबंधीचा विचार होता. परंतु आज पारंपारिक भांडवलशाहीत इतका बदल घडून आला आहे आणि तिच्यांत तक्या सुधारणा झाल्या आहेत की मूळच्या स्वरूपांत ती आज जवळजवळ अस्तित्वांतच राहिलेली नाही. त्यामुळे आजच्या समाजवाद्यांना अगदी निराळ्याच समाजाला तोंड द्यावे लागणार आहे. त्यादृष्टीने युद्धपूर्वकालीन भांडवलशाही विरोध आता फारसा उपयोगी पडणार नाही.

समाजवादाची फेरमांडणी करण्याची ही कांही पहिलीच वेळ नाही असे म्हणून परंपरावादी कदाचित् स्वतःचे समाधान करून घेतील. समाजवादी विचारसरणीचा उभ्या इतिहासांत पूर्वीच्या सिद्धांताचे मोठ्या हिरीरीने खंडन करण्याइतकी परंपरागत गोष्ट दुसरी कोणतीही नसेल. मार्क्सच्या पूर्वी जे पाय रोवून उभे होते त्या स्वप्नदर्शी किंवा ओवेनवादी समाजवाद्यांचा समाचार घेण्यात मार्क्सने आपली फार मोठी शक्ती वेचली आहे. फेबियन समाजवाद्यांची लेखणी मार्क्सइतकी तिखट नव्हती. परंतु मार्क्सने ओवेनला जितक्या कडवेपणाने त्याज्य ठरविले आहे तितक्याच आवेशाने फेबियन पंथीयांनी मार्क्सला ताज्य ठरविले आहे. त्यांच्यापैकी कोणीही पूर्वीच्या सिद्धांतांपासून महत्त्वाचे असे फारसे कांही स्वीकारलेले नाही. अशा प्रकारे सुधारणावादाला देखील भूतकाळाच्या आवाहनाचे वलय आहे आणि जो जो उद्दिष्ट फलद्रूप होत जाते तो तो पारंपारिक सिद्धांत अधिकाधिक अप्रस्तुत ठरत जातात या सर्वसामान्य दृष्टीकोणाची पाखंड म्हणून टर उडविण्याचे कारण नाही.

अर्थात त्याला लोकप्रियता मात्र मिळू शकणार नाही. लोकांना नव्या कल्पना रुचत नाहीत आणि जुन्या सरावातल्या मनःप्रवृत्तींना धक्का लागला तर त्यांना त्याचा तिटकारा येतो येवढ्यापुरतेच मी हे म्हणत नाही तर, ऐतिहासिक दृष्ट्या देखील सुधारणावादाला सतत विरोध होत आला आहे त्यामागील सूक्ष्म कारणांचा विचार मला येथे अभिप्रेत आहे. याचे कारण असे आहे की, कामगार वर्गातील अनेक लढाऊ कार्यकर्त्यांना आणि त्यापेक्षाही कामगारांचा कैवार घेणाऱ्या मध्यम वर्गातील कांही लोकांना असे वाटत असते की, त्यांचे स्थान आणि मानसिक सुरक्षितता ही वर्गसंघर्षाची पारंपारिक कामगार वर्गीय तत्वप्रणाली टिकवून धरण्यावरच अवलंबून आहे.

स्वतःला कामगार वर्गाचे सच्चे साथी म्हणवून घ्यावयाचे असेल, कामगारांकडून मान्यता मिळवून घ्यावयाची असेल आणि आपण खरोखरीच त्यांच्या पक्षाचे आहोत अशी त्यांची खात्री पटवून द्यावयाची असेल तर आपण 'राजापेक्षाही राजनिष्ठ' बनले पाहिजे– हिरीरीने पूर्वीपासून चालत आलेल्या परंपरांचा आणि सिद्धांताचा पाठपुरावा करीत राहिले पाहिजे अशी बहुधा मध्यमवर्गीय समाजवाद्यांची धारणा असावी. धर्माप्रमाणेच राजकारणातही नव्या संप्रदायाची दीक्षा घेणाऱ्यांच्या त्यासंबंधीच्या निष्ठा अधिक कडव्या असतात आणि समाजवादी आंदोलनाला वाहून घेणाऱ्या कामगार कार्यकर्त्यांच्या दृष्टीने त्यांचा सामाजिक दर्जा त्याचप्रमाणे त्यांचे भावनात्मक स्थैर्य हे लढाऊ संघर्ष अपिरिहार्य आहे ह्या श्रद्धेवर अवलंबून असते. या श्रद्धेमुळेच त्यांचे जीवन यथार्थ ठरते. सुधारणावादामुळे लढाऊपणाच्या आवश्यकतेबद्दल संदेह निर्माण होत असल्यामुळे किंवा वर्गसंघर्ष हा आता काहीसा कालबाह्य ठरला आहे असे सूचित होत असल्यामुळे त्यांच्या सामाजिक

आणि भावनात्मक सुरक्षिततेलाही एक प्रकारचे आव्हान दिले जाते. वर्गजागृत भांडवलशाही विरोध जर नामशेषच होत असेल तर लढाऊ म्हणून त्यांचे स्थान काय राहिले आणि त्यांच्या जीवनाला अर्थ तरी कसला उरला? आणि त्यामुळेच लढाऊपणा किंवा वर्गलढा यावर टीका करणारांवर आग पाखडली जाते.

महान सुधारणावादी समाजवादी बर्नस्टाइन याने पन्नास वर्षांपूर्वीच्याही आधी हे ओळखले होते. आर्थर रोझेनबर्ग याने असे लिहिले आहे की, –कामगार चळवळीच्या दृष्टीने अधिकृत जहालवादी सिद्धांतापेक्षा सुधारणावादी विचारसरणीचे व्यवहार्य फायदे अधिक आहेत. . . .तरीदेखील इंटरनॅशनलमधील बहुसंख्य सभासदांनी त्याचे तर्कशुद्ध समर्थन मान्य करण्याचे नाकारून भावनातिरेकाने त्याचा सपशेल त्यागच केला. बहुसंख्य कामगारांच्या दृष्टीने भांडवलशाही सरकारचा निषेध करून त्यापासून आपण अलिप्त आहोत असे दाखविणे अत्यावश्यक होऊन बसले होते. एखाद्या धार्मिक चळवळीप्रमाणे सवंग मार्क्सवादामुळे त्यांना आत्मविश्वास टाकून द्यावा लागला असता. आजच्या कामगार चळवळीतही वर्गभावनेला चिकटून राहण्याची अंतःप्रेरणा दृष्टोत्पत्तीस येते.

त्याशिवाय सुधारणावादाला विरोध असण्याचे आणखी एक मानसशास्त्रीय कारण आहे आणि ते समाजवादी आंदोलनाच्या यशस्वितेतूनच उद्भवलेले आहे. एम्. रेमंड ॲरॉन् यांनी 'पाश्चिमात्य देशात समाजवाद हा वस्तुस्थितीचाच एक भाग बनल्यामुळे ती आता कपोलकल्पित कथा राहिलेली नाही' असे जे म्हटले आहे ते अगदी यथार्थ आहे. अर्थात ते पूर्ण सत्य नसले तरी कपोलकल्पित कथा न वाटण्याइतके सत्य खासच आहे. मजूर सरकारे अधिकारावर आली आहेत. आणि अधिकारावर आल्यानंतर अंगावर येऊन पडणारी जबाबदारी पार पाडण्यास जितकी कठीण तितकीच अनपेक्षित असल्याचे त्यांना आढळून आले आहे. त्याचप्रमाणे बेकारीचे समूळ उच्चाटन आणि सामाजिक सुरक्षितता यामुळे पूर्वीच्या भावनात्मक उत्साहामागील बराचसा युक्तिवाद नष्ट झाला आहे.

सुधारणावादात या नव्या वास्तवतेची दखल घेतली गेली आहे. जुन्या स्वप्नांपैकी अनेक स्वप्ने विरून गेली आहेत तर अनेक साकार होऊन चुकली आहेत याची ती स्पष्ट कबुलीच आहे. आणि या उघडयानागडया कबुलीवरच खरा राग आहे. कारण एक तर त्यामुळे जुना साधेपणा, निश्चितता आणि वादातीत श्रद्धा यांचा चुराडा होतो. युद्धापूर्वी जी. डी. एच्. कोल यांनी असे लिहून ठेवले आहे की, समाजवादाबद्दलची जिद्द परिमार्जनाची वाट पहात असलेल्या अन्यायाच्या जित्या जागत्या जाणीवेतून निर्माण होते. आणि ज्यावेळी हे अन्याय अगदी उघडउघड होते त्यावेळी शत्रू नेमका कोठे आहे, त्याचा मुकाबला करण्यासाठी काय केले पाहिजे आणि लढ्याचे पवित्रे कसे घेतले पाहिजेत ते आपल्याला समजू शकत होते. अशा तऱ्हेच्या सुस्पष्ट आणि सत्प्रवृत्त उद्दिष्टांसाठी लढा देणे उत्साहवर्धक होते. परंतु

आता पूर्वीची निश्चितता आणि साधेपणा राहिलेला नाही; आणि प्रत्येक गोष्ट संदिग्ध आणि गुंतागुंतीची होऊन बसली आहे. उघड दिसणारे ढळढळीत अन्याय, ओंगळपणा, अपप्रवृत्ती आणि संकटग्रस्त टापू यांच्याऐवजी आंतरराष्ट्रीय देवघेवीचा ताळेबंद (बॅलन्स ऑफ पेमेंटस्) प्रोत्साहक प्रेरणा आणि वाढीव उत्पादनक्षमता यांचाच घोळ घालीत बसावा लागतो आणि समाजवाद्यांची अवस्था नव्या आणि आकस्मिक वास्तवतेच्या कचाटयात सापडल्यासारखी होऊन बसते.

उद्दिष्ट पहिल्यापेक्षा आता अधिक अस्पष्ट झाले आहे इतकेच नव्हे तर पहिल्या दोन प्रकरणात वर्णन केलेल्या सुधारणा घडून आल्यानंतर त्यांची निकडही पहिल्याइतकी राहिलेली नाही. त्यामुळे त्यासाठी पहिल्यासारखी बाजी लावण्याची प्रेरणाही आता होत नाही. परंतु लोकांना कशा ना कशा तरी धर्मयुद्धाच्या भावनेने स्वतःला वाहून घ्यावयाचे असते आणि उराशी बाळगलेली स्वप्ने निम्मी शिम्मी साध्य झाली तरीदेखील शैथिल्याची भावना त्यांच्या मनाला ग्रासून टाकते. धर्म-सुधारणा यशस्वी झाल्यानंतर स्ट्रिंड्वर्गच्या नाटकातला तो ओलोफ ओरडतो, 'सर्व काही पुन्हा पहिल्यापासून सुरू करता येईल तर काय बहार होईल ! मी विजयाची हाव धरली नव्हती; मला हवी होती ती लढाई!' अनेक समाजवाद्यांच्या मनातदेखील अशीच भावना खोलवर दडलेली असते. सुरक्षितता आणि रोजगाराची शाश्वती असणारांची स्वप्ने भंग पावली असून त्यांच्यावाबतीत आता लढयाची गरज उरलेली नसल्यामुळे त्यांच्यातील चळवळे अस्वस्थ होऊन जातात आणि त्यांच्यात एक प्रकारची वैफल्याची भावना पसरते. त्यामुळेच सुधारणावादी त्यांना नव्या वस्तु-स्थितीला तोंड देण्यास भाग पाडू लागले म्हणजे ते सुधारणावाद्यांवरच घसरतात आणि वडेबडे भांडवलदार, वॉल स्ट्रीट, पिळवणूक करणारे नफेखोर, हे सर्व जुने शत्रू आपल्यावर हल्ला करण्यासाठी अद्यापही दवा धरून बसले आहेत अशी स्वतःची फसवणूक करून घेतात. आजच्या परिषदांतील ९०% ठरावांच्या बाबतीत असे म्हणावे लागेल की क्विक्झोट ज्या प्रमाणे पवनचक्कीलाच भयानक राक्षस समजून त्याच्याशी दोन हात करण्याचा आव आणतो तशीच असले ठराव करणारांची अवस्था असते. दुर्दैवाने सँकोपांझाप्रमाणे तो राक्षस नसून ती साधी चक्की आहे असे सांगणारे त्यांना फारसे कोणी भेटत नाही.

## २. साध्य-साधनातील गोंधळ

समाजवादी सिद्धांतांची फेरमांडणी करावयाची असेल तर प्रथम 'समाजवाद' या शब्दाचा नेमका कोणता अर्थ आपल्याला अभिप्रेत आहे ते स्पष्ट केले पाहिजे.

परंतु अशी व्याख्या करणे सोपे नाही. कारण 'समाजवाद' या शब्दाने ज्याची अनुभवसिद्ध लक्षणे सांगता येतील आणि 'समाजवाद' असल्याचे किंवा नसल्याचे निर्विवादपणे सादर करता येईल अशा कोठल्याही एखाद्या विद्यमान किंवा

गतकालीन समाजाचे चित्र नजरेसमोर उभे रहात नाही. त्यामुळे समाजवादा-संबंधीच्या कोणत्याही विधानाची सत्यासत्यता निश्चितपणे पारखून घेता येत नाही; आणि समाजवादाची अचूक कल्पना देणारा शब्द म्हणून त्याकडे बघता येत नाही. सहाजिकच समाजवाद या शब्दाची व्याख्या शोधण्यासाठी विश्वकोष धुंडाळीत बस-ण्यात काहीही अर्थ नाही. कारण त्या शब्दाची तशी सुस्पष्ट व्याख्या झालेली नाही आणि ती होणे शक्यही नाही.

स्वत:ला 'समाजवादी' म्हणविणारांना अभिप्रेत असलेला अर्थ निरनिराळा इतकेच नव्हे तर गेल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे परस्पर विसंगतही होता यवरूनही वरील विधानाने प्रत्यंतर येईल. 'उत्पादन साधनांचे, वितरणाचे आणि विनिमयाचे राष्ट्रीयीकरण म्हणजे समाजवाद' अशी मार्क्सची व्याख्या होती आणि 'आपल्या समाजाला सुधारण्याच्या सर्व आकांक्षांची' पूर्ती म्हणजे समाजवाद या प्रूधाँच्या व्याख्येपेक्षा मार्क्सच्या समाजवादाचा अर्थ अगदी निराळा होता. 'आपण सर्वजण आता समाजवादी आहोत' असे १८९२ मध्ये जाहीर करणाऱ्या सर विल्यम हरकोर्ट याला अभिप्रेत असलेल्या समाजवादापेक्षा 'सर्व संपत्ती समाजाच्या मालकीची असावी, सरकारनेच सर्व कामगारांचे नियंत्रण करावे आणि उत्पादन होणाऱ्या सर्व वस्तूंचे समान वितरण करण्याची सक्ती करावी' म्हणजे समाजवाद आला असे मानणाऱ्या त्याच्या समकालीन ब्रॅड्लॉचा समाजवाद अगदी निराळा होता. आणि समाजवादी विचारसरणीचा इतिहास काढून पाहिला तर मालकी-हक्क, सहकार्य, नियोजन, उत्पन्नाचे वाटप, इत्यादींच्या संदर्भात समाजवादाच्या निरनिराळ्या व्याख्या केल्याचे आढळून येईल आणि मग त्यातील खरी कोणती ते ठरवणे हे ज्याच्या त्याच्या व्यक्तिगत निवडीवर अवलंबून राहील. शिवाय त्यातल्या काही व्याख्या इतक्या संदिग्ध असतात की त्या जवळजवळ निरर्थकच ठरतात. उदाहरणार्थ 'लोकाहीवादी ध्येयाची आर्थिक बाजू' या सिडने वेबने केलेल्या व्याख्ये तून कोणताही अर्थ निघू शकेल.

समाजवाद या शब्दाने जो भावनात्मक आशय व्यक्त केला जातो त्यामुळे तर त्याविषयीच्या गोंधळात अधिकच भर पडते. त्याचप्रमाणे समाजवादात केवळ मन वळविण्यासंबंधीचा जो भाग आहे त्यासंबंधीही असेच म्हणता येईल. हिटलरप्रणीत राष्ट्रीय 'समाजवाद' किंवा पूर्व युरोपातील 'समाजवाद' हा शब्द संमती दर्श-विण्याकरता किंवा मिळविण्याकरता वापरला जातो किंवा डाव्या गटाची साप्ताहिके त्यांना पसंत नसलेल्या धोरणावर ते समाजवादी नाही अशी टीका करतात तर उजव्या गटाचे अमेरिकन 'सरपटणारा समाजवाद' असा त्याचा उल्लेख करतात.

परंतु या सर्व गोंधळात भर कशाने पडत असेल तर 'समाजवाद' हा शब्द विशिष्ट समाजाचे किंवा त्या समाजाला लागू पडतील अशा मूल्यांऐवजी तो समाज अस्तित्वात आणण्यासाठी साधन म्हणून ज्यांचा उपयोग होऊ शकतो किंवा

होऊ शकेल असे वाटते अशा धोरणाचा तपशील देण्याच्या प्रवृत्तीमुळे. या शब्दामुळे होणारा गोंधळ आणि त्याला येणारे विकृत स्वरूप यांना आळा घालावयाचा असेल तर स्वतःला समाजवादी म्हणविणाऱ्यांना सर्वांना, निदान त्यातील जास्तीत जास्त लोकांना मान्य होतील अशा काही बाबी असतील तर त्या कोणत्या ते प्रथम विचारात घेतले पाहिजे. भांबावून टाकणाऱ्या निरनिराळ्या सिद्धांतांत सर्वांना समान असलेली कोणती बाब असेल तर ती म्हणजे नैतिक मूल्ये आणि आकांक्षा; आणि अन्यथा निरनिराळ्या विचारसरणीत कमालीची मतभिन्नता असली तरी त्या सर्वांमध्ये दुवा साधणाऱ्या समान आकांक्षामुळेच लोक स्वतःला समाजवादी म्हणवितात.

अशा तऱ्हेने आधुनिक काळात प्रथम एकोणीसाव्या शतकाच्या मध्याला ओवेनवाद्यांकडून हा शब्द रूढ आला. परंतु मार्क्सने कुत्सितपणे 'स्वप्नदर्शी' समाजवादी म्हणून त्यांची संभावना केली. ओवेनवाद्यांचा 'समाजवाद' उघड उघड समाजासंबंधीचा नैतिक दृष्टीकोन, विशिष्ट जीवन पद्धती, आणि नैतिक मूल्ये यावरच आधारलेला होता. या साधनांच्या द्वारा हा 'चांगला समाज' स्थापन करता येईल अशी त्यांची जी धारणा होती ती आजकाल विसंगत ठरली आहे. आणि समाजवादाचे उद्दिष्ट साध्य करण्याचे सर्वोत्तम साधन कोणते यासंबंधी एकवाक्यता होऊ न शकलेला वाद सुरू झाल्यापासूनच त्यावर आक्षेपही घेण्यात आले आहेत. स्वतःला योग्य वाटणारी विशिष्ट साधने म्हणजेच समाजवाद असे म्हणण्याचा आग्रह त्या साधनांच्या पुरस्कर्त्यांनी धरला नसता तर आज त्या वादाला काही महत्त्वही उरले नसते.

अशा तऱ्हेने, तिसऱ्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे उत्पादन साधनांवरील मालकी कशा प्रकारची आहे त्यावरून सबंध समाजाचे स्वरूप ठरत असते, आणि समाजवाद्यांच्या मूलभूत आकांक्षा फलद्रूप होण्यासाठी सामुदायिक मालकी प्रस्थापित करणे पुरेसे आहे या दोन चुकीच्या गृहीत कृत्यांवर विसंबून मार्क्सने उत्पादन-साधनांवरील सामुदायिक मालकीच्या कल्पनेचा समाजवादाचे वर्णन करण्यासाठी उपयोग करून घेतला. आणि तेव्हापासून समाजवाद हा शब्द समाजात आर्थिक अमर संस्थात्मक स्थित्यंतर घडवून आणण्यासाठी अवलंबावयाच्या धोरणाच्या संदर्भात सर्वसामान्यपणे वापरला जाऊ लागला. ते स्थित्यंतर घडवून आणण्या-मागील अंतिम सामाजिक उद्दिष्टांचा उल्लेख करण्यासाठी मात्र तो क्वचितच कोणी वापरला असेल. त्यामुळे समाजवाद आणि उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरणच नव्हे तर सरकारी नियोजन, फेरवितरण किंवा सरकारी सामुदायिकीकरण यांचीही सांगड घालून दिल्याचे आपण नेहमी पहातो. साध्याबाबत जनतेचे सर्वसाधारण एकमत होऊ शकेल परंतु साधनांबाबत प्रामाणिक मतभेद असणे अगदी साहजिक असल्याने त्यातून काही निष्पन्न होणार नाही. शिवाय एका पिढीला जी साधने

उपयुक्त ठरतील तीच दुसऱ्या पिढीला सर्वस्वी गैरलागू ठरण्याचाही संभव असतो आणि कोणत्याही परिस्थितीत ( आणि हे अधिकच महत्वाचे आहे ) विशिष्ट साधनांमुळे अभिप्रेत असलेल्या परिणामाव्यतिरिक्त आणखीही अनेक परिणाम घडून येण्याचीही शक्यता असते. वर उल्लेखिलेल्या धोरणांच्याबाबतीत वस्तुतः असेच घडून आलेले आहे.

अशा तऱ्हेने उत्पादन साधने, वितरण आणि नियमन यांचे राष्ट्रीयीकरण म्हणजे समाजवाद अशी व्याख्या केली तर आधीच्या समाजवाद्यांना त्या शब्दाचा जो अर्थ अभिप्रेत होता त्यापेक्षा सर्वस्वी भिन्न असे निष्कर्ष निघू लागतील. उदा. पाश्चिमात्य समाजवादी सर्वसाधारणपणे समाजवादात जी मूल्ये गृहीत धरतात त्यापैकी बहुतेक सर्व मूल्ये हिरावून घेतली जात असतांनाही सोव्हिएट रशिया हा संपूर्ण समाजवादी देश आहे– अगदी स्वीडनपेक्षादेखील– असे मानावे लागेल. त्याचप्रमाणे आर्थिक व्यवहाराचे सामुदायिकीकरण किंवा सर्व अर्थव्यवहारावर सरकारी नियंत्रण अशी समाजवादाची व्याख्या केली तर नाझी जर्मनीला अगदी यथार्थतेने समाजवादी देश म्हणावा लागेल. परंतु या दोन्ही उदाहरणातील समाज-वादाच्या व्याख्येनुसार झालेली त्या देशातील परिणती पाहिली तर त्याला समाज-वाद म्हणून फार करुन कोणताच समाजवादी मान्यता देणार नाही. राष्ट्रीयीकरण आणि नियोजन या साधनांच्या द्वारा अनेक,हेतू साध्य करुन घेता येतात हे लक्षात घेतले म्हणजे साध्य आणि साधन एकरूप आहेत असे समजणे किती मूर्खपणाचे आहे ते ध्यानात येईल.

ते केवळ मूर्खपणाचेच आहे असे नव्हे तर भाषाशास्त्राच्या आणि ऐतिहासिक दृष्टीनेही ते चूक आहे. ओवेनवादी आणि मार्क्सवादी, फेबियन आणि ख्रिश्चन सोशॅलिस्ट, सिंडिकॅलिस्ट आणि गिल्ड सोशॅलिस्ट इत्यादी स्वतःला समाजवादी म्हणविणाऱ्या किंवा इतरांकडून तसे समजल्या जाणाऱ्या निरनिराळ्या वैचारिक पंथांचे योग्य साधनांचे बाबतीत एकमेकांशी तीव्र मतभेद झालेले आहेत आणि त्यांपैकी कोणत्याही साधनाला 'समाजवादी' या नामाभिधानापेक्षा चांगले नाव सापडलेले नाही. या सर्व पंथांत समान अशी कोणती बाब असेल तर ती म्हणजे मूलभूत आकांक्षा आणि त्यांच्या मुळाशी असलेली नैतिक मूल्ये. यावरुन हे ओघानेच येते की या समान बाबींत 'समाजवाद' या शब्दांत ऐतिहासिक आणि तर्क-दृष्टचा बसण्या-, सारखा असेल तेवढाच अर्थ अभिप्रेत असणार आणि आपल्याला आता त्याचाच विचार करावयाचा आहे.

## ३. समाजवादाच्या मूलभूत आकांक्षा

हे नतिक आणि भावनात्मक आदर्श [काही अंशी अकरणात्मक असतात (भांडवलशाहीच्या दृष्य परिणामांचा निषेध)तर काही अंशी सकरणात्मक असतात

आणि चांगल्या समाजाच्या स्वरूपासंबंधीचा निश्चित दृष्टीकोण त्यात दिग्दर्शित झालेला असतो. अर्थात अकरणात्मक आणि सकरणात्मक असे दोन्ही धागे अनेकदा एकमेकात गुंफले गेलेले असतात.

ठोकळमानाने त्याची यादी पुढीलप्रमाणे देता येईल. एक: भौतिक दारिद्रय आणि शारीरिक ओंगळपणा यांचा निषेध. दोन : 'समाजकल्याणा'बद्दल व्यापक आस्था–कोणत्याही कारणाने गरजू, दडपले गेलेले किंवा दुर्दैवी असलेल्यांच्या हिताच्या संदर्भात. तीन :समता आणि ' वर्गविहीन समाज ' यावर निष्ठा आणि विशेषतः कामगाराला त्याचे 'न्याय्य' हक्क आणि कामात जबाबदारीचे स्थान मिळवून देण्याची इच्छा. चार : स्पर्धात्मक विरोधाला नामंजुरी आणि बंधुभाव व सहकार्याचे ध्येय. पाच : एक अर्थव्यवस्था यादृष्टीने भांडवलशाहीतील अकार्यक्षमता विशेषतः त्यातून सामुदायिक बेकारी निर्माण होण्याची प्रवृत्ती यांना विरोध. यांपैकी पहिल्या तीन बाबी तळच्या पददलितांच्या वतीने चालविले जाणारे व्यापक मानवी आंदोलन या अर्थाने समाजवादाचा पाया ठरतात. पहिली आणि शेवटची या दोन बाबी भांडवलशाहीच्या भौतिक परिणामाचा निषेध करतात तर उरलेल्या तीन न्याय्य, सहकारी आणि वर्गविहीन समाजाच्या आदर्शवादी इच्छेतून पुढे आलेल्या आहेत.

(मी फक्त सामाजिक आणि आर्थिक आकांक्षांचाच उल्लेख केला आहे. अर्थात त्याच्या मुळाशी स्वातंत्र्य आणि लोकशाही यावर निष्ठा आहे असे गृहीत धरलेले आहे. व्यक्तीच्या स्वातंत्र्याच्या राजकीय चौकटीव्यतिरिक्त समाजवादाला इतर काही अर्थ असू शकतो ही गोष्ट सुरुवातीच्या बहुतांश समाजवाद्यांच्या ध्यानातही आली नसती. परंतु ब्रिटनमधील हुजूर पक्षीय आणि समाजवादी या दोघांनाही हे राजकीय गृहीत कृत्य मान्य नसल्यामुळे त्यासंबंधी ऊहापोह केलेला नाही.)

अशा तऱ्हेची मांडणी केल्यानंतर असे दिसून येईल की या अगदी मूलभूत आकांक्षादेखील आजच्या काळातील समाजाला लागू पडणाऱ्या नाहीत. त्यापैकी काहींची भाषा आजच्या परिस्थितीला लागू पडत नाही. मुख्य म्हणजे त्या कमालीच्या अकरणात्मक स्वरूपाच्या आहेत, आणि ते साहजिक आहे. कारण बव्हंशी ती युद्धपूर्व काळातील भांडवलशाहीच्या प्रत्यक्ष परिणामाविरुद्ध व्यक्त होणारी प्रतिक्रिया होती आणि एका बाजूला वीस लाख लोकांची बेकारी, कमालीचे दारिद्रय व अन्नान्न दशा आणि गलिच्छ वस्त्यांतील दारुण परिस्थिती तर दुसऱ्या बाजूला श्रीमंत वर्गाजवळ असलेली अमाप संपत्ती अशी परिस्थिती असल्यानंतर आकांक्षांचा तपशील देत बसण्याऐवजी ही भयानक परिस्थिती नष्ट करण्याची अकरणात्मक इच्छा प्रबळ ठरली तर ते साहजिकच म्हणावे लागेल.

परंतु जसजशी या आपत्तीवर मात केली जाते आणि अन्याय दूर होऊ लागतात तसतशी अकरणात्मक विधाने अधिकाधिक अप्रस्तुत ठरू लागतात आणि

मतदारांना ती अवास्तव वाटूं लागतात. कारण बहुसंख्य मतदार बेकारी, दारिद्र्य, बेकारभत्त्याकरता लागलेल्या रांगा हे सारे विसरून गेलेले असतात आणि १९३० सालच्या घडामोडींवर आधारलेल्या प्रचार मोहिमा त्यांना आकर्षित करू शकत नाहीत. ज्यांच्या मनात भीतीचा लवलेशही राहिलेला नाही उलट आपले जीवनमान आता उंचावणार या आशेने ज्यांची मने भरून आली आहेत त्यांच्यापुढे कोणी भूतकालीन अन्यायाचे चऱ्हाट वळीत बसेल तर त्यांना ती एक डोकेदुखीच वाटणार.

म्हणून आपण पुन्हा मूलभूत आकांक्षांचा विचार करू लागलो तरीदेखील स्थित्यंतराच्या गतीने जुन्या सिद्धांतांना मागे टाकले असून त्यांची नव्याने मांडणी करणे जरूरीचे होऊन बसले आहे ही एकपरीने स्वागतार्ह ठरणारी पूर्वीचीच अडचण उभी राहते. अर्थात टोरी सरकारने पूर्वीच्या सर्व आपत्ती पुन्हा निर्माण केल्या असत्या तर मात्र परिस्थिती अगदी सरळ आणि साधी झाली असती. कारण मग 'काही कालपर्यंत' नवविचार बाजूला सारून जुन्या अकरणात्मक विधानावर काम भागवून नेता आले असते. परंतु टोरी इतक्या बेदरकारपणे वागले किंवा गेलेले महत्त्व पुन्हा परत मिळविण्यासाठी केवळ अधूनमधून ते प्रतिहल्ले करीत राहिले तरी तेवढ्याने नव्या आखणीची जरूर पडणार नाही हे संभवनीय दिसत नाही.

या आकांक्षांमागील मूलभूत नैतिक आणि भावनात्मक आशय कायम ठेवून, परंतु त्याचबरोबर त्यातील आजच्या परिस्थितीशी मिळताजुळता नसलेला भाग त्याज्य ठरवून त्यांची फेरमांडणी कशी करता येईल हा आपल्यापुढील खरा प्रश्न आहे. ब्रिटनच्या संदर्भात बोलावयाचे तर मुळातल्या पाच आकांक्षांपैकी पहिली आणि पाचवी आजच्या परिस्थितीत झपाट्याने गैरलागू ठरू लागली आहे. आणि आज जे काही दारिद्र्य शिल्लक राहिलेले असेल तेही सध्याच्या आर्थिक विकासाची गती लक्षात घेता एका दशकाच्या आत नष्ट होईल आणि विद्यमान मिश्र अर्थव्यवस्थेचे वैशिष्ट्य हे आहे की, रोजगार आणि उत्पादनक्षमता या दोहोंची पातळी खूप उंचावली असून त्याला काही एका मर्यादेपर्यंत स्थैर्याचीही जोड लागलेली आहे. निराळ्या शब्दांत सांगावयाचे तर भांडवलशाहीच्या आर्थिक परिणामासंबंधीच्या आकांक्षा, भांडवलशाहीत जसजसे स्थित्यंतर घडून येत आहे तसतशा झपाट्याने लोप पावत चालल्या आहेत.

परंतु उरलेल्या तीन महत्त्वाच्या सकरणात्मक आकांक्षा, ज्या वर दाखवून दिल्याप्रमाणे पददलितांविषयीच्या आस्थेतून किंवा न्याय्य, सहकारी आणि वर्गविहीन समाजाच्या अपेक्षांतून निर्माण होतात म्हणून सांगितले, त्या अद्यापही काही अंशी अपूर्णच राहिलेल्या आहेत हे स्पष्ट आहे. आज आपण त्यांची मांडणी निराळ्या प्रकारे केली पाहिजे हे खरे; परंतु त्यातील मूलभूत आशय अद्यापही तितकाच लागू

उरलेला आहे. ज्यांना मदतीची जरूर आहे असे दुर्दैवी नागरिक अद्याप कितीतरी आहेत; आणि समतेवर आधारलेला किंवा वर्गहीन असा समाज अद्याप अस्तित्वात आलेला नाही. तसेच आजच्या समाजात सहकार्यावर आधारलेले सामाजिक संबंधही प्रस्थापित झालेले नाहीत.

## ४. सहकारी आकांक्षा

सहकारी आकांक्षेचा उहापोह प्रथम हातावेगळा करून टाकण्याचा माझा इरादा आहे. अर्थात ही बाब कमी महत्त्वाची आहे म्हणून मी ती हातावेगळी करण्याच्या मागे आहे असे मात्र नव्हे. पण त्याचे मुख्य कारण असे आहे की सद्यःपरिस्थितीशी ती बाब कितपत सुसंगत ठरू शकेल याविषयीचा निश्चित निर्णय मी देऊ शकत नाही.

संगर वर्षांपूर्वीपेक्षा ब्रिटनमधील आजच्या समाजांत निश्चितच कमी स्पर्धा आहे हे बहुतेक सर्वजण मान्य करतील. उद्योगांच्या बाबतीत तर हे विधान विशेषच खरे आहे, आणि स्पर्धेला विरोध करणाऱ्या समाजवाद्यांच्या टीकेचा मुख्य भर तर औद्योगिक क्षेत्रांतील स्पर्धेवरच होता. आज त्या स्पर्धेची व्याप्ती ज्याप्रमाणे कमी झाली आहे त्याचप्रमाणे ती पूर्वीइतकी तीव्रही राहिलेली नाही. आणि व्यापारी वर्गाची वृत्ती ही पहिल्या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे अधिक मर्यादित आणि समंजसपणाची बनलेली आहे.

परंतु हा फरक येथेच संपत नाही तर त्याची व्याप्ती वाढलेली दिसते म्हणजे पूर्वीची व्यक्तित्ववादावर आणि स्वावलंबनावर नितांत विश्वास बाळगणारी विचारसरणी जाऊन त्या जागी जाता गटाने मिळून करावयाची कृती आणि समाज कल्याणाच्या बाबतीत सामुदायिक जबाबदारीच्या तत्त्वावर सर्वांनी 'सहकारी' झाले पाहिजे ही विचारसरणी मान्यता पावली आहे. याचा परिणाम स्पर्धेवर आधारलेल्या वर्तणुकीचे परंपरागत नियम अधिकाधिक काटेकोर बनण्यात झाला आहे. संगर वर्षांपूर्वी स्पर्धा ही जवळजवळ निरंकुश असे. वासाहतिक आक्रमणे, लहान मुलांकडून काम करून घेणे, शरीराची काहीली करणारे कारखाने, कामगार पुढाऱ्यांवर हिंसक हल्ले, आपल्याशी स्पर्धा करणारांविरुद्ध कमालीची निर्घृणता इतकेच नव्हे तर दुसऱ्यांच्या व्यक्तिगत स्वातंत्र्यावर गदा आणणे या साऱ्या गोष्टी वावगी विहीत समजल्या जात असत. परंतु पूर्वीच्या संकेतानुसार इतकेच नव्हे तर अनेकदा कायद्यानुसार देखील क्षम्य मानल्या गेलेल्या या गोष्टी आज असंमत मानल्या जातात. लोकमताच्या नैतिक दृष्टीकोनांत आज फरक पडलेला असून स्पर्धेच्या आक्रमक प्रवृत्तीला आळा बसला आहे व ती अधिक सुसंस्कृत बनली आहे.

आज साऱ्या जगांत बहुधा असा एकही देश नसेल की जेथे स्पर्धेची धार पूर्वीइतकीच तीव्र राहिलेली आहे किंवा वैयक्तिक हालअपेष्टा वाढलेल्या आहेत.

जो कामगार ठरवून दिलेल्या प्रमाणापेक्षां अधिक उत्पादन देतो किंवा फाजील काम करतो, तसेच जो मालक किंमतीच्या बाबतीत आक्रमक पवित्रा घेतो तो दोषी आहे, निदानपक्षी रूढ संकेतांचे तो पालन करीत नाही आणि आपल्या सहकाऱ्यांची प्रतारणा केल्याचा व न्याय्य विभागणीच्या तत्त्वांची पायमल्ली केल्याचा ठपका त्याच्यावर ठेवण्यात येतो. आर्थिक व्यवहारांच्या बाबतीतील मार्गदर्शक नियम म्हणून स्पर्धेऐवजी सुरक्षिततेची कल्पनाच मोठ्या प्रमाणावर मान्यता पावली आहे, निदानपक्षी स्पर्धेची तीव्रता पुष्कळच कमी झाली आहे हे तरी कोणालाच नाकारता येणार नाही.

स्पर्धेच्या व्यापक कक्षा रुंदावल्या आहेत हे खरे. परंतु गंमत अशी की डाव्या गटांकडून येणाऱ्या दडपणाचा आणि त्यांच्या हालचालीचाच तो कांही अंशी परिणाम आहे. कारण विकासासाठी उत्तरोत्तर सर्वांना समान संधी मिळू लागल्यामुळेच स्पर्धेला आळा बसू शकला. यामुळे सत्ता वाढीस लागणे अपरिहार्य होऊन बसते आणि जागांबाबत कसली स्पर्धा नसेल तर ते खरोखरी लोकशाहीशीच विसंगत ठरेल आणि सामाजिक अभिसरणाची कसलीही संधी उपलब्ध नसेलल्या, जातिवर्चस्वाची उतरंड असलेल्या किंवा सरंजामशाही समाजासारखी परिस्थिती निर्माण होईल. म्हणून स्पर्धेचा प्रतिवाद सहकार्य हाच असेल असे नाही. कदाचित व्यक्तिगत अधिकार हिरावून घेणे आणि सामाजिक गुठबंदी ही स्पर्धेची जागा घेऊ शकेल. यांतच पुढेमागे उद्‌भवणाऱ्या मूल्यांच्या विचित्र संघर्षाची बीजे साठविलेली आहेत.

स्पर्धेची व्याप्ती, निदानपक्षी भेदनिदर्शक मोबदला प्राप्त व्हावा म्हणून चाललेली एखाद्याची धडपड यात आणखीही एका दृष्टीने भर पडते. एका शतकापूर्वी फक्त खाजगी कारखानदाराच्या उत्पन्नांत त्याने व्यक्तिश: केलेल्या प्रयत्नानुसार किंवा घेतलेल्या परिश्रमानुसार वटघट होत असे. परंतु त्यानंतर मात्र मागच्या प्रकरणांत स्पष्ट केलेल्या उपन्नाला भेदनिदर्शक परिश्रमानुसार भेदनिदर्शक मोबदल्याचे स्वरूप प्राप्त होत आले आहे. अशा तऱ्हेने व्यक्तीव्यक्तींत भेदाभेद करण्याचा हेतू गटागटांच्या एकजुटीच्या ताकदीमुळे काही प्रमाणांत विफल होऊ शकेल. परंतु व्यक्तिनिष्ठ प्रवृत्ती आणि वैयक्तिक लाभ मिळवण्याचे उद्दिष्ट यांची जोपासना करण्यासाठी भेदाभेदाची आवश्यकता उरलेच. तथापि येथेही मूल्यामूल्यात संघर्ष निर्माण होऊ शकेल. कारण आर्थिक विकास साधण्यासाठी किंवा राहणीमान सुधारण्यासाठी वरील प्रकारचा भेदाभेद इष्ट किंवा फायदेशीर ठरू शकतो. त्यामुळे पुन्हा स्पर्धेच्या जागी सहकार्याऐवजी आर्थिक कोंडी निर्माण होणेही शक्य आहे.

अशा तऱ्हेने शंभर वर्षापूर्वी सहकार्याचा आदर्श प्रथम पुढे ठेवण्यात आला त्यापेक्षा आताचे चित्र कितीतरी अधिक अस्पष्ट बनले असल्याचे दिसून येईल. एका बाजूला स्पर्धेवर आधारलेल्या व्यक्तिनिष्ठेच्या अतिरेकीपणाला निश्चितपणे

आळा बसला आहे तर दुसऱ्या बाजूला पूर्वी ज्याचा फारसा विचार झाला नव्हता असे कांही फायदेही स्पर्धेमुळे प्राप्त होऊ शकतात असे आढळून आले आहे. तथापी सहकार्याचे हे ध्येय साध्य करण्याच्या प्रयत्नाचे फलित काय होऊ शकेल त्याचा अधिक खोलवर विचार करावा लागेल. व्यक्तिगत हेतू आणि काम करतांना येणारे संबंध ही दोन क्षेत्रे विचारार्ह ठरतील.

एक: नागरिकांनी स्वतःच्या भौतिक फायद्यासाठी काम न करता समाजाच्या कल्याणासाठी काम केले पाहिजे. कारण एक तर त्यामुळे त्यांना अधिक आत्मिक समाधान लाभू शकेल किंवा ते अधिक चांगल्या प्रकारे व जादा काम करू लागतील; निदान एवढे तरी म्हणता येईल की स्वार्थमूलक प्रवृत्ती बाजूस सारून इतरांसाठी काम करणे नैतिक दृष्ट्या अधिक चांगले मानले जाते.

काही विशिष्ट प्रेरणा असतील तर लोक अधिक कष्ट घेतात आणि त्यात त्यांना आनंदही अधिक वाटतो हे खरे; हे विधान काही अंशी वस्तुस्थितीवर आधारलेले आहे; तर लोकांनी इतरांच्या भानगडीत न पडता काही विशिष्ट हेतू मनात धरून काम करावे हे विधान आदर्शवादी स्वरूपाचे आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी की, पहिल्या विधानाच्या सत्यासत्यतेची प्रचीती आणून देणे केवळ कठीणच नव्हे तर अशक्यप्राय आहे तर दुसऱ्या विधानाच्या बाबतीत कोणतेही निश्चित आणि व्यवहार्य असे धोरण घालून देणे अवघड आहे.

योग्य परिस्थिती असेल तर समान उद्दिष्टांसाठी काम करण्याची प्रेरणा बलवत्तर असू शकते आणि त्या परिस्थितीत कमालीच्या कष्टाचे कामही समाधानपूर्वक करून घेता येते. डंकर्कच्या पाडावानंतर ब्रिटनमधील विमाने तयार करण्याचे कारखाने, स्वतःहून केलेल्या संघटना किंवा धर्मादाय संस्था, भारताच्या ग्रामीण भागातील विकास योजना किंवा इस्त्रायलमधील सहकारी शेतीवर काम करणाऱ्या लोकांना ते समान उद्दिष्टांसाठी झटत असल्याने ध्येयपूर्तीचे समाधान लाभत असल्याचे दिसते व त्यामुळे ते अधिक चांगले काम करतात; त्याचप्रमाणे त्यांच्या तक्रारीही कमी असतात.

परंतु त्याचबरोबर हेही उघड आहे की, जेथे कामाच्या मोबदल्यात व्यक्तिगत परिश्रमानुसार तफावत पडत असते तेथे लोक स्वतःच्या भौतिक लाभासाठी काम चांगले करतात त्याचप्रमाणे अधिक समाधानी वृत्तीनेही करतात. कामगारांना भरपूर लाभांश आणि प्रोत्साहक वेतन देणाऱ्या पुरोगामी आणि कार्यक्षम अशा खाजगी कारखान्यांत याचा पडताळा मिळू शकतो.

यावरून हे स्पष्ट होते की, योग्य परिस्थिती असेल तर दोनही उद्दिष्टांची परिपूर्ती अत्यंत उत्तम प्रकारे होऊ शकते. यापैकी दुसऱ्या म्हणजे समाजहितासाठी काम करण्याच्या उद्दिष्टाबद्दल असे म्हणता येईल की, कार्यक्षम व्यवस्थापन आणि त्याने अंगिकारलेले कामगारविषयक पुरोगामी धोरण अशी परिस्थिती असावी

लागेल. परंतु तातडीच्या अल्प मुदतीपलीकडे सामाजिक उद्दिष्टांसाठी लागणारी परिस्थिती निर्माण करणे मोठे कठीण असते. तुम्ही समाजाच्या भल्यासाठी राबत आहात किंवा तसे राबणे हे तुमचे कर्तव्य आहे असे लोकांना नुसते प्रवचन झोडून भागत नाही तर त्यांना त्याची प्रत्यक्ष प्रचीती यावी लागते. आणि अशी प्रचीती आणून देण्यासारखी संस्थात्मक यंत्रणा उभी करणे सोपे नसते.

राष्ट्रीयीकरणाचा जो अनुभव आला आहे त्यावरून वरील विधानाची प्रचीती येते. रेल्वे किंवा खाणकामगार हे वस्तुतः सार्वजनिक हितासाठी ज्याप्रमाणे काम करीत असतात त्याचप्रमाणे ते स्वतःसाठीही राबत असतात. अत्यंत तातडीच्या अशा सार्वजनिक उपयुक्ततेसाठीच त्यांचे श्रम खर्ची पडत असतात आणि त्यांच्या श्रमातून फायदा उकळणारे भागधारक किंवा खाजगी नफा अशी काही चीजच तेथे नसते. परंतु तरीदेखील मानसिक दृष्टया इतर कोणत्याही धंद्यापेक्षा या धंद्यातील कामगारांची परिस्थिती भिन्न नसते किंवा तेथे अधिक समाधानाचे वातावरण असते असेही म्हणता येणार नाही. वेतनमान किंवा कामावर जाण्याचे अंतर यावर कदाचित हे समाधान अवलंबून असावे. एखाद्या विकास योजनेवर काम करणाऱ्या किंवा आपल्या खेडयासाठी रस्ता तयार करण्याच्या कामात गुंतलेल्या खेडुत कामगाराला त्याच्या श्रमाचे सार्थक झाल्याचे डोळयांनी प्रत्यक्ष दिसत असते. विकास कामात आपण महत्त्वाचा हातभार लावलेला आहे हे तो पहात असतो आणि आपल्या परिश्रमामुळे आपल्या समाजाला त्याचा लाभ मिळतो आहे याची त्याला प्रचीती येत असते. परंतु खाणकामगाराला आपल्या सर्वंकष श्रमाची अशी अनुभूती मिळू शकत नाही. होबर्ट हाऊसमधून वेळोवेळी प्रसिद्ध होणाऱ्या उत्पादनाच्या आकडेवारी व्यतिरिक्त आपल्या श्रमाचे प्रत्यक्ष असे कोणतेच प्रमाण त्याच्या पदरात पडत नाही. त्यामुळे उत्पादनाच्या या सगळया प्रक्रियेत आपला वाटा अगदीच अत्यल्प आहे अशी त्याची समजूत होते. त्याचप्रमाणे आपल्या श्रमातून निर्माण होणाऱ्या नफ्याचे वितरण कसे होते याबद्दलही त्याला फारशी माहिती नसते. त्यामुळे असे म्हणता येईल की, आपले श्रम अपरिहार्य आहेत अशी भावना त्याच्या मनात येणार नाही. कारण ते काम फार मोठया प्रमाणावरील असेल आणि अंतरही फार दूरचे असेल.

परंतु याची एक दुसरीही बाजू असू शकते हे सर्वांनाच माहीत आहे. ती बाजू अशी की, सर्वसामान्य खाण किंवा रेल्वे कामगाराला त्याच्या स्वतःच्या कामाचे महत्त्व किती आहे आणि आपण कोणती जबाबदारी उचलीत आहोत याची बरोबर जाणीव असते. उदा. आगगाडी चालविणारे कामगार. त्यांना याची जाणीव असावी हे उघडच आहे. खाणकामगारांना निदान खाणीच्या तोंडाशी काम करणारांना तेथील मोजमाप करण्याच्या यंत्रणेमुळे ही जाणीव आलेली असते. तथापि ही जाणीव आणि तिच्यातून निर्माण होणारी सामाजिक प्रेरणा, स्थानिक

गटाबद्दलची ऐक्यभावना, वेतन किंवा कामाची परिस्थिती यासंबंधीचा असंतोष, स्थानिक व्यवस्थापकाबद्दलची अप्रीती ( रेल्वेच्या बाबतीत ), राष्ट्रीयीकरणाचे स्वरूप किंवा ट्रान्सपोर्ट कमिशनचा कारभार याविषयीची नाराजी इत्यादी अन्य प्रेरणा किंवा भावना यामुळे निष्प्रभ ठरू शकते.

यावरून व्यवहार्यत: इतकेच म्हणता येईल की (अ) लोक स्वत:च्या (किंवा कुटुंबाच्या) फायद्यासाठी सपाटून आणि समाधानी वृत्तीने काम करतात. † (ब) समान हितासाठीं राबणारे लोकही कामचुकारपणा करू शकतात व असमाधानीही असतात. (क) अर्थात सामाजिक आणि व्यक्तिगत अशी दोन्ही उद्दिष्टे ज्यावेळी त्यांच्या कामाच्या पाठीमागे असतात त्यावेळीं ते सर्वात चांगले काम करतात हे नि:संशय; परंतु (ड) नैतिक भूमिकेवरून स्वार्थमूलक प्रेरणेचे रूपांतर समाज-हिताच्या प्रेरणेत घडून यावे अशी अपेक्षा असेल तर ते साध्य होणे मात्र अत्यंत कठीण आहे. कारण त्यासाठीं मूलभूत सामाजिक प्रवृत्तीतच स्थित्यंतर घडून आले पाहिजे किंवा अगदी अभिनव अशी संस्थात्मक यंत्रणा तरी निर्माण झाली पाहिजे. सोव्हियट सत्ताधारी फार पूर्वीच या निष्कर्षाप्रत आले आणि त्यांनी या दिशेने प्रयत्न करावयाचे सोडून देऊन जुन्याच 'भांडवलशाही प्रेरणा' स्टॅखेनॉव्हिस्ट या नावाखाली परंतु अत्यंत निर्घृणपणे आणि आत्यंतिक स्वरूपात प्रचलित केल्या.

अशा तऱ्हेचे परिवर्तन घडवून आणण्याच्या कामी यापैकी कोणताच मार्ग उपयुक्त ठरणार नाही असे कोणीच म्हणू शकणार नाही; ते असंभाव्य आहे असे फार तर म्हणता येईल. सिद्धांत म्हणून, स्वार्थमूलक आणि व्यापक स्वरूपाच्या प्रेरणा यांतील संतुलनांत बदल घडवून आणून सामाजिक प्रकृतीत स्थित्यंतर घडवून आणण्याची शक्यताच कोणाला नाकारता येईल असे मला वाटत नाही. सामाजिक मानवशास्त्र आणि समूह मानवशास्त्र असे सांगते की माणसाच्या मनातील प्रवृत्ती आणि त्याचे वर्तन हे अपरिवर्तनीय किंवा कधीही न बदलणारे नसते. किंवा ते जीवशास्त्रा-नुसारही होत नसते तर काही एका (अज्ञात) मर्यादेपर्यंत ते त्यांच्या संस्कृतीवर अवलंबून असते. अर्थात ते नेमके कशावर अवलंबून असते त्याविषयीचे आपले

---

† वस्तुत: आज कामगाराच्या दृष्टीने भौतिक प्रेरणा या कमालीच्या बलवत्तर असतात. मूल्यमापन आणि टिकावू क्रयवस्तूवरील मालकीमुळे विनिमयाच्या एका अगदी नव्याच क्षेत्रांत प्रवेश मिळविण्याची त्यांना मनोमन अपेक्षा असते. आणि या वस्तू हप्तेबंदीने घेण्याचा प्रकार फार मोठ्या प्रमाणावर सध्या रूढ झालेला असल्यामुळे त्यांना प्रत्यक्षांत तशी शक्यताही निर्माण झालेली आहे. कामगारांतील या प्रेरणा इतक्या जोरदार असतात की कामगार संघटनांच्या पुढाऱ्यांना कामाचे जादा तास असू नयेत असे वाटत असले तरी 'ओव्हर टाईम' सोडून देण्याला ते कामगारांना प्रवृत्त करू शकत नाहीत.

ज्ञान अत्यल्प असल्याने व्यवहार्य धोरण म्हणून त्यासंबंधी कांही बोलणे विशेष उपयुक्त ठरणार नाही.

त्याचप्रमाणे आज विद्यमान असलेल्या संस्थात्मक चौकटीत सामाजिक उद्दिष्टांना अधिक वाव मिळेल अशा तऱ्हेचा बदल घडवून आणणे फारसे सोपे आहे असे नाही. यादृष्टीने सामाजिक मालकी पुरी पडत नाही हे तर उघडच आहे. अगदी खालच्या पातळीपर्यंत आर्थिक व्यवहाराचे हस्तांतर किंवा विभागणी करणेही आपल्याला भाग पडेल. अर्थात हे कधीच घडून येणार नाही. उद्योग-प्रधान प्रगत अर्थव्यवहारांत ते शक्यही होणार नाही. त्यामुळे राहणीमान कमालीचे घसरण्यांत त्याची परिणती होईल इतकेच नव्हे तर इतिहासाला उलटी गती दिल्यासारखे किंवा त्यामागील सामाजिक आणि तांत्रिक प्रवृत्तीचा ओघ मागे फिरवण्यासारखेच ते होईल. परंतु ते कसे शक्य आहे? विद्यमान चौकटीत कांही प्रमाणांत आर्थिक व्यवहार दुसऱ्याकडे सोपवणे शक्य आहे हे खरे; आणि पुरोगामी व्यवस्थापक सामूहिक हालचालीकडे अधिक लक्ष पुरवून आणि सामाजिक वृत्तीची जोपासना करून इच्छित प्रेरणांना उत्तेजन देण्याच्या दृष्टीने हळूहळू काही पावले उचलतीलही. तथापी व्यक्तिगत उद्दिष्ट स्थानिक किंवा तात्पुरत्या स्वरूपाचे न राहता सर्वसाधारण आणि सखोल बनावे यासाठी मजूर सरकारला विशिष्ट राष्ट्रीय धोरण अंगीकारता येईल असे मला वाटत नाही.

काम करतांना निर्माण होणारे संबंध हे दुसरे असे क्षेत्र आहे की जेथे सहकारी आदर्शाचा संबंध पोहोचतो (अर्थात हे क्षेत्रही पहिल्या क्षेत्राशी निगडित असेच आहे). सुरुवातीच्या काळांतील समाजवाद्यांची धारणा अशी होती की, कामगारांनी स्वतंत्र किंवा वेगळचावेगळचा व्यक्ती म्हणून काम न करता बंधुभावनेच्या सहकारी उद्दिष्टाने प्रेरित होऊन सामूहिक आणि सहकारी पद्धतीने काम करावे. स्वतःच स्वतःचे नियंत्रण करू शकणारे गिल्डस प्रस्थापित होणे आजच्या काळात शक्य नसल्यामुळे सहविचाराने किंवा समरस होऊन काम करावे म्हणजेच मोठ्या औद्योगिक प्रकल्पांच्या (मग ते प्रकल्प खाजगी क्षेत्रातील असोत वा सार्वजनिक क्षेत्रातील असोत) हेतूपूर्तीसाठी झटणाऱ्या छोट्या गटाशी समरस होऊन त्यांच्या सहकार्याने काम केले पाहिजे असा समाजवाद्यांच्या मूळ कल्पनेचा अर्थ घेतला पाहिजे.

परंतु आता आपण असे पाहतो की व्यक्तिगत आणि सामुदायिक अंतःप्रेरणा यामध्ये संघर्ष उद्भवला तर तो कसा सोडवायचा किंवा लोकांना गट बनवायला प्रवृत्त करावयास आणि गटाचे मानदंड स्वीकारावयास कसे उद्युक्त करावयाचे ही सुरुवातीच्या समाजवाद्यांना भेडसावणारी अडचण आज फारशी राहिलेली नाही. कळप करून राहण्याची माणसाची मनःप्रवृत्ती इतकी प्रभावी असते की इतर कोणत्याही क्षेत्रांत देखील आपोआपच गट बनतात; थोड्याच अवधीत त्यांचे पुढारी निर्माण होतात आणि त्या त्या गटाच्या वर्तणुकीचे कांही मानदंडही निश्चित होतात.

परंतु नैसर्गिक रित्या आपणहून पडलेल्या अशा गटांच्या मार्फत सहकारी आदर्शाची अभिव्यक्ती होऊ शकेलच असे नाही ही खरी अडचण आहे. अशा गटांत भिन्न मताबद्दलची असहिष्णुता, कमालीचा ठोकळेबाजपणा, विरोधकांना परास्त करण्यासाठी ( किंवा आधुनिक भाषेत बोलावयाचे तर त्यांची कॉन्न्हेट्रीत रवानगी करण्यासाठी ) हाती असलेल्या अंतीम सत्तेचा मनमानेल तसा निर्घृणपणे उपयोग करणे यासारख्या कमालीच्या अवांच्छनीय प्रवृत्ती वाढत जाण्याचा संभव असतो; परंतु तशा प्रवृत्ती एकवेळ निर्माण झाल्या नाहीत असे धरले तरी देखील त्या गटा-बाहेरील संस्था किंवा उद्दिष्टे यांच्या बाबतीतील त्यांचे वर्तन सहकार्याचे किंवा बंधुभावाचे अजिबात नसते. उलट त्यांची उद्दिष्टे आणि वर्तन सर्वस्वी स्वार्थी असण्याचा संभव असतो आणि ज्या कारखान्यात किंवा उद्योगात तो गट काम करीत असेल त्याच्याशी समरस होण्याच्या किंवा सहकार्य करण्याच्या प्रवृत्तीचा संपूर्ण अभावच असतो. म्हणून औद्योगिक संशोधनाने दाखवून दिल्याप्रमाणे अशा गटामुळे उत्पादनात वाढ होण्याऐवजी त्याला अटकाव होणे, व्यवस्थापनाबरोबरच्या संबंधात सुधारणा होण्याऐवजी ते बिघडत जाणे, सुसंवाद किंवा सामंजस्य निर्माण होण्याऐवजी असंतोषाची आणि संतापाची भावना पसरत जाण्याचा संभव असतो.

म्हणून आपल्याला अभिप्रेत असलेले सामूहिक आणि सहकारी वातावरण निर्माण होईल आणि नैसर्गिकरित्या पडणाऱ्या गटात ते ज्या व्यापक संघटनेचे घटक असतील तिच्याशी एकरूप होतील अशा तऱ्हेने माणसाच्या मनांतील गट प्रवृत्तीला वळण कसे लावावयाचे हाच खरा प्रश्न आहे. दुर्दैवाने हे साध्य कसे करावयाचे त्याची अद्याप कोणाला फारशी कल्पना आलेली नाही. रेल्वे किंवा खाणी यांच्याबाबतीत आढळून आल्याप्रमाणे केवळ राष्ट्रीयीकरण केल्याने किंवा संयुक्त समित्या स्थापन केल्याने हे साध्य होऊ शकणार नाही. कारण संयुक्त सल्लागार समित्या स्थापन झाल्या तरी त्या अगदी तळच्या खऱ्याखुऱ्या गटांच्या उद्दिष्टांशी सर्वस्वी विसंगत आणि ज्यांना कसलीही पाळेमुळे नाहीत अशा वरिष्ठ पातळीवरील केवळ औपचारिक समित्यांचे स्वरूप त्यांना प्राप्त होते.

आपण एखाद्या उद्योगाची पहाणी केली तर आपणास इतके विविध प्रकारचे अनुभव येतात की त्यामुळे निश्चित असे कोणतेही निष्कर्ष काढणे अत्यंत कठीण होऊन बसते. कांही कारखाने असे आढळतात की जेथील कामगार समाधानी आणि एकनिष्ठ असतात. परंतु त्यांना औपचारिकरित्या कोठल्याही प्रकारची "सहभागी" मिळालेली नसते. दुसरे कांही कारखाने असे असतात की ज्यांत संयुक्त सल्लागार समित्यांच्या मोठमोठ्या योजना असतात पण त्यांतील कामगार-वर्ग मात्र दुर्मुखलेला आणि असमाधानी असतो. परंतु त्याचबरोबर असेही कांही कारखाने आढळतात की जेथे संयुक्त समित्यांच्या अस्तित्वावर तेथील कामगारांबरोबरचे सलोख्याचे संबंध अवलंबून असतात. यावरून आपण इतकेच म्हणू

शकतो की केवळ संस्थात्मक बदल केल्यामुळे परिस्थिती बदलत नाही. काम-
गारांना व्यवस्थापनेत सहभागी करून घेतल्यामुळे सहकार्याचे वातावरण निर्माण
होणे न होणे हे सामाजिक शक्तीवर अवलंबून असते. परंतु या सामाजिक शक्तीच्या
नेमक्या स्वरूपाबाबत औद्योगिक मानसशास्त्रज्ञांत एकमत आढळत नाही–निदान
सुस्पष्ट राष्ट्रीय धोरण आखण्या इतके तरी मतैक्य त्यांच्यात दिसून येत नाही.

अर्थात याचा अर्थ असा नव्हे की, उद्योगांतील संबंधात बदल घडवून आण-
ण्याच्या किंवा कामगाराला अधिक सत्ता देण्याच्या विचारात कसलेच तथ्य नाही.
त्यात तथ्य जरूर आहे. परंतु बंधुभाव किंवा सामाजिक समाधान या मुद्यावर
त्याची उभारणी होऊ शकत नाही (कारण आपल्या प्रस्तुत ज्ञानावरून ते समर्थनीय
ठरत नाही) तर सामाजिक न्याय, कामगारांचे हक्क आणि समानता यासंबंधीच्या
प्रतिपादनावर ते समर्थनीय ठरू शकते.

सारांश एका शतकापूर्वी असलेली व्यक्तिनिष्ठ आणि स्पर्धात्मक आकांक्षांची
आक्रमकता बऱ्याच प्रमाणात कमी झालेल्या आजच्या समाजात निदान काही प्रमाणात
तरी सहकारी आकांक्षा फलद्रुप झालेली आहे. आणि मनमिळाऊपणाची प्रवृत्ती आता
इतकी वाढली आहे की साहचर्य लाभण्याऐवजी एकांत गमावून बसण्याची वेळ येण्याचाच
संभव अधिक. उलटपक्षी आपण सहकाराच्या स्वप्ननगरीतही वावरत नाही. बहुतेक
लोक अद्यापही सामाजिक हितापेक्षा वैयक्तिक फायद्यासाठीच काम करीत असतात.
आणि उद्योगधंद्यातील सामूहिक सहकारी सहभागाचे ध्येय साकार होण्याची
सुरुवातही झालेली नाही.

विशेषेकरून शिक्षणासारखी स्पर्धेच्या बाबतीत कमीअधिक निवड करण्या-
सारखी एक दोन क्षेत्रे आहेत–ज्यांचा विचार स्वतंत्रपणे पुढील प्रकरणात केला
आहे. सामूहिक हालचालींबाबतही अशीच निःसंदिग्ध निवड करावी लागणारी
काही क्षेत्रे आहेत. उदा. घरबांधणी आणि नगरविकास. तसेच औद्योगिक क्षेत्रातील
व्यवस्थापन जसजसे प्रगत आणि पुरोगामी बनत जाईल तसतशी सहकाराची
भावना वाढीस लागेल आणि दहाव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे हळूहळू
वाढत जाणाऱ्या समानतेबरोबर स्पर्धेची तीव्रताही आणखी कमी कमी होत जाईल.
परंतु आपल्या ज्ञानाची सध्याची कक्षा लक्षात घेता यापेक्षा अधिक मजल मात्र
आपल्याला मारता येण्यासारखी नाही. व्यक्तिगत स्वार्थ साधण्याची प्रवृत्ती संपूर्ण-
पणे दडपून टाकता आली किंवा व्यक्तिगत संबंधांचा बळी देऊन सामुदायिक
संबंधांना प्रभुत्व देता आले तर व्यक्तिगत समाधानीपणावर किंवा कामासंबंधीच्या
दृष्टिकोणावर किंवा आपल्या आजच्या दर्ज्यावर त्याचे काय परिणाम घडून येतील
ते आपल्याला निश्चितपणाने सांगता येणार नाहीत. त्याचप्रमाणे अशा तऱ्हेचे बदल
घडून येऊ शकतील अशी संस्थात्मक यंत्रणा आपल्या दृष्टीच्या टप्प्यातदेखील
आलेली नाही. आणि असे बदल घडवून आणणे व्यवहार्य आहे असे मानले तरी

त्यामुळे एकांतपणा, व्यक्तिमत्व, व्यक्तिगत स्वातंत्र्य, समान संधी किंवा राहणीचे मान यासारख्या बाबतीत गंभीर स्वरूपाचे नुकसान तर सोसावे लागणार नाही ना याविषयीही आपल्याला ठामपणे कसली हमी देता येत नाही.

म्हणून, शाब्दिक काटेकोरपणाच्या दृष्टीने सहकाराचा आदर्श समाजवाद या शब्दांत निश्चितपणे अंतर्भूत होतो हे मला मान्य असले आणि समान सामाजिक उद्दिष्टांबद्दल जनतेत सर्वसाधारणपणे अधिक जागरुकता असती तर एका अर्थाने ते अधिक चांगले झाले असते हेही मी मान्य करीत असलो तरी समाजवादाच्या उद्दिष्टांसंबंधी कोणाचीही खात्री पटेल इतपत निश्चिती आणि व्यवहार्य असे निवेदन करावयाचे झाले तर त्यात (समाजवादी) ध्येयाचा भाग म्हणून याचा अंतर्भाव करणे मला शक्य होणार नाही. अर्थात ज्यांची मते अधिक सुस्पष्ट असतील त्यांनी माझ्या या विचारसरणीत काही चूक दाखविली तर ती सुधारावयाला मी तयार आहे.

## ५. समाजकल्याण आणि समानता याविषयींच्या आकांक्षा

उरलेल्या दोन आकांक्षा—समाज कल्याणाविषयीची आस्था आणि समानता असलेला वर्गविहीन समाज निर्माण व्हावा ही इच्छा या आपल्या चर्चेच्या संदर्भात निश्चितच प्रस्तुत ठरतात. त्यांपैकी पहिलीत सामुदायिक जबाबदारी मान्य करणे, व्यक्तिवादी तत्त्वज्ञानावर आधारलेल्या "अनिर्बंध" अर्थव्यवस्थेच्या मानाने सामाजिक आपत्ती आणि दुर्भाग्य यांना सर्वोच्च अग्रक्रम देणे अभिप्रेत असते. परंपरागत समाजकल्याण, कामगार चळवळीतील सामाजिक सेवांविषयक तत्त्व-प्रणाली आणि गरजू व जे पुरेसे भाग्यवान नसतील त्यांचा आपोआप कैवार घेण्याची मनःप्रवृत्ती यांचा हा विद्यमान आविष्कार होय.

ब्रिटनमध्ये अद्याप कितीतरी सामाजिक दुःखे साचून राहिलेली आहेत. अद्यापही तेथे प्राथमिक स्वरूपाच्या दारिद्र्यामुळे निर्माण होणारी काही दुःखे शिल्लक असली तरी बऱ्याच प्रमाणात ती कमी झाली असून नैसर्गिक आपत्ती, शारी-रिक किंवा मानसिक विकृती, कुटुंबाच्या आकारात होत असलेली घट, उत्पन्नात अचानक होणारी घटघट आणि सामाजिक भांडवलाची कमतरता यांसारखी, दुय्यम स्वरूपाच्या दारिद्र्यामुळे उद्‌भवणारी दुःखे मात्र टिकून आहेत. व्यक्तिगत खर्चाची पातळी खूप वरची असणाऱ्यांनाही भोगावी लागणारी दुःखे ही भयानक आहेत—घाणेरडी शहरे, अरुंद रस्ते, झोपडपट्ट्या, शाळेतील मुलांची गर्दी, अपुरी रुग्णालये, वेड्यांच्या इस्पितळातील अपुरा नोकरवर्ग, वृद्धाश्रमांची कमतरता, सामाजिक सुविधांच्या बाबतीत एकंदरीनेच अपुरेपणा परंतु कित्येकदा तर त्याचे भयानक आणि किळसवाणे होणारे दर्शन.

ही दुःखे कमी करणे आणि त्यांतील किळसवाण्या बाबींचा नायनाट करणे हे सामाजिक बाबींवर होणाऱ्या खर्चाचे उद्दिष्ट असले पाहिजे आणि उपलब्ध साधनां-

वरील इतर कोणत्याही मागणीपेक्षा या गोष्टीला निरपवाद अग्रक्रम देणारा म्हणूनच समाजवादी ओळखला जातो. उत्पन्नात वरपासून खालपर्यंत एकंदर समानता निर्माण करण्याचाच केवळ हा प्रश्न नाही. त्यामागील युक्तिवाद हा केवळ समतावादी नसून मानवतावादी आणि करुणेवर आधारलेला आहे. राष्ट्रीय उत्पादनाच्या वितरणाचा अग्रक्रम ठरविण्याचा आणि जे गरीब, दुर्दैवी, 'नाहीरे' आणि सर्वसाधारणपणे गरजू असतील त्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशा विश्वासाचा हा प्रश्न आहे. यावरूनच सामुदायिक सामाजिक जबाबदारी आणि त्याबरोबरच शासनाची जबाबदारी आणि कर आकारणी यासंबंधीचा विशिष्ट दृष्टीकोण बनतो. समाजवादी आणि हुजूरपक्षीय यांतील सर्वांत प्रमुख मतभेद यातूनच व्यक्त होतात.

सामाजिक समता आणि 'वर्गविहीन समाज' हे दुसरे सुस्पष्ट असे समाजवादी ध्येय. सामाजिक असंतोष शक्य तितका कमी करण्याच्या, व्यक्तीव्यक्तींत न्याय प्रस्थापित करण्याच्या आणि संधीच्या बाबतीत समानता निर्माण करण्याच्या हेतूने मानधन, प्रतिष्ठा आणि विशेषाधिकार यांचे समानतेच्या तत्त्वावर वितरण झाले पाहिजे असे समाजवादी मानतो. आणि सध्याची दृढमूल असलेली वर्गीय चौकट आणि त्या अनुषंगाने येणारी मत्सराची आणि न्यूनगंडाची भावना व वर्गावर्गांचे मीलन घडून येणाच्या कामी येणारे अडथळे दूर करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. सामाजिक समतेवरील हा विश्वास—आणि जवळजवळ सर्व समाजवादी पंथाचे प्रमुख नैतिक स्फूर्तिस्थान हेच आहे—विद्यमान काळातील समाजवादी विचारांचे प्रमुख वैशिष्टय म्हणून आजही टिकून राहिले आहे.

या आकांक्षा आता प्राधान्येकरून आर्थिक स्वरूपाच्या राहिलेल्या नाहीत हे लक्षात ठेवले पाहिजे. आधुनिक समाजातील अकार्यक्षमता आणि अत्यंत गैर आर्थिक व्यवहार हे आता सुधारण्यात आले आहेत, आणि आधुनिक समाजवादाच्या फार मोठ्या कालखंडात ज्याप्रमाणे याबाबतीत सुधारणा घडवून आणण्याची आवश्यकता भासत होती तशी ती आता भासत नाही. अर्थात हे खरे की, ब्रिटनला अद्यापही अत्यंत गंभीर अशा आर्थिक समस्येला तोंड द्यावे लागत आहे आणि ती समस्या म्हणजे परदेशातील आर्थिक देणेदारपणा. परंतु हुजूर आणि मजूर या दोनही पक्षांपुढे ती आहे, आणि समाजवादी धोरणापुरतेच बोलावयाचे तर केवळ याच आघाडीवर मुकाबला द्यावा लागणार आहे असे नव्हे.

ब्रिटनपेक्षा देखील ब्रिटनचे बाह्य जगाशी जे संबंध आहेत त्यांच्या बाबतीत हे आदर्श अधिक महत्त्वाचे आहेत. ब्रिटनच्या बाबतीत ते तितकेसे लागू पडत नाहीत हेदेखील उघड आहे. मागासलेल्या देशातच खरे दारिद्र्य असते, आणि इंग्लंडमधील श्रीमंत आणि गरीब यांच्यामधील विषमतेपेक्षा ही मागासलेली राष्ट्रे आणि ब्रिटन यामधील विषमता अधिक तीव्र आहे. आणि म्हणूनच आपल्या स्वतःच्या देशातील (ब्रिटनमधील) समाजाची रचना बदलण्यापेक्षाही पुढारलेल्या आणि

मागासलेल्या राष्ट्रांतील संपत्ती आणि विशेषाधिकार यामधील समतोल बदलण्यावरच समाजवादी ध्येयाची सुस्पष्ट परिपूर्ती अवलंबून आहे. परंतु त्यासंबंधीचा उहापोह मी करीत नाही कारण प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे हे पुस्तक ब्रिटनच्या अंतर्गत परिस्थितीपुरतेच मर्यादित आहे; आणि ब्रिटनमध्ये देखील अद्यापही ध्येये पूर्णांशाने साध्य झालेली नाहीत. परंतु समाजवाद्यांनी हे सदैव लक्षात ठेवले पाहिजे की, वर्गा-वर्गापेक्षाही राष्ट्रांराष्ट्रांतील अन्याय आणि विषमता आजकाल अधिक तीव्र भासते.

## ६. ब्रिटनमध्ये समाजवाद अद्यापही प्रस्तुत आहे काय ?

आतापर्यंत आदर्श नुसते सांगून झाले. त्याचे तपशीलवार समर्थन केले गेले नाही. त्याचप्रमाणे त्यांची यापुढे अधिक प्रमाणांत अंमलबजावणी झाली तर त्यामुळे आपला समाज निश्चितपणे सुधारेल असे सिद्ध करणारा कोठलाही पुरावा सादर करण्यात आलेला नाही. आतापर्यंत येवढेच प्रतिपादन करण्यात आले आहे की, समाजवाद या शब्दाचा वाजवी अर्थ घेतला तर समाजवादात हे आदर्श अनुस्यूत असतात आणि बहुसंख्य लोकांनी आपल्या आजच्या समाजाला समाजवादी म्हणून संबोधावे इतक्या प्रमाणावर ते आपल्या समाजात अंतर्भूत झालेले नाहीत.

काही थोडे लोक अगदी स्पष्टपणे नाही तरी दूरान्वयाने समाजवादी म्हणून आपल्या समाजाचा उल्लेख करतील हे खरे. म्हणजेच ते असे मानतात की आपण अंतिम ध्येय गाठले आहे, निदान ते आपल्या दृष्टीच्या टप्प्यात तरी आले आहे. जे आदर्श बऱ्याच प्रमाणावर गाठले गेले आहेत असे काही मामुली आदर्श निवडून ते आदर्श म्हणजेच समाजवाद अशी समजूत करून घेतली तरच वरील विचारसरणी मान्य करता येईल. म्हणून 'दारिद्र्य आणि गुलामगिरी' या दोन मुख्य शत्रूंबरो-बर समाजवाद्यांना लढा द्यावयाचा आहे' या जी. डी. एच्. कोल यांनी युद्धापूर्वी केलेल्या विधानाचा पुनरुच्चार करावयाचा झाला तर ब्रिटनमध्ये समाजवाद आता जवळजवळ प्रस्थापित झालाच आहे असे आपल्याला म्हणावे लागेल कारण ब्रिटन-मधून दारिद्र्य किंवा गुलामगिरी जवळजवळ नष्टच झाली आहे.

अशा तऱ्हेच्या अनेक व्याख्या दाखवून देता येतील. त्यापैकी १९५१ साली पुनरुज्जीवित झालेल्या दुसऱ्या सोशॅलिस्ट इंटरनॅशनलच्या फ्रँकफूर्ट जाहीर-नाम्यात आलेली व्याख्या विशेष लक्षात राहण्यासारखी आहे. त्यात (जवळजवळ अर्थशून्य ठरणाऱ्या संदिग्ध प्रास्ताविकानंतर) सर्व भर लोकशाही नियोजनावर देण्यात आला असून समाजवादाच्या दृष्टीने ती मूलभूत गरजेची बाब मानण्यात आली आहे. 'संपूर्ण रोजगार, उत्पादन वाढ, वाढते राहणीमान, सामाजिक सुर-क्षितता आणि उत्पन्न व मालमत्ता यांचे न्याय्य वाटप' ही नियोजनाची उद्दिष्टे सांगितली आहेत. परंतु ही उद्दिष्टे (निदान त्यातील 'मालमत्ता' हा शब्द वगळता उरलेली सर्व) हे एक तर समाजवाद्यांचे खास वैशिष्ट्य नव्हे किंवा ब्रिटन आणि स्कँडेनेव्हियात ती बहुतांशी साध्य तरी झालेली आहेत.

आता हे खरे की, मजूर सरकारच्या पहिल्या यशस्वी कारकीर्दीमुळे अस्तित्वात आलेले योजनाबद्ध व संपूर्ण रोजगार उपलब्ध असलेले कल्याणकारी राज्य म्हणजे ऐतिहासिक प्रमाणाच्या संदर्भात आणि युद्धपूर्व भांडवलशाहीच्या तुलनेने बोलावयाचे तर कमालीची गुणवत्ता असलेला समाज होय. समाजवादी विचारांचे बीजारोपण करणाऱ्या सुरुवातीच्या समाजवाद्यांना हा समाज नंदनवनासारखाच वाटला असता. दारिद्र्य आणि असुरक्षितता नष्ट होण्याच्या मार्गाला लागली आहे, राहणीमानात झपाट्याने वाढ होत आहे, बेकारीची भीतीही हळूहळू कमी होत चालली आहे, आणि मागील पिढीतील कामगाराच्या डोक्यातही कधी आले नसते असे भावी काळाविषयीचे आशादायी विचार आजचा सामान्य तरुण कामगार करू लागला आहे. सामाजिक अन्याय खूपच कमी झाला आहे. अर्थव्यवस्था कार्यक्षम बनली आहे आणि गेल्या निवडणुकीच्या वेळी मजूर पक्षाच्या दृष्टोत्पत्तीस आल्याप्रमाणे मतदार आता व्यापक प्रमाणावरील बदलाला अनुकूल नाही. विद्यमान व्यवस्थेचे समूळ उच्चाटन करावयाला तर तो तयार नाहीच नाही. दारिद्र्य आणि बेकारी यांचा मानवतावादी दृष्टीकोनातून निषेध करावयाचा म्हणून जे उदारमतवादी विचारवंत विसाव्या शतकाच्या चौथ्या दशकात स्वभावतःच स्वतःला समाजवादी म्हणवून घेत ते आता अशा निर्णयाप्रत आले आहेत की, 'केन्स अधिक नवीन स्वरूपातील भांडवलशाही अधिक कल्याणकारी राज्य' हे बरोबर चालू शकते, आणि (टोरी पक्षच ही भूमिका वळकावून बसला नाही तर) मजूर पक्षाने मुख्यतः सध्याची परिस्थिती टिकवून धरणारा पक्ष अशी भूमिका घेतली आणि स्थानिक चळवळीला थोडा हुरूप यावा म्हणून मधून मधून किरकोळ सुधारणांच्या मधाचे बोट लावले तरी तेवढ्यावर ते संतुष्ट राहतील.

परंतु हा समाजवाद नव्हे. त्याचप्रमाणे ही निव्वळ भांडवलशाहीही नव्हे हे खरे. आणि पारंपारिक समाजवादी आकांक्षापैकी कांही भाग त्यामुळे पुरा झालेला आहे आणि तेवढ्यापुरतीच ती समाजवादी लक्षणे आहेत. सोव्हियट समाजांत शंभर टक्के सार्वजनिक मालकी प्रस्थापित झाली आहे आणि संपूर्ण सरकारी नियोजन आहे तर ब्रिटनमध्ये सार्वजनिक मालकी २५% च असून नियोजन अगदी बारीक सारीक तपशीलापर्यंत पोहोचलेले नाही. त्यामुळे ब्रिटनपेक्षा सोव्हियट समाज कितीतरी पटीने अधिक समाजवादी आहे असे लोकांना कांही वेळा वाटते म्हणून जरी नाही तरी पारंपारिक समाजवादी आदर्श आजच्यापेक्षा अधिक प्रमाणात साध्य करणे शक्य असल्याने ब्रिटनमधील समाज याहून बऱ्याच अधिक प्रमाणात समाजवादी बनू शकेल. हेच अधिक सोप्या भाषेत सांगावयाचे तर समाजवादाच्या रोखाने आपण बरेच महत्त्वाचे टप्पे गाठले असले तरी यापेक्षा अधिक सामाजिक समता व अधिक वर्गविहीन समाज निर्माण करणे आणि टाळता येण्यासारखी सामाजिक दुःखे कमी करणे शक्य असल्याने अद्यापही समाजवादी राष्ट्र म्हणून ब्रिटनचे वर्णन करता येणार नाही.

ऊर्वरित आकांक्षाची परिपूर्ती कशी करता येईल, म्हणजेच समाजवादाच्या रोखाने यापुढील वाटचाल कशी करता येईल त्याची तपशीलवार चर्चा तिसऱ्या व चौथ्या भागांत केली आहे. त्या भागात दोन आकांक्षांचा स्वतंत्रपणे विचार केला असून पाचव्या भागांत त्यांच्या आर्थिक परिणामांची चर्चा केली आहे.

परंतु समाजवादाच्या रोखाने वाटचाल करण्याच्या आणि समृद्ध आणि सर्वसाधारणपणे सुसह्य म्हणून मान्यता पावलेल्या समाजांत बदल करण्याच्या आवश्यकतेचे समर्थन करीत न बसतां त्याची कारणे फक्त याठिकाणी थोक्डयांत देता येतील. आपल्या सुरुवातीच्या कालखंडाच्या संदर्भात लॉर्ड ॲटली यांनी अलिकडेच असे उदगार काढले आहेत की, "आपल्या समाजाचे जे स्वरूप होते ते न आवडल्यामुळे आणि त्यापेक्षां कांहीतरी चांगले असावे असे वाटत असल्याने मी समाजवादी आंदोलनात सामील झालो." तेच विधान आज एखाद्याला करता येणार नाही काय ?

माझ्या समजुतीने याची तीन कारणे संभवतात. त्यापैकी पहिले कारण असे की, भौतिक दर्जा आणि वरवर दिसणारी संतुष्टता यांत कितीही वाढ होत असली तरी वर उल्लेखिलेल्या टाळता येण्यासारख्या सामाजिक विपत्ती आणि शारीरिक ओंगळपणाची क्षेत्रे अद्यापही शिल्लक असल्याने बहुसंख्य लोकांच्या निवड करण्याच्या स्वातंत्र्यावर आणि हालचालींवर मर्यादा पडतात. दुसरे असे की ( ही बहुधा अधिक अनिवार्य असावीत ) इतर कांही देशांच्या मानाने आपल्या देशांत राजकीय आणि औद्योगिक अशा दोन्ही क्षेत्रांत अस्वस्थ करुन टाकण्याइतके सामाजिक हितविरोध आणि वर्गसंघर्ष असून त्यामुळे समाजात जेवढी शांतता आणि संतुष्टता नांदणे शक्य होते त्यापेक्षा ती कमी नांदत आहे. तिसरे कारण म्हणजे, मोबदला आणि विशेषाधिकार यांच्या वाटपात अद्यापही फार मोठी विषमता आढळते. कारण गुणवत्ता, सदाचरण, योग्यता किंवा बुद्धिमत्ता यांच्याशी त्याची नीट सांगड घातली जात नाही आणि विशेषतः सर्वोच्च मोबदला मिळण्याच्या संधीच्याबाबत तर अद्यापही कमालीची विषमता आहे.

विपत्ती, असंतोष आणि अन्याय यांच्या या महत्त्वपूर्ण गळाठ्यामुळे सामाजिक परिवर्तनाचा पुढील टप्पा गाठण्याचे प्रथमदर्शनी समर्थन प्राप्त होऊ शकते असे मला वाटते आणि समाजवादाच्या संदर्भात मी त्याचे विवेचन करीन. युद्धपूर्व काळांतील सामुदायिक बेकारी आणि विपत्तीची क्षेत्रे यांच्या इतक्या तीव्रतेने त्यांचे समर्थन कदाचित होऊ शकणार नाही. आधीच सुधारलेल्या समाजात आणखी सुधारणा घडवून आणण्यासाठी काहीसा सहेतुक विधायक आणि भेदजन्य निर्धार हवा. परंतु यापुढे घडून येणाऱ्या परिवर्तनामुळे व्यक्तिगत स्वातंत्र्य, सामाजिक संतुष्टता आणि न्याय यांत खूपच भर पडेल असा विश्वास असणे हे समाजवादाच्या स्वीकाराचे नैतिक अधिष्ठान ठरते.

● ● ●

प्रकरण सहावे

# समाजकल्याणाची किंमत

## १. बेव्हरिज क्रांती

सामुदायिक जबाबदारी आणि समाज कल्याण याला सर्वोच्च अग्रक्रम हे समाजवादातील सर्वात पहिले ध्येय म्हणून ठरविण्यात आले होते. वर्ग किंवा समानता या विषयापेक्षा वरील बाब काहीशी रुक्ष वाटली तरीही मी तिलाच पहिले स्थान देतो. याचे कारण असे की, न्याय आणि संतुष्टता या दोहोंच्याही दृष्टीने ती बाब अधिक तातडीची आणि महत्त्वाची ठरते.

या ध्येयांमुळे समाजसेवांची भूमिका कोणती हा प्रश्न उपस्थित होतो. अगदी अलिकडेपर्यंत सर्वसाधारणपणे हे मान्य केले जात होते की दरिद्रयाचा परिहार हे समाजसेवांचे एकमेव उद्दिष्ट असते. अर्थात या उद्दिष्टासंबंधीही निरनिराळे दृष्टीकोण असू शकतात आणि दारिद्रयाचा परिहार करण्यासाठी योजावयाच्या तुटपुंजा आणि भरघोस उपायांतील तीव्र तफावतीचे समर्थन करता येते. समाजसेवांचा इतिहास म्हणजे दारिद्रयाच्या व्याख्येत हळू हळू येत गेलेल्या व्यापकतेची आणि राष्ट्राच्या किमान राहणीमानासंबंधीच्या ठोकळेवाज दृष्टीकोणात होत गेलेल्या विकासाची हकीगतच म्हटली पाहिजे. १९०६ साली उदारमतवादी सरकारच्या अमदानीत या दृष्टीकोणाला प्रथम फार मोठी चालना मिळाली आणि तेव्हांपासून अधूनमधून आणि विरोध सहन करीत का होईना पण त्याचा विकास चालूच राहिला. शेवटी बेव्हरिज अहवालात आणि त्या अनुषंगाने पुढे झालेल्या कामगारविषयक कायद्यात त्याची अंतिम परिणती झाली.

किमान राष्ट्रीय राहणीमानासंबंधीच्या तात्त्विक भूमिकेचे सविस्तर आणि परिपूर्ण निवेदन बेव्हरीज अहवालाच्या द्वारा पुढे आले. त्या अहवालानुसार सामाजिक सेवांचा प्रधान उद्देश कमतरता नष्ट करणे हा होता. ' पुअर लॉ 'मधील

तरतुदींप्रमाणे केवळ निराश्रित नागरिकांनाच नव्हे तर दारिद्र्याची झळ पोचणाऱ्या सर्वच वर्गातल्या नागरिकांना दारिद्र्यापासून अलग करून किंवा अशा नागरिकांच्या जीवनातील दारिद्र्याचा कालखंड दूर करून हा उद्देश साध्य करण्यात येणार होता अशा नागरिकांच्या एकंदर गरजेचा अंदाज बांधण्यात आल्यानंतर कोणतीही कसोटी न लावता किंवा उत्पन्नाशी सांगड न घालता सरसकट मानाने किमान जीवनावश्यक इतकी मदत हक्क म्हणून त्यांना देण्यात यावयाची होती. आपल्या श्रमाशी मिळता जुळता मोबदला प्रत्येक नागरिकाला हक्काने मिळाला पाहिजे हे या योजनेचे मुख्य सूत्र असल्याने विम्याच्या तत्त्वाचा एक महत्त्वाचे अंग म्हणून त्या योजनेत समावेश करण्यात आला होता. साधनांच्या कसोटीवर मिळणारे राष्ट्रीय सहाय्य हा मुख्य योजनांचा फायदा मिळू न शकणाऱ्या अत्यल्प लोकांचा आसरा ठरतो.

दरम्यान सामाजिक सुरक्षिततेच्या उपायांबरोबरच आरोग्य आणि शिक्षण सेवांविषयक रचनात्मक योजनांचीही उभारणी करण्यात यावयाची होती. आणि खाजगी संस्थांकडून मिळणाऱ्या सेवांच्या इतक्या दर्जाच्या तरी सेवा सर्वांना उपलब्ध झाल्या पाहिजेत हे तत्त्व प्रथमच मान्य करण्यात आले. कमतरतेचे संपूर्ण उच्चाटन करून प्रत्येक नागरिकाला उचित अशा किमान राहणीमानाची हमी मिळू शकेल अशा तऱ्हेची सामाजिक सेवांची आखणी केली जाईल व तसे झाले म्हणजे सर्वांना रोजगार उपलब्ध करून देण्यात त्याची परिणती होऊ शकेल.

यात थोडीशी विसंगती आहे आणि योग्य तऱ्हेने त्याचा परामर्ष घेण्याचा किंवा ती दूर करण्याचा प्रयत्न केला गेला नाही हे खरे. कमतरता नष्ट करणे हे सामाजिक सेवांचे उद्दिष्ट आहे असे मानले तर कमतरता निश्चित करण्या-साठी काहीतरी कसोटी ठरवणे हे तर्कशुद्ध ठरते. उलटपक्षी, साधनांचा विचार न करता सर्रास सर्वांना सुविधा प्राप्त करून द्यावयाच्या हेच तत्त्व मान्य करण्यात आले तर कमतरतेचे उच्चाटन एवढेच केवळ उद्दिष्ट राहू शकणार नाही. म्हणजेच काही नवी आणि भिन्न उद्दिष्टे समाविष्ट झाली आहेत हे उघड आहे. परंतु त्या अहवालात किंवा त्यावर झालेल्या चर्चेत यासंबंधीचा कसलाच उलगडा करण्यात आला नाही. तथापी आज तरी ही विसंगती प्रत्यक्षात उद्भवलेली नसून ती संभाव्य स्वरूपातच आहे. विनशर्त सुविधा उघड उघड गरजू असणाऱ्यांच्या वर्गात मोडणाऱ्यांपुरत्या मर्यादित करण्यात आल्या. त्यामुळे दारिद्र्याचे उच्चाटन हेच अद्यापही उद्दिष्ट राहिलेले आहे असे सप्रमाण दाखवून देता येईल. ज्यांना गरज नाही अशांना फार करून या सुविधांचा फायदा दिला जाणार नाही. यामुळे बेव्हरिज अहवाल हा सर्वांग परिपूर्ण आणि सामाजिक सेवांची 'दारिद्र्या'च्या दृष्टी-कोणांतून व्यवस्थित मांडणी करणारा अहवाल आहे असे अद्यापही म्हणता येईल.

या अहवालावरच काय ती परिणामकारक अशी पावले उचलण्यात आली. १९४६ ते १९४९ च्या दरम्यान सामाजिक विमा क्षेत्रात मोडणाऱ्या सर्व बाबी व

तदनुशंगिक इतर सेवांची पुनर्घटना करण्यात आली व निरनिराळी महत्त्वाची विधेयके आणून त्यांच्याद्वारा त्यात सुसूत्रता आणण्यात आली, त्याचप्रमाणे त्यांची व्याप्तीही वाढविण्यात आली. दारिद्र्य कमी करण्याच्या बाबतीत हे कायदे किती प्रभावी ठरले त्याचे वर्णन दुसऱ्या प्रकरणात येऊन गेलेलेच आहे. ब्रिटनच्या इतिहासातील त्या कालखंडाइतकी सामाजिक प्रगती अन्य कोणत्याही कालखंडात घडून आलेली नाही. मूलभूत स्वरूपाचे दारिद्र्य बऱ्याच प्रमाणात नष्ट झाल्याचे आढळून आले आणि जणू काही कल्याणकारी राज्याचे ध्येय अंतिम स्वरूपात साध्य झाले आहे आणि समाजसेवांचा परमोच्च बिंदू गाठला गेला आहे अशा थाटात जनतेने कल्याणकारी राज्याच्या शुभारंभाचे स्वागत केले. 'माणसामाणसातील तसेच शासनसंस्था आणि नागरिक यांच्यातील नव्या संबंधाच्या नव्या युगाची सुप्रभात आणि माणसा-माणसातील जागतिक बंधुभावाची मुहूर्तमेढ' म्हणून बेव्हरिज अहवालाचे स्वागत करण्यात आले. त्या अहवालाच्या अंमलबजावणीमुळे 'समाजासंबंधीच्या नव्या कल्पनांचा पाया घातला गेला.'

## २. सामाजिक सेवातील 'पेचप्रसंग'

परंतु त्यानंतर थोड्याच वर्षांत सामाजिक सेवांच्या बाबतीत 'पेचप्रसंग' निर्माण झाल्याची भाषा ऐकू येऊ लागली व जिकडेतिकडे त्यासंबंधी टीका व आत्मसंशोधन सुरू झाले. सामाजिक सेवांच्या बाबतीत असे बिघडले होते तरी काय?

एक तर राष्ट्रीय विमा योजनेचे फायदे किमान पातळीवर रोखून धरणे अत्यंत अवघड जाऊ लागले. १९४६ साली ही पातळी कोणती असावी ते ठरवून देण्यात आले होते. परंतु युद्धोत्तर झालेल्या किंमतवाढीमुळे ते झपाट्याने त्या पातळीच्या खाली घसरले आणि त्यानंतर पैशाची किंमत घसरू नये म्हणून किंमतीत वेळोवेळी जे फेरबदल करण्यात आले त्यामुळे प्रथम ठरवलेल्या पातळीच्या जरा खाली आणि तिच्यापेक्षा पुष्कळच खालच्या पातळीवर असा त्यात चढउतार होऊ लागला. परंतु बहुतेक काळ ते त्या पातळीच्या बरेच खाली राहिले व त्यामुळे राष्ट्रीय मदतीचा अधिकाधिक आसरा घेणे भाग पडू लागले. १९५५ साली 'असिस्टन्स बोर्डातर्फे' विमा योजनेचा फायदा घेणाऱ्यांपैकी २५% लोकांत मिळून १५ लक्षांवर भत्ते दिले जात होते. अपेक्षा केली होती त्यापेक्षा हे चित्र अगदी निराळे होते.

दुसरे असे की, बेव्हरिज अहवालांत अंतर्भूत नसलेल्या किंवा मुळांत सामा-जिक सेवांमध्ये ज्यांचा विचार देखील करण्यात आलेला नव्हता अशा (मुख्यतः अन्नधान्यासाठी द्यावयाच्या मदतीच्या बाबतीत) ग्राहकांना सरसकट द्यावयाच्या मदतीत झपाट्याने वाढ होत गेली आणि थोड्याच दिवसांत बेव्हरिज योजने-खाली कराव्या लागणाऱ्या खर्चाच्या रकमा आणि निवडक सामाजिक सेवांवरील

खर्चातही जवळजवळ तितकीच वाढ झाली. सर्व प्रकारच्या विमाविषयक बाबी, राष्ट्रीय मदत, कुटुंब भत्ता, शिष्यवृत्त्या, शाळेतील विद्यार्थ्यांना द्यावयाचे जेवण, आणि बाळंतपणासाठी दिलेल्या सवलती या सर्वांवर जो ६४५ दशलक्ष पौंड खर्च होत असे त्या तुलनेने विचारात न घेतलेल्या बाबींवरील खर्च १९५० साली ४६८ दशलक्ष पौंडावर गेला. मदतीत झालेल्या या वाढीमुळे अंदाजपत्रकावर जो बोजा पडला त्यामुळेच मुख्यत: सामाजिक विमा सवलती किमान पातळीवर रोखून धरता आल्या नसाव्यात.

तिसरी गोष्ट अशी की, जास्तीतजास्त चांगले राहणीमान, हे तत्त्व म्हणून एकदा स्वीकारण्यांत आल्यानंतर वस्तूंच्या स्वरूपांत द्यावयाच्या सवलतीसाठी, विशेषत: संपूर्णपणे विनामूल्य उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या आरोग्यविषयक सवलतींसाठी होणारा खर्च भयानक ठरणार हे स्पष्टपणे दिसू लागले. हे खरे की, आरोग्य खात्यातर्फे कराव्या लागणाऱ्या चालू खर्चात झपाट्याने होणाऱ्या वाढीवरील बहुतेक टीका अगदी चुकीची होती. परंतु भावी काळांत कराव्या लागणाऱ्या खर्चा-संबंधी तथाकथित तज्ञांनी व्यक्त केलेल्या भाकितांमुळे लोक अस्वस्थ झाले होते. १९५१ साली आरोग्य खात्यावरील खर्चाबाबत जी अत्यंत कटुता निर्माण झाली होती त्याची पार्श्वभूमी ही अशी होती.

यांतून दोन स्वतंत्र मुद्दे पुढे आले. त्यापैकी पहिला मुद्दा तत्त्वप्रणाली संबंधीचा आणि सामाजिक सेवांच्या अंतिम उद्दिष्टांशी निगडीत असा होता. १९३७-३८ ते १९५०-५१ च्या दरम्यान करपूर्व व्यक्तिगत उत्पन्नाशी असलेले रोख रकमेच्या स्वरूपांतील प्रमुख सवलतींचे प्रमाण (५·५%) टिकून राहिले असले तरी वस्तूंच्या आणि अनुदानाच्या स्वरूपांत मिळणाऱ्या सवलतींचे प्रमाण एकूण राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानाने दुपटीहूनही वाढले होते (म्हणजे ५·५% वरून ते ११.५% झाले होते) असे आढळून आले. प्रत्यक्ष आणि पैशाच्या स्वरूपांत मिळणाऱ्या सवलतींमधील प्रमाणांत घडून आलेल्या या बदलामुळे मूळच्या बेव्हरिज दृष्टीकोणांत मूलभूत स्वरूपाची तफावत पडल्याचे दिसून आले. सामाजिक खर्चाचे समर्थन या दृष्टीने कमतरता नष्ट करण्याची कल्पना मागे पडून उत्पन्नाचे सामाजीकरण करण्याची कल्पना पुढे आली. उत्पन्नाचे सामाजीकरण करण्याच्या या कल्पनेनुसार राष्ट्रीय उत्पन्नाचा अधिकाधिक भाग पितृस्वरूपी शासन संस्थेकडून कराच्या रूपाने वसूल करून तो (बव्हंशी त्याच लोकांना) जास्तीतजास्त फायदेशीर ठरणाऱ्या कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत पुन्हा विभागून टाकला जाईल अशी कांही टीकाकारांची समजूत होऊन बसली. या सैद्धांतिक मुद्याचा परामर्श पुढील प्रकरणांत घेतला आहे.

दुसरे असे की, तावडतोबीच्या आणि संभाव्य खर्चाच्या बोजासंबंधीची भीती वाढत्या प्रमाणांत व्यक्त होऊ लागली. ही भीती कितपत साधार होती ?

सामाजिक सेवांवर ( धान्याच्या मदतीसकट ) सर्व सार्वजनिक खात्यांकडून १९३८–३९ साली एकूण राष्ट्रीय उत्पन्नाच्या ९·२% इतका खर्च होत असे. त्यांत वाढ होऊन १९५१–५२ साली तो १३.७% पर्यंत गेला. अन्नधान्यासाठी देण्यात येणारी मदत वगळता ही वाढ ९.२% ते ११·५% पर्यंत होती. म्हणजेच अनुदान धरून राष्ट्रीय उत्पन्नापैकी सामाजिक सेवांवर खर्ची पडणाऱ्या रकमांचे प्रमाण जवळजवळ निम्म्याने वाढले. परंतु हे विधान निश्चितच अतिव्याप्त ठरते. अनुदानाची रक्कम बाजूला सारली तरीही आरोग्य खात्यावर त्या प्रमाणांत सर्वांत जास्त खर्च झाला. त्यामानाने सार्वजनिक खर्चात झालेली वाढ आरोग्य खात्यावर होणाऱ्या एकूण खर्चाच्या वाढीशी समप्रमाण आहे असे दिसत नाही. कारण 'नॅशनल हेल्थ स्कीम' लागू करण्यात आल्यानंतर आरोग्यावर खर्च होणाऱ्या रकमेपैकी कांही भाग खाजगी व्यक्तींकडून खर्च होत असे तो आता आरोग्य खात्याकडे वर्ग करण्यांत आला इतकेच. त्यामानाने प्रत्यक्ष सुविधांत फारच थोडी वाढ झाली– सामाजिक विम्याचे फायदे आणि कुटुंब-भत्ता हे दोन्ही मिळून १९३८–३९ प्रमाणेच १९५१–५२ सालीही करपूर्व वैयक्तिक उत्पन्नाच्या प्रमाणाइतकेच पडते. मध्यवर्ती सरकारच्या सर्व खर्चात (अनुदान धरून) १९३८–३९ सालांतील २८% वरून १९५१–५२ साली ४०% पर्यंत जी वाढ झाली (पुढे १९५३–५४ मध्ये ती ३१% पर्यंत खाली आली) त्यावरून सामाजिक सेवांमुळे निर्माण झालेल्या आर्थिक समस्येचे स्वरूप समजून येईल.

ही वाढ बरीच होती तरी देखील कल्याणकारी राज्याची उभारणी करण्याची मजूर सरकारची जाहीर घोषणा आणि सामाजिक खर्चाचा ' चिरडून टाकणारा ' भार याविषयी वारंवार काढली जाणारी मुक्ताफळे लक्षांत घेता ही वाढ तशी बेताचीच म्हटली पाहिजे. सामाजिक सेवांमुळे उपलब्ध साधनसंपत्तीवर फाजील भार पडत होता किंवा त्यामागून येणाऱ्या आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाच्या बाबतीत उद्भवणाऱ्या पेचप्रसंगाचे मूळही त्यांतच होते असा निष्कर्ष वरील आकड्यांवरून काढता येणार नाही. अर्थात त्यामुळे पुढील अर्थमंत्र्यांपुढे आर्थिक, त्याचप्रमाणे महसुलासंबंधीच्याही समस्या निश्चितच उभ्या राहिल्या. इतर सर्व गोष्टी होत्या तशाच राहून फक्त सामाजिक सेवांची व्याप्ती एकांगी वाढली असे नव्हे तर दुसरे महायुद्ध आणि कोरियांतील लढाई यामुळे अर्थव्यवस्थेवर जो विलक्षण ताण पडला त्याने निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे सामाजिक सेवांवरील खर्चात वाढ झाली. परंतु या अनर्थाचे मूळ केवळ सेवांवर होणारा खर्च हेच आहे, निदान ते प्रमुख कारण आहे असे म्हणणे समर्थनीय ठरणार नाही. विशेषतः सामाजिक सेवांवर होणाऱ्या खर्चाच्या काही प्रमाणातील वाढ तरी निदान त्या सेवांचा फायदा मिळणाऱ्या वर्गात त्यामानाने जी वाढ झाली होती त्यामुळे आपोआपच घडून आलेली होती हे लक्षांत घेतले म्हणजे तर वरील तक्रार अजिबातच समर्थनीय ठरत नाही. युद्धपूर्व काळापेक्षा त्यावेळी दहा लाख मुले आणि पंधरा लाख वृद्ध माणसे यांची भर पडली होती.

परंतु खर्चातील ही वाढ तशी विशेष नव्हती याचे कारण असे की, सामाजिक आणि राजकीय अशा दोन्ही बाजूंनी जास्त खर्चाची जोरदार मागणी होत असतांना आणि लोकांना खऱ्याखुऱ्या हालअपेष्टांना तोंड द्यावे लागत असतांनाही खर्चाचे प्रमाण निर्धारपूर्वक वाढू देण्यात आले नव्हते. राष्ट्रीय विमा योजनेनुसार मिळणारे फायदे एकसारखे किमान राहणीमानाच्या खाली घसरत होते. आरोग्य आणि अनुदान यावर होणाऱ्या खर्चावर मर्यादा घालण्यात आल्या आणि शिक्षणविषयक कार्यक्रमालाही जबरदस्त कात्री लावण्यांत आली. शिवाय भावी काळाकडे पाहता नव्या नव्या मागण्या पुढे येत जाणार हे उघड होते. त्यामुळे बहुतेक लोकांना जर कशाची धास्ती पडली असेल तर युद्धोत्तर काळांतील प्रत्यक्ष खर्चापेक्षाही पुढील काळांत खर्चात जी संभाव्य वाढ होणार होती त्याची.

## ३. वृद्धावस्थेतील लोकसंख्येचा परिणाम

भावी काळात कराव्या लागणाऱ्या खर्चाचा विचार करताना झपाट्याने वृद्धावस्थेकडे झुकू लागलेल्या जनतेचा प्रश्न पुन्हा पुन्हा उपस्थित केला जातो. फिलिप्स समितीच्या अहवालानुसार ब्रिटनमधील वृद्धावस्थेतील ( ६५ वर्षावरील पुरुष आणि ६० वर्षावरील स्त्रिया ) नागरिकांची संख्या १९५१ साली ६.६ दशलक्ष होती ती १९७९ साली ९.५ दशलक्षापर्यंत जाईल. म्हणजे ती लोकसंख्येच्या १३.५% वरून १८.२% इतकी वाढेल. वृद्धावस्थेतील नागरिकांच्या संख्येत होत जाणारी ही वाढ हीच खरी चिंतेची बाब होती.

परंतु पुष्कळदा असे लक्षात घेतले जात नाही की, वयात होणारी वाढ ही अगदी नवी अशी बाब निर्माण झालेली नसून गेल्या पन्नासाहून अधिक वर्षे ही वाढ दिसत आलेली आहे. गेल्या वीस वर्षात लोकसंख्येच्या वयाच्या गटात जितक्या झपाट्याने वाढ होत गेली, तितकी ती पुढील वीस वर्षात होऊ शकणार नाही. व्हिक्टोरिया काळाच्या उत्तरार्धात वयाचे जे प्रमाण धरले जात असे त्याच्या निम्म्याहून जास्त टप्पा एव्हाना आपण गाठला आहे. सध्याचे सरासरी वय ३५.५ आहे ते पुढील पंचवीस वर्षात ३९ पर्यंत वाढणार आहे. सध्याच्या सरासरी वयातही १८९१ च्या सरासरी २७ पासून इतकी वाढ झाली आहे, आणि एकूण लोकसंख्येशी असलेल्या वृद्धांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात १८% पर्यंत वाढ होणार असून आजपर्यंत ती ६.५% पासून जवळजवळ १४% पर्यंत झाली आहे. यावरून असे दिसून येईल की, त्यामुळे जो बोजा वाढणार आहे त्यातील बराचसा भाग येऊन गेला असून राहणीमानावर त्याचे जे परिणाम व्हावयाचे ते एव्हाना होऊन गेले आहेत.

आणि शिवाय भावी काळात वयांचे जे गट पडणार आहेत त्यात ( १९८० पासून पुढे त्यात फारसा बदल घडून येणार नाही अशी अपेक्षा आहे )

वयोमानाच्या शास्त्रानुसार विशेष वैशिष्टय राहणार आहे असे नाही. एकोणि-साव्या शतकाच्या अखेरीच्या काळातील वयोगटाची रचना (तत्कालीन पाश्चात्य मानदंडानुसार) अनैसर्गिक होती कारण त्यावेळीसुद्धा मृत्यूसंख्येचे प्रमाण त्या-मानाने जास्तच होते. त्यामुळे वृद्धांच्या संख्येचे प्रमाण कमी रहात असे आणि त्याच्या जोडीला लोकसंख्येत मात्र झपाटयाने वाढ होत असे. त्यामुळे सरासरी वय फार कमी भरत असे. गेल्या ७० वर्षात या दोन्ही गोष्टीत बदल घडून आला आहे. मृत्यूसंख्येचे प्रमाण खूपच कमी झाले आहे तर जननसंख्येचे प्रमाण इतके घटले आहे की, लोकसंख्येची वाढ जवळजवळ थांबलीच आहे. त्यामुळे सरासरी वयात वाढ झाली आहे. परंतु हे जे सर्व घडत आहे ती मिळतेजुळते घेण्याची एक प्रदीर्घ प्रक्रिया असून स्थिर लोकसंख्येसाठी आवश्यक असलेल्या वयाच्या गटवारीच्या दिशेने अर्धीअधिक मजल गाठण्यातही आली आहे.

आणि यात वाईट वाटण्यासारखे काही आहे असेही नाही. एक तर मृत्यू-संख्येच्या प्रमाणात वाढ करून किंवा व्हिक्टोरियाकालीन लोकसंख्यावाढीचे प्रमाण पुन्हा गाठून या परिस्थितीत उलटा बदलही घडवून आणता येईल. अर्थात त्यापैकी पहिला पर्याय कोणीच पसंत करणार नाही. आणि दुसऱ्या पर्यायासंबंधी बोलावयाचे तर नैसर्गिक परिस्थिती अत्यंत प्रतिकूल असलेल्या ब्रिटनसारख्या देशात लोक-संख्येच्या वाढीमुळे अन्नधान्य आणि इतर वस्तूंचा पुरवठा करण्याच्या बाबतीत गंभीर समस्या निर्माण होतील आणि राहणीमान उंचावण्याची शक्यताही त्यामुळे दुरावेल.

घडून आलेल्या स्थित्यंतराच्या परिणामासंबंधी होणारी बहुतेक सर्व चर्चा ही नाही तरी, बरीचशी गैरलागू ठरते. एकूण उत्पादन व साधनसामुग्री आणि उत्पादक आणि ग्राहक किंवा काम करू शकणारे आणि ज्यांना दुसऱ्यावर अवलंबून रहावे लागते अशांच्या वयाच्या गटातील फरकामुळे राहणीमान खालावण्याचा संभाव्य धोका यावरच ती केंद्रित झालेली दिसते. परंतु वस्तुतः हा बदल तसा फार मोठा नाही. दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्या वयोमानाच्या गटात फक्त वृद्धांचाच समावेश होतो असे नव्हे तर पंधरा वर्षाखालील मुलेही त्यातच मोडतात. १९७९ पर्यंत लोकसंख्येत २२% पासून २०% पर्यंत घट होणार असल्याने मुलांच्या वयोमानाच्या गटातही त्या प्रमाणात घट अपेक्षित आहे. आणि त्यामुळे वृद्धांच्या वयोमानाच्या गटातील वाढीचे परिणाम नष्ट होणार आहेत. या दोन गोष्टींचा एकत्रित विचार केला तर असे दिसून येईल की, एकूण लोकसंख्येतील काम करू शकणाऱ्या वयो-मानाच्या गटात थोडीशी– ६४% पासून ६२% पर्यंत–घट होईल.

उत्पादनात होणाऱ्या वाढीची संभाव्यता लक्षात घेता ही बाब अर्थातच अगदी गौण ठरते. प्रत्येक वयोमानाच्या गटाचे नोकरीतील प्रमाण आहे तसेच राहिले तर प्रत्येक ग्राहकामागे असलेली उत्पादकांची संख्या आणि त्याबरोबरच

( इतर कसलाही बदल झाला नाही तरी ) राहणीमानाच्या सरासरीत ३.५% नी घट होईल. परंतु एकूण राष्ट्रीय उत्पन्नात होणारी १.५% वाढ अत्यंत मर्यादित असली तरी त्याच काळात दरडोई उत्पन्नात मात्र ५०% वाढ होईल आणि सध्याच्या वाढीच्या दरात ८०% वाढ होईल.

परंतु खरी समस्या आहे ती ' हस्तांतरा 'ची. उत्पादन क्षमतेत वाढ झाल्यामुळे उत्पादनात होणारी वाढ प्रत्यक्ष वृद्धांपर्यंत पोहोचत नाही. कारण ते (बव्हंशी) कामावर नसतात. त्यामुळे त्यांच्या संख्येत वाढ झाल्याने एकूण उत्पन्नात वाढ करावयाची असेल तर उत्पादन आणि उत्पन्न यांच्यात होणाऱ्या वाढीपैकी काही भाग ती वाढ ज्यांच्या पदरात पडते त्या श्रमजीवी जनतेवर कर बसवून काढून घेऊन सेवानिवृत्तांमध्ये हस्तांतरित केली पाहिजे हे ओघानेच येते. म्हणजेच भौतिक साधनसामुग्री, वाढलेला खर्च भागविण्याइतकी भरपूर आहे असे नुसते दाखवून भागणार नाही ( कारण त्याचा भार सार्वजनिक पैशांवरच पडणार ) तर हस्तांतराचा किंवा कर आकारणीचा प्रश्नही समाधानकारकपणे सोडविता येईल हे दाखवून देता आले पाहिजे.

वस्तुनिष्ठ दृष्टीकोणातून म्हणजेच उत्पादकाचे ग्राहकाशी असलेले प्रमाण विचारात घेऊन आर्थिक समस्येचे अचूक मूल्यमापन न होण्याची आणखीही दोन कारणे आहेत. एक तर या प्रमाणात होणारी थोडीशी घट ही वृद्धांच्या वाढत्या संख्येला तरुणांच्या कमी होणाऱ्या संख्येमुळे जो छेद बसतो त्यामुळे साधल्या जाणाऱ्या समतोलाचा परिणाम असतो. परंतु तरुणांच्या संख्येत होणारी घट मोठ्या प्रमाणावर नसते. हा भाग सोडून दिला तरी, अंदाजपत्रकात दरडोई तितकीच सवलत देण्याइतकी ती असत नाही. कारण ( सर्वांच्या नसले तरी ) काही तज्ज्ञांच्या मते वृद्धांना द्यावयाच्या निवृत्ती वेतनाचा आर्थिक बोजा १५ वर्षाखालील मुलांवर कराव्या लागणाऱ्या खर्चापेक्षा अधिक असतो.

दुसरे असे की, वृद्धांना द्यावयाच्या निवृत्ती वेतनासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चात वृद्धांच्या संख्येच्या मानाने प्रमाणाबाहेर वाढ होत जाईल. कारण १९४६ च्या कायद्याची अंमलबजावणी जसजशी होत जाईल आणि त्याचा पुरता परिणाम जाणवू लागेल तसतशी निवृत्ती वेतन प्राप्तीच्या अर्हतेत हळूहळू वाढ होत जाईल. वयोमानाच्या बदलत्या गटामुळे निर्माण होणारी ' खरी ' आर्थिक समस्या हे वस्तुतः बऱ्याच दिवसापासून प्रचलित असलेल्या प्रवृत्तीचेच सातत्य असते, तर करविषयक समस्यांत निदान काही प्रमाणात तरी युद्धोत्तर काळात लागू करण्यात आलेल्या राष्ट्रीय विमा (नॅशनल इन्शुरन्स) योजनेमुळे निर्माण झालेल्या सर्वस्वी नव्या परिस्थितीला मिळणाऱ्या कलाटणीचे प्रतिबिंब पडलेले असते. याचा परिणाम निवृत्ती वेतनावर होणाऱ्या खर्चात वृद्धांच्या संख्येच्या मानाने अडीच पट वाढ होण्यात होतो.

अर्थात निवृत्ती वेतनासकट सरकारी खर्चात होणारी वाढ एकूण उत्पादनात होणाऱ्या वाढीच्या समप्रमाणात राहिली तर कसलीच अडचण उभी राहणार नाही. उत्पादनातील वाढीच्या जोडीला उत्पन्नाच्या वाढीतील काही भाग विद्यमान करातून मिळणाऱ्या रकमेत होणाऱ्या वाढीमुळे आपोआपच सरकारी तिजोरीत जातो आणि अशा तऱ्हेने आपोआप होणाऱ्या या सरकारी उत्पन्नातील वाढीमुळे इतर खर्च भागवता येतो (अर्थात उत्पन्नाच्या प्रमाणात कर कमी करण्याचा मात्र विचार केला जात नाही). परंतु निवृत्ती वेतनावर कराव्या लागणाऱ्या खर्चावरून वाटते त्याप्रमाणे उत्पादनाच्या प्रमाणापेक्षा खर्चात जास्त वाढ झाली तर सबंध समाजाला मिळून त्याच्या उत्पन्नाच्या प्रमाणाच्या मानाने आजच्यापेक्षा सरकारला अधिक भाग द्यावा लागतो (मग प्रत्यक्षांत जादा कर आकरणीची जरुरी असो वा नसो).

यातूनच नेमकी समस्या निर्माण होते. मात्र या ना त्या कारणास्तव डाव्या गटांकडून क्षुल्लक म्हणून तिच्याकडे दुर्लक्ष केले जाते. परंतु व्यवहारतः ती महत्त्वाची कशी ठरते ते पुढील आर्थिक प्रकरणात सविस्तरपणे दाखवून दिले आहे. पहिली गोष्ट अशी की, अर्थव्यवस्था आधीच कोलमडून पडत आहे तरीही अंतर्गत आणि परकीय गुंतवणुकीत वाढ करण्यासारख्या तातडीने पुऱ्या केल्या पाहिजेत अशा अनेक मागण्या अद्याप पुऱ्या झालेल्या नाहीत. चलनवाढ न करता त्या पुऱ्या करावयाच्या झाल्या तर त्यासाठी सरकारी बचतीत वाढ करावी लागेल आणि वाढत्या सामाजिक खर्चाच्या मागणीला तोंड द्यावे लागेल. दुसरे असे की कराचे प्रमाण आधीच जास्त असल्याने एकूण राष्ट्रीय उत्पन्नापैकी ३०% रक्कम घेतल्या-नंतर त्यात आणखी भर घालणे अगदी अशक्य नसले तरी व्यवहारतः अत्यंत अडचणीचे ठरेल. उदा. त्यामुळे सरकारचा पराभव होऊ शकेल किंवा (१९५१ प्रमाणे) सत्ताधारी पक्षाला घातक ठरणारी फाटाफूट पक्षात घडून येईल किंवा करदात्यांच्या वृत्तीमुळे खर्चाचे प्रमाण खाली आणण्याचे एक साधन या दृष्टीने तसे करणे परिणामकारक ठरणार नाही. तिसरा मुद्दा असा की, काही मर्यादेपर्यंत करवाढ करता येणे शक्य असले तरी वाढलेला जादा सामाजिक खर्च भागविण्या-साठी आता केवळ श्रीमंतांकडून पुरेसा पैसा काढता येणार नाही आणि त्यामुळे त्याचा बोजा मुख्यतः कामगार वर्गावरच पडेल (आणि साहजिकच निवडणुकीच्या दृष्टीने तो अधिकच अप्रिय ठरेल).

म्हणून सामाजिक खर्चाच्या दृष्टीने हुजूर पक्षीयांपेक्षां समाजवाद्यांनी जादा कर आकारणीस तयार असले पाहिजे हे खरे असले तरी हस्तांतराचा प्रश्न सहजा-सहजी अंगाबाहेर टाकून चालणार नाही. आणि पुढे कराव्या लागणाऱ्या खर्चाचा विचार देखील कर आकारणीवर घडून येणाऱ्या परिणामाच्या संदर्भात करावा लागेल. त्याचप्रमाणे राहणीमानाच्या राष्ट्रीय सरासरीवर त्याचे काय परिणाम घडून येतील तेही विचारात घ्यावे लागेल.

## ४. सरकारी निवृत्ती वेतनाचा खर्च

सध्याच्या दराने निवृत्ती वेतनावर होणारा खर्च पुढील पंचवीस वर्षात दुपटीपेक्षाही थोडा जास्तच असेल. म्हणजे १९५४ साली त्यासाठी जो ३७० दशलक्ष पौंड खर्च होत होता तो १९७९ साली जवळजवळ ८०० दशलक्ष पौंडाच्या घरात जाईल. वृद्ध लोकांच्या संख्येत होणारी वाढ आणि निवृत्ती वेतन मिळण्याच्या अर्हतेत क्रमाक्रमाने होत जाणारी वाढ काही अंशी याला जबाबदार आहे. शिवाय, वृद्धांना मिळणाऱ्या इतर (निवासविषयक) सेवांच्या खर्चात त्या प्रमाणात वाढ होईल अशी अपेक्षा करणे अगदी रास्त ठरेल.

एकूण खर्चात होणारी ही वाढ उत्पादनात होणाऱ्या संभाव्य वाढीच्या प्रमाणात जास्त असेल. तरी सध्या मिळणाऱ्या सवलतीसाठी कराव्या लागणाऱ्या खर्चावर ती आधारलेली आहे. वस्तुत: इतर निव्वळ उत्पन्नात वाढ झाली तरी निवृत्ती वेतनाच्या निव्वळ मूल्यांतही तशीच वाढ होणे अगदीच असंभाव्य आहे (आणि ते अत्यंत अयोग्यही ठरेल). यावरून हे स्पष्ट होईल की, वृद्धांच्या गरजा भागविण्यासाठी खर्ची पडणाऱ्या एकूण उत्पन्नाच्या प्रमाणात सध्याच्या मानाने कितीतरी वाढ होईल.

यातून अनेक मागण्या पुढे येऊ लागतात व त्यातील अनेक उपयुक्त मागण्यांसाठी जनतेचे दडपणही येऊ लागते. हुजूरपक्षीय लोक अनेकदा शासकीय काटकसरीचा मुद्दा पुढे मांडीत असतात. परंतु ते शक्य आहे असे मानण्याजोगा पुरावा उपलब्ध नाही—सार्वजनिक सेवांतील रोजगार आणि वेतन यांची पातळी आणि खाजगी नोकरीतील रोजगार आणि वेतन यांची पातळी समान राखावयाची असेल तर शासकीय खर्चात वाढ होणारच. आणि मोठमोठ्या संबंधित संस्था, खर्चात तशी वाढ होत राहील म्हणून प्रयत्नशील राहणार हेही अपेक्षितच आहे.

सेवा निवृत्तीचे वय वाढवावे या सूचनेवरही बरेच लोक अनुकूलता दर्शवितात. आरोग्याचे मान जसजसे सुधारत जाईल तसतसे निवृत्तीचे वय या ना त्या स्वरूपात वाढत जाईलही; परंतु त्यामुळे निवृत्ती वेतनाच्या खर्चात विशेष अशी घट होणार नाही. फिलिप्स कमेटीने या कल्पनेला तत्वत: अनुकूलता दर्शविली असली तरी आपल्या अहवालात त्याबाबत असे दाखवून दिले आहे की स्त्रिया आणि पुरुष या दोघांचेही निवृत्तीचे वय तीन वर्षांनी वाढविण्यात आले तर त्यामुळे १९७९ साली (निव्वळ म्हणजे राष्ट्रीय मदत, आरोग्य आणि बेरोजगार यासंबंधीच्या सवलतीसाठी करावा लागणारा जादा खर्च धरून) अवघे पन्नास दशलक्ष पौंड वाचू शकतील.

काही वेळेला असे सुचविण्यात येते की, किमान जीवनावश्यकतेचे तत्त्व केवळ नाममात्र राहू द्यावे (म्हणजे त्यामागील उद्देश असा की, लोकांनी राष्ट्रीय

मदतीवर अवलंबून न राहता मुख्यतः स्वतःच्या सेवानिवृत्ती वेतनावरच जगले पाहिजे ). परंतु किमान जीवनावश्यकता मात्र अधिक काटेकोरपणे ठरविण्यात यावी म्हणजे सरासरी निव्वळ उत्पन्नाच्या बरोबरीने सवलतीच्या प्रमाणातही वाढ होण्याचे टाळता येईल. परंतु वृद्धांच्या दृष्टीने ही उपाययोजना अत्यंत अन्याय्य, निदान अत्यंत कद्रूपणाची तरी खासच ठरेल. सध्या किमान गरजा व्यतिरिक्त अन्य खर्चासाठी दर आठवडचाला फारच थोडे शिलिंग मिळत असल्याने सध्याची जीवनावश्यकतेची किमान पातळी पुरेशी काटेकोर आहे. बहुतेक लोक तर असे म्हणतील की, ती आधीच फार कमी आहे. आणि सरासरी उत्पन्नात जसजशी वाढ होत जाईल तसतशी ही पातळी उंचावत गेली पाहिजे असे म्हणणे हे जितके योग्य तितकेच स्वाभाविकही ठरेल. अखेर गरिबी ही काही स्वाधीन अशी कल्पना असू शकत नाही तर ती एक सामाजिक किंवा सांस्कृतिक कल्पना आहे. आरोग्य आणि पौष्टिक आहार यासारख्या अगदी मूलभूत बाबींच्यासंबंधी देखील सर्वत्र सारखाच लागू पडेल असा 'किमान जीवनावश्यकता' ठरविण्याचा निश्चित मानदंड असू शकत नाही. आवश्यक वस्तूंच्या खर्चात ज्या प्रमाणात वाढ होत जाते त्या प्रमाणात किमान जीवनावश्यकतेची कल्पनाही उंचावत जाते. परंतु कोणत्याही परिस्थितीत उपासमार आणि रोगराई टाळण्यापुरते किमान अन्नवस्त्र देणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यासारखे आपले वर्तन असता कामा नये. सुखसमाधान आणि सामाजिक न्याय यांचीही आपण जाणीव ठेवली पाहिजे. आणि म्हणूनच गरिबीचा विचार आत्मनिष्ठ दृष्टीकोणातून आणि तारतम्य वापरूनच झाला पाहिजे. कारण अनारोग्य आणि आरोग्य विघातक आहार टाळता आला तरी दारिद्र्यातून उद्‌भवणारी दुःखे आणि अन्याय- अगदी ऐषआराम सोडला तरी इतरांना उपभोगायाला मिळणाऱ्या आणि आजच्या सांस्कृतिक निकषानुसार ज्या वस्तुतः 'रूढ गरजा'तच मोडतात अशा छोटचा छोटचा सुख-सवलती जोपर्यंत अप्राप्य राहतात तोपर्यंत- शिल्लकच राहतात.

गरिबांना मिळणारे अन्न ठराविक कॅलरीपर्यंत असले पाहिजे किंवा त्यांच्या प्रकृतीच्या आलेखात विशिष्ट पातळी दाखवता आली पाहिजे असला खास रुग्णालयी खाक्या वगळता गरिबांसंबंधीचा इतर कोणताही दृष्टीकोण स्वीकारला तरी त्यात आर्थिक विकासाबरोबर जीवनावश्यकतेचे निकषही उंचावत गेले पाहिजेत असेच अभिप्रेत असते. याउलट दृष्टीकोण स्वीकारला गेला तर इतर समाजाच्या मानाने गरीब अधिक गरीब होत जातील आणि ही गोष्ट समाजवाद तर सोडाच पण साध्या मानवतावादालाही खासच धरून होणार नाही. म्हणून भावी अर्थमंत्र्यांनी केवळ पैशाचे मूल्य घसरू नये म्हणूनच केवळ नव्हे तर सेवानिवृत्तांना अनिष्ट ठरेल अशा प्रकारचे उत्पन्नाचे फेरवाटप करावे लागू नये म्हणूनही त्यांना मिळणाऱ्या सवलतीत मधूनमधून वाढ होत जाण्याची संभाव्यता गृहीत धरून चालले पाहिजे.

काटकसरीचा शेवटचा पण तितकाच जालीम उपाय म्हणजे किमान जीवनावश्यक वस्तूंची तरतूद करण्याच्या तत्त्वाला कायमची तीलांजली देऊन टाकणे आणि साधनसामुग्री उपलब्ध असेल त्या मानानेच निवृत्तीवेतन देणे हा होय. याचा विचार करू लागलो की त्यातून सामाजिक सेवांच्या मागील कार्यकारणभावासंबंधीचेच अधिक व्यापक प्रश्न उपस्थित होतात. त्यासंबंधीचा उहापोह पुढील प्रकरणात केला आहे. या ठिकाणी मी इतकेच धरून चालतो की, मजूर सरकार ही सूचना निश्चितच झिडकारून टाकणार ( आणि ते योग्यच आहे ). अर्थात त्यामुळे अंदाजपत्रकात खर्चाची तरतूद कशी करावयाची ही समस्या तशीच शिल्लक राहते.

## ५. खाजगी क्षेत्रातील अतिवयस्कतेचा खर्च

काही वेळा असे म्हटले जाते की, सरकारी निवृत्तीवेतन योजनेव्यतिरिक्त खाजगी अतिवयस्कतेसंबंधीच्या योजनांमुळे समाजावर आणखी बोजा पडतो. करात मळणाऱ्या भरपूर सवलती आणि नोकरवर्गाला आकृष्ट करून तो टिकवून धरण्याच्या बाबतीत मालकांना येणाऱ्या अडचणी यामुळे गेल्या काही वर्षांत अशा योजनांत झपाट्याने वाढ झाली आहे. सरकारी नोकऱ्यांतील सुमारे तीस लक्ष आणि खाजगी नोकऱ्यांतील पन्नास लाखाहून अधिक म्हणजेच एकूण नोकरी करणारांपैकी एक तृतीयांश लोक अशा योजनाखाली येतात आणि या योजना अधिकाधिक पसरत जातील अशीच शक्यता दिसत आहे.

त्याचे आर्थिक परिणाम काय होतील ? पहिला परिणाम शिलकीच्या पुरवठ्यावर होईल. सध्या निवृत्तीवेतनाच्या रूपाने जी रक्कम खर्च करावी लागते त्यापेक्षा त्यासाठी जमा झालेला निधी किती तरी जास्त असतो. अर्थात निवृत्तीवेतनासंबंधीच्या योजना बहुतांशी विम्याच्या दरावर आधारलेल्या असल्यामुळे त्या सध्याइतक्याच राहिल्या तर एक वेळ अशी येईल की, निवृत्ती वेतनावर करावा लागणारा खर्च आणि निवृत्तीवेतन निधी आणि त्या भांडवलाची गुंतवणूक ही (जवळजवळ) सारखीच असेल आणि या बाबीपासून राहणारी शिल्लक शून्यावर येऊन बसेल. परंतु सध्या अस्तित्वात असलेल्या योजनांच्या बाबतीत देखील ही वेळ आणखी तीस वर्षे तरी येणार नाही आणि दरम्यान निवृत्तीवेतन देण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चापेक्षा जमा अनेक वर्षपर्यंत किती तरी जास्त दाखवणाऱ्या नव्या योजना पुढे येत राहतील. त्यामुळे येती तीस चाळीस वर्षे खाजगी अतिवयस्कता योजनांतून मिळणारे उत्पन्न खर्चाच्या मानाने वरेच असेल ( अर्थात ते कमी कमी होत जाईल ) आणि या बाबीतून जमेच्या बाजूला भरपूर शिल्लक राहील.

परंतु इतर कोणत्याही पद्धतीत ही शिल्लक राहणारच की नाही ? तशी ती राहणे अगदी असंभाव्य दिसते. नोकरवर्गाच्या बाबतीत विक्रेत्यांच्या बाजारपेठेत नोकरवर्गाची सौदा पटविण्याची ताकद खूप वाढलेली आहे असे धरले तर

निवृत्तीवेतन निधीत आता जमा झालेल्या रकमांचा अत्यल्प भाग, निवृत्तीवेतन योजना अस्तित्वात नसतील तर, अपरिहार्यपणे वाढीव रोजगार आणि वेतन यांच्या रूपांत वाटला जाईल. त्यांतील सर्वच्या सर्व रक्कम खासच शिल्लक राहणार नाही. त्यामुळे उरलेला सर्वच्या सर्व भाग जर शिल्लक टाकता आला (करांच्या किंवा न वाटलेल्या फायद्याच्या स्वरूपांत) तर त्याचा परिणाम निव्वळ शिलकीत सध्याच्या मानाने घट येण्यात होईल.

काही जण असे प्रतिपादन करतात की, धोकादायक भांडवल गुंतवणुकीपेक्षा निवृत्तीवेतन निधी आणि विम्यांत गुंतवलेले पैसे अधिक सुरक्षित असतात आणि त्यामुळे खाजगी अतिवयस्कता योजनांत जसजशी वाढ होत जाईल तसतसा खरोखरीचा धोकादायक गुंतवणुकीतील भांडवल पुरवठा कमीकमी होत जाईल. यापैकी पहिले विधान कदाचित खरे असू शकेल परंतु अर्थातच त्यांतून दुसरे विधान निघत नाही. एकूण निव्वळ बचतीत कसलीही वाढ झालेली नाही परंतु सध्याची बचत धाडसी धोकेबाजांकडून काढून घेऊन ती सावधपणे गुंतवणूक करणाऱ्या विश्वस्तांच्या हाती सोपविली तरी देखील असे घडून येईल. परंतु आपण वर पाहिल्याप्रमाणे एकूण बचतीत वाढ झाली आहे आणि निवृत्तीवेतन निधीच्या उपन्नापैकी कांही भाग सामान्यत: इक्विटीमध्ये गुंतविला जात असल्याने बचतीच्या धोकेदायक गुंतवणुकीच्या एकूण आकारमानांत निश्चित अशी घट तर होणार नाहीच उलट ती खात्रीपूर्वक वाढत जाण्याचीच शक्यता अधिक.

अतिवयस्कतेत वाढ होत गेली तर त्यामुळे अर्थपुरवठा करणाऱ्या संस्थांची खाजगी उद्योगांवरील नियंत्रणाची पकड कमालीची घट्ट होत जाईल असे जे कांही लोकांकडून सुचविले जाते त्यावरही माझा विश्वास बसत नाही. गुंतवणुकीचा निधी मुख्यत: विमा कंपन्यांच्या नियंत्रणाखाली असता तर ही भीती थोडीफार तरी सार्थ आहे असे म्हणता आले असते. परंतु त्या निधीपैकी मोठा भाग संबंधित कंपन्यांनी स्थापन केलेल्या आणि ज्यावर अनेकदा कामगार संघटनांचेही प्रतिनिधी असतात अशा विश्वस्त स्वायत्त निवृत्ती निधीत समाविष्ट झालेला असतो. त्यांनी जर या निधीतील पैसा मोठ्या प्रमाणावर इक्विटीमध्ये गुंतविण्याचे ठरविले (तसे झाले तर मागच्या परिच्छेदांत निर्दिष्ट केलेली भीती आपोआपच दूर होईल) तर कोणत्याही प्रकारचे उघड उघड धोकादायक परिणाम घडून येण्याची मला तरी शक्यता दिसत नाही. वितरणाच्या दृष्टीकोणांतून बोलावयाचे तर जादा लाभांश आणि भांडवली नफ्याचे फायदे आजच्यापेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेने विभागलेले असतील; आणि नियंत्रणाच्या दृष्टीकोणांतून बोलावयाचे तर निवृत्तीनेतन निधी म्हणजे अत्यंत सूप्त भागधारक ठरण्याचा संभव असल्याने त्याचा परिणाम व्यवस्थापनाच्या संदर्भात संपत्तीची परिणामकारकता आणखीनच कमी होण्यात होईल. आणि तसे झाले तर मी ते विशेष अनिष्ट मानणार नाही.

असेही प्रतिपादन केले जाते की, निवृत्तीवेतनाचा अधिकार पूर्णांशाने क्वचितच हस्तांतरित करता येत असल्याकारणाने खाजगी अतिवयस्कतेमुळे कामगारांच्या अभिसरणावर प्रतिकूल परिणाम घडून येथील. आणि अर्थात अतिवयस्कता योजना लागू करण्यामागे अनेकदा एकूण उलाढाल कमी करण्याचा जो उद्देश असतो त्यातलाच हा प्रकार आहे. तरीही तथाकथित अनिष्ट परिणामाविषयी मी साशंकच आहे. कारण निरनिराळ्या कारखान्यातून होणारे कामगारांचे आगमन–निर्गमन (Turnover) हे आर्थिक दृष्ट्या आवश्यकतेपेक्षा ( आणि सामाजिक दृष्ट्या इष्ट त्यापेक्षा ) खूपच जास्त असते. पण कोणत्याही परिस्थितींत ते टाळता येणे शक्य आहे. कारण हस्तांतराचे पूर्ण हक्क बहाल करण्याच्या अटीवरच करात सवलती दिल्या जातील अशी अट घालणे शक्य आहे.

तथापी तावडतोबीचा प्रश्न आहे तो हा की, अलिकडेच सूचित करण्यात आल्याप्रमाणे खाजगी अतिवयस्कतेसंबंधीच्या योजनांमुळे समाजावर प्रचंड बोजा लादला जातो किंवा काय ?——पंचवीस वर्षांच्या कालावधीत सरकारी सेवा निवृत्तीच्या बोजापेक्षाही तो वाढला नाही तरी कोणत्याही परिस्थितीत तो त्याच्याइतका होऊन बसेल. वरील सर्व प्रतिपादनाला प्रत्यक्ष आकड्यांचा भरपूर आधार देण्यात येत असला तरी ते खाजगी सेवानिवृत्तीवरील एकूण खर्चाच्या संदर्भात सपशेल गैरलागूच ठरते.

आपण वर पाहिल्याप्रमाणे निवृत्तीवेतनाच्या खर्चाच्या किंवा बोजाच्या दोन बाजू असतात. एक : वृद्धांच्या तुलनात्मक संख्येत होणाऱ्या वाढीमुळे प्रत्यक्ष साधनसामुग्रीची समस्या निर्माण होते; आणि खाजगी अतिवयस्कता योजना अस्तित्वात आहे किंवा नाही याच्याशी त्याचा कसलाही संबंध नसतो. प्रश्न असा उपस्थित होतो की खाजगी अतिवयस्कतेमुळे जादा बोजा सहन करावा लागतो किंवा नाही, म्हणजेच जादा साधनसामुग्री इतर समाजापेक्षा खाजगी निवृत्ती वेतनाच्या योजनेत सामील झालेल्यांसाठी आधीच खर्च करून टाकलेली असते की काय ? अर्थात खाजगी निवृत्तीवेतन पुढे कसे खर्च केले जाईल त्याची आकडेवारी सांगून या प्रश्नाचे उत्तर देता येणार नाही तर व्यक्तिगत खर्च करण्याच्या शक्तीत घट करणारा निवृत्तीवेतनावरील वाटा आणि त्यात भर घालणारे निवृत्तीवेतन यातील समतोल लक्षात घेऊनच वरील प्रश्नाचे उत्तर देता येईल. निवृत्तीवेतनात जमा होणाऱ्या एकूण रकमांपेक्षा एकूण निवृत्तीवेतन वाढत्या प्रमाणावर असल्याने राष्ट्रीय विमा योजनेमुळे बाकीच्या समाजावर बोजा जरूर पडतो. म्हणून योजनेचा एकूण विचार करता साधनसामुग्रीवर बराच ताण पडतो.

तीस चाळीस वर्षांच्या काळात खाजगी अतिवयस्कतेच्या बाबतीत हे खरे ठरण्याचा फारसा संभव नाही. कारण त्या काळात निवृत्तीवेतनासाठी भरल्या जाणाऱ्या रकमांच्या मानाने दिल्या जाणाऱ्या फायद्याचे प्रमाण अत्यल्प असते.

अशा तऱ्हेने निवृत्तीवेतनदारांच्या खर्च करण्याच्या शक्तीत जेवढी वाढ होते त्यापेक्षा निवृत्तीवेतनात रकमा भरणाऱ्यांच्या खर्च करण्याच्या शक्तीत खूपच जास्त घट होते. परिणामी अशा योजना अस्तित्वात नसतांना खर्चाच्या आणि शिलकीच्या बाबतीत जवळपास कोणताही जरी प्रकार गृहीत धरला तरी इतर वेळेपक्षा निव्वळ शिलकीची पातळी वरचीच राहते. अशा तऱ्हेने खाजगी अतिवयस्कतेसंबंधीच्या योजनांमुळे साधनसामुग्रीवर अधिक ताण पडण्याऐवजी उलट त्यामुळे अन्य उपयोगा-साठी आणि विशेषत: अधिक भांडवल गुंतवणुकीसाठी जादा साधने उपलब्ध होतील. येत्या दहा वर्षात आपल्या साधनसंपत्तीवर जो ताण पडणार आहे तो लक्षात घेता ही बाब आर्थिक दृष्टचा अत्यंत अनुकूल अशीच ठरते.

दूरवरच्या दृष्टीने पाहता, 'उभारणीचे काम' पूर्ण झाल्यानंतर आणि जवळ-जवळ जमा होणाऱ्या रकमेइतकी निवृत्तीवेतनाच्या फायद्याची रक्कम वाढली म्हणजे परिस्थितीचे स्वरूप अगदी निराळे असल्याचे दृष्टोत्पत्तीस येणे शक्य आहे हे खरे. व्यक्तिगत खर्च करण्याची ताकद आणि त्यात होणारी एकूण वटघट यांचा परस्परांना छेद बसत असणे शक्य असले तरी खर्च करण्याची प्रत्यक्ष पातळी वाढलेली असणे आणि शिल्लक टाकण्याची कुवत घसरलेली असणे शक्य आहे. निवृत्तीवेतनधारक निवृत्तीवेतनाची सर्व रक्कम खर्च करून टाकतील अशी शक्यता गृहीत धरली तर असे होऊ शकेल आणि त्या परिस्थितीत निवृत्तीवेतनाच्या एकूण रक्कमेपेक्षा खर्च होणारी रक्कम जास्त असेल. परंतु निवृत्तीवेतन निधीत जमा होणाऱ्या एकूण रकमेपेक्षा शिलकी रक्कम जास्त असणार नाही. कारण त्यातील काही भाग मग शिलकीत जमा झालाच असता. त्यामुळे अतिवयस्कता योज-नेत सहभागी होणाऱ्यांकडून निव्वळ साधनसंपत्तीवर सांगितला जाणारा दावा हा अधिक असणार आणि इतर समाजाजवळ असलेल्या साधनसंपत्तीचे प्रमाण अति-वयस्कता योजनाच अस्तित्वात नसती तर जितके असते त्याहून आता कमी राहणार. परंतु ही परिस्थितीही काहीशी दिशाभूल करणारीच आहे. कारण उभारणीच्या प्रदीर्घ काळात उपलब्ध होणाऱ्या जादा निव्वळ शिलकीमुळे दरम्यानच्या काळात भांडवल गुंतवणुकीची वरची पातळी गाठली गेलेली असते आणि त्यामुळे ज्यामधून ही जादा मागणी पुरी करावयाची तो निव्वळ विकास जास्त असतो. म्हणून दूरवरच्या दृष्टीने देखील अतिवयस्कता योजनेमुळे समाजावर जादा बोजा पडणे हे अगदी असंभाव्य ठरते इतकेच नव्हे तर परिस्थिती वस्तुत: त्याच्या उलटच असते.

अर्थात 'हस्तांतरा'साठी करावा लागणारा खर्च तरीही पडणारच. कारण अशा योजनांमुळे करांच्या बाबतीत खूप सवलती दिल्या जातात. शासकीय खर्चाच्या कोणत्याही विशिष्ट पातळीवर आणि निव्वळ सार्वजनिक शिलकीच्या इच्छित दराच्या संदर्भात इतर कोठल्याही प्रकारच्या कराच्या भत्याप्रमाणेच इतर बाबती-तील कर आकारणी जादा असली पाहिजे. (किंवा खर्च कमी असला पाहिजे.) या

सवलतींसाठी भावी काळात संभाव्य खर्च किती करावा लागेल त्याचा अंदाज वर्तविणे जरूर त्या आकडेवारीच्या अभावी कठीण आहे. सध्याचा खर्च सुमारे १०० दशलक्ष पौंड आहे; आणि पुढील पंचवीस वर्षात तो तिपटीने वाढेल असे सूचित केले जाते. तरीही अर्थातच प्रत्यक्षात येणारा निव्वळ खर्च पुष्कळच कमी असणार. त्याचे कारण मात्र कालांतराने निवृत्तीवेतनाचा ओघ सुरू होऊन त्यावर कर आकारणी सुरू झाली म्हणजे सवलतींपायी द्याव्या लागणाऱ्या रकमेचा काही भाग पुन्हा वसूल केला जाईल (आणि राष्ट्रीय मदतीखाली होणाऱ्या खर्चातूनही कांही रक्कम शिल्लक राहील) येवढेच केवळ नसून कर आकारणीतून येणारे एकूण उत्पन्न 'उभारणी काळातील' निव्वळ बचतीमुळे शक्य होणाऱ्या अतिरिक्त भांडवल गुंतवणुकीमुळे मिळू शकले असते त्यापेक्षा अधिक राहील हेही असते. वाढीव उत्पादन आणि उत्पन्न यात त्याचे प्रत्यंतर पहावयास मिळते. त्यामुळे सरकारी तिजोरीवर पडणारा खरोखरीचा निव्वळ बोजा हा या संबंधात काही वेळा जे आकडे ऊधृत केले जातात त्यापेक्षा आणि अर्थातच राष्ट्रीय विमा योजनेखालील निवृत्तीवेतनासाठी येणाऱ्या खर्चापेक्षा खूपच कमी असण्याचा संभव असतो. तथापी अधिक माहितीच्या अभावी त्याची नेमकी व्याप्ती किती असेल हे सांगता आले नाही तरी हस्तांतराच्या बोजात थोडीफार तरी भर पडणार हे उघड आहे.

## ६. आरोग्य आणि शिक्षण यासाठी येणारा खर्च

इतर बाबींवर होणाऱ्या सरकारी खर्चाची परिस्थिती काय असते? एकूण उत्पादनाच्या प्रमाणात त्यात घट होणार असली तर निवृत्ती वेतनासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चाचा बोजा यापेक्षा कितीतरी सुसह्य होऊ शकेल.

तीन प्रमुख बाबी आजच्याच अनिर्बंध पातळीवर स्थिर राहतील आणि त्यामुळे राष्ट्रीय उत्पन्नाचा एक भाग म्हणून त्यात घट होईल अशी आपल्याला अगदी रास्तपणे अपेक्षा करता येईल. निव्वळ राष्ट्रीय कर्जामुळे पडणाऱ्या बोजात सरकारच्या नाणेविषयक आणि करविषयक धोरणानुसार फरक पडत जातो. परंतु त्यात होणारी वटघट ही त्यामानाने अत्यंत मर्यादितच असते; आणि पुढील पंचवीस वर्षात त्यात विशेष अशी वाढ होईल अशी अपेक्षा करण्याचेही काही कारण नाही. हुजूर पक्षाच्या कारकिर्दीत अनुदानात निश्चितच वाढ होणार नाही. त्याचप्रमाणे पुढील प्रकरणात करण्यात आलेले प्रतिपादन ग्राह्य धरले तर मजूर सरकार अधिकारावर असले तरीही त्यात विशेष अशी वाढ होणार नाही. संरक्षणाबद्दल काहीच सांगता येत नाही. कारण ज्यांचा अंदाज वर्तवता येत नाही असे डावपेच आणि आंतरराष्ट्रीय दडपण यावर ते अवलंबून असते. परंतु आंतराष्ट्रीय परिस्थिती पार बिघडून गेली नाही- तसे झाले तर सगळेच अडाखे चुकतील—तर संरक्षण खर्च फार फार तर सध्या- इतका धरावा लागेल आणि त्यामुळे साधन संपत्तीचा भागही कमी कमी होत जाईल.

एकूण उलाढालीच्या प्रमाणाचा भाग म्हणून वरील तीन बाबी घसरल्या तर (निवृत्ती वेतन सोडून) उरलेल्या इतर सामाजिक सेवांत प्रत्यक्ष उत्पन्नाबरोबरच **'पारीपासू'** वाढ होऊ शकेल. आणि आर्थिक समस्या आटोक्याबाहेर मुळीच जाणार नाही. परंतु मुख्य प्रश्न निर्माण होतो तो हा की, या इतर सामाजिक सेवांत किती झटपट वाढ घडून येणार ?

त्यापैकी प्रथम शिक्षणाचा विचार करू. आपण हे पाहिलेच आहे की, शाळेत जाणाऱ्या मुलांच्या संख्येत होणारी संभाव्य घट अंदाजपत्रकाच्या दृष्टीने वृद्धांच्या संख्येत होणाऱ्या वाढीशी समप्रमाण असणार नाही. (विशेषत: शाळेत जाण्यापूर्वीच्या वयोगटातील मुलांतच अशी घट होणे संभाव्य असल्याने वरील विधानाची सत्यता अधिकच जाणवेल.) युद्धानंतर लगेचच्या वर्षांत जननसंख्येत भरमसाट वाढ झाल्याने शालेय विद्यार्थ्यांच्या संख्येत जो 'फुगाव' आला आहे त्यामुळे (शिक्षणाचा) खर्च अपेक्षेपेक्षाही वाढला आहे; किंवा अधिक यथार्थतेने बोलावयाचे तर शिक्षणाकडे अधिक गांभीर्यपूर्वक लक्ष पुरवले तर त्यात वाढ व्हावयास हवी. परंतु शालेय शिक्षण संपल्याने मुलांचा हा 'फुगाव' ओसरला तरीही (संभाव्य) खर्चात घट होईल अशी अपेक्षा करता येणार नाही. कारण मग आपल्याला शिक्षणाच्या कमालीच्या निकृष्ट दर्जाकडे लक्ष पुरवावे लागेल. मुलांच्या 'फुगावा'मुळे आज जे जादा शिक्षक नेमावे लागतात ( आणि इतर पूरक खर्च करावा लागतो ) ते त्यावेळी वर्गातील मुलांची संख्या कमी ठेवण्यासाठी नेमावे लागतील आणि कदाचित शिक्षणक्षेत्रात आणखी एखादी मोठी सुधारणा (उदा. शालेय शिक्षण संपविण्याचे वय १६ वर्षापर्यंत वाढविणे) घडवून आणावी लागेल. विशेषत: समान वेतनाच्या संपूर्ण अंमलबजावणीसाठी करावा लागणारा खर्च जमेस धरला म्हणजे तर हे मर्यादित उद्दिष्ट साध्य करण्यासाठी देखील चालू खर्चात सध्याच्या पातळीपेक्षा अधिक वाढ होईल हे वस्तुत: अगदी स्पष्ट आहे.

परंतु तो खर्च देखील निराशाजनक वाटण्याइतका किमान आणि जेमतेमच असेल. सध्याची वयोमर्यादा कायम ठेवावयाची आणि कर्मचाऱ्यांच्या प्रमाणात खरो-खरीची सुधारणा करणे १९६० च्या सुरुवातीपर्यंत पुढे ढकलावयाचे असा त्याचा अर्थ होईल. सरकारी आणि खाजगी शाळांचे तर सोडाच, परंतु सरकारी शिक्षण पद्ध-तीतही समान दर्जा राखता येणार नाही. आणि खरोखरी समान शैक्षणिक संधी प्राप्त करून देण्याच्या दृष्टीनेही फारसे काही करता येणार नाही. नीट लक्ष ठेवता येईल इतके लहान वर्ग बनवणे, शालेय शिक्षणात एक वर्षाची वाढ करणे, दुय्यम तांत्रिक शिक्षणाची व्याप्ती वाढवणे, बालवाड्यांची संख्या वाढवणे आणि ग्रामीण महा-विद्यालये सुरू करणे यासारख्या सुधारणा त्वरेने आणि मनापासून घडवून आणा-वयाच्या असतील तर– आणि या सुधारणा करणे म्हणजे १९४४ सालच्या शिक्षण-विषयक कायद्याची अंमलबजावणी करण्यापलिकडे दुसरे काही नाही–सध्याच्या

खर्चात कितीतरी वाढ करावी लागेल. अशा तऱ्हेने विद्यार्थ्यांच्या संख्येतील फुगाव आणि सध्याचा कमालीचा निकृष्ट दर्जा या दोन्हीमुळे सध्या शिक्षणावर जो खर्च होतो त्यात आणखी कित्येक वर्षे तरी निदान उत्पादन क्षमतेच्या मानाने कितीतरी अधिक वाढ करणे शक्य होईल आणि ते वाजवीही ठरेल. पुढील काळात एकदा शालेय विद्यार्थ्यांची संख्या स्थिरावली म्हणजे खर्चात वाढ झाली तरी तो एकदाच करावा लागेल आणि दहा पंधरा वर्षानंतर या क्षेत्रातील आपल्या सर्व अडचणी दूर होतील.

दुसरी बाब म्हणजे आरोग्य. या क्षेत्रातही खर्चात थोडीफार वाढ होणे अपरिहार्य आहे. कारण समाजातील इतर घटकांच्या मानाने वृद्धांसाठी आरोग्यविषयक बाबींवर अधिक खर्च करावा लागतो. परंतु त्यांना या बाबतीतल्या पुरेशा सवलती उपलब्ध करून देण्याच्या प्रयत्नामुळेच मुख्यत: या खर्चात वाढ झालेली असेल. ग्युलेबाँड समितीच्या शब्दात सांगावयाचे तर "खर्चात होणाऱ्या अगदी अनुपेक्षणीय खर्चापुरतेच बोलावयाचे तर‥ ‥ वेड्यांची इस्पितळे, मानसिक दौर्बल्य असणाऱ्यांसाठी असलेल्या संस्था, कायम दुखणेकरी, रुग्णालयांतील बाह्य रुग्णांचे विभाग, दंत वैद्यकाचा विभाग इत्यादीतील आजच्या उणीवा दूर करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चाचा उल्लेख करावा लागेल. यादृष्टीने आरोग्य सेवा परिपूर्ण बनवावयाची झाली तर राष्ट्रीय संपत्तीचा फार मोठा भाग इतर बाबींवरून काढून इकडे वळवावा लागेल. आणि इतके करून ती "परिपूर्ण" झाली तरी खर्चात सतत वाढ करीत गेल्याशिवाय ती तशी कायम टिकेल की नाही हेही पुन्हा नि:संदिग्धपणे सांगता येत नाही. वैद्यकीय ज्ञानात सतत जी वाढ होत आहे त्यामुळे रुग्णांवर करावयाच्या औषधोपचार पद्धतीत आणि खर्चातही एकसारखी वाढ होत आहे आणि आयुष्य लांबवत गेल्याने हळूहळू मृत्यू येणाऱ्या रोगांवर कराव्या लागणाऱ्या खर्चातही वाढ होत जाते.... वैद्यकीय ज्ञानात होणाऱ्या वाढीबरोबर आरोग्यविषयक सेवेवरही सतत जादा मागण्यांचा भार पडू लागतो आणि जनतेच्या त्यासंबंधीच्या मानदंडाच्या बाबतीतील अपेक्षाही वाढत जातात. म्हणून पुरेशी आरोग्यसेवा उपलब्ध करून द्यावयाची असे उद्दिष्ट आपण डोळ्यापुढे ठेवले तर एकूण उत्पादनाच्या मानाने आरोग्यविषयक खर्चातही खूप वाढ होण्याचा संभव दिसतो.

अशा तऱ्हेने लोकसंख्येतील चढउतार आणि त्याच्या जोडीला उच्च राहणीमानासाठी येणारे सर्वस्वी समर्थनीय आणि जोरदार दडपण यामुळे आरोग्य आणि शिक्षण यावरील विद्यमान खर्चात काहीशा झपाट्याने वाढ करावी लागणे सहज शक्य आहे. इतर सेवांच्या बाबतीत लोकसंख्येमुळे खर्चावर परिणाम घडून येत नसला तरी वाढत्या राहणीमानाचे दडपण मात्र येतच राहते. भत्ता मिळण्यास पात्र असलेल्या मुलांच्या संख्येत फारशी वाढ होणार नसल्याने सध्याच्या दराने मिळणारा

कुटुंबभत्ता जवळपास आहे तितकाच राहील; परंतु पहिल्या मुलांना तो भत्ता लागू करावयाचा झाला तर त्यासाठी शंभर दशलक्ष पौंड जादा खर्च करावे लागतील. सरासरी प्रत्यक्ष उत्पन्नात जसजशी वाढ होत जाईल तसतशी बिगर निवृत्तीवेतन विम्याच्या सवलतीत वाढ होत जाईल. युद्धोत्तर काळातील कर्जवाटप अधिक उदारतेने केले जावे म्हणून येणारे राजकीय दडपणही जबरदस्त आहे. तसेच अनुदानात वाढ करावी, इतकेच नव्हे तर इतर सर्व नव्या किंवा व्यापक बाबींवर खर्च केला जावा म्हणून येणारे दडपणही, विशेषत: मजूर सरकारला अतिशय भारी पडणे अपरिहार्य आहे. पंचवीस वर्षांच्या पुढील काळावर नजर टाकली तर या सर्व सुधारणा सहज घडवून आणता येतील. परंतु इतर सरकारी खर्चात वटघट होणार नसली तरी देखील पहिली पंधरा वर्षे मात्र त्यामुळे फार गंभीर अशा आर्थिक समस्येला तोंड द्यावे लागेल.

भांडवलाच्या किंमतीमुळे करारासंबंधीचे प्रश्न निर्माण होत असल्यामुळे त्या बाबीचाही विचार करावा लागेल. बेकारीचे समूळ उच्चाटन केले, सामाजिक गुंतवणुकीत वाढ केली तरी त्याबरोबरच खाजगी बचतीत वाढ करून आश्चर्यकारक रीतीने समतोल साधला गेला नाही तर त्यासाठी शिलकी अंदाजपत्रकाद्वारे सरकारी बचतीत तितकीच वाढ करावी लागेल. आणि त्यासाठी पुन्हा जादा करआकारणी तरी करावी लागेल, नाही तर विद्यमान खर्चाला तरी कात्री लावावी लागेल.

सध्याच्या आपल्या सामाजिक भांडवलाची कमालीची निकृष्ट पातळी आणि त्यामुळे सतत होणारी जादा खर्चाची मागणी यातून ही समस्या उभी राहते. दोन युद्धांच्या दरम्यान बऱ्याच मागण्यांकडे दुर्लक्ष झाल्यामुळे आणि युद्धकाळात तर नवनिर्माणाचे काम जवळजवळ बंदच पडल्यामुळे खर्चाचा फार मोठा बोजा आधीच तुंबून राहिला होता. युद्धसमाप्तीनंतरही भांडवल गुंतवणुकीच्या कार्यक्रमात सामाजिक सेवांना फार खालचा अग्रक्रम मिळत असून गुंतवणुकीत कपात करावयाची पाळी आली म्हणजे मात्र त्यांच्यावरच पहिली कुऱ्हाड कोसळते. त्याचा परिणाम असा होतो की, शाळेत मुलांची भयंकर गर्दी उसळते, रुग्णालयात अनावस्था परिस्थिती निर्माण होते. गलिच्छ वस्त्यांचे उच्चाटन मागे पडते आणि मानसिक दृष्ट्या अधू असलेल्या मुलांसाठी असणाऱ्या मानसोपचार संस्था किंवा शिक्षणसंस्था यांसारख्या विशेष सवलतींची तीव्र टंचाई भासू लागते; अनेक वर्षांपूर्वी मोठा गाजावाजा करून सुरू करण्यात आलेल्या भांडवली खर्चाच्या काही नव्या योजना नुसत्या कागदावरच राहतात (उदा. आरोग्य केंद्रे आणि ग्रामीण महाविद्यालये). आणि सामाजिक सेवांची कक्षा गरिबांना केवळ काही मदत पोचविण्यापासून तो सार्वजनिक आरोग्य, शिक्षण आणि सामाजिक भांडवल यांचा दर्जा जवळपास श्रीमंतांना उपलब्ध असलेल्या अशा बाबींच्या बरोबरीचा आणून ठेवण्याइतकी वाढवावयाची असे म्हटले म्हणजे तर अशा खर्चात खूपच वाढ होणार.

म्हणजे पुन्हा एकदा ही समस्या मुख्यत: पुढील काही वर्षांपुरती आणि तावडतोबीच्या मागणीचीच ठरते. शाळेतील मुलांच्या संख्येत झालेली वाढ, आरोग्य सेवेच्या उभारणीचे मागे पडलेले काम, घर दुरुस्तीच्या आणि गलिच्छ वस्तींच्या उच्चाटणाच्या समस्या या सर्वांचा वाढत्या औद्योगिक भांडवलगुंतवणुकी-वर जो भार पडतो त्यामुळे ही समस्या निर्माण होते. आणखी काही वर्षांच्या सघन भांडवलगुंतवणुकीनंतर परिस्थिती पुष्कळच सुधारेल. १९६०–६५ सालापर्यंत (जुन्या इमारती बदलण्याऐवजी) शाळांसाठी नव्या इमारती बांधण्याचा कार्यक्रम जवळजवळ पुरा झालेला असेल, आणि घरांच्या बाबतीतील बहुतेक सर्व कमतरता आणि आरोग्यविषयक बाबींपैकी काही उणीवा भरून काढलेल्या असतील. परंतु १९६० च्या पूर्वी आपल्या सामाजिक भांडवल गुंतवणुकीत सुधारणा घडवून आणू इच्छिणाऱ्या कोणत्याही सरकारला साधनांची कमालीची टंचाई भासणार.

यावरून असे दिसून येईल की, उतार वयाला लागलेल्यांच्या लोकसंख्येमुळे पडणाऱ्या बोजासंबंधीच्या चर्चेमधून काहीसे चुकीचे निष्कर्ष निघतात. वयोमानाच्या गटात होणारे बदलच तेवढे लक्षात घेतले आणि पंचवीस वर्षांच्या कालखंडातील उपलब्ध साधनसामुग्रीच्या अनुषंगाने त्याचा विचार केला तर चिंताजनक अशी कोणतीच समस्या आपल्याला भेडसावणार नाही. खरी समस्या वेगळीच आहे. एक तर अगदी पूर्णांशाने जरी नाही तरी मुख्यत्वेकरून ती साधनसंपत्तीपेक्षा देखील अर्थविषयक धोरणाचीच खरी समस्या आहे. दुसरे असे की, काही अंशी वयो-मानाच्या गटातील स्थित्यंतर आणि काही अंशी तुंबून राहिलेल्या खर्चाच्या अवाढव्य रकमा यामुळे मुख्यत: दहा वर्षांपुरतीच ही समस्या आहे. आणि तिसरे म्हणजे, अर्थव्यवस्था आज आधीच पार ताणली गेली असल्यामुळे, तसेच खर्चाच्या इतर अनेक मागण्या आणि ऐतिहासिक मानदंडाच्या दृष्टीने पहाता आधीच वाढलेली आणि आजच्या पातळीपेक्षा अधिक वाढविता न येण्यासारखी होऊन बसलेली कर-आकारणी यामुळे ती समस्या तीव्र होऊन बसली आहे.

## ७. विम्याचे तत्त्व

विम्याच्या तत्त्वाची व्याप्ती वाढवून करआकारणीची ही समस्या दूर सारता येण्याचा काही संभव आहे का ?

या तथाकथित तत्वाचा काथ्याकूट करण्यात आजवर खूप शाई खर्ची पडली आहे. परंतु सत्य परिस्थिती अशी आहे की, राष्ट्रीय विमा योजनेत सर्वसाधारणपणे ज्याला तत्व असे म्हणतात ते फारच थोडे आहे. धोक्याशी हप्त्याची किंवा हप्त्याशी विमाधारकाला मिळणाऱ्या फायद्याची कसलीही सांगड घालण्यात आलेली नाही. विम्याच्या दराच्या दृष्टीने ती योजना स्वयंपूर्ण नसून सरकारी तिजोरीतून (अधिकाधिक) अनुदान त्यासाठी घेण्यात येत आहे. राखीव निधीचा उपयोग त्या

योजनेच्या अर्थव्यवस्थेला स्थैर्य प्राप्त करून देण्यासाठी केला जात नाही तर सरकारच्या कर्जविषयक व्यवस्थेसंबंधीच्या दैनंदिन गरजा भागविण्यासाठीच केला जातो. विमाधारकांकडून हप्त्याच्या रूपाने गोळा होणारा निधी आणि खर्चाबाबतच्या जबाबदाऱ्या या दोहींवरही सरकारी धोरणाचा प्रत्यक्ष परिणाम घडून येऊ शकतो.

अशा तऱ्हेने राष्ट्रीय विम्यात नेहमीच्या विमा पद्धतीचा यत्किंचितही आविष्कार झालेला दिसत नाही. उलट सामाजिक बाबींवरील खर्चाची तरतूद करण्याचीच केवळ ती एक पद्धत असून पुष्कळदा ती सोयीस्कर ठरते म्हणूनच तिचा अवलंब केला जातो. कामगारांकडून जमा होणारा निधी हा सर्व नोकरांकडून वसूल होणाऱ्या सरसकट ‘पोल टॅक्स’ इतका असतो तर मालकवर्गाकडून गोळा होणारा निधी हा मजूरवर्गाच्या रोजगारीवरील अप्रत्यक्ष कराइतका असतो.

म्हणून ‘विम्याच्या तत्वाच्या’ बाजूने करण्यात येणारे बहुतेक सर्व युक्तिवाद चुकीच्या समजुतीवर आधारलेले असतात. उदा. असे सांगितले जाते (उदा. बीव्हरीज अहवालात) की, सामाजिक विम्यासाठी द्याव्या लागणाऱ्या निधीमुळे त्यापासून मिळणारे फायदे ही कोणाची मेहरबानी न राहता ‘हक्का’ची बाब बनत असल्याने ब्रिटनमधील जनता सामाजिक विम्याची पद्धतीच पसंत करते. परंतु वस्तुतः ती तसे काहीच करीत नसते. कारण त्यांना जी रक्कम त्या निधीत भरावी लागते ती त्यांना मिळणाऱ्या फायद्याच्या दृष्टीने पुरेशी नसते आणि सर्वसाधारण करामधून त्यासाठी अनुदान द्यावे लागते. अर्थात त्यामुळे जनतेला मिळणारे फायदे ही कोणाच्या मेहरबानीची बाब ठरत नाही. कारण त्यासाठी लागणारा खर्च या ना त्या मार्गाने जनतेलाच सोसावा लागतो – मग तो निधीत भराव्या लागणाऱ्या रकमेच्या द्वारा असो वा करांच्या द्वारा असो– त्याचप्रमाणे सामाजिक विम्यासारख्या योजनांचे फायदे की, जे लोकांनी भरलेल्या रकमांमधून भागवले जातात असे ढोबळमानाने समजले जाते, त्यापेक्षा कुटुंबभत्ता किंवा आरोग्य सेवा यांसारख्या करांतून भागवल्या जाणाऱ्या फायद्यांकडे निराळ्या दृष्टीने पाहिले जाते असे म्हणण्यासारखा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. (वस्तुतः कोणत्या फायद्यासाठी कोणता पैसा वापरला जातो त्यासंबंधी बहुतेक लोक अंधारातच असतात.)

त्याचप्रमाणे विम्याच्या तत्त्वाविरुद्ध केले जाणारे युक्तिवादही मोठे परिणामकारक किंवा बिनतोड असतात असे नाही. विम्यासाठी द्यावे लागणारे हप्ते म्हणजे प्रतिगामी स्वरूपाची करआकारणीच होय अशी टीका केली जाते. वस्तुतः ते तसे आहेतही. परंतु त्यांचा बोजा मुख्यतः कामगारांवरच पडला असला तरी सामाजिक सेवांच्या खर्चाची तरतूद करण्यासाठी तो बसवण्यावाचून गत्यंतर नसते. अशा अनेक अप्रत्यक्ष करांहून ते अधिक प्रतिगामी खासच नसतात. शिवाय असेही प्रतिपादन केले जाते की, राष्ट्रीय विमा योजनेमुळे शासन व्यवस्थेवर निष्कारण खर्चाचा जो

बोजा पडतो तो विम्याचे तत्त्व सोडून दिले असते तर टाळता आला असता, आणि ती योजना प्राप्तीकर आणि रोख रकमेत होणारे सर्व प्रकारचे फायदे यांचा अंतर्भाव असलेल्या एकाच संयुक्त यंत्रणेत सामावून घेता आली असती; परंतु रॅडक्लिफ कमिशनने हा दृष्टीकोन उचलून धरलेला नाही. असेही म्हटले जाते की, विम्याच्या हप्त्यामुळे वेतनाच्या उत्पन्नावर असह्य भार पडतो. परंतु १९४६ साली ही योजना लागू करण्यात आल्यापासून हप्त्याच्या मानाने आठवड्याच्या उत्पन्नात वस्तुतः वाढच झाली आहे.

यातून सर्वात शहाणपणाचा मार्ग म्हणजे 'विम्याच्या तत्वा'संबंधीच्या गूढ चर्चेत गुरफटून न जाता भराव्या लागणाऱ्या हप्त्यांकडे सामाजिक सेवांच्या विशिष्ट भागासाठी लागणारा खर्च उपलब्ध करून देणारा तो एक प्रकारचा प्रतिगामी कर आहे म्हणूनच त्याकडे बघावयाचे. त्यात वाढ करावी की, कपात करावी ते अजिबात रद्दच करून टाकावेत की, ते उत्पन्नानुसार वसूल करण्यात यावेत अगर त्याच्या जागी सामाजिक सुरक्षितता कर बसविण्यात यावा या सर्व प्रश्नांचा विचार (अ) सर्व प्रकारच्या सामाजिक सेवांचा खर्च भागविण्यासाठी लागणारा एकूण महसूल आणि (ब) विम्याच्या हप्त्यासकट एकूण करपद्धती किती प्रमाणात पुरोगामी आहे ते पाहून त्या संदर्भात करावा लागेल.

सामाजिक सेवांसाठी लागणारा पैसा कोणत्याही परिस्थितीत कामगार वर्गावर कर लादूनच बव्हंशी उभा करावा लागेल असे दिसून येत असेल (आणि तसे ते निश्चितच दिसून येते), आणि प्रोत्साहक दृष्टीने करयोजना ही एकंदरीने शक्य तेवढी पुरोगामी स्वरूपाची असेल तर कामगार वर्गावर बसविण्यात येणाऱ्या इतर प्रकारच्या करांपेक्षा विम्याचे हप्ते काही विशिष्ट बाबतीत निश्चितच फायदेशीर ठरतात. फार करून ते कोणाच्या लक्षात येत नाहीत आणि त्यामुळे ते इतर करांइतके अप्रिय ठरत नाहीत. प्रोत्साहनाला त्यामुळे बाधा येत नाही. कारण मिळकतीनुसार त्यात बटघट होत नाही. कोणत्याही अप्रत्यक्ष करापेक्षा लोकसंख्येच्या फार मोठ्या विभागाकडून ते वसूल करता येतात. आणि प्रत्यक्ष वस्तुस्थिती काहीही असली तरी ज्यांना सामाजिक सुविधांचा फायदा मिळणार त्यांनीच त्याचा भार उचलला पाहिजे हे पटवून देणे मानसिकदृष्ट्या सोपे जाते. परंतु या ठिकाणी कोणत्याही तत्त्वाचा संबंध नसून एकंदर करपद्धती विचारात घेऊनच त्यासंबंधीचा अंतिम निर्णय घ्यावा लागेल. ते कसेही असो, संभाव्य खर्चाची समस्या त्यामुळे सुटू शकत नाही आणि समाजकल्याणाची आकांक्षा पुरी करण्याच्या प्रयत्नात समाजवाद्यांपुढे हेच मुख्य आवाहन असते.

● ● ●

## प्रकरण सातवे

# सामाजिक खर्चाची उद्दिष्टे

### १. हुजूर पक्षीय दृष्टीकोण : साधनांच्या कसोटीचा आग्रह

समाज सेवांचे मूलभूत उद्दिष्ट काय यासंबंधीची स्पष्टता असल्याशिवाय आणि त्या अनुषंगाने अग्रक्रम कशाला द्यावयाचा ते निश्चित झाल्यावाचून समाज-कल्याणासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चाचे आव्हान स्वीकारता येणार नाही.

या उद्दिष्टांसंबंधीचे सुस्पष्ट निवेदन सर्वप्रथम हुजूर पक्षाने प्रसिद्ध केले. त्या पक्षाच्या दोन प्रमुख पुढाऱ्यांनी प्रसिद्ध केलेल्या एका पुस्तकात ते ग्रथित करण्यात आले आहे. त्यापैकी एकजण पुढे आरोग्य मंत्री झाले. 'फेरवाटप हे समाजसेवांचे वैशिष्टच आहे असे मानले तर सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, गरजेसंबंधी खात्री करून घेतल्यानंतरच त्या उपलब्ध करून दिल्या जातील. म्हणजेच एखाद्या व्यक्तीच्या किंवा तिच्या कुटुंबाच्या मिळकतीतून समाजसेवेची ती बाब आर्थिक दृष्टया त्याला मिळणे शक्य होणार नाही असे दिसेल त्याचवेळी ती सेवा त्याला मिळेल. अन्यथा साधनसामुग्रीची जमवाजमव करून त्याचे वाटप करावयाचे आणि त्यामुळे लोकांना पूर्वीच्याच सवलती उपभोगावयास मिळावयाच्या आणि ती एक नसती उठाठेव होऊन बसावयाची.' किंवा पॉवेल यांनी नंतर एके ठिकाणी म्हटल्या-प्रमाणे 'ह्या दृष्टीकोणात गरज काय आहे ते नक्की करून घेणे ही गरजा भाग-विण्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक अशी प्राथमिक बाब होऊन बसते. अर्थात ज्याला "साधनांची कसोटी" म्हणून संबोधिले जाते त्यात अभिप्रेत असलेल्या आजच्या भावनात्मक आणि राजकीय आशयापेक्षा गरज काय आहे ते नक्की करून घेण्याचे प्रकार निरनिराळे असू शकतील. साधनांची कसोटी आणि निव्वळ समाजसेवा अवि-भाज्य आहेत.

प्रत्येक नागरिक कराच्या रूपाने जेवढी रक्कम भरतो नेमके तेवढ्या रकमे-चेच फायदे त्याच्या पदरात पडतात हे जवळपास असंभाव्य असल्यामुळे या ना त्या

स्वरूपातील फेरवाटप हे समाजसेवांचे वैशिष्टय असल्याचे कोणालाही कबूल करता येईल. आणि जरी प्रत्येक नागरिक आपल्याला मिळणाऱ्या फायद्याइतकीच रक्कम कररूपाने भरतो असे मानले तरी समाजसेवांचा कार्यक्रम निरर्थक ठरेल कारण परिणामी त्याचा खर्चाचा ढाचा निराळा असू शकेल. उदा. एखादा नागरिक कसलेही कर भरीत नसला किंवा समाजसेवांचे कसलेही फायदे अस्तित्वातच नसते तरी देखील त्यांच्या मुलांना अधिक शिक्षण मिळू शकेल.

परंतु फेरवाटप हे उत्पन्नाच्या दृष्टीने समान पातळीवर देखील निश्चित असू शकेल. उत्पन्नाच्या प्रत्येक पातळीवर अविवाहितांकडून कुटुंबवत्सलांना, रोजगार असणारांकडून बेकारांना, निरोग्यांकडून आजाऱ्यांना आणि तरुणांकडून वृद्धांना अशा प्रकारची सर्व हस्तांतरे ही सामान्यत: सामाजिक सेवांतच गणली जातील. ह्या सर्वांत उत्पन्नाचे फेरवाटप होईल. 'लोकांना ज्यामुळे फक्त पूर्वीइतकाच सुविधांचा उपभोग घेता येईल अशा तऱ्हेची साधनांची निरर्थक आणि निष्फळ जमवाजमव आणि वाटप' असा प्रकार त्यात संभवणार नाही. तरीही कोणाला साधनांची कसोटी पाहण्याची किंवा गरज पडताळून पाहण्याची आवश्यकता भासणार नाही.

वरच्या श्रेणीतील लोकांकडून खालच्या श्रेणीतील लोकांकडे अशी फेरवाटपाची संकुचित व्याख्या केली आणि त्या अनुषंगाने नग सामाजिक सेवा म्हणजे अशा तऱ्हेचे फेरवाटप असा अर्थ केला तर त्यावरून गरजेसंबंधीचा पुरावा आणि आर्थिक असमर्थता याविषयीचे वरील निष्कर्ष निघतात आणि साधनांची कसोटीही मग अपरिहार्य ठरते. इतकेच नव्हे तर ती सामाजिक सेवांसंबंधीच्या धोरणामागील मध्यवर्ती कल्पना ठरते. अर्थात सामाजिक सेवांची अशी व्याख्या करण्याचे काहीच कारण नाही आणि प्रत्यक्षात बहुतेक लोक तशी ती करीत नाहीतही. ती व्याख्या संपूर्णपणे मनमानी असून सामाजिक सेवांचे स्वरूप कसे असावे यासंबंधी सदर लेखकांच्या ज्या कल्पना आहेत त्याबाबतचे एक शिफारसवजा निवेदन या पलीकडे त्या व्याख्येला काही अर्थ नाही. आणि ती शिफारसही परिणामी गेल्या शतकातील 'पूअर लॉ' मध्ये आणि अगदी अलिकडच्या राष्ट्रीय किमानाच्या कल्पनेत 'गरिबी' संबंधीचा जो दृष्टीकोण गृहीत धरलेला आहे तो परत स्वीकारला जावा या दृष्टीनेच करण्यात आलेली आहे.

म्हणून, मुळात व्याख्या नसलेल्या पण तसे भासविणाऱ्या निवेदनांकडे दुर्लक्ष केल्यानंतर या दृष्टीकोणासंबंधी काय म्हणता येईल ? एक तर मूलभूत रोखीच्या सवलतींना लागू करण्यात आलेली साधनांची कसोटी अत्यंत खऱ्याखुऱ्या कारणांसाठी नापसंत असते ती केवळ 'भावनात्मक किंवा राजकीय' कारणांमुळे नापसंत असते असे म्हणता यावयाचे नाही. कामगार वर्गाच्या वचतीच्या दृष्टीने ती अप्रतिष्ठेची, अपमानास्पद आणि अत्यंत हानीकारक ठरणारी आहे. मिळणारे फायदे केवळ मेहर-

बानी म्हणून मिळणार आहेत आणि स्वतःच्या पायावर उभे राहण्याची असमर्थता असल्याची आणि स्वातंत्र्य गमावल्याची कबुली त्यात ध्वनित होत असल्याने त्या कसोटीबद्दल असंतोष व्यक्त केला जातो. हा संताप देखील खरोखरी नागरी सुदृढतेचेच निश्चित द्योतक आहे असे म्हणावे लागेल. ती इतकी अप्रिय असल्यामुळेच तिचे उद्दिष्ट सफल होऊ शकत नाही. कारण अनेक लोक त्यापेक्षाही मुकाट्याने हाल-अपेष्टा सहन करायला तयार होतात परंतु मदत मंडळाकडे (असिस्टन्स बोर्डाकडे) अर्ज करीत नाहीत.

दुसरे असे की, यामुळे समाजातील सर्वांत खालचा आणि दरिद्री वर्ग समाजापासून अलग पडत असल्याने आणि सार्वजनिक पैशावर जगणाऱ्यांचा दर्जा त्यांना प्राप्त होत असल्याने (निदान त्यांच्यात तशी भावना निर्माण होते मग ती तर्कसंगत असो वा नसो) या दृष्टीकोणामुळे सामाजिक समतेच्या तत्त्वाला बाध येतो. तिसरे असे की, जे आर्थिक विपत्तीत असतील त्यांच्यात उत्पन्नाचे फेरवाटप करण्यापुरतीच सामाजिक सेवांमागील कल्पना मर्यादित आहे असे यात गृहीत धरले जाते. परंतु वस्तुतः यापूर्वीच स्पष्ट केल्याप्रमाणे आर्थिक गरजेशी प्रत्यक्ष संबंध नसलेली सार्वजनिक खर्चाची इतरही अनेक निकडीची उद्दिष्टे असू शकतात.

आणि शेवटचा मुद्दा असा की, केवळ खर्चामुळेच नव्हे तर तत्त्व म्हणूनही सार्वजनिक खर्च अत्यंतिक किमान मर्यादेवर आणून ठेवावयाचा असे त्यात अभिप्रेत असल्यामुळे तो दृष्टीकोण अत्यंत आक्षेपार्ह वाटतो. याउलट पाचव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे याबाबतचा समाजवादी दृष्टीकोण असा असतो की, सामाजिक विपत्ती हलक्या करण्याला अगदी प्रथम क्रमांक दिला पाहिजे. आणि तसे करावयाचे म्हणजे प्रत्येक सामाजिक सेवा उपलब्ध करून देण्यापूर्वी साधनांची कसोटी पाहण्याचा आग्रह धरणारांपेक्षा किती तरी अधिक उदार दृष्टीकोण स्वीकारावयास हवा.

## २. समाजशास्त्रज्ञांचा दृष्टीकोण : मुक्त सार्वत्रिकता आणि सामाजिक समता

असे जर आहे तर मग दुसऱ्या टोकाला जाऊन असे म्हणावयाचे का की, यच्चयावत फायदे—मग ते रोखीच्या स्वरूपातील असोत वा वस्तूंच्या स्वरूपातील असोत—ते सार्वत्रिक आणि विनामूल्य असले पाहिजेत आणि खरोखरी त्यांची गरज आहे की नाही हे सिद्ध करण्याचे बंधन त्या फायद्यांचा उपभोग घेणाऱ्यांवर असता कामा नये. संपूर्ण सामाजिक सेवांची बैठक ही एक तर सामाजिक समता प्रस्थापित करणे आणि दुसरे म्हणजे 'अनिर्बंध सार्वत्रिकता' ही सामाजिक समतेसाठी आवश्यक असणारी बाब मानणे या दोन गृहीत कृत्यांवरच संपूर्ण 'अनिर्बंध सार्वत्रिकतेच्या' तत्त्वांचा आग्रह धरण्यात येतो. त्यापैकी दुसऱ्या गृहीत तत्त्वाचा उहापोह आता करू.

असे म्हटले जाते की, सार्वत्रिक फायदे हे सामाजिक समतेचे प्रतीक असून जणू काही सर्वांना नागरिकत्वाची निशाणीच त्यामुळे दिली जाते. समाजातील गरीब-श्रीमंत; गरजू–बिगर गरजू अशा भिन्नभिन्न वर्गातील सार्वजनिक तफावतीला थारा मिळत नाही. श्रीमती बारबारा बूटन यांनी असे म्हटले आहे की, 'गरीब आणि श्रीमंत या दोघांवरही फायद्यांची सारखीच खैरात करण्यापाठीमागील सर्वात महत्त्वाचा मुद्दा हा की, त्यामुळे कोण गरीब आहे आणि कोण नाही हे कोणाला समजावयाचे कारणच नाही.' आणि प्रा. मार्शल यांनी दर्जातील समानतेबद्दल लिहितांना असे म्हटले आहे की, सार्वजनिक सेवांबरोबर ती आपोआपच येते. रोखीच्या स्वरूपात फायदे दिले जातात त्यावेळी देखील एका नव्या समान अनुभवाच्या द्वारा निरनिराळे वर्ग एकजीव होत असल्याचे दृष्य बाह्य स्वरूपात व्यक्त होते. प्रत्येकाचे स्वतःचे विमा कार्ड असणे आणि नियमितपणे त्यावर शिक्का उठवून घेणे किंवा निवृत्ती वेतन घेऊन येणे यासाठी कोणत्या दिव्यातून जावे लागते ते सर्वांच्याच अनुभवास येते. परंतु जेव्हा फायदे रोखीच्या स्वरूपात न मिळता प्रत्यक्ष सवलतींच्या स्वरूपात मिळतात तेव्हा त्यातील गुणात्मक भाग ते ज्या पद्धतीमार्फत प्राप्त होतात त्या पद्धतीतच केवळ नव्हे तर त्या फायद्यातच समाविष्ट होतात. म्हणून अशा सेवांच्या व्याप्तीचा सामाजिक भेदाभेदातील गुणात्मक बाजूवर फार मोठा परिणाम घडून येतो. 'एक्स एलमेंटरी' शालेय विद्यार्थी आणि 'पॅनेल पेशंट' यांसारखी लेबले नाहीशी होतात, वर्गीय भेदाभेद अंधुक होत जातात आणि सबंध समाज एकात्म बनतो.

प्रत्येकजण आता विमा कार्डधारक असतो आणि प्रत्येकालाच त्यासाठी स्थानिक टपाल कचेरीत जावे लागते ही वस्तुस्थिती सामाजिक समता दृढमूल करण्यास खरोखरी कितपत उपयोगी पडते याची शंकाच आहे. रोख रकमेच्या स्वरूपात मिळणारे हे फायदे सुस्थितीतील लोकांच्या एकूण उत्पन्नाच्या मानाने त्यांच्या जीवनात विशेष तफावत पडण्याच्या दृष्टीने अत्यंत तोकडे असतात–श्रीमंत लोक ते फायदे प्राप्त करून घेण्याच्याही फारसे भानगडीत पडत नाहीत. श्रीमंत आणि गरीब यावर फायद्यांचा वर्षाव केला तरी गरीब कोण आणि श्रीमंत कोण हे दडून राहात नाही. गरीब आणि श्रीमंत वर्ग अजिबात नष्ट झाला तरच हे शक्य आहे. आणि ते साध्य करावयाचे असेल तर सार्वत्रिक निर्वाह सवलतीच्या कितीतरी पुढची मजल मारावी लागेल.

आपण ज्यावेळी प्रत्यक्ष स्वरूपातील सेवांचा विचार करू लागतो त्यावेळी मात्र सामजिक समतेशी, विशेषतः आरोग्य आणि शिक्षण या क्षेत्रात प्रत्यक्ष दुवा सांधला जातो. सरकारकडून खाजगी क्षेत्राच्या मानाने मुक्तहस्ताने आणि खरोखरीच उच्च दर्जाच्या शाळा आणि रुग्णालये, शिक्षक आणि डॉक्टर्स उपलब्ध करून दिले जात असतील तर त्याचा परिणाम प्रत्यक्ष उत्पन्नात अधिक समता निर्माण होण्या-

पेक्षांदेखील सामाजिक जीवनाच्या घाटणीतच निश्चित अधिक समानता निर्माण होण्यात होईल. उदाहरणार्थ स्वीडनमध्ये खाजगी शाळांचा किंवा रुग्णालयांचा क्वचितच कोणी अवलंब करतात, मग त्यांचे उत्पन्न कितीही असो. काही अंशी त्याला तशीच काही ऐतिहासिक कारणे असली किंवा ब्रिटनपेक्षा तेथील संपत्तीचे वाटप अधिक समप्रमाणात झालेले आहे हेही काही अंशी खरे असले तरी तेथील सरकारी शाळा किंवा रुग्णालये यांचा दर्जा डोळयात भरण्याइतका उच्च प्रतीचा असतो हेही त्याचे तितकेच महत्त्वाचे कारण आहे. सर्व वर्गांतील नागरिकांची मुले एकाच शाळेत जातात आणि एकाच प्रकारच्या रुग्णालयाच्या सुविधांचा उपयोग करून घेतात (आणि ब्रिटनपेक्षां कितीतरी अधिक प्रमाणात एकाच प्रकारच्या नव्या गृहनिर्माण वसाहतीत जाऊन राहतात) याचादेखील सामाजिक समतेची भावना निर्माण करण्याच्या आणि विशेषत्वाची भावना कमी करण्याच्या दृष्टीने फार प्रभाव पडतो.

परंतु हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी या सेवा सर्वांना विनामूल्य उपलब्ध करून दिल्या पाहिजेत किंवा साधनांची छाननी न करता त्या उपलब्ध करून दिल्या पाहिजेत असे मुळीच नाही. त्याचप्रमाणे त्यांचा सार्वत्रिक अवलंब झाला पाहिजे असेही नाही. मुख्यत: हा तुलनात्मक राहणीमानाचाच प्रश्न आहे. खाजगी व्यवस्थे-पेक्षा सरकारी व्यवस्थेत अत्यंत खालावलेला दर्जा असेल तर सामाजिक भेदाभेद अपरिहार्य होऊन बसतात. परंतु हे अंतर जसजसे कमी होत जाईल आणि मिळ-णाऱ्या सुविधांत खरोखरीचा तौलनिक सारखेपणा येत जाईल तसतसा सार्वजनिक सेवांवर मारला जाणारा निकृष्ट हा शिक्का शिल्लक उरणार नाही. मग त्या सेवा संपूर्णपणे विनामूल्य आणि सार्वत्रिक असोत वा नसोत; अर्थात त्यांचा दर्जा जसजसा सुधारत आईल तसातसा साहजिकच त्यांचा सर्रास फायदा घेतला जाऊ लागेल.

शिक्षण क्षेत्रात सरकारी आणि खाजगी अशा दोन्ही प्रकारच्या शाळा बरोबरीने अस्तित्वात असल्या तरी एका पिढीपूर्वी सरकारी शाळांचा दर्जा जितका निकृष्ट होता तितका तो आज राहिलेला आही. आणि 'एक्स एलमेंटरी स्कूल बॉय' हा शब्दप्रयोगदेखील आता मागे पडला आहे. अर्थात सरकारी शिक्षणसंस्थातील शिक्षणाचा दर्जा जवळपास खाजगी शिक्षण संस्थाच्या बरोबरीने आला असल्यामुळे तो शब्दप्रयोग आता अस्तंगत झाला आहे. उलटपक्षी अद्यापही सरकारी आणि खाजगी शिक्षण संस्थातील शैक्षणिक दर्जात खूपच तफावत पडते आणि सरकारी शाळांतील फीचे प्रमाण काहीही जरी असले तरी दोहोंच्या दर्जात जोपर्यंत तीव्र तफावत आहे आणि खाजगी शाळातील विद्यार्थ्यांना जोपर्यंत कितीतरी पटीने अधिक चांगल्या शिक्षणाचा लाभ होत आहे तोपर्यंत ही तफावत रहाणारच.

त्याचप्रमाणे घरांच्या बाबतीत देखील युद्धपूर्व काळात "कौन्सिल हाऊस" म्हटल्याबरोबर जो एक सामाजिक आशय ध्वनित होत असे तो आता होत नाही.

या कौन्सिल हाऊसमधून वाढत्या प्रमाणावर लोक राहू लागल्यामुळे हा बदल घडून आला आहे असे नव्हे; किंवा काही काळपर्यंत उत्पन्नाची छाननी केल्याशिवाय घर बांधणीसाठी अधिक अनुदान दिले जात असे म्हणून तर नव्हेच नव्हे. हा बदल घडून येण्याचे मुख्य कारण असे आहे की, नगरपालिकांच्या नव्या घरांचा दर्जा खाजगी घरांच्या तुलनेने आता पुष्कळच सुधारला आहे. वस्तुतः युद्धानंतरची काही वर्षे तर या दोन प्रकारच्या घरात जवळपास कसलाच फरक नव्हता. आणि मजूर पक्षाने सुचविल्याप्रमाणे यापुढे निकृष्ट दर्जाच्या आणि मोडकळीस आलेल्या जुनाट खाजगी इमारती नगरपालिकांच्या ताब्यात द्यावयाचे ठरविले तर राहण्याच्या बाबतीत जी सामाजिक विषमता राहील ती घरांच्या आकारमानावर किंवा त्यासाठी दिल्या जाणाऱ्या अनुदानाच्या संबंधात असणार नाही तर घरबांधणीच्या रचनेत जी तफावत असेल तेवढ्यापुरतीच उरलेली दिसेल.

आरोग्याच्या बाबतीतही अशीच परिस्थिती आहे. जे लोक नॅशनल हेल्थ सर्व्हिसचा फायदा घेतात त्यांची आता 'पॅनल पेशंट' म्हणून कुचेष्टा केली जात नाही. मध्यमवर्गीतील लोक फार मोठ्या प्रमाणावर या योजनेचा फायदा घेतात आणि जे घेत नाहीत त्यांचा दर्जा मोठा वरचा आहे असेही कोणी मानीत नाही. तरीही या योजनेचे फायदेदेखील विनामूल्य मिळत नाहीत; त्याचप्रमाणे ती सार्व-त्रिकही केलेली नाही. डॉक्टरीचा खाजगी धंदा चालूच आहे आणि उत्पन्नाची छाननी केल्यानंतर निरनिराळ्या प्रकारची फीही रोग्यांकडून आकारली जाते.

यावरून असे म्हणता येईल की, सामाजिक समतेसाठी, सार्वजनिक सेवा सर्वांना उपलब्ध असणे (अर्थात त्या यच्चयावत सर्वांना उपलब्ध असल्याच पाहिजेत असे नाही) अर्थातच आवश्यक असले तरी त्या सर्वांना विनामूल्य मिळाल्या पाहिजेत असे नाही. आणि सामाजिक भेदाभेद टाळण्याच्या दृष्टीने फायदा उपलब्ध करून देण्यासाठी केली जाणारी उत्पन्नाची छाननी आणि केवळ मोबदला देण्यापुरती केली जाणारी छाननी यात फरक आहे. अशा तऱ्हेने सरकारी इस्पितळात फक्त राष्ट्रीय मदत योजनेचा फायदा घेणारांनाच प्रवेश मिळावयाचा किंवा उत्पन्नाची छाननी केल्यानंतरच निवृत्ती वेतन द्यावयाचे असे असते तर आजारी किंवा वृद्ध यांचा अशा सेवांचा विनशर्त उपयोग घेण्याचा अधिकार नाकारल्यासारखे होईल; त्यांना त्यासाठी प्रथम शासनाकडे अर्ज करावा लागेल. आणि आपण निराधार असल्याचे सिद्ध करावे लागेल. आणि त्यामुळे जे 'आपण स्वावलंबीपणे जीवन जगू शकत नाही' असे उघडपणे कबूल करतील किंवा सरकारी मदतीसाठी अर्ज करतील ते साह-जिकच समाजात कमी प्रतीचे म्हणून ओळखले जातील. या ठिकाणी उत्पन्नाची छाननी करणे म्हणजे विशिष्ट अटी पुऱ्या होत नसतील तर त्या नागरिकाला समाज सेवांचा लाभ घेऊ देण्यास मनाई करणे आणि त्याचबरोबर समाजातील सर्वात दरिद्री वर्गाला अलग ठेवण्याचे साधन उपलब्ध करून देणे असाच अर्थ होतो.

परंतु नागरिकाचा समाजसेवांचा लाभ घेण्याचा हक्क मान्य करण्यात आला तरी त्याला त्यांचा मुक्त लाभ घेऊ द्यावयाचा की नाही हे ठरविण्यासाठी उत्पन्नाची छाननी करणे वेगळे. या ठिकाणी नागरिकाला समाजसेवांचा लाभ मिळावा म्हणून शासनाकडे अर्ज करण्याची सक्ती केली जात नाही. उलट शासनालाच पैसे वसूल करण्यासाठी नागरिकाकडे जावे लागेल अशी अट ठेवण्यात आली तर सामाजिक समतेला बाध येणार नाही, त्याचप्रमाणे ते अपमानास्पदही वाटणार नाही. अर्थात त्यासाठी दोन गोष्टी आवश्यक ठरतील : एक तर नागरिकाला उपलब्ध करून द्यावयाचा फायदा किंवा सेवा त्याच्या उत्पन्नाच्या मानाने अत्यंत निकडीची आणि अतिशय व्यापक असता कामा नये आणि या सेवांचा लाभ मिळण्याचा आपला सामाजिक हक्कच आहे अशी त्याची समजूत होता कामा नये. तसे झाले तर उत्पन्नाच्या कसोटीमुळे त्याच्या खऱ्या उत्पन्नाला आणि आत्मप्रतिष्ठेलाही बाधा येईल. मूलभूत रोखीच्या स्वरूपातील फायदे, असे फायदे हेच पुष्कळ वेळा ग्राहकांचे बहुतांश उत्पन्न असते, त्याचप्रमाणे मध्यवर्ती अत्यावश्यक शिक्षण आणि आरोग्य सेवा यांच्या बाबतीत उत्पन्नाची छाननी करण्याचा प्रश्नच उरत नाही. दुसरे असे की, उत्पन्नाची मर्यादा शक्य तितकी वरची ठेवली पाहिजे. केवळ सरटॅक्स देणारांवरच तेवढा सेवांचा मोबदला देण्याची सक्ती करण्यात आल्यामुळे कमीपणाची जी भावना निर्माण होईल त्यापेक्षा केवळ भणंग असतील त्यांनाच द्याव्या लागणाऱ्या मोबदल्यातून वगळण्यात आले तर ती भावना कितीतरी पटीने बळावण्याचा धोका आहे. उदा. विश्वविद्यालयीन शिष्यवृत्त्यांच्या बाबतीत एका विशिष्ट पातळीखालच्या उत्पन्नवाल्यांकडून काहीही आकारावयाचे नाही, नंतर उत्पन्नाच्या प्रमाणात हळूहळू वाढ करीत ज्यांचे उत्पन्न २०० पौंडांपेक्षा जास्त असेल त्यांच्याकडून संपूर्ण आकार घ्यावयाचा असे करण्यात आले तर त्यामुळे सामाजिक विषमता उद्भवेल असे म्हणता येणार नाही. कारण मुख्यतः शिक्षक आणि बरोबरचे विद्यार्थी यांना कोणाला आर्थिक मदत मिळते आणि कोणाला मिळत नाही हे समजण्यास काही मार्ग नसतो.

अशा प्रकारे मुक्त सार्वत्रिक सेवा आणि सामाजिक समता यामधील संबंध अत्यंत अस्पष्ट असतो. एका बाजूने काही विशिष्ट परिस्थितीत उत्पन्नाची छाननी केल्यामुळे सामाजिक समता धोक्यात येतेच असे नाही, तर दुसऱ्या बाजूला मुक्तपणे सर्वांना उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या सेवा तशाच प्रकारच्या खाजगी सेवांच्या मानाने फार निकृष्ट दर्जाच्या असतील तर त्यामुळे सामाजिक समतेचे पाऊल पुढे पडणार नाही. तशा परिस्थितीत मग सुस्थितीतील लोक त्यांचा फायदाच घेणार नाहीत आणि वर्गावर्गातील भेद कोठल्याही प्रकारे कमी होणार नाहीत.

सामाजिक समतेसाठी मुख्यतः जर कशाची गरज असेल तर ती म्हणजे सार्वजनिक आरोग्य, शिक्षण आणि घरे यांचा दर्जा इतका उंचावयाचा की खाजगी आणि सार्वजनिक क्षेत्रात त्याबाबत डोळ्यात भरेल इतकी गुणात्मक तफावत

राहूच द्यावयाची नाही. तसे झाले म्हणजे वर नमूद केलेल्या परिस्थितीत क्वचित सेवांबद्दलचा मोबदला वसूल करण्यात आला तरी त्याचे कुणाला काही वाटणार नाही. सेवांचा सर्रास सर्वांना उपभोग घेऊ देण्याबद्दल बोलावयाचे तर हे एक तर आपोआपच घडून येईल (किंवा कदाचित उत्पन्नातील वाढत्या समानतेमुळे ते लादले जाईल) ; आणि तसे ते आपोआपच घडून आले नाही, आणि काही हेकेखोर शिष्टांनी पूर्वीप्रमाणे आपल्या खाजगी डॉक्टरकडेच जाणे येणे ठेवले तरी त्याला कसलेच महत्त्व उरणार नाही. परंतु महत्त्वाचा मुद्दा आहे तो हा की, सामाजिक समता हे सार्वत्रिकतेचे (सेवांचा सर्रास मुक्त उपभोग घेऊ देण्याचे) उगमस्थान असते. सार्वत्रिकतेतून सामाजिक समता निर्माण होणार नाही.

## ३. सामाजिक सेवा आणि उत्पन्नाचे वितरण

रोखीच्या ऐवजी प्रत्यक्ष स्वरूपात मुक्तपणे सर्रास सर्वांना मिळणाऱ्या फायद्यांचा उत्पन्नाच्या वितरणावर काय परिणाम घडून येतो याचा ज्यावेळी आपण विचार करू लागतो त्यावेळी आपणास असे दिसून येते की, समता प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने त्या अधिकच अकार्यक्षम ठरतात. याचे कारण असे की अशा सुविधांपैकी जो भाग मध्य रेषेहून जास्त उत्पन्न असलेल्यांवर खर्च होतो तो समतेच्या दृष्टीने ‘ वाया ’ गेल्यासारखाच असतो. सर्वांना सेवांचा फायदा प्राप्त करून देणे आणि उत्पन्नाचे वरपासून खालपर्यंत फेर वितरण करणे या गोष्टी परस्पर विरोधी असतात.

वस्तुतः आता सामाजिक सेवांची श्रीमंत आणि गरीब यात फेरवाटप क्वचितच होते. युद्धोत्तर काळातील उत्पन्नाच्या फेरवाटपाचे प्रमुख वैशिष्टय ‘ श्रीमंत वर्गा ’कडून काढून घेऊन ते ‘ जनतेत ’ वाटून द्यावयाचे असे राहिलेले नाही, तर फेरवाटपाचे फायदे निरनिराळ्या उत्पन्नाच्या गटात विभागले जातात आणि ते उपभोगाशी निगडीत असतात हे प्रमुख वैशिष्टय बनले. सर्वसाधारण सिद्धांत असा की, अन्नधान्यासाठी द्यावे लागणारे अनुदान आणि आरोग्य व शिक्षण यावरील खर्चात होणारी वाढ भरून काढण्यासाठी कामगारवर्ग मद्य (बिअर), तंबाखू, विक्रीकर आणि या स्वरूपाचे इतर अप्रत्यक्ष कर यांच्या रूपाने पुरेसा जादा आकार भरत असतो, तर प्रत्यक्ष करात झालेल्या वाढीच्या स्वरूपात तो जे भरतो ते हस्तांतरित पैशाची आवक (ट्रान्सफर मनी रिसीट्स) यामधील वाढ भरून काढतात. वार्षिक ५०० पौंडाखाली उत्पन्न असलेला तो कामगार या व्याख्येप्रमाणे १९४९ साली कामगार वर्गाने करांच्या रूपाने त्यांना मिळणाऱ्या फायद्यांपेक्षा १३९ दश लक्ष पौंड जादा भरले. त्यानंतर १९५० साली केलेल्या पहाणीत असे आढळून आले की, कामगार वर्गाला मिळणाऱ्या एकूण सामाजिक सेवांपेक्षा त्यांनी भरलेले एकूण कर वरील रकमेपेक्षा किती तरी जास्त होते.

या आश्चर्यजनक (प्रथमदर्शनी) निष्कर्षाचे मुख्य कारण म्हणजे (कर असलेल्या) रोखीच्या स्वरूपातील फायद्यांपेक्षा तुलनेने (करमुक्त) प्रत्यक्ष स्वरूपात विनामूल्य मिळणाऱ्या फायद्यात झालेली वाढ. १९३८–३९ साली समान सेवांवरील ५३% खर्च कर दिले आणि सवलतींच्या रूपाने पैसे परत केले या स्वरूपातील होता आणि ४७% खर्च प्रत्यक्ष स्वरूपात मिळणाऱ्या सेवा किंवा अनुदानाच्या स्वरूपातील होता. १९५१–५२ सालातील हेच प्रमाण अनुक्रमे ३४% आणि ६६% असे होते. (१९५२ पर्यंत दिल्या गेलेल्या) अन्नधान्यावरील अनुदानामुळेच मुख्यत: हा फरक घडून आला.

रोखीच्या फायद्यांची श्रीमंतांपेक्षा गरिबांना अधिक मदत होते. कारण त्यामुळे त्यांच्या एकूण उत्पन्नात त्यामानाने मोठ्या प्रमाणात वाढ होते. श्रीमंत मनुष्य विनामूल्य किंवा अनुदानित वस्तूंवर आपल्या उत्पन्नाचा अधिक भाग खर्च करील तर प्रत्यक्ष स्वरूपात सरसि सर्वांना मिळणारे फायदे किंवा अनुदान यामुळेही असेच परिणाम घडून येतील; तथापी फेरवाटपाच्या दृष्टीने रोखीच्या स्वरूपातील मोबदल्याच्या मानाने ते कमी प्रभावी असतात. एक तर त्यावर कर नसल्याने गरीब आणि श्रीमंत अशा दोघांनाही मिळणाऱ्या रकमा सारख्याच असतात. दुसरे असे की, रोखीने मिळणारे फायदे हे सामान्यपणे (वृद्ध, आजारी, मोठी कुटुंबे यासारख्या) उघडउघड गरजू गटांवरच केंद्रित होत असतात तर अनुदान हे असा कोणताही दंडक न लावता दिले जाते आणि सार्वत्रिकतेचे उद्दिष्ट साध्य करावयाचे असेल तर ते तसेच दिले गेले पाहिजे.

अर्थात अनुदान किंवा प्रत्यक्ष स्वरूपातील फायदे सरसि सर्वांना न देण्याची भूमिका या युक्तिवादामुळे समर्थनीय ठरते असे मला सुचवावयाचे नाही. कारण त्यांच्या बाजूचे इतर काही निर्णायक स्वरूपाचे मुद्दे आहेत. मला या ठिकाणी येवढेच दाखवून द्यावयाचे आहे की, रोखीच्या किंवा निवडक फायद्यांच्या तुलनेने निष्फळ वाटपाचे जे परिणाम घडून येतात त्यामुळे "मुक्त सार्वत्रिकता" आणि समता यात दुवा साधणे आणखीच कठीण होऊन बसते.

## ४. सामाजिक खर्चाची मुख्य उद्दिष्टे

शेवटी मी असे म्हणेन की, दारिद्र्यासंबंधीच्या दृष्टीकोणाचा अधिक काटेकोरपणे अवलंब झाला पाहिजे या टोरी पक्षाच्या आग्रहाविरुद्ध केवळ मुक्त सार्वत्रिकतेचे तत्व लागू करणे हे काही या समस्येवरील अचूक उत्तर नव्हे. सामाजिक समता प्रस्थापित करण्याचे उद्घोषित उद्दिष्ट अयोग्य आहे, म्हणून अर्थातच मी असे म्हणत नाही तर ते उद्दिष्ट साध्य करण्याचा तो योग्य मार्ग नसल्याने मी वरील विधान करीत आहे. आपल्या सरकारी शाळा, रुग्णालये आणि त्यांच्याशी निगडित असलेल्या इतर सर्व सेवांचा दर्जा खाजगी पैशाने उपलब्ध होणाऱ्या सेवांइतका उच्च

प्रतीचा राखण्यासाठी सामाजिक खर्चाच्या बाबतीत सामाजिक भांडवल गुंतवणुकीचा व्यापक, कल्पक अति दूरगामी कार्यक्रम आखणे हाच योग्य मार्ग होय.

परंतु कोणत्याही परिस्थितीत सामाजिक समता हे समाजसेवांचे अंतिम उद्दिष्ट समजता कामा नये. समाजसेवांचे अंतिम उद्दिष्ट सामाजिक विपत्ती आणि हालअपेष्टा यांचा भार कमी करणे आणि सामाजिक गरजेत सुधारणा करणे हा असला पाहिजे. अर्थात या हेतूपूर्तीसाठी उचललेली पावले साहजिकच सामाजिक समतेला पोषक ठरतील आणि शेवटी सामाजिक समता हे देखील एक महत्वाचे दुय्यम उद्दिष्ट असतेच.

आता हे मध्यवर्ती उद्दिष्ट हुजूरपक्षीय दृष्टीकोण स्वीकारून साध्य करता येणार नाही. कारण हुजूरपक्षीय दृष्टीकोणात असे गृहीत धरलेले असते की, अगदी मूलभूत स्वरूपातील दारिद्र्य जरी नव्हे तरी निदानपक्षी आर्थिक अडचणी याच अपरिहार्य सामाजिक विपत्तींना (म्हणजेच ज्या विपत्ती संबंधित व्यक्तीच्या बेजबाबदारपणामुळे निर्माण झालेल्या नाहीत अशा) जबाबदार असतात. आणि म्हणून उत्पन्नाची छाननी करण्याचा आग्रह धरला जातो. परंतु आजची सामाजिक विपत्ती आणि गरज ही काही मूलभूत दारिद्र्य किंवा उत्पन्नाचा संपूर्ण अभाव यामुळेच केवळ निर्माण झालेली नाही तर उत्पन्न किमान आवश्यकतेच्या रेषेपेक्षां कितीतरी वर असूनही इतर अनेक भिन्न भिन्न आणि नेमक्या लागू पडणाऱ्या कारणांमुळे ती निर्माण झालेली असते.

याचा अर्थ असा नव्हे की, मूलभूत दारिद्र्याकडे दुर्लक्ष करता येईल किंवा वाढत्या भौतिक राहणीमानाच्या गरजांचे क्षेत्र आकुंचित करीत जाण्याच्या दृष्टीने काहीच उपयोग होत नाही. जोपर्यंत मूलभूत दारिद्र्य शिल्लक आहे तोपर्यंत त्याला सर्वोच्च अग्रक्रम हा द्यावा लागणारच. आणि कुटुंबाचे उत्पन्न जसजसे वाढत जाईल तसतसा समाजकल्याणावर त्याचा अत्यंत महत्वाचा असा परिणाम घडून येणारच. तथापी मूलभूत दारिद्र्याचे अंती समूळ उच्चाटन झाले आणि सरासरी उत्पन्नात सतत वाढ होत गेली तरीही अनेक प्रकारच्या गरजा आणि हालअपेष्टा मागे रेंगाळत राहणारच.

पहिला प्रकार म्हणजे व्यापक अर्थाने ज्याला दुय्यम दारिद्र्य म्हणतात त्या प्रकारच्या दारिद्र्यामुळे निर्माण होणाऱ्या हालअपेष्टा म्हणजे अनारोग्य, जीवनसत्वयुक्त आहाराचा अभाव किंवा आवश्यक गरजा भागविता न येणे यासारख्या उत्पन्नाच्या संपूर्ण अभावामुळे नव्हे तर सूज्ञपणे खर्च न केल्यामुळे निर्माण होणाऱ्या हालअपेष्टा. हुजूरपक्षीयदेखील खर्च सूज्ञपणे केला न जाण्याची शक्यता मान्य करतात आणि त्यामुळेच शिक्षण आणि आरोग्य याबाबतीत किमान सेवा उपलब्ध करून देणे समर्थनीय मानतात.

परंतु काही वेळा अशी समजूत करून घेतली जाते की, एक़दा या किमान

गरजा भागवल्या म्हणजे मग आणखी काही करावयाची जरूर नाही. कारण प्रत्यक्ष वेतनात जसजशी वाढ होत जाईल तसतसे दुय्यम दारिद्र्यही हळूहळू नष्ट होत जाईल. परंतु हा फाजील आशावादी दृष्टीकोण झाला. प्रत्यक्ष वेतनाची पातळी कोणतीही जरी असली तरी मुलांना त्यांच्या पालकांच्या खरोखरीच्या अडाणीपणा-मुळे जरूरीच्या आरोग्यविषयक बाबींपासून वंचित ठेवले जाणे अगदी शक्य आहे. सगळेच बाप आपल्या मुलांना विनामूल्य मिळणारा संत्र्याचा रस स्वतःच्या दारू-बरोबर मटकावून टाकण्याइतके दारूडे आणि निष्काळजी असतात असे मानणे हा काहीसा जुनाट दृष्टीकोण झाला. फक्त ३७% स्त्रियांनीच विनामूल्य मिळणारे कॉडलिव्हर ऑईल नियमितपणे आपल्या मुलांना का दिले यासंबंधी युद्धकाळात केलेल्या पहाणीत असे दिसून आले की, त्याचे मुख्य कारण त्याचा उग्र दर्प आणि चव त्यांना आवडत नसे हे नव्हते तर ते मुलांच्या प्रकृतीला फायदेशीर ठरते हेच मळी त्यांना माहीत नव्हते. घटसर्प निर्मूलनाच्या योजनेबाबत झालेल्या पहाणीतही असेच आढळून आले की मुलाखती घेतलेल्यांपैकी एकतृतीयांशाहूनही कमी पाल-कांना त्या रोगासंबंधी किंवा तो कशामुळे होतो त्यासंबंधीची माहिती होती.

परंतु हा अज्ञानाचा भाग सोडून दिला तरी सूज्ञपणे खर्च न केल्यामुळे येणारे दारिद्र्यही अद्याप फार भयानक प्रमाणात आहे. कुटुंबात उत्पन्नाचे वितरण योग्य-प्रकारे न झाल्यामुळेच बहुतेकदा ते निर्माण होते. अशी कित्येक कुटुंबे आढळतात की, त्यांनी सर्वांचे उत्पन्न एकत्र केले तर एकूण उत्पन्न पुरेसे असते. परंतु तरीही नवऱ्याने घरखर्चासाठी बायकोच्या हवाली केलेली रक्कम राहणीमानाचा साधारण किमान दर्जा टिकविण्यालाही अपुरी पडते. नवरा जर स्वार्थी किंवा अविचारी असेल तर कोठल्याही कुटुंबात असे होऊ शकते. मग त्या कुटुंबात माणसे कमी असोत की जास्त असोत. परंतु मुख्यतः मोठ्या कुटुंबातच फार करून असे घडून येते. कारण प्रत्येक नव्या मुलाबरोबर नवऱ्याकडून जी जादा रक्कम दिली जाते ती जादा खर्च भागविण्याइतकी पुरेशी नसते.

सध्याच्या प्रमाणात मिळणारा कुटुंबभत्ता ही अडचण दूर करण्यास पुरा पडू शकणार नाही. वेतनात कोठल्याही प्रकारे वाढ न होता कुटुंबातील व्यक्ती मात्र वाढत गेल्या तर त्यामुळे त्या कुटुंबाचे सरासरी राहणीमान जे खाली घसरते ते घसरू नये म्हणून प्रथम हा भत्ता सुरू करण्यात आला आणि सबंध कुटुंबाचे सर्व उत्पन्न एकत्र केले तर कुटुंबभत्त्याला त्या दिशेने बरीच मजल मारता येईल. परंतु प्रत्यक्षात मात्र कुटुंबाच्या सरासरी राहणीमानासंबंधीच्या कल्पना चुकीच्या होत्या. नव्याने जन्माला आलेल्या मुलाच्या खर्चाचा आर्थिक बोजा...कुटुंबातील सर्व मंडळी सारख्या प्रमाणात वाटून घेत नसत. आई आणि पहिली मुले यांनाच त्याचा ताण तीव्रतेने भोगावा लागत असे. कुटुंब जसजसे मोठे होईल तसतशी ते आपल्या बायकांच्या "पगारात" वाढ करीत नसत. कुटुंबाच्या आकारात होणाऱ्या

वाढीबरोबर नवरा आणि बायको यांच्यात होणाऱ्या तौलनिक उत्पन्नाच्या विभाग-णीत जो फरक घडून येतो तो लक्षात घेतला म्हणजे कुटुंब जितके मोठे तितका दारू आणि तंबाखू यांच्या मानाने गरजांवर होणारा खर्च कमी या नेहमीच्या सिद्धांताचा चटकन उलगडा होतो.

अवलंबून असणारी मुले असलेल्या कुटुंबांतील दुय्यम दारिद्र्य हे इतरांनी घ्यावयाच्या निर्णयावर अवलंबून असल्याने ती समाजाची जबाबदारी ठरते. अर्थात मोठ्या माणसांनी केलेल्या चुकीच्या खर्चाची जबाबदारी समाजाची नाही—जोपर्यंत दारूडा शांत आहे तोपर्यंत अशा प्रत्येक दारूड्याचा बंदोबस्त करणे ही सरकारची जबाबदारी असत नाही. विशेषत: कुटुंबविषयक सामाजिक सेवांचा खूप व्यापक प्रमाणावर अंतर्भाव करण्यास अग्रक्रम देणे त्यामुळे समर्थनीय ठरते. अशा सेवां-पैकी प्रत्यक्ष बाबींत बाळंतपणाच्या आणि मुलांच्या कल्याणाच्या योजनांचा अंतर्भाव होतो तर जादा मुले झाल्यामुळे येणाऱ्या आर्थिक अडचणींचा परिहार करण्यासाठी देण्यात येणाऱ्या कुटुंबभत्त्यासारख्या बाबींचा समावेश रोखीच्या स्वरूपात मिळणाऱ्या फायद्यात होतो.

हालअपेष्टांचे दुसरे कारण म्हणजे—हेही पुन्हा मूलभूत दारिद्र्याशी संबंधित नसते—कुटुंब गटाच्या आकारांत आणि एकसंधपणात झालेली घट. १९११ साली विवाह होऊन २५–३० वर्षे झालेल्या पन्नाशीच्या आसपासच्या स्त्रियांपैकी ७०% हून अधिक जणींना चार किंवा त्याहून जास्त मुले असत; ४०% हून अधिक स्त्रियांना सात किंवा त्याहून जास्त मुले असत तर अवघ्या ५% स्त्रिया विनाअपत्य असत. १९५१ साली याच गटातील फक्त २५% स्त्रियांना चार किंवा चारपेक्षा जास्त मुले असत, ५% स्त्रियांना सात किंवा त्याहून जास्त मुले असत आणि विनाअपत्य स्त्रियांचे प्रमाण जवळजवळ ११% असे.

जननसंख्येत आढळून येणारे हे स्थित्यंतर त्याचबरोबर घडून येणाऱ्या सामाजिक स्थित्यंतरामळे तर अधिकच प्रकर्षाने नजरेत भरते. विशेषत: दोन पिढ्या-पूर्वीपेक्षा आता कुटुंबांची पुष्कळच पांगापांग झालेली आढळते. व्यवसायातील गतिक्षमतेत (mobality) झालेली वाढ काही अंशी त्याला जबाबदार असली तरी घरबांधणीतील सुधारणा—उपनगरांची वाढ, मोठमोठ्या शहराच्या मध्यभागी असलेल्या पूर्वीच्या घरादारांपासून खूप दूरवर उभारण्यात आलेल्या गृहनिर्माण वसा-हती आणि आता तर त्याहूनही लांब अंतरावर वसविण्यात आलेली नवी शहरे ही त्याची मुख्य कारणे आहेत. पन्नास वर्षांपूर्वी निरनिराळी कुटुंबे पिढ्यान् पिढ्या एकाच आसमंतात राहात आणि त्यामुळे एकमेकांच्या घरी त्यांचे सहज पायी जाणे येणे होत असे. आज परिस्थिती इतकी बदलली आहे की दूरवर विखुरल्यामुळे उठल्यासुटल्या एकमेकांकडे जाणे अशक्य होऊन बसले असून आपल्या जुन्या शेजाऱ्याला कधी सटी सहामाशी भेट देण्याचे प्रसंग येऊ लागले आहेत.

कुटुंबांची ही पांगापांग कोणत्याही परिस्थितीत बहुधा झालीच असती कारण कुटुंबांचा 'योग्य' आकार कोणता असावा याविषयींच्या सामाजिक दृष्टीकोणातच आता फरक पडला आहे. पूर्वी एकाच कुटुंबात निरनिराळ्या पिढ्यांतील सगळीच्या सगळी माणसे दिसावयाची. व्हिक्टोरियन काळातील कुटुंबे इतकी मोठी दिसावयाची ती केवळ त्या घरातील मुलांची संख्या भली मोठी असे म्हणून नव्हे तर ज्या निर-निराळ्या नातेवाईकांची मिळून ती कुटुंबे बनलेली असत ते सर्व नातेवाईक एकाच कुटुंबात रहात असल्यामुळे. आजकालची कुटुंबे म्हणजे आईबाप आणि त्यांच्यावर अवलंबून असलेली मुले येवढ्यांचे मिळून बनलेले कुटुंबच योग्य मानले जाते आणि त्यात इतर कोणी नातेवाईक तळ ठोकू लागला तर ते सहन केले जात नाही. इतकेच नव्हे तर मानसशास्त्रीय दृष्ट्या ते हानिकारक समजले जाते. त्यामुळेच मेहुणे किंवा सासूसासरे यांना कुटुंबात थारा देण्याला विरोध असतो. वयात आलेल्या मुलांनीदेखील घराबाहेर पडून स्वतःच्या पायावर उभे रहावे ही विचारसरणी प्रस्थापित होत असून मोठाल्या नातेवाईकांनी एकत्र राहण्यात काही तरी चूक आहे अशी एक अस्पष्ट धारणा होऊन बसली आहे.

मार्गारेट मीडने एके ठिकाणी लिहिले आहे की, "आम्ही आमचे घर आता आटोपशीर बनवले आहे आणि सासू किंवा आजी, अविवाहित मुलगी आणि बहीण यांची हकालपट्टी केली आहे. वयात आलेल्या इतरांना आपल्या घरात राहू न देण्याच्या न्यायाने घरगडीही आता घरात राहात नाही. . .त्यामुळे प्रत्येक घर हे आता अगदी किमान व्यक्तींपुरतेच मर्यादित बनले आहे. म्हणजे इतके मर्यादित बनले आहे की प्राथमिक अवस्थेतील माणसांना ते शक्य कोटीच्या पलिकडचेच वाटले असते. . .आई पौष्टिक आहारतज्ञ बनली आहे तर मुलगा मानसशास्त्रज्ञ, अभियंता, उत्पादन व्यवस्थापक, तज्ञग्राहक अशा निरनिराळ्या भूमिका एकाच वेळी पार पाडतो आहे." परंतु उलटपक्षी याचा परिणाम असा होतो की, जे नातेवाईक एकाकाळी त्या कुटुंबात राहात होते परंतु आता वेगळे राहू लागले आहेत त्यांच्या जीवनात कमालीचा एकाकीपणा आला आहे.

एकंदरीने हा बदल चांगला आहे की वाईट ते मला सांगता यावयाचे नाही. परंतु सामाजिक सेवांविषयींच्या धोरणावर त्याचा निश्चितच परिणाम घडून आला आहे, कारण त्या बदलामुळे कुटुंबांची एकमेकांना मदत मिळण्याची शक्यता खूपच कमी झाली आहे. वयस्कर लोकांना आयुष्यातील ऐन अडचणीच्या वेळी मदत करावयाला हाताशी कोणी तरुण नातेवाईक असत नाहीत. वयात आलेले तरुण ज्यावेळी आपले कुटुंब बनवीत त्यावेळी काका, आत्या अशी दूरची अनेक नातेवाईक मंडळी त्यांना असत परंतु बहीण किंवा भाऊ यासारखे अडचणींच्या वेळी उपयोगी पडणारे अगदी जवळचे नातेवाईक मात्र कोणी नसत. शिवाय अवलंबून असलेल्या मुलांपुरतेच कुटुंब मर्यादित झाल्यामुळे तान्हया किंवा दोन ते पांच वर्षांच्या मुलांना सांभाळू

शकतील अशी समजदार मुले असलेली कुटुंबे फारच थोडी असत. परंतु या बदलाचा सर्वात जाणवणारा परिणाम म्हणजे पन्नास वर्षापूर्वीची तुलना करावयाची तर देखभाल करावयाला घरी अविवाहित मुली नाहीत, किंवा लग्न झालेली मुलेही अगदी कमी, आणि अधूनमधून भेटायला यायला भाच्या–पुतण्याही उरलेल्या नाहीत बरे मनाची करमणूक करून घेऊन वेळ आनंदात घालवायचा तर नातवंडांचाही जवळपास अभाव व त्यामुळे एकाकी जीवन जगणारी वृद्ध मंडळी.

यावरून हे दिसून येईल की, अडीअडचणीच्या वेळी म्हणजे बाळंतपणाच्या काळात, तरुण मातेच्या आजारपणात किंवा दीर्घ मुदतीच्या आजारात आणि मुख्य म्हणजे वृद्धापकाळी एकमेकांची मदत मिळण्याची शक्यता कमी कमी होऊ लागली आहे. आणि मूलभूत गरिबीशी याचा काहीही संबंध नाही तसेच ही परिस्थिती केवळ कामगार वर्गापुरती मर्यादित आहे असेही नव्हे. हे खरे की, युद्धपूर्वकाळात घरगड्यांची टंचाई भासत नसे आणि त्यांना पगारही द्यावा लागत नसे. त्याचप्रमाणे हॉटेलस् किंवा शुश्रुषागृहे ही अल्प किंमतीत सहज मिळू शकत असत. त्यामुळे सुस्थितीतील लोकांना कसली यातायात पडत नसे. परंतु वाढते कर आणि ठराविक उत्पन्न असलेल्यांच्या क्रयशक्तीत झालेली घट यामुळे त्यांची सुद्धा आता पंचाईत होऊ लागली आहे. आता केवळ [अत्यंत श्रीमंत वर्गाला कोणाचीही मदत न घेता आजारीपण, एकाकीपणा आणि वृद्धापकाळ यासारख्या कौटुंबिक अडचणी निभावून नेता येतात.

त्यामुळे रूढ दरिद्ररेषेपेक्षा कितीतरी व्यापक क्षेत्रासाठी मोठ्या प्रमाणावर सामाजिक तरतुदी करणे आवश्यक होऊन बसते. वस्तुतः अशी तरतूद करण्याचा हेतू कुटुंबावर पडणाऱ्या जबाबदारीतून त्यांना मुक्त करणे हा नसतो तर कुटुंबाचा आजचा आकार आणि त्याची झालेली पांगापांग यामुळे अगदी कर्तव्यतत्पर कुटुंबांना देखील कोणाच्या मदतीशिवाय ज्या जबाबदाऱ्या पार पाडता येत नाहीत त्या सामुदायिकपणे पार पाडता याव्यात हा त्यामागील हेतू असतो. आणि हा हेतू साध्य करावयाचा तर परिचारिका, बालवाड्या, अनाथालये, वृद्धांसाठी छोटी छोटी घरे किंवा त्यांना लागणाऱ्या ,सोयी मिळू शकतील अशी निवासस्थाने निरनिराळ्या सुविधा प्राप्त करून देणाऱ्या संस्था आणि बहुधा सर्वात महत्वाचे म्हणजे घरगुती स्वरूपाच्या सेवांमध्ये खूप वाढ झाली पाहिजे.

सामाजिक हालअपेष्टांचे तिसरे कारण म्हणजे, काळाच्या त्याचप्रमाणे व्यक्तीव्यक्तीच्या संदर्भात गरजेच्या मानाने उत्पन्नाचे होणारे विषम वाटप. कुटुंब-वत्सल लोकांच्याबाबतीत होते त्याप्रमाणे एकतर उत्पन्नाची गरजेच्या अनुषंगाने संपूर्णपणे सांगड घातली जात नाही किंवा अचानक उद्‌भवलेल्या आजारपणाच्या वेळी ज्याप्रमाणे खरी गरज असते त्यावेळीच नेमकी उत्पन्नात घट होते किंवा काही वेळा गरजा काहीशा कमी होत असल्या तरी त्याचवेळी निवृत्त व्हावे लागल्याने

उत्पन्नात त्यापेक्षाही झपाट्यान घट होत असते. उत्पन्नाच्या विषम वाटपाची ही कारणे असू शकतात व त्यामुळे दोन तऱ्हेचे परिणाम घडून येऊ शकतात. उत्पन्नाच्या प्रत्येक पातळीवर सड्या आणि रोजगारावर असलेल्या माणसांच्या मानाने कुटुंबे किंवा म्हातारी माणसे यांची परिस्थिती वाईट असते आणि राउंत्री लेव्हर्स. यांनी केलेल्या पाहणीत आढळून आल्याप्रमाणे, विशिष्ट काळात कामगार वर्गापैकी अगदी लहानसा गट दारिद्र्याचे जिणे जगत असला तरी त्या वर्गातील फार मोठ्या विभागाला आयुष्यात केव्हा ना केव्हा तरी दारिद्र्याच्या अवस्थेतून जावे लागते.

गरज आणि उत्पन्न यांच्यातील परस्पर संबंधाचा हा अभाव स्वीडन आणि अमेरिकेप्रमाणेच ब्रिटनसारख्या बहुतेक पुढारलेल्या देशातून पहावयास मिळतो. प्रत्येक ठिकाणी तरुण अविवाहित कामगार आणि त्यापेक्षा काहीशा कमी प्रमाणात मूलबाळ नसलेले तरुण दांपत्य किंवा मुले मोठी झालेली असूनही नोकरीधंदा करीत असलेले आईबाप यांचा गट विशेष हक्क उपभोगीत असलेला प्रकर्षाने उठून दिसतो कारण त्यांच्या खिशात पैसे खुळखुळत असतात. पण त्यामानाने त्यांच्यावर जबाबदारीचे ओझे मात्र फारसे नसते. याउलट मुलेबाळे असलेले आईबाप आणि निवृत्तीवेतनावर उदरनिर्वाह करणारे वृद्ध यांच्या जबाबदाऱ्या फार असतात, पण त्यामानाने त्यांचे उत्पन्नाचे साधन मात्र तुटपुंजे असते. त्यामुळे वरील गटाइतकाच हा गट प्रकर्षाने समाजात कसलाही विशेष दर्जा नसलेला असा दिसून येतो. आणि ही परिस्थिती व्यक्तीव्यक्तीच्या दृष्टीने केवळ अन्याय्यच आहे असे नव्हे तर त्या व्यक्तीच्या आयुष्यात जीवनमानात जे चढउतार घडून येतात– प्रा. टिटमस यालाच ‘ व्यक्तीच्या आयुर्मर्यादेत घडून येणारे विसंवाद ’ असे म्हणतात– त्यामुळे संघर्ष आणि तणातणी निर्माण होते. तौलनिक दृष्ट्या लग्नापूर्वीचे उत्पन्न जास्त असल्यामुळे सांभाळलेले जीवनमान आणि राहणीसंबंधीच्या कल्पना यांना लग्न होऊन मुलेबाळे झाल्यावर धक्का बसतो. उतार वय सुरू होण्याच्या सुमारास जी सुस्थिती प्राप्त होते त्यामुळे पुढे निवृत्तीवेतनावर चरितार्थ चालविण्याची वेळ आली म्हणजे आयुष्यातील हालअपेष्टा वास्तवतेपेक्षा जास्त भासू लागतात.

म्हणून हालअपेष्टांचा इतर कशाशीही संबंध नसतो, अगदी स्वतंत्रपणे त्यांचा विचार करता येईल असे मानता कामा नये. विद्यमान अपेक्षा आणि पूर्वी मिळत असलले प्रत्यक्ष उत्पन्न यांच्या संदर्भातच त्यांचा विचार झाला पाहिजे. आजच्या परिस्थितीला तर हे विशेषच लागू पडते. कारण ठराविक जादा खर्च करावाच लागणाऱ्या आजच्या काही सामाजिक सवयीमुळे उत्पन्नात विशिष्ट वाढ झाली तरी मनमानेल त्याप्रमाणे खर्च करता येण्यासारख्या उत्पन्नात मात्र एकदम खूपच घट पडते. हप्तेबंदीने घेतलेल्या वस्तूंसाठी करावा लागणारा खर्च, विम्याचे हप्ते, मॉर्टगेज पेमेंटस्, शिक्षणासाठी करावा लागणारा खर्च यासारख्या अनेक जबाबदाऱ्या आज बहुतेक लोक आधीच अंगावर घेऊन ठेवीत असतात. त्यांच्या उत्पन्नात घट

झाली तर या खर्चाला फाटा (घर विकून टाकणे, हप्तेबंदीने घेतलेल्या वस्तूंचे हप्ते न भरणे, विमा पॉलिसी (लॅप्स) बाद होऊ देणे) देऊन त्यांना आपले नेहमीचे राहणीमान सहज टिकवता येईल. पण त्यांचे उत्पन्न किमान जीवनावश्यकतेच्या मर्यादेपेक्षा पुष्कळ जास्त असले तरीही त्यांनी यापैकी काहीही केले नाही तर विशिष्ट खर्चासाठी राखून ठेवलेल्या रकमेच्या व्यतिरिक्त उत्पन्न खूपच कमी पडू लागेल व हालअपेष्टांना खरोखरीच सुरुवात होईल. अशा तऱ्हेने उत्पन्नात होणाऱ्या बदलाचे पडसाद विद्यमान खर्चावर तीव्रतेने उमटतात आणि त्यामुळे दारिद्र्यासंबंधीच्या दृष्टिकोणाप्रमाणे उत्पन्नाचा स्वतंत्रपणे विचार न करता त्यातील वटघटही विचारात घेणे अपरिहार्य होऊन बसते.

अर्थात कर आकारणी आणि सामाजिक सेवा यांच्याद्वारा उत्पन्नाचे फेरवाटप योग्य दिशेने होतच असते. परंतु समाजवादी निकष लावावयाचा तर सामाजिक न्यायाच्या, त्याचप्रमाणे कल्याणाच्या भूमिकेवरून यापेक्षा कितीतरी मोठ्या प्रमाणावर ते झाले पाहिजे आणि त्यायोगे वृद्ध, आजारी आणि इतर लोकांच्या मानाने ज्याच्या कुटुंबात लहान मंडळी अधिक अशांच्या प्रत्यक्ष उत्पन्नात वाढ केली पाहिजे. आपल्याला असे दिसून येईल की, सध्याची वितरणातील विषमता उत्पन्नाच्या वरच्या पातळीपेक्षा खालच्या पातळीवर अधिक तीव्र असते आणि ती दूर करण्यासाठी योजलेल्या उपायांमुळे वर्गावर्गातील सामाजिक समता वाढीस लागेल त्याचप्रमाणे सामाजिक न्यायही जास्त प्रमाणात प्रस्थापित होईल.

## ५. उपेक्षित राहिलेले काही खास गट आणि नव्या दिग्दर्शनाची आवश्यकता

शेवटी असे काही खास गट असतात की, जे लोकसंख्येच्या कोणत्याच व्यापक गटात मोडत नाहीत तर त्यांना भोगाव्या लागणाऱ्या हालअपेष्टा या विशिष्ट, अपरिहार्य अशा व्यक्तिगत दुर्दैवामुळे उद्‌भवलेल्या असतात. मागासलेल्या मुलांचे आईवडील, मानसिक विकृती असलेल्यांचे नातेवाईक, गंभीर स्वरूपाची मानसिक विकृती असणारे रोगी, उपेक्षित आणि ज्यांचे संसार उध्वस्त झाले आहेत अशांची मुले, अंध, क्षय किंवा त्यासारख्या दीर्घ मुदतीच्या रोगाने पछाडलेली माणसे इत्यादींचा या गटात समावेश होतो आणि इतर कोणापेक्षाही बहुधा त्यांनाच सर्वांत जास्त हालअपेष्टा सहन कराव्या लागतात.

तरी देखील त्यांचीच सर्वांत जास्त उपेक्षा होते. मदत द्यावयाच्या यादीत त्यांचा नंबर नेहमी सर्वांत शेवटचा असतो आणि खर्चात कपात करावयाची वेळ आली तर त्याची कुऱ्हाड मात्र सर्वप्रथम त्यांच्यारच कोसळते. त्यांना आपला आवाज उठविता यत नाही किंवा निवडणुकांवर परिणाम घडवून आणण्याइतकी त्यांची संख्याही नसते, युद्धकाळापासून देखील कल्याणकारी राज्याची उभारणी

करण्याच्या उत्साहात सार्वत्रिक सुविधांवर जितके लक्ष केन्द्रित करण्यात आले त्या-मानाने संख्येने कमी असलेल्या परंतु कित्येकदा हताश झालेल्यांकडे मात्र दुर्लक्ष झाले. म्हणूनच अग्रक्रम ठरवतांना मागासलेल्या मुलांच्या शाळांना फार खालचा क्रम दिला गेला आणि वेडयांच्या इस्पितळांचा क्रम तर त्याच्याही खाली गेला—वेडयांच्या इस्पितळातील परिस्थिती किती भयानक असते आणि त्यात सुधारणा करणे किती आवश्यक आहे ते अशा एखाद्या इस्पितळाला भेट दिल्याबरोबर ताडबडतोब लक्षात येते.

कुटुंबाचा लहान होत जाणारा आकार, वाढती पांगापांग आणि त्यांना मदत करणाऱ्या किंवा त्यांची देखभाल करणाऱ्या नातेवाईकांचा अभाव यामुळे तर त्यांच्या हालअपेष्टांत अधिकच भर पडते. आणि त्यांची गरज अर्थातच अशी असते की, उत्पन्नाच्या छाननीची कसोटी त्यांच्या बाबतीत लागू करणे सर्वस्वी अप्रस्तुत ठरते. त्यांच्यावर ओढवलेल्या या दुर्दैवाचा मूलभूत स्वरूपाच्या किंवहुना दुय्यम स्वरुपाच्या दारिद्र्याशी सुतराम संबंध नसतो आणि सामान्यपणे पुरेसे उत्पन्न असणाऱ्यांनाही त्यांना लागणाऱ्या सुविधा प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीने ते उत्पन्न अत्यंत तोकडे पडते (अर्थात तेवढ्या उत्पन्नात ते आपल्या याबाबतीतल्या गरजा थोडयाफार प्रमाणात तरी भागवू शकतात की नाही हा प्रश्नच आहे). ज्यांना शक्य असेल त्यांच्याकडून त्यांना मिळणाऱ्या सवलतींचा खर्च संपूर्ण किंवा अंशतः करण्यात आक्षेपार्ह असे काहीच नाही. परंतु त्यासाठी उत्पन्नाच्या छाननीची अट घालणे, निदान अगदी कमी उत्पन्न असलेल्यांच्या बाबतीत तरी कधीच कबूल करता येणार नाही.

या सर्वांचा दारिद्र्याशी कसलाही संबंध नसतो हे उध्वस्त किंवा समस्यापूर्ण कुटुंबाच्या उदाहरणावरून सहज लक्षात येईल. केवळ जगण्यापुरता रोख भत्ता दिल्याने, प्रत्यक्ष वेतनाची पातळी वाढविल्याने, इतकेच नव्हे तर सर्वांना नगरपलिकांच्या नव्या रेखीव वसाहतीत घरे दिल्यानेही हा प्रश्न आपोआप सुटू शकणार नाही. अर्थात काही प्रमाणात तरी या प्रश्नाचे मूळ प्रतिकूल भौतिक परिस्थितींत असते यात शंका नाही तथापी दारिद्र्याचा संपूर्ण बीमोड केला तरीही तो प्रश्न बऱ्याच प्रमाणात शिल्लक राहतोच आणि जुन्या झोपडपट्ट्यांइतकीच या नव्या वसाहतीतही समस्यापूर्ण कुटुंबे असणे अगदी शक्य आहे.

तज्ञांच्याकडून असे सांगितले जाते की, अशा उदाहरणांतील अनेकजणांना अधिक योग्य उपाययोजना करण्यासाठी सर्वांत जास्त आवश्यकता कशाची असेल तर ती सध्याच्या परस्परव्यापी आणि त्यामुळे अकार्यक्षम आणि वायफळ ठरणाऱ्या सेवांत सुसंवादित्व निर्माण करण्यासाठी महत्वाच्या शासकीय सुधारणा घडवून आणण्याची समस्या—कुटुंबांच्या बाबतीत तर याची अधिकच निकड भासते.

परंतु व्यापक स्वरूपातील नव्या दृष्टिकोणाचाच हा एक भाग असू शकेल.

पूर्वी सामाजिक समस्यांकडे मुख्यतः एक प्रवर्ग समस्या (कॅटॅगरी प्रॉब्लेम) म्हणूनच बघितले जात असे. आणि भौतिक चणचणीमुळे त्या निर्माण होतात असे मानले जात असे. बेव्हरीज क्रांतीच्या मुळाशी हीच तत्त्वप्रणाली होती. व्यक्तिगत छाननी न करता गरज अजमावता येईल असा एखादा व्यापक प्रवर्ग (कॅटॅगरी) सुटा काढून घ्यावयाचा आणि नंतर रोखीच्या स्वरूपात भरपूर मदत देऊन ती गरज भागवावयाची यामागे हालअपेष्टा दूर करण्यापेक्षा देखील गरज भागविण्याचेच उद्दिष्ट असे आणि सर्व लोकसंख्येला लागू पडणाऱ्या समान कारणांतून गरज निर्माण होते असे गृहीत धरलेले असे. त्यावेळी हा दृष्टीकोण बरोबरही होता इतकेच नव्हे तर यापुढेही कित्येक वर्षे तो तसा राहील.

परंतु आपले आर्थिक विकासाचे सध्याचे प्रमाण कायम राहिले तर भौतिक तुटवडा, दारिद्रय आणि अत्यावश्यक वस्तूंच्या बाबतीतील आबाळ हे प्रश्नच शिल्लक उरणार नाहीत. आपल्याला सर्वांना लागू पडणाऱ्या गटांपेक्षा व्यक्ति आणि कुटुंबे यांच्याकडे व्यक्तिशः अधिकाधिक लक्ष पुरवावे लागेल. त्याचप्रमाणे हालअपेष्टांच्या आर्थिक कारणांपेक्षाही सामाजिक आणि मानसिक कारणांवर भर द्यावा लागेल. त्यासाठी आपल्याला अर्थशास्त्रज्ञांऐवजी मानसोपचार तज्ञ, समाजशास्त्रज्ञ आणि मानसशास्त्रज्ञांचा सल्ला उपयोगी पडेल. खर्चाच्या व्यापक आणि सरसकट बाबींपेक्षा गरजेचे वास्तव स्वरूप काय असेल त्यासंबंधी अनुभवजन्य संशोधन करून त्या आधारावर विशिष्ट गटांनाच मदत पुरविण्यावर लक्ष केन्द्रित करावे लागेल. आणि अशी मदत पुष्कळदा रोखीत किंबहुना भौतिक स्वरूपातही न देता ती व्यक्तिगत औषधोपचार किंवा प्रतिबंधात्मक उपाय योजनेच्या स्वरूपात द्यावी लागेल. कुटुंबनियोजन संस्था, मुलांची देखभाल करणाऱ्या समित्या, घरोघर भेटी देणारे दानाधिकारी आणि मानसिक आरोग्य राखण्यासाठी काम करणारे कार्यकर्ते या सर्वांवर निवृत्तीवेतनापेक्षा अधिक खर्च करावा लागेल.

गरजेच्या स्वरूपात हे जे स्थित्यंतर घडून येत आहे त्याची पुरेशी जाणीव अद्यापही मजूर पक्षाला झालेली नसावी. अद्यापही फक्त बेव्हरीज वर्गवारीच्या पारंपारिक चाकोरीतूनच विचार करण्याकडे कल दिसतो. त्याचबरोबर हुजूर पक्षाची 'उत्पन्नाची छाननी' करण्याची भूमिका ही वरील समस्यांच्या संदर्भात तितकीच विसंगत आहे. तरीही पहिल्या भागात वर्णन केलेल्या सामाजिक क्रांतीबरोबर असे स्थित्यंतर घडून येणे हा उपसिद्धांत अनिवार्य ठरतो. हे स्थित्यंतर आणि त्याच्या जोडीला झपाट्याने होणारा विकास यामुळे दारिद्रय, बेकारी आणि ढळढळीत अन्याय यांसारख्या जुन्या शत्रूंवर हळू हळू मात करणे शक्य होऊ लागले आहे. परंतु आपण जसजसे हे क्षेत्र काबीज करीत जातो तसतसे आपल्याला असे आढळून येते की, आपण रंगवलेली स्वप्ने साकार होण्याऐवजी भौतिक मानदंडाबद्दलच्या नैसर्गिक हव्यासामुळे आजवर दृष्टिआड झालेल्या अनेक नव्या आणि अधिक गुंतागुंतीच्या

सामाजिक समस्या डोके वर काढू लागल्या असून त्याकडे लक्ष पुरविणे अपरिहार्य होवून बसले आहे. राहणीमानात पुढील पंचवीस वर्षात दुपटीने सुधारणा घडवून आणली किंवा आजच्याहून अधिक समानता प्रस्थापित करता आली आणि ही दोन्ही उद्दिष्टे अत्यंत वांच्छनीय अशीच असली तरी केवळ तेवढयाने या नव्या समस्या सुटू शकणार नाहीत. या ठिकाणी 'केन्सची विचारसरणी अधिक सुधारित भांडवल' ही विचारसरणी या क्षेत्रात अजिबात प्रभावी ठरू शकणर नाही. या सामाजिक समस्या सोडविण्याला इतर कशापेक्षाही अधिक महत्त्व देण्याचा निर्धार हा समानतेवरील निष्ठेपेक्षाही समाजवादी दृष्टीकोणाचे एक महत्वपूर्ण अंग बनला पाहिजे.

## ६. युद्ध आणि सामाजिक सेवा

सामाजिक सेवांबाबतच्या विशाल दृष्टीकोणाची पहिली प्रसादचिन्हे युद्ध-कालीन अनुभवामुळे दृग्गोच्चर होऊ लागली. नाही तरी सामाजिक सेवांच्या क्षेत्राचा विकास घडवून आणण्याला युद्ध बऱ्याच अंशी कारणीभूत झालेलेच होते. काही अंशी युद्धामुळे निर्माण झालेली राष्ट्रीय ऐक्याची भावना, काही प्रमाणात मध्यमवर्गीयांना कराव्या लागणाऱ्या स्थलांतरामुळे अनेक शहरवासियांना किती भयानक निकृष्ट दर्जाचे जीवन जगावे लागते ह्याची झालेली जाणीव आणि काही प्रमाणात स्थलांतर आणि युद्धासाठी करावी लागलेली सैनिक भरती यामुळे पुढे आलेल्या नव्या निकडीच्या गरजा यामुळे हे घडून आले.

सामाजिक गरजा केवळ दारिद्र्य आणि निराश्रितता यामुळेच निर्माण होत नाहीत तर समाजाच्या प्रत्येक पातळीवरच त्या आढळतात ही हळूहळू होत गेलेली जाणीव सामाजिक सेवांच्या विकासापेक्षा अधिक महत्त्वाची होती. ब्रिटनमध्ये ज्यावेळी सर्वांना भरपूर रोजगार उपलब्ध होता आणि आर्थिक विपत्तीचे प्रमाणही उभ्या इतिहासात सर्वात कमी झालेले होते अशा वेळी या अत्यंत व्यापक प्रमाणा-वरील जादा गरजा लक्षात येऊ लागल्या. त्यामुळे दारिद्र्य आणि सामाजिक गरज यात परस्पर संबंध असतोच असे नाही हे अगदी स्पष्टपणे प्रत्ययास येऊ लागले आणि या अनुभवामुळेच सामाजिक सेवांचे स्थान काय असावे याबद्दलच्या नव्या आणि व्यापक कल्पना प्रसृत होऊ लागल्या.

उदाहरणार्थ, १९३९ साली असे मानले जात असे की, बाँबवर्षावात घरांची धूळदाण झाली तर फक्त गरिबांनाच सरकारी मदतीची गरज लागेल, बाकीचे लोक आपले आपण निभावून घेऊ शकतील. आणि म्हणून बाँबवर्षावामुळे नुकसान झालेल्यांना मदत देण्याचे कार्य 'मदत मंडळाकडे' सोपविण्यात आले होते. साहजि-कच लंडनवरील पहिल्याच मोठ्या बॉम्बहल्ल्यात केवळ गरिबांनाच सरकारी मद-तीची जरूर लागेल ही समजूत आणि त्यावेळी केलेली व्यवस्था दोन्हीही कोलमडून

पडल्या. त्याचप्रमाणे व्हाइट हॉलमध्ये ज्यावेळी शहरे खाली करण्याबाबतची चर्चा झाली त्यावेळी सरकार पक्षातर्फे ग्रामीण भागांत यासाठी स्थापन होणाऱ्या केंद्रात तात्पुरत्या मुताऱ्या बांधण्यासाठी लागणारा खर्च मंजूर करण्यास नकार देण्यात आला. सरकारतर्फे त्याचे कारण असे सांगण्यात आले की, सामाजिक खर्चाच्या न्याय्य उद्दिष्टांत हा खर्च बसत नाही. परंतु हा दृष्टीकोणही पुढे फार काळ टिकू शकला नाही. शाळांतून प्रथम 'गरजू आणि पुरेसा सकस आहार मिळू न शकणाऱ्या' विद्यार्थ्यांनाच विनामूल्य दूध व अनुदानित जेवण पुरविले जात असे. परंतु अन्नधान्याच्या वाढत्या टंचाईची झळ सर्वांना सारखीच बसत आहे हे लवकरच ध्यानात आले आणि मग सर्वच मुलांना ही सवलत मिळू लागली. शेवटचे आणि अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण म्हणजे कुमारी मातांना मिळणाऱ्या वागणुकीचे. सुरवातीला ज्या निराश्रित किंवा अनाथ असतील त्याच तेवढ्या मदत देण्याच्या लायकीच्या आहेत असे धरले जात असे आणि त्यांची जबाबदारी देखील 'पब्लिक असिस्टन्स कमेटयांवर' सोपवलेली असे. पुढे हळू हळू असे लक्षात येऊ लागले की ती एक युद्धामुळे निर्माण झालेली अत्यंत निकडीची, व्यापक आणि अपरिहार्य अशी सामाजिक समस्या असून उत्पन्नाच्या प्रत्येक पातळीवर तिचे दुर्दैवी परिणाम घडून येत आहेत आणि म्हणून अशी स्त्री निराधार असो वा नसो, मदतीची गरज असलेल्या प्रत्येक स्त्रीला ती मिळाली पाहिजे.

युद्ध समाप्तीच्या वेळी 'केवळ गरिबांचीच नव्हे तर समाजातील बहुतेक सर्वच वर्गातील लोकांची विपत्ती आणि त्यांच्यावर पडणारा ताण कमी करणे हे सरकारचे उचित असे कार्यच केवळ नव्हे तर वस्तुतः ते सरकारचे कर्तव्यच ठरते' असे अधिकाधिक प्रमाणात मान्य होऊ लागले होते. अर्थात युद्ध आणि त्याबरोबर हाहाःकार उडवून देण्याइतक्या व्यापक प्रमाणावर घडून येणारा भौतिक विध्वंस आणि सामाजिक अस्वस्थता यामुळे समस्यांची व्याप्ती देखील इतकी वाढते की, अगदी सुस्थितीतील व्यक्तीदेखील केवळ स्वतःच्या बळावर त्यांना तोंड देऊ शकत नाही. सरकारने उचलावयाच्या जबाबदारीचे क्षेत्र शांततेच्या काळात देखील इतकेच किंवा निदान जवळजवळ इतकेच व्यापक असावे असे म्हणणे अगदी चूक ठरेल हे खरे असले तरी त्यामागील मूलभूत तत्वप्रणाली शांततेच्या त्याचप्रमाणे युद्धकाळालाही सारखीच लागू पडणारी आहे.

## ७. सामाजिक सेवा आणि सामाजिक समता

वरील विवेचनात गरजेसंबंधीच्या चार क्षेत्रांचा अलग अलग विचार करण्यात आला. त्याबाबत एकमत झाले तर सामाजिक खर्चाच्या बाबतीतील अग्रक्रम जवळजवळ आपोआपच ठरत जातात. त्यापैकी पहिल्या तीन गरजा– दुय्यम स्वरुपाचे दारिद्र्य, कुटुंबाची बदलेलेली परिस्थिती आणि काळानुसार गरजेत होणारे

फेरबदल– यांचा संबंध मुख्यत: मोठी कुटुंबे असलेल्या आणि आजारपणामुळे उत्पन्नात घट होणाऱ्या मंडळींशी व वृद्धांशीच येतो. शिवाय उरलेसुरले मूलभूत दारिद्रचही याच गटात केंद्रित झालेले असते.

त्यामुळे अग्रहक्कांचा क्रम ठरविण्याच्या बाबतीत निश्चितता येते. एका बाजूला या गटांना आपोआपच मिळणारे रोखीच्या स्वरूपातील पारंपारिक फायदे– वृद्धापकाळचे निवृत्तीवेतन, आजारपण आणि अपंगत्व यासाठी मिळणारे फायदे आणि कुटुंबभत्ता आणि दुसऱ्या बाजूला यापूर्वीच ज्यांचा तपशीलवार उल्लेख करण्यात आला आहे, अशा काही प्रत्यक्ष स्वरूपातील कल्याणकारी सेवा असे त्यांचे स्वरूप असते. यानंतरचा क्रम ‘ खास स्वरूपाच्या ’ मंडळींच्या गरजांचा लागतो. यासाठी फार मोठा पैसा खर्च करावा लागणार नाही. संख्येच्या (आणि निवडणुकीच्याही) दृष्टीने अगदीच क्षुल्लक असलेल्या गटांच्याबाबत उदारतेचे धोरण अंगीकारण्याची खरीखुरी तळमळ आहे की नाही हाच येथे खरा प्रश्न आहे.

सामाजिक विपत्ती, हालअपेष्टा आणि गरज यांचा परिहार करण्यासाठी वरील बाबींवर खर्च करणे आवश्यक असते. परंतु सामाजिक समता वाढत्या प्रमाणावर प्रस्थापित करण्याचे, याच्याच जोडीचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी अर्थातच जादा खर्चाची जमवाजमव करावीच लागणार. आरोग्य आणि शिक्षण यांच्या संदर्भात यासंबंधीची चर्चा येऊन गेली आहे. परंतु याशिवाय सधन वर्गातील लोक स्वत:च्या ऐपतीवर प्राप्त करून घेऊ शकतील अशा काही निकडीच्या सुविधा गरीब वर्गाला प्राप्त करून देऊन त्यायोगे पहिल्यापेक्षा जास्त सामाजिक समता प्रस्थापित करता येईल अशा तऱ्हेच्या सामाजिक खर्चाच्या आणि/किंवा करात सवलती देण्याच्या योजनांशी–ज्याला सर्वसाधारणपणे सामाजिक धोरण म्हणून संबोधतात– संबंधित अशा आणखीही काही बाबी आहेत. कायद्यासंबंधीची मदत हे याचे एक ठळक उदाहरण म्हणून दाखवता येईल.

परंतु याबाबतीतील विषमतेचा प्रत्यय प्रकर्षाने कोठे येत असेल तर जीवनाच्या विशिष्ट काळात श्रीमंत लोक स्वत:च्या खाजगी साधन सामुग्रीतून करात मिळणाऱ्या सवलतीतून किंवा त्यांच्या नोकरीच्या तरतुदीतून उत्पन्नाच्या मानाने तीव्रतेने वाढलेल्या गरजा भागविल्याची तरतूद करू शकतात त्यावेळी. म्हणजेच गरीब किंवा कामगार वर्गातील म्हातारेकोतारे, रुग्णाईत आणि मोठी कुटुंबे असणारे लोक यापेक्षा त्याच स्थितीतील श्रीमंत वर्गातील लोक तुलनेने अधिक चांगल्या प्रकारे दिवस काढू शकतात.

जास्त उत्पन्न असलेल्या कुटुंबांना करातील सवलतींमुळे रक्कम आणि मुदत या दोन्ही बाबतीत कुटुंबभत्ता मिळणाऱ्या पगारदारांपेक्षा त्यामानाने अधिक फायदे मिळतात. पहिल्या प्रकारच्या कुटुंबांना मिळणारे फायदे पहिल्या मुलाचे सर्व शिक्षण पुरे होईपर्यंत मिळत राहतात तसे दुसऱ्या प्रकारच्या कुटुंबात होत नाही. शिवाय

मध्यमवर्गातील बहुतेक सर्व लोकांना वार्षिक किंवा काही विशिष्ट काळानंतर पगार वाढ मिळत असल्याने आयुष्याच्या २५ ते ४० या अत्यंत धकाधकीच्या काळात मुलांचे संगोपन करण्यास तिचा थोडाफार उपयोग होतो. याउलट रोजमजुरी करणारांचे उत्पन्न मात्र पंचविसाव्या वर्षी असते तितकेच ते चाळीसाव्या वर्षीही राहते.

आजारीपणासंबंधी बोलावयाचे तर आता बहुतेक कंपन्या एखादा पगारदार कर्मचारी आजारी पडला तर त्याचा आठवड्याचाच नव्हे तर संपूर्ण महिन्याचाही पगार देतात. परंतु त्या काळातील रोजंदारीवरील कामगाराची रोजी मात्र देत नाहीत आणि त्यामुळे ही असमानता निर्माण होते. त्यामुळे ज्यावेळी गरजा अतिशय निकडीच्या होऊन बसलेल्या असतात त्याच वेळी नेमकी त्याच्या उत्पन्नांत त्या मानाने घट आलेली असते. वृद्धापकाळाबाबत काही खाजगी कंपन्यांमधून काही कर्मचाऱ्यांना लागू असलेली अतिवयस्कता योजना सर्वांना लागू नसल्यामुळे ही तफावत पडत जाते.

अशा तऱ्हेच्या काही असमानता दूर करुन घेणे कामगार संघटनांना शक्य आहे आणि त्यांनी तशा त्या दूर करुन घेतल्या पाहिजेत. सरकारच्या आर्थिक धोरणांसंबंधी बोलावयाचे तर वर निर्दिष्ट केलेला अग्रक्रमच सूचित केला जातो. परंतु खाजगी कंपन्यांतील अतिवयस्कतेच्या प्रश्नाचा मात्र अधिक तपशीलवार विचार व्हावयास पाहिजे.

व्यक्तिगत कल्याणकारी योजनांच्या दृष्टीने असे म्हणता येईल की त्यांचे परिणाम निश्चितच अत्युत्तम असल्याचे दिसून येते. सेवानिवृत्तीनंतर राहणीमान एकदम घसरते व त्याबरोबर अनेक अडचणी सोसाव्या लागतात. त्याचप्रमाणे कोणत्याही व्यक्तीचे राहणीमान पहिल्यापेक्षा म्हातारपणी उंचावण्यासाठी योजण्यात आलेल्या प्रत्येक उपायामुळे त्या व्यक्तीचे स्वास्थ्य सुधारण्याचा संभव असतो हे सर्वचजण मान्य करतात. निदान जे अशा योजनांत पैसे भरतात त्यांची तरी तशी समजूत असली पाहिजे असे त्या योजनांना लाभलेल्या लोकप्रियतेवरून म्हणता येईल.

कामगार वर्गापैकी फक्त एकतृतीयांश लोकच या योजनेच्या कक्षेत येतात यावरुन या कल्याणकारी फायद्यांचे वाटप अत्यंत वाईट तऱ्हेने होत असल्याचे स्पष्ट होते. परंतु या योजनांमुळे प्राप्तीकराचे बाबतीत ज्या सवलती मिळतात त्यांचे परिणाम प्रतिगामी स्वरुपाचे होतात व ते अनेकदा आणखी अन्यायाला कारणीभूत होतात असेही म्हटले जाते. याबाबत असा युक्तिवाद केला जातो कीं, या सवलतीमुळे समाजातील प्राप्तीकर न भरणाऱ्या गरीब गटाचा कसलाही फायदा होत नाही; आणि सर्वसाधारणपणे उत्पन्नाच्या अशा योजनांसाठी पैसा भरावा लागत असल्यामुळे उत्पन्न जितके जास्त असेल तितके फायदेही जास्त मिळू शकतात.

गरीब माणसाच्या निवृत्तीवेतनापेक्षां श्रीमंत मनुष्याच्या निवृत्तीवेतनावर शासन अधिक खर्च करते.

या युक्तिवादात काहीतरी गोंधळ उडालेला दिसतो. एक तर प्राप्तीकरातील प्रत्येक सवलतीमुळे कमी उत्पन्न असलेल्यांपेक्षा जास्त उत्पन्न असलेल्यांनाच अर्थात अधिक फायदा होतो. कारण जास्त उत्पन्न असलेल्यांनाच जास्त कर द्यावा लागतो. पुरोगामी करांची करांत मिळणाऱ्या सवलतींशी सांगड घातली गेल्यामुळे हा परिणाम घडून येणे अपरिहार्य होऊन बसते. आणि या दृष्टीने पहाता गरिबांची बायका-मुले आणि त्यांच्यावर अवलंबून असलेले नातेवाईक यांच्यासाठी शासन जास्त खर्च करते. कारण श्रीमंतांप्रमाणे गरीब लोक प्राप्तीकर भरीत नसतात. आणि प्राप्ती-करातील सवलतीवर आक्षेप घ्यावयाचा तर सर्वच करांतील सवलती मागे घ्याव्या लागतील. परंतु केवळ निवृत्तीवेतनाच्या सवलतीवरच तेवढी टीका करण्यास कसलाही तात्विक आधार नाही.

दुसरे असे की, एकूण कर आकारणीतील एखादीच बाब वेगळी काढून ती प्रतिगामी आहे अशी टीका करणे निरर्थक आहे असे बरेच दिवसांपासून मानण्यात येऊ लागले आहे. एकूण कर आकारणी, सवलती आणि फायदे यामधील पुरोगामी, प्रमाणबद्ध आणि प्रतिगामी बाबींची संपूर्ण सरमिसळ झालेली असते; आणि त्यांतील कोठल्याही एका बाबीच्या परिणामाचा अलगपणे विचार केल्यास त्यातून कांहीही निष्पन्न होत नाही. आपल्याला समानतेसंबंधी विचार करावयाचा असेल तर कर आकारणी आणि खर्च साकल्याने लक्षांत घेऊन त्याचे सर्वसाधारण परिणाम काय घडून येतील ते पाहिले पाहिजे.

एकंदर पुरोगामी कर रचनेतही काही विशिष्ट बाबी अनेकदा प्रतिगामी स्वरूपाच्या असतात याचे कारण असे की, उत्पन्नाचे वरपासून खालपर्यंत विभाजन करण्याव्यतिरिक्त कर आकारणीचे इतरही काही उद्देश असतात. त्यापैकी एक उद्देश असा असतो की, ज्यांच्या गरजा कमी आहेत त्यांच्याकडून गरजा जास्त अस-लेल्यांच्याकडे उत्पन्नाच्या प्रत्येक पातळीवर साधनांचे हस्तांतर करणे. या दृष्टीने पहाता करात दिलेल्या सवलती हा सामाजिक खर्चाचा पर्याय असू शकेल आणि प्राप्तीकरातील सवलतींच्या समर्थनामागील खरा मुद्दा हाच आहे.

एखादी विशिष्ट सवलत किंवा त्या सवलतीचे प्रमाण समर्थनीय आहे किंवा नाही हे त्यामुळे साधले जाणारे समाजकल्याण हे त्याच्या प्रतिगामी परिणामांच्या तुलनेने सरस आहे किंवा नाही यावरून ठरते. (अर्थात एखाद्या सवलतीमुळे सबंध करपद्धती कमी पुरोगामी बनते असे नाही. कारण रॅडक्लिफ समितीवरील अल्पसंख्य सभासदांनी सुचविल्याप्रमाणे एकाच उत्पन्न गटातील लोकांपैकी ज्यांना मुले नाहीत अशांवर जादा कर बसवून मुलांसाठी द्यावयाच्या जादा सवलतीचा खर्च वळता करून घेता येईल. परंतु कर आकारणीतील फक्त तेवढ्याच बाबीचा विचार केला

तर ती नक्कीच प्रतिगामी ठरेल) सामाजिक आणि कौटुंबिक स्वास्थ्याच्या दृष्टीने मुलांसाठी भत्ता मिळणे समर्थनीय ठरते याबाबत कोणाचेच दुमत होणार नाही. माझ्या मते वृद्धापकाळाकरता अधिक उदारपणे तरतूद करण्यास जे उत्तेजन दिले जाते त्यामुळे कल्याणकारी योजना अधिक फलदायी ठरते. यावरूनच अतिवयस्कतेच्या सवलतीमागील तत्त्व निखालसपणे समर्थनीय ठरते—अर्थात अगदी वरच्या उत्पन्नवाल्यांना मिळणाऱ्या काही प्रत्यक्ष सवलती या निष्कारणच वारेमाप असतात आणि त्यांना कात्री लावणे अत्यावश्यक आहे.

सध्याच्या खाजगी अतिवयस्कता योजनेबाबत खरा आक्षेप आहे तो मुख्यत: करांत मिळणाऱ्या सवलतींसंबंधीचा नाही, तर लोकसंख्येच्या काही विशिष्ट भागालाच त्या योजनेचे फायदे मिळू शकतात हा खरा आक्षेप आहे. करांतील सवलतींपेक्षाही आतिवयस्कतेच्या फायद्याचे वितरण अधिक अन्याय्य आहे. श्रमिक जनतेपैकी दोनतृतीयांश लोक या योजनेखाली येऊ शकत नाहीत इतकेच केवळ नव्हे तर या योजनेत समाविष्ट व्हावयाचे की नाही ते ठरविण्याचे स्वातंत्र्य अर्थातच व्यक्तीला असत नाही— ती व्यक्ती ज्या संघटनेत काम करीत असेल त्या संघटनेलाच ते ठरविण्याचा अधिकार असतो. याचा परिणाम असा होतो की, ज्यांना केवळ सरकारकडून मिळणाऱ्या निवृत्ती वेतनावरच उदरनिर्वाह करावा लागतो आणि त्यामुळे निवृत्तीनंतर ज्यांच्या उत्पन्नात एकदम कमालीची घट होते आणि अतिवयस्कता योजनेखाली आल्यामुळे ज्यांच्या उत्पन्नात फारच थोडी घट होते असे दोन सुस्पष्ट वर्ग निर्माण होतात आणि त्यामुळे सामाजिक न्याय आणि सामाजिक समानता या दोन्हीलाही बाधा पोहोचते. आणि त्यामुळे प्रत्यक्ष नोकरीच्या कालावधीपेक्षा म्हातारपणात अधिक विषमता उपभोगावयास लागण्याचाही सहजच फार मोठा धोका निर्माण होतो.

मग यावर उपाय काय ? वृद्धापकाळाकरता राष्ट्रीय उत्पन्नातून जेवढी तरतूद करण्यात आली असेल ती सर्वच्या सर्व रक्कम सरसकट दराने किमान जीवनावश्यकतेसाठी द्यावयाच्या भत्त्यावर खर्च करून चालणार नाही. कारण एक तर खाजगी अतिवयस्कता योजनेखाली बरेच लोक आलेलेच असतात, शिवाय अशा तऱ्हेने त्या रकमेचे वाटप करणे केव्हाही तर्कशुद्ध ठरणार नाही. निवृत्तीनंतरचे राहणीमान निवृत्तीपूर्वीच्या राहणीमानाशी मिळतेजुळते असावे हा उद्देश असेल तर निवृत्तीपूर्व उत्पन्नाशी निवृत्तीवेतनाची सांगड घातली गेली पाहिजे.

संपूर्ण 'नॅशनल इन्शुअरन्स पेन्शन' योजनेची फेर आखणी करून नागरिकाकडून त्या योजनेसाठी घेतला जाणारा पैसा आणि त्याच्या बदल्यात त्याला मिळणारे फायदे हे बदलते ठेवणे हाच या समस्येवरील तर्काला जास्तीत जास्त धरून असलेला तोडगा आहे यात शंकाच नाही. परंतु याला इतका तीव्र विरोध आहे की, त्यामुळे तो अमलात आणणे हे आणखी दहा वर्षे तरी व्यवहार्य राजकारण ठरणार

नाही. त्यामुळे स्वीडनमधील सरकारनियुक्त समितीने अलीकडेच सुचविल्याप्रमाणे आजच्या राष्ट्रीय विमा योजनेला सक्तीच्या सार्वत्रिक योजनेची जोड देणे हाच यावरील तोडगा ठरतो. स्वीडनच्या या नव्या योजनेप्रमाणे नागरिकांकडून वसूल करावयाची रक्कम वार्षिक उत्पन्नानुसार कमीजास्त होत जाईल आणि निवृत्ती-वेतनही नोकरीच्या काळातील पगारानुसार (नोकरीच्या काळात मिळालेले एकूण संकलित उत्पन्न) मिळेल. (प्रत्यक्ष राष्ट्रीय उत्पन्नात जसजशी वाढ होत जाईल तसतशी पैशाचे मूल्य जर यदाकदाचित घसरले तर त्या प्रमाणात निवृत्तीवेतनातही आपोआपच वाढ होईल.) पुढच्या मजूर सरकारने ही शक्यता आपल्या कारकीर्दीच्या सुरवातीलाच विचारात घेणे इष्ट ठरेल.

## ८. सार्वत्रिक अनुदाने विरुद्ध सर्वंकष प्रयत्न

गेल्या प्रकरणात हे दाखवून दिलेच आहे की, हा प्रश्न सोडविण्यासाठी येणारा खर्चही पुढील अनेक वर्षेपर्यंत तरी त्या मार्गातील धोंड ठरणार आहे. मग प्रश्न असा उभा राहतो की, ही समस्या सोडवावयाची कशी ? सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की, अग्रक्रम योग्य तऱ्हेने निश्चित करणे आणि सामाजिक सेवांचे निश्चित कार्य कोणते यासंबंधी सुस्पष्टता असणे हा या प्रश्नाचा खरा गाभा आहे. (निवड-णुकीच्या वेळी दिलेल्या आश्वासनांना जरूर ती मुरड घालण्याची आवश्यकताही लक्षात घेतली पाहिजे.) परंतु त्याचबरोबर काही विशिष्ट सेवांवर होणारा खर्च टाळता येणार नाही आणि गरजू व बिनगरजू या दोघात कसलाही फरक न करता सरसकट दिल्या जाणाऱ्या अनुदानांना शक्य तो फाटा द्यावा लागेल हेही लक्षात घेतले पाहिजे.

संपूर्ण किंवा अंशतः मोबदला देण्याची शक्यता अजमावण्यासाठी मध्यवर्ती आणि निकडीच्या सेवांव्यतिरिक्त इतर बाबतीत उत्पन्नाची कसोटी लावली तर त्यामुळे सामाजिक विषमतेत वाढ होतेच असे नाही. मात्र ती कसोटी किमान जीवनावश्यक उत्पन्नाची कसोटी असता कामा नये हे आपण यापूर्वी पाहिलेच आहे. हुजूपक्षीय मंडळी समजतात त्याप्रमाणे स्वभावतःच अत्यंत स्तुत्य आणि वस्तुतः सामाजिक सेवांच्या स्वरूपात अभिप्रेत असलेल्या सामाजिक धोरणाचे, उत्पन्नाची छाननी करणे हे खास वैशिष्ट्य नव्हे. परंतु त्याला काही प्रमाणात महत्त्व निश्चित आहे– विशेषतः दिल्या जाणाऱ्या सेवा कोणत्याही परिस्थितीत विनामूल्यच दिल्या गेल्या पाहिजेत असा आग्रह असेल तर चालू असलेल्या सर्व सेवांचा लाभ विनामूल्य प्राप्त करून द्यावयाचा की, इतर बाबींवर जादा खर्च करावयाचा यासंबंधीचा निर्णय त्यामुळे आधीच घेतला गेला जातो.

सामाजिक सेवांसाठी काही फी आकारावी की नाही हे ठरविताना पुढील चार बाबी विचारात घेणे आवश्यक आहे. एक : सध्याची सेवा मोफत उपलब्ध करून देणे आणि फी बसविल्यामुळे अशा प्रकारच्या नव्या खर्चासाठी होऊ शकणारी

आर्थिक तरतूद यापैकी सामाजिक दृष्टचा अधिक फायदेशीर कोणते? दोन: सध्याच्या सेवेची गरज किती निकडीची आहे इतकेच नव्हे तर त्यासाठी केली जाणारी मागणी कितपत तीव्र आहे, म्हणजे त्यासाठी फी भरावी लागली तर जनता त्याचा लाभ घेण्याच्या बाबतीत औदासिन्य दाखवील किंवा काय? तीन: फी घेणे आवश्यक ठरले तर ती वसूल करण्याची सोपी आणि कार्यक्षम पद्धत अस्तित्वात आहे काय? आणि चार: सेवा विनामूल्य उपलब्ध करून दिल्यामुळे त्याचा दुरुपयोग केला जाईल आणि त्यामुळे इतरत्र चांगल्या तऱ्हेने उपयोगात आणता येणारी साधनसामुग्री निष्कारण अडकून पडेल अशी शक्यता आहे काय?

या प्रश्नांचा वस्तुनिष्ठ दृष्टीकोणातून आणि तपशीलवार विचार झाला पाहिजे. वातावरण तप्त होऊ न देता शांतपणे आणि बुद्धिवादी दृष्टीकोणातून त्याची चर्चा करता येणे अगदी शक्य आहे. अर्थात सामाजिक सेवासंबंधीचे जे तज्ञ असतील तेच यासंबंधीचे निकष अधिकारवाणीने ठरवू शकतील. विश्वविद्यालयीन शिष्यवृत्त्या, कायद्याची मदत, डॉक्टरने दिलेले औषधांचे निर्देशपत्र आणि (वाढत्या प्रमाणावरील) नगरपालिकेची घरबांधणी यासारख्या विविध प्रकारच्या सेवांवर अनिष्ट परिणाम घडू न देता सध्या लागू करण्यात येणाऱ्या उत्पन्नाची छाननी करण्याच्या कसोटीला निश्चित स्थान आहे– अर्थात त्याबाबतचे निकष सहानुभूती-पूर्वक लागू करण्यात यावेत आणि गरज भासल्यास वसूल करावयाची फी सहज माफ करण्याची सोय असावी. वसूल होणारी एकूण रक्कम कधीच फारशी असणार नाही हे उघड आहे. परंतु याचा अर्थ असा नव्हे की, सरकारी तिजोरीवर पडणारा संभाव्य ताण लक्षात घेता त्या उत्पन्नावर पाणी सोडावे.

शेवटी प्रश्न उपस्थित होतो तो अनुदानाचा, विशेषतः अन्नधान्यासंबंधीच्या अनुदानाचा. (ज्यामुळे अगदी निराळेच प्रश्न निर्माण होतात अशा वेतनविषयक धोरणासंबंधीचा विचार याठिकाणी लक्षात घेतलेला नाही) एकतर ज्यांच्यावर कोणी अवलंबून नाही अशांकडून ज्यांच्यावर इतर लोक अवलंबून आहेत त्यांच्यात उत्पन्नाचे फेरवाटप होते. कारण ज्यांना त्यांच्यावर अवलंबून असलेल्यांचा भार उचलावा लागतो त्यांना आपल्या उत्पन्नाच्या मानाने त्यातील अधिकांश भाग अन्नधान्यासाठी खर्च करावा लागतो असे गृहीत धरलेले असते. हा मुद्दा अनुदानाच्या समर्थनार्थ पुढे केला जातो. अशा तऱ्हेचे फेरवाटप होणे सर्वस्वी अगत्याचे ठरते हे खरे. परंतु ते साध्य करण्यासाठी अनुदानाचा अवलंब करण्याची पद्धत अत्यंत अकार्यक्षम ठरते. कारण ती अनुदाने सर्व जनतेत विखुरलेली असतात आणि त्यावर कसलाही कर असत नाही. त्यापेक्षा कुटुंबभत्त्यात वाढ करण्यात आली (आणि सेवा-निवृत्त लोकही त्यांच्या उत्पन्नाच्या अपेक्षेपेक्षा फार मोठा भाग अन्नधान्यावरच खर्च करीत असल्याने निवृत्त वेतनातही वाढ करणे कदाचित उचित ठरेल) तर फेर-वाटपाचे हे उद्दिष्ट वायफळ खर्च न होता साध्य होऊ शकेल.

जास्त प्रमाणात रोखीने पैसे देण्यापेक्षा ते अनुदानाच्या स्वरूपात देण्याचे समर्थन करण्यासाठी दुसरा एक मुद्दा मांडला जातो तो असा की, किंमतीत तुलनात्मक बदल घडवून आणला तर त्यामुळे अशा कुटुंबधारकांना अधिक खाद्यपदार्थ खरेदी करण्यास प्रवृत्त करता येते. अन्यथा मात्र त्या कुटुंबधारकांनी त्यांच्या प्रत्यक्ष उत्पन्नात कसलाही फेरबदल झालेला नसतानाही त्या बाबीवर इतका पैसा खर्च केला नसता. परंतु हे समर्थन इतके पटण्यासारखे नाही. कामगारवर्गाच्या उत्पन्नाची सध्याची पातळी विचारात घेतली आणि त्यांचे प्रत्यक्ष उत्पन्न स्थिर राहिले आहे, असे गृहीत धरले तर किमतीत ज्या प्रमाणात चढउतार होईल त्याप्रमाणात अन्नधान्याच्या वापरातही फरक पडेल असे खात्रीपूर्वक सांगता येणार नाही. खाद्यपदार्थांच्या किंमतीत होणाऱ्या वाढीची भरपाई करण्यासाठी कोणते उपाय योजले जातात यावरच बहुधा ते अवलंबून राहील. मद्य आणि तंबाखू यावरील कर कमी करण्यात आले (व्यवहारात मात्र ते असंभवनीयच आहे) तर अन्नधान्याचा वापर कदाचित खाली येईल कारण कुटुंबाच्या एकूण उत्पन्नात बदल झाला नाही तरी बायकोला घरखर्चासाठी मिळणाऱ्या पैशांच्या प्रत्यक्ष मूल्यात मात्र घट होईल, आणि नवऱ्याला 'विडी-काडी' साठी मिळणाऱ्या पैशाच्या प्रत्यक्ष मूल्यात मात्र वाढ होईल. आणि नवऱ्याकडून या बदलाची भरपाई केली जाणार नाही. परंतु केवळ कुटुंबाचे एकूण उत्पन्नच नव्हे तर प्रत्यक्ष स्वरूपातील त्याचे अंतर्गत विभाजनही आहे तसेच राहू देण्याच्या दृष्टीने कुटुंबभत्त्यांत वाढ करण्यात आली तर कदाचित अन्नधान्याच्या उपभोगावर कसलाही परिणाम घडून येणार नाही.

तथापी एका विशिष्ट परिस्थितीत प्रत्यक्ष उत्पन्न जसेच्या तसे कायम टिकविण्यात आले तरीही किंमतीतील चढ उताराचा अन्नधान्याच्या उपभोगावर तात्काळ परिणाम घडून येतो. बायकोला घरखर्चासाठी मिळणारे पैसे (हे पैसे मुख्यत: अन्नधान्य आणि इतर गरजा भागविण्यासाठीच खर्च केले जातात) आणि नवऱ्याला विडी-काडीसाठी मिळणारे पैसे यात कुटुंबातील उत्पन्नाची विभागणी नेमकी कशाप्रकारे होते यावरच ते अवलंबून असते. किंमती स्थिर राहिल्या तर नवरा बायकोतील पैशाच्या विभागणीतून योग्य त्या सकस आहारासाठी करावा लागणारा खर्च भागवता येईल. परंतु एकूण किंमती चढ्या असतील तर नवऱ्याला योग्य तो महागाई भत्ता मिळत असूनही तो कदाचित घरखर्चासाठी द्यावयाच्या पैशांत त्या प्रमाणात वाढ करणार नाही. मग त्या परिस्थितीत अन्नधान्य आणि इतर गरजांवर होणारा खर्च कमी होणे अपरिहार्य ठरेल आणि कदाचित खर्चातील ही कपात निमचैनीच्या वस्तूंवरील खर्चाच्या मानाने बरीच मोठी देखील असू शकेल. आणि मोठ्या कुटुंबातून सकस आहार न मिळाल्याने घडून येणारे परिणाम गंभीर स्वरूपाचेही होऊ शकतील.

अशा परिस्थितीत अन्नधान्यासाठी मिळणाऱ्या अनुदानात वाढ करण्यात आली आणि त्याचबरोबर निमचैनीच्या वस्तूंवर अप्रत्यक्ष कर बसविण्यात

आले तर प्रत्यक्ष उत्पन्नाचे निरनिराळ्या वस्तूंतील अंतर्गत विभाजन पूर्वीसारखच राहू देण्यात सहाय्यभूत होईल आणि त्यायोगे खाद्यपदार्थ आणि इतर खर्च याचे प्रमाण पूर्ववत राहू शकेल. म्हणून महागाईच्या काळात सामाजिकदृष्टया अनुदानाची बाजू अतिशय बळकट होते.

परंतु हा एक अपवाद वगळला तर प्रत्यक्ष उत्पन्नाचे पहिल्यासारखेच वाटप होत रहावे म्हणून कमी वायफळ ठरणाऱ्या अन्य उपायांपेक्षा अनुदानात वाढ करण्याला अधिक पसंती देणे सामाजिकदृष्टया तितकेसे समर्थनीय ठरत नाही— विशेषत: आपल्या मर्जीनुरूप आपले उत्पन्न खर्च करण्याच्या नागरिकांच्या स्वातंत्र्यावर बाधा येता कामा नये या दृष्टीकोणातून तर अनुदानाची बाजू अधिकच लंगडी पडते. समाजवादी या मुद्याला फारसे महत्व देत नाहीत कारण एक तर खर्चाच्या आणि किंमतीच्या 'खऱ्या' आणि 'प्रत्यक्ष' स्वरूपाला अनुदानामुळे विकृत वळण तरी लागते किंवा ते स्वरूप लपवले तरी जाते या लोकप्रिय परंतु मूर्खपणाच्या आणि जुन्या पठडीतील अर्थशास्त्रीय तज्ञांनी चावून चोथा केलेल्या युक्तिवादाची आणि या मुद्याची गफलत करतात. एकाधिकार, विषम स्पर्धा, जकातीची बंधने, पुरवठयाच्या बाबतीतील साचेबंदपणा, परकीय चलनाच्या बाबतीतील निर्बंध इत्यादिच्या जमान्यात करमुक्त किंवा अनुदानाविरहित किंमती या 'प्रत्यक्ष' किमती आहेत असे मानणे निरर्थक आहे.

परंतु यामुळे पितृसत्तावादी प्रवृत्तीच्या प्रश्नावर कोणताही परिणाम घडून येत नाही. अनुदान मागे घेण्यात आल्यास त्याची योग्य ती भरपाई केली गेली तर उत्पन्नाचे एकाकडून दुसऱ्याकडे हस्तांतर होण्याचा संभव नसल्याने राष्ट्रीय विनिमयाचा ढाचा सक्तीने बदलण्याच्या हेतूने उत्पन्नाचे 'सामाजीकरण' करण्याचा जाणूनबुजून केलेला एक प्रयत्न म्हणूनच अनुदानाकडे बघितले पाहिजे. आता अशा तऱ्हेचा पितृसत्तावादी दृष्टीकोण या प्रकरणात चर्चिलेल्या मूलभूत कल्याणकारी सेवांच्या संदर्भात नि:संदिग्धपणे समर्थनीय ठरतो. परंतु सध्याची सांस्कृतिक पातळी आणि प्रत्यक्ष उत्पन्नाचे मानदंड लक्षात घेता त्यांची व्याप्ती फार वाढवता कामा नये.

या ठिकाणी समाजवाद्यांनी कठोर आत्मपरीक्षण करून ते कोठे भरकटत चालले आहेत ते स्वत:ला विचारून पहावे. आपले उत्पन्न कशा प्रकारे खर्च करावे यासंबंधी जनतेला सतत प्रवचने झोडीत राहणे हा समाजवाद नव्हे. असे करणे म्हणजे नागरिकांच्या स्वातंत्र्यात खरोखरीच हस्तक्षेप करणे आणि व्हाईट हॉलमध्ये बसलेल्या माणसालाच तेवढे सर्व समजते या समजुतीला खतपाणी घालणे होय. या प्रकरणात दिग्दर्शित केलेल्या आणि गरज व हालअपेष्टांच्या दृष्टीकोनातून सर्वस्वी समर्थनीय ठरणाऱ्या प्रचंड प्रमाणावरील सामाजिक खर्चासंबंधी हुजूरपक्षीय मंडळींच्या चर्पटपंजरीकडे लक्ष देण्याचे कारण नाही. परंतु तेवढ्या मुद्याव्यतिरिक्त

समाजवाद्यांनी हे सदव लक्षात ठेवले पाहिजे (परंतु ते सहसा तसे ठेवीत नाहीत) की, त्यांच्या नसानसांतून अराजकवाद्यांचे रक्त वहात असून प्रत्येक वेळी व्यक्ती-विरुद्ध शासनाची तळी उचलून धरणे हे त्यांचे ब्रीद नव्हे. धोरणीपणा आणि स्वतः-हून लादून घेतलेली शिस्त याविषयीचे गोडवे हवे तर त्यांनी गावेत, लोकात वाट-ल्यास त्याचा प्रचारही करावा; परंतु एकसारखे ते दुसऱ्यावर लादीत बसण्याच्या मात्र त्यांनी भरीस पडू नये.

ते कसेही असो. सध्याच्या परिस्थितीत अनुदानांत मोठ्या प्रमाणावर वाढ करण्यास अनुकूलता दर्शविणे अत्यंत मूर्खपणाचे ठरेल. साधनसामुग्रीवर आधीच दुसरा फार मोठा बोजा असतांना आणि सरकारी खर्च भरमसाठ वाढलेला असतांना कल्याणकारी समाजाचे ध्येय तडीस नेण्यासाठी फार मोठे धैर्य आणि इच्छाशक्ती दाखवावी लागेल. तरच जरूर ती साधन संपत्ती उपलब्ध करून घेता येईल आणि हस्तांतराच्या समस्येवर मात करता येईल. त्यासाठी जी करआकारणी करावी लागेल त्याला हुजूर पक्षाकडून तर जोरदार विरोध होईलच परंतु बहुधा नोकरपेशातील माणसे आणि सर्वसाधारण मतदार हे देखील विरोध करतील. जर हे आव्हान स्वीकारावयाचे असेल – आणि न स्वीकारले तर समाजवादी सरकार आपल्या पहिल्याच उद्दिष्टापासून च्युत झाले असे होईल–तर सामाजिक खर्च गरजू आणि बिनगरजू या दोहोंतही तुरळकपणे विखरून भागणार नाही तर जेथे सर्वात जास्त गरज असेल तेथेच तो जास्तीत जास्त केन्द्रित करावा लागेल.

# प्रकरण आठवे

# वर्गांची लक्षणे

## १. ब्रिटनमधील विरोधाभास

मूलभूत समाजवादी आकांक्षांची चर्चा करतांना सामाजिक समता आणि वर्ग-विहीन समाज प्रस्थापित करण्याच्या आकांक्षेला आपण दुसऱ्या क्रमांकाचे स्थान दिले होते. त्यासंबंधीच्या आपल्या दृष्टीकोणाचा फेरविचार करणे भाग पडावे अशी दोन कारणे घडली आहेत. त्यापैकी पहिले कारण असे की, गेल्या दोन दशकांतील फेरवाटपावरून असे दिसू लागले आहे की, जास्त प्रमाणावर समता प्रस्थापित करण्याच्या बाजूने समाजवादी जो पारंपारिक युक्तिवाद करतात त्यापैकी काही मुद्दे आता गैरलागू झाले आहेत. यासंबंधीची चर्चा पुढच्या प्रकरणात केली आहे.

आणि दुसरे कारण असे की, उत्पन्नातील समतेच्या बाबतीत आपण बरीच मजल गाठली आहे. तरीही अर्थात सामाजिक दृष्टया समतेवर आधारलेल्या आणि वर्गविहीन अशा समाजापासून आपण अद्याप कितीतरी दूर आहोत असे दिसून येते. १९४१ साली जॉर्ज ऑरवेल याने असे लिहिले आहे की, ‘ सबंध जगात इंग्लंड हा असा एक देश आहे की, जेथील समाज सर्वात जास्त वर्गाधिष्ठित आहे.’ ‘ लॉयन अँड दि युनिकॉर्न ’ हे आपले पुस्तक ऑरवेलने लिहिले तेव्हापेक्षा या परिस्थितीत थोडीशी सुधारणा घडून आली आहे. तरीदेखील दुसऱ्या प्रकरणात निर्दिष्ट केलेल्या उत्पन्नाच्या फेरवाटपानंतरही ब्रिटनमध्ये वर्गीय भावना अद्याप तीव्र स्वरूपात वसत असून कोणत्याही स्कँडेनेव्हियन, ऑस्ट्रॅलेशियन किंवा उत्तर अमेरिकेतील राष्ट्रांपेक्षा इंग्लंडमधील समाजात उघडउघड सामाजिक विभागणी झालेली आढळते. त्याचप्रमाणे तेथील वर्गविरोध अधिक कडवा असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. वस्तुस्थिती अशी आहे की आपल्या समाजातील वर्गीय पद्धतीची पाळेमुळे आपल्या सामाजिक

मनोभूमिकेत इतकी खोलवर रुजली आहेत की, ती आपण जवळजवळ गृहीतच धरून चालतो. परंतु सराव नसलेला एखादा परदेशीय किंवा परदेशात जाऊन परत आलेला एखादा स्थानिक प्रवासी ज्यावेळी येथील परिस्थिती पहातो त्यावेळी त्याला धक्काच बसतो. आणि येथील वर्गीय भावनेची व्याप्ती पाहून तो आश्चर्यचकित होतो.

आणि खरोखरीच दोन महायुद्धे आणि सहा वर्षांची मजूरपक्षाची राजवट यांच्या प्रभावामुळे झंझावाती सामाजिक स्थित्यंतर घडून येत असतानाही वर्ग भावना अद्यापही पाय घट्ट रोवून उभी असलेली पाहून मती कुंठित होऊन जाते. सबंध जगाला ब्रिटनमध्ये एक विरोधाभास पहावयास मिळतो. एका बाजूला कमालीची प्रगल्भ अशी राजकीय लोकशाही, वाढती आर्थिक सुबत्ता आणि सामाजिक न्यायाला योग्य त्या प्रमाणात स्थान देणारी समाज व्यवस्था, तर दुसऱ्या बाजूला सामुदायिक असंतोषाला जन्म देणारी जुन्याच धाटणीची वर्गव्यवस्था असे परस्पर विरोधी चित्र ब्रिटनमध्ये पहावयास मिळते. उत्पन्नाच्या बाबतीत घडून आलेल्या स्थित्यंतराचाही या परिस्थितीवर परिणाम घडून येऊ शकत नाही. यावरून केवळ संपत्तीचे फेरवाटप केल्याने वर्गविहीन समाज निर्माण करता येईल असे दिसत नाही. म्हणून आपल्या उद्दिष्टासंबंधी व्यापक स्वरूपाची फेरमांडणी करण्याची भाषा आणि त्याची पहिली पायरी म्हणून वर्गासंबंधी अधिक काटेकोर विश्लेषण याची पूर्वी कधी नव्हती इतकी गरज आज निर्माण झालेली आहे.

## २. वर्ग याचा लोकांना अभिप्रेत असलेला अर्थ

लोक ज्यावेळी वर्गासंबंधी बोलतात त्यावेळी त्यांना असे अभिप्रेत असते की, समाज काही मर्यादित थरात विभागलेला असतो आणि त्यांची एक उतरंड लागलेली असते. निरनिराळ्या समाजातील या थरांची संख्या, त्यांतील अंतर आणि त्यांच्या सीमारेषांतील काटेकोरपणा यात भिन्नता असते. निरनिराळ्या थरांतील सीमारेषा अगदी स्पष्ट अशा क्वचितच असतात. तरीदेखील वर्गीय विभागणीला कसलाही बाध येत नाही किंवा त्यातील सत्यता कमी होत नाही—उभयलिंगी प्राणी आपण पहात असलो तरी सरतेशेवटी लिंगभेदाची जाणीव आपल्याला असतेच की नाही ?

सामाजिक दृष्ट्या मान्यता पावलेल्या वरिष्ठ आणि कनिष्ठतेच्या संबंधांतून हे वर्ग निर्माण झालेले असतात आणि अशा श्रेष्ठ–कनिष्ठ संबंधांतूनच त्यांची अभिव्यक्ती होत असते. समानतेच्या संबंधाने एकमेकांच्या जवळ आलेले आणि श्रेष्ठकनिष्ठतेच्या मान्यता पावलेल्या मानदंडांनुसार इतरांपासून अलग असलेल्या व्यक्तींच्या समूह किंवा समाजाचा विशिष्ट विभाग म्हणजे वर्ग असे म्हणता येईल. ‘ वर्ग म्हणजे समाजाच्या घटकांकडून सामाजिकदृष्ट्या कनिष्ठ किंवा वरिष्ठ

स्थान प्राप्त झालेल्या लोकांच्या दोन किंवा दोनाहून जास्त श्रेणी.'

सामूहिकरित्या माणसाला इतरांकडून कशाप्रकारची वागणूक आणि स्थान दिले जाते त्याचप्रमाणे तो इतरांना कशा प्रकारची वागणूक आणि स्थान देतो त्यावरून सामाजिकदृष्टचा मान्यता पावलेले परस्पर संबंध प्रतिबिंबित होतात. त्यामुळे या वर्गवारीची दोन स्वरूपे असतात. त्यापैकी एक सामाजिक दृष्टि-कोणातून व्यक्त होणारे—मग तो दृष्टिकोण स्वतंत्र आणि समानतेचा असो की, भेदजन्य आणि तुच्छतादर्शक असो—बाह्य स्वरूप आणि समानता, श्रेष्ठत्व किंवा कनिष्ठता या संबंधीच्या आत्मनिष्ठ भावनांच्या तीव्रतेतून किंवा त्या उलट व्यक्त होणारे दुसरे मानसिक स्वरूप.

मान्यता पावलेले हे परस्पर संबंधांचे जाळे ही वर्गासंबंधीची एक अविवाद्य बाब आहे. या वर्गांची उभारणी कशी झाली, सामाजिक दृष्टचा मान्यता पावलेल्या वर्गवारीचे निकष कोणते आणि वरपासून खालपर्यंत लागलेल्या या उतरंडीतील व्यक्तीचे स्थान ठरविण्याचे गमक कोणते हा समाजशास्त्रविषयक प्रश्न असून त्याबाबत समाजशास्त्रज्ञांत अद्यापही मतभेद दिसून येतात. आजच्या-पेक्षा 'वर्गा'ची तीव्रता कमी कशी करता येईल याविषयीचा उहापोह करतांना यांपैकी कोणत्याही एका सिद्धांताचा समाजवाद्यांना आश्रय घेता येणार नाही. शिवाय याबाबत झालेल्या प्रत्यक्ष संशोधनातून उपलब्ध झालेला जवळजवळ सर्व पुरावा मुळात अमेरिकेतील आहे. ब्रिटनमध्ये यादृष्टीने जवळपास पहाणी झालेलीच नाही. त्यामुळे या प्रकरणात जी उदाहरणे देण्यात आली आहेत ती अमेरिकेतील पहाणीतून घेतलेली आहेत.

वर्ग निर्माण होण्यास कोणकोणत्या बाबी निश्चितपणे असाव्या लागतात ते सध्या उपलब्ध असलेल्या ज्ञानाच्या आधारे ठरविणे शक्य नाही आणि त्यासंबंधीचे तपशीलवार विवेचन करण्याचा याठिकाणी उद्देशही नाही. याठिकाणी वर्ग निर्माण करणाऱ्या प्रमुख बाबींवरच तेवढा भर द्यावयाचा असल्यामुळे आणि विशेषतः वर्ग-जागृती आणि सामाजिक विषमता यांना उत्पन्नाव्यतिरिक्त इतर गोष्टीही जबाबदार असतात हेच मुख्यतः दाखवून द्यावयाचे असल्यामुळे ब्रिटनऐवजी अमे-रिकेतील पाहणीचा आधार घेतला म्हणून फारसे बिघडत नाही. या इतर बाबी उत्पन्नापेक्षांही अधिक महत्त्वाच्या असू शकतात. ते कसेही असो, परंतु त्या नेहमी उत्पन्नाशी (किंवा एकमेकींशी) निगडित असतातच असे नाही एवढे मात्र निश्चित. याचा अर्थ असा की, ही चर्चा अर्थातच निर्णायक स्वरूपाची होऊ शकत नाही असा ग्रह होतो. या प्रकरणाच्या शेवटी मी दाखवून दिल्याप्रमाणे काही ऐतिहासिक कारणांमुळे याबाबतीतील इंग्लंडमधील परिस्थिती मात्र सहसा कधी आढळणार नाही इतकी निर्णायक आहे. म्हणजेच इंग्लंडमधील सामाजिक उतरंडीवर

ज्यांचा प्रभाव पडतो त्या बाबी अगदी मोजक्या आणि ठोस असतात, त्याचप्रमाणे त्या परस्परांशी संबंधित असतात. त्यामुळे त्यात कमालीची स्पष्टता असते अशी माझी समजूत आहे. परंतु इंग्लंडमध्येदेखील प्रभाव पाडणाऱ्या अशा ज्या बाबी आहेत त्या अलग अलग केल्या पाहिजेत. अन्यथा सामाजिक समता ही केवळ किंवा मुख्यत: संपत्तीचे अधिक फेरवाटप झाले म्हणजे येऊ शकते असा चुकीचा समज होऊन बसावयाचा.

## ३. वर्गासंबंधीचा मार्क्सवादी सिद्धांत

वर्गांच्या उभारणी संबंधाने बहुतेक समाजशास्त्रज्ञ 'वस्तुनिष्ठ' सिद्धांत प्रमाण मानतात; म्हणजेच ते असे मानतात की, समाजातील वर्ग हे साधारणत: आर्थिक स्वरूपाची काही विविक्षित उद्दिष्टे आणि सहज ओळखू येणाऱ्या कसोट्या यावरून जवळपास आपोआपच ठरत असतात.

अशा प्रकारचा सर्वांत आधीचा सिद्धांत अर्थातच मार्क्सने मांडलेला आहे. तो असे प्रतिपादन करतो की, उत्पादनाचे स्वरूप आणि परिस्थिती याच मूलत: वर्ग रचना आणि वर्गीय दृष्टीकोण यांच्या बाबतींतील निर्णायक बाबी होत. उत्पादनाच्या भौतिक साधनांवरील मालकी किंवा त्यापासून वंचित केले जाणे हे वर्गीय विभागणीच्या प्रभावाचे द्योतक असून त्यावरूनच पुढे असा निष्कर्ष निघतो की, अंतत: मालक (भांडवलदार) आणि बिगर मालक (कामगार) असे फक्त दोनच वर्ग राहू शकतात आणि त्या दोन वर्गांच्या दरम्यान असलेले गट हळूहळू समाजातून अस्तंगत होत जातात. वर्ग निर्माण होण्यास कारणीभूत ठरणाऱ्या निर्णायक बाबी या केवळ आर्थिकच असतात असे नाही तर त्या जवळपास तंत्रशास्त्रविषयकही असू शकतात आणि वर्ग म्हणजे केवळ उत्पादन साधनांशी विशिष्ट संबंध (मालकी किंवा बिगर मालकी) असलेला असा एका विशिष्ट कार्यात गुंतलेला गट. अर्थात वर्गावर्गातील इतर सामाजिक आणि तत्त्वप्रणालीसंबंधीचे फरक अर्थातच कालांतराने पुढे येतात. परंतु ते मूलत: दुय्यम स्वरूपाचे आणि उत्पादनविषयक संबंधांच्या पायावर उभारण्यात आलेल्या अधिसंरचना (सुपर स्ट्रक्चर) सारखे असतात.

हे विश्लेषण तीन प्रकारची परिस्थिती असेल तर लागू पडते. पूर्वी कदाचित तशी परिस्थिती असेलही, परंतु औद्योगिकदृष्टचा पुढारलेल्या देशात ती आज खासच आढळणार नाही. यापैकी पहिली गोष्ट अशी की, उत्पादनसंबंध आणि त्यातील श्रमविभाग हा तंत्रदृष्टचा अगदी साध्या स्वरूपाचा असला पाहिजे; त्यायोगे उत्पादन साधनांबरोबरचे संबंध अगदी सुस्पष्ट असलेल्या अशा ठळक आर्थिक गटांत लोकांची विभागणी होऊ शकते. परंतु वस्तुत: गेल्या शतकात (व्यवसाय, प्रशासन, करमणूक, यांसारख्या) सेवांच्या स्वरूपातील व्यवसायांत झपाट्याने वाढ

झाली असून उत्पादनाच्या भौतिक साधनांशी त्यांचा कसलाही संबंध येत नाही असे दृष्टोत्पत्तीस आले आहे. वस्तू निर्माण करणाऱ्या कारखान्यांतूनही वाढीचे प्रमाण आणि उत्पादनातील तंत्रविषयक गुंतागुंत यामुळे (विशेषतः व्यवस्थापकीय आणि तांत्रिक यांसारखी) कसबी कामे करणाऱ्यांच्या संख्येत कितीतरी वाढ झाली असून त्यामुळे अशा कारखान्यांतून काम करणारे कामगार हे आता सुस्पष्ट अशा कामगार वर्गात मोडेनासे झाले आहेत (स्वयंचलित यंत्रांमुळे याला आणखीच गती मिळणार आहे). अशा तऱ्हेने ध्रुवीकरण होण्याचे बाजूलाच राहून कामगार किंवा भांडवलदार यांपैकी कोणत्याच वर्गात न मोडणाऱ्या मधल्या लोकांची संख्या वाढू लागल्याचे आपल्याला आढळून येत आहे. आणि उत्पादनसाधनांबरोबरच्या प्रत्यक्ष भौतिक संबंधांमुळे या वर्गात मोडणाऱ्या लोकांच्या सामाजिक दृष्टीकोणावरही परिणाम घडून येत नाही.

दुसरी बाब म्हणजे, परस्पर आर्थिक संबंध आणि त्यामुळे वर्गीय ढाचा यावर मूलतः (उत्पादन साधनांवरील) मालकी आहे किंवा नाही या निकषाचा प्रभाव पडावयास हवा. परंतु तिसऱ्या प्रकरणात आपण हे आधीच पाहिलेले आहे की, मालकी हक्काचा आर्थिक सत्ता, उत्पन्नाचे फेरवाटप, पिळवणुकीचे प्रमाण किंवा वर्गीय वृत्ती साकार करणाऱ्या इतर कोणत्याही बाबींशी सुतराम संबंध नसतो.

तिसरी गोष्ट अशी की, मार्क्सवादी कबूल करीत नसले तरी माणसाचे जीवन आणि साहजिकच त्याचा सामाजिक दृष्टीकोण यावर त्याच्या भौतिक गरजा व त्याला भासणारा त्यांचा तुटवडा यांच्या दुर्दम्य दडपणाचे अधिराज्य असते आणि अशा तऱ्हेची टंचाईची अर्थव्यवस्था मार्क्सप्रणीत समाजशास्त्रात गृहीत धरलेली असते. या व्यवस्थेत माणसांचे जीवन आणि त्यांच्या सामाजिक प्रवृत्ती, भौतिक गरजा आणि आवश्यक वस्तूंचा अभाव, यांनी नियंत्रित होतात. दारिद्र्य आणि दारिद्र्याविषयीची नाराजी यामुळे बहुसंख्याकांची विशिष्ट मनोवृत्ती बनते तर हिंसक मार्गाने आपली श्रीमंती हिरावून घेतली जाईल या धास्तीने अल्पसंख्य श्रीमंतांची मनोवृत्ती तशीच बनते. फक्त अशा तऱ्हेच्या समाजातच परस्परातील सामाजिक संबंध हे पूर्णतः केवळ उत्पादन संबंधांवर निर्भर असू शकतील. त्याचप्रमाणे, निखळ भौतिक प्रेरणांवरच सामाजिक आकांक्षा निर्धारित होऊ शकतील. परंतु आज औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या देशांतील अर्थव्यवस्था समृद्ध आणि झपाट्याने विकास पावत असल्याने परिस्थिती अगदी निराळी दिसू लागली आहे. आर्थिक परिस्थितीबद्दलचा रासवट संतापाचा सामाजिक दृष्टीकोणावरील प्रभाव कमी कमी होऊ लागला आहे, इतकेच नव्हे तर कामाच्या तासात झालेली घट आणि त्याच्या जोडीला वाढते राहणीमान आणि उपभोग्य वस्तूंची फार मोठी विविधता यामुळे कामाच्या संबंधांवरून वर्गाचे मूल्यमापन करण्याचे महत्त्वही हळूहळू कमी होऊ लागले असून त्याऐवजी वस्तूंचा उपभोग आणि स्वास्थ यांच्या परस्पर संबंधांचा

प्रभाव मात्र वाढीस लागला आहे.

अर्थात अद्यापही उत्पादनसंबंधांचा वर्गीय दृष्टीकोणावर फार मोठा प्रभाव आहे. एखादा खाण कामगार आणि 'कोल बोर्डा'चा सभासद यांच्या भावना सारख्या नसतात. औद्योगिक तंटे संपुष्टात आलेले नाहीत (अर्थात हे तंटे आता अधिकाअधिक प्रमाणात बिगर आर्थिक प्रश्नावर उद्‌भवलेले असतात) आणि जनतेला अद्यापही तिच्या भौतिक राहणीमानाची विवंचना लागून राहिलेली असते. म्हणून मार्क्सवादी समाजशास्त्र (जर खुलेपणाने त्याचा अर्थ लावला गेला तर) अद्यापही या प्रश्नाच्या विवेचनात काही भर घालू शकेल. परंतु वर्गाविषयी पर्याप्त आणि सर्वंकष असा सिद्धांत मात्र मार्क्सवाद देऊ शकत नाही हे स्पष्ट आहे.

## ४. वर्ग निर्णायक म्हणून उत्पन्न, व्यवसाय आणि जीवनपद्धती यांचे स्थान.

युद्धापूर्वीचे बहुतेक सर्व समाजशास्त्रज्ञ याबाबतीतील मार्क्सचे सिद्धांत संकुचित म्हणून त्याज्य मानीत असले तरी त्यांचा दृष्टिकोण स्थूलमानाने आर्थिक स्वरूपाचा असे. त्यांच्या दृष्टीने, अत्यंत व्यापक अर्थाने व्यावसायिक किंवा आर्थिक दर्जा हेच वर्गाचे मुख्य गमक असे. उत्पन्नाची रक्कम, उत्पन्नाचे साधन, शाश्वतीचे प्रमाण, स्वातंत्र्याची व्याप्ती, उपक्रमशीलता आणि नियंत्रण यांचे प्रमाण, कामाचे स्वरूप (शारीरिक की बिनशारीरिक श्रमाचे), अर्थ विषयक नसलेले विशेषाधिकार अशा निरनिराळ्या गोष्टींवरून हा आर्थिक दर्जा ठरत असतो.

या ना त्या स्वरूपातील 'आर्थिक दर्जा'च वर्गावर्गातील भेदाभेदाचे एकमेव जरी नव्हे तरी प्रमुख कारण असते ही गोष्ट बहुतेक सर्वजण मान्य करतील. एकाद्याचे वर्गीयस्थान ठरविताना बहुधा हीच गोष्ट प्रथम विचारात घेतात आणि श्रमिक, मध्यम आणि वरिष्ठ किंवा उच्च अशा तीन वर्गांत समाजाची जी विभागणी झालेली दिसते तिचा देखील यामुळेच उलगडा होऊ शकतो आणि ती समर्थनीयही वाटू लागते. परंतु वरवर पाहाता ही बाब जितकी सरळ आणि खात्रीलायक वाटते तितकी ती नसते. उलट त्यामुळे दिशाभूलच होते आणि अधिक बारकाईने विचार केला तर असे दृष्टोत्पत्तीस येते की, वर्ग निश्चितीचा हा एकमेव निकष नसून वेग-वेगळ्या आणि कित्येकदा परस्पर विरोधी अशा निकषांची त्यात सरमिसळ झालेली असते.

विशेषत: उत्पन्न आणि इतर काही बाबी यांचा निश्चित असा परस्पर संबंध असतोच असे नाही, आणि पुष्कळदा अशा बाबींचा व्यावसायिक प्रतिष्ठेवर फार मोठा प्रभाव पडत असतो. अशा तऱ्हेने सामाजिक प्रतिष्ठेनुसार व्यवसायांची प्रत-वारी लावण्याची वेळ येते त्यावेळी उत्पन्नाच्या विभाजनाच्या ढाच्यावरच ती लावली जाते असे नाही. प्राध्यापक, गोदी कामगार, सचीव, न्यायाधीश, खाण-

कामगार किंवा यासारखे निरनिराळे व्यवसाय करणाऱ्यांचे स्थान वेगवेगळे असते. यातील महत्वाची तफावत औद्योगिक क्षेत्रातील पांढरपेशा ( व्हाइट कॉलर ) वर्गावरून स्पष्ट होते. या वर्गाचे उत्पन्न रोजंदारी करणाऱ्या कामगार वर्गापेक्षा बहुधा कमीच असते. तरीही रोजंदारी ऐवजी त्यांना मिळणारे मासिक वेतन, कामाची उशीरा होणारी सुरुवात, कामगारांपेक्षा निराळी उपहारगृहे, निवृत्ती-वेतन योजना, नोकरीची अधिक शाश्वती, बिगर शारीरिक श्रमाच्या स्वरूपाचे काम, यांसारख्या आर्थिक स्वरूपाच्या नसलेल्या विशेषाधिकारांमुळे ( अर्थात हे विशेषाधिकार तर्कशुद्ध असतातच असे नाही) त्यांना समाजात एक प्रकारची व्यावसायिक प्रतिष्ठा प्राप्त झालेली असते.

वस्तुतः आज ज्यांना मध्यमवर्गीय म्हणून संबोधिले जाते, विशेषतः ज्यांना मासिक पगाराच्या स्वरूपात वेतन मिळते त्यांना मध्यमवर्गीय ही संज्ञा त्यांच्या आर्थिक दर्जापेक्षाही बिनआर्थिक स्वरूपाच्या बाबीवरून प्राप्त होत असते. त्यांचा आर्थिक दर्जा पहिल्यापेक्षा तुलनेने कितीतरी निकृष्ट झालेला आहे. याच्या उलट काही औद्योगिक कामगार आणि बहुतेक सर्व छोटे व्यापारी ( दुकानदार इत्यादी ) यांनी आपल्या आर्थिक परिस्थितीत कितीतरी प्रगती करून घेतलेली असूनही ते करीत असलेल्या व्यवसायांना ती प्रतिष्ठा प्राप्त झालेली दिसत नाही. यावरून हे स्पष्ट होईल की, उत्पन्न आणि आर्थिक क्षेत्राबाहेरील व्यावसायिक प्रतिष्ठा या अगदी स्वतंत्र अशा बाबी आहेत असे धरून चालले पाहिजे.

परंतु अलीकडे काही वर्षांपासून लहान शहरांच्या सामाजिक व मानववंश-शास्त्रीय अभ्यासावरून काही समाजशास्त्रज्ञ असे प्रतिपादन करू लागले आहेत की, स्थूल स्वरूपाच्या आर्थिक निकषाबद्दलही निरपवाद असा आग्रह धरता कामा नये. त्यांच्या पहाणीत असे दिसून आले आहे की, सामाजिक वर्गवारी ही उत्पन्न किंवा व्यवसाय यांच्याशी नेहमी पूर्णपणे निगडित असतेच असे नाही. उलट व्यक्तिगत "जीवनपद्धती ", सामाजिक सवयी आणि रीतीरिवाज व विनिमयाचा सर्वसाधारण ढाचा यांसारख्या अनिश्चित किंवा संदिग्ध बाबींवरही काही अंशी ती अवलंबून असते.

लॉइड वॉर्नर याने केलेल्या पहाणीवरून त्याला असे दिसून आले की, यँकी शहरातील वर्गवारी ही मुख्यतः तेथील घरांचे प्रकार, रहावयाच्या जागेचे क्षेत्रफळ, पोशाख, करमणुकीचे प्रकार इत्यादींवरून अजमावली जात असे आणि त्यामुळे सामाजिक मान्यता प्राप्त होईल अशा बाबींवर खर्च करण्याकडे तेथील लोकांचा कल असे. या पहाणीत असेही आढळून आले की, या वर्गवारीचा उत्पन्नाच्या दर्जाशी कसलाही संबंध नव्हता. 'वरच्या दोन वर्गांच्या खाली मोडणाऱ्या वर्गातील कितीतरी लोकांचे उत्पन्न वरच्या वर्गातील लोकांपेक्षा अधिक असे'. त्याचप्रमाणे अब्राहम कार्डिनर याला प्लेनव्हिला गावच्या पहाणीत असे आढळून आले की, इतर

कोणत्याही बाबींपेक्षा (घरदार, गाडीघोडा, जेवणखाण, कपडालत्ता, बोलणेचालणे आणि चारचौघातील ऊठबस यांसारख्या सांस्कृतिक बाबींमिळून बनणाऱ्या) राहणीमानावरूनच तेथील नागरिकांची दोन मुख्य वर्गांत काटेकोर आणि वस्तुनिष्ठ अशी विभागणी होत असे. त्याचप्रमाणे त्याला असेही आढळून आले की, उत्पन्नाशी या वर्गवारीचा फारसा संबंध नसे. ' खालच्या वर्गातील अनेक कुटुंबे (बहुधा एक-तृतीयांश ) वरच्या वर्गातील कित्येक ( यांची संख्याही बहुधा तितकीच असावी ) कुटुंबांपेक्षा सधन होती, परंतु त्यांना वर्गीय स्तराच्यावर नेऊन बसविण्याच्या दृष्टीने उत्पन्नाची बाब पुरेशी नव्हती.

विनिमयाच्या स्वरूपाच्या तपशीलवार पहाणीवरून असे दृष्टोप्त्तीस येते की, निर्विवादपणे सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून देणाऱ्या नव्यानव्या आणि फॅश-नेबल वस्तूंच्या विभाजनाशी उत्पन्नाच्या दृष्टीने पहाता कित्येकदा कसलाच मेळ बसत नाही. उत्पन्नाच्या प्रतवारीवरून एकाद्याच्या खर्चाच्या स्वरूपाचा कस-लाही अंदाज वर्तवता येत नाही. त्याचप्रमाणे त्याच्या उत्पन्नाविषयीही अंदाज बांधता येत नाही. कारण विनिमयाचा ढाचा हा उत्पन्नापेक्षांही विशिष्ट गटांत त्यावेळी प्रचलित असलेल्या फॅशन्सवर अवलंबून असतो. ( पुष्कळदा ही फॅशन थेट मुलांपर्यंत देखील पोहोचलेली असते. ममी, आपण धुण्याचे मशीन घ्यायचे का ? असे मुले आपल्या आयांना विचारतांना आपण ऐकतोच की ? )'

आपण राहतो त्याच्या आसपासचा विभाग हे आपल्या 'जीवनपद्धतीचे' सर्वांत प्रमुख गमक असते. तुम्ही कोठल्या भागांत राहता—कोन्सिंग्टन की बरमाँ-ड्से; एमबॅस्टन की नेचेल्स्; वूडस्टॉक रोड की सेंड एन्स; घर तुमच्या स्वतःच्या मालकीचे आहे की म्युनिसिपालिटीचे ? ते ईस्ट साईडच्या बाजूला आहे की वेस्ट साईडच्या ? गांवाच्या वरच्या बाजूला की खालच्या ? व्यक्तीचा वर्गीय दर्जा पुष्कळदा ठोकळमानाने अशा बाबींवरूनच ठरवला जातो. आणि व्यक्तींच्या जीवन पद्धतीतील तफावत ठरविणाऱ्या या बाबींवरून त्या व्यक्तीचे सामाजिक आणि भौगोलिक स्थान निश्चित होत असल्याने विनिमयाच्या सवयींनुसार सामाजिक प्रतिष्ठेची उतरंड उभी राहते इतकेच नव्हे तर त्यामुळे स्थूल स्वरूपांतील सामा-जिक पातळीही निश्चित होते असे दिसून येईल.

वरील निष्कर्षावरून वर्गासंबंधीच्या चर्चेत एक नवा मुद्दा प्रकर्षाने उपस्थित होतो. व्हेब्लेन बद्दल लोक आता बोलू लागले आहेत. विनिमयाच्या सामाजिक दर्जावर पुन्हा विशेष भर दिला जातो आहे. आपली गरज भागविण्यासाठी किंवा आवडीनिवडी पुरविण्यासाठीच माणूस खर्च करतो असे नाही तर तो ज्या गटात मोडत असतो त्या गटाचा सामाजिक दर्जा टिकाविण्यासाठी म्हणूनही तो खर्च करीत असतो. खर्च करणाराला आंतरिक समाधान मिळावे म्हणूनच केवळ नव्हे तर, आपले सामाजिक स्थान मान्यता पावावे, इतकेच नव्हे तर ते अधिक उंच-

वावे हाही खर्च करण्यापाठीमागील उद्देश असतो. अशा तऱ्हेने परंपरागत 'आर्थिक-मानवा'कडून अपेक्षा केली जाते त्याप्रमाणे उपलब्ध रकमेचा 'कार्यक्षमते'ने व्यय करणे हा विनिमयाचा निकष न राहता त्या गटाच्या सामाजिक अपेक्षा हा तो निकष बनतो. म्हणून व्हेबलेनच्या शब्दांत सांगावयाचे तर, खाणेपिणे, नोकरीपेशा, दागदागिने, वस्त्रप्रावरणे, घरदार आणि मनोरंजन यांसारख्या मानमरातबाच्या बारीकसारीक गोष्टीत निवडानिवड केली जाते. या यादीत आता कालानुसार मोटारगाडी, टेलिव्हिजन आणि सर्व साधारणपणे घरगुती भांडवल यांचाही समावेश करावा लागेल.

परंतु व्हेबलेनच्या या प्रतिपादनावर आपण फारसे विसंबून राहता कामा नये. त्याच्या सिद्धांताचा मुख्य गाभा असा की, 'आर्थिक समर्थतेचा' विनिमय हा प्रत्यक्ष पुरावा मानला जातो. खर्च करणाराच्या संपत्तीचे प्रदर्शन घडविणे हे त्याचे सामाजिक कार्य असते. आणि त्यासाठी डोळ्यात भरण्यासारखा वारेमाप इतकेच नव्हे तर उधळपट्टीच्या स्वरूपाचा खर्च करणे आवश्यक होऊन बसते. त्याचा परिणाम असा झाला की, आर्थिक बाबींवरून आधीच निश्चित झालेल्या वर्गीय आकृतीबंधाच्या बाह्य प्रतीकाचे किंवा प्रदर्शनाचे स्वरूप त्याला प्राप्त होते. अशा तऱ्हेने व्हेबलेनवादी सिद्धांतात असे गृहीत धरले जाते की, एक तर संपत्ती हा मानमरातबाचा अपरिहार्य असा आधार असतो आणि दुसरे म्हणजे डोळ्यांत भरणाऱ्या खर्चावरून संपत्ती संबंधीचा अंदाज बांधला जातो.

परंतु यापैकी कशालाच आज वस्तुस्थितीचा आधार राहिलेला नाही. (आणि इतर कांही देशांत तशी परिस्थिती असली तरी इंग्लंडांत तरी ती कधीच नव्हती.) अलिकडे सामाजिक दर्जाचे मूल्यमापन हे केवळ संपत्तीवरून केले जात नाही तर, खर्च कशा प्रकारे केला जातो त्यावरूनहि ते केले जाते. त्यातही पुन्हा खर्चावरून संपतीची प्रचीती कितपत येते यापेक्षाही त्या खर्चाला स्वतःचे असे सामाजिक महत्त्व कितपत आहे यावरूनही त्याचा अंदाज केला जातो. म्हणून जो सर्वांत जास्त खर्च करतो त्याच्याजवळ सर्वात जास्त संपत्ती असल्याचा प्रत्यय येत असला तरी केवळ तेवढ्यामुळेच त्याला सर्वोच्च दर्जा प्राप्त होतोच असे नाही. सामाजिक मूल्यमापनांत विनिमय हा एक अपरिहार्य असा घटक बनला आहे इतकेच नव्हे तर अनेकदा संपत्तीशी तो मिळताजुळताही असत नाही. यावरून हे ओघानेच येते की, पैशाचे "नेत्रदीपक प्रदर्शन" आणि "डोळ्यांत भरणारी उधळपट्टी" याचा विनिमयाच्या उद्दिष्टांशी सामाजिक दृष्ट्या कसलाही परस्पर संबंध राहिलेला नाही. वस्तुतः आपण बहुधा अगदी दुसरे टोक गाठले असावे. भपकेबाजी ही आता सर्वसाधारणपणे ग्राम्य समजली जाते. आणि गटाची मान्यताही अतिरेकी खर्चापेक्षांही 'चांगली अभिरुची' आणि त्या गटातील सर्वमान्य अशा सामुदायिक पातळीला चिकटून राहण्यानेच प्राप्त

करून घेतली जाते.

ते कसेही असो, ब्रिटनमध्ये राहणीमान आणि खर्च करण्याच्या सवयी यांचा सामाजिक निकर्षावर कमालीचा प्रभाव पडत असतो, कारण अन्य ठिकाणांपेक्षा ब्रिटनमधील निरनिराळ्या वर्गांतील तफावत फार तीव्र आहे. याचे मुख्य कारण असे आहे की, पूर्वापार चालत आलेल्या वंशपरंपरागत अमीरउमरावी समाज-पद्धतीचा ठसा इंग्लंडमधील आजच्या जीवनावरही फार खोलवर उमटलेला आहे. त्यामुळे एकाद्याचा पोषाख (विशेषतः पुरुषांचा पोषाख. स्त्रीच्या पोषाखावरून तिची पूर्वपीठिका सांगता येणार नाही या आजकालच्या लोकप्रिय दृष्टीकोणाशी भावनाशून्य माणसालाच सहमत होता येईल,) जेवणाखाणासंबंधीच्या (आणि पिण्याच्याही) सवयी, फर्निचरच्या बाबतीतील आवडीनिवडी, राहत्या घराचे स्वरूप, मनोरंजनाची तऱ्हा, खेळाच्या आवडीनिवडी आणि सर्वसाधारणपणे फुरसतीच्या वेळांतील उद्योग यांवरून निरनिराळ्या सामाजिक वर्गाची अटकळ तात्काळ बांधता येते. काहीशा चाकोरीबद्ध अशा समाजजीवनामुळे तर ही तफावत अधिकच उठून दिसते हे समाजजीवनवरच्या श्रेणींत, राजदरबारी मंडळींच्या वर्तुळांत, 'कमिंग आऊट' सारख्या शिष्टाचारांत व लंडन शहरांतील शिष्ट समाजांत दृष्टीस पडते.

सामाजिक दर्जाचे सर्वश्रेष्ठ व निरपवाद असे प्रतीक असलेली शब्द संपत्ती आणि उच्चारांची धाटणी यांच्या बरोबरचे साहचार्य हेही या तफावतीला कांही अंशी कारणीभूत असते. अशा तऱ्हेने एकाद्या व्यक्तीने तोंडातून शब्द काढल्याबरोबर त्याचे वर्गीय स्थान ओळखणे इतर कोठल्याही देशांत शक्य होणार नाही. आणि यामुळेच वर्गीय लक्षण म्हणून 'जीवनपद्धतीला' इंग्लंडमध्ये फाजील महत्त्व प्राप्त होते. अगदी १९५६ मध्ये देखील एलिझा डूलिट्स हे पात्र अशक्य कोटीतील आहे असे ब्रिटनमध्ये मानले जात नसे. परंतु अन्य देशांतून मात्र पिगमेलियन हे नाटक म्हणजे असंभाव्य कोटीतील एक ब्रिटिश फार्स आहे असेच नेहमी मानले जात असे.

आता ही तफावत वर्गांसंबंधीच्या आर्थिक लक्षणांमुळे किंवा त्याचा परिपाक म्हणून निर्माण होते असे नाही. तसेच या तफावतीचा उत्पन्नाशी किंवा आर्थिक सत्तेशी निश्चित असा संबंध असत नाही. त्यापैकी समाजातील सर्वात जुन्या व सर्वात प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या वरिष्ठ वर्गाचे उत्पन्न आणि स्वकर्तृत्वाने पुढे आलेल्या भांडवलदारांच्या किंवा उद्योगधंद्यातील व्यवस्थापनाच्या सर्वोच्चपदी असलेल्यांच्या संपत्तीपेक्षा कमी असेल (आणि अनेकदा तसे ते असतेही) तर या नव्या वर्गाबद्दल त्यांना असूया वाटते. खानदानी कुटुंबातील अनेक तरुण छानछोकीचा पोषाख करून शहरातील व्यापारी बँकांच्या इमारतीतून उगीचच भटकताना दिसतात यावरूनही वरील विधानाची प्रचीती येऊ शकते. अर्थात कालानुसार या दोन वर्गातही दुवा साधला जातो. कारण स्वतःच्या कर्तबगारीवर पुढे आलेला भांडवल-

दार आपल्या मुलांना ईटन आणि ऑक्सफोर्डला शिकायला पाठवतो आणि ती मुले तेथले खानदानी रीतीरिवाज अल्पावकाशातच आत्मसात करतात. परंतु कोण-त्याही विशिष्ट वेळी आर्थिक बाबींवर किंवा जीवनपद्धतींवर आधारलेल्या निकषांचे परिणाम वेगवेगळे घडून येऊ शकतात.

इंग्लंडमधील भाषाशैली, सामाजिक रीतीभाती आणि रहाणीमान यांचा शिक्षणाशी जितका घनिष्ठ संबंध असतो तितका तो व्यावसायिक प्रतिष्ठेशी नसतो. पब्लिक स्कूलमधून शिक्षण घेतलेले उच्च वर्गीय गट सोडले तरी इतरांच्या विनिमयाचा ढाचा अगदी तंतोतंत जरी नाही, तरी बऱ्याच अंशी उत्पन्नाशी मिळता जुळता असतो. उत्पन्नापेक्षाही सामाजिक उतरंडीच्या सर्वोच्चिपदी असलेले शिक्षण, राहणीमान आणि व्यावसायिक प्रतिष्ठा हे एकमेकांशी निगडित असलेले त्रिकूट सामाजिक विषमतेला अधिक कारणीभूत ठरते आणि एकदा ही गोष्ट नीट लक्षात घेतली म्हणजे वर्गीय भावना कमी करण्याच्या कामी उत्पन्नाच्या फेरवाटणीला फारसे यश आले नाही म्हणून आपण विशेष भांबावून जाणार नाही.

सत्ता हे जे वर्गीय भावनेचे शेवटचे निर्णायक कारण तिचा आता विचार करू या. सत्तेमुळे प्रतिष्ठा प्राप्त होते आणि उच्चनीचतेच्या भावनेवर तिचा फार मोठा परिणाम घडून येत असतो या म्हणण्यात निश्चितच काही अर्थ आहे. परंतु दुर्दैवाने हा विचार अत्यंत संदिग्ध स्वरूपाचा असून त्यातून अनेक अर्थ निघू शकतात. त्यापैकी सर्वस्वी व्यक्तिगत किंवा फुटकळपणे व्यक्त होणाऱ्या प्रतिक्रिया आपल्याला अर्थातच अभिप्रेत नाहीत. हिप्नॉटिस्ट किंवा सॅडिस्ट यांनी घडवून आणलेल्या प्रतिक्रियांशी आपल्याला कर्तव्य नाही. संपूर्ण सामाजिक गटांना लागू पडतील अशाच प्रतिक्रिया आपल्याला विचारात घ्यावयाच्या आहेत. परंतु याबाबतही अनेक अर्थ संभवणाऱ्या अशा कल्पनेतून आपल्याला अगदी निश्चित किंवा निरपवाद असा अर्थ अभिप्रेत धरता येणार नाही. आपल्याला वर्गीय पद्धतीच्या दृष्टीने महत्त्वाचे वाटणारे निरनिराळे पैलू तेवढे विचारात घेता येतील.

एक: एकाच सामाजिक गटात मोडणाऱ्या व्यक्तींची इतरांच्या जीवितांवर आणि मालमत्तेवर असलेली प्रत्यक्ष साक्षात सत्ता. नोकरीवरून काढून टाकणे, बढती देणे किंवा खालच्या जागेवर ढकलणे, पगार कमीजास्त करणे, एका ठिकाणा-हून दुसऱ्या ठिकाणी बदली करणे, विशिष्ट तऱ्हेने कामाची आखणी करणे, आणि कर्मचाऱ्यांच्या नोकरीचे स्वरूप आणि व्यावसायिक दर्जा निश्चित करणे किंवा सर्वसाधारणपणे त्यावर प्रभाव पाडणे इत्यादी बाबतीतील अधिकार हे सत्तेची उतरंड असलेल्या उद्योगधंद्याचे उघडउघड ध्यानात येईल असे लक्षण होऊन बसले आहे. मार्क्सवादी समाजात त्याप्रमाणे ही उतरंड उद्योगांच्या मालकीशी निगडित नसते तर उद्योगांच्या संघटनात्मक यंत्रणेतील स्थानच काय ते त्यामुळे सूचित केले जाते.

शासनाने पत्करावयाच्या जबाबदाऱ्यांत झपाट्याने होत गेलेल्या वाढीबरोबर

राजकीय व्यवहारांतही अशीच नोकरशाही सत्तेची उतरंड निर्माण झाली आहे. सरकारी नियमांचा अर्थ विषद करणारे आणि त्यांची अंमलबजावणी करणारे शासकीय कर्मचारी व्यक्तिगत नागरिकांच्या जीवितांवर आणि भवितव्यावर पुष्कळ सत्ता गाजवीत असतात. भांडवलदार कामगारांवर जशी सत्ता गाजवतात असा समाजवाद्यांचा दावा असतो तशाच तऱ्हेची ती सत्ता असते. वस्तूंचा पुरवठा करणे किंवा तो आखडता घेणे, कारखाना उभारावयाला परवानगी देणे किंवा ती नाकारणे, जमीन मालकाची जमीन काढून घेणे किंवा त्याला नवीन जमीन संपादन कण्रयास मज्जाव करणे, लोकांना वेड्याच्या इस्पितळात डांबून ठेवणे, वेतनाला पूरक अनुदान देणे किंवा ते काढून घेणे, यासारखी व्यापक सत्ता या अधिकाऱ्यांच्या हाती असते. संघटनात्मक कामाची व्याप्ती जसजशी वाढत आहे तसतशी सत्ता गाजविणारे अधिकारीही सर्वत्र आढळू लागले आहेत. व्यवसायांतही ही नोकरशाही शिरू लागली असून त्याचा परिणाम असा होऊ लागला आहे की, ज्यावेळी व्यावसायिक आपापले व्यवसाय स्वतःच्या बळावर करीत असत त्यापेक्षा आता सत्तास्थानांचे केंद्रीकरण होऊ लागले असून खास विश्वासातल्या लोकांसाठीच ती राखून ठेवली जाऊ लागली आहेत.

सत्ता गाजवणारे अधिकारी हे निश्चितच सामाजिक वर्गीकरणाला हातभार लावतात आणि तरीही अशा वर्गीकरणाला जबाबदार असलेल्या इतर बाबींपेक्षा ते वेगळे असतात. डॉरसेट शायरमधील एखादा लेफ्टनंट कमांडरसारख्या हुद्यावर असलेला जमीनमालक खानदानी घराण्यात आपली सोयरिक जमवतो; त्याचे उत्पन्न आणि व्यावसायिक प्रतिष्ठा मोठी असते आणि त्याची राहणी तर खूपच उच्च दर्जाची असते आणि तरीही त्याच्यापेक्षा कमी उत्पन्न असलेला कृषि मंत्रालयातील एखादा अधिकारी त्याला आपली जमीन परत मिळविण्यास मनाई करतो असे घडू शकते. व्यापारी मंडळाकडून ( बोर्ड ऑफ ट्रेड ) एखादा परवाना मिळवू पहाणाऱ्या व्यापाऱ्याचे उत्पन्न त्या मंडळावरील ज्या तरुण अधिकाऱ्यापुढे त्याचा अर्ज विचारासाठी आलेला असतो त्याच्यापेक्षा दुप्पटही असू शकते. मोठ्या कारखान्यातील आस्थापना व्यवस्थापकाच्या (पर्सोनेल मॅनेजर) हाती त्याच्या उत्पन्नाच्या मानाने कितीतरी अधिक सत्ता असते. म्हणजेच स्तरीकरणाची एक बाब म्हणून सत्ता आणि संपत्ती या समकक्ष आहेत असे मानता येणार नाही.

दुसरी बाब म्हणजे केवळ व्यक्तीच्याच नव्हे तर एका सबंध गटावर परिणाम घडून येऊ शकतील अशा प्रकारचे निर्णय घेण्याची 'दूरान्वयी' सत्ता. निर्णय घेण्याची सत्ता अपरिहार्यपणे जसजशी केंद्रित होत जाते तसतसा सार्वजनिक आणि खाजगी उद्योगधंद्यात त्याचप्रमाणे कामगार संघटनातही वरिष्ठ अधिकाऱ्यांचा त्यामानाने एक लहानसा वर्ग उदयास येतो आणि तो वर्ग कधी कधी सबंध राष्ट्राच्या जीवनावर आपली सत्ता चालवतो. सबंध उद्योगावर नेहमीच त्या वर्गाची सत्ता

चालत असते. आणि कारखान्यातील शेकडो नव्हे हजारो कामगार तर सततच त्याच्या सत्तेच्या अधीन असतात. अशा प्रकारची सत्ता अपरिहार्यपणे व काही अंशी गुप्तपणाने आणि ज्यांच्यावर ती लादली जाते त्यांच्या मनाचा कानोसा न घेता गाजवली जात असल्यामुळे ती दूरवरून, अलिप्तपणाने गाजवली जाते आणि त्यामुळेच तिच्याबद्दल हमखास असंतोष निर्माण होतो. तसेच नियंत्रण ठेवणारे आणि नियंत्रणाखाली असणारे यात फार व्यापक स्वरूपाची विषमता असल्याने तिच्यामुळे तीव्र स्वरूपाची वर्गीय भावनाही बळावते.

पुढारलेल्या उद्योगप्रधान देशांत हमखास आढळणाऱ्या सामुदायिक यंत्रणेपासून 'आदेश फर्माविण्याची' ही प्रचंड सत्ता अलग करता येत नसली तरी संस्थात्मक यंत्रणा, समाजातील जनमत, विरोधी गटांतील ( उदा. मालक वर्ग आणि कामगार संघटना) सत्ता समतोल आणि शासनाकडून होणारा हस्तक्षेप यांच्यामुळे ती सत्ता कमी अधिक प्रमाणात एकतंत्री आणि बेजबाबदार बनू शकते, आणि मागच्या पिढीपेक्षा अलिकडच्या काळात विशेषतः खाजगी उद्योगधंद्याच्या क्षेत्रांतील सत्ता पहिल्या इतकी बेजबाबदार राहात नाही आणि शह–काटशहाच्या यंत्रणेमुळे तिचा पुष्कळच संकोच होतो हे पहिल्या प्रकरणांत सूचित केलेच आहे. तरी देखील अद्यापही सामाजिक जीवनाचे फार मोठे क्षेत्र तिच्या कक्षेत येते आणि केवळ खाजगी उद्योगातच नव्हे तर विशेषतः राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग आणि कामगार संघटना यातही उघड उघड अंतर्गत शत्रुत्व निर्माण होते. कामगार संघटनांमध्ये सर्वसामान्य कामगार आणि नेते यांच्यामधील अंतर खूप वाढल्यामुळे काही काही वेळा मोठे संशयाचे वातावरण निर्माण होते.

त्याचप्रमाणे ही सत्ता उत्पन्नाशीही पूर्णांशाने निगडित असत नाही. राष्ट्रीयीकरण झालेल्या धंद्यांतील प्रमुख, वरिष्ठ सनदी नोकर आणि कामगार संघटनांचे नेते यांच्या हाती जी सत्ता असते तिचा पगाराशी कसलाच ताळमेळ बसत नाही. (वरिष्ठ दर्जाच्या कक्षा किती व्यापक बनल्या आहेत त्याचे कामगार संघटना हे एक अतिशय मजेदार उदाहरण आहे. तसे पाहिले तर त्यांची 'जातकुळी' कामगार वर्गाची म्हणावी लागेल. परंतु उत्पन्न किंवा व्यावसायिक प्रतिष्ठा यांचा निकष लावला तर ते मध्यम वर्गात मोडतात आणि त्यांच्या हाती असलेली सत्ता विचारांत घेतली तर त्यांचा समावेश निश्चितच वरिष्ठ वर्गात करावा लागेल.) किंबहुना खुद्द उद्योगातही विशेष ज्ञानाच्या वाढीबरोबर व्यवस्थापकीय विभागांतील मध्यम स्थानावर असलेल्या संघटनात्मक किंवा तंत्रविषयक काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांचा नवा वर्ग उदयाला येत असून लघु उद्योगधंद्यांतील त्यांच्याहून सधन असलेल्यांपेक्षा तर त्यांच्या हाती निश्चितच आधिक सत्ता असते. त्याच धंद्यातील त्यांच्यापेक्षा जास्त पगार मिळविणाऱ्या सर्वोच्च कार्यकारी आधिकाऱ्यांच्या इतकीच जवळपास सत्ता ते गाजवू शकतात.

राजकीय सत्तादेखील वर्गीय दृष्टीकोणाच्या बाबतींत प्रभावी ठरू शकते;

लोकशाही जमान्यांत केवळ एकच पक्ष फार काळपर्यंत बहुमतांत राहिला तरच असे होऊ शकेल असे मला वाटते. परंतु दर पांच वर्षांनी सत्ता दुसऱ्या पक्षाकडे जाणार असेल तर राजकीय परिस्थिती स्वतंत्रपणे आपला प्रभाव कितपत गाजवू शकेल याविषयी मी साशंक आहे. कारण मग त्या परिस्थितीत राजकीय सत्ता ही कोठल्याही एका विशिष्ट वर्गाच्या हातांत आहे असे मानले जात नाही. परंतु ( समजा ) एकादा पक्ष सतत वीस वर्षे अधिकारावर राहिला, तर जनतेच्याही ते अंगवळणी पडते आणि मुख्यतः एखाद्या वर्गावरच तो पक्ष आधारलेला असला तर राजकीय सत्ता हे त्या वर्गाचे आणखी एक लक्षण बनते.

म्हणून युद्धापूर्वी जेव्हा हुजूर पक्षीय सरकार ही नित्याची बाब होऊन बसली होती त्यावेळी सत्ताधारी वर्गाची इतर सर्व लक्षणे लागू पडत असतांना राजकीय सत्ता हे त्या वर्गाचे आणखी एक निम-कायम स्वरूपाचे लक्षण आहे असे वाटू लागले व त्यामुळे उच्च नीचतेची सामुदायिक भावना वाढीस लागली. याच्या उलट समाजवादी सरकार ही स्वीडनमध्ये स्वाभाविक परिस्थिती बनून गेल्यामुळे तेथे सामुदायिक वर्गीय भावनेची तीव्रता कमी झाली आहे, कारण 'वरिष्ठ वर्गाची' इतर लक्षणे त्याच्या ठिकाणी दिसतात पण राजकीय सत्तेचे मात्र स्थलांतर झालेले आहे.

निराळ्या शब्दांत सांगावयाचे तर त्यामुळे राजकीय सत्ता 'पसरली' जाते आणि उच्च वर्गाच्या लक्षणांचे केंद्रीकरण होण्याला आळा बसतो. कामगाराला हे माहीत असते की त्याचे उत्पन्न, व्यावसायिक दर्जा, राहणी आणि इतर कोठल्याही बाबतीत मालकापेक्षा त्याची परिस्थिती खालच्या दर्जाची असली तरी शेवटी त्याची राजकीय सत्ता मालकापेक्षा जास्त आहे; आणि मालकालाही तसेच वाटत असते. मानसिक दृष्टीकोणांत एक प्रकारची स्थिरता येण्याइतक्या दीर्घकाळपर्यंत एकाच पक्षाच्या हाती सत्ता असेल तरच हे घडून येऊ शकेल.

वर्गीय दृष्टीने पाहता सत्तेचे आणखीही काही मजेदार पैलू दिसून येतात. उदा. छोट्या, सुस्पष्ट आणि चपखल बसणारी परंतु सर्वमान्य अशी सामाजिक सत्तेची उतरंड असलेल्या समाजात दृष्टोत्पत्तीस येणारी सत्ता इंग्लंडमधील ग्रामीण भागांत आणि लहान शहरांत अद्याप फार जोर धरून आहे. परंतु ती उतरंड उत्पन्नाशी मात्र निगडित नाही. मात्र अशा तऱ्हेची सत्ता हे मुख्यतः ग्रामीण भागा-तील किंवा छोट्या शहरांतील वर्गीय संबंधाचे वैशिष्ट्य आहे. औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या ब्रिटनमधील वर्गाची राष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाची अशी लक्षणे शोधावयाची असतील तर ती शहरी दृष्टीकोण आणि शहरी भागांत प्रभाव पाड-णाऱ्या बाबींमध्येच शोधावी लागतील. शिवाय अशा प्रकारची स्थानिक सत्ताही गेल्या पन्नास वर्षांपेक्षा आता खूपच कमकुवत झालेली आहे आणि सामाजिक स्तरी-करणाला कारणीभूत ठरणारी इतर लक्षणे पहिल्याइतकी प्रभावी राहिली नाहीत तर ही स्थानिक सत्ता टिकून तरी राहील किंवा नाही याची शंकाच आहे.

अशा तऱ्हेने विद्यमान परिस्थितीत सत्तेची पहिली दोन रूपे सर्वांत महत्वाची वाटतात. अर्थात प्रतिष्ठा आणि सत्ता यांच्यातील परस्पर संबंध त्याव्यतिरिक्त अन्य प्रकारे व्यक्त होऊ शकत नाहीत असे मात्र नाही. सामाजिक आलेखाच्या कोठल्या तरी कानाकोपऱ्यांत अनेकदा विस्मयजनक विसंगती रेंगाळत असलेली दिसते. उदाहरणार्थ संसदेच्या सभासदांना जी सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त झालेली असते ती त्यांचे हात राजकीय सत्तेपर्यंत पोहोचू शकत असल्यामुळेच प्राप्त होत असावी. ही प्रतिष्ठा फार मोठी नसली तरी त्यांचे उत्पन्न लक्षांत घेतां त्यांना ती प्राप्त होऊ शकली नसती. त्याचप्रमाणे त्यांच्या राहणीची धाटणी आणि त्यांच्याकडून होत असलेला खर्च या निकषावर ती कधीच सार्थ ठरणार नाही.

परंतु अशी अपवादात्मक उदाहरणे फार थोडी. एक तर समोरासमोरच्या प्रत्यक्ष सत्ता किंवा विशेषतः मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंद्यांतील दूरान्वयाने गाजविल्या जाणाऱ्या मोक्याच्या पदावरील सत्ता यांचा सामाजिक वर्गीकरणावर फार मोठा प्रभाव पडतो. सामाजिक विषमतेच्या प्रमाणावर याचा खूप परिणाम घडून येत असला तरी उत्पन्नाच्या फेरवाटणीसाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या उपायांचा मात्र त्यावर विशेष प्रभाव पडत नाही.

## ६. व्यक्तिनिष्ठ वर्गसिद्धांत

परंतु वस्तुनिष्ठ परिस्थितीनुसार मुळी वर्ग निश्चित केले जातच नाहीत असे मानले तर? काही समाजशास्त्रज्ञ अलीकडे 'व्यक्तिनिष्ठ' वर्गसिद्धांताला अनुकूल होऊ लागलेले दिसतात. याचे कारण ते असे देतात की, व्यवहारात माणसे एकाच तऱ्हेने विचार किंवा वर्तन करताना दिसत नाहीत; तसेच व्यवसाय, उत्पन्न किंवा तशा आणखी काही बाबी समान असणारे लोक एका सामाजिक वर्गात मोडतात असेही आढळत नाही. किंवा वर्गपद्धती संबंधी ते जे सांगतात त्यावरून वर्ग निश्चित करण्यासाठी ते काही वस्तुनिष्ठ निकषांचा अवलंब करतात असेही दिसत नाही.

आपण या दृष्टीने पाहिले तर लोकांना आपण ज्या वर्गात मोडतो असे वाटते किंवा ते ज्या वर्गात मोडतात असे धरले जाते त्याच वर्गात ते मोडतात. लोक ज्याला वर्ग असे मानतात तोच वर्ग, आणि व्यक्तिनिष्ठ मूल्यमापन आणि प्रत्यक्ष समाजात स्वतःला समाविष्ट करून घेतले जाणे हाच त्यांचा अंतिम निकष असतो. 'ते आमच्यापैकी आहेत', 'आमच्या गटात ते बसू शकत नाहीत', 'तिचे कुटुंब आमच्या माहितीचे नाही,' 'उभ्या आयुष्यात आमच्या समाजामध्ये मी तिला कधी पाहिलेले नाही', 'ते आमच्यासारखेच सामान्यजन आहेत' यासारख्या वाक्प्रचारावरूनही याची प्रचीती येते.

वर्ग हे मानसिक आणि सामाजिक असे गट असून त्यांचे स्वरूप मूलतः व्यक्तिनिष्ठ असते व ते वर्गीय भावनेवर (आपण एखाद्या विशिष्ट गटाचे आहोत

ही भावना) अवलंबून असते. आणि वर्गभेद दर्शविणाऱ्या रेषा समाजशास्त्रज्ञांना वस्तुनिष्ठ किंवा वर्गीकरणाच्या दृष्टीने अभिप्रेत असलेल्या तर्कशुद्ध सीमारेषांशी मिळत्याजुळत्या असतातच असे नाही. असे असल्यामुळे लोकांना प्रश्न विचारताच वर्गीय पद्धतीचा उलगडा होऊ शकतो. लॉईड वॉर्नर म्हणतो की, 'यँकी शहरातील लोकांनी स्वत: केलेल्या मूल्यमापनानुसारच शेवटी तेथील लोकांचे स्थान निश्चित करण्यात आले.'

वर्गासंबंधीचा हा दृष्टीकोण व्यक्तिनिष्ठ स्वरूपाचा आहे असे का म्हटले जाते ते तितकेसे स्पष्ट झालेले नाही. नेहमीच्या रूढ अर्थाने तो शब्द वापरला जात असेल तर एखादा माणूस स्वत: तसे म्हणतो, किंवा त्याला तसे वाटते म्हणून तो त्या सामाजिक वर्गात मोडला जातो असा त्याचा अर्थ होईल. परंतु त्या परिस्थितीत मग आपण कोणत्या वर्गात असावे ते त्या त्या व्यक्तीला ठरविता येईल आणि मग वर्ग या शब्दाला काही अर्थच उरणार नाही. म्हणून फार करून अशी भूमिका कोणी घेत नाही. उदाहरणार्थ पहाणीवरून असे आढळून येते की, बहुतेक लोक (अर्थातच यात वरिष्ठ वर्गातील लोकांचा त्याचप्रमाणे अगदी विरुद्ध कारणासाठी मध्यम वर्गीय मजूर पक्षीय संसद सभासदांचा समावेश करता येणार नाही) स्वत:ला मध्यम वर्गीय समजतात. परंतु एकादी व्यक्ती स्वत:ला मध्यमवर्गीय समजत असली तरी ज्या इतरांना ती मध्यम वर्गीय समजते ते जर तिला सामाजिक दृष्ट्या आपल्या बरोबरीचे मानण्यास तयार नसतील किंवा तिच्याबरोबर मिसळणार नसतील तर त्या व्यक्तीने स्वत: ठरविलेल्या स्थानाला समाजाकडून मान्यता प्राप्त होत नाही. सामाजिक मान्यता हे अवश्यमेव लक्षण त्या ठिकाणी आढळत नाही; आणि ती व्यक्ती स्वत:विषयी जे मूल्यमापन करते ते वास्तवातील स्तरीकरणाचे वर्णन नसून ती केवळ एक व्यक्तिगत आकांक्षा असते. म्हणून एखाद्या गटातील व्यक्ती स्वत:ला मध्यम वर्गीय समजतात म्हणूनच केवळ त्या समाजाच्या वेगवेगळ्या स्तरात विखुरलेल्या असताना सामाजिक दृष्ट्या त्या एकसंध आहेत असे मानून चालणार नाही.

'व्यक्तिनिष्ठ दृष्टीकोण याचा अर्थ इतकाच दिसतो की, लोक स्वत:ला विशिष्ट वर्गाचे समजत असतील किंवा त्यांना तसे वाटत असेल तर ते त्या वर्गात मोडतात आणि इतरही तसे मान्य करतात. या प्रकरणाच्या सुरुवातीला वर्गाची जी व्याख्या दिली आहे त्याच्याशी हे अगदी सुसंगत दिसते आणि वर्ग निश्चित करणाऱ्या निकषांची जी यादी वर दिली आहे त्याबद्दल शंका निर्माण व्हावी असे व्यक्तिनिष्ठ समजल्या जाणाऱ्या दृष्टीकोणात काहीही आढळत नाही.

इतरांना तुम्ही कोठल्या वर्गात घालता या प्रश्नाबरोबरच तसे करण्याची कारणे काय तेही जर लोकांना विचारले तर लोकांना प्रश्न विचारून वर्ग निश्चित करण्याच्या पद्धतीमुळे निरनिराळे निष्कर्ष निघू शकतील हे खरे आहे. पहिल्या प्रश्नाला मिळणारी उत्तरे वस्तुनिष्ठ निकष लावल्याने निघणाऱ्या निष्कर्षासारखीच

असू शकतील. परंतु दुसऱ्या प्रश्नाचा मात्र वस्तुनिष्ठ निकषांशी कसलाही संबंध आढळणार नाही, किंवा संबंध असलाच तर तो अत्यल्प असेल. लोक कदाचित असे सांगतील की, वर्गीकरणासंबंधीचे त्यांचे निष्कर्ष अ, ब आणि क या निकषांवर आधारित असतात. परंतु आपल्याला निरीक्षणानंतर असे आढळून येईल की, वर्गीकरणाच्या निकषांचा अ, ब आणि क यांच्याशी कसलाही संबंध नसतो तर क्ष, य आणि ज्ञ शी त्याचा घनिष्ट संबंध असतो. मग अर्थातच खऱ्या निकषांचीच अ, ब आणि क ही उपपत्ती आहे असे मानले जाते. अशा तऱ्हेने उपपत्ती लावून दाखविण्याचे प्रकार नित्याचेच आहेत. परंतु वस्तुनिष्ठ भूमिकेतून वर्गीय पद्धतीचा उलगडा करून दाखविण्याच्या शक्यतेस त्यामुळे कसलाही बाध येत नाही.

यावरून असा निष्कर्ष काढणे संयुक्तिक दिसते की, काही वस्तुनिष्ठ बाबींवरून वर्गीय स्थान निश्चित होत असते; आणि कालानुसार, त्याचप्रमाणे निरनिराळ्या समाजानुसार या बाबी सहाजिकच बदलत असतात. परंतु वर या बाबींची जी यादी दिली आहे, ती दरवेळी मिळतीजुळती असतेच असे नसले तरी औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या पाश्चिमात्य देशात त्या बाबी अत्यंत प्रभावी ठरत असल्याचे आढळून येते. तरीही वर्गासंबंधीच्या निष्कर्षांचे काहीशा निराळ्या स्वरूपात व्यक्तिनिष्ठ दृष्टीने समर्थन करणे किंवा त्याला बौद्धिक कसोटी लावून दाखवणे शक्य आहे आणि मुळात लोकांच्या मनात वर्गासंबंधीची भावना जागृत असणे ही व्यक्तिनिष्ठ सामुदायिक मूल्यमापनाची अत्यावश्यक गरज असते– त्याशिवाय वर्गाला सामाजिक वास्तवता प्राप्त होणार नाही आणि वर्ग ही केवळ समाजशास्त्रज्ञांनी उभी केलेली औपचारिक रचना ठरेल.

## ७. वर्ग अस्तित्वात तरी असतात का ? आणि त्यांना काही महत्व आहे का ?

वर्ग जागृती आणि सुस्पष्ट व्याख्या असलेल्या वर्गाचे अस्तित्व या दोन्ही दृष्टीने वर्ग हे ब्रिटिश जीवनाचे एक खास वैशिष्टय आहे. या दोन गोष्टी एकच असतात असे नाही. वर्गजागृती असेल परंतु वर्ग असतीलच असे नाही. प्रो. मार्शल यांनी असे दाखवून दिले आहे की, सामाजिक दृष्ट्या विविधता असलेल्या समाजात ‘ राष्ट्रातील सर्व नागरिकांच्या जीवनाचे वर्ग हे एक वैशिष्टय असते येवढ्याच अर्थाने राष्ट्रीय स्वरूपाची वर्गपद्धती आहे असे म्हणता येईल. पण म्हणून राष्ट्रीय स्वरूपाचे वर्ग असतात असे नाही.’ वर्गावर्गामधील रेषा तिरप्या तिरप्या आणि नागमोडी असू शकतात आणि त्यामुळे जे पोटवर्ग निर्माण होतात त्यांची एकमेकांत सरमिसळ झालेली असते. अशा तऱ्हेच्या पोटवर्गीकरणामुळे वर्गीय भावनेला पुरेसा वाव रहात असला तरी राष्ट्रीय स्वरूपाच्या सुस्पष्ट अशा सामाजिक गटात मात्र त्या समाजाची विभागणी होऊ शकत नाही.

समाजपुरुषाच्या अंगाचा स्वतंत्र निकषामुळे खोलवर आणि रुंद छेद घेतला जातो की त्यावर नुसतेच ओरखडे उठतात त्यावरून राष्ट्रीय स्वरूपाचे वर्ग आहेत किंवा नाही ते ठरत असते. त्याचप्रमाणे हे खोलवरचे छेद राष्ट्रीय पातळीवरील एकेका विभागाशी कितपत मिळतेजुळते आहेत यावरही राष्ट्रीय पातळीवरील वर्गाचे अस्तित्व अवलंबून असते. अर्थात निरनिराळ्या निकषांसंबंधीचा उहापोह करताना छेद तंतोतंत मिळतेजुळते नसतात हे स्पष्ट झालेलेच आहे. परंतु हे सामाजिक गट थोड्याफार प्रमाणात एकमेकात मिसळलेले असले तरी तेवढ्यावरून प्रत्येक व्यक्ती म्हणजे परस्पर विरोधी सामाजिक लक्षणांचा एक गोतावळा असतो आणि त्यातील काही समाजाच्या वरच्या अवस्थेचे द्योतक असतात, तर काही खालच्या अवस्थेचे. त्यांना निश्चित असे वर्गीय स्थान असतच नाही असे म्हणता येणार नाही. सर्वच्या सर्व निरनिराळी वर्गीय लक्षणे प्रभावी असतील तर राष्ट्रीय वर्ग निर्माण होण्यासाठी अलग होण्याच्या व एकत्र येण्याच्या योग्य प्रवृत्तीचीच केवळ गरज असते. एकाच वेळी खंड पडण्याची व एकत्र येण्याची पुरेशी प्रवृत्ती असेल तर त्यामुळे देखील राष्ट्रीय स्वरूपाचे वर्ग निर्माण होऊ शकतील.

अशी प्रवृत्ती ब्रिटनमध्ये निश्चितपणे प्रत्यायास येते ! शिक्षण, व्यावसायिक प्रतिष्ठा आणि राहणीची धाटणी इत्यादीतील घसरगुंडीमुळे समाजाचे उघड उघड विभाग पडतात. आणि हे विभाग स्थूलमानाने एकमेकांशी मिळतेजुळते किंवा समव्याप्त असतात. अलग अशा शिक्षणाच्या त्रिस्तरीय पद्धतीमुळे इतर दोन निकषां-वरही तशाच तऱ्हेचा ढाचा लादला जातो. अशा तऱ्हेच्या परस्पर संबंधामुळे हे विभाग समव्याप्त असतात. वारसा पद्धतीमुळेही हा सारखेपणा वाढतो. अर्थात काही विसंवादी प्रकार असतातच. समाजाची कामगार, मध्यम आणि वरिष्ठ वर्गात होणारी विभागणी स्पष्टपणे दर्शविण्याइतके त्यांच्यातील परस्पर संबंध घनिष्ट असतात. लोक स्वत:पुरती ही विभागणी वास्तव धरून चालतात. इतरांबरोबरच्या त्यांच्या वर्तणुकीवर आणि सामाजिक निष्कर्षावर त्याचा परिणाम घडून येत असतो. आणि लोकांचे व्यक्तिगत मूल्यमापन काय असेल ते विचारात न घेता वर उल्लेखि-लेल्या (त्यात उत्पन्नाच्या निकषांचा समावेश असतोच असे नाही) तिन्ही निकषांना हे लागू पडते या अर्थाने या विभागणीला वस्तुनिष्ठही म्हणता येईल.

यापेक्षाही काहीशी सूक्ष्म किंवा विशुद्ध विभागणी केली तर ती अर्थशून्य ठरणार नाही. लोक अनेकदा समाजाविषयी आपले निष्कर्ष काढतांना त्याची पाच वर्गात (वरिष्ठ, वरिष्ठ मध्यम, कनिष्ठ मध्यम, वरिष्ठ कामगार, आणि कामगार) विभागणी करतात. या विभागणीला खऱ्याखुऱ्या व्यक्तिनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ वास्तवतेचा आधार दिसतो. ज्या लोकांना अशा तऱ्हेची विभागणी अभिप्रेत असते त्यांचे प्रतिपादन ते ज्यांच्याशी चर्चा करीत असतात त्यांना समजत नाही असे नाही. आणि सामाजिक मान्यतेचा निकषही त्यामध्ये स्पष्टपणे व्यक्त होतो. वर्गदृष्ट्या

ज्यांचे स्थान अनिश्चित आहे अशा मंडळींची संख्या यापुढे वाढत जाईल. परंतु त्यांची संख्या कितीही वाढली तरी ते अल्पसंख्यच राहतील आणि सामाजिक संबंधाचा एकूण रागरंग ज्यांचे वर्गीय स्थान बहुतांशी सुस्पष्ट आहे अशा बहुसंख्यांकडूनच ठरविला जाईल.

परंतु वर्ग किंवा वर्गीय भावना यांच्या अस्तित्वास इतके महत्त्व तरी का दिले जाते ? त्यामुळे कायमचा आणि हिंसक स्वरूपाचा वर्गसंघर्ष उद्भवत असता तर त्याला महत्त्व देणे सहज समजण्यासारखे आहे. परंतु तसा संघर्ष उद्भवण्याचे काहीच कारण दिसत नाही. अर्थात निरनिराळ्या वर्गाचे हितसंबंध भिन्न भिन्न असतात हे उघड आहे. वर्गीय विशेषाधिकाराच्या वाटपाबाबत त्यांच्यात चुरस असते आणि प्रत्येक वर्गाचे आपले श्रेष्ठ स्थान टिकवून धरण्यात किंवा कनिष्ठ स्थान असेल तर ते सुधारण्यात प्रत्यक्ष हितसंबंध गुंतलेले असतात. यातूनच ऐतिहासिक परिस्थितीनुसार व्यक्त किंवा अव्यक्त स्वरूपाची खरीखुरी वर्गीय चुरस निर्माण होते.

ही चुरस सामान्यतः राजकीय पद्धतीच्याद्वारा व्यक्त होत असते. ज्या देशात धार्मिक किंवा प्रादेशिक मतभेद अत्यंत तीव्र आहेत असे देश वगळता सर्वसामान्यपणे राजकीय पक्ष हे एकाच पायावर आधारलेले असतात आणि प्रत्येक पक्ष जनतेतील विशिष्ट वर्गीय स्तरातून मुख्य पाठिंबा मिळवत असतो. उदाहरणार्थ ब्रिटनमध्ये मजूर आणि हुजूर पक्षाच्या मतदारांची नेमकी विभागणी इतर कशापेक्षाही वर्गीय स्थानाच्या सीमारेषेमुळेच झालेली असते. याचा अर्थ असा नव्हे की, वर्गीय स्थानामुळेच केवळ राजकीय मते ठरत असतात. काही मध्यमवर्गीय मतदार कायम मजूर पक्षालाच मतदान करीत असतात. तर कित्येक कामगारवर्गीय मतदार हे हुजूर पक्षाला मते देत असतात हे कुप्रसिद्धच आहे. यावरून हेच सिद्ध होते की, काही लोकांना एक तर स्वतःचे खरेखुरे हित कशात आहे ते समजत नाही, किंवा समजत असूनही ते बुद्धीहीनपणाने तसे मतदान करीत असले पाहिजेत किंवा वर्गाचा संबंध नसलेल्या बाबींच्या प्रभावामुळे समजून उमजून ते तसे वागत असले पाहिजेत.

समाज, समजा पाच वर्गात विभागला गेला असेल तर ती विभागणी सहाजिकच द्विपक्ष पद्धतीत प्रतिबिंबित होणार नाही. तरीही राजकीय दृष्टीकोणातून यापेक्षाही सूक्ष्म स्वरूपाची वर्गीय उभारणी व्यक्त होऊ शकते. समाजातील वरिष्ठ वर्गातील सगळीच्या सगळी एक तृतियांश जनता स्थूल सामाजिक वर्गात विभागली गेली आणि उत्पन्न आणि व्यवसायिक प्रतिष्ठा यांच्या अनुषंगाने उतरत्या भाजणीसारखी त्यांची रचना झालेली असेल तर सामाजिक वर्ग जितका खालच्या पातळीवर तितके त्या समाजातील मजूर पक्षाला मिळणारे मतदान हुजूर पक्षाच्या मानाने अधिक असेल.

वर्गीय हितसंबंध भिन्न भिन्न स्वरूपाचे असतात व ते राजकीय दृष्टया व्यक्त

होतात. याचा अर्थ हिंसक वर्गसंघर्ष ही केवळ आपल्याच समाजातील डोकेदुखी आहे असे नव्हे. मार्क्सप्रणीत वर्गसंघर्षाचा सिद्धांत हा 'अंतर्विरोधा'च्या सिद्धांतावर आधारलेला आहे. 'भौतिक उत्पादक शक्ती आणि विद्यमान उत्पादनसंबंध यामधील हितविरोध हा वर्गसंघर्षाचा पाया असतो.' इतिहासाच्या विशिष्ट कालखंडात अशा तऱ्हेचा हितविरोध अस्तित्वात होता यात शंका नाही. पण त्याचबरोबर असा हितविरोध अस्तित्वात नसतानाही असह्य भौतिक परिस्थिती, आर्थिक अस्थिरता किंवा दारिद्र्य आणि संपत्ती यातील कमालीची तफावत त्यामुळे वर्गसंघर्षाला अगदी सहज चेतावणी देता येईल. परंतु अंतर्विरोध किंवा वर उल्लेखिलेल्या बाबी यांपैकी ब्रिटनमध्ये आज काहीच विद्यमान नाही, आणि पहिल्या भागात दिलेले निरनिराळे बदल स्फोटक संघर्षासारखी परिस्थिती निर्माण होऊ देत नाहीत. वर्गीय विशेष हक्कांच्या वाटपावरून होणारा वाद हा शांतता आणि सहिष्णुतापूर्ण असा राहील आणि लोकशाही मार्गाचे कधीही उल्लंघन करणार नाही.

परंतु वर्गीय संबंधांत मोठ्या प्रमाणांत आढळणाऱ्या या समतोलपणामुळे त्या प्रमाणांत वर्गीय भावना निश्चितपणे कमीकमी होत जाते किंबहुना वर्गावर्गातील सीमारेषा अस्पष्ट होत जातात असे नाही. आणि ब्रिटनमध्ये वर्गाच्या अस्तित्वाला महत्त्व प्राप्त होते याचे कारण आजही आपल्या समाजांत अस्तित्वांत असलेली तीव्र स्वरूपाची वर्गीय भावना आणि खोलवर रुजलेली वर्गीय उतरंड हेच आहे. त्यामुळे तशाच प्रकारच्या तीव्र स्वरूपाच्या सामाजिक विषमतेची जशी सूचना मिळते तसेच तिचे अस्तित्वही सिद्ध होते. व्यक्तिनिष्ठ दृष्ट्या त्यामुळे वर्गीय स्थानाबद्दल विशेष जोरकस अशी सामुदायिक आणि व्यक्तिगत भावना निर्माण होते. ही भावना, पर्यायाने का होईना, वैमनस्य आणि असंतोष यास कारणीभूत होते. वस्तुनिष्ठ दृष्ट्या उत्पन्न, सत्ता, राहणी इ. निरनिराळ्या वर्गीय लक्षणांचे बाबतींत फार मोठी दरी असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते आणि त्यामुळे पुन्हा संस्कृती-मध्ये कमालीचो तफावत पडते आणि निरनिराळ्या वर्गाच्या अप्रतिहत सामाजिक अभिसरणाला वाव रहात नाही.

आता ही परिस्थिती बदलता येण्यासारखी नाही असे नाही. कोणत्याही समाजांतून वर्गीय भावनेचे समूळ उच्चाटन करता येईल असे कोणीच मानीत नाही हे खरे; परंतु त्याचबरोबर एकाद्या समाजातील वर्गीय भावना दुसऱ्या समाजा-पेक्षां दुप्पट आहे असे दाखवणारा एकादा निकषही उपलब्ध नाही. तरीही व्यक्ति-निष्ठ वर्गीय भावना आणि सामाजिक अभिसरणाचे स्वातंत्र्य कमी जास्त असू शकते हे उघड आहे. आणि या अनुषंगाने निरनिराळ्या समाजाविषयी तुलनात्मक किंवा वर्णनात्मक विधाने करण्यात आली तर ते चूक ठरणार नाही. आणि म्हणून इंग्लंडमधील सरंजामशाही काळापेक्षां एलिझाबेथ कालीन समाज कमी वर्गनिष्ठ होता. त्याचप्रमाणे आजच्या ईजिप्तपेक्षा आजच्या न्यूझीलंडमधील समाजात वर्गीय

तफावत कमी आहे. न्यूइंग्लंडपेक्षा इलिनॉअिस अगर ग्रेट ब्रिटनपेक्षा स्वीडनमध्य वर्गाचे स्तोम कमी आहे असे म्हटले तर ते हास्यास्पद ठरणार नाही.

वर्गीय भावना आणि निरनिराळ्या देशांतील सामाजिक विषमतेच्या तीव्रतेतील तफावत ही या प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे स्थूलमानाने खालील बाबींवर अवलंबून असते असे दिसून येते. ( अर्थात व्यवहारांत मात्र त्यांची गल्लत झालेली असते. केवळ सोयीसाठी त्या निरनिराळ्या दाखवण्यात आल्या आहेत. ) एक : तंत्रविषयक बाब. आर्थिक विकासाचा विशिष्ट टप्पा गाठला गेला आहे का ? उत्पादन साधनाशी निगडित असलेले सुस्पष्ट आर्थिक वर्ग निर्माण करण्याइतकी उत्पादनपद्धती जुनाट आहे का व त्या जुनाट पद्धतींत लोकांच्या अपेक्षेच्या मानाने फार कमी उत्पादन होते का ? आणि त्यामुळे सामाजिक प्रवृत्तींवर केवळ असंस्कृत आर्थिक संतापाचाच अंमल चालतो का ?

दोन : अभिसरण. र्गामधील ऊर्ध्वाधर ( Vertical ) अभिसरण व क्षेत्र. अभिसरण जितके जास्त तितकी सामाजिक समता आणि अनिर्बंध सामाजिक मेळजुळ जास्त हे उघड आहे. आणि त्यामुळे निःसंदिग्ध आणि एकमेकापासून काटेकोरपणाने अलग करण्यांत आलेले स्तर अशी समाजाची कायमची विभागणी होणार नाही.

तीन : वर्ग निश्चितीची निरनिराळी लक्षणे किती खोलपर्यंत छेद घेतात ? अशा छेदांमधील सामाजिक अंतर आणि सर्वसामान्यपणे प्रत्येक वेगवेगळ्या क्षेत्रांतील प्रतिष्ठा, शिडीची लांबी, पैशाच्या स्वरूपातील संपत्ती, व्यावसायिक प्रतिष्ठा शिक्षण, राहणी व खर्चाच्या सवयी आणि सत्ता ( यापैकी मधल्या तीन बाबी इंग्लंडमध्ये अत्यंत महत्त्वाच्या असून त्या परस्परांशी अत्यंत निगडित आहेत ) ही ती वर सांगितल्याप्रमाणे लक्षणे होत. कमी जास्त प्रमाणांत या लक्षणांचा विस्तार किंवा केंद्रीकरण यावर सामाजिक नियंत्रण असते. आणि म्हणून समाज, निदानपक्षी वर्गीय भावना आणि विषमता यावर जरूर तर परिणाम घडवून आणू शकतो– समाजाजवळ तितकी सत्ता असते.

अर्थातच वर्गासंबंधीच्या चर्चेमुळे सामाजिक समतेचा विषय हातावेगळा होतो असे नाही. राष्ट्रीय स्वरूपाचे वर्ग जरी अस्तंगत झाले तरी या ना त्या स्वरूपांतील प्रतिष्ठेची उतरंड ही राहणारच. कारण प्रत्येक समाजांत रूढ आणि सर्व मान्य प्रतवारी ठरणारी काही ना काही यंत्रणा ही असतेच. वर्गाची उतरंड जितकी काटेकोर आणि असमान तितकी तिला मागे टाकणारी प्रतिष्ठेची उतरंड देखील काटेकोर आणि असमान असते हे समजण्यासारखे आहे. परंतु व्यवहारात मात्र कदाचित तसे ते दिसणार नाही. वर्गाची स्थूल लक्षणे नष्ट झाली आणि त्याजागी प्रतिष्ठेच्या प्रतवारीची एक मालिका निर्माण झाली तर त्याबरोबर सामाजिक विषमताही कमी कमी होत जाईल हे कोणीही मान्य करील.

परंतु तशी ती झाली नाही किंवा प्रतिष्ठेच्या उतरंडीच्या अगदी वरच्या

टोकाच्या आणि अगदी खालच्या टोकाच्या लोकात तरीही फार मोठी तफावत शिल्लक राहिली तरी धोरणाच्या दिशेत फारसा फरक पडणार नाही. कोणत्याही देशांत वर्गाचे सुस्पष्ट स्तरीकरण किंवा प्रतिष्ठेसंबंधीची कमालीची विषमता ही बहुधा तशाच प्रकारच्या सामाजिक बाबींवर आधारित असते आणि वर्गीय भावनेबद्दल कुणाला सहानुभूती वाटो किंवा अधिक सर्वसाधारणपणे प्रतिष्ठेच्या बाबतीतील विषमतेबद्दल ओढ असो, समतावादी व्यक्तीचा प्रत्यक्ष कृतीचा कार्यक्रम जवळपास एकच राहील.



## प्रकरण नववे

# सामाजिक समतेचे समर्थन

### १. आर्थिक कल्याणाची बाजू

अधिकाधिक समता असणे इष्ट ठरेल हे अद्याप दाखवून द्यावयाचेच आहे. युद्धपूर्वकाळात ज्याप्रमाणे आर्थिक उदाहरणे घेऊन ती गोष्ट पटवून दिली जात असे तशी ती आता येणार नाही.

सतत १९३९ पर्यंतच्या काळात निदान उत्पन्नाचे बाबतीत तरी अधिकाधिक समता असणे इष्ट ठरते ही गोष्ट स्वयंसिद्ध वाटत असे. श्रीमंतांना कमी श्रीमंत केल्याने गरीबांना कमी गरीब करता येत असे. आणि सामाजिक जाणीव असणारांना हे विधान पुरेसे आश्वासक वाटत असे. मानवतावादी दृष्टीकोण, त्याचप्रमाणे न्यायबुद्धी आणि कणव या सर्वसामान्य भावना बाळगणारेही त्याकडे आकर्षित होत. बौद्धिक पातळीवर त्याला उपयुक्ततावादी विचारसरणीच्या प्रभावाचे खतपाणी मिळे. एका बाजूला समृद्धि असतांना दुसऱ्या बाजूला दारिद्र्याची खाई पसरलेली असणे साहजिकच घृणास्पद वाटे आणि श्रीमंती हेच दारिद्र्याचे कारण आहे अशी समजूत असल्याने अफाट संपत्ती असणे हे लज्जास्पद वाटे. श्रीमंतांकडून त्यांच्या संपत्तीतील अंशभाग काढून घेऊन गरीबांच्या तोंडात दोन घास घालणे नैतिकदृष्टचा अत्यावश्यक समजले जाई.

परंतु आपण आता अशा अवस्थेप्रत येऊन पोहोचलो आहोत की; संपत्तीचे आणखी फेरवाटप केले तरी जनतेच्या राहणीमानात फारसा फरक पडणार नाही. श्रीमंतांची श्रीमंती कमी केली तरी त्यामुळे गरिबांची गरिबी फारशी कमी होणार नाही. सरटॅक्सपात्र सर्व उत्पन्न कामगार वर्गात वाटून दिले तर कामगारांचा फार तर दरडोई आठवड्याला काही शिलिंगांनी फायदा होईल. परंतु हे देखील व्यवहार्य आहे असे कोणीच मानीत नाही. परंपरागत समतावादाला आज जे यश प्राप्त झाले आहे त्यामुळे त्याचा मूलाधारच कोलमडून पडला आहे.

म्हणून श्रीमंताकडचा एक पौंड काढून घेऊन तो गरिबाच्या पदरात टाकला तर त्यामुळे आर्थिक स्वास्थ्य सहाजिकच वाढेल या एकेकाळच्या लोकप्रिय प्रतिपादनाच्या आधारावर फेरवाटपाचे निःसंदिग्धपणे समर्थन करता येणार नाही. ते प्रतिपादन आता मुळातच खोटे ठरले आहे असे नव्हे; परंतु सगळ्याच्या सगळ्या सामाजिक वर्गांत ऊर्ध्व स्वरूपाचे फेरवाटप आपल्याला अभिप्रेत असेल तर त्यासाठी आपल्यापाशी असलेले पौंड अगदीच तुटपुंजे ठरतील. लक्षाधीशाकडून काढून घेतलेला पौंड त्याचा फायदा घेणाऱ्या ९६० लोकात पै पैसा करून विखरून टाकावयाचा असेल तर स्वास्थ्याच्या निकषानुसार पहाता संदिग्ध स्वरूपाचेच उत्तर मिळते. आणि त्यापासून निश्चित फायदा होईल असा निष्कर्ष फार करून कोणी काढणार नाही.

दुसरीही एक अडचण अशी आहे की, संपत्तीचीच आत्यंतिकता पहिल्याइतकी आता सुस्पष्ट राहिलेली नसल्यामुळे संपत्तीचे फेरवाटप केले तरी ते नेमके श्रीमंत आणि गरीब यांच्यांतच होईल असे नाही. उलट मध्यम वर्गात मोडणाऱ्या फार मोठ्या गटालाच त्याची झळ लागेल. आणि तसे झाले म्हणजे तोटा किती झाला आणि फायदा किती झाला याचा मेळ बसवणे कमालीचे अवघड होऊन बसेल. सर्वसाधारणपणे आत्यंतिक विषमता आपण जसजशी मागे टाकीत जातो तसतसे गरीब आणि श्रीमंत यात सर्वसंमत असा ताळेबंद काढणे दुरापास्त होत जाते आणि उभ्या स्वरूपाचे (व्हर्टिकल) आणखी फेरवाटप केल्याने आर्थिक समाधान वाढेल की नाही याबाबत लोकात तीव्र मतभेद असणेच जास्त संभवनीय.

म्हणून जनतेच्या कल्याणासंबंधी जे परंपरागत प्रतिपादन करण्यात येते त्यात ज्यांचे सरासरी उत्पन्न खूपच जास्त आहे अशा एखाद्या गटातील संपत्तीचे फेरवाटप करण्यासाठी काही निवडक उपाय योजले तर ते आजही समर्थनीय ठरतील; परंतु ऊर्ध्व स्वरूपाचे फेरवाटप करण्यासाठी योजावयाचे सरसकट उपाय समर्थनीय ठरत नाहीत. आणि उत्पन्नात आर्थिक समानता आली तर त्यामुळे आर्थिक स्वास्थ्यात वाढ होईलच असे छातीला हात लावून कोणीही सांगू शकणार नाही.

मग अधिकाधिक समता साध्य झाली पाहिजे असे सतत सांगत राहणे तरी कितपत समर्थनीय ठरते? समाजकल्याणात निश्चित वाढ होईल असे सांगता येत नसेल तर ज्यांच्यावर करांचा मोठा बोजा आहे, आणि ज्यांना आधीच फार नुकसान सोसावे लागले आहे अशा श्रीमंतांनाच आणखी पिळून काढण्यात कसले स्वारस्य असणार? हे प्रश्न फार गंभीर स्वरूपाचे आहेत याचे समाजवाद्यांना चटकन आकलनच झाले नाही. (विशेषतः अलिकडे प्रोत्साहक तरतुदी आणि व्यक्तिगत शिल्लक यासंबंधीचा वरवर योग्य वाटणारा युक्तिवाद पुढे येऊ लागल्यापासून तर या प्रश्नाचे गांभीर्य अधिकच वाढले आहे.) समाजकल्याणसंबंधीच्या स्वयंसिद्ध विधानावरच अद्यापही समाजवादाची उभारणी झालेली आहे असे धरूनच ते बोलत असतात

परंतु वस्तुस्थिती अशी आहे की आपल्याला अधिक समता हवी असेल तर पूर्णांशाने जरी नाही तरी बव्हंशी आर्थिक कल्याणाशी निगडित नसलेल्या विधानांवरच आपल्याला त्याची उभारणी करावी लागेल.

## २. व्यक्तिगत असूया

तरी देखील बिगर आर्थिक स्वरूपाची काही विशिष्ट मूल्ये किंवा नैतिक निकष हा अद्यापही समतावादाच्या भूमिकेचा मूलाधार होऊ शकेल अशी माझी खात्री आहे. त्याचप्रमाणे एकूण आर्थिक समाधानाच्या बाबतीत फारसे काही साध्य होण्यासारखे नसले तरी अधिक समानता प्रस्थापित झाली तर ते ‘ चांगल्या ’ स्वरूपाच्या समाजाला पोषकच ठरेल हा विश्वास हीही समतेच्या दृष्टीने पायाभूत असलेली बाब ठरेल. माझ्या दृष्टीने याची तीन कारणे असून सामाजिक वैमनस्यात होत जाणारी घट, सामाजिक न्याय आणि सामाजिक नासधूस टाळणे यांच्याशी ती निगडित आहेत. यथावकाश त्यांचाही उहापोह केला जाईल.

आत्यंतिक विषमतेमुळे वैफल्य, असूया आणि असंतोष यांची केवळ व्यक्तिगत भावना चेतवली जात असल्याने सहाजिकच वैमनस्य निर्माण होते. पूर्वी अशा तऱ्हेच्या भावना सर्वसाधारणपणे संपत्तीतील ठळक विषमतेशी निगडीत असत. खुद्द अर्थशास्त्रज्ञांनी देखील हे पूर्वीच ओळखले आहे की, श्रीमंतांकडून होणाऱ्या मोठ्या प्रमाणावरील खर्चाचा, श्रीमंत ग्राहकांना त्यापासून काही विशिष्ट प्रमाणात समाधान लाभते म्हणून, अलगपणे विचार करून चालणार नाही; इतर लोकांच्या मनावरही त्याचे काही परिणाम घडून येत असतात. ॲडम स्मिथने असे म्हटले आहे की, ‘ श्रीमंतांच्या सुबत्तेमुळे गरीबांच्या मनात असूया उत्पन्न होते आणि मग ते त्यांच्या पुऱ्या होऊ न शकणाऱ्या गरजा आणि त्यांच्या मनात निर्माण झालेली असूयेची भावना यांच्यामुळे श्रीमंतांच्या संपत्तीवर हल्ला चढविण्यास प्रवृत्त होतात. ’

सध्याच्या अँग्लो–सॅक्सन समाजात गरजा भागत नाहीत म्हणून श्रीमंतांच्या संपत्तीवर हल्ला करण्याची गरीबांना क्वचीच वेळ येत नाही, आणि त्यांना सध्या मिळणाऱ्या निव्वळ वेतनामुळे व्यक्तिशः त्यांच्या मनात श्रीमंतांविषयी असूयेची भावना तरी निर्माण होत असेल किंवा नाही याबद्दल मी साशंकच आहे. संपत्तींतील तफावतीचा अलगपणे विचार केला तर त्यामुळे व्यापक प्रमाणावरील असंतोष निर्माण होऊ शकतो असे दिसत नाही. सर्वसामान्य कामगाराला एकाद्या जॉर्ज डासनबद्दल किंवा एकाद्या लेडी डॉकरबद्दल विशेष तीव्र असे वैमनस्य वाटत नाही. (परंतु त्यांच्या कामगार संघटनेच्या पुढाऱ्याचे मानधन वाढविण्याची सूचना पुढे आली तर त्याबद्दल मात्र त्याला वैषम्य वाटते; तसेच पार्लमेंटच्या सभासदाला वर्षाला १५०० पौंड देण्याच्या कल्पनेने तर सर्वचजण भडकतात.)

परंतु बिगर आर्थिक बाबतीतील विषमतेसंबंधी मात्र अद्याप बराच असंतोष

आहे. कामगारांना त्यांच्या स्वतःच्या कारखान्यातील अधिकाऱ्यांना जे सामाजिक विशेषाधिकार उपभोगावयास मिळतात आणि शेकडो बारीक सारीक गोष्टींतून हे अधिकारी 'कामगारां'पेक्षा उच्च सामाजिक वर्गात मोडतात असे जे सूचित केले जाते त्यामुळे मात्र कामगार कमालीचे चिडतात. शैक्षणिक बाबतीतील असमानते-बद्दलचा असंतोष तर अधिकच स्पष्टपणे दिसून येतो. स्वतःच्या कर्तृत्वाने पुढे आलेल्या सुसंस्कृत माणसाला, पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण घेतलेल्या मुलाला शास-कीय शाळेत चांगली संधी आणि शाश्वती मिळते असे वाटत असते आणि त्यामुळे त्याची लायकी नसतानाही त्याला सुरुवातीलाच एकदम वरची जागा मिळते. तसेच ज्या पालकांची मुले साध्या 'ग्रामर स्कूल'च्या परीक्षेतही पास होत नाहीत आणि विद्यार्थ्यांच्या निवडीबाबतच्या वरवर दिसणाऱ्या न्यायामुळेही ज्यांचे समा-धान होत नाही त्यांना इतक्या लहानपणी आपल्याला हलक्या प्रतीचे शिक्षण घेण्यास भाग पडावे आणि त्यामुळे आपल्याला सुसंधी प्राप्त होऊ नये आणि कनिष्ठ सामाजिक दर्जा प्राप्त व्हावा याची चीड येते. आणि ही भावना अनैसर्गिक किंवा खेदजनक आहे असेही म्हणता येणार नाही. न्याय्य आणि वाजवी काय यासंबंधीच्या सीध्यासाध्या समजुतीवर ती आधारलेली असते.

## ३. सामुदायिक असंतोषाचे सातत्य–
## बेव्हिनवाद आणि औद्योगिक असंतोष

असंतोषाला वाचा फुटून नंतर गटांगटांतील उघड उघड वैमनस्यामुळे सामु-दायिक असंतोषाचा सतत जो उद्रेक होत राहतो त्याबद्दल मात्र कोणालाच शंका घेता येणार नाही.

अशा प्रकारची शत्रुत्वाची भावना औद्योगिक क्षेत्रात तर अगदी उघडपणे पहावयास सापडते. आणि अनधिकृत संप, सहकार्याचा अभाव आणि संशयाचे व विरोधाचे सर्वसाधारण वातावरण यांच्याद्वारा ती व्यक्त होत असते. अर्थात मला असे सुचवावयाचे नाही की, इतर बहुतेक देशांपेक्षा ब्रिटनमधील औद्योगिक संबंध अधिक बिघडलेले आहेत– वस्तुस्थिती तशी नाही. उलट वीस किंवा तीस वर्षांपूर्वी होते त्यापेक्षा आता ते किती तरी सुधारलेले आहेत. परंतु आर्थिक क्षेत्रातील नेह-मीच्या डोकेदुखी राहिलेल्या नाहीत हे लक्षात घेता ते अपेक्षेपेक्षा अधिक बिघडलेलेच नाहीत का ? बेकारी, दारिद्र्य, वास्तविक (Real) वेतनातील घट किंवा मालकां-कडून त्यावर होणारे आक्रमण ही औद्योगिक क्षेत्रातील हितविरोधाची परंपरागत कारणे होत. यापैकी एकही कारण आज राहिलेले नाही. आणि तरीही औद्योगिक क्षेत्रातील कमालीची अस्वस्थता चालूच आहे. यावरून या असंतोषाचे मूळ आर्थिक नसून सामाजिक आहे असेच निश्चितपणे सूचित होते. आणि रेल्वेसारखे काही अपवाद सोडले तर कमी पगार आणि बिघडलेले संबंध यात फारसा परस्पर संबंध

नसतो हे लक्षात घेण्यासारखे आहे. किंबहुना वस्तुस्थिती अगदी उलट आहे. कोळसा-खाणी, गोदी आणि धातूंचे आणि अभियांत्रिकी उद्योगातील वेतनाचे प्रमाण कमालीचे जास्त असूनही उग्र स्वरूपाच्या संपाची झळ त्या धंद्यांनाच अधिक लागण्याचा संभव असतो.

राजकीय क्षेत्रातही अशाच तऱ्हेची परिस्थिती आढळून येते. राष्ट्रीय स्वभाव वैशिष्टयातील वैचित्र्याचा अपवाद वगळला तर सर्वसाधारणपणे देशातील राजकारणाचा रागरंग आणि चर्चेचे वातावरण यावरून त्यातील सुप्त सामाजिक तणाव ध्वनित होतात. हाऊस ऑफ कॉमन्समधील वातावरण खेळीमेळीचे आणि सहिष्णु असते. तेथील चर्चा अत्यंत सौजन्यपूर्ण असते, निरनिराळ्या पक्षाचे सभासद आपापसात सामाजिक देवाणघेवाण करीत असतात. आणि तेथे कोणी एकमेकांविरुद्ध हात उगारत नाही किंवा गडबड गोंधळ माजवला जात नाही म्हणून ब्रिटनमधील संसदपटूंना परदेशातून येणारे प्रवासी कौतुकमिश्रित धन्यवाद देतात आणि ते त्याचा कृतज्ञतापूर्वक स्वीकारही करतात. आपल्या राजकीय जीवनातील ही स्वागतार्ह वैशिष्टये आंतरराष्ट्रीय मानदंडाच्या दृष्टीने पहाता निश्चितच उल्लेखनीय आहेत.

परंतु यावरून गंभीर स्वरूपाचे सामाजिक तणाव ब्रिटनमध्ये अस्तित्वात नाहीत असा निष्कर्ष काढण्यापूर्वी पक्षापक्षामधील हे ऐसपैस संबंध दिशाभूल करणारे तर नाहीत ना याचा विचार केला पाहिजे. कारण आज डाव्या गटातच निर्माण झालेल्या राजकीय मतभेदांच्या सत्यस्वरूपापासून जनतेचे लक्ष विचलित केले जाते. ब्रिटनमधील अलिकडच्या काळातील बहुतेक सर्व अटीतटीच्या राजकीय वादंगांना सभागृहात तोंड फुटले नाही तरी ते वरच्या मजल्यावरच्या समित्यांच्या सभागृहात, मजूरपक्षाच्या वार्षिक अधिवेशनात आणि स्थानिक पक्षशाखांच्या बैठकीत फुटलेले आहे.

१९५१ नंतर काही वर्षे तर डाव्या गटातील हे वाद विशेषत्व आक्रमक स्वरूपाचे होते. त्या वादाला वस्तुस्थितीचा काही आधार होता किंवा तथाकथित उजव्या आणि डाव्या गटात खरोखरीचे सुस्पष्ट आणि गंभीर स्वरूपाचे धोरणविषयक मतभेद त्याच्या मुळाशी होते असे खात्रीपूर्वक म्हणता येणार नाही. परंतु हे सर्व या ठिकाणी गैरलागू आहे. कारण एकदा कडवटपणाची आणि प्रतिकाराची भावना उफाळून आली म्हणजे मग धोरणविषयक निवेदन बुद्धिवादी आणि सौम्य शब्दात व्यक्त करणे बहुधा कठीण होऊन बसते. शब्दप्रयोगापेक्षादेखील कटुतेची तीव्रता अधिक असते. 'बेव्हिनप्रणित' विचारसरणीसंबंधीच्या किळसवाण्या आणि प्रदीर्घ झगड्याने याची चांगलीच प्रचीती येऊन चुकली आहे.

खुद्द मजूर पक्षातच संशयात्मक लढाऊ आणि वर्गजागृत जहाल वादासंबंधी जी एक चमत्कारिक तीव्र प्रवृत्ती आहे तिचेच पडसाद या कटुतेच्या रूपाने उमटत असतात. ही प्रवृत्ती इतकी खोलवर रुजली आहे की, केवळ बेव्हिनसारख्या कुशाग्र

बुद्धीच्या प्रवक्त्याच्या वचनाने त्याचा पुरेसा उलगडा होऊ शकणार नाही. कारण बेव्हिनने आधीपासूनच असलेल्या असंतोषाच्या भावनेला फक्त वाचा फोडण्याचे काम केले. त्याचप्रमाणे अमेरिकेचे आणि रशियाचे प्रभुत्व असलेल्या आजच्या जगातील ब्रिटनच्या पालटलेल्या आणि धोकेबाज बनलेल्या परिस्थितीची किंवा हैड्रोजन बाँबची ती प्रतिक्रिया आहे असे म्हणूनही त्याचे समाधानकारक उत्तर मिळत नाही. अस्पष्ट स्वरूपाची, अर्धवट शांततावादी आणि अर्धवट तटस्थतावादी ही आजच्या मनःस्थितीची उघड लक्षणे आहेत. अमेरिकाविरोधी प्रवृत्ती ही तर विशेषतः डाव्या विचारसरणीतील एक कायमची विकृतीच होऊन बसली आहे. लंडनऐवजी वॉशिंग्टन हे जागतिक सत्तेचे केंद्र बनल्यामुळे आणि त्याचबरोबर ब्रिटनमध्ये समाजकल्याणकारी राज्य निर्माण होऊन बेकारी अजिबात नष्ट झाल्याने ही परिस्थिती बदलण्याच्या कामी भांडवलदारांची उपयुक्तताही उरलेली नव्हती. त्यामुळे देशातील भांडवलदारांना हाकलण्यासाठी काहीतरी जोरदार निमित्त हवे होते—अमेरिका विरोधाची भावना ही यातूनच परिणत झालेली आहे.

परंतु जागतिक परिस्थितीमुळेही मूलभूत प्रश्न सुटत नाही. संरक्षण किंवा विदेशनीती यासारख्या प्रश्नावरील डाव्या आणि उजव्या गटातील मतभेद कित्येकदा इतक्या क्षुल्लक स्वरूपाचे असतात की त्यामुळे एवढी कटुता कशी निर्माण होऊ शकते तेच समजत नाही. शिवाय एकाद्या विशिष्ठ सामाजिक गटांत आणि राजकीय ताण्याबाण्यातील विशिष्ट ठिकाणीच ती केंद्रित का व्हावी तेही समजू शकत नाही. अमेरिका विरोध किंवा अण्वस्त्राबद्दल वाटणारी चिंता ही लढाऊ जहालवादाची खरी कारणे मुळीच राहिलेली नाहीत (ज्याप्रमाणे अमेरिकेत कम्युनिस्ट विरोध हे मॅकार्थीवादाचे कारण राहिलेले नाही) हे या दोन्ही बाबतीत खोलवर रुजलेल्या कोठल्यातरी असंतोषाचे घटपट करून बनवलेले समर्थन आहे.

ब्रिटनमध्ये इतका तीव्र राजकीय असंतोष माजून रहावा हे एक आश्चर्यच आहे. अर्थात कांहीं पौर्वात्य देशाइतका तो एकदम लक्षांत येण्यासारखा नाही तसेच युद्धपूर्व काळाइतका तो तीव्र नाही. आणि ते सहाजिकच आहे. सर्व देशांतील राजकीय हवा सदासर्वकाळ सारखीच असत नाही. ज्या समाजातून बेकारीचे उच्चाटन झालेले नाही, जेथील राहणीमान निकृष्ट प्रतीचे आहे किंवा संपत्ती आणि दारिद्र्य यांतील तफावत ज्या देशांत फार मोठी आहे तेथे आत्यंतिकता बोकाळणे किंवा तेथील लोक नेहमी भडकलेले असणे सहाजिक आहे हे आपण धरूनच चालले पाहिजे. परंतु संपूर्ण रोजगार, सामाजिक सुरक्षितता, वाढत जाणारे निव्वळ उत्पन्न आणि उत्पन्नाच्या वितरणात ( ऐतिहासिक दृष्टया पहाता ) डोळ्यात भरण्यासारखी समता असलेल्या ब्रिटनसारख्या देशाच्या बाबतीत आपल्याला तशी अपेक्षा करता येणार नाही. (किंवा ज्या देशांत वांशिक, जातीय किंवा धार्मिक तणाव हिंसक स्वरूप धारण करतात अशा देशांत हे अपेक्षित म्हणता येईल, परंतु सुदैवाने

ब्रिटन या सर्वांपासून मुक्त आहे. )

आणि महत्त्वाची गोष्ट अशी की, जवळपास (ब्रिटनसारखेच) राजकीय आणि आर्थिक वातावरण असलेल्या स्कँडेनेव्हियन देशांत डाव्या गटाबद्दल इतकी तीव्र कटुता दिसत नाही किंवा आपल्या सारखा लढाऊ जहालवादही तेथे नाही. आपल्यापेक्षा तेथील परिस्थितीत जर मुख्य फरक कोणता असेल तर तो हा की, सामाजिक समता आणि वर्गीय स्तरीकरण यांच्यातील फरक केवळ प्रमाणाचाच आहे. हा नुसता योगायोगच समजावयाचा कां ?

गेल्या दोन दशकांत घडून आलेल्या सर्व सामाजिक आणि आर्थिक सुधारणा आणि निसर्गतःच मनमिळावू इतकेच नव्हे तर खिलाडू वृत्तीचे लोक बघितल्यानंतरही ब्रिटनमध्ये इतका तीव्र असंतोष असावा, इतके अनधिकृत संप घडून यावेत, राजकारणांत आणि उद्योगधंद्यांत इतके हळवे, कुत्सित, चिडखोर आणि वैफल्याने ग्रासलेले लोक असावेत आणि त्यांच्या मनांत समाजाबद्दल अढी असावी व कामाबद्दल त्यांची एकसारखी कुरकुर चाललेली असावी व त्याबद्दल त्यांनी सारख्या तारा पाठवत रहावे आणि रागारागाने ठराव पास करावेत, सभांना गर्दी करावी आणि ती सुद्धा बिल्ले लावून नव्हे तर दंडुके खांद्यावर टाकून आणि कोणीतरी आपल्यावर हल्ला चढवील म्हणून चिडखोरपणाने वाट पहात बसावे हे निदान समजण्यासारखे तरी आहे. याचे मूळ अंतस्थ समाजशास्त्रीय कारणांत आहे आणि वर्गीय हितविरोधाचे खास वैशिष्ट्य असलेल्या सामाजिक विषमतेबद्दलच्या असंतोषाचा त्यामध्ये पुष्कळवेळा अभावितपणे बराच भाग असतो.

## ४. सामाजिक राजकारणाचा सिद्धांत

या प्रश्नाची काही समाजशास्त्रीय कारणेही असू शकतील याकडे या देशांत काहीसे दुर्लक्ष झाले आणि मूलतः आर्थिक दृष्टीकोणातूनच राजकारणाचा आणि औद्योगिक संबंधांचा विचार केला पाहिजे असेच जणू आपण धरून चालतो. पूर्वीची परिस्थिती कांहीही जरी असली तरी आता मात्र ज्याला स्थूलमानाने आर्थिक राजकारण आणि सामाजिक राजकारण असे म्हणता येईल त्यांत फरक करावयास हवा. मला असे म्हणावयाचे नाही की, या दोहोंतील फरक अगदी सुस्पष्ट आणि परिपूर्ण असा आहे; परंतु त्यांपैकी एखाद्या विशिष्ट बाजूकडे जास्त कल असतो इतकेच मला सुचवावयाचे आहे.

आर्थिक राजकारण हे कोणत्याही देशाचे किंवा परिस्थितीचे वैशिष्ट्य नसून मार्क्सवादी विश्लेषण कदाचित त्या ठिकाणी लागू पडू शकेल. वाढती भुकेकंगाली, आर्थिक मंदी आणि मोठ्या प्रमाणावरील बेकारी, निव्वळ उत्पन्नात होत जाणारी घट आणि वर्गावर्गांमधील कमालीचे ध्रुवीकरण ही सर्व लक्षणे त्या परिस्थितीत दृष्टीस पडतात. मौलिक टंचाई भासत असल्यामुळे सुस्पष्ट अशा उत्पादक वर्गांत

आर्थिक हितसंबंधाच्या बाबतीत प्रत्यक्ष संघर्ष निर्माण होतो अशा वेळीच राजकीय दृष्टीकोणाच्या संदर्भात आर्थिक प्रश्नांना निर्णायक स्वरूप प्राप्त होते.

याउलट सुबत्ता, वाढते उत्पन्न, संपूर्ण रोजगार आणि चलनवाढ ही सामाजिक राजकारणाची वैशिष्टये असून त्या काळात राहणीमानात वाढ होत असल्याने आणि उदरनिर्वाहाचा प्रश्न न उरल्यामुळे बिगर आर्थिक प्रश्नाकडे लक्ष देण्यास लोकांना वेळ आणि मानसिक उत्साह असतो म्हणूनच केवळ नव्हे तर आणखीही काही कारणांमुळे त्यावेळी लोकांचे लक्ष आर्थिक प्रश्नावरून उडून सामाजिक प्रश्नाकडे वेधले जाते.

सुबत्ता आणि झपाट्याने घडून येणारे आर्थिक बदल यांचे निकट साहचर्य असते– नव्हे आर्थिक बदल हे सुबत्तेचे खास वैशिष्टय असते. एक तर हा बदल आर्थिक मंदीचे तेजीत त्वरेने होणाऱ्या रूपांतराच्या स्वरूपाचा असतो किंवा तंत्रशास्त्रात झपाट्याने विकास घडून येत असलेल्या कोणत्याही कालखंडाचे लक्षण असलेला संथ स्वरूपाचा असतो. अशा बदलामुळे तौलनिक उत्पन्नात फार मोठी तफावत पडणे अपरिहार्थ होऊन बसते. त्याचा परिणाम असा होतो की, आर्थिक उतरंड आणि वर्गीय किंवा सामाजिक उतरंड यातील समन्वय विसकटून जातो. त्यापैकी वर्गीय किंवा सामाजिक उतरंड सामाजिक मान्यता पावलेल्या मूल्यांवर आधारलेली असते आणि तिची पाळेमुळे फार खोलवर रुजलेली असतात. परंपरेचे फार मोठे दडपण त्यावर असते. त्यामुळे आर्थिक उतरंडीत होणाऱ्या बदलाशी तिला पुरेशा गतीने जमवून घेता येत नाही. त्याचा परिणाम असा होतो की, काही सामाजिक गटांना जास्त उत्पन्न मिळू लागल्याने प्राप्त झालेल्या वरिष्ठ दर्जाशी सामाजिक उतरंडीतील त्यांचे स्थान मिळतेजुळते राहिलेले नाही असे त्यांना वाटू लागते तर त्या मानाने खालावलेले उत्पन्न आणि त्यांचे परंपरागत स्थान यात मेळ राहिलेला नाही अशी दुसऱ्या काही सामाजिक गटांची भावना होऊन बसते. वर्गीय तणातणी आणि असंतोष यांना त्यामुळे चांगलेच खतपाणी मिळते. अर्थात राजकारणाप्रमाणे अत्यंत निकृष्टावस्थेतील गटाऐवजी त्यामानाने सुस्थितीत असलेल्या गटात ती भावना पहावयास सापडते.

वस्तुत: आत्यंतिक गरिबीमुळेच केवळ नव्हे तर आर्थिक बदल घडून आल्यामुळे पूर्वीचे सामाजिक संबंध विस्कटले जाऊन अपमानास्पद अशी खालच्या दर्जाची स्थिती प्राप्त होण्याची संभाव्यता निर्माण झाल्यामुळे आपले सामाजिक स्थान धोक्यात आले आहे असे मानणारे १९२० ते ३० या कालखंडातील युरोपमधील मध्यमवर्गीयांचे विशिष्ट गट दुसऱ्या गटात मोडतात. त्यावेळी अशा गटांसमोर चलनवाढीचे संकट उभे ठाकलेले होते- आणि आपले वर्गीय स्थान टिकविण्यासाठी ते फॅसिझमकडे झुकू लागलेले होते किंवा अमेरिकेतील अँग्लो–सॅक्सन वंशातील जुन्या कुटुंबातील मंडळी आर्थिक स्पर्धेतून फार मागे पडल्यामुळे एक काळचे आपले वर्चस्व

टिकवू शकली नाहीत व मागाहून आलेल्या निर्वासितांच्या आणि नव्याने उदयास येणाऱ्या मध्यम वर्गापुढे त्यांचे काही चालेनासे झाले. याबाबतचा आपला असंतोष रिपब्लिकन पक्षातील अतिरेकी गटाला जोरदार पाठिंबा देऊन त्या मंडळींनी व्यक्त केला. किंवा आजच्या ब्रिटनमधील पगारदारांचा विशिष्ट वर्ग (उदा. शिक्षक) किंवा कुशल कारागिरांचा गट (उदा. खेचकाम करणारे किंवा रेल्वेमधील ए. एस्. एल्. इ. एफ. चे सभासद) चलनवाढीमुळे ज्यांना मिळणाऱ्या वरच्या दर्जाच्या पगाराची किंमत कमी झालेली आहे आणि ज्यांची उत्पन्नविषयक तौलनिक परिस्थिती युद्धपूर्वकाळाच्या मानाने, त्याचप्रमाणे त्यांच्या अंगी असलेल्या कौशल्याच्या मानानेही बरीच खालावलेली आहे; त्याचप्रमाणे रोजंदारीवरील कामगारांच्या मानाने मिळणाऱ्या उत्पन्नाच्या बाबतीतील फायदे कमी झाल्यामुळे त्याबद्दलची प्रतिक्रिया बिगर आर्थिक बाबतींतील उच्च सामाजिक दर्जावर भर देऊन व्यक्त करतात असे उद्योगधंद्यातील कनिष्ठ श्रेणीतील व्यवस्थापकीय कर्मचारी– या सर्वांचा दुसऱ्या गटांत समावेश होतो.

सामाजिक स्थानांत तुल्यबळ अशी प्रगती न होता ज्यांचा आर्थिक दर्जाच तेवढा सुधारलेला असतो अशा पहिल्या गटाचे उदाहरण द्यावयाचे तर चलनवाढीमुळे किंवा बेकारीचे समूळ उच्चाटन झाल्यामुळे अचानक श्रीमंत झालेल्या व्यापारी वर्गाकडे बोट दाखवता येईल. त्यांत टेक्सास तेलावर लक्षाधीश बनलेल्यांपासून ते छोटे दुकानदार किंवा सोल प्रोप्रायटर्सपर्यंत सर्वांचा समावेश होऊ शकेल. हा वर्ग आज खूप भरभराटीत असला तरी त्यांना सामाजिक सुरक्षितता वाटत नाही. कारण प्रतिष्ठित आणि बुद्धीवादी अशा दोघांकडूनही आपला अधिक्षेप होतो अशी त्यांची भावना असते. त्यापैकी प्रतिष्ठितांचा आत्मविश्वास आणि बुद्धिजीवींची संस्कृती याबद्दल त्यांना असूया वाटत असते आणि त्यांच्याकडून आपल्याला सामाजिक मान्यता मिळत नाही म्हणून ते अधिकाधिक असंतुष्ट बनत चाललेले असतात. किंवा दुसरे उदाहरण म्हणजे अमेरिकेत ह्यासारख्या नव्याने देशामध्ये स्थाईक झालेल्या कामगार गटाचे. फार काळपर्यंत चांगल्या व्यवसायापासून वंचित राहावे लागल्यानंतर एकदाचा समाधानकारक आर्थिक दर्जा प्राप्त झाला असला तरी ही मंडळी समाजांतील दांभिक प्रतिष्ठितांकडून त्रास झाल्यामुळे स्थानिक लोकांपासून अलिप्त राहतात आणि आपण शंभर टक्के अमेरिकन आहोत हे दाखविण्याकरतां रागारागाने मॅकार्थीवादाचा पुरस्कार करूं लागतात. संपूर्ण रोजगारीमुळे मनीमानसीही नसलेली आकांक्षा अचानक परिपूर्ण होऊन उत्पन्नांत खूप वाढ झाल्याने उच्च दर्जा प्राप्त झालेला परंतु तरीही 'कामगार वर्गीय' किंवा मजूर म्हणूनच ज्याच्याकडे पाहिले जाते असा कामगार वर्गातील सुदैवी गट किंवा यापेक्षांही सर्वसाधारणपणे सांगावयाचे तर उत्पादन क्षमतेत होणाऱ्या वाढीबरोबरच ज्यांच्या उत्पन्नांतही झपाट्याने वाढ होत जाते असे कामगार वर्गातील गट, यांचाही

पहिल्या गटांत समावेश करता येईल.

ब्रिटनमधील औद्योगिक आणि राजकीय या दोन्ही क्षेत्रांतील असंतोषाला खरोखरी हे दोन गटच कारणीभूत आहेत. औद्योगिक क्षेत्रांत, कामगारांबरोबरचे संबंध सगळ्यांत जास्त बिघडलेले जर कोठे असतील, तसेच संघर्षाची ठिणगी उडण्याजोगी परिस्थिती जर कोणत्या उद्योगधंद्यांत असेल तर ती कोळसाखाणी; गोद्या आणि अभियांत्रिकी उद्योगधंद्यांतील काही विभागात होय. या उद्योगधंद्यांतील कामगारांना सर्वसाधारणपणे कोणत्याही धंद्यातील कामगाराला मिळणाऱ्या पगाराच्या मानाने कितीतरी जास्त पगार मिळतो इतकेच नव्हे तर उत्पन्नाच्या एकूण रचनेतच त्यामानाने डोळ्यांत भरण्यासारखी वाढ झाल्याचे तो अनुभवीत असतो. परंतु त्या प्रमाणांत त्याची सामाजिक प्रतिष्ठा वाढलेली नसते हे लक्षांत ठेवण्या-सारखे आहे. परिणामी नवा आर्थिक आणि जुना सामाजिक दर्जा यांत कमालीची तफावत दिसून येते.

औद्योगिक क्षेत्रांतील असंतोषाचे मूळ यांतच तर नसेल ? या उद्योगधंद्यांची आतापर्यंत जी समाजशास्त्रीय पहाणी करण्यांत आली आहे त्यावरून या विधा-नाला बळकटी येते. श्री. झ्विग लिहितात 'खाणकामगाराची अद्यापही अशीच समजूत असते की, जनता आणि व्यवस्थापक हे दोघेही त्यांच्याविरुद्ध आहेत आणि तो सगळ्यांचाच नावडता आहे अशीही त्याची भावना होऊन बसलेली असते. त्याच्याबद्दल आजपर्यंत काय काय बोलले जात असे आणि अहंमन्य "मध्यम-वर्गीयां" चे त्याच्या संबंधाचे ठराविक वाक्प्रचार काय असत ते अद्यापही तो विसरलेला नसतो. . . .त्याच्याकडे उपहासाने बघितले जात असे आणि खरे तर आजही पाहिले जाते. . . . खुद्द त्याचा मुलगा आता स्वत: खाणकामगार राहि-लेला नसला तरी तो देखील आपल्या बापाला आयुष्यांत यापेक्षा जास्त काहीच जमले नसते असेच मानतो. . . . अशा तऱ्हेचा न्यूनगंड साचत गेल्यामुळेच कदा-चित त्याचे उट्टे म्हणून कांही वेळा खाणकामगार जी आक्रमक वृत्ती धारण करतात त्यांतून त्यांचा अहंगंड व्यक्त होतो. !'

दुसऱ्या एका पहाणीचा निष्कर्ष असा आहे की, 'खाणकामगार हा कोणीतरी हलक्या प्रकारचा प्राणी आहे आणि सामाजिकदृष्ट्या तो जवळपास बहिष्कृतच असतो, हे शब्द कदाचित कडक वाटतील. परंतु खाणकामगा-रांच्या मनांतील तीव्र भावना यापेक्षा सौम्य शब्दाने व्यक्त करून दाखवता येणार नाहीत. . . . . वर वर पहाता अगदी क्षुल्लक वाटणारी पगारासंबंधीची भांडणे हे वस्तुत: त्या माणसाचा व्यवसाय म्हणजे पर्यायाने तो माणूसच कमी प्रतीचा समजला जातो या भावनेचेच व्यक्त स्वरूप असते—— स्नानगृहे नसणे हे शारी-रिक गैरसोयीपेक्षा देखील सामाजिक कलंकाचे लक्षण समजले जात असे. त्याच-प्रमाणे पोलिश किंवा इटालियन कामगारांना खाणीत काम देण्याची सूचना अप-

ज्ञानास्पद वाटते कारण त्याच्या मुळाशी अशी भावना असते की परदेशीय काम-
गारांपैकी जे बेकार असतील त्यांनाच फक्त खाणीतील कामाला जुंपायचे अशी
या मागील वृत्ती आहे आणि त्याबद्दलच त्यांचा खरा राग असतो.

गोदीमध्येही सामाजिक दर्जासंबंधी अशीच परिस्थिती निर्माण होते. ' त्यांच्या-
संबंधीच्या इतर लोकांच्या वृत्तीमुळे गोदीकामगारांत असंतोष पसरतो आणि त्यांच्यात
आक्रमक आणि शत्रुत्वाची भावना निर्माण होऊन कधी कधी हिंसक किंवा समाज-
विघातक कृत्यांत त्याचा परिस्फोट होतो.... गोदी कामगारांचे पगार आणि
कामाची परिस्थिती यात सुधारणा घडून आलेली असूनही गोदीकामगारांचा व्यव-
साय हा अद्यापही काहीसा हलक्या दर्जाचाच समजला जातो.... त्यांच्यापुरते
बोलावयाचे तर गोदीकामगारांना आता स्वत्वाची चांगलीच जाणीव झालेली आहे '
अशा तऱ्हेने आपण स्वतः गोदी कामगार असल्याबद्दल ते खंत बाळगतात, आणि
यांच्यातील काही जणांनी तर अशी कबुली दिली की, ग्रामर स्कूलमध्ये प्रवेश
मिळालेल्या त्यांच्या मुलांना आपला बाप गोदीकामगार आहे हे शक्यतो कोणाला
कळू देऊ नका असे त्यांनी सांगून ठेवलेले असते.

अधिक उत्पन्नामुळे नव्याने प्राप्त झालेला दर्जा आणि त्याच्या जोडीला
निकृष्ट सामाजिक दर्जाविषयी घृणा ही परिस्थिती महत्त्वपूर्ण आहे, आणि खाणी
व गोदी या व्यतिरिक्त इतर क्षेत्रातील बरेचसे झगडे हे केवळ उच्च वेतनश्रेणी
असलेल्या उद्योगधंद्यांतीलच असतात असे नव्हे तर त्यात वेतनश्रेणी किंवा कामाच्या
अटी यांचा काही संबंधही नसतो. उलट प्रतिष्ठा आणि सत्ता हेच कारण त्यांच्या
मुळाशीं असते. जादा काम, कामगार प्रतिनिधींचे अधिकार, कामगारांची बडतर्फी,
फोरमनची नियुक्ती इत्यादी बाबतीत सल्ला घेतला नाही म्हणून किंवा, सर्वसाधा-
रण शिस्तीच्या प्रश्नावरून असे तंटे उद्भवतात. आपले आर्थिक महत्त्व वाढत्या
सामाजिक दर्जातून आणि प्रतिष्ठेतून योग्य प्रकारे व्यक्त होत नाही अशी भावना
चांगले पगार मिळविणाऱ्या कामगारांच्या मनात वसत असते हेच वरील तऱ्हेच्या
झगड्यावरून प्रतीत होते.

राजकारणातील लढाऊ जहालवादाच्या मुळाशी अशाच तऱ्हेच्या भावना
असाव्यात असे दिसते. स्थानिक पक्षशाखेतील सर्वात असंतुष्ट कामगार हा सहसा
गरीब किंवा झोपडपट्टीत राहाणारा असतो किंवा आर्थिक क्षेत्रात आणखी बदल
घडून आले तर त्याला त्याचा जास्तीत जास्त फायदा होणार असतो असे नाही;
उलट चांगले उत्पन्न मिळविणारे, नीटनेटक्या नव्या हौसिंग कॉलनीमधून राहणारे,
तरुण आणि स्वत्वाची जाणीव असलेले कुशल अभियांत्रिकी कामगार, वीज कामगार,
ड्राफ्ट्समन, तंत्रज्ञ आणि कनिष्ठ श्रेणीतील कारकून इत्यादी कामगारच सर्वात
जास्त अस्वस्थ असतात असा मजूर पक्षातील सर्वच राजकारण्यांचा अनुभव असतो.
त्याचप्रमाणे जुन्या औद्योगिक वसाहतींपेक्षाही उच्च वेतनश्रेणी असणाऱ्या नव्या

अभियांत्रिकी विभागातील पक्षशाखा सर्वांत जास्त लढाऊ वृत्तीच्या असतात. कॉव्हेन्ट्री आणि मार्गेट हे या लढाऊ वृत्तीचे बालेकिल्ले आहेत हे याचेच उदाहरण.) आईवडिलांपेक्षा आपला आर्थिक दर्जा कितीतरी उच्च असूनदेखील आपल्या कारखान्याकडून घेण्यात येणाऱ्या निर्णयात आपल्याला सहभागी करून घेतले जात नाही किंवा धोरण ठरविण्याच्या बाबतीत आपल्याला कसलाही अधिकार नसावा, व्यवस्थापकीय श्रेणीतील कर्मचाऱ्यांच्या मानाने बिगरआर्थिक बाबतीत फारच थोडे विशेषाधिकार उपभोगता यावेत या गोष्टींचा अशा प्रकारच्या माणसांना सहाजिकच संताप येतो आणि कारखान्याबाहेर आपले शिक्षण कमी आहे, प्रसंगी आपल्यापेक्षाही कमी उत्पन्न असलेल्या मध्यमवर्गीयांकडून आपल्या राहणीचा, आपल्या बोलण्याचालण्याचा आणि एकंदरीतच आपल्या कनिष्ठ प्रतीच्या वर्गीय स्थानाचा अधिक्षेप केला जातो ही गोष्ट त्यांना डाचत असते.

मला असे वाटते की, सामाजिक एकरूपतेच्या या अभावामुळेच विरोधाची भावना निर्माण होते. त्याचप्रमाणे जे गट आर्थिकदृष्ट्या वर आलेले आहेत किंवा येऊ लागले आहेत परंतु ज्यांच्या सामाजिक आशाआकांक्षा आपल्या समाजात खोलवर रुजलेल्या सामाजिक स्तरीकरणामुळे कुंठित होऊन बसल्यासारख्या झाल्या आहेत अशा गटातच ती भावना केंद्रित का होते त्याचाही उलगडा होतो. आपण आत्यंतिक विषमता आणि खरीखुरी समानता या दोहोंच्यामध्ये असल्यामुळे दोन्ही बाजूंनी येणाऱ्या संकटांना आपल्याला तोंड द्यावे लागते. यां ठिकाणी पुन्हा स्कॅन्डेनेव्हियातील परिस्थिती याच्या नेमकी उलट अशी आहे हे जाणवते. तेथील समाजातील वर्गावर्गातली विभागणी इतकी काटेकोर नसते, इथल्यासारखा आर्थिक दर्जा असलेल्यांचा सामाजिक दर्जा त्यामानाने कितीतरी वरचा असतो आणि त्यामुळे ते देश तशा प्रकारच्या असंतोषापासून मुक्त असतात.

अर्थात ही उपपत्ती अचूक आहे हे सिद्ध मात्र करून दाखवता येणार नाही. याचा खुलासा करणे फारसे अवघड जाऊ नये– उदा.गतकालीन औद्योगिक संघर्ष आणि अन्याय यांच्या कटु आठवणी उफाळून येत असतील किंवा कम्युनिस्ट वर्चस्व निपटून काढण्यात आलेले अपयश हेही त्याला कारणीभूत असेल. पण मी सुचविलेल्या उपपत्तीचे समर्थन करणारा पुरावा प्रथमदर्शनी तरी बराच सबळ आहे.

## ५. वर्गद्रोहासंबंधीची विचारसरणी

पहिल्या भागात वर्णन केलेले बदल घडून आलेले असतानाही ब्रिटनमध्ये वर्गीय विश्वासघात वा भ्रष्टीकरणाची विचारसरणी जी आश्चर्यकारक वाटेल अशा पद्धतीने सतत चालू राहिली आहे तिच्या योगानेही ती उपपत्ती सिद्ध होते.

यालाच मी एकतर कामगार वर्गाच्या पुढाऱ्यांना वश करून घेऊन किंवा कपटाने त्यांची मने भ्रष्ट करून टाकून, कामगारांचा वर्गीय शत्रू कामगार वर्गाला

सर्वस्वी दुर्बल करून टाकील ही हळवेपणाची, बचावात्मक आणि जवळपास विकृत भीती असे म्हणतो. मग बचावात्मक प्रतिक्रिया सुरू होते.

एखाद्या कामगाराने व्यवस्थापकीय किंवा निरीक्षक अधिकाऱ्याची जागा स्वीकारली तर लगेच त्याने कामगारांचा विश्वासघात केला (तो मालकाला जाऊन मिळाला) अशा शब्दात जी तीव्र विरोधाची भावना व्यक्त केली जाते, त्याचप्रमाणे ज्यांच्यावर नितांत विश्वास व्यक्त केला जात असे अशा कामगार नेत्यांची राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगाच्या समितीवर नेमणूक झाल्याबरोबर त्यांच्याबद्दल जे वैमनस्य दृष्टीस पडते त्यातलाच हा प्रकार आहे. कामगार संघटनेच्या अगदी सामान्य पदाधिकाऱ्यांची राहणी, त्यांच्या मोटारी किंवा त्यांचे उत्पन्न, मालकांच्या जवळपास बरोबरीचे आहे (वस्तुतः ते तसे कधीच नसते) असे मनात आल्याबरोबर लगेच त्यांनी काही तरी भ्रष्टाचार केला असला पाहिजे असा संशय घेतला जातो.

पन्नास वर्षांपूर्वी अशा प्रकारची वृत्ती कदाचित समर्थनीय ठरली असती; पण आज मात्र ती अगदीच मूर्खपणाची ठरते. त्याचा अर्थ असा होतो की, कामगार आणि व्यवस्थापकीय वर्ग यांचे हितसंबंध कोणत्याही परिस्थितीत परस्पर विरोधीच असले पाहिजेत. परंतु आता प्रत्येकाला याची जाणीव झाली आहे की, (पगारासंबंधीच्या वाटाघाटींच्या बाबतीत) हे हितसंबंध भिन्न भिन्न असले तरी (उत्पादनक्षमता वाढविण्याच्या बाबतीत) ते मिळतेजुळतेही असू शकतात. कामगार आणि मालक यांच्यात सतत अनिवार्य असा संघर्ष असला पाहिजे, किंवा मालकवर्गाकडून कामगार वर्ग दुखावला जाणारच आणि जे कामगार सर्वात जास्त कार्यक्षम असतील त्यांना त्यांच्या कुवतीच्या मानाने भराभर बढती मिळू शकणार नाही किंवा राष्ट्रीयीकरण झालेल्या धंद्यातील संचालक मंडळावर कामगार संघटनांचे प्रतिनिधी कधीच घेतले जाणार नाहीत असे आता संयुक्तिकपणे कोणीच मानीत नाही. आणि तरीही वर्गद्रोहाच्या विचारसरणीत या सर्व समजुती अभिप्रेत असतात. (अशा तऱ्हेने व्यवस्थापकीय जागांवर अधिकाधिक कामगार घेण्यात यावेत, त्याचप्रमाणे राष्ट्रीयीकरण केलेल्या धंद्यांच्या संचालक मंडळावर कामगार संघटनांच्या प्रतिनिधींना जास्त जागा मिळाव्यात या त्याच वर्गीय "देशभक्तां"कडून पुनः पुन्हा केल्या जाणाऱ्या मागणीशी वरील विचारसरणी सर्वस्वी विसंगत आहे.)

आणि कामगार-व्यवस्थापक संघर्षाच्या सीमारेषा अधिक सुस्पष्ट असल्या तरी देखील सध्याच्या कामगार चळवळीची प्रचंड ताकद लक्षात घेता, अशा तऱ्हेची बचावात्मक भीती व्यक्त करणे खासच अवास्तव ठरेल. कामगारांचा निकराचा लढा सुरू असता आणि त्यांच्यावर पराभव पत्करण्याची पाळी आली असती तर एकवेळ ते योग्य ठरले असते. अशा प्रसंगी मनोधैर्य खचून कसल्या तरी शंका मनात उद्भवणे सहाजिक आहे. आणि ही विश्वासघाताची किंवा भ्रष्टतेची विचारसरणी म्हणजे वस्तुतः एखाद्या मोठ्या समाजात सामावले गेलो तर आपले स्वतंत्र अस्तित्व

नष्ट होईल किंवा आपली ससेहोलपट केली जाईल या भीतीने पछाडल्या गेलेल्या वांशिक किंवा धार्मिक अल्पसंख्यांकांकडून नेहमीच व्यक्त होत असलेली भीती होय. ते त्यांचे ऐतिहासिक वैशिष्टयच आहे असे म्हटले तरी चालेल. म्हणूनच 'अंकल टॉमिझम'चा म्हणजेच खास अमेरिकन प्रवृत्तीचा जरा कोठे वास आला तरी अमेरिकेतील नीग्रोंना लगेच त्याबद्दल संशय वाटू लागतो आणि त्यांच्या पुढाऱ्यांना फितवून वश करून घेऊन गोऱ्या माणसाच्या मोहवश संस्कृतीच्या नावाखाली आपल्या जातीशी द्रोह करावयास भाग पाडले जाईल अशी त्यांना एकसारखी भीती वाटत असते; त्याचप्रमाणे ज्यू विरोधी मोहिमेच्या वेळी त्यांच्यापैकी एक गट आपण ज्यू असल्याचे अट्टाहासाने प्रतिपादित असतो. कडवे धर्मनिष्ठ गट 'जगात' चाललेल्या भ्रष्टाचाराची झळ लागू नये म्हणून विधिनिषेधाची अगदी तपशीलवार जंत्री करून ठेवतात ती याच भीतीपोटी.

परंतु पुरेशी ताकद पाठीशी असेल तर अशा तऱ्हेचे बचावात्मक खबरदारीचे उपाय आततायीपणाने योजणे मूर्खपणाचे ठरते आणि ज्यावेळी ब्रिटनमधील काही कामगार 'समान संधी'ची घोषणा खरी आहे असे मानण्याचे धाडस करतात त्यावेळी संघटनेची कवचकुंडले धारण केलेला अभेद्य ब्रिटिश कामगारवर्ग दुखावला जातो किंवा आपला विश्वासघात झाला आहे अशी त्याची भावना होते त्यावेळी ती परिस्थिती काहीशी हास्यास्पद ठरते इतकेच नव्हे तर समाजवादी ध्येयसिद्धीच्या दृष्टीने ती अत्यंत धोकादायक ही ठरते.

तरीही या मनोवृत्तीचे सातत्य, ते उघड उघड अविचारी असले तरी देखील महत्त्वपूर्ण असते. कारण त्यामुळे खोलवर रुजलेली सामाजिक असुरक्षिततेची आणि आत्मविश्वासाच्या अभावाची भावना ध्वनित होते. त्यातून वर्गीय जाणिवेचे सामर्थ्य ज्याप्रमाणे प्रतीत होते त्याचप्रमाणे वर्गीय स्तरीकरणामुळे सामाजिक वैमनस्य आणि असंतोष यांना खतपाणी मिळते या भूमिकेला बळकटी प्राप्त होते.

## ६. समाजवाद, मानवी स्वभाव आणि सामाजिक समाधान

परंतु काही वेळा असे म्हटले जाते की, सामाजिक असूया आणि असंतोष याकडे लक्ष देणे म्हणजे लांछनास्पद असे एकादे कृत्य करण्यासारखे किंवा स्वार्थीपणाने जनसमूहाची भाटगिरी करण्यासारखे आहे. परंतु खरे म्हणजे ते तसे नसते. कारण नैतिकदृष्टया खालच्या पातळीवर असणाऱ्या लोकांच्या मनातच केवळ या भावना असतात असे नाही तर त्याविरुद्ध हाकाटी करणारे उच्चभ्रूही त्यापासून मुक्त नसतात, आणि ते अगदी सहाजिक आहे. केवळ देशभक्ती पुरी पडणार नसल्याने इतर अनेक बाबी ज्याप्रमाणे विचारात घ्याव्या लागतात (उदा. आपल्याला अधिकाधिक पैसा मिळाला पाहिजे आणि जास्त जास्त प्रयत्नशील बनण्यास प्रोत्साहन मिळावे म्हणून कर कमी करण्यात आले पाहिजेत अशी मागणी करणाऱ्या धनिक

वर्गाची हाव) त्याचप्रमाणे वरील बाबही विचारात घेतली तर त्यात लांछनास्पद असे काहीच नाही. एखादी जादूची कांडी फिरल्याबरोबर सर्व प्रकारची असूया किंवा लोभ नष्ट होत असता तर मग प्रश्नच नव्हता. परंतु तशी ती नष्ट होणार नसल्याने ती अत्यंत महत्त्वपूर्ण अशी सामाजिक वस्तुस्थिती आहे हे धरूनच चालले पाहिजे. आणि त्यामुळे समाजातील शांतता आणि स्वास्थ्य ढळत असल्यामुळे त्यातून शक्य तितका कमी प्रक्षोभ निर्माण होईल अशा तऱ्हेचे प्रयत्न न करणे किंवा परिस्थितीशी मिळते न घेणे चूक ठरेल.

शैक्षणिक संधी मिळण्याच्या बाबतीतील विषमतेमुळे ज्यावेळी असूयेची भावना निर्माण होते त्यावेळी ती पराकोटीच्या दुराग्रही असहिष्णुतेची परमावधी आहे असे मानून तिचा अधिक्षेप करता येणार नाही. वरिष्ठ आणि मध्यम वर्गातील लोकांना तर असे वाटते की, आपल्या मुलांच्या शिक्षणाकडे आणि भावी आयुष्याकडे काळजी-पूर्वक लक्ष पुरवणे यात दोषास्पद असे तर काही नाहीच, उलट ते पालकांचे कर्तव्यच ठरते. अशा परिस्थितीत कामगारवर्गीय पालकांना आपल्या मुलांपेक्षा श्रीमंतांच्या मुलांना चांगल्या प्रतीचे शिक्षण मिळते, त्यांचा दृष्टीकोण अधिक व्यापक होतो आणि त्यांना पुढील आयुष्यात अधिक चांगली संधी प्राप्त होते याबद्दल असूया वाटली तर त्याबद्दल त्यांना कोणत्या तोंडाने ते ठपका देणार ?

सामाजिक वैशिष्टयाच्या या पैलूंची चर्चा करीत असतांना 'मानवी स्वभावा'ची अनिवार्य आणि अनाकलनीय बाजू विचारात घेतलेली नाही. सामाजिक वंशशास्त्राने निदान एवढे तरी दाखवून दिले आहे की, मानवी स्वभाव आणि त्यातील वैशिष्टये ही त्रिकालाबाधित आणि सर्वांना सारखीच लागू पडणारी नसतात तर मानवाच्या संस्कृतीनुसार ती बदलत असतात आणि वंशश्रेष्ठत्वाच्या सिद्धांता-नुसार सूचित करण्यात आल्याप्रमाणे मानवी स्वभावातील हे फरक अनुवांशिक नस-तात तर ते निदान काही प्रमाणात तरी संस्कृतीमुळे आलेले असतात. अर्थात मानवी स्वभावात काही शारीरिक आणि प्राणीशास्त्रीय गुण अनुवांशिकतेने उतरलेले असतात. परंतु प्राणीशास्त्रासंबंधीच्या अभ्यासामुळे आता निरनिराळया वंशात सामाजिक आणि सांस्कृतिक बाबतीत बदल असतात असे आढळून आले असून त्याचा उलगडा या अनुवंशिकतेमुळे होऊ शकत नाही. कोठल्याही एकाद्या समाजाच्या स्वभाववैशिष्टयात कालानुसार जे बदल घडून येतात त्यांची तर अनुवंशिकतेच्या आधारावर कधीच संगती लावून दाखवता येणार नाही.

सामाजिक मानसशास्त्रज्ञांनी गटासंबंधी केलेल्या प्रयोगावरूनही या मताला पुष्टी मिळते असे आढळून आले आहे. त्यावरून असे आढळून आले आहे की, प्रामाणिकपणा किंवा अप्रामाणिकपणा यासारख्या वर्तणुकीच्या मूलभूत क्षेत्रातही सामाजिक दडपण निर्णायक ठरत असते– म्हणजे व्यक्ती प्रामाणिक किंवा अप्रामाणिक नसते, परिस्थिती प्रामाणिक किंवा अप्रामाणिक असते; आणि एखाद्या गटाचे वर्तन

आक्रमक असते की सहकार्याचे, चिरखोडपणाचे असते की संतोषयुक्त असते, लोकशाहीचे असते की त्यातून अधिकारशाही डोकावते ते देखील त्या त्या वेळच्या परिस्थिती-वरूनच ठरत असते. अर्थात यातील कार्यकारणभावासंबंधी निश्चित आणि ठाम असे विधान कोणीच करू शकणार नाही. आणि पाचव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे 'सामाजिक' उद्दिष्टे आणि संबंध यासंबंधीच्या वृत्तीत बदल कसा घडून येतो ते तर अनेकदा सांगता येत नाही. परंतु याबाबतीत कमी किंवा जास्त स्वरूपातील सामाजिक समता असणे सहज शक्य आहे इतकेच नव्हे तर कार्यकारणभाव प्रस्थापित करणारा पुरावा बराच बळकट असावा असे दिसते– विशेषतः स्कॅन्डे-नेव्हियात तशाच प्रकारचा सामाजिक असंतोष त्यातल्या त्यात कमी प्रमाणात आढळतो आणि उत्तर अमेरिकेत सामाजिक असूया आणि वर्गीय विद्वेषाची भावना फारशी आढळत नाही यावरून हेच प्रत्ययास येते. यावरून सामाजिक समता आणि वर्गीय स्तरीकरण यांच्याशी काही प्रमाणात तरी या गोष्टींचा संबंध असावा असे सूचित होते.

अशा तऱ्हेने अधिक समानता असावी या प्रतिपादनातील पहिल्या मुद्याचे नैतिक अधिष्ठान हे आहे की, त्यामुळे सामाजिक समाधानात वाढ होऊन सामाजिक असंतोष कमी होईल. हे विधान हे अर्थातच केवळ वर्णनात्मकच असणार. म्हणजे असे की, दोन समाजात आढळणाऱ्या समाधानाच्या प्रमाणात फरक असला तर त्या समाजात वावरणाऱ्या व्यक्तींच्या सभोवतालच्या वस्तुनिष्ठ परिस्थितीतील फरकामुळे तो घडून आला असणे शक्य आहे. व्यवहारात मात्र इतक्या वस्तुनिष्ठतेचा अभाव असतो. त्यामुळे अशा प्रकारच्या विधानाला निदान काही अंशी तरी मूल्यमापनाचे स्वरूप प्राप्त होते व शिफारसवजा दडपणाचा जोर त्यामागे असतो. एक म्हणजे असंतुष्ट समाजापेक्षा समाधानी समाज चांगला या नैतिक भूमिकेवरून आणि दुसरे म्हणजे समाजाचे समाधान त्या समाजातील व्यक्तींच्या समाधानावर अवलंबून असते या निष्कर्षावरूनही वरील विधान समर्थनीय ठरते. यावरून आपल्यातील सामुदायिक असमाधानाचा उगम निदान काही प्रमाणात तरी सामाजिक विषमतेत झालेला असतो आणि ती विषमता जसजशी कमी होईल तसतसे असमाधानही कमी कमी होत जाईल हे एक या प्रकरणात मांडलेले गृहित कृत्य आहे. त्याचप्रमाणे विशेषाधिकार उपभोगणाऱ्या आजच्या वर्गाच्या समाधानात जी घट होते तिची एकूण समाजाच्या समाधानात होणाऱ्या वाढीमुळे भरपाई होईल या दुसऱ्या गृहित कृत्यावर ते विधान आधारलेले आहे.

ही विधाने केवळ वर्णनात्मक किंवा वस्तुस्थिती निदर्शक नाहीत तर त्यात मूल्याचा भाग फार मोठा आहे. परंतु असे असले तरी त्यामुळे ती कमी महत्त्वाची ठरतात असे मानण्याचे कारण नाही. समाजाच्या समाधानासंबंधीचे किंवा कल्याणा-संबंधीचे कोठलेही विधान हे जादा समतेच्या बाजूचे असो की विरोधाचे असो, या

सन्हेचे असते. परंतु त्याबाबत कितीही अनिश्चितता असली तरी काही निष्कर्ष हे काढावे लागतातच. एक तर आपण अधिक समतेचा आग्रह धरला पाहिजे, नाही तर आहे त्या समतेत घट झाली पाहिजे असे म्हटले पाहिजे, नाही तर सध्याची समता पुरेशी आहे असे तरी म्हटले पाहिजे; आणि यापैकी बरोबर कोणते ते ठरवताना राजकारणी लोकांनी समाजकल्याणाविषयी काही दंडक गृहीत धरले पाहिजेत. अशा प्रकारची विधाने केवळ नैतिक स्वरूपाची असतात हे सहज दाखवून देता येत असले तरी त्या सबबीवर त्यांना स्वतःवरची जबाबदारी अंगाबाहेर टाकता येणार नाही.

ही विधाने व्यक्तिगत 'सुखा' बद्दलची नसतात हे लक्षात घेतले पाहिजे. समाजातील व्यक्तिगत सुखाची व्याप्ती न वाढवता देखील आपल्याला सामुदायिक हितविरोध आणि असंतोष कमी करता येईल आणि त्याचप्रमाणे सामुदायिक समाधानात वाढ करता येईल.

सुरुवातीच्या काळातील बहुतेक सर्व समाजवादी (रॉबर्ट ओवेन तर निश्चितच) असे मानीत असत की, समाजवाद आणि सौख्य यांचे नाते अगदी साधे आणि सरळ आहे. त्यांची अशी समजूत होती की, समाजाची समाजवादाच्या दिशेने जसजशी प्रगती होत जाईल तसतसा तो समाज अधिकाधिक स्वप्नदर्शी समाजवादाच्या अवस्थेप्रत पोहोचू लागेल. यालाच विल्यम गॉडविन याने "परमसुखाची व्याप्ती सर्वत्र फैलावण्यास अत्यंत अनुकूल परिस्थिती" असे म्हटले आहे. जनता संपूर्णपणे सुखी बनेल, वैफल्य आणि दुष्टावा कमी कमी होत जाईल आणि पृथ्वीवर जणू नंदनवन अवतरेल. सर्वत्र बंधुभाव पसरेल. सर्व दुःखाचे मूळ सामाजिक कारणात असल्याने सामाजिक परिवर्तन घडून आले की नैतिक आणि मानसिक दुरावस्था दूर होईल अशी त्यांची समजूत होती.

परंतु आज इतकी भोळसटपणाची भूमिका कोणीच घेणार नाही; कारण त्याबाबत निदान दोन प्रमुख अडचणी आहेत : पहिली अडचण अशी की, एका समाजापेक्षा दुसऱ्या समाजात अधिक सामाजिक समाधान वसत आहे म्हणजेच त्या समाजातील सामाजिक हितविरोध, सामुदायिक असंतोष आणि राजकीय कटुता कमी आहे असा निष्कर्ष काढणे बरोबर असले (आणि लोक सतत असा निष्कर्ष काढीत असतात) तरी एका समाजातील व्यक्तींपेक्षा दुसऱ्या समाजांतील व्यक्ती सर्वसाधारणपणे जास्त सुखी आहेत असे विधान मात्र करता येणार नाही. 'सौख्य' हा शब्द अगदीच संदिग्ध आहे म्हणून असे होते असे नव्हे— उलट एखादी व्यक्ती सुखी आहे किंवा नाही इतकेच नव्हे तर 'अ' पेक्षा ब अधिक सुखी आहे याविषयीसुद्धा अनेकदा लोकांचे एकमत असते. परंतु सबंध समाजाविषयी याबाबतीत काही निष्कर्ष काढणे अशक्य होते हे त्याचे कारण आहे.

दुसरे असे की, जरी असे निष्कर्ष काढणे शक्य झाले असते तरीदेखील व्यक्ति-

गत सौख्य आणि सांस्कृतिक, सामाजिक पूर्वपीठिका यातील परस्पर संबंधाविषयीचे आपले ज्ञान अगदीच अपुरे असते आणि त्यामुळे सांस्कृतिक–सामाजिक बाबतीत कोणते बदल घडून आले म्हणजे व्यक्तिगत सौख्यावर त्याचा प्रभाव पडतो ते निश्चितपणे सांगता येत नाही. त्यामुळे फ्रॉईडच्या सुरुवातीच्या आत्यंतिक मतांचा आधार घेऊन सांस्कृतिक बाबींकडे संपूर्ण दुर्लक्ष करणाराही कोणी निघू शकेल. लोक काहीतरी खटपट करून आपले म्हणणे बुद्धिवादाच्या चौकटीत बसवून दाखवतात. त्यांची ते बाह्यातकारी आणि जाणूनबुजून जी कारणमीमांसा करतात ती त्यांच्या 'वास्तव' अंतर्मनाची निदर्शक नसते हे आता आपण पाहिलेले आहे. त्यामुळे एखाद्याला असेही म्हणता येईल की, असूया आणि असंतोष यांची सामाजिक संदर्भात केवळ संगती लावून दाखवली गेली होती परंतु प्रत्यक्षात मात्र अपरिपक्व अनुभव आणि लैंगिक नागवणूक हीच त्याच्या मुळाशी असतात किंवा नवजात बालकाला स्तनपान देण्याच्या, त्याला तोडण्याच्या किंवा त्याचे संगोपन करण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळे स्वाभाविक वैशिष्ट्ये ठरत असतात आणि व्यापक सामाजिक बाबींवर ती केवळ अप्रत्यक्षपणे अवलंबून असतात हा सामाजिक प्राणीशास्त्रज्ञांचा दृष्टीकोणही स्वीकारता येईल.

समाजात काही प्रमाणात तरी असंतोष आणि वैफल्य कायम स्वरूपात असतेच किंवा निदान तसे ते असणे सामाजिक अगर आर्थिक सुधारणांसाठी अपरिहार्य असते. अशा सुधारणांचा परिणाम इतकाच होतो की, त्यामुळे असंतोषाची दिशा बदलते आणि त्यामुळे पूर्वी बाह्यस्वरूपाचा आणि राजकीय व औद्योगिक क्षेत्रातील सामुदायिक स्वरूपाच्या हितविरोधांच्या द्वारा व्यक्त होत असलेला असंतोष आता मुख्यत: व्यक्तिगत वैफल्याच्या द्वारा अंतर्गतरित्या व्यक्त होऊ लागतो. म्हणजेच निराळ्या शब्दात सांगावयाचे तर सामाजिक स्थित्यंतर आणि भरपाई यांच्या उद्दिष्टांच्या बाबतीत पूर्वीचे सामाजिक आणि राजकीय अडथळे कमी झाले तर त्या जागी नवी आणि निव्वळ व्यक्तिगत कारणे शोधून काढली जातील, परंतु वैफल्याचे प्रमाण मात्र कायमच राहील.

हे खरे आहे असे मानले तरी अधिक समानतेच्या मुद्दाला त्यामुळे कसलाही बाध येत नाही. त्याचे एक प्रमुख कारण असे की सामाजिक न्याय आणि सामाजिक नासधूस यासंबंधीच्या विधानाला ते संपूर्णपणे लागू पडते. यासंबंधीची चर्चा याच प्रकरणात पुढे आली आहे. पण कोणत्याही परिस्थितीत गटागटांतील वैमनस्यातून व्यक्त होणाऱ्या सामाजिक असंतोषाच्या बाबतीत निव्वळ व्यक्तिगत असंतोषाच्या तुलनेत दोन अत्यंत अनिष्ट प्रवृत्ती असतात. एक म्हणजे त्याच्या सामुदायिक स्वरूपामुळेच त्याला स्वत:चेच खतपाणी मिळत असते आणि त्यामुळे त्याला व्यापक आणि प्रचंड स्वरूप प्राप्त होते; आणि दुसरे असे की, केवळ व्यक्तिगत फुटकळ वैफल्यामुळे लोकशाही, सामाजिक आणि औद्योगिक शांतता, सहिष्णुता इतकेच

नव्हे तर व्यक्तिगत स्वातंत्र्य यासारख्या अत्यंत महत्त्वाच्या मूल्यांना जो धोका निर्माण होत नाही तो एका अर्थाने सामाजिक असंतोषामुळे निर्माण होऊ शकतो.

परंतु कायम स्वरूपाच्या असंतोषाची कल्पनाच वस्तुतः मला मंजूर नाही. उलट माझी तर अशी खात्री आहे की, आपल्या समाजातील अनेक प्रकारचे सामाजिक असंतोष-काही देशातील मोठाल्या कम्युनिस्ट पक्षाच्या अस्तित्वाप्रमाणे-मुख्यतः सुप्तपणे असले तरी वर्गीय स्तरीकरण आणि विषमता याविषयीची खरीखुरी आणि नैसर्गिक प्रतिक्रिया व्यक्त करीत असतात. आणि असूया, असंतोष आणि वैमनस्य यांच्याद्वारा प्रकट होणारे तणाव निर्माण होणे अपरिहार्य असते. एका विख्यात मनोविश्लेषणतज्ञाने म्हटल्याप्रमाणे केवळ संपत्तीच्या बाबतीतीलच नव्हे तर शिक्षण मनोरंजन, आरोग्याचे संवर्धन आणि संपादन इ. ची संधी उपलब्ध होण्याच्या बाबतातील सध्याची कमालीची विषमता सुप्त शत्रुत्वाने परिपूर्ण अशी परिस्थिती निर्माण करण्यास कारणीभूत होते. अर्थात सर्व बाबतींतील शत्रुत्वाची भावना संपूर्णपणे नष्ट करणे कधीच शक्य नसते. परंतु त्यापैकी ज्या भावना सामाजिक कारणामुळे उद्भवलेल्या असतात त्या सामाजिक उपायाने काही प्रमाणात तरी कमी करता येतात आणि अधिक समानता असावी या भूमिकेतील पहिला मुद्दा हाच आहे.

## ७. समता आणि सामाजिक न्याय

याबाबतचा दुसरा मुद्दा विशेषाधिकार आणि मोबदला यांचे न्याय्य वाटप कशाला म्हणावयाचे यावर आधारलेला असतो. त्यासंबंधीचा निकष सर्वस्वी नैतिक स्वरूपाचा असल्यामुळे त्याच्या खरेखोटेपणाचा किंवा तो मुद्दा सिद्ध होण्या न होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही; ज्याच्या त्याच्या नैतिक प्रवृत्तीनुसार हे वाटप न्याय्य आहे की नाही ते ठरणार. परंतु आज अस्तित्वांत असलेल्या विषमतेत सामाजिक न्यायाला बाध आणणाऱ्या चार बाबी असाव्यात असा माझा तर्क आहे. आणि त्यामुळे असंतोष निर्माण होतो की नाही हा प्रश्न येथे सर्वस्वी गैरलागू आहे.

पहिली गोष्ट अशी की प्रत्येक मुलाला नागरिक म्हणून जगण्याचा आणि स्वातंत्र्य उपभोगण्याचा व सौख्य प्राप्त करून घेण्याचाच केवळ नव्हे तर त्याच्या नैसर्गिक बुद्धिमत्तेनुसार सामाजिक दर्जा प्राप्त करून घेण्याचाही निसर्गतःच हक्क आहे. ही गोष्ट बहुतेक सर्व उदारमतवादी आता मान्य करतील असे मला वाटते. किंवा निराळ्या शब्दात सांगावयाचे तर संपत्ती, विकास आणि कीर्ती संपादन करण्याची प्रत्येकाला समान संधी असली पाहिजे. अर्थात् ही गोष्ट संपूर्णपणे साध्य होणे हे अशक्य कोटीतील ध्येय आहे. कारण बुद्धीमान पालकांच्या मुलांना सभोवतालच्या वातावरणाचा उघड उघड फायदा मिळतो. परंतु एवढी एक

बाब सोडल्यास समाज मनात आणील तर सर्व मुलांना निदानपक्षी सर्वोत्कृष्ट शिक्षण घेण्याची समान संधी नक्की उपलब्ध करून देता येईल.

ब्रिटनमध्ये आज ही संधी मिळू शकत नाही, कारण श्रीमंत वर्गातील लोक त्यांच्या मुलांइतकीच लायक असूनही आईबापांच्या बाबतीत मात्र दुर्दैवी असलेल्या मुलांना मिळू न शकणारा, पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण घेण्याचा सामाजिक विशेषाधिकार केवळ त्या शाळांची फी भरण्याची ऐपत असल्यामुळे आपल्या मुलांसाठी प्राप्त करून घेऊ शकतात. बाराव्या प्रकरणात या मुद्याचा विस्तृत परामर्ष घेण्यात आला आहे. याठिकाणी एवढेच नमूद करावयाचे आहे की, सर्वोत्कृष्ट पब्लिक स्कूलमध्ये चांगल्या दर्जाचे शिक्षणच नुसते मिळत नाही तर त्याच्या जोडीला शुद्ध वाणी, रीतभात आणि शुद्ध चारित्र्य हे महत्त्वाचे फायदेही त्या मुलांच्या पदरात पडतात. याचा पुढील व्यावसायिक जीवनात त्याला फार फायदा मिळतो कारण उत्पन्न, सत्ता आणि मानमरातब किंवा प्रतिष्ठा ही शेवटी व्यवसायावरच अवलंबून असते. परंतु या गोष्टींचे वाटप जवळ जवळ सर्वस्वी पालकांची संपत्ती आणि वर्गीय स्थान यांच्याशी निगडित असते. मुलांची बुद्धिमत्ता किंवा कर्तृत्व यांचा त्यात फारच थोडा भाग असतो. या परिस्थितीमुळे माझा स्वतःचा फायदा झाला असला तरी देखील मला यात असमर्थनीय असा अन्यायच दिसतो. समान संधीच्या तत्त्वाला त्यामुळे विलक्षण बाध येतो.

दुसरे असे की, संपत्तीच्या वाटपाबाबतही हाच मुद्दा लागू पडतो. समान तत्त्वावर संपत्तीचे वाटप करावयाचे असेल तर (जाणूनबुजून दानाच्या स्वरूपातील वाटपाचा अपवाद सोडून) एकतर ती संपत्ती निश्चित स्वरूपाच्या सेवेसाठी किंवा कामासाठी द्यावयाच्या स्वरूपातील असली पाहिजे आणि दुसरे म्हणजे ते काम करण्याची व त्यायोगे संपत्ती मिळविण्याची सर्वांना समान संधी असली पाहिजे. त्या परिस्थितीत मग स्वतःच्या अंगच्या गुणांमुळे जो राष्ट्रीय सुबत्तेत किंवा सौख्यात जास्तीत जास्त भर घालू शकेल त्याला जास्तीत जास्त मानधन मिळू शकेल. अर्थात ही गुणवत्ता कृत्रिमरित्या (म्हणजे बुद्धिमत्तेतील अंगभूत फरकापेक्षा निराळ्या कारणांमुळे प्राप्त होणाऱ्या) मूठभर शेलक्या लोकांकरिता राखून ठेवलेली असता कामा नये.

आताच उल्लेखिलेल्या शैक्षणिक बाबींमुळे ही शेवटची अट कामातून मिळणाऱ्या उत्पन्नाच्या बाबतीत संपूर्णपणे पुरी होऊ शकत नाही. आणि मालमत्तेमुळे मिळणाऱ्या उत्पन्नाच्या बाबतीत तर ती अगदी क्वचितच पुरी होऊ शकते. मालमत्तेचे एकूण उत्पन्न आर्थिक सेवेच्या बदल्यात मिळणाऱ्या किमान वस्तूंच्या पुरवठ्यासाठी लागणाऱ्या वस्तूंच्या संदर्भात समर्थनीय ठरते की नाही त्यासंबंधीची चर्चा पुढे एका प्रकरणात आली आहे. परंतु आपण तसे गृहीत धरले, तरी आणि मालमत्तेच्या उत्पन्नाची सर्वच्या सर्व रक्कम तातडीच्या गरजा भागविण्यासाठी

लागते असे मानले तरी दुसऱ्या निकषावर लावून पहाता त्याचे विभाजन खासच समर्थनीय ठरू शकत नाही. कारण सर्व नागरिकांना संपत्ती मिळविणाची समान संधी मिळू शकेल असा दावा कोणालाही करता येणार नाही आणि त्यामुळे भांडवलाचा पुरवठा करण्याची कामगिरी बजावल्याबद्दल जरूर तो मोबदला मिळण्याची ही सगळ्यांना सारखी संधी मिळणार नाही.

एखाद्या व्यक्तीच्या स्वतःच्या संचित शिलकीच्या संदर्भात बोलावयाचे तर सगळी खाजगी मालमत्ता केवळ स्वकष्टार्जित असली, म्हणजेच त्या व्यक्तीने ती स्वतःच्या प्रयत्नाने आणि त्यागमय जीवन जगून मिळविलेली असली, तरच असे म्हणता आले असते. परंतु वस्तुतः खाजगी मालमत्तेतील बराचसा भाग हा वारसाहक्काने मिळालेला असतो आणि त्याच्या विभाजनाचा संबंध ती संपत्ती धारण करणाऱ्याच्या पूर्वीच्या किंवा आताच्या कर्तृत्वापेक्षा त्याच्या जन्मासंबंधीच्या योगायोगाशीच असतो आणि भरीला पुढे दाखवून दिल्याप्रमाणे त्या विभाजनातही फार विषमता असते. त्यामुळे मूठभर श्रीमंतांचा वरिष्ठ वर्ग अनुत्पादित उत्पन्नाचा सारा ओघ अडवून बसलेला असतो.

विषमतेची ही बाजू निश्चितच अन्यायजनक आहे. उत्पन्नाची अधिक साधने आणि भांडवली नफा मिळण्याची किंवा भांडवलांतून खर्च करण्याची संधी येवढेच नव्हे तर त्याच्या जोडीला सुरक्षितता आणि धोका पत्करण्याचे स्वातंत्र्य यासारखे प्रचंड फायदे भाग्यवान वारसांच्या विशिष्ट गटाला त्यामुळे प्राप्त होतात आणि अंगी स्वतःचे कर्तृत्व नसतांना; त्याचप्रमाणे त्याबद्दल कसलीही जबाबदारी स्वीकारावी न लागता हे फायदे त्यांना उपभोगावयास मिळतात. खाजगी भांडवलामुळे चांगले शिक्षण घेता येते त्याचप्रमाणे काही मोक्याचे सामाजिक फायदेही खाजगी भांडवलामुळे मिळू शकतात व त्यामुळे केवळ गुणवत्तेवरून मिळू शकले असते त्यापेक्षा उच्च व्यवसाय आणि कामाबद्दल मिळणारे उत्पन्न यांचाही लाभ होऊ शकतो व अशा तऱ्हेने हा अन्याय अधिकाधिक वाढत जातो.

तिसरा मुद्दा असा की, विषमता जितकी जास्त, तितके सत्तेचे केंद्रीकरणही जास्त. एखाद्या व्यक्तीने किंवा लहानशा गटाने इतर व्यक्तींच्या जीवनावर आणि भवितव्यावर बेजबाबदारपणे सत्ता गाजवावी याबद्दल उदारमतवादी आणि समाजवादी नेहमीच नापसंती दाखवीत आले आहेत. अशा तऱ्हेची निरंकुश सत्ता उपभोगण्याचा कोणाला कसलाही नैतिक अधिकार पोहोचत नाही. तिचा दुरुपयोग करण्याचा मोह अनावर असतो आणि कोठल्याही एका वरिष्ठ व्यक्तीच्या लहरीपुढे मान तुकवणे हे प्रौढ माणसांना केव्हाही अपमानास्पद आणि तिरस्करणीय वाटते. परंतु समाजात तीव्र स्वरूपाची सामाजिक विषमता असेल तर त्यातून अशा तऱ्हेची सत्तेच्या बाबतीतील लोकशाहीला मारक ठरणारी विषमता निर्माण होते. (अर्थात इतर कारणांमुळेही ती निर्माण होऊ शकेल.) खेड्यातील अनेक झोपड्यांवर

किंबहुना सबंध खेड्यावर देखील मालकी असलेल्या मोठमोठ्या खाजगी जमीन-दारांच्या हाती त्या भागातील नोकरीधंद्याची सूत्रे असतात आणि कोणाची कोठे वर्णी लावावयाची तेही त्यांच्या हातात असते. म्हणजेच केवळ संपत्तीचे अतोनात केंद्रीकरण अशा तऱ्हेच्या विषमतेला कारणीभूत ठरते. परंतु अलिकडे सत्तेची अधिकारशाही निर्माण होते ती खाजगी मालसत्ता किंवा पैशाच्या स्वरूपातील संपत्ती यापेक्षादेखील नोकरशाही उतरंडीतील विशिष्ट स्थानामुळे. खाजगी आणि सार्वजनिक क्षेत्रातील सर्वात उच्च पदस्थ प्रशासकीय अधिकाऱ्यांच्या हाती अद्यापही भरमसाठ सत्ता असल्याचे आढळून येते. विशेषत: अशा अधिकाऱ्यांच्या हाती असलेली अप्रत्यक्ष सत्ता किंवा त्यांच्या लगेचच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांची 'समोरासमोरची' सत्ता याबाबतीत तर हे प्रकर्षाने आढळून येते. अर्थात दोन युद्धांच्या दरम्यानच्या काळात तिचे प्रमाण पुष्कळच कमी झाले आहे. हे प्रमाण आणखी खाली आले आणि त्या प्रमाणात उत्पादनाच्या पातळीवर कामगारांच्या हाती असलेल्या सत्तेत वाढ झाली तर सामाजिक न्यायात सुधारणा घडून येईल अशी माझी खात्री आहे.

चौथा मुद्दा श्रमाच्या मोबदल्यांचा. काही प्रमाणात तरी विषमता आवश्यक ठरते हे कोणतीही समाजवादी (शॉचा अपवाद वगळता. पण त्याची सुद्धा याबाबतीतील मते उत्तर आयुष्यात कायम राहिली नव्हती.) नाकारीत नाही कारण श्रेष्ठ बुद्धिमत्ता असेल तर कर्तृत्वाच्या बाबतीत थोडीफार कूस ही द्यावीच लागते त्याच-प्रमाणे सगळ्यांना सारखा मोबदला द्यावयवाचा म्हटले तर काही विशिष्ट प्रकारची कामे करायला, धोका पत्करायला किंवा त्रासदायक जबाबदारी स्वीकारायला कोणी पुढेच येणार नाही. त्यामुळे कलावंत, कोळशाच्या खाणीत काम करणारा कामगार, नव्याने धंदा सुरू करणारे कारखानदार आणि वरिष्ठ प्रशासक यांना भेदजन्य जादा मोबदला दिला गेला पाहिजे. श्रमाबद्दल मिळणाऱ्या मोबदल्याचे सध्याचे स्वरूप—मग ते तात्त्विक (म्हणजे वरपासून खालपर्यंत असलेल्या एकूण विस्ताराच्या बाबतीत) असो किंवा व्यावहारिक (म्हणजे योग्य माणसांनाच कमी किंवा जास्त उत्पन्न मिळ-ण्याच्या बाबतीत) असो समर्थनीय कसे ठरते ते वरील विवेचनावरून स्पष्ट होत नाही.

व्यवहारात तरी निदान ते समर्थनीय ठरत नाही. स्वकष्टार्जित उत्पन्नाच्या वरच्या गटात मोडणाऱ्यांपैकी काही लोक तरी निश्चित असे असतात की, ज्यांना ते स्थान काहीसे सहजासहजी मिळालेले असते; त्यासाठी लागणारे गुण त्यांच्या अंगी असतातच असे नाही. व्यापक प्रमाणावरील खाजगी उद्योगधंद्यात मात्र सर्वसाधा-रणपणे अशी परिस्थिती असत नाही आणि सार्वजनिक क्षेत्रातील उद्योगधंद्यात तर अर्थात नाहीच नाही. खाजगी क्षेत्रातील लघुउद्योगात मात्र असे प्रकार घडतात कारण तेथील वशिलेबाजी अद्याप नष्ट झालेली नाही. नागरी भागातील संस्थात अद्यापही मोठमोठ्या फायद्याच्या जागांवर अर्थविषयक बाबतीतील विशेष ज्ञान अजिबात नसलेल्या आणि कसलेही महत्त्व नसलेल्या परंतु सरकारी किताब

धारण करणाऱ्या सैन्यातील आणि नाविक दलातील अधिकाऱ्यांच्या नेमणुका होतात तर खालच्या जागा मात्र जरूर ते कॉलेज शिक्षण झालेल्या उच्च कुळातील मुलांची तपासणी घेऊन त्यांच्यातून भरल्या जातात त्यामुळे वरील संस्थातून ही परिस्थिती बऱ्याच प्रमाणात विद्यमान आहे. जोपर्यंत ही परिस्थिती कायम आहे तोपर्यंत कामाचा मोबदला देण्याची पद्धत अन्याय्य आहे असे म्हणणेच रास्त ठरेल कारण या पद्धतीनुसार सर्वोच्च मोबदल्याच्या जागी काही जागा हस्तगत करण्याची समान संधी सर्वांना मिळूच शकत नाही.

परंतु असे घडत नाही आणि निरनिराळ्या उत्पन्नाच्या पदावर अगदी लायकीनुसार नेमणुका होतात असे गृहीत धरले तरी देखील आज उत्पन्नाच्या बाबतीत जी इतकी विभागणी झालेली दिसते ती न्याय्य म्हणता येईल का ? आर्थिक कार्यक्षमतेच्या दृष्टीने पाहिले तर काही भेदजन्य मोबदला हा वस्तुतः अत्यंत संकुचित असतो हे अगदी उघड आहे. परतु याला सर्वसाधारणपणे हा भेदाभेद 'हॉरिझाँट्ल्' म्हणजे विशिष्ट धंद्यातील किंवा व्यापक उत्पन्न गटातील असतो असे म्हणता येईल. अशा तऱ्हेने खाण कामगार आणि इतर पगारदार कुशल आणि अकुशल कामगार, फोरमन आणि मुकादमीचे काम न करणारे कामगार, पदवीधर आणि बिगर पदवीधर शिक्षक, कमी जास्त कार्यक्षमता असलेले व्यापारी यांच्यात मोठ्या प्रमाणावर भेदाभेद करणे आपल्याला आवश्यक वाटत असावे.

उत्पन्नाची ऊर्ध्व (व्हर्टिकल) विभागणी मला संशयास्पद वाटते. त्यात दोन बाबतीत अनिश्चितता संभवते. एक म्हणजे कर्तृत्वासाठी किती वाढवा (rent) द्यावयाचा ही कल्पना अगदीच संदिग्ध राहते. (अर्थात शॉच्या वैशिष्ट्यपूर्ण व्याख्येप्रमाणे सर्वसाधारण मूर्खपणाच्यावर जितक्या प्रमाणात अक्कल जास्त असेल तितक्या प्रमाणात हा वाढवा दिला जावा.) हा वाढवा बिगरआर्थिक, प्रमाणक (normative) कल्पनेवर आधारलेला असून समाजाला व्यक्तीच्या कर्तृत्वाचा फायदा करून घेण्यासाठी खर्च कराव्या लागणाऱ्या पैशाच्या स्वरूपात तो ठरवला जात नाही तर समाजाच्या दृष्टीने (या ना त्या स्वरूपात) व्यक्तीला जे महत्त्व असते त्या आधारावर तो निश्चित होत असतो. परंतु याबाबतीत जर हा एकमेव निकष ठरविण्यात आला (अर्थात तसा तो कधीच ठरविला जात नाही कारण कवी किंवा तत्वज्ञ यांच्यापेक्षा मोटारींची नवी नवी मॉडेल्स बनवणारे किंवा सिनेमानट यांच्यासारख्या समाजात खूप मागणी असणारांनाच व्यवहारात असा वाढवा मिळू शकतो) तर समतेत भर पडण्याऐवजी उलट काही प्रमाणात विषमताच निर्माण होईल व साहजिकच सर्वजण त्याला विरोध दर्शवतील. याचे कारण असे की, आधुनिक समाजात पैशाच्या स्वरूपात दिल्या जाणाऱ्या मोबदल्यात जितकी विविधता आढळते त्यापेक्षा माणसाच्या गुणवत्तेत आणि संशोधकतेत कितीतरी अधिक विविधता असल्याचे प्रत्ययास येते. एखादा स्टीव्हन्सन, फॅरेड, फोर्ड, रूदरफोर्ड किंवा फ्लेमिंग यांचे भावी

काळातील राहणीमान किंवा रोगांचे निर्मूलन यादृष्टीने जे महत्त्व आहे ते आपल्या-सारख्या सर्वसामान्य माणसापेक्षा केवळ वीस पटीने नव्हे तर सहस्त्र पटीने जास्त असते.

परंतु (गुणवत्ता अनुवांशिक असते असे गृहीत धरून) व्यक्तीच्या अनुवांशिक गुणवत्तेसाठी इतक्या व्यापक प्रमाणावर जादा मोबदला देणे किंवा तो न देऊन शासन करणे न्याय्य आणि शहाणपणाचे ठरणार नाही या कारणास्तव समाजाला वाटणारे ' महत्त्व ' हा योग्य निकष ठरत नाही अशा निर्णयाप्रत आलो तर गुणवत्तेसाठी दिला जाणारा वाढवा ही एक आर्थिक कल्पना ठरते. म्हणजेच असाधारण कर्तृत्वाबद्दल व्यवहारात समाजाकडून जादा मोबदला मिळावा अशी अपेक्षा केली जाते.

हा जादा मोबदला किती असावा ते ठोकळमानाने नमूद करणे अर्थातच अशक्य आहे. समतेवर जर आपला विश्वास असेल तर आपल्याला इतकेच म्हणता येईल की विशेष कर्तृत्वाबद्दल जादा मोबदला दिल्यामुळे होणारा संभाव्य फायदा आणि समतेत येणारी संभाव्य उणीव यात समतोल राखला गेला पाहिजे. निर-निराळ्या पायऱ्यावरील विशेष कर्तृत्व प्राप्त करून घेण्यासाठी जी किंमत द्यावी लागेल त्यावर हा समतोल अवलंबून राहील. यावरून अद्यापपर्यंत आपल्याला ज्याची विशेष कल्पना आलेली नाही त्या प्रोत्साहकतेसंबंधीचा प्रश्न उपस्थित होतो. परंतु अशी एक धोक्याची अवस्था निश्चितच असणार की जेथे हे जादा कर्तृत्व (त्याचप्रमाणे प्रयत्न करणे, धोका पत्करणे इ.) प्राप्त करून घेताना समतेवर आणि त्यामुळे आर्थिक विकासावरही खरोखरीच फार गंभीर परिणाम घडून येऊ शकतात. ही अवस्था नेमकी केव्हा सुरू होते ते कोणालाच सांगता येणार नाही. परंतु आपण ती अवस्था अद्यापपर्यंत गाठली आहे असे मला स्वतःला वाटत नाही. यासंबंधी सविस्तर चर्चा पुढे येणार आहे. परंतु कर भरल्यानंतरच्या उत्पन्नात २० : १ इतकी तफावत ठेवणे प्रोत्साहक म्हणून आवश्यक आहे असे मला वाटत नाही. त्यामुळे निव्वळ उत्पन्न एकूण उत्पन्नावर लक्ष केंद्रित केले जावे, अगदी काठावरच्या उत्पन्नावरील करात वाढ करण्याचे सोडून द्यावे आणि सर्वाधिक उत्पन्नाला हात घालण्याऐवजी सर्वात कमी असलेले उत्पन्न वाढविण्यावर भर द्यावा आणि अशा तऱ्हेने हळूहळू प्रगती करीत जावे आणि एकेक पाऊल उचलल्यानंतर काही काळ थांबून आर्थिक व्यवहारावर त्याचे काय परिणाम घडून येतात ते अजमावून पुढील पाऊल टाकावे असे माझे मत आहे.

परंतु कामापासून मिळणाऱ्या उत्पन्नाचे पुनर्घटन करणे हे मजूर सरकारपुढील विशेष तातडीचे काम आहे असे मला वाटत नाही. कारण एक तर, वर उल्लेखि-लेल्या तीन प्रकारच्या उत्पन्नांच्या मानाने हे उत्पन्न निश्चितच फार कमी अन्याय्य असते आणि दुसरे असे की, त्याबाबत घेण्यात येणारा निर्णय हा उत्पन्न किंवा

संपत्ती यांचा एकूण विचार करून घेण्यात आलेला नसतो. सरटॅक्सपासून मिळणारे सुमारे ४० % उत्पन्न हे कामाच्या उत्पन्नामधून मिळालेले नसते तर ते मालमत्तेपासून मिळालेले असते, आणि एकूण उत्पन्नात जसजशी वाढ होत जाते तसतसे मालमत्तेचे फेरवाटप करण्यात आले तर त्यामुळे संपत्तीतील विषमता फार मोठ्या प्रमाणांत कमी होईल आणि वारसाहक्काने मिळालेल्या अफाट संपत्तीमुळे मिळणारे सामाजिक आणि शैक्षणिक भेदजन्य फायदे कमी होऊ लागल्याने कामापासून मिळणाऱ्या उत्पन्नाच्या स्वरूपात अप्रत्यक्षपणे फरक पडू लागेल.

ते कसेही असले तरी कामाच्या मोबदल्यातील विषमता ही प्रत्यक्ष पैशाच्या स्वरूपांत मिळणाऱ्या मेहनतान्यामुळे प्राप्त होणाऱ्या कांही परंपरागत फायद्यांच्या मानाने त्याचे वाटप केले असता निर्माण होणारी कामाच्या मोबदल्यांतील विषमता कमी असते. अशा तऱ्हेने औद्योगिक क्षेत्रांतील बिगर आर्थिक भेदाभेदाची बाब प्रोत्साहनाच्या कारणास्तव समर्थनीय ठरू शकत असली तरी त्यापेक्षा ती कितीतरी अधिक गंभीर स्वरूप धारण करते. उदा. सुट्या, आजारीपणाची रजा, कामाचे तास आणि अनेकदा निवृत्तीचे वय.

केवळ सामाजिक सेवांवर अवलंबून असलेल्या गरीब वर्गातील लोकांपेक्षा श्रीमंत वर्गातील लोक नोकरीच्या अटी किंवा त्यांना करांत मिळणारी सूट यामुळे मोठ्या कुटुंबाच्या पालनपोषणाची जबाबदारी, आजारीपण आणि म्हातारपण यासारख्या आर्थिक समस्यांना अधिक चांगल्या प्रकारे तोंड देऊ शकतात ही सातव्या प्रकरणांत उहापोह करण्यात आलेल्या व्यापक विशेषमतेची केवळ एक बाजू झाली. समाजांतील सगळेच्या सगळे स्त्री पुरुष अविवाहित आहेत अशी कल्पना करून त्या गृहीत कृत्यावर आधारून सध्याचे ऊर्ध्व ( व्हर्टिकल ) वाटप एकवेळ समर्थनीय ठरले तरी देखील निरनिराळ्या कुटुंबाच्या गरजांतील तीव्र तफावत लक्षात घेता गरजेच्या काळांत एकूण उत्पादनाचे वाटप फारसे समर्थनीय ठरू शकणार नाही. म्हातारे, आजारी आणि मोठाल्या कुटुंबांची जबाबदारी असणाऱ्यांत करावयाच्या साधनसामुग्रीच्या वाटपांतील ऊर्ध्व ( व्हर्टिकल ) विषमता हा निश्चितच सामाजिक अन्याय आहे असे माझे ठाम मत आहे.

## ८. समता आणि सामाजिक नासधूस

तीव्र सामाजिक विषमतेविरुद्ध असलेला तिसरा आक्षेप म्हणजे त्यामुळे येणारी अकार्यक्षमता आणि नासधूस. ब्रिटनमधल्याप्रमाणे, वर्ग निश्चित करणाऱ्या गमकांमुळे समाजाला तीव्र छेद जात असला आणि अनिर्बंध सामाजिक अभिसरणाला त्यामुळे अटकाव होत असला ( मुख्यतः शिक्षणपद्धतीमुळे समाजात पडणाऱ्या अलग अलग थरांमुळे ) तर त्यामुळे दोन अनिष्ट परिणाम घडून येतात.

एक तर समाजांतील निरनिराळ्या वर्गांतील रीतीभाती आणि वागण्याची

तऱ्हा यांतील बाह्य तफावत त्याचप्रमाणे त्या त्या वर्गाची कल्पनागत अस्मिता यामुळे वर्गावर्गांतील सामाजिक अभिसरणांत फार मोठे अडथळे निर्माण होतात. अमेरिका किंवा स्वीडनमधील समाजांतील अत्यंत आकर्षक वाटणारी कोणती एकादी गोष्ट असेल तर ती म्हणजे तेथील असाधारण सामाजिक स्वातंत्र्य, मुक्त आणि अनौपचारिक वातावरण, एकमेकाशी सहजासहजी येणारे संबंध, समतेची सहजप्रवृत्ती, मानापानाच्या भावनेचा संपूर्ण अभाव, त्याचप्रमाणे काही प्रमाणांत तरी शिष्टपणाला मिळणारा फाटा आणि विशिष्ट सामाजिक दृष्टीकोणाला जबाबदार असलेली जी आग्रही वर्गभावना ब्रिटनमध्ये आढळते तिचा या समाजांतून होत असलेला लोप ही होय. इंग्लंडमधल्या यच्चयावत सर्वांनी एकदम एकमेकांना "वडे" म्हणून संबोधायला सुरुवात करावी किंवा ज्या अखडूपणासाठी ते विख्यात आहेत ते त्यांचे राष्ट्रीय वैशिष्टय त्यांनी अजिबात सोडून द्यावे असे कोणीच म्हणणार नाही. परंतु ते आजच्यापेक्षां जास्त मोकळेपणाने आणि फारसे आढेवढे न घेता एकमेकांत थोडे अधिक मिसळले तरी पुष्कळ झाले. तसेच एकंदरीने आपली समाजपद्धती इतकी विभागलेली नसती तर बरे झाले असते. अर्थात ही ज्याच्या त्याच्या व्यक्तिगत आवडीनिवडीची आणि विशिष्ट प्रवृत्तीची बाब झाली. जरा जास्त भिडस्त आणि आढ्यताखोर असलेल्या इंग्रजांना इतके सरमिसळीचे, समतापूर्ण आणि अनौपचारिक स्वरूपाचे समाजजीवन कदाचित आवडणारही नाही.

तथापी ब्रिटनमधील वर्गीय पद्धतीमुळे सामाजिक नासधूसही निश्चितपणे घडून येते कारण त्या समाजातील आपल्या नेत्यांची निवड करण्याची पद्धत अगदी चुकीची आहे. सामाजिक अभिसरण फारसे होत नसेल, आणि निरनिराळ्या स्तरात विभागलेल्या समाजात तसे ते होत नाहीच, आणि कनिष्ठ किंवा मध्यम श्रेणीतील लोकांना सहजासहजी वरच्या श्रेणीपर्यंत पोहोचता येत नसेल तर सत्तास्थानी असलेले मूठभर लोक ती सत्ता वंशपरंपरा आणि कायमची बळकावून बसतात; आणि अनुवांशिक किंवा घराण्याच्या गुणवत्तेसाठी कितीही कसर द्यावयाची म्हटले तरी त्यामुळे लोकांची बुद्धिमत्ता निष्कारण वाया दवडली जाते.

पूर्वीपेक्षा वरच्या पदावर जाण्याची संधी आता अधिक प्रमाणावर उपलब्ध आहे हे खरे आणि एखादा असामान्य कर्तृत्वाचा कामगारवर्गातील मुलगा प्रयत्नांती सर्वोच्च पदीही पोहोचू शकेल. परंतु अगदी साध्या कार्यक्षमतेच्या भूमिकेवरून पाहिले तर येवढ्याने ते भागण्यासारखे नाही. आपल्या अत्यंत गुंतागुंतीच्या आणि धंदेवाईक उद्योगप्रधान समाजात कुशाग्र बुद्धीची चारदोन माणसे शोधून काढणे एवढीच काही नेतृत्वासंबंधीची समस्या नाही. कारण अशा माणसांपेक्षा भरावयाच्या जबाबदारीच्या वरच्या जागा कितीतरी जास्त आहेत. आपल्याजवळची सर्वच्यासर्व 'क्ष' मूर्तींचे अगदी योग्य प्रकारे वाटप केले म्हणजे झाले असे म्हणून चालणार नाही तर त्याचबरोबर आपल्याजवळच्या सर्व 'य' साधनसामुग्रीचा जास्तीत जास्त

उपयोगही करून घेता आला पाहिजे. आणि वस्तुस्थिती अशी आहे की, आपल्या-जवळच्या मूर्ती तर अजिबात समाधानकारक नाहीत. कामगारवर्गातील हुषार मुलांना अद्यापही पब्लिक स्कूलमधून प्रवेश मिळू शकत नाही आणि बुद्धीने कमी परंतु जी पुढे उपयुक्त ठरू शकतील अशा मुलांना तर ग्रामर स्कूलमध्ये तरी प्रवेश मिळेल की नाही याची ही वानवाच असते. नैसर्गिक बुद्धिमत्ता आणि मिळू शकणारे शिक्षण यात कसलाही मेळ नाही. शिवाय वर म्हटल्याप्रमाणे वडलोपार्जित मालमत्ता, वशिले-बाजी आणि वर्गीय पक्षपात या सर्वांमुळे सर्वोच्च जागांसाठी केवळ गुणवत्तेवर होणाऱ्या खुल्या आणि परिणामकारक स्पर्धेला बाध येतो.

यावरून हे ओघानेच दिसून येते की, अद्यापही आपण आपल्या समाजातील सर्वोत्तम व्यक्ती उचलून घेत नाही किंवा आधीच तुटपुंजा असलेला मानवी कर्तृत्वाचा सर्वंकष उपयोग करून घेत नाही. ही निश्चितच सामाजिक नासधूस म्हटली पाहिजे. ऊर्ध्व ( व्हर्टिकल ) अभिसरणाच्या मार्गात अडचणी निर्माण करून खरी-खुरी समानसंधी मिळणे अशक्य करून टाकणाऱ्या साचेबंद सामाजिक पद्धतीचाच तो परिपाक आहे.

## २. समतेचे प्रमाण किती ?

समतेच्या बाबतीत किती मजल मारण्याचा आपला इरादा आहे ? माझ्या दृष्टीने हा प्रश्न योग्यही नाही किंवा प्रसंगोचितही नाही. त्यामुळे त्याला समर्पक उत्तर देता येणे शक्य नाही किंवा तसा प्रयत्न करण्यातही काही अर्थ नाही. सध्या अस्तित्वात असलेल्या समतेपेक्षा अधिक समता असणे आवश्यक आहे अशी माझी समजूत असून त्याची कारणे यापूर्वीच्या प्रकरणांतून येऊन गेलेलीच आहेत. त्यामुळे याठिकाणी प्रगतीच्या पुढील टप्प्यांचे दिग्दर्शन करणे शक्य असले तरी याबाबतचे अंतिम उद्दिष्ट मात्र अनिश्चितच राहणार.

एखाद्या आदर्श समाजाची कल्पना करून त्याचे आराखडे निश्चित करून ठेवणे आणि विशिष्ट स्वरूपाच्या काही सुधारणा घडून आल्याबरोबर त्या आरा-खड्यानुसार तसा आदर्श समाज निर्माण करणे शक्य आहे अशी थिल्लर विचार-सरणी बाळगणारेच काय ते समतेच्या बाबतीतील अंतिम उद्दिष्ट ठामपणे सांगू शकतील. भांडवलशाहीचा विनाश ओढवणार असल्याच्या क्रांतीकारी सिद्धांतातूनच ' एक दिवस आपण झोपेतून उठून पाहू तो ' समाजवाद ' या नावाची चीज अवतर-लेली असेल ' अशा तऱ्हेचा भविष्यवादी दृष्टीकोण पुढे येतो. परंतु पाश्चात्य समा-जातील स्थित्यंतर उत्क्रांती तत्त्वानुसार हळूहळू घडून येत असते. दर वेळी त्याची अगोदर चाहूल लागते किंवा राजकीय दृष्ट्या ते काबूत असतेच असेही नाही. एखाद्या आदर्श समाजाचा आराखडा निश्चित करून तसा समाज भविष्यकाळात विशिष्ट दिवशी साकार होईल अशी कल्पना करून घेणे जितके निरर्थक तितकेच

धोकादायकही ठरेल. ब्रिटनसारख्या देशात एखादी विशिष्ट समाजपद्धती परिणतावस्थेत पोहोचल्यानंतर तिच्या जागी दुसरी समाजपद्धती एकदम सुरू होते असे घडत नाही उलट समाजपद्धतीत एकसारखे स्थित्यंतर चालूच असते.

शिवाय पाचव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे, समाजवाद म्हणजे काही एखाद्या महात्म्याला स्फुरणारी समाजाची भूतकालीन आणि विद्यमान सामाजिक रचना नाही की जिचे नेमके किंवा यथार्थ वर्णन करून सांगता येईल किंवा अनुभवजन्य निरीक्षण किंवा विश्लेषण करता येईल. समाजव्यवस्थेत समाजवाद्यांना अभिप्रेत असलेली काही मूल्ये, किंवा आकांक्षा समाजवादाच्या कल्पनेतून व्यक्त होतात असे फार तर म्हणता येईल. म्हणून विशिष्ट क्षणी समाजात ही मूल्ये पुरेशा प्रमाणात समाविष्ट झालेली आहेत किंवा झालेली नाहीत आणि तशी ती झालेली नसतील तर समाजात आणखी स्थित्यंतर घडून येणे आवश्यक आहे इतकेच काय ते म्हणता येईल. त्यापलिकडे जाण्याचा प्रयत्न करण्यात अर्थ नाही. परंतु ही मूल्ये समाजात पुरेशी रुजली आहेत हे दाखविण्यासाठी समता नेमकी किती प्रमाणात असणे आवश्यक आहे ते बहुधा सांगता येणार नाही. जसजशी परिस्थिती उद्भवत जाईल तसतसे आपल्याला यासंबंधात नव्याने मूल्यमापन करावे लागेल.

अशा तऱ्हेने आपल्याला समाजवादाच्या उद्दिष्टांसंबंधी अगदी ढोबळ स्वरूपाची विधाने करता येणे शक्य आहे. आपली आजची शिक्षण पद्धती, मालमत्तेचे आणि जरूरीच्या काळात साधनसामुग्रीचे वाटप, सामाजिक रीतीभाती आणि जीवनपद्धती तसेच उद्योगधंद्यातील सत्ताकेंद्र यात समतेला अनुकूल असे फार मोठे स्थित्यंतर घडून येणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे कामापासून मिळणाऱ्या उत्पन्नातही, कमी प्रमाणावर असले तरी, काही निश्चित बदल घडून यावयास हवेत असे माझे निश्चित मत आहे. हे सर्व बदल जमेस धरले तर त्यामुळे बरीच मोठी सामाजिक क्रांती घडून येईल असे मला वाटते.

याच्या उलट माझी अशी खात्री आहे की, आपल्याला अभिप्रेत असलेल्या समतेलाही एक निश्चित मर्यादा आहे. उत्पन्नाच्या बाबतीत संपूर्ण समानता आपल्याला अभिप्रेत नाही कारण जादा जबाबदारी किंवा असाधारण बुद्धिमत्ता यांच्यासाठी भेदजन्य मोबदला द्यावाच लागतो. आपले विरोधक काही वेळा मूर्खपणाने सूचित करतात त्याप्रमाणे हजारावर वार्षिक उत्पन्न असणाऱ्या एखाद्या म्हाताऱ्या बाईचे बोर्नमाउथ सारख्या भागात एखादे स्वतंत्र आणि नेहमीच्या धकाधकीपासून अलिप्त असे निवासस्थान असावयाला आपला विरोध असतो असे नाही. मला स्वत:ला सगळ्याच्या सगळ्या खाजगी शिक्षणसंस्था बंद करून टाकाव्यात किंवा स्कँडेनेव्हियन राष्ट्राप्रमाणे आपल्या पंतप्रधानाला सरकारी गाडी पुरविण्यात येऊ नये, राणीने सायकलवरून जावे यावे, हाऊस ऑफ लॉर्डस ताबडतोब बरखास्त

करून टाकावे, रोल्स राईस मोटारींच्या उत्पादनाला बंदी करावी, असे काहीही वाटत नाही. त्यामुळे जीवनात येणारी नीरसता मला नको आहे.

परंतु आपल्या समाजवादाच्या मार्गावरील अखेरचा टप्पा गांठण्यापूर्वी आपण कोठे मुक्काम करावा ते मात्र मी सांगू शकत नाही. यापूर्वी नमूद केलेले बदल घडून आले तर आपल्या समाजाचे स्वरूप पार बदलून जाईल आणि मग त्यावेळी माझ्यापेक्षा तरुण पिढीला समाजवादासंबंधी नव्याने विचार करून त्याबाबत नवी घोषणा करावी लागेल.



## प्रकरण दहावे

# समान संधी पुरी पडेल का ?

### १. समान संधी असलेल्या समाज पद्धतीवरील पारंपारिक आक्षेप

काही जहाल मतवादी लोकांचे मात्र समान संधीच्या अत्यंत मर्यादित उद्दिष्टाने समाधान होऊ शकते. त्यांचे प्रतिपादन असे असते की, सर्वोच्चपदी पोहोचण्याची सर्वांना समान संधी मिळणार असली आणि प्रत्येक कामगार कार्यकारी संचालकाचे कागदपत्र आपल्या पिशवीत बाळगत असला, म्हणजेच कधी ना कधी तो त्या पदावर विराजमान होण्याची शक्यता असली तर मग त्या पदावर पोहोचावयाला किती वेळ लागतो याची किंवा मेहनतान्याच्या वाटपातील विद्यमान विषमतेची चिंता हवी कशाला ? महत्त्वाची गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे प्रत्येक नागरिकाला समान संधी उपलब्ध असली पाहिजे—तो त्याचा मूलभूत लोकशाही हक्क आहे—परंतु सुरुवात योग्य तऱ्हेने होत असेल तर मग प्रत्येकाला स्वतःची प्रगती करून घेण्यात पुरेसा वाव असला म्हणजे झाले. तसे असेल तर लहान मोठ्या दर्जाची लांबच लांब शिडी असली (उदा. उत्पन्न किंवा विनिमय करण्याचे निरनिराळे प्रकार) इतकेच नव्हे तर सुस्पष्ट अशी वर्गीय विभागणी (उदा. अलग शिक्षण पद्धती) असली तरी त्यात काही गैर नाही कारण सर्वोच्च दर्जा किंवा अत्युच्च पद मिळविण्याची संधी सर्वांना खरोखरीच समान असणार. त्यामुळे वस्तुतः या शिडीच्या खालपासून वरपर्यंत सतत हालचाल होत राहील व त्यायोगे अपरिहार्यपणे समाजही अधिक गतिशील बनून वर्गावर्गाच्या बंधनाने कमी जखडला जाईल.

आधुनिक टोरी जहालवादाचे तत्वज्ञान वरील विचारसरणीत सामावलेले आहे असा हुजूर पक्षीयांना दावा करावासा वाटतो. (युद्धपूर्व काळातील भांडवलशाही पद्धतीत समान संधीचा अभाव हा सर्वस्वी असमर्थनीय असा अन्याय आहे असे

मानणाऱ्या डाव्या गटाचाही या विचारसरणीला पाठिंबा असतो.) आणि ही शिडीची कल्पना हा ब्रिटिश टोरी पक्षांतील पुरोगामी मंडळींनी उभा केलेला तत्वप्रणालीचा आभास होऊन बसला आहे. ऑस्ट्रेलिया, कॅनडा किंवा त्यापेक्षाही अमेरिकेन समाजात ही कल्पना जवळजवळ पूर्णत्वाने साकार झालेली असल्याने तो समाज त्यांना आदर्श असल्याचा भास होतो.

'आभास' हा शब्द मी जाणूनबुजून वापरला आहे. कारण अशा प्रकारच्या समाजाशी बहुसंख्य हुजूर पक्षीयांच्या पुढे असलेल्या खऱ्याखुऱ्या आदर्शाच्या कोठल्याही प्रकाराशी साम्य आहे असे मी मानीत नाही. उद्योगधंद्यात संपूर्णपणे मुक्त आणि स्पर्धात्मक प्रवेश, सर्व प्रकारची वशिलेबाजी आणि पक्षपात यांचे उच्चाटन, वडिलो-पार्जित हक्कांना संपूर्ण कात्री लावता आली नाही तरी बऱ्याच प्रमाणात ते कमी करणे, पब्लिक स्कूलमधील फी रद्द करणे, आणि सर्वसाधारणपणे समाजातून वडिलोपार्जित विशेषाधिकारांची हकालपट्टी या बाबी त्या आदर्शात अर्थातच अभिप्रेत असतात. आता या प्रत्येक बाबतीत हुजूरपक्षाचे धोरण काय आहे आणि ब्रिटिश जीवनाच्या अत्यंत परंपरावादी आणि वाडवडिलांपासून चालत आलेल्या वैशिष्ट्यांशी हुजूरपक्ष भावनिकदृष्ट्या किती निगडित आहे ते पडताळून पाहण्यासारखे आहे.

अमेरिकेच्या धर्तीचा गतिशील आणि समान संधी असलेला समाज ब्रिटन-मधील हुजूरपक्षीयांना खरोखरीच हवा आहे हाच मुळात एक संपूर्ण भ्रम आहे. आपण सुधारक आहोत असे म्हणवून घेण्यासाठी आणि आपल्या पक्षांजवळही काही धाडस आणि उपक्रमशीलता आहे असे भासविण्यासाठी ते भले तसे म्हणोत. मात्र ते ज्यावेळी अमेरिकेचे गुणगान गातात त्यावेळी वस्तुतः ते अनिर्बंध अर्थव्यवहार आणि भांडवलशाही यांचीच भलामण करीत असतात. परंतु असा समाज निर्माण करण्यासाठी ज्या दूरगामी सुधारणा घडवून आणावयास पाहिजेत त्याचे तर त्यांना अजिबात वावडे आहे, आणि सध्याच्या अमेरिकेतील समता-वादी तत्वप्रणालीपेक्षा त्यांची खरी तत्वप्रणाली सर्वस्वी भिन्न आहे हे ध्यानांत येण्यास क्षणाचाही विलंब लागणार नाही. डाव्या गटाला अभिप्रेत असलेल्या समता-वादी कल्पनांपेक्षा उजव्यांची सहजप्रवृत्ती ही अधिक स्थिरवादी कशी असते ते यावरून स्पष्ट होऊ लागते. परंतु इंग्लंडमध्ये त्याचे सर्वांना नेहमी आकलन होतेच असे मात्र नाही.

सुधारकांच्या दृष्टिकोणांतून समान संधी असलेल्या समाजात बऱ्याच चांगल्या गोष्टी असतात. तीव्रतेने जाणवणारा वडलोपार्जित प्रतिष्ठेमुळे उद्‌भवणारा असंतोष त्या समाजात टाळला जातो. अगोदरच ज्यांची निवड झालेली असते अशा मोजक्या लोकांसाठी सर्वोच्च जागा आधीच राखून ठेवलेल्या असतात, श्रीमंताच्या पोटी आलेल्या मूर्खालाही गरीबांच्या पोटी आलेल्या कुशाग्र बुद्धीच्या इसमापेक्षा

अधिक चांगली संधी उपलब्ध होऊ शकते, आणि गरीब मुलाला आपल्या वडलांपेक्षा पुढे जाण्याची शक्यता दिसत नाही तर दैव ठेवील तेथेच त्याला रहावे लागते असे त्या भावनेचे स्वरूप असते. त्या समाजांत वर्गावर्गातील अभिसरणाला अधिक वाव असतो आणि वर्गीय बंधने ढिली पडल्यामुळे, त्याचप्रमाणे दोन्ही बाजूंनी चलनवलन होत राहिल्याने उच्चनीचतेची सामुदायिक भावना तरी निदान कमी होत जाते. आणि शेवटची बाब अशी की, सर्वोच्च जागांसाठी निवड करण्याची कौतुक वाटण्याइतकी कार्यक्षमपद्धती अस्तित्वांत असल्यामुळे मूर्ख माणसे बाजूला सारली जाऊन जे सर्वात लायक असतील त्यांचाच तेवढा टिकाव लागतो आणि अशा तऱ्हेने श्रेष्ठ गुणवत्तेची माणसे उच्चपदी गेल्याने आर्थिक विकासाला हातभार लागतो.

परंतु सामाजिक आणि मानसशास्त्रीय कारणास्तव 'स्पर्धात्मक उतरंड' असलेल्या समाजावर टीकेची झोड उठविण्यात काहीजण भूषण मानतात. अनेक मानसशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ आणि सामाजिक वंशशास्त्रज्ञ आग्रहाने असे प्रतिपादन करतात की, त्यामुळे नवी धोकादायक संकटे समोर उभी राहतील. त्या समाजरचनेची मूलभूत वैशिष्टये म्हटली म्हणजे समाजातील डोळ्यात भरण्यासारखा प्रवाहीपणा. या प्रवाहीपणामुळेच आपल्याला वरिष्ठ दर्जा प्राप्त करून घेता येईल याची त्या समाजातील व्यक्तीला जाणीव असते. (सरंजामशाही समाजात ही शक्यता नसते.) समाजातील निरनिराळ्या स्तरांच्या दरम्यान कडक निर्बंध नसल्याने व्यक्तीव्यक्तीतील मत्सराच्या भावनेपासून तो समाज मुक्त असतो आणि खालच्या जागांपेक्षा वरच्या जागांवर मिळणारा मोबदला कितीतरी अधिक असल्यामुळे, तसेच स्पर्धात्मक संघर्षानंतरच सामाजिक प्रतिष्ठा आणि मानसशास्त्रीय स्वयंमान्यता प्राप्त होत असल्याने वरिष्ठ पदावर जाण्याचा सर्वसाधारण निर्धार त्या समाजात दिसून येतो. अशा तऱ्हेने आपल्याकडे कोणी मत्सराने पहात नाही उलट आपल्याला उज्वल भवितव्य आहे अशी खात्री वाटत असल्याने वरचा दर्जा मिळविण्याचे ध्येय डोळ्यापुढे ठेवता येते आणि स्वतःच्या प्रगतीची दारे आपल्याला सताड उघडी आहेत हे दिसत असल्यामुळे आपले ध्येय साध्य करून घेता येईल असे त्यास वाटत असते. त्यामुळे समाजात वरचे स्थान प्राप्त करून घेण्यासाठी अस्वस्थ करून टाकणारी सार्वत्रिक तगमग चालली असल्याचे सर्वत्र दिसून येते.

यातून निर्माण होणारी दुसऱ्याच्या पुढे जाण्याची प्रवृत्ती आणि महत्त्वाकांक्षा यामुळे समाधानी वृत्तीत वाढ होण्याचे तर बाजूलाच राहते उलट ती कमी कमी होत जाऊन सर्वसाधारण असुरक्षितता वाटण्यातच त्याचे पर्यवसान होते असे सांगितले जाते. वडलोपार्जित समाजपद्धतीत स्पर्धेला अत्यंत थोडा वाव असतो तर आता ती अगदी नित्याची बाब होऊन बसते. आणि स्पर्धेचे क्षेत्र जसजसे वाढत जाते आणि स्वतःची प्रगती करून घेण्याला अधिकाधिक वाव मिळू लागतो तसतसे संधी

न मिळण्याचे प्रमाणही कमी कमी होत जाणे अपरिहार्य ठरते. वडलोपार्जित हक्कांना प्राधान्य असलेल्या समाजात उन्नती करून घेण्याची संधी ज्याप्रमाणे नाकारली जाते त्याप्रमाणेच तशी ती करून घेता आली नाही तरी त्यामुळे वैफल्याची भावनाही निर्माण होऊ दिली जात नाही. परंतु सर्वांना संधी उपलब्ध असती आणि १० टक्के लोकांनाच आपली उन्नती करून घेता आली असती तर ९० टक्के लोकांना पराभूत झाल्याची टोचणी लागून राहिली असती आणि त्यामुळे त्यांच्या स्वाभिमानाला धक्का लागला असता. आणि मानधनातील विषमता जितकी जास्त असेल तितकी वरिष्ठ पद न मिळाल्यामुळे येणारी विफलता ही तीव्र असणार; तसेच स्पर्धा जितकी तीव्र आणि जीवघेणी तितकी प्रतिस्पर्ध्याबद्दल दाखवण्यात येणारी असहिष्णुता ही अधिक कडवी. वरिष्ठ दर्जा प्राप्त होणे न होणे हे खर्च करण्याच्या प्रमाणावर म्हणजेच पैसा कमावण्यावर अवलंबून असल्याने माणसाची धन संपादन करण्याची हावही वाढत जाणार.

वर उल्लेखिलेल्या लोकांवर विश्वास ठेवावयाचा तर समान संधीच्या मागे लागलेला समाज हा अस्वस्थ, असुरक्षित, आक्रमक आणि लोभी असा असणार. आणि त्याचे परिणाम समाजातील कनिष्ठ श्रेणीच्या लोकांतील वाढता असंतोष, व्यापक प्रमाणावरील मनोविकृती आणि समतोल सुटलेला विस्कळीत समाज हेच त्याचे अपरिहार्य फलित असणार. अमेरिका आजच अशा प्रकारच्या विकृतींनी झपाटलेली असून ब्रिटनमध्ये त्याची लागण होण्याची स्पष्ट चिन्हे दिसत आहेत.

## २. आक्रमक स्पर्धेचे मायाजाल

सत्याचा अंश असला तरी वरील विधानात असंबद्धता आणि अतिशयोक्ती कमालीची आहे.

एक : पूर्वीपेक्षा आजकालच्या काळात मानसिक विकृतीचे प्रमाण वाढलेले आहे असे निश्चित विधान करता येण्यासारखा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. मनोविकृती, पोटातील अल्सर्स इत्यादी रोगांनी पछाडल्यामुळे गैरहजर राहाणाराची संख्या भरमसाट वाढली आहे असे दाखविणारी प्रचंड आकडेवारी सादर केली जाते, परंतु याबाबतची पूर्वीच्या काळातील आकडेवारी मात्र अर्थातच सहसा उपलब्ध नसते आणि वस्तुतः जी थोडीफार तौलनिक आकडेवारी मिळू शकते त्यावरून वरील निष्कर्षास बळकटी मिळू शकत नाही. अलीकडेच करण्यात आलेल्या अमेरिकेतील एका पाहणीवरून असे आढळून आले आहे की, स्पर्धेचे प्रमाण, प्रतिष्ठा प्राप्त करून घेण्यासाठी करावा लागणारा संघर्ष आणि असुरक्षितता यात तथाकथित वाढ झालेली असूनही गेल्या शंभर वर्षांत मनोविकृतीच्या प्रमाणात वाढ झालेली नाही.

आणि मनोविकृतीत वाढ झालेली आहे असे दाखवता आले तरी सामाजिक

आणि आर्थिक बाबींमुळेच ती घडून आलेली असेल असे म्हणता येणार नाही. उदाहरणार्थ एखादा कट्टर फ्रॉईडवादी कदाचित असे प्रतिपादन करील की, समाजातील मनोविकृतीचे प्रमाण हे व्यक्तीच्या शारीरिक गरजांवर विद्यमान सांस्कृतिक दंडकांच्या नावाखाली जे निर्बंध लादले जात असतात त्यावर अवलंबून असते. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, अशा विकृतीच्या सामाजिक कारणांबाबत कोणतेही निश्चित विधान करण्याइतकी मानसशास्त्रीय विभागाची अद्याप वाढ झालेली नाही.

परंतु मानसिक विकृतीबद्दलची ही अतिरेकी भाषा बाजूस ठेवली आणि व्यक्तिगत असुरक्षितता आणि असमाधान यांच्या मुळाशी सामाजिक कारणेच आहेत एढ्या मर्यादित विधानापुरतेच बोलावयाचे योजले आणि शंभर वर्षापूर्वीपेक्षा आज त्यात खूप वाढ झाली आहे असे कोणी दाखवून दिले तरी देखील सामाजिक कारणामुळेच त्या उद्‌भवतात असे अनुमान निघत नाही. अभिसरण किंवा स्पर्धा यासारख्या विशिष्ट सामाजिक बाबतीत त्याचे मूळ आहे असे तर मुळीचच म्हणता येणार नाही. हवामान, आहार, वंश, धर्म किंवा यासारख्या इतर अनेक बाबी त्याला कारणीभूत होऊ शकतील. उदा. स्वीत्झर्लंडसारख्या देशात स्पर्धा अत्यंत सौम्य स्वरूपाची असूनही जगातील इतर कोठल्याही देशापेक्षा घटस्फोट आणि आत्महत्या यांचे प्रमाण तेथे सर्वांत जास्त आहे असे सांगितले जाते.

ते कसेही असो, स्पर्धाविरोधी बाजूच बरोबर आहे असे सिद्ध करून दाखवावयाचे असेल तर सध्याच्या अँग्लो सॅक्सन समाजात अधिक चलनवलन असल्यामुळे निर्घृण किंवा जीवघेणी स्पर्धा आणि आत्मनिष्ठ आक्रमण यावर अवास्तव भर दिला जात नाही येवढे तरी निदान दाखवून द्यावे लागेल. आणि त्यानंतर व्यक्तिगत वैफल्याच्या प्रमाणात झालेली वाढ किंवा त्यामागील सामाजिक कारणे यासंबंधी काही निश्चित विधाने करण्यात आली तर त्या म्हणण्याला निदान प्रथमदर्शनी तरी काही आधार आहे असे म्हणता येईल.

परंतु ब्रिटनच्या बाबतीत अर्थातच असे दाखवून देता येणार नाही—पूर्वीच्या प्रकरणात हे यापूर्वीच दाखवून देण्यात आले आहे की, व्हिक्टोरिया काळातील भांडवलशाहीच्या ऐन वैभवाच्या काळात, इतकेच नव्हे तर १९२० ते ३० च्या दरम्यानच्या काळातील परिस्थिती कशीही जरी असली तरी आजचा ब्रिटिश समाज आणि उद्योगधंद्यातील परिस्थिती दंडेलीने स्वतःचा वरचष्मा प्रस्थापित करण्याला अनुकूल असण्याऐवजी सुरक्षितता, संघभावना, सुरक्षित बाजारपेठा आणि शांत जीवन यांनाच मानसिकदृष्टया अनुकूल असून त्याच्या जोडीला आठवडयाच्या शेवटी मिळणारी प्रदीर्घ सुट्टी, नियमितपणे गोल्फ खेळण्याची संधी आणि ग्रामीण भागांतील घरकुल या सुविधाही भरपूर प्रमाणात उपलब्ध असतात.

तथापी यासंबंधीचे निष्कर्ष काढण्याच्या दृष्टीने वस्तुतः ब्रिटन हा योग्य असा देश नाही कारण अद्यापही ब्रिटनमधील सामाजिक संबंध हे काहीसे

स्थितिशील असून त्यांची चौकटही बरीचशी काटेकोर आहे. म्हणून यासंबंधीचा पुरावा हवा असेल तर आपल्याला निश्चितपणे गतिशील आणि प्रवाही, स्पर्धेवर आधारलेल्या अनिर्बंध अर्थव्यवस्थेच्या तत्वप्रणालीचे जगाला दर्शन घडवणाऱ्या आणि आक्रमक, लोभी व त्याबरोबर येणारे असमाधान यांनी परिपूर्ण असलेल्या अमेरिकेतील नमुनेदार समाजाकडेच वळावे लागेल. अमेरिकेचे हे वर्णन बरोबर असेल तर त्यावरून असा निष्कर्ष निघेल की जीवघेणी चढाओढ आणि सामाजिक अभिसरण या दोन गोष्टी अविभाज्य आहेत आणि अशा चढाओढी मागोमाग आक्रमक वृत्ती आणि असुरक्षितताही ओघानेच येते.

परंतु माझी अशी समजूत आहे की, अमेरिकेचे हे चित्र, तेथील काही भोळसट लोक त्यावर विश्वास ठेवत असले तरी, बरेचसे कपोलकल्पित आहे. अमेरिकेत असुरक्षितता नाही असे मला म्हणावयाचे नाही, परंतु जीवघेणी स्पर्धा किंवा स्वत:चा वरचष्मा बसविण्यासाठी चाललेला व्यक्तिनिष्ठ संघर्ष या तेथील लोकांच्या खास वैशिष्टयांपेक्षाही त्याची कारणे निराळीच आहेत. त्यातून तेथील विद्यमान तत्वप्रणालीचे खरेखुरे दर्शन घडत नाही त्याचप्रमाणे तेथील लोकांच्या वर्तणुकीचा प्रत्यक्ष ढाचाही डोळ्यासमोर येत नाही.

एकतर व्यापारी वर्गाचे प्रवक्ते आपल्या वार्षिक सभांतून काहीही जरी सांगत असले तरी कोणताही अटकाव नसलेली अनिर्बंध अर्थव्यवस्था ही तेथील सत्ताधाऱ्यांची विचारसरणी राहिलेली नाही. राजकीय दृष्टीकोणावरून विचारप्रवाहांचा मागोवा घेता येतो, आणि अनिर्बंध अर्थव्यवस्थेवर नितांत श्रद्धा बाळगणाऱ्या पक्षाचे बहुमत पंचवीस वर्षांपूर्वीच संपुष्टांत आलेले आहे. त्यानंतरची वीस वर्षे 'न्यू डील' आणि 'फेअर डील'चा रिपब्लिकन पक्षाचा व्यापारीवर्गाला काहीसा प्रतिकूल असलेला वर्धिष्णु समाजवादी जमाना चालत आला आहे. तो पक्ष अद्यापही सामाजिक सुरक्षिततेला बांधलेला असून न्यू डीलमध्ये अनुस्यूत असलेली तत्त्वे त्या पक्षाने जशीच्या तशी अबाधित ठेवली आहेत. परंतु असे असूनही आता त्या पक्षाला अध्यक्ष आयसेन होवर यांच्या मदतीखेरीज आपले बहुमत टिकवून धरता आलेले नाही. आत्यंतिक अनिर्बंध व्यवहाराचे समर्थक हे रिपब्लिकन पक्षांतील फक्त उजव्या गटांतच आहेत आणि ब्रिटनप्रमाणेच तेथील मतदारांचाही नैसर्गिक कल सध्याच्या थोडया डाव्या बाजूला झुकलेला असतो. डिक्सन-यीट्स या खाजगी भांडवलदारांच्या बरोबर करावयाच्या कराराला-तो सार्वजनिक मालकीच्या टी. व्ही. ए. ला अत्यंत बाधक ठरेल या धास्तीने-तेथील जनतेने रिपब्लिकन राजवट असूनही यशस्वीरित्या केलेला विरोध ही बहुधा अमेरिकेच्या अलीकडील इतिहासातील सर्वांत सूचक घटना म्हणावी लागेल.

सध्याची विचारसरणी ही संपूर्णपणे अनिर्बंध व्यवहाराच्या निश्चितपणे विरोधीच आहे असे मला म्हणावयाचे नाही. मला म्हणावयाचे आहे ते इतकेच

की, ती त्याबाबतीत पहिल्याइतकी उत्कटतेने अनुकूल राहिलेली नाही. जनमानसात होणाऱ्या बदलाची कांही समाजशास्त्रज्ञांपेक्षाही चटकन चाहूल लागणाऱ्या अमेरिकेतील अनेक उद्योगपतींनी हे बरोबर ओळखले असून अनिर्बंध व्यवहारावरील जनतेचा विश्वास अजिबात उडून जाईल अशी धास्ती वाटू लागल्यामुळे त्यांनी जनतेचा पाठिंबा मिळविण्यासाठी जाहिरातबाजीच्या मोठमोठ्या मोहिमाच उभारल्या आहेत ही घटना अत्यंत अर्थपूर्ण मानावी लागेल. कारण अनिर्बंध व्यवहाराची अद्यापहि चलती असती तर 'कॉंपिटिटिव्ह एंटरप्राईझ सिस्टिम इनकॉर्पोरेटेड' स्थापन करण्याची, ८००० भित्तीपत्रके, १,३६,००० मोटारवाल्यांना द्यावयाची कार्डे आणि तीस लाख रेडियो ऐकणारांची म्हणून अनिर्बंध व्यवहाराबाबतची मते छापून प्रसिद्ध करण्याची जरूरच भासली नसती. त्याचप्रमाणे नफा पद्धतीचे फायदे सांगणारी मोठ्या लांबीची हॉलिवूड धर्तीची फिल्म काढण्याचीही जनरल मोटार कंपनीला आवश्यकता भासली नसती. किंवा जनरल इलेक्ट्रिक, प्रॉक्टर अँड गँबल रिपब्लिक स्टील यासारख्या अनेक कंपन्याही अनिर्बंध व्यवहार लोकप्रिय करण्यासाठी व्यंगचित्रांची मासिके काढून ती मोफत वाटण्याच्या फंदात पडल्या नसत्या.

एकंदरीने पाहता, एखाद्या उद्योगातर्फे आपली विक्री वाढावी म्हणून जोरदार मोहीम हाती घेतली जावी त्याप्रमाणे अनिर्बंध व्यवहाराच्या प्रचारासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली जात आहे. फार काय, तो एक स्वतंत्र धंदाच बनू पहात आहे. सध्याच्या दराने उद्योगातील जाहिरात, जनसंपर्क आणि कामगारांबरोबरचे संबंध या बाबींवर वर्षाकाठी खर्च होणाऱ्या रकमेपैकी दहा कोटी डॉलर्स केवळ यासाठी खर्च होत असतात. आणि इतके करूनही तो खर्च सर्वस्वी निरर्थकच ठरतो. ज्यांचा त्यावर एवढा भरवसा असतो तेही तशी कबुली देतात. 'साहेब खरी गरज कशाची असेल तर अधिक परिणामकारक प्रचाराची. आपला प्रचार तर गिऱ्हाईकांच्या मनाची पकडच घेत नाही. आपण अजून त्यांच्या हृदयाला जाऊन भिडलेलोच नाही. जो डोक्स बहिरा झाला आहे' कारण मंदीमुळे अनिर्बंध व्यवहारावर त्याचा विश्वासच उरलेला नाही; त्याऐवजी 'न्यू डील'च्या म्हणजेच सामाजिक सुरक्षिततेचा पुरस्कार करणाऱ्या राजकीय तत्त्वप्रणालीचे त्याला अतूट आकर्षण वाटू लागले आहे.

जनमानसात घडून आलेला हा बदल खुद्द प्रमुख उद्योगपतींच्यातच जो मानसिक बदल घडून आला आहे त्यात प्रतिबिंबित होतो. अँड्र्यू मेलन किंवा अँड्र्यू कारनेजी यासारख्या त्यांच्याशी स्पर्धा करणाऱ्यांच्या बाबतीत आक्रमक, चिडखोर आणि कसलीही दयामया न दाखवणाऱ्या, कामगार संघटनांबाबत अत्यंत कठोरपणे वागणाऱ्या, स्वत:च्या अमर्याद सत्तेचा गर्व चढलेल्या आणि जनतेच्या किंवा सरकारच्या मतासंबंधी तुच्छता दर्शविण्याचा उद्धटपणा करणाऱ्यांचा जमाना आता

पार भूतकाळात जमा झालेला आहे. आणि मॉंटगॉमेरी वॉर्ड कंपनीपैकी श्री. स्वेल ॲव्हरीसारखे जे थोडेसे उरले आहेत ते अगदी अलग पडले आहेत आणि तऱ्हेवाईक म्हणून त्यांची ख्याती झाली आहे. परंतु त्यांच्या या विक्षिप्तपणामुळे जनमानसात संपूर्ण बदल झाल्याचेच प्रत्ययास येत आहे. आजचा उद्योगपती हा अगदी वेगळाच दिसू लागला आहे. पहिल्यापेक्षा अधिक शांत, सुसंस्कृत, निगर्वी, अनिर्बंध व्यवहारासंबंधी काहीसा साशंक, स्वतःचे समर्थन करण्याच्या फारशा भरीस न पडणारा, वारंवार वॉशिंग्टनच्या फेऱ्या करणारा, आयसेनहोवरला पाठिंबा देणारा, अर्थशास्त्र चांगले जाणणारा, आपल्याशी स्पर्धा करणारे आणि कामगार पुढारी या दोघांशीही फायदेशीर अटींवर वाटाघाटी करण्यात पटाईत, आणि बेकारीचे समूळ उच्चाटन करण्यासाठी जरूर तर शासनाकडून जे उपाय योजले जातील त्यांची आवश्यकता मानणारा असे त्याचे वर्णन करता येईल.

कामगारांबरोबरच्या संबंधांत तर ही तफावत विशेषच उठून दिसते. कामगार संघटनांना आता जवळजवळ सार्वत्रिक मान्यता मिळाली आहे ही निःसंदिग्ध वस्तुस्थिती असली तरी ती या ठिकाणी मला अभिप्रेत नसून उद्योगातील व्यवस्थापक नोकरविषयक आणि कामगारविषयक समस्या यामुळे ते पछाडल्यासारखे वागतात त्यावरून मी हे विधान करीत आहे. सर्वोच्चपदावरील व्यवस्थापक आपली निम्मी शक्ती या समस्यांसंबंधी चिंता वाहण्यात आणि त्याबाबत अधिकाधिक पुरोगामी कल्पना शोधून काढण्यातच खर्च करीत असतात. सहभाग, सहकार्य, मानवी संबंध, कामगारशक्तीचे नीतिधैर्य, चांगला विचारविनिमय, सांघिक हालचाली आणि सामाजिक बांधणी हेच त्यांच्या चर्चेचे विषय असतात. अहंमन्य किंवा अनियंत्रित व्यवस्थापक वर्ग आता वर्ज समजला जातो. त्याऐवजी संघभावना हा आता परवलीचा शब्द होऊन बसला आहे. आणि व्यवस्थापकांच्या कामगारांकडे बघण्याच्या दृष्टीकोणाचे प्रतीक म्हणून हेन्री फोर्डची जागा एल्टन मेयोने घेतली आहे. परंतु धंद्यातील स्पर्धेच्या बाबतीतही ही तफावत नजरेत भरते. उद्योगधंद्यातील स्पर्धा युरोपपेक्षा अमेरिकेत अद्यापही विशेष तीव्र स्वरूपाची असली तरीही ती कटाक्षाने एका मर्यादेत ठेवली जाते. पूर्वीच्या आक्रमक, व्यक्तिनिष्ठ अनिर्बंध अर्थव्यवस्थेच्या जमान्यात ती कधीच सहन केली गेली नसती.

विनिमयाच्या मानसशास्त्रातही तशाच तऱ्हेचा बदल घडून आल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. पन्नास वर्षापूर्वी अमेरिकन समाज हा खरोखरीच लोभी व व्हेब्लेनवादी होता. आणि मी वर ज्या लेखकांचा उल्लेख केला आहे त्यांची अद्यापही तशीच समजूत आहे. परंतु ही समजूत बरोबर नसावी अशी शंका मागच्या प्रकरणात व्यक्त केलीच आहे. व्हेब्लेनवादी समाजात सांपत्तिक श्रेष्ठत्व निर्विवादपणे सिद्ध करून दाखविण्यासाठी खर्च शक्यतितका नेत्रदीपक आणि भपकेबाज असावा लागतो. इतरांच्या बरोबर राहणे म्हणजे शक्य तेवढे त्यांच्यापुढे जाणे असे समजले जात

नसे. इतरांच्या डोळ्यात भरेल इतके पुढे जात राहणे हे आता चांगले समजले जात नाही. आपल्याबरोबरच्या सर्वांजवळ ब्यूक गाड्या असताना आपणच तेवढी कॅडि-लॅक खरेदी करणे, इतर कोणाच्याही आधी आपला बंगला वातानुकूलित करून घेणे, सर्वसाधारणपणे भरमसाट आणि डोळ्यात भरण्यासारखा खर्च करून आपल्या श्रीमंतीचे प्रदर्शन करणे ही लोकांची अप्रियता संपादन करण्याची लक्षणे ठरली असून त्यामुळे संकेत मोडले जाऊन दिखाऊपणा पदरी येतो. अशा तऱ्हेने वर्तूळ पूर्ण झाले आहे. विल्यम रँडाल्फ हर्स्टकडे आता कोणी मत्सराने पहात नाही किंवा त्याचे गुणगानही कोणी करीत नाही तर एक आडमार्गाला लागलेली आणि कोणाशी मिळतेजुळते न घेणारी व्यक्ती म्हणून त्याची कीव केली जाते, किंवा त्याचा धिक्कार केला जातो. विक्षिप्तपणा करून इतरांच्या नजरेत भरण्याची आत्मनिष्ठ प्रवृत्ती मागे पडून सांस्कृतिक साचेबंदपणा दिसू लागला आहे. लोकांनी मत्सराने आपली इतरांशी तुलना करावी एवढाच खर्च करण्यामागील उद्देश असे. त्याऐवजी आता तशी तुलना शक्यतो टाळण्याची प्रवृत्ती दिसते.

शेवटी आणखी एक उदाहरण देण्यासारखे आहे. समाजातील सांस्कृतिक दृष्टीकोणाचे अगदी यथातथ्य प्रतिबिंब शिक्षणपद्धतीत उमटलेले असते. असूया आणि स्पर्धा यावर कमी भर देणाऱ्या किंवा सहकार आणि मिळतेजुळते घेण्याची प्रवृत्ती यावर अधिक भर देणाऱ्या अशा शाळा जगात दुसरीकडे कोठेच आढळणार नाहीत. जीवनात एकमेकांशी जुळवून घेणे, 'सांघिक जीवन जगणे' आणि 'समा-जाशी एकरूप होणे' याचे पाठ अभ्यासक्रमात, त्याचप्रमाणे परीक्षापद्धतीतूनच मिळत असतात. गुणवत्तेनुसार किंवा स्पर्धात्मक परीक्षा घेऊन प्रगतीचे मोजमाप करण्याची पद्धती बहुतेक सर्वच ठिकाणी मागे पडली असून कुशाग्र बुद्धीची मुले जादा महत्त्वा-कांक्षी बनू नयेत आणि 'ढ' मुलांना आपण कमी बुद्धीमान आहोत असे दिसून आल्याने त्यांच्यात वैफल्याची भावना पसरू नये म्हणून त्यांच्या 'वयाच्या गटा-नुसार' सर्वांनाच वरच्या वर्गात घातले जाते.

सर्वसाधारणपणे, वर्तणुकीतील सारखेपणा, इतरांची पसंती मिळावी अशी तीव्र इच्छा, व्यक्तिगत संबंधांबद्दलची भावनाशीलता, आवडीनिवडीचे 'सामाजीकरण' आणि विक्षिप्तपणा दिसू न देण्याची स्पष्टपणे आढळणारी प्रवृत्ती ही आजच्या अमे-रिकन समाजाची ठळक वैशिष्टये आहेत. निर्घृण आणि प्रभुत्व गाजविणारी महत्त्वा-कांक्षा, सत्तेची लालसा, स्पर्धेविषयी वाटणारी पोटतिडीक आणि बेफिकीर स्वयं-केंद्रिय व्यक्तिनिष्ठा यांचे प्रभुत्व असलेल्या समाजापेक्षा हे चित्र अगदी निराळे आहे. या स्थित्यंतराचा प्रारंभ १९३० च्या आगेमागे झाला असावा असे वाटते आणि तेव्हापासून अमेरिकेतील समाजात इतक्या झपाट्याने स्थित्यंतर घडून आले आहे की, १९२० च्या अमेरिकेचे युग केव्हाच उलटून गेले आहे

अमेरिकन किंवा कोणताही स्थितीवादी समाज सामाजिक तणावापासून मुक्त

असतो असे नाही. सनातनी प्रवृत्ती आणि जातीविषयक हालचाली यावर भर दिला जातो तेव्हा तीव्र स्वरूपाचे तणाव आणि चिंताजनक परिस्थिती निर्माण होते आणि समाजातील विक्षिप्त माणसे समाजाची जी निंदा ओढवून घेतात त्यामुळे त्यांना कमालीचे दुःख भोगावे लागते. आत्मनिर्भर, व्यक्तिवादी आणि प्रस्थापिताला चिकटून न बसणारी संस्कृती असलेल्या समाजापेक्षा अशा समाजात भावनात्मक तणाव, असुरक्षितता आणि चिंता यांचे प्रमाण जास्त असते असे मात्र निश्चितच म्हणता येईल.

ते कसेही असो, महत्वाची गोष्ट आहे ती ही की, या परंपरेला चिकटून बसणाऱ्या जातीय वृत्ती, अमेरिकन समाजाच्या संदर्भात, त्यांच्या नेमक्या उलट असलेल्या स्पर्धात्मक प्रवृत्तीशी (कनिष्ठ व्यवस्थापकीय वर्गात तीव्रतेने आढळणाऱ्या) पडताळून पाहिल्या पाहिजेत. या दोहोंचा संयोग झाला तरी तेवढ्याने अमेरिकेत सध्या जो समाज आस्तित्वात आहे असे मानले जाते असा समान संधी असलेला प्रवाही समाज, आधीच्या विभागात वर्णन केले आहे तशाच तऱ्हेची संस्कृती आणि वातावरण निर्माण करीलच असे सांगता येत नाही. समाजात अशा तऱ्हेची परिस्थिती असू शकेल. मागेही ती तशी असेच. आणि ज्यावेळी अशी परिस्थिती असते त्यावेळी– जरी आपल्याला त्याची कल्पना येत नसली तरीही– त्याला चिकटवण्यात येणारे दोषही निर्माण होत असणार हे नक्कीच. परंतु सामाजिक अभिसरण आणि समान संधी या उद्दिष्टांशी ते निगडीत असतात किंवा ती उद्दिष्टेच दोषास्पद आहेत असे म्हणता येणार नाही.

## ३. समान संधी असलेल्या समाजाचे फायदे

शिवाय अभिसरणाचे प्रमाण जास्त असेल तर असुरक्षितता जास्त असते आणि त्या अनुषंगाने (जणू काही) 'एकूण' सामाजिक असंतोषही काही प्रमाणात वाढतो असे मानले तरी त्यामुळे निव्वळ असंतोषच वाढीला लागतो असा निष्कर्ष त्यावरून काढता येणार नाही. सामाजिक अभिसरणाच्या अभावामुळे काही गंभीर तोटे सहन करावे लागतात आणि समाज अधिकाधिक प्रवाही बनत गेला तर त्याबरोबर काही फायदेही येतात (यापैकी काहींचा त्रोटक उल्लेख या प्रकरणाच्या सुरुवातीला आलेला आहे) हे काही वेळा लोक विसरतात.

अशा तऱ्हेने जास्त अभिसरणामुळे घडून येणारे तथाकथित अनिष्ट परिणाम संपूर्णपणे टाळावयाचे असतील तर त्याचे कारणही संपूर्णपणे नष्ट केले पाहिजे. मूलतः भेदजन्य मोबदला देण्याची पद्धती हे त्याचे कारण असते; आणि भेदजन्य मोबदला आणि त्याबरोबर तो मिळण्यासाठी लागणारी समान संधी उत्तेजक ठरते. यापैकी पहिले, दुसरे किंवा दोनही कारणे नष्ट झाली तरच असंतोष संपूर्णपणे नाहीसा होईल. उदाहरणार्थ अमर्याद महत्त्वाकांक्षेची विकृत वाढ— व्यक्तिगत स्पर्धा नावालाही नसेल त्याचप्रमाणे असामान्य व्यक्तिगत कर्तृत्वाबद्दल जेथे खास

मोबदला दिला जात नाही अशी संस्कृती असेल तर—— असंभाव्य आहे. प्रतिष्ठा आणि मालमत्ता मिळविण्याच्या हव्यासालाही हेच लागू पडते यांत शंका नाही. परंतु अशा प्रकारचा सुप्रतिष्ठित समाजाचा लाभ होण्यासाठी किंमतही काहीशी जास्तच मोजावी लागते—— म्हणजेच असामान्य व्यक्तिगत कर्तृत्वाबद्दल कसलेही जादा वेतन देऊन चालत नाही.

अर्थात नेमस्त प्रवृत्तीचे टीकाकार इतकी मर्यादा गाठीत नाहीत. तरी देखील त्यांच्या प्रतिपादनाचा रोख तोच असतो——तो म्हणजे स्पर्धेला आळा घालणे, स्वतःची प्रगती साधणाऱ्या प्रोत्साहक उपायांना महत्त्व न देणे. व्यवस्थापकीय जागा नाकारणाऱ्या प्रतिनिधींची वाखाणणी केली जाते; किंमतीतील स्पर्धा पुन्हा सुरू करण्यासाठी योजण्यात यावयाच्या उपयांवर अत्यंत जोरदार आक्षेप घेतला जातो; अंगावर किंवा उक्ते काम देण्याची पद्धती किंवा पैशाच्या स्वरूपात मोबदला देण्याच्या कल्पनेचा अधिक्षेप केला जातो——इतका की, कोठल्याही प्रकारच्या जीवघेण्या स्पर्धे-पासून जेवढे म्हणून संरक्षण मिळणे शक्य आहे तेवढे लाभू शकणाऱ्या परांच्या गाद्या पसरलेल्या प्रतिगामी समाजाचाच जवळ जवळ ते पुरस्कार करतात.

दुसऱ्या एखाद्या कालखंडात कदाचित आदर्श समाज निर्माण करण्याच्या दृष्टीने हे योग्य ठरले असते. परंतु आजच्या परिस्थितीत ते निश्चितच योग्य ठरणार नाही. त्यामुळे आर्थिक विकास आणि कार्यक्षमता यांना फार मोठ्या प्रमाणावर तिलांजली द्यावी लागेल. आणि ते अत्यंत धोकादायक ठरेल. नव्या नव्या प्रोत्साहक योजनांचा विकास होत जावा असे कोणाला कितीही वाटो, आर्थिक विकास आणि कार्यक्षमता हवी असेल तर काही प्रमाणात तरी भेदजन्य मोबदला द्यावाच लागेल. त्याचप्रमाणे थोडीफार तरी स्पर्धा अपरिहार्यच ठरेल. मी मागच्या प्रकरणात प्रति-पादन केल्याप्रमाणे सध्या जी विषमता अस्तित्वात आहे तिचे या कारणास्तव निश्चितच समर्थन करता येणार नाही. त्याचप्रमाणे आर्थिक विकासाच्या प्रश्नाचे इतके स्तोम माजविण्याची मुळीच जरूर नसल्याचे मी पुढे दाखवून देणारच आहे. परंतु भेदाभेद आणि अकार्यक्षमता यांचा काही संबंध आहे असे मानले आणि यापुढील वीस वर्षांनंतरची परिस्थिती काशीही जरी असली तरी यापुढे कित्येक वर्षेपर्यंत आपल्या साधनसामुग्रीवर कमालीचा ताण पडणार आहे हे मान्य केले तर आपल्याला स्पर्धेचे समूळ उच्चाटन करून चालणार नाही. आधीच्या तात्त्विक स्वप्नदर्श्यांप्रमाणेच समाजशास्त्राच्या क्षेत्रातील स्पप्नदर्शी विचारवंतही, स्वभावाने स्थितिप्रिय असतात आणि ते असे धरून चालतात की उत्पादनाची समस्या सुटलेली असल्यामुळे समा-जात आता कोणालाही असूयेची झळ लागणार नाही आणि प्रत्येकजण खुशाल आराम करीत बसू शकेल. परंतु निदान आजच्या घटकेला तरी सर्व स्पर्धात्मक प्रयत्नांना आळा घालण्यासाठी तातडीच्या गरजा बाजूस ठेवण्याची फार मोठी किंमत मोजावी लागणार आहे.

दुसरे असे की, समान संधी आणि सामाजिक अभिसरण यांचा अभाव म्हणजे लोकशाही हक्क नाकारण्यासारखे आहे त्याचप्रमाणे असंतोषाला निश्चित कारण मिळवून देण्यासारखे आहे. औद्योगिक क्रांतीची सुरवात झाली तेव्हापासून अठराव्या शतकातील समाजाचे स्थिर स्वरूप, स्थलवाचक अभिसरण आणि सामाजिक जागृती यात एकदम वाढ झाली. पण त्याहीपेक्षा कामगार वर्गाची राजकीय चळवळ सुरू झाली आणि शिक्षण सार्वत्रिक झाले त्यावेळेपासून विषम संधीविरुद्ध असंतोष धुमसू लागला आणि तोच सामाजिक वैफल्याचे कारण होऊन बसला. सध्या अस्तित्वात असलेल्या सामाजिक उतरंडीमागे काही तरी ईश्वरी इच्छा असली पाहिजे यावर विश्वास ठेवण्यास जनता तयार होईनाशी झाली. आपल्यालाही वरच्या जागांवर जाण्याचा हक्क आहे अशी खात्री पटल्यामुळे त्यांना तशी संधी नाकारणाऱ्या समाज-व्यवस्थेलाच त्यांनी आव्हान दिले आणि अशा समाजव्यवस्थेचे अस्तित्व हे जनतेच्या असंतोषाचे एक हमखास साधन होऊन बसले. हे ध्येय साध्य करण्याचे मार्ग जस-जसे सुकर आणि विशाल होत गेले तसतसा हा असंतोष हळूहळू क्षणिक ठरू लागला (ब्रिटनमध्ये मात्र अद्यापही तो बराच टिकून आहे) तरी त्याचबरोबर असुरक्षिततेत तथाकथित वाढ होऊ लागली. परंतु अनेकदा वस्तुस्थिती तशी नसते. त्याचे कारण माझ्या मते असे आहे की, स्पर्धाविरोधी लेखक अनेकदा तुलना करतांना काळाच्या बाबतीत चूक करीत असतात. समान संधी असलेला समाज आणि वडलोपार्जित अधिकारांना महत्त्व असलेला समाज—म्हणजे आजची अमेरिका आणि अठराव्या शतकातील ब्रिटन—— यांची तुलना करावयाची झाली तर, मला जी माहिती आहे, त्यावरून त्या समाजात घडून आलेले स्थित्यंतर अधिकच वाईट होते, त्याचप्रमाणे त्या विरोधी असलेले तणावही अधिक तीव्र स्वरूपाचे होते. परंतु ही तुलना फारशी लागू पडणारी किंवा लक्ष वेधून घेणारी नाही. कारण पूर्वीच्या वडलोपार्जित अधि-कार असलेल्या जथावंद समाजाकडे जावे असे कोणीच म्हणणार नाही. परंतु समान संधी असलेला आणि अशी संधी असावी अशी आकांक्षा बाळगणारा परंतु प्रस्थापित सामाजिक संबंधामुळे ती नाकारली गेलेला समाज (१९०६ सालचा ब्रिटन) यांची तुलना केली तर आपल्याला असे आढळून येईल की दुसऱ्या प्रकारच्या समाजात असंतोष आणि वैफल्य यांचे प्रमाण कमी होते.

तीन : सामाजिक (आणि म्हणून राजकीय) अभिसरणांत वाढ झाली म्हणजे त्या अनुषंगाने इतर सामाजिक फायदे आपोआपच मिळू लागतात ही वस्तुस्थितीही काही अंशी त्याला कारणीभूत असते. अचानक एकाकीपणे उदय पावलेल्या ब्रिटन-मध्ये हे वाढते अभिसरण नव्हते परंतु सामाजिक सुधारणांसाठी चाललेल्या चळवळीत ब्रिटन सहभागी झालेले होते (काही मर्यादेपर्यन्त ब्रिटननेच ती चळवळ घडवून आणली होती). त्या चळवळीमुळेच अधिक समानता, चांगल्या प्रकारची सामाजिक सुरक्षितता, शिक्षणाचा प्रसार—वस्तुतः जनतेच्या एकूण परिस्थितीतच सर्वसाधारण

सुधारणा घडून आली.

या सर्व प्रक्रियेमुळे असुरक्षिततेतही त्याप्रमाणांत वाढ झाली आहे असे म्हणता येईल की नाही ते मात्र निश्चितपणे सांगता येत नाही. सुधारणांसाठी झालेल्या एकाच चळवळीमुळे कल्याणकारी राज्य आणि पहिल्यापेक्षा अधिक समान संधी या दोनही गोष्टी साध्य झाल्या. कदाचित त्यापैकी वाढलेल्या समान संधीमुळे असुरक्षितता तीव्र बनली असण्याची शक्यता आहे. परंतु कल्याणकारी राज्यामागील ध्येयात्मक आणि व्यवहारी बाजू आपली सारी शक्ती विरुद्ध बाजूने म्हणजे सुरक्षितता, सामाजिक जबाबदारी आणि सहकाराच्या बाजूने झेपावत असते. या दोन्ही गोष्टींचा—कल्याणकारी राज्य आणि समान संधीत झालेली वाढ यांचा साकल्याने विचार केला तर असुरक्षितता, महत्त्वाकांक्षा आणि लोभीपणा यात निव्वळ वाढ झाली आहे असे निश्चितपणे कोणी म्हणू शकेल कां? बहुतेक लोक तर खात्रीपूर्वक असाच निष्कर्ष काढतील की, आजच्यापेक्षा संधीच्या बाबतींत किती तरी प्रमाणात जास्त विषमता असलेल्या व्हिक्टोरियाकालीन इंग्लंडच्या मध्याला वरील बाबी अधिक स्पष्ट होत्या.

चवथी गोष्ट अशी की, अधिकाधिक संधी मिळत गेली तर त्याबरोबर वर्गीय भावना आणि स्तरीकरण कमी कमी होत जाते. आठव्या प्रकरणांत ज्याचा ऊहापोह करण्यात आला आहे तो अभिसरणाचा मुद्दा येथे लागू पडतो. अगदी तळच्या स्तरावरील माणसे सर्वांत वरच्या स्तरापर्यंत चढू लागली तर त्या स्तरावरील लोकांच्या तौलनिक दर्जाला त्याची थोडीफार तरी झळ लागणे अपरिहार्य आहे. या उलट वडिलोपार्जित वरिष्ठ वर्ग खालच्या स्तरांतील लोकांकडूनही त्याला कसलाही धक्का बसण्याची शक्यताच नसल्याने आपले वर्चस्व आणि कोणाकडूनही आव्हान मिळू न शकणारा उच्च दर्जा टिकवून धरू शकतो. परंतु या वरिष्ठ स्थानावर, वरवर येऊ पहाणारांकडून जसजसे आक्रमण होऊ लागते आणि अद्यापही अगदी खालच्या तळावर असलेले लोक सर्वात वरच्या स्तरावर असलेल्यात आपले कोणी नातेवाईक किंवा ओळखीपाळखीचे लोक आहेत असे सांगू लागतात त्यावेळी त्या स्तरावर असणाऱ्यांच्या तिष्ठेला अर्थातच कमीपणा येऊ लागतो. अभिसरणात झालेल्या वाढीमुळे, विशेषतः ब्रिटनमधल्याप्रमाणे ज्यावेळी जहाल सुधारणांसाठी झालेल्या व्यापक चळवळीचा एक भाग म्हणून ती वाढ झालेली असते त्यावेळी सामाजिक वर्ग, निश्चित करणाऱ्या निकषांच्या संदर्भातील विषमता कमी कमी होऊ लागते. अर्थात समाजवाद्यांना अभिप्रेत असते तेवढ्या प्रमाणात ती कमी होऊ शकत नाही— निदान नव्या समाजासारखी ब्रिटनमध्ये तरी ती तितकी कमी होऊ शकत नाही. कारण या नव्या समाजांच्या मानाने ब्रिटनसारख्या देशात वर्गीय स्तरीकरण इतके खोलवर रुजलेले असते की केवळ सर्वांना सारखी संधी उपलब्ध करून दिल्याबरोबर त्याचे उच्चाटन होऊ शकत नाही. तथापी त्याचा थोडयाफार प्रमाणात तरी योग्य परिणाम घडून येतोच

## ४. ब्रिटनमधील संधीच्या बाबतीतील विषमता

यावरून मी असा निष्कर्ष काढतो की, समान संधी असलेल्या गतिशील समाजाविरुद्ध जे आक्षेप घेण्यात येतात ते अतिरंजित असतात. त्याचप्रमाणे त्यामुळे होणाऱ्या नुकसानीबरोबर जे फायदे होतात त्याकडे दुर्लक्ष केले जाते. अर्थात समान संधीवर फाजील भर दिला गेला तर काही विशिष्ट परिस्थितीत पराकोटीची स्पर्धा आणि त्यातून उद्‌भवणारा असंतोष आणि असुरक्षितता निर्माण होण्याची शक्यता आहे. (ही विशिष्ट परिस्थिती कोणती त्याचे विवेचन पुढे आले आहे.) परंतु तशी विशिष्ट परिस्थिती असेल तरच हे संभवनीय आहे. आणि ती परिस्थिती म्हणजे नेमके काय ते स्पष्ट झाले पाहिजे. ती परिस्थिती अस्तित्वात आहे किंवा नाही याचा विचार न करता एखाद्या समाजावर वारेमाप आक्षेप घेणे योग्य ठरणार नाही.

शिवाय इतरत्र कशीही परिस्थिती असली तरी ब्रिटनमध्ये समान संधीच्या कक्षा विस्तारत गेल्या तर त्यामुळे नि:संशय काही लक्षणीय फायदे मिळू शकतील आणि पुन्हा त्यासाठी नेहमीच्या मानाने जवळ जवळ कसलाच धोका पत्करावा लागणार नाही. याचे कारण असे की, मानसिक विकृतीत किंवा आक्रमक स्पर्धेत भरमसाट वाढ व्हावी हे आपल्या राष्ट्राच्या स्वाभाविक प्रकृतीतच नाही. तसेच आपल्या सामाजिक सवयीही अशी वाढ होण्याच्या दृष्टीने अत्यंत प्रतिकूल अशा आहेत. आपल्या राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीमुळे वरिष्ठ जागांसाठी निवड करतांना ती कार्यक्षमतेने करण्याला विशेष महत्त्व प्राप्त होते. त्याचप्रमाणे परंपरागत आणि वडलोपार्जित समाजपद्धतीत आपल्याकडे हळूहळू परिवर्तन घडून आलेले असल्याने प्रत्येक मुलाला समान संधी देण्याचा जमाना येण्याला आपल्याकडे अद्याप फार अवकाश आहे.

संधीच्या बाबतीत अद्यापही विषमता कशी अस्तित्वात आहे त्याची अनेक उदाहरणे गेल्या प्रकरणात दिलेली आहेत. याबाबत अलिकडेच करण्यात आलेल्या पहिल्या पाहणीत जी तपशीलवार आकडेवारी उपलब्ध झाली आहे त्यावरून ही टीका कशी सार्थ होती ते सिद्ध करता येण्यासारखे आहे.

ही पहाणी करणारांनी 'इंडेक्स ऑफ असोसिएशन'च्या द्वारा सामाजिक जडत्व आणि स्वत: न एखाद्या वर्गात दाखल होण्याची प्रवृत्ती यांच्या विरोधात असलेले सामाजिक अभिसरणाचे प्रमाण निश्चित केले आहे. वडलोपार्जित किंवा स्वकर्तृत्वाने मिळविलेली प्रतिष्ठा यात कसलाही दुवा नसलेल्या आणि प्रत्येक मुलाला प्रतिष्ठेच्या कोणत्याही वर्गात स्वत:चा अंतर्भाव करून घेण्याची शक्यता असलेल्या 'कुटकळ' किंवा पूर्णावस्थेत पोहोचलेल्या अभिसरणाच्या अवस्थेत 'इंडेक्स ऑफ असोसिएशन' राहील. याचा अर्थ असा की, विशिष्ट वर्गातील

वडलांच्या मुलांची–जे स्वतःहून त्या वर्गात आले–प्रत्यक्ष संख्या ही कसल्याही पूर्व नियोजनाबाचून निवड केली तर जी संख्या 'अपेक्षित असते तितकीच नेमकी भरते. परंतु समजा अशा मुलांची संख्या वीस असली, आणि पूर्व नियोजनाशिवाय केलेल्या निवडीतील मुलांची संख्या पंधरा आली तर प्रत्यक्ष आणि अपेक्षित उमेदवारांचे प्रमाण २०–१५ असे असेल आणि इंडेक्स ऑफ असोसिएशन १.३ असेल. यावरून हे दिसून येईल की इंडेक्स जितका जास्त, तितके स्वतःहून केलेल्या निवडीचे आणि वडलोपार्जित प्रतिष्ठा टिकून राहण्याचे प्रमाणही जास्त.

इंडेक्स ऑफ असोसिएशन समप्रमाणात असण्यासाठी त्यावेळी पूर्णावस्थेला पोहोचलेल्या अभिसरणाची अवस्था अभिप्रेत धरलेली असते. परंतु सहाजिकच अशी समप्रमाणाची परिस्थिती क्वचितच आढळते. कारण पितृप्रधान पद्धतीच्या पार्श्व-भूमीचा फार मोठा प्रभाव पडलेला असतो. एकूण लोकसंख्येच्या दृष्टीने समप्रमाणा-पेक्षा इंडेक्स जास्त असणे हे महत्त्वाचे नसून निरनिराळ्या सामाजिक गटांसाठी त्याचे मूल्य अजिबात निराळे असते ही त्यातील खरी महत्वाची बाजू आहे.

ब्रिटनमध्ये नेमकी अशीच परिस्थिती आहे. नमूना पहाणीतील पुरुषांच्या सबंध गटाचा इंडेक्स १·४४ इतका होता. परंतु त्या गटाचे ज्यावेळी धंद्यातील दर्जा-नुसार सात वर्ग पाडण्यात आले त्यावेळी असे आढळून आले की त्यातील तेरा वरिष्ठ वर्गातील होते (व्यावसायिक आणि उच्च शासकीय पदावरील) म्हणजेच योजनारहित अभिसरणापेक्षा या वर्गात स्वकर्तृत्वाने शिरलेल्या मुलांच्या पालकांचे प्रमाण १३ पट जास्त होते. ५·८ दुसऱ्या वर्गातील (व्यवस्थापकीय आणि कार्यकारी पदावरील)होते व तीन ते सहापर्यंतच्या वर्गातील संख्या दोहोपेक्षा कमी होती; परंतु सातव्या वर्गातील (अकुशल, शारीरिक काम करणारे) संख्या पुन्हा २·२ इतकी वाढलेली होती.

खालच्या श्रेणीतील मुलांना वरच्या, विशेषे करून अती वरच्या श्रेणीत जाण्याची संधी फारच कमी मिळते हे यावरून सिद्ध होते, सर्वात जास्त मान आहे अशा धंद्यात फारच थोड्या लोकांना शिरता येते किंवा वडील त्या धंद्यात असले तर त्यांचा दर्जा टिकवता येतो. खालच्या श्रेणीमध्ये मात्र बरेच अभिसरण घडून येते. सातही निर्देशांकात गेल्या कित्येक वर्षात लक्षणीय असा बदल घडून आलेला नाही. १९४४ च्या शिक्षण कायद्यामुळे कदाचित हा बदल सतत घडून येईल; परंतु सुधारणा होत राहिली नाही ही एक चिंतेचीच बाब आहे. वरच्या दोन श्रेणीतील मुलांना काही विशिष्ट सवलतींचा लाभ होतो, तर खालच्या श्रेणीतील मुलांना मधल्या अगर अगदी वरच्या श्रेणीतील धंद्यामध्ये प्रवेश मिळविणे फार कठीण जाते. ब्रिटनमध्ये आज देखील समान संधी नाही हे या आकडयांवरून दृष्टीस पडते आणि समान संधी हे तर समाजवादाचे सारभूत किंवा प्रमुख उद्दिष्ट आहे.

## ५. समान संधी पुरेशी का नाही ?

तरी देखील, ब्रिटनमध्ये समान संधीचे उद्दिष्ट पुरेसे ठरत नाही किंवा त्यामुळे इतर प्रकारच्या विषमतेवर होणाऱ्या प्रत्यक्ष टीकेची जबाबदारी आपल्यावर रहात नाही यालाही एक कारण आहे. असुरक्षितता किंवा उग्र स्वरूपाची स्पर्धा यांच्याशी ते कारण काही अंशी निगडीत असले तरी मुख्यतः इतर बाबींशीच ते संबंधित आहे. विशिष्ट परिस्थितीत समान संधी उपलब्ध झाल्याने एका तऱ्हेच्या (वंश-परंपरेच्या पायावर आधारलेल्या) उच्चभ्रूंच्या जागी केवळ (कर्तृत्व आणि बुद्धिमत्ता यावर आधारलेल्या) नवे उच्चभ्रू येण्यापलिकडे कोणताही फरक न पडण्याचा जो धोका निर्माण होतो त्यातूनच हे कारण उद्‌भवते.

आता कोणत्याही समाजात निवडक वर्गातील लोक काही प्रमाणात असणे अपरिहार्य आहे-- आणि खरोखरी ते इष्टही असते. कारण एकजात सर्वांनाच खालच्या पातळीवर आणलेला अगदीच सामान्य दर्जाचा समाज आपल्याला अभिप्रेत नाही. म्हणून विश्वविद्यालयीन शिक्षणामुळे श्रेष्ठतेची भावना काही प्रमाणात तरी निर्माण झालेली नाही अशा समाजाची कल्पनाही करता येणार नाही. परंतु समाजात समानतेचे वातावरण असेल आणि वर्गीय विभागणीची पाळेमुळे खोलवर गेलेली नसतील तर त्या निवडक लोकांत आणि सर्वसामान्य जनतेत फार अंतर पडणार नाही आणि असे अंतर नसेल तर सर्वसामान्य जनतेलाही इतरांविषयी मत्सर वाटणार नाही किंवा ती न्यूनगंडाने पछाडली जाणार नाही-- खरोखरी अशा समाजात मग श्रेष्ठ किंवा निवडक लोक हा शब्दप्रयोगही जवळपास निरर्थक ठरेल. स्वीडन किंवा अमेरिकेत अशीच परिस्थिती आहे. त्या देशात वरिष्ठ आणि कनिष्ठ दर्जाच्या लोकात डोळ्यात भरण्यासारखी तफावत आढळून येत नाही. त्याचप्रमाणे पुढारी लोक हे कोणत्या तरी निराळ्या आणि श्रेष्ठ वर्गात मोडतात अशीही भावना तेथील जनतेच्या मनात वसत नसल्याने श्रेष्ठत्वाचा टेंभा मिरविण्याच्या मनःप्रवृत्तीचा मागमूसही तेथे आढळत नाही. बहुतेक सर्वांनी एकाच शाळेत शिक्षण घेतलेले असते, बोलण्याचालण्यात किंवा राहणीमानात तीव्र स्वरूपाची तफावत नसते, त्याचप्रमाणे सामाजिक उच्चनीचतेची तीव्र जाणीवही तेथील जनतेच्या मनात नसते.

तथापी आपण कोणीतरी विशेष आहोत या भावनेचा अतिरेक होणे किंवा इतर लोकांपासून अशीच प्रमाणाबाहेर अलिप्तता राखली जाणे अथवा त्यांच्या अजिबात संपर्कही न ठेवणे हेदेखील अर्थातच तितकेच अनिष्ट. परंतु ब्रिटनमध्ये समान संधी असूनही अशा तऱ्हेची परिस्थिती सहजासहजी आढळून येऊ शकेल-- सर्वसाधारणपणे आपली परंपरागत चालत आलेली आणि खोलवर रुजलेली वर्गीय चौकटीत जखडलेली समाजपद्धती याला जबाबदार आहे. वाढत्या अभिसरणामुळे

तिला हादरा बसला असला तरी ती पुरेशी ढासळलेली नाही. आपल्याकडची पृथगात्म आणि विशेषाधिकार असलेली शालेय शिक्षण पद्धतीच याला मुख्यत्वेकरून जबाबदार आहे. केवळ समान संधीवरच आपण भर देत राहिलो तर त्याचा अर्थ असा होईल की, आपण सध्याच्या पब्लिक, ग्रामर आणि आधुनिक तऱ्हेच्या दुय्यम शाळांत शिक्षण आणि प्रतिष्ठा यांच्याबाबत जे परस्पर संबंध आहेत ते तसेच टिकवून धरले आहेत. परंतु यापैकी पहिल्या दोन प्रकारच्या शाळांत प्रवेश देण्यासाठी करावयाची विद्यार्थ्यांची निवड मात्र सर्वांना खुली ठेवण्यात आली असून खरोखरीच्या गुणवत्तेनुसारच मुलांना तेथे प्रवेश मिळू शकेल— म्हणजेच ईटनचे दरवाजेदेखील स्पर्धात्मक परीक्षासाठी सर्वांना उघडे ठेवावे लागतील.

अशा धोरणामुळे कोणकोणते परिणाम घडून येतील त्याचे विवेचन शिक्षणासंबंधीच्या प्रकरणात आलेले आहे. निरनिराळ्या शैक्षणिक स्तरातील तफावत इतकी तीव्र आहे की, समान संधी उपलब्ध झाली तरीदेखील श्रेष्ठ आणि कनिष्ठ यांच्यातील ही प्रचंड दरी तशीच कायम राहील इतकेच मी या ठिकाणी नमूद करून ठेवतो. लहानपणीच मुलांची निरनिराळ्या शाळातून प्रत्यक्ष विभागणी झाल्यामुळे देखील ही परिस्थिती काही झाले तरी कायम राहू शकेल. परंतु त्याखेरीज ईटन (प्रवेशासाठी स्पर्धात्मक परीक्षा ठेवल्या तरी) आणि आधुनिक माध्यमिक शाळा यामधील तफावतीमुळे त्यात शिक्षण घेणारे विद्यार्थी आणि त्यांचे पालक यांच्या मनात गुणवत्तेवर आधारलेल्या शिक्षणपद्धतीबद्दल अस्मिता निर्माण होईल.

हा बडेजाव किंवा सामाजिक प्रतिष्ठा यांचाही केवळ प्रश्न नाही (तसा तो असता तरी त्यामुळे त्याचे महत्त्व कमी ठरले नसते). त्यातून वस्तुनिष्ठ तफावतीचे यथातथ्य स्वरूपही व्यक्त होते. पब्लिक आणि ग्रामर स्कूलमधील शिक्षण अतिशय उच्च दर्जाचे असते इतकेच नव्हे तर अगदी कामगार कुटुंबातून आलेला मुलगादेखील सेकंडरी मॉडर्न स्कूलऐवजी ईटनमधून शिक्षण घेऊन बाहेर पडला तर त्याचे बोलणेचालणे, पेहराव, रीतिरिवाज, दृष्टीकोण आणि एकंदर सर्वच जीवनपद्धती या बाबतीत तो संपूर्णपणे बदललेला दिसतो. म्हणजेच समाजातील लहान मुलांची श्रेष्ठ कनिष्ठ अशा स्वतंत्र सामाजिक वर्गात विभागणी झालेली असणार.

व्यक्तित्वाला आकार येण्याच्या वयातील अलगपणामुळे उत्तर आयुष्यात विषमतेची भावना निश्चित तीव्र स्वरूप धारण करते. सामाजिक रीतीभातीतील तफावत मोठेपणीही तशीच कायम राहते आणि त्यामुळे वर्गीय स्थान चटकन निर्देशित केले जाते इककेच नव्हे तर व्यवसाय आणि त्याबरोबरच उत्पन्न, सत्ता आणि व्यावसायिक दर्जा यासारख्या प्रतिष्ठेच्या इतर बाबींच्या बाबतीत शैक्षणिक पार्श्वभूमीला उत्तरोत्तर फार महत्त्वाचे स्थान प्राप्त होत असल्याने मोठ्या माणसांच्या प्रतिष्ठेतील तफावतीचे क्षेत्र खूपच वाढत जाते. कारण शैक्षणिक दर्जाच्या

बाबतीत आधीच जी तफावत असते ती मोठेपणी निरनिराळया व्यवसायात पडल्या-वरही तशीच लादली जाते.

ही तफावत इतकी व्यापक असते की वरिष्ठ वर्गात प्रवेश करून घेण्याची सर्वांना सारखी संधी प्राप्त करून दिली तरी देखील तेवढयाने सामाजिक विषमतेमुळे निर्माण होणारा सगळा असंतोष आणि वैफल्य दूर होऊ शतत नाही. कारण एक तर वयाच्या अगदी अकराव्या वर्षी अशी संधी ज्यांना प्राप्त होते त्या मुलांना किंवा त्यांच्या पालकांनाही ती संधी खरोखरीच सर्वांना समान आहे असे वाटत नाही. त्यानंतर घडून येणाऱ्या बदलाची व्यवस्था कितीही जरी पद्धतशीर असली तरी-देखील ११ व्या वर्षी जी मुले चाचणी परीक्षेत नापास होतात त्यांना ती परीक्षा जरा उशीरा घेण्यात आली असती तर निकाल निराळाच लागला असता असे कायम वाटत राहिले असते आणि आता इतक्या वर्षानंतर मागे वळून पाहता इतक्या लहानपणी आपल्याला जीवनातील निकृष्ट पातळी दिली गेली त्यावेळी त्याचे महत्त्व समजण्याचे देखील आपले वय नव्हते असे मनात येऊन त्यांना त्याचा राग येतो.

त्यांना आलेल्या सर्व अपयशावरूनच त्यांना समानसंधी मिळाली होती हे सिद्ध होत असले तरी त्यामुळे त्यांच्या मनातील असंतोष कमी होत नाही. उलट तो वाढीला लागण्याचाच संभव अधिक. ज्यावेळी संधीच्या बाबतीत विषमता आहे हे माहीत असते आणि निवड करतांना संपत्ती किंवा घराण्याचा विचार प्रथम केला जातो त्यावेळी निवड न झालेल्या लोकांना निदान एवढे तरी समाधान वाटत असते की आपल्याला बरोबर संधीच मिळाली नाही, निवड करण्याची पद्धतीच अन्याय्य होती आणि परिस्थिती आपल्याला अत्यंत प्रतिकूल होती. परंतु निवड ही उघड उघड गुणवत्तेवर होत असेल तर समाधानाची ही बाजूही राहात नाही. आणि अपयशामुळेच ते न्यूनगंडाच्या भावनेने संपूर्णपणे घेरले जातात. त्याचे समर्थन करण्याचा कोणता मार्गच त्यांच्यापाशी रहात नाही. आणि मग मानवी स्वभावा-नुसार इतरांच्या निवडीमुळे त्यांच्या मनातील मत्सराची आणि असंतोषाची भावनाच उलट वाढीस लागते. वर दिलेल्या स्पर्धात्मक विरोधी सिद्धांताचे जे विवेचन केले आहे त्याचे खरे सार हेच आहे की, मोबदल्यातील मिषमता प्रमाणाबाहेर जास्त असेल तर समान संधी निर्माण करून दिल्याने अतिशय तीव्र स्पर्धा सुरू होईल आणि त्यामुळे वैफल्य आणि असंतोष यात वाढ होण्याचा धोका खरोखरीच निर्माण होईल.

आता एकूण लोकसंख्येच्या दृष्टीने असंतोषात झालेली ही वाढ त्याबरोबरच येणाऱ्या फायद्यांनाही मागे टाकील की काय हे कोणीच सांगू शकणार नाही. महत्त्वाचा मुद्दा आहे तो हाच की, समान संधीबरोबरच समाजातील उच्चभ्रू मंडळी आणि इतरेजन यांच्यात काटेकोर बंधने असतील (स्कँडेनेव्हिया किंवा उत्तर

अमेरिकेत नसली तरी ब्रिटनमध्ये अशी परिस्थिती असू शकेल) तर पराकोटीच्या विषमतेमुळे निर्माण होणारा सर्व प्रकारचा असंतोष दूर होऊ शकणार नाही. उलट काही विशिष्ट प्रसंगी तो अधिकच तीव्र बनेल.

न्यायाच्या दृष्टीकोणातून याहूनही ठोकळ स्वरूपाचा मुद्दा पुढे मांडला जातो. अगदी निवडक अशा श्रेष्ठ लोकांकडून देखील आपल्यावर सत्ता गाजविली जावी असे लोकांना वाटत नाही. त्यांना असे वाटते की, कोणत्याही कारणास्तव अशा तऱ्हेची विषमता समर्थनीय ठरू शकत नाही. त्यांच्या दृष्टीने सारी समाजपद्धती मूलतःच अन्याय्य आहे. आणि त्यांच्या या भावनेत बरेचसे तथ्यही आहे. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने पाहिले तर वंशपरंपरेने चालत आलेल्या प्रभुत्वापेक्षा बुद्धिमत्ते-मुळे प्राप्त होणारे प्रभुत्व ही पुढची पायरी आहे हे कबूलच करावे लागेल. कारण आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर प्रभुत्व संपादन करण्याची संधी कोणालाही नाकारली जात नाही. व्यक्तिगत मूल्यांच्या दृष्टीने पहाता हा न्यायावर आधारलेला समाज आहे असे मी मानीत नाही.

यावरून असे ध्वनित होते की, मोबदल्यातील विषमता आणि विशेषा-धिकार यांची विभागणी मानवी व्यक्तित्वातील एका विशिष्ट प्रवृत्तीनुसारच सर्वस्वी होत असते. कारण कोणत्याही क्षेत्रात निवड करावयाची झाली तरी व्यवहारतः ती माणसाच्या अंगातील कमी जास्त प्रमाणात माहीत असलेल्या आणि मूल्यमापन करता येण्यासारख्या काही मोजक्या वैशिट्यांच्या आधारेच करावी लागणार. बुद्धिमत्ता हा निकष ठरविण्यात आला आहे असे धरू. खास वागणूक देण्याच्या दृष्टीने हाच निकष का निवडला जावा ? बुद्धिमत्ता ही देखील आई-वडिलांच्या सामाजिक दर्जामुळे प्राप्त होत असते; अनुवंशिकता आणि फायदेशीर ठरणारे संगोपन या बाबी श्रेष्ठ दर्जाच्या बुद्धीमत्तेच्या दृष्टीने महत्त्वाच्या ठरतात. आणि ज्या बाबतीत स्वतःची जबाबदारी फारच थोडी असते अशा बाह्य गुणांसाठी एकाला मोबदल्याच्या बाबतीत इतका उदारपणा दाखवावयाचा आणि दुसऱ्याला मात्र कडक शासन करावयाचे हे योग्य ठरणार नाही.

परंतु एकादा गुण किंवा गुणांचा समुच्चय उपजत असो किंवा नसो, केवळ तेवढ्यावरून जीवनातील यशापयश, श्रीमंती अथवा गरिबी किंवा श्रेष्ठ अथवा कनिष्ठ दर्जाची प्रतिष्ठा का म्हणून लादली जावी ? साधुवृत्ती, उदारता, करूणा, विनोद, सौंदर्य, व्यासंग, संयम किंवा कलागुण यांनाही काही मार्क का देऊ नयेत ? हा प्रश्न उपस्थित करण्यामागे बुद्धिमत्तेबद्दल काही आकस आहे असे मुळीच नाही—विशेष मोबदला देण्यासाठी बुद्धिमत्तेऐवजी दुसरा एखादा निकष लावण्याचे ठरले तरी देखील परिस्थिती आहे तीच राहणार. ज्या अनेक गुण समुच्चयांचे मिळून मानवी व्यक्तिमत्व बनत असते त्यापैकी काही निवडक बाबींकडे बोट दाखवून त्याच पराकोटीच्या विषमतेच्या मुळाशी आहेत असे मानणे न्यायाचे होणार नाही.

वरिष्ठ वर्गाच्या प्रभुत्वाविरुद्ध मांडण्यात येणाऱ्या भूमिकेचे खरे नैतिक अधिष्ठान हेच आहे.

अर्थात अलौकिक कर्तृत्वाची मुक्तहस्ताने खातिर केली जाते याला काही व्यवहार्य कारणे आहेत हे उघड आहे. आणि हे कर्तृत्व समाजाच्या सेवेसाठी पुढे यावे म्हणून अशा प्रकारे विशेष खातिर न करणारा समाज मूर्खच म्हणावा लागेल. परंतु त्यासाठी इतरेजनांपेक्षा निराळे शिक्षण मिळालेला आणि खास निवड केलेला असा निवडक लोकांचा स्वतंत्र वर्ग निर्माण करणे आवश्यक होऊन बसत असेल तर त्याला आर्थिक कार्यक्षमतेसाठी द्यावी लागणारी गैरवाजवी सवलत असेच संबोधावे लागेल. आणि वस्तुत: ती न्याय्य आहे असे म्हणता येणार नाही. परंतु स्कँडेनेव्हिया किंवा अमेरिका या देशात ही निवड अत्यंत कार्यक्षमतेने केली जात असूनही तेथे सामाजिक समतेचे प्रमाण किती तरी जास्त आहे. हे पाहिल्यानंतर प्रचलित शिक्षण पद्धतीखालील आजच्या ब्रिटनमध्ये विषमता आणि वर्गीय तटबंदीमुळे निर्माण झालेले कर्तृत्वाच्या बाबतीतील श्रेष्ठत्व हे कार्यक्षमतेच्या कारणास्तव व्यवहारात कधीही समर्थनीय ठरू शकणार नाही असे मी समजतो.

समते संबंधीचा तिसरा मुद्दा असा आहे की, त्यामुळे सामाजिक उधळपट्टी कमी होते. परंतु वरिष्ठ जागांसाठी स्पर्धात्मक निवडीऐवजी वंशपरंपरेने निवड केल्यामुळे होणारी उधळपट्टी बुद्धिमत्तेच्या निकषावर निवड होऊ लागल्याने वाचत असली व त्यामुळे श्रेष्ठ बुद्धिमंताचा वर्ग खूप फायदेशीर ठरत असला तरी देखील वयाच्या अकराव्या वर्षीच मुलांची निरनिराळ्या गटात विभागणी झाली आणि ब्रिटनसारख्या एखाद्या अगदी निराळ्या देशातील समाज प्रवाहात ते घर करून बसले– आणि ब्रिटनमध्ये आज तशीच परिस्थिती आहे– तर अप्रतिहतपणे सामाजिक सरमिसळीला खीळ पडल्यामुळे विनाकारण जो खर्च होतो त्याला आळा बस-णार नाही. तसेच त्यामुळे सदिच्छा आणि व्यापक व्यक्तिगत अनुभव यांचा जो संकोच होतो तोही थांबणार नाही.

यामुळे जो एक विशिष्ट परिणाम घडून येतो (त्याकडे अनेकदा लक्ष वेध-ण्यात आलेले आहे) त्यामुळे राजकीय दृष्टयाही फार मोठी अस्वस्थता निर्माण होते. शिष्यवृत्त्या किंवा अनुदान देऊन कामगार वर्गातील कुशाग्र बुद्धीच्या मुलांना स्वतंत्र आणि उच्च प्रकारचे शिक्षण देऊन त्यांना कामगार वर्गापासून अलग कर-ण्यात आले तर तो वर्ग आपोआपच मिळणाऱ्या नेतृत्वाला मुकेल आणि एक तर त्या वर्गाला दुय्यम दर्जाच्या नेतृत्वावर विसंबून रहावे लागेल किंवा सर्वसामान्य कामगारांपेक्षा शैक्षणिक अनुभव अगदी निराळा असल्यामुळे कामगार वर्गाच्या मनोभूमिकेशी जे कधीच समरस झालेले नाहीत आणि त्यामुळे जे कामगारांचे खरे प्रतिनिधीत्व करू शकत नाहीत अशांचे नेतृत्व पत्करावे लागेल. समाजातील बुद्धिमत्तेचे नवनीत शोधून काढणाऱ्यांना भावी बेव्हिन आणि मॉरिसन त्यांच्या

लहानपणीच सापडतील आणि त्यांना समाजातील वरिष्ठ वर्गातील मुलांसारखे शिक्षण देण्यासाठी त्यांची धावपळ सुरू होईल. त्यामुळे कामगार संघटनांचे नेतृत्व खाली राहिलेल्या गळाठ्याकडे जाईल आणि मजूर पक्षाचे नेतृत्व मात्र संपूर्णपणे ईटनच्या माजी विद्यार्थ्यांचे हाती जाईल. लोकशाहीच्या गुणवत्तेच्या दृष्टीने हे इष्ट नसले तरीही वरिष्ठ वर्ग निर्माण करणाऱ्या शिक्षणपद्धतीचा तो अपरिहार्य परिपाक म्हणावा लागेल.

सर्वसामान्य जनतेपासून स्वभावतःच वरिष्ठ वर्ग अलिप्त राहतो या व्यापक मुद्याची ही एक बाजू झाली. त्यामुळे लोकांना खरोखरी काय पाहिजे आहे त्याचे त्यांना आकलन होत नाही आणि उतावळेपणाने लोकांना जे हवे आहे असे त्यांना वाटते ते त्यांना मिळवून देण्याकडे त्यांचा कल असतो. म्हणून आपली शासनपद्धती कार्यक्षम आणि उपकारक अशी तर असली पाहिजे पण त्याबरोबरच त्यामागे मूलतः पितृप्रधान संस्कृतीचा दृष्टिकोण असला पाहिजे. शेलक्या लोकांच्या सरकारात अनुदार दृष्टीकोण आणि श्रेष्ठ दर्जा हे गुण अंगभूतच असतात. त्यामुळे समाजवाद्यांनाच नव्हे तर कोणाही लोकशाहीवाद्याला त्यावद्दल संशय वाटू लागतो.

यावरून ब्रिटनमध्ये समान संधी आणि सामाजिक अभिसरण असले आणि त्यामुळे तेथील बुद्धिमत्तेची विभागणी अत्यंत कौतुकास्पद असली तरी तेवढ्याने भागणार नाही असाच निष्कर्ष काढावा लागेल. काही समाजशास्त्रज्ञ प्रतिपादन करतात त्याप्रमाणे त्यांचा अधिक्षेप करण्याची जरूरी नाही. परंतु मोबदल्यातील फार मोठ्या प्रमाणावरील तफावतीमुळे उद्भवणारा सामुदायिक स्वरूपाचा असंतोष, विषमतेमुळे निर्माण होणारा अन्याय आणि वर्गीय तटबंदीचे प्रमाण कमी करण्यासाठी योजावयाच्या उपायांची त्याला जोड मिळाली पाहिजे. समाजवादी दृष्टिकोणातून पाहता मर्यादित स्वरूपाचे ध्येय पुरेसे ठरणार नाही.

● ● ●

# प्रकरण अकरावे

# काही समताविरोधी विधाने आणि अमेरिकेचे उदाहरण

## १. आर्थिक कार्यक्षमतेला धोका

अधिक प्रमाणावरील समतेच्या उद्दिष्टांसंबंधी सर्वसाधारणपणे जे आक्षेप घेतले जातात त्यांपैकी काही मुद्यांचा विचार या प्रकरणात करावयाचा आहे. त्याच-प्रमाणे अमेरिकेतील परिस्थितीच्या संदर्भात सामाजिक समतेवर परिणाम घडवून आणणाऱ्या बाबींचाही उहापोह करावयाचा आहे.

एकीकडे उत्पादन वाढ आणि राहणीमान यात वाढ होत असतानाच दुसरीकडे प्रोत्साहक योजना, शिलकी रकमेचा पुरवठा आणि सर्वसाधारण आर्थिक कार्यक्षमता यावर घडून येणाऱ्या प्रतिकूल प्रतिक्रियांमुळे समानतेवर जे परिणाम घडून येण्याचा संभव असतो त्यावर आक्षेप घेणे आज अत्यंत फॅशनेबल होऊन बसले आहे. या पुस्तकात अधिक प्रमाणावरील समतेसंबंधी जे विवेचन करण्यात आले आहे त्या संदर्भात ही टीका फारशी लागू पडत नाही. वर्गीय विषमतेला कारणीभूत असणाऱ्या अभिसरण आणि तदनुशंगिक इतर बाबींची यादी आठव्या प्रकरणात दिलेली आहे. त्यापैकी अभिसरणाची बाब विचारात घेता अभिसरण वाढत गेले तर कार्यक्षमतेच्या दृष्टीने ते निश्चितच इष्ट ठरेल हे उघड आहे. कारण संपत्ती किंवा घराण्याची पूर्वपीठिका येवढेच ज्यांचे भांडवल आहे त्यांना बाजूला काढले तर देशाच्या आर्थिक नेतृत्वाचा आवाका वाढेल. अंतरासंबंधीच्या ज्या इतर बाबी आहेत त्यापैकी शैक्षणिक दर्जा, जीवनपद्धती, खर्चाचे स्वरूप किंवा व्यावसायिक प्रतिष्ठा यात अधिक समानता आली तर त्यामुळे विशेष नुकसान कसे काय होऊ शकेल ते कळणे कठीण आहे. या प्रत्येक बाबतीत स्वीडन आणि अमेरिका या दोनही देशात कितीतरी अधिक समता आहे आणि तरी देखील तेथे उत्पादनाच्या बाबतीतही तितकीच कार्यक्षमता आहे. निदान आपल्याशी तुलना होऊ शकेल इतकी तरी खासच आहे.

अंतराच्या बाबींपैकी सर्वांत जास्त लागू पडणारा मुद्दा संपत्तीच्या वाटपासंबंधीचा. या बाबतीत समतेत वाढ होत जाईल तसतशी व्यक्तिगत शिल्लक घटत जाईल हे एकदम मान्यच करावे लागेल. परंतु केवळ काही लोकांना आपली व्यक्तिगत शिल्लक वाढवीत राहता यावे एवढ्यासाठी मोठ्या प्रमाणावर विषमता राहू द्यावयाची म्हणजे या प्रश्नाबाबत काहीशी एकांगी भूमिका स्वीकारण्यासारखेच आहे. म्हणून हा मुद्दा वस्तुतः उद्दिष्टांची पूर्तता होत नाही म्हणून उपस्थित केला जात नसून अन्य मार्गांनी पुरेशी शिल्लक टाकण्याच्या हेतूनेच करण्यात येत असला पाहिजे असे मला वाटते. एकोणिसाव्या आणि विसाव्या प्रकरणात यासंबंधीचा उहापोह करण्यात आला आहे.

परिश्रम आणि संशोधन यास प्रोत्साहन मिळण्यासंबंधीच्या मुद्याबाबत सर्वसाधारण असे फारसे काही सांगता येण्यासारखे नाही. मी यापूर्वी दिग्दर्शित केल्याप्रमाणे आर्थिक मानसशास्त्रासंबंधीचे आपले सध्याचे ज्ञान लक्षात घेता कोणतेही निश्चयात्मक विधान ठोकून देणे योग्य होणार नाही—यापूर्वीच याची जाणीव आपल्याला झाली नसेल तर युद्धोत्तर काळात कर वाढीचे प्रोत्साहकतेवर काय परिणाम घडून येतील यासंबंधी वर्तविण्यात आलेली सर्व भाकिते खोटी ठरली आहेत यावरून तरी निदान त्याची प्रचीती येण्यास हरकत नाही. शिवाय प्रोत्साहनासंबंधीचा सर्व प्रश्न हा जितका आर्थिक स्वरूपाचा आहे, निदान तितका तरी तो सांस्कृतिक स्वरूपाचाही आहे. वाजवी मोबदल्यासंबंधीच्या परंपरागत कल्पना निर्विकल्प किंवा कधीही न बदलणाऱ्या अशा नसतात, आणि आपली जी काही माहिती आहे त्यावरून पहाता दहा वर्षानंतर आजच्यापेक्षा त्यात खूपच फरक झालेला असण्याचा संभव आहे.

कामाच्या उत्पन्नाचे फेरवाटप करण्याच्या काही पद्धतींमुळे— विशेषतः काठावरच्या उत्पन्नावर फार मोठे कर लादणे— अनिष्ट परिणाम घडून येण्याची शक्यता आहे असे आपण यथार्थपणे म्हणू शकू हे खरे. परंतु त्यामुळे समताची बाजू फारशी कमकुवत होत नाही. सर्वांत जास्त विषमता निर्माण होते ती संपादित उत्पन्नाच्या वाटपामुळे होत नाही तर वडलोपार्जित भांडवलाच्या मालकीमुळे होते. संपादित उत्पन्नात अधिक समानता असली पाहिजे असा आपला आग्रह असेल तर मागील प्रकरणात सुचविलेल्या उपयांचाच आपणाला हळू हळू अवलंब करावा लागेल. परंतु समानता आणि आर्थिक विकासाचे प्रमाण वाढवणे हा सर्व प्रश्न पाचव्या भागात हाताळण्यात आला आहे.

## २. संस्कृतीला धोका

समतेविरुद्ध घेण्यात येणारा दुसरा आक्षेप अधिक मूलभूत स्वरूपाचा आहे. कारण तो आर्थिक किंवा व्यावहारिक उपयुक्तता यावर आधारलेला नाही तर उत्पादनावर प्रतिकूल परिणाम घडून येत नाही असे धरले तरी सुद्धा समानता वाढत

गेली तर त्याची परिणती 'चांगला' समाज निर्माण होण्यात होईल हे मूलभूत मूल्यमापनच त्यात नाकारण्यात येते. समता आणि संस्कृती परस्पर विरोधी असतात या समजुतीवरच मुलतः आधारलेल्या या दृष्टीकोणाचा इतिहास फार जुना आहे. परंतु प्रस्तुत चर्चेसाठी मी एम्. बर्ट्रांड डी. जोव्हेनेल याने व्यक्त केलेल्या विचारांचा आधार घेणार आहे.

एम. डी. जोव्हेनेलचे प्रतिपादन असे आहे की, संपत्तीच्या समानतेवर आधारलेल्या वाटपामुळे, 'सम्यक' परिस्थिती निर्माण होईल, पण ती फक्त आत्मनिष्ठ गरजांच्या संदर्भात. म्हणजे त्याला असे म्हणावयाचे आहे की, त्यामुळे उपयुक्ततेच्या दृष्टीने आर्थिक समाधान मिळू शकेल. अशा तऱ्हेने उत्पन्नाकडे केवळ व्यक्तिगत ग्राहकाच्या समाधानाचे साधन म्हणूनच केवळ बघितले पाहिजे या गृहीतकृत्यावरच समानतेची मागणी आधारलेली असते, आणि या संकुचित दृष्टीने पाहता समान वाटपामुळे आपल्याला आर्थिक आदर्श गाठता येईल. परंतु ह्यामुळे बिगर-आर्थिक निकषांच्या दृष्टीने आपल्याला आदर्श समाज प्राप्त होऊ शकणार नाही; कारण फेरवाटपाच्या प्रक्रियेत इतर क्षेत्रात– विशेषतः सध्या श्रीमंत वर्गाच्या आश्रयावर चालणारे कलात्मक आणि सांस्कृतिक कार्यक्रम तसेच उत्तम प्रकारचे संभाषण, आदरातिथ्य, परदेशातील प्रदीर्घ प्रवास, स्वेच्छेने विनावेतन केलेले काम यांसारखे सामाजिक दृष्ट्या उपयुक्त असलेले फुरसदीने करावयाचे व्यवसाय बंद पडणे अपरिहार्य आहे– फार मोठे नुकसान सोसावे लागेल. सरकारने याबद्दल दुसरी काही तरी तरतूद करूनही चालणार नाही. कारण एक तर ती तितकी कार्यक्षम असणार नाही आणि त्यामुळे सरकारी कामकाजात निष्कारणच वाढ होत राहील. भौतिक स्वरूपाचे नसलेले हे तोटे एकदा आपण लक्षात घेतले म्हणजे संपत्तीच्या बाबतीत समानतेचे प्रमाण वाढले तर त्यामुळे बहुसंख्य लोक ज्याला 'चांगला' समाज म्हणतात त्याचा उदय होण्याऐवजी उलट त्याला निश्चितपणे धोकाच निर्माण होईल. (अर्थात अर्थशास्त्रज्ञांनी, श्रीमंतांनी केलेल्या खर्चाचा बाह्य काटकसर म्हणून फार पूर्वीच उल्लेख करून ठेवलेला आहे हे नमूद करणे न्यायाचे होईल.)

सांस्कृतिक मूल्यांची यत्किंचितही कदर नसणारे भौतिकवादी किंवा निरक्षर गांवढळ म्हणून आपली संभावना होईल अशा विकृतीने पछाडलेल्या समाजवाद्यांना हे आक्षेप हमखास भुरळ पाडतात. आणि सांस्कृतिक दृष्ट्या नुकसान होणे खरोखरीच अपरिहार्य आहे असे आपण मानले तर सर्वस्वी उपयुक्ततावादावर आधारलेली समानतेचा पुरस्कार करणारी बाजू ढासळून पडते असे वाटण्याचा संभव आहे– अर्थात हे ज्या त्या व्यक्तीच्या मूल्यमापनावर अवलंबून राहील. परंतु नवव्या प्रकरणात हे स्पष्ट करण्यात आले आहे की, अधिक प्रमाणावर फेरवाटप करण्याच्या आवश्यकतेचा मुद्दा आता उपयुक्ततावादी दृष्टीकोण, आर्थिक समाधान किंवा

समाजिक कल्याण यापैकी कशावरच आधारलेला नसतो. याहून जास्त फेरवाटप झाले तर आर्थिक कल्याणात वाढ होईलच असे निश्चितपणे सांगता येत नाही हे तर वस्तुत: मी निक्षून बजावले आहे. हे प्रतिपादन, एस. डी. जोव्हेनेल याने केलेल्या प्रतिपादना-इतकेच बिगरआर्थिक मूल्यांसंबंधीचे निकष आणि चांगला समाज कशाला म्हणा-वयाचे याबाबतचा दृष्टीकोण यावरही आधारलेले आहे. आर्थिक उपयुक्ततावादाचा मुद्दा अमान्य केला तर या प्रतिपादनात कोणताही उणेपणा येत नाही. सांस्कृतिक नुकसान आणि सामाजिक न्याय किंवा संतोष यात होणारी वाढ यांची वजावाट करून काय तो निष्कर्ष काढावा लागेल इतकेच.

या फायद्यातोटयाचा विचार करताना दोन मुद्दे उपस्थित होतात. त्यापैकी पहिला मुद्दा असा की, सांस्कृतिक नुकसान होणे अपरिहार्य आहे असे वादाकरता गृहीत धरले तर ते नुकसान टाळण्याकरता दुसऱ्या बाजूला सामाजिक न्याय आणि संतोष यासाठीं किती प्रमाणात नुकसान सहन करावे लागणार आहे ? म्हणजेच किती मोठी विषमता सहन करावी लागणार आहे ? आणि दुसरे असे की, विसाव्या शतकाच्या मध्यावर असलेल्या ब्रिटनमध्ये मुळात सांस्कृतिक नुकसान होण्याची शक्यता तरी आहे काय ?

एक तर, किती विषमता असणे जरूर आहे असे मानले जाते ?— कदाचित तिचे प्रमाण बरेच मोठे असण्याचाही संभव आहे. उदाहरणार्थ सांस्कृतिक कार्या-बरोबरच विषमताही वाढत जात असती तर, म्हणजेच सांस्कृतिक बाबींवरील खर्च ही श्रीमंतांच्या खर्चातील अगदी काठावरची बाब असेल तर, सर्वसामान्य जनतेची पिळवणूक करून श्रीमंतांना अधिक श्रीमंत बनविण्यास हरकत नाही. कारण त्यामुळे सांस्कृतिक खर्चात त्या प्रमाणात तीव्र स्वरूपाची वाढ होत जाईल. अर्थात त्याबरो-बर गुलामगिरी येणार हे बहुधा तर्कसंगतच ठरते. एका ग्रीक लेखकाने म्हटले आहे की, "लोकांना आपली सौंदर्यविषयक दृष्टीची झेप वाढावी असे वाटत असेल तर गुलाम पदरी बाळगण्याचे फायदे फुगवून सांगता येणार नाहीत." दुर्दैवाने सांस्कृतिक कार्याविषयी उत्साह दाखवणारे सर्वच जण क्लाइव बेल इतके स्पष्टवक्ते नसतात. क्लाइव बेलने असे म्हटले आहे की, "संस्कृतीच्या विकासासाठी भरपूर फुरसद असणारांचा वर्ग असावा लागतो आणि अशा वर्गासाठी गुलामांची आवश्यकता असते....विषमतेवरच सर्व संस्कृतींचा डोलारा उभा आहे. अथेन्समधल्या लोकां-पाशी गुलाम असत; फ्लॉरेन्सच्या संस्कृतीत ज्यांनी भर घातली तो वर्ग मता-धिकार नसलेल्या कामगार वर्गाच्या जिवावरच टिकून राहू शकला; एस्किमो किंवा त्यांच्यासारख्या अन्य समाजालाच सामाजिक न्यायाचा आशिर्वाद लाभलेला असतो."

ज्यांना ही विचारसरणी मान्य आहे आणि इतर कोठल्याही मूल्यांपेक्षा संस्कृतीलाच जे सर्वश्रेष्ठ समजतात त्यांच्या दृष्टीने त्यांनी मन मानेल तितक्या

विषमतेचा पुरस्कार करावा हे सरळ आहे; परंतु आजच्या जमान्यात अशी माणसे फार करून मिळणार नाहीत. परंतु अडचण अशी आहे की, सध्याचे समाजवादाच्या विरुद्ध असलेले बहुतेक सारे लेखक इतके स्पष्टवक्ते नाहीत. त्यामुळे त्यांच्या मूल्यांची स्पष्ट वर्गवारी ते सांगतच नाहीत. विशेषतः प्रश्न असा पडतो की, संस्कृतीच्या जपणुकीसाठी किमान युद्धपूर्व काळासारखी तरी उत्पन्नाची वाटणी झालेली असली पाहिजे अशी त्यांची मागणी असते का ? का संस्कृतीची सांगड समाजातील "इतर" चांगल्या बाबींशी घातली गेली पाहिजे हे मान्य करून समानतेच्या रोखाने आहे यापेक्षा जास्त वाटचाल होता कामा नये असे ते मानतात ? यापैकी ते कोणती भूमिका स्वीकारतात त्यावरून त्यांच्याविषयी वेगवेगळ्या भूमिका स्वीकाराव्या लागतील.

परंतु कोणत्याही परिस्थितीत समानतेत वाढ झाल्याने सांस्कृतिक बाबतीत नुकसान सहन करावे लागणे अपरिहार्यच आहे का ? श्रीमंत लोक पूर्वी सांस्कृतिक कार्यासाठी आपल्या संपत्तीचा जेवढा भाग खर्च करीत असत त्यापैकी किती भाग त्यांना आता गमवावा लागला आहे आणि सरकार, कामगारवर्ग किंवा इतर ज्या कोणाकडे तो भाग गेला असेल ते त्यापैकी किती भाग या कामासाठी खर्च करतील यावर बहुधा वरील प्रश्नाचे उत्तर अवलंबून राहील.

काही काळापूर्वीचे श्रीमंतांकडून सांस्कृतिक कार्यावर होणाऱ्या खर्चाचे प्रमाण कदाचित खूप मोठे असू शकेल—परंतु आजच्या ब्रिटनमध्ये निश्चितच ते तसे राहिलेले नाही. सरटॅक्स देणाऱ्यांच्या उत्पन्नांपैकी कला किंवा संस्कृति किंबहुना कोठल्याही बौद्धिक स्वरूपाच्या कार्यक्रमावर होणारा खर्च अगदीच क्षुल्लक असतो. त्यापैकी बहुतेक सर्व रक्कम आलिशान गाड्या आणि घरे, आरामात सुट्टी घालविण्याची विश्रांतिस्थाने, नोकरचाकर, उंची मद्य, उपहारगृहे, नाचरंग, मोठमोठ्या मेजवान्या इत्यादींवरच खर्च होऊन जातो. अशा बाबींवर होणाऱ्या खर्चाबद्दल आक्षेप घेण्याचेही काही कारण नाही. कारण पुष्कळदा त्या बाबींदेखील निःसंशय पुष्टीदायक ठरू शकतात. परंतु त्यामुळे समाजाच्या सांस्कृतिक दर्जात क्वचितच वाढ होते. कलेला उत्तेजन म्हणून अशा खर्चाची हमी देता कामा नये. सुसंकृत परदेशी पाहुण्यांचे केंब्रिजच्या सभागृहात आगतस्वागत झाले तर त्यामुळे ते कदाचित मोहून जातील आणि इंग्लंडमधील श्रीमंत वर्गाच्या राहणीला साजेसे आपले खास स्वागत झाले अशी त्यांची समजूत होईल परंतु स्थानिक टीकाकारांना तसे वाटण्याचे कारण नाही.

इतिहासात पूर्वी कधी आढळला नसेल इतका अशिक्षित श्रीमंताचा वर्ग अलीकडच्या काळात आपल्याकडे होऊन गेला असे कदाचित ब्रिटनला यथार्थपणे म्हणता येईल. निदान १९३९ पर्यंत म्हणजे उत्पन्नाच्या फेरवाटपाला गती मिळाली तोपर्यंत तरी खाजगी आश्रयदात्यांनी आपली संपत्ती चांगल्या रीतीने वापरली असे म्हणता

येणार नाही. त्या काळात ज्या अनेक वास्तू उभारल्या गेल्या त्यांचे कोणालाही स्मरण होईल. लंडनमधील अनेक जॉर्जियन इमारती ते वाचवू शकले नाहीत, न्यूयॉर्क किंवा शिकागोला हलवाव्या लागलेल्या नानाविध कलात्मक वस्तू आणि विद्यमान समाजाविरुद्ध त्यावेळच्या अनेक ख्यातनाम कलावंतांनी पुकारलेले उग्र बंड या सर्व गोष्टींची आठवण होते. अर्थात कलांना मिळणाऱ्या आश्रयाच्या निरनिराळ्या स्वरूपांबद्दल एकच असे विधान कधीच करता येणार नाही. काही वेळा खाजगी आश्रय संपूर्णपणे फायदेशीरही ठरलेला आहे. परंतु आपल्याला विद्यमान ब्रिटन याठिकाणी अभिप्रेत आहे. आणि याबाबतीत असे नक्कीच म्हणता येईल की, संपत्तीचे याहून अधिक वाटप झाल्यास सांस्कृतिक दृष्टया जो तोटा होईल तो इतका थोडा असेल की, ज्यांना त्या वाटपाचा फायदा मिळेल त्यांना, आणि सरकारला तो भरून काढता आला नाही तर ते अगदीच निकामी ठरले असे म्हणावे लागेल.

ज्यांच्याकडे संपत्तीचा ओघ वळतो त्यांनी यापैकी काही नुकसान का भरून काढू नये ? संस्कृती आणि विषमता यात काही कार्यकारण भाव आहे हे मान्य केले तर त्यांनी तो जरूर भरून काढला पाहिजे असेच आपल्याला म्हणावे लागेल. कारण किमान गरजा भागविल्यानंतर जे जादा उत्पन्न राहील ते सांस्कृतिक बाबींवर वाढत्या प्रमाणात खर्च होत गेले पाहिजे असे गृहीत धरलेले असते. उत्पन्नाच्या फेरवाटपामुळे ज्यांचा फायदा होतो ते, आणि ज्यांचे नुकसान होते ते अशा दोघांच्या बाबतीत निदान काही मर्यादेपर्यंत तरी हे विधान बरोबर असावे. कामगार वर्गाचे उत्पन्न वाढत्या प्रमाणात दारू, तंबाखू आणि जुगार यावर खर्च होते इकडे बोट दाखवून काही लोक वरील वस्तुस्थिती कबूल करणार नाहीत. परंतु तेराव्या प्रकरणात दाखवून दिलेल्या कारणास्तव हे प्रमाण आता निश्चितपणे झपाट्याने खाली येणार आहे. आणि आजदेखील कलाप्रदर्शन किंवा मैफलीमधील उपस्थिती, सार्वजनिक ग्रंथालयातून नेल्या जाणाऱ्या पुस्तकांची संख्या, नियतकालिकांचा खप, आणि आठवड्याच्या शेवटी सुट्टी घालविण्यासाठी लॉंग्लेट किंवा लुटनहू येथे होणारी गर्दी यावरून हेच उघड होते की, अलीकडेच मिळू लागलेले जादा उत्पन्न चांगल्या प्रकारे खर्च केले जात आहे. शिवाय त्यापैकी बरेचसे प्रवासावर ( समुद्रसफर त्याचप्रमाणे परदेश गमन ) खर्च होत असून काही प्रमाणात तरी त्याचा परिणाम लोकांची मने व्यापक बनण्यात होत असला पाहिजे.

परंतु खाजगी व्यक्तींच्यापुरते बोलायचे झाले तर (ऐतिहासिक स्वरूपाच्या इमारतींची देखभाल करण्याच्या बाबतीत ) निव्वळ तोटा होत असला तरी सार्वजनिक संस्थांनी तो भरून काढण्यास पुढे का येऊ नये ? एम्. डी. जुव्हेनेल म्हणतो की, खाजगी व्यक्तींपेक्षा त्यांच्याकडून कमी ‘ कार्यक्षमतेने ’ खर्च केला जाईल. मला

तरी असे का व्हावे ते समजू शकत नाही. खाजगी व्यक्तींकडून मिळणाऱ्या आश्रया-इतकाच लोकाश्रयही तुटपुंजा असतो असे इतिहास सांगतो—— एका बाजूला ग्रीक मंदिरे आणि पुनरुत्थानाच्या काळातील सर्वोत्कृष्ट कलाकृतीपासून तो दुसऱ्या टोकाला चौदावा लुई किंवा स्टॅलिन यांच्या मानाने सध्याची ब्रिटनमधील परिस्थिती त्या-मानाने पुष्कळच चांगली आहे. आर्ट कौन्सिल, कॉव्हेंट गार्डन, आर्ट गॅलरी, ब्रिटिश म्यूझियम, एडिंबरो फेस्टिव्हल, गंभीर स्वरूपाची नाटके, प्राचीन स्मारके, अनेक इतिहासप्रसिद्ध राजवाडे आणि व्यापक प्रमाणावर विश्वविद्यालये देखील सार्व-जनिक पैशावरच चालतात. आणि या सगळ्यांचे आश्रयदाते म्हणून सरकारने त्याबाबतीत कंजूषपणा दाखवला आहे किंवा त्यात अवास्तव हस्तक्षेप केला आहे असे होत नाही. परदेशातील सांस्कृतिक दौऱ्यासाठी अनेक स्वरूपाची अनुदाने दिली जातात. ती जर मिळाली नसती तर खाजगी व्यक्तींना इतका खर्च करून परदेशी जाणे परवडलेच नसते. ब्रिटनमधील उत्सवाच्या वेळी तरुण शास्त्रज्ञांना आपल्या अंगचे गुण प्रकट करण्याची पूर्वी कित्येक दिवसात मिळाली नसेल इतकी उत्तम संधी मिळाली. यावरून असे दिसून येते की, सर्वोच्च कलागुणांना सरकारकडून नुसती मदत मिळते असे नाही तर शासनातर्फे असे नवे नवे उपक्रमही सुरू केले जाऊ शकतात. विशेषतः शहरांच्या आणि ग्रामीण भागाच्या नियोजनात अनेक चुका झालेल्या आहेत तशाच काही उणीवाही राहून गेल्या आहेत. परंतु संपत्तीचे याहून जास्त फेरवाटप झाले तर त्याची झळ ब्रिटनमधील ज्या सधन वर्गांना बसणार आहे त्यांनी कला किंवा संस्कृती यांना आश्रय देण्याच्याबाबतीत जी कामगिरी बजावली होती त्यापेक्षा सरकारकडून कमी कामगिरी बजावली जात आहे किंवा बिघाड केला जात आहे असे मानण्याला कोणतेही सबळ कारण नाही आणि या-पुढेही सरकारकडून तसे काही घडेल असा संभव नाही.

शेवटी लोकाश्रयाची व्याप्ती वाढली तर आपल्या स्वातंत्र्याचा संकोच होत जाईल अशी भीती व्यक्त केली जाते. आता विशिष्ट परिस्थितीत सरकारी नोकर-शाही वाढत जाण्याचा खराखुरा धोका सहजच संभवतो. पुढील भागात त्यासंबंधी विवेचन केले आहे. परंतु संस्कृतीच्या क्षेत्रात या धोक्याचा विशेष गंभीरपणे विचार करण्याचे कारण नाही. लोकाश्रय हा बहुतेक नेहमीच कोणतीही काटेकोर बंधने नसलेल्या, किंबहुना जवळजवळ मुक्तपणे कार्य करणाऱ्या स्वतंत्र संघटनांपर्यंत विखुरलेला असतो. पार्लमेंटकडून त्याची जागरूकतेने छाननी होत असते आणि काही वृत्तपत्रांची तर त्यावर अत्यंत करडी नजर असते. सार्वजनिक पैसा खर्च केला जातांना खर्चावर सरकारचे नियंत्रण असता कामा नये. याबाबत सर्व पक्षांचे एक मत असते. आर्ट्स कौन्सिल किंवा युनिव्हर्सिटी ग्रँटस कमिशन म्हणजे हुकुमशाहीची नांदी होय असे सर्वसाधारणपणे म्हणता येणार नाही—— किंबहुना वस्तुस्थिती त्याच्या नेमकी उलट असते. कारण नागरिकांना अधिक शिक्षित आणि सुसंस्कृत

बनण्यास सहाय्य केल्याने उलट भावी हुकुमशाहीपुढे मान तुकविण्याच्या प्रवृत्तीला आळाच बसतो.

म्हणून समतेच्या रोखाने आणखी प्रगती केल्याने होणारे सांस्कृतिक नुकसान– जर तसे नुकसान निश्चितपणे होत असेल तर–– सार्वजनिक मदतीमुळे दूर होऊ शकणार नाही असे मानण्यास काही जागा आहे असे मला वाटत नाही. आणि पुढ पंचविसाव्या प्रकरणात मी हे दाखवणारच आहे की, जुने सामाजिक आणि आर्थिक शत्रू ज्या प्रमाणात आपण काबूत आणू त्या प्रमाणात सार्वजनिक संस्थांच्या सांस्कृतिक कार्यक्रमाला आपण अधिकाधिक अग्रक्रम दिला पाहिजे. तसेच आपला देश आणि जीवनपद्धती सुंदर आणि सुसंस्कृत बनविण्यासाठी आपण अधिक कल्पकतेने त्याचे नियोजन केले पाहिजे व त्यासाठी अधिक सढळ हाताने खर्च केला पाहिजे. ब्रिटिश भांडवलशाहीने ब्रिटिश समाजवादाला याबाबतीत फार चांगला आदर्श घालून दिला आहे असे कोणीच म्हणू शकणार नाही.

## ३. सामूहिक समाजाचा धोका

समानतेपासून संस्कृतीला असलेला तथाकथित धोका आणि 'बहुजनवादी समाजा'पासून असलेला तथाकथित धोका यांची पुष्कळदा गल्लत केली जाते. हे दोन अगदी स्वतंत्र मुद्दे आहेत, कारण लोकशाहीवादी बहुजन समाज आणि त्याबरोबर येणारी सामुदायिक संस्कृती ही बहुधा आधुनिक तंत्रविज्ञान, विकासाचे प्रमाण आणि सार्वत्रिक शिक्षण यामुळे अटळ ठरत असावी. समाजातील समतेच्या प्रमाणाशी ती निगडित नसते. तथापी समाजांत लोकशाही आणि समता जितकी जास्त, तितका तेथील संस्कृतीला 'सामुदायिक' दर्जा प्राप्त होण्याचा आणि त्यामुळे ठोकळेबाजपणा येण्याचा व बुद्धिवादाला विरोध होण्याचा धोका अपरिहार्य. त्याचप्रमाणे त्यामुळे सांस्कृतिक पातळी घसरण्याचा संभवही जास्त असे कोणीही सहज म्हणू शकेल असे मला वाटते.

हा धोका कितपत गंभीर स्वरुपाचा आहे ? अमेरिकेत तो नेहमीच आत्यंतिक स्वरूपांत अस्तित्वांत असतो असे सांगितले जाते. उदाहरणार्थ युरोपात ज्यांना वरकरणी अत्यंत सन्मानाने वागविले जाते असे प्राध्यापक स्वतःच्या देशांत मात्र समाज आपल्याकडे तुच्छतेने बघतो अशी अनेकदा तक्रार करताना आढळतात. वस्तुतः समाजशास्त्रीय पहाणीवरून असे आढळून आले आहे की, अमेरिकेतील व्यावसायिक दर्जाच्या उतरंडीत तेथील प्राध्यापकांना युरोपइतकाच वरचा क्रमांक मिळालेला असतो. परंतु हा निष्कर्ष चुकीचा आहे आणि प्राध्यापकांना तेथे बराच खालचा दर्जा मिळतो असे मानले तरी बुद्धिवादाला तेथे असेलेला विरोध हे त्याचे कारण नसावे. अमेरिकेतील विद्यापीठांतून प्राध्यापक ही उपाधी इतकी सवंग झाली आहे की, सहाजिकच त्याची किंमत कमी होते किंवा

अधिक व्यापक अर्थाने बोलावयाचे तर अमेरिकेतील विद्यापीठांची युरोपातील विद्यापीठांइतकी व्यासंग आणि विद्वत्ता याबद्दल कधीच ख्याती नव्हती. त्यामुळे तेथील प्राध्यापकांकडे उपेक्षेने पाहिले जात असावे. कदाचित सर्वसामान्य अमेरिकन समाजाचाच तो एक भाग बनला असल्यामुळे किंवा निराळ्या शब्दांत सांगावयाचे तर सर्वसामान्य समाजच विश्वविद्यालयातून प्रतिबिंबीत होत असल्यामुळे अमेरिकेपासून खूप दूरवर असलेल्या युरोपातील प्राध्यापकांकडे ज्या निरतिशय आदराने बघितले जाते, तो मान यांच्या वाट्याला येत नसावा. अमेरिकेतील विद्यापीठ विद्वत्सभेसारखे नसते तर एखाद्या प्रचंड कारखान्यासारखे त्याचे स्वरूप असते. मुलाचा जन्म होण्यापासून तो त्याचे पूर्व प्राथमिक, प्राथमिक, माध्यमिक हे सारे शिक्षण, भावी वधु हेरणे, लग्न करणे, धार्मिक मनःशांती मिळविणे आणि मनोविकृतीवर उपाययोजना करून घेणे या साऱ्या गोष्टी तेथे होत असतात, वृत्तपत्रे चालवणे, हिशेब ठेवणे, पाकशास्त्र या सगळ्यांचे शिक्षण तेथे दिले जाते. सहाजिकच या साऱ्या साम्राज्याचा कारभार पहाण्यासाठी विद्यापीठांकडून मोठमोठे सेनापती भाड्याने लावले जातात यांत आश्चर्य वाटण्याचे कांहीच कारण नाही.

सर्वसाधारणपणे, सांस्कृतिक बाबातीतील अमेरिकेतील परंपरागत वृत्ती आणि तिचा निकृष्ट दर्जा यावर जो पूर्वीपासून भर दिला जात आहे त्याबद्दल मी जरा साशंक आहे. अमेरिकेतील गुळगुळीत कागदावरील मासिकांचा सांस्कृतिक दर्जा तशाच तऱ्हेच्या युरोपांतील मासिकांपेक्षा कितीतरी चांगला असतो. कारखान्यांतील वस्तू– मग ती रक्षापात्रे असोत, फर्निचर असो की, स्त्रियांना लागणारे हलक्या किंमतीचे कपडे असोत, अमेरिकेपेक्षा कमी समता असलेल्या ब्रिटनच्यामानाने खूपच चांगल्या असतात. फार करून चित्रपटांना न जाणाऱ्या बुद्धिवाद्यांची समजूत असते त्यापेक्षा हॉलिवूडमध्ये तयार होणाऱ्या चित्रपटांत ठरीव ठशाचा मालमसाला फार कमी असतो. बेसबॉलच्या सामन्यांपेक्षा अभिजात संगीताच्या मैफलीवर अधिक खर्च केला जातो. गेल्या दहा वर्षात पुस्तकांचा खप दुपटीने वाढला आहे. कामगार वर्गाच्या घरगुती, त्याचप्रमाणे उपहारगृहांतील खाद्यपदार्थांची विविधता आणि दर्जा इतका वाढला आहे की, त्याबाबत इंग्लंडशी त्याची तुलनाही होऊ शकणार नाही. आणि रूढिप्रियतेबद्दल बोलावयाचे तर तसे दडपण तेथे असते हे निःसंशय, परंतु तेथेही व्यापारी साचेबंदपणाविरुद्ध लोकांकडून सतत उठाव होत असतो आणि तो यशस्वीही होतो. उदाहरणार्थ व्यापारी हितसंबंधियांनी सुरू केलेल्या साचेबंद भसाड्या ‘ स्विंग संगीताऐवजी परंपरागत आणि पुरोगामी अशा ‘ जाझ ’ संगीताचे झालेले पुनरुज्जीवन.

तथापी अमेरिकेतील संस्कृती हे एक महाभयंकर कोडे आहे असे मानले तरी अमेरिकेइतकीच लोकशाही आणि समान संधी असलेल्या स्वीडनबद्दल मात्र तसे म्हणता येणार नाही. जगांतील कोठल्याही देशांतील विश्वविद्यालयीन जीवन

स्वीडनइतके श्रेष्ठ दर्जाचे असणार नाही. त्याचप्रमाणे तेथील 'विद्वान' आणि बुद्धि-जीवी यांच्याइतका उच्च दर्जाही इतरत्र पहावयास मिळणार नाही. स्वीडनमधील जनतेच्या संस्कृतीचा दर्जा तर विश्वविख्यात आहे. औद्योगिक वस्तूंचा कायम टिकविण्यात आलेला उत्कृष्ठ दर्जा, विस्तीर्ण सुखोद्याने, दुकानांतील विशिष्ट प्रकारची मांडणी, अलिशान लोकप्रिय उपहारगृहे, दुग्धमंदिरांतून देखील आढळ-णारी आधुनिक कलावंतांनी काढलेली उत्तमोत्तम चित्रे, घरांच्या वसाहतींत, त्याच-प्रमाणे नगर रचनेतील प्रसिद्ध ठिकाणी उघड्यावर ठेवण्यात आलेले पुतळे आणि तेथील आधुनिक वास्तुशास्त्र, यावरून त्याची प्रचीती येऊ शकते. आणि महत्वाची गोष्ट अशी की हा सगळा सांस्कृतिक विकास लोकाश्रयामुळेच घडून आलेला आहे. ग्रेट ब्रिटनपेक्षा स्वीडनमध्ये सामाजिक समतेचे प्रमाण अधिक आहे, त्याचप्रमाणे तेथील संस्कृतीचा सर्वसाधारण दर्जाही वरच्या श्रेणीचा आहे ही वस्तुस्थितीच असे सांगते की, या मुद्यावर निष्कारण घोळ घालण्याचे कांहीही कारण नाही.

### ४. स्वातंत्र्यावर घाला.

समानतेमुळे व्यक्तिगत स्वातंत्र्यावर घाला घातला जातो असे कधीकधी म्हटले जाते. 'झुंडी' कडून किंवा बहुजन समाजाकडून होणाऱ्या संभाव्य जुलुमाच्या संदर्भात म्हणजेच व्यापक राजकीय दृष्टिकोणातून अशी भूमिका मांडली जाते. या समुदायाचेच कोणत्याही उपक्रमांत सहाय्य घेतले जाते आणि तो तर स्वातंत्र्या-विषयी उदासीनच असतो. तसेच बिगरसाचेवंद विचारसरणीच्या तो विरुद्ध असतो आणि खरोखरीच सामुदायिक सत्ता असणे किंवा बहुजन समाजाने राजकारणांत भाग घेणे म्हणजे राजकीय स्वातंत्र्याच्या असुरक्षिततेला एक प्रकारे धोकाच. या अर्थाने लोकशाही आणि व्यक्तिगत स्वातंत्र्य हे कोणत्याही अर्थाने समानार्थक ठरत नाहीत– म्हणजे लोकशाही असली म्हणजे व्यक्तिगत स्वातंत्र्य असेलच असे संभवत नाही. अशा तऱ्हेने लाभलेल्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्यांविरुद्ध उभारलेल्या अत्यंत कडव्या आंदोलनालासुद्धा जनतेचा खराखुरा पाठिंबा मिळाल्याची उदाहरणे अगदी अलिकडच्या इतिहासांत देखील सहज सापडू शकतात. फासिझम किंवा मॅकार्थिझम किंवा मुख्यतः कामगार वर्गाच्या पाठिंब्यावर आधारलेली कम्युनिस्ट चळवळ आणि 'पेरॉनिस्ट लेबर यूनियन्स' याकडे यादृष्टीने बोट दाखवता येईल. त्याचप्रमाणे अधिक शिकलेल्या लोकांपेक्षा कामगार कांही वेळी कमी उदार अस-तात हेही खरे असू शकेल (आणि ते कांहीसे सहाजिकही आहे). उदाहरणार्थ ते सुशिक्षितांपेक्षा अधिक ज्यूविरोधी, कॅथॉलिकविरोधी किंवा वंशविद्वेषाने भारलेले आणि विरोधीमताबद्दल अधिक असहिष्णु असू शकतात.

पण आपण ज्या मुद्याची चर्चा करीत आहोत त्याच्याशी याचा फारसा संबंध पोहोचत नाही. सध्या ब्रिटनमध्ये जी राजकीय लोकशाही नांदते आहे ती

चांगली सुस्थिर असून झुंडशाहीशी कोठल्याही प्रकारे निगडित नाही. ती प्रदीर्घ उदारमतवादी परंपरांवर आधारलेली असून विरोधी मतांबाबत ती कमालीची सहिष्णु आहे. आपण आपल्या समाजात याहूनही जास्त प्रमाणांत समानता प्रस्थापित केली तरीदेखील आपल्या संसदीय संस्था, उदार मतवादी परंपरा, व्यक्तिगत स्वातंत्र्याशी निगडित असलेले आपले राष्ट्रीय वैशिष्टय आपण टिकवून ठेवले पाहिजे. यावरून आपल्या राजकीय स्वातंत्र्याचा संकोच करण्याला पुरेसे कारण आहे असे वाटत नाही. अखेर शंभर वर्षापूर्वीपेक्षा आज आपल्या समाजांत अधिक सामाजिक समता आहे. परंतु बहुतेक लोक असेच म्हणणार की, आपले व्यक्तिगत स्वातंत्र्य देखील पहिल्यापेक्षा अधिक आहे. हा प्रवाह एकदम उलटा वाहू लागेल हे संभवत नाही, आणि व्यक्तिगत संकुचित दृष्टिकोणाचा प्रश्न घेतला तरी शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार झाला तर त्याही परिस्थितीत अर्थातच सुधारणा घडून येईल हे उघड आहे.

तथापि यावरही असा मुद्दा उपस्थित केला जाईल की, सत्तेमुळे स्वातंत्र्याला प्रत्यक्ष धोका संभवत नसला तरी काही विशिष्ट धोक्यांपासून विषमतेमुळे स्वातंत्र्याच्या नकारात्मक संरक्षणाचा धोका संभवतो. सरकारी नोकरशाहीत अपरिहार्यपणे होत जाणारी वाढ व नागरिकांच्या व्यक्तिगत जीवनावर पडणारा घाला किंवा अधिक व्यापक अर्थाने बोलावयाचे तर स्वखुषीने एकत्र आलेल्या गटांकडून (मग ते गट राजकीय, सामाजिक किंवा धार्मिक असे कोणत्याही स्वरूपाचे असोत) होणारा संभाव्य जुलूम यामुळे हा धोका उत्पन्न होतो. खाजगी साधनांवर मालकी प्रस्थापित करणे हा अशा धोक्यांपासून संरक्षण करण्याचा एक उपाय असू शकतो असे सांगितले जाते. त्यामुळे सरकारी खात्याकडून खाजगी साधनांवरील मालकी काढून घेण्याचा, इतकेच नव्हे तर सुसंघटित अशा ऐच्छिक संघटनांतून हकालपट्टी होण्याचा जो धोका असतो तो टाळण्यासाठी किंवा त्याच स्वरूपाच्या ज्या इतर प्रदीर्घ आणि खर्चिक मोहिमा उघडण्यात येतात त्यांना निदान काही भाग्यवान नागरिक तरी यामुळे आर्थिक हातभार लावू शकतात. याबाबतीत **क्रिचेलडाऊनचे** नाव डोळ्यासमोर येते. परंतु व्यक्तिगत स्वातंत्र्यासाठी आणि विरोध व्यक्त करण्यासाठी, केवळ पैशाचे भरपूर पाठबळ असल्यामुळेच जे यशस्वीपणाने लढले अशांची अनेक उदाहरणे इतिहासात सापडतात.

हा मुद्दा महत्त्वाचा असला तरी या पुस्तकात जो विषय हाताळण्यात आला आहे त्याला तो फारसा लागू पडत नाही. आतापर्यंत ज्या स्वरूपाच्या विषमतेसंबंधीचा उहापोह करण्यात आला आहे त्याच्या संदर्भात तर तो जवळजवळ अजिबातच गैरलागू ठरतो. संपत्तीच्या वाटपाचे असे एक क्षेत्र आहे की, जेथे हा मुद्दा लागू पडेल. परंतु तेथे देखील चुकून एखादा लक्षाधीश स्वातंत्र्याचा लढा लढावयास क्वचित तयार होईल किंवा त्यांतील एखादा तसाच चुकून कलांना आश्रय देणारा

ज्ञानसंपन्न आश्रयदाताही निघेल. पण म्हणून सर्वच्या सर्व लक्षाधीश शाबूत ठेवावयाचे असे करून चालणार नाही. संपत्तीची समानता इतक्या कडेला न्यावयाची की त्यामुळे कोणालाच तात्पुरते देखील कधी स्वयंपूर्ण होता येऊ नये किंवा परंपरागत विचारांना विरोध करावयाचा असेल तर त्यासाठी खाजगी साधनसामुग्रीचा आधार मिळू नये या विचाराशी हा मुद्दा सुसंगत नाही.

या देशात ही समस्या व्यवहारतः अतिशय कूट स्वरूपाची बनलेली नाही. कारण ब्रिटिश समाजवादी याबाबतीत इतकी एकांतिक भूमिका कधीच स्वीकारीत नाहीत, किंवा थोडक्या प्रमाणावर देखील खाजगी संपत्ती राहू द्यावयाची नाही असे त्यांचे धोरण नाही. मृत्यूकरात (डेथ ड्यूटी) सूट मिळण्याची मर्यादा १०० पौंडावरून २००० पौंडापर्यंत वाढवली ती अखेर मजूर पक्षाचे अर्थमंत्री डाल्टन यांनीच. त्याचप्रमाणे मजूर पक्षाने ही मर्यादा ३,००० पौंडांवर नेण्याचा आग्रह धरून त्याला सरकारी मान्यता मिळवून घेतली. मृत्यूकरासंबंधी मजूर पक्षातर्फे प्रसिद्ध करण्यात आलेल्या सबंध वाङ्मयात २०,००० पौंड किंवा त्याखालील मालमत्तेला कधीही विरोध दर्शविण्यात आलेला नाही.

वरील स्वरूपाच्या भांडवलामुळे बराच काळपर्यंत स्वातंत्र्य टिकवून धरता येईल. त्याचप्रमाणे मतविरोध किंवा परंपरेच्या विरुद्ध मतप्रदर्शन करणे किंवा नोकरशाहीकडून होणाऱ्या अन्यायाचा प्रतिकार करणे शक्य होईल हे उघड आहे. दुसऱ्या बाजूला इतपत भांडवल असणे समाजवादाच्या वाजवी उद्दिष्टांशी विसंगत ठरते असेही नाही. म्हणून (अधिक सुस्पष्ट अशा आर्थिक मुद्यांव्यतिरिक्त) सरसकट सर्वंकष समानतेविरुद्ध स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांकडून मांडण्यात येणाऱ्या भूमिकेत बरेच तथ्य असले तरी या पुस्तकात समतेचा ज्या प्रमाणात पुरस्कार करण्यात आला आहे त्याला कसलाच बाध येत नाही.

## ५. अमेरिकेतील सामाजिक समतेवर परिणाम घडवून आणणाऱ्या बाबी

ब्रिटनपेक्षा अमेरिकेत सामाजिक समता जास्त होती, त्याचप्रमाणे तेथे ब्रिटनइतकी वर्गभावना तीव्र नव्हती हे सहसा कोणीच नाकारणार नाही. त्यामुळे सामाजिक समतेवर परिणाम घडवून आणणाऱ्या बाबींच्या संबंधात अमेरिकेचे उदाहरण घेऊ. स्वीडनमधील परिस्थिती समाजवाद्यांच्या 'चांगल्या' समाजाच्या ध्येयाशी अधिक मिळतीजुळती आहे, म्हणजे समाजकल्याण, सामाजिक सेवा, याकडे तेथे अधिक लक्ष पुरविले जाते; संपत्तीच्या बाबतीत अधिक समानता आहे. तेथील औद्योगिक संबंधांच्या स्वरूपात अधिक एकजिनसीपणा आणि परस्पर सहकार्याची भावना आहे. तेथे समाजवाद्यांची वैशिष्टयपूर्ण सत्ता चालत आलेली आहे आणि तेथील सांस्कृतिक परंपराही निरतिशय मोठी आहे. म्हणून स्वीडनचे उदाहरण घेणे मी अधिक पसंत केले असते. परंतु अमेरिका हा असा एकच देश आहे की

त्यासंबंधी भरपूर समाजशास्त्रीय वाङ्मय उपलब्ध आहे. त्यामुळे कमी जास्त स्वरूपाचे एखादे निश्चयात्मक विधान करावयाचे झाले तर त्याला त्या वाङ्मयातून आधार काढून दाखवता येतो आणि म्हणूनच मला अमेरिकेची निवड करणे भाग पडले.

अर्थात या निवडीमुळे गैरसमज होण्याचा संभव आहे. म्हणून मी हे स्पष्ट करू इच्छितो की, अमेरिकेतील सामाजिक समतेचे विश्लेषण करीत असताना तेथील समाज 'चांगला' किंवा वाईट आहे, किंवा विदेशनीती, आर्थिक, सांस्कृतिक, वंशविषयक किंवा नागरी हक्कासंबंधीचे त्या समाजाचे धोरण ब्रिटनपेक्षा चांगले आहे असे काहीही मला ध्वनित करावयाचे नाही. दुर्दैवाने या सर्व बाबतींत कमालीचे प्रतिगामी धोरण असलेल्या देशांतही सामाजिक समतेचे प्रमाण खूप मोठे असू शकते. तथापी समाजवाद्यांचा संबंध सामाजिक समतेशीच येत असल्याने अमेरिकेतील अनुभव विचारात न घेणे हा मूर्खपणा ठरेल.

अमेरिकेतील वस्तुस्थितीसंबंधीची आकडेवारी वादातीत आहे. वस्तुनिष्ठ दृष्टीकोणातून पाहता भाषा, पेहराव. रीतिरिवाज आणि सर्वसाधारण जीवन पद्धती या बाबतीत तेथे फारशी वर्गीय तफावत आढळत नाही आणि रस्त्यावरून फेरफटका मारताना किंवा आगगाडीतून प्रवास करताना समोरच्या माणसाचे सामाजिक स्थान काय असेल ते इंग्लंडप्रमाणे अमेरिकेत चटकन सांगता येत नाही. उलट व्यक्तिनिष्ठ दृष्टीकोणातून बोलावयाचे तर तेथील सामाजिक संबंध हे अधिक समतावादी व स्वाभाविक आणि 'जी हुजूर' वृत्ती किंवा शिष्टपणा कमी असलेले असे आहेत. टॅक्सी ड्रायव्हर, मद्यविक्रेता, हवाई सुंदरी आणि औषधांच्या दुकानातील मदतनीस यांच्या वर्तनावरून हे चटकन ध्यानात येते.

याचा परिणाम असा होतो की, वर्गीय तटबंदीची आणि विशेषतः त्रिवर्गीय (कामगार, मध्यम व वरिष्ठ वर्ग) उतरंडीची भावना खूप कमी होते. अमेरिकेच्या स्वभाववैशिष्ट्यांविषयी केलेल्या आपल्या वैशिष्ट्यपूर्ण पहाणीत मार्गारेट मीड यांनी असे दाखवून दिले आहे की, अमेरिकेतील वर्गवारी ही एखाद्या शिडीसारखी आहे आणि जन्मतःच समाजाच्या निरनिराळ्या कप्प्यात जन्माला आलेल्या नागरिकांच्या सुव्यवस्थित विभागणीऐवजी या शिडीवर त्यांची ये जा व्हावी अशी अपेक्षा असते. अशा तऱ्हेने ज्यांच्या बाबतीत सामाजिक गती अधोमुख असते त्यांनाच तेवढे 'वरिष्ठ वर्गीय' म्हणता येईल. त्यांच्या अशा खास रीतिभाती किंवा विशिष्ट नैतिक मूल्ये असत नाहीत. त्याचप्रमाणे त्यांनी अमुकच धंदे करावयाचे आणि अमूक करावयाचे नाहीत. . . . बाल्टिमोरमधील एखादा उच्च वर्णीय गलिच्छ कपडे घालून बिलिंग्स मॉंटाना येथे गेला तर तेथील लोकांना आपला दर्जा पटवून देणे त्याला मुष्किल होऊन जाईल. . . . पूर्वी बाल्टिमोरला रहात असलेले लोक कदाचित त्याला ओळखू शकतील पण ते त्यांच्याशी असलेल्या त्याच्या पूर्व परिचयामुळे.

इंग्लंडप्रमाणे बोलण्याची धाटणी किंवा त्याची एकंदर ढब यावरून काही ते त्याचे वर्गीय स्थान ओळखू शकणार नाहीत.

सामाजिक शिडीच्या दुसऱ्या बाजूला जास्त उत्पन्न मिळवणाऱ्यांबद्दल मत्सराची आणि असंतोषाची भावनाही कमी प्रमाणात असते. कारण ज्यांचे उत्पन्न जास्त असते ते आपल्यापेक्षा निराळ्या किंवा श्रेष्ठ वर्गात मोडतात किंवा तो दर्जा त्यांच्या वाडवडिलांपासून चालत आला आहे असे खालच्या श्रेणीतील लोकांना वाटत नाही. तसेच तेथे कामगार वर्गाचे फारसे वेगळे असे व्यक्तिगत किंवा सामुदायिक मानसशास्त्र असत नाही. त्याचप्रमाणे वर्गसंघर्ष अपरिहार्य आहे ही समजूतही कमी प्रमाणात असते आणि नवव्या प्रकरणात वर्गीय विश्वासघाताची म्हणून जी विचारसरणी दिली आहे तशी ती अमेरिकेत आढळत नाही. जे कामगार व्यवस्थापकीय जागा स्वीकारतात त्यांनी आपल्या वर्गाशी द्रोह केला असे मानले जात नाही. कामगार पुढाऱ्यांजवळ अलिशान गाड्या असल्या किंवा त्यांना मोठमोठे तनखे मिळत असले आणि ते उंची सिगार ओढत असले म्हणजे लगेच ते भ्रष्ट झाले किंवा मालकांना सामील असले पाहिजेत असे समजले जात नाही. किंवा कामगार संघटनांनी आपल्या कारखान्यातील मालाचा खप वाढावा, कारखान्याची उत्पादन शक्ती वाढावी इतकेच नव्हे तर कारखान्याचे दिवाळे निघू नये म्हणून स्वेच्छेने पगार कपात स्वीकारली तर त्याबद्दल त्यांना कामगारद्रोही म्हटले जात नाही. त्याचप्रमाणे त्यांनी आपले कार्यकर्ते प्रशिक्षणासाठी हारवर्ड किंवा येलसारख्या विद्यापीठात पाठवले आणि अनेक पदवीधरांना नोकरीवर ठेवले तरी त्यांच्याकडे कोणी संशयाने पहात नाही.

या सगळ्या फरकाचे कारण काय असावे ? समाजवाद्यांच्या मनात परंपरेनुसार ज्या दोन बाबी आल्या असत्या त्या याला खासच कारणीभूत नसतात. त्यापैकी पहिली बाब म्हणजे : सार्वजनिक मालकीचे प्रमाण जास्त आणि भांडवलशाही पद्धतीने होणाऱ्या आर्थिक सत्तेच्या विभाजनाचे प्रमाण कमी असणे, त्याचप्रमाणे उत्पन्नाचे वाटप जास्त प्रमाणावर न होणे. अर्थात यावरून हे सिद्ध होत नाही की, ब्रिटनमध्ये या दोन बाबी महत्त्वाच्या ठरत नाहीत. वर्गीय भावना निश्चित करणारे निकष सर्व देशात सारखे असत नाहीत, तर त्या त्या देशाच्या सांस्कृतिक आणि ऐतिहासिक पार्श्वभूमीनुसार ते बदलत असतात; आणि इतर बहुतेक देशांपेक्षा ब्रिटनमध्ये वर्गीय तणाव आणि विरोध औद्योगिक क्षेत्रात केंद्रित झालेले दिसत असून कामाच्या संबंधातून ते निर्माण झाले असावेत असे वाटते. अमेरिकेत आढळणाऱ्या जास्त प्रमाणावरील कार्यक्षमतेमुळे, तेथील प्रत्यक्ष वेतन जास्त असल्यामुळे किंवा समान संधीच्या वातावरणामुळे हा फरक घडून येत असावा आणि ब्रिटनमधील औद्योगिक क्षेत्रातील वर्गीय भावना इतर समतावादी उपाय जसससे अमलात आणले जातात तसतशी कमी कमी होत जाते. यावरून हेच सिद्ध होते की, अगदी निराळ्या प्रकारच्या असंतोषाची संगती लावून दाखविण्यासाठी या वर्गीय भावनेचा आश्रय

ितला जातो. परंतु निदान या घटकेला तरी ही भावना ब्रिटनमध्ये अत्यंत प्रबल असून त्यामुळे औद्योगिक ढाचा बदलण्यास, निदान प्रथमदर्शनी तरी सबळ कारण मिळत असावे असे वाटते.

उत्पन्नाच्या बाबतीतही असेच आहे. उत्पन्नातील विषमतेच्या कोणत्याही विशिष्ट प्रमाणापुढे कमीजास्त असंतोष उद्‌भवू शकतो आणि ती विषमता कमी किंवा जास्त प्रमाणात अन्याय्य आहे असे वाटते. ब्रिटनमध्ये असंतोष आणि अन्याय या दोहोंचे प्रमाण जास्त आहे. अमेरिकेतील 'होरॅशियो एल्गर' आणि 'भिक्षाधीशापासून लक्षाधीशा'पर्यंतची परंपरा याला काही अंशी कारणीभूत आहे. सर्वोच्च पदापर्यंत जाण्याची खूप आशा असल्यामुळे जे आधीच तेथपर्यंत जाऊन पोहोचले आहेत त्यांच्याविषयीचा असंतोष कमी होतो. ब्रिटनमधील मोठमोठी उत्पन्ने ही फार करून कष्टार्जित नसतात. त्याचप्रमाणे ती वडलोपार्जित संपत्तीमुळे निर्माण झालेली असल्यामुळे व्यक्तिगत परिश्रम आणि कर्तृत्व यांचा तो भाग आहे असेही त्याचे समर्थन करता येत नाही. ही परिस्थिती देखील काही अंशी याला कारणीभूत आहे.

ब्रिटन आणि अमेरिका या दोन देशात हा जो फरक आहे त्याचे साधे आणि सरळ कारण असे आहे की, अमेरिकेत खालून वर असे (व्हर्टिकल) अभिसरण जास्त आहे असा सर्वसाधारण दृष्टीकोण आहे. परंतु अलिकडेच करण्यात आलेल्या पहाणीवरून असे आढळून आले आहे की, असे अभिसरण तेथे विशेष जास्त नाही. त्याचप्रमाणे तेथील शारीरिक श्रम करणाऱ्या कामगारांच्या मुलांना वरच्या, बिगर शारीरिक श्रमाचा व्यावसायिक दर्जा मिळविण्याची संधी ब्रिटन इतकीच (किंवा अन्य युरोपीय देश) मिळू शकते—— त्यापेक्षा जास्त मिळते असे नाही.

अर्थात याचा अर्थ असा नव्हे की, अभिसरणाचा प्रश्न गैरलागू आहे. अमेरिकेत खालून वर असे अभिसरण जास्त नसले तरी समस्तर (हॉरिझाँटल) व भौगोलिक अभिसरण नक्कीच असते. यूरोपच्या मानाने (फार मोठा विस्तार असलेल्या) शेतीवरील कामगारांची जरूरी हळूहळू कमी होत असल्यामुळे अमेरिकेतील शहरांकडे जाणाऱ्या माणसांची सतत कल्पनातीत रीघ लागलेली असते. अमेरिकेतील शहरी अर्थव्यवस्थेत भरपूर संधी मिळू शकते. अर्थात ही संधी वरिष्ठ सामाजिक दर्जा मिळविण्याच्या बाबतीतच असते असे नाही तर दुसरा व्यवसाय सुरू करणे, नव्या वातावरणात पदार्पण करणे, संपत्ती आणि कीर्ती यांच्या शोधार्थ घराबाहेर पडणे अशा कितीतरी बाबतीत ही संधी मिळते. अर्थव्यवस्थेत घडून आलेल्या मोठ्या रचनात्मक बदलांमुळे निर्माण होणारा संधीचा अनुकूल ढाचा समाज अधिक प्रवाही आणि गतीमान बनवतो. त्याचप्रमाणे वडलोपार्जित आणि स्वकष्टार्जित दर्जा यातील सीमारेषा फार अंधूक असते.

ते कसेही असो, ऊर्ध्वगामी (व्हर्टिकल) अभिसरणाबाबतची तौलनिक वस्तुस्थिती काहीही जरी असली तरी त्याबाबतची दोन देशांतील सर्वमान्य प्रतिमा अगदी

वेगवेगळी असते. 'पट्टेवाल्याचा प्रेसिडेंट' अशा स्वरूपाच्या भाकड कथांवर अमेरिकनांची श्रद्धा असते. त्यामुळे प्रत्येकाच्या आकांक्षांची पातळी वरची असते, त्या आकांक्षा फलद्रूप करून घेण्याची उमेद मोठी असते आणि व्यक्तीचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टीकोणही त्यामुळे आनंदी आणि रंगेल असतो. सामाजिक दृष्टीकोण आणि नीतिमत्ता यांच्या दृष्टीने याला अर्थातच फार महत्त्व आहे. आताच जिचा उल्लेख करण्यात आला आहे ती वाढत्या प्रमाणावरील स्थलविषयक गतीमानतादेखील अर्थातच या फरकाला अंशत: कारणीभूत आहे. परंतु त्याचबरोबर शासकीय उच्चपदी असणाऱ्यांना आपल्या घराण्याचा नव्हे तर अगदी गरिबीतून स्वकर्तृत्वाने पुढे आल्याचा अभिमान वाटण्यालारखी परिस्थिती निर्माण करणारी समतावादी विचारसरणीही त्याला अंशत: जबाबदार आहे. याच्या उलट ब्रिटनमध्ये स्वकर्तृत्वाने पुढे आलेली माणसे आपले मूळचे सामाजिक स्थान उजेडात येऊ न देण्याचा प्रयत्न करतात आणि आपल्याला पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण मिळालेले नाही हे त्यांना फार कमीपणाचे आणि अडचणीचे वाटते. अशा तऱ्हेने अमेरिकेतील विद्यमान तत्त्वप्रणालीनुसार खालून वर अशा अभिसरणाच्या (व्हर्टिकल मोबिलिटी) विस्तारावर भर दिला जातो तर उलट ब्रिटनमध्ये तो दडवण्याचा प्रयत्न केला जातो आणि अमेरिकेतील ही परिस्थिती समान संधीच्या वातावरणास अनुकूल ठरते.

यावरून असे दिसून येईल की, अभिसरणाची बाब ही या दोन देशातील तफावतीला काही प्रमाणात कारणीभूत आहे. उदाहरणार्थ अमेरितील परंपरागत हुजूर पक्षीय तत्त्वप्रणाली, त्याचप्रमाणे उदारमतवादी जहाल तत्त्वप्रणाली या सुरुवातीपासूनच समतावादी आहेत, तर ब्रिटनमध्ये सातत्याने (आणि आजही मूलत:) समता विरोधी तत्वप्रणालीचाच पगडा आहे. मानवांमधील नैसर्गिक समानतेला अमेरिकेच्या घटनेमधील सुप्रसिद्ध वचनांच्या द्वारा जे पावित्र्य प्राप्त झाले आहे त्यामुळे अमेरिकेतील सामाजिक मतप्रवाहाचा ओघ समतेच्या दिशेकडे वळण्यास खूपच मदत होते आणि त्याचे परिणाम वर्गीय हितसंबंधांपेक्षा अगदी निराळ्या क्षेत्रातही—स्त्रीपुरुष संबंधात किंवा मतदार आणि राजकारणी, पालक आणि मुले, किंवा अधिकारी आणि कनिष्ठ नोकर यांच्यातील परस्पर संबंधांत पहावयास सापडतात.

अमेरिकेत स्थिर स्वरूपाचा आनुवंशिक सत्ताधारी वर्ग कधीच निर्माण होऊ शकला नाही; किंवा सत्ताधारी वर्गात हमखास आढळणारी प्रतीष्ठा निदर्शक प्रतीकेही तेथे कधी निर्माण झाली नाहीत. ज्या वर्गीय चौकटीमुळे ही प्रतीके निर्माण झाली ती वर्गीय चौकट जवळ जवळ नष्ट झालेली असली तरीदेखील ब्रिटनमध्ये मात्र ती अद्यापही टिकून आहेत. अमेरिकेत, एक तर अशी प्रतीके अस्तित्वातच नाहीत आणि असलीच तर ती कृत्रिम आणि दुसऱ्याची उसनवारी करून उचललेली असून समाजाच्या दृष्टीने त्याला फारसे महत्त्वही नाही. या बाबतची काही

उदाहरणे द्यावयाची तर अमेरिकेत कोठलेही सन्मानदर्शक किताब बहाल केले जात नाहीत. काही प्रतिष्ठादर्शक शाळा अस्तित्त्वात असल्या तरी इंग्लडमधील पब्लिक स्कूलसारखी शिष्टपणाची किंवा सामाजिक उच्चनीचतेची भावना त्यामागे नसते. अमेरिकेत खास सत्ताधारी वर्गाच्या निदर्शक अशा विशिष्ट शैलीतील वास्तू उभ्या राहिलेल्या दिसत नाहीत. परंतु ज्या अलिशान इमारती बांधण्यात आल्या आहेत त्या पूर्वीच्या ट्यूडर राजवाड्यांच्या, फ्रेंच दुर्ग किंवा प्रबोधन काळातील प्रासादांच्या धाटणीच्या आहेत. तेथेही नवागत आणि 'सोशल रजिस्टर' असते. पण अगदी लहानशा वर्तुळापलीकडे त्याला कोणी महत्त्व देत नाही.

अमेरिकेतील समाजात आणखीही एक महत्त्वाचा फरक आढळतो आणि तो म्हणजे त्या समाजाचे विस्कळित स्वरूप आणि विशेषतः जाती–वंशाच्या बाबतीतील वैधर्म्य. दुसऱ्या पिढीतील अमेरिकनांच्या मनात आपण कामगार आहोत अशी वर्गीय भावना कधीच निर्माण होत नाही. कारण तो मुळी कधी कामगार नव्हताच–अगदी खालच्या दर्जाची कामे ही नेहमी नीग्रो लोकांकडे किंवा देशांतर करून येणाऱ्या पुढच्या टोळीकडे असत. उदा. श्वेतवर्णियांच्या दुसऱ्या पिढीने जवळपास कधीच घरकामाच्या नोकऱ्या केलेल्या नाहीत. नीग्रो लोकांची जसजशी दास्यमुक्ती होत गेली आणि स्थलांतरितांचा मोठ्या प्रमाणावरील ओघ थांबू लागला तसतशी ही परिस्थिती बदलू लागली. त्यामुळे आता पहिल्याइतका त्याचा प्रभाव राहिलेला नाही. परंतु परिस्थितीला अशी संपूर्ण कलाटणी मिळण्यापूर्वीच जणू काही अमेरिकन कामगाराला कामगारवर्गीय दृष्टिकोणापासून दूर ठेवण्याचे ऐतिहासिक कार्य तडीस गेलेले आहे.

अर्थात या फरकाची जी इतर कारणे आहेत ती फक्त अमेरिकेतच आहेत असे नाही. ब्रिटनमधील समाजवाद्यांनाही त्यापासून बोध घेता येण्यासारखा आहे. यापैकी पहिले आणि सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे अमेरिकेतील शिक्षणपद्धती. ब्रिटनमधील शिक्षणपद्धतीमुळे समाजात जी फुटीरपणाची प्रवृत्ती निर्माण होते ती अमेरिकेत दिसून येत नाही. त्याचे पहिले कारण असे की, वयाच्या अकराव्या वर्षापासून मुलांची शासकीय क्षेत्रातील शाळातून विभागणी होत नाही. अमेरिकेतील पब्लिक सेकंडरी शाळा सर्वांना खुल्या असतात आणि त्यामुळे समाजातील बहुसंख्य मुलांना त्यांचे शालेय शिक्षण संपेपर्यंत एकाच तऱ्हेचा शैक्षिक अनुभव मिळतो.

अमेरिकेतही खाजगी शाळा आहेत हे खरे, आणि त्यांचे प्रमाण बहुधा ब्रिटनमधील एकूण शाळांइतकेच असावे. तरीही ब्रिटनमधील पब्लिक शाळांतून जसा राष्ट्रीय पातळीवर सुशिक्षित उच्चभ्रूंचा एक वर्ग निर्माण होतो तसा तो अमेरिकेत होत नाही. तसे पाहिले तर खाजगी शाळांतील विद्यार्थ्यांची आकडेवारी एका अर्थाने दिशाभूल करणारीच आहे. कारण ब्रिटनमध्ये आहेत त्यापेक्षा अमेरिकेतील बऱ्याचशा खाजगी शाळा या विशिष्ट वर्गापुरत्या–विशेषतः कॅथॉलिक–

मर्यादितच आहेत. आणि उरलेल्या शाळांपैकी जास्त करून शाळा या लहानशा भौगोलिक विभागात केंद्रित झालेल्या आहेत. उदा. परंपरावादी न्यूइंग्लंड, न्यूयॉर्क-मधील 'सोशल रजिस्टर' विभाग व फ्लॉरिडा आणि दक्षिणेकडील काही भाग. आणखीही एका अर्थाने ही आकडेवारी दिशाभूल करणारी आहे. म्हणजे असे की, ब्रिटनपेक्षा अमेरिकेतील खाजगी शाळांतील विद्यार्थी आपल्या शैक्षणिक जीवनापैकी फक्त काही भागच अशा खाजगी शाळांतून घालवतात आणि उरलेला काळ ते सरकारी शाळांतून शिक्षण घेतात.

ते कसेही असो, अमेरिकेतील सर्वसाधारण पब्लिक स्कूल आणि खाजगी शाळा यातील सामाजिक अंतर फार कमी असते. (बहुतेक सर्व विभागातील) शैक्षणिक दर्जा इंग्लंडच्या मानाने अधिक सारखा असतो; आणि सामाजिक प्रतिष्ठेच्या बाबतीत फार मोठी तफावत नसते. उदा. अनेक खाजगी शाळा अशा असतात की, ज्यांची नावेही फारशी कोणाला माहीत नसतात, आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी की, शालेय शिक्षण संपण्याच्या वयात फारसा फरक नसतो. माध्यमिक शाळातील बहुतेक मुले १७ व १८ वर्षे वयाच्या दरम्यान तो अभ्यासक्रम संपवतात. अशा तऱ्हेने ब्रिटनमध्ये सामाजिक दर्जात तीव्र तफावत निर्माण होण्याची जी अनेक कारणे संभवतात त्यांतील महत्त्वाचे कारणच नष्ट केले जाते.

दुसरे असे की, खर्चाचे स्वरूप ब्रिटनपेक्षा अमेरिकेत कितीतरी अधिक प्रमाणात सारखे असते. प्रतिष्ठेच्या समजल्या जाणाऱ्या वस्तूंचे वाटप फार विस्तृत प्रमाणावर झालेले असते आणि निरनिराळ्या उत्पन्नगटातील लोकांच्या राहणी-मानातही नजरेत भरण्याइतके अंतर आढळून येत नाही. अगदी ठळक उदाहरण म्हणजे जवळजवळ प्रत्येक कुटुंबात मोटारगाडी असते. सर्व उपभोग्य वस्तूंत मोटार ही विशेष लक्षणीय वस्तू मानली जाते येवढेच याचे महत्त्व नाही तर सर्वांच्याजवळ मोटारी आल्या म्हणजे सुट्टया, उपहार गृहे, मध्यम वर्गीयांच्या खरेदीच्या सवयी इ. सारख्या निमचैनीच्या किंवा लक्षणीय वस्तूंचा वापरही सार्वत्रिक होऊ लागतो हे महत्त्वाचे आहे. परंतु वर्गीय वैशिष्टयांचा बाह्यत: अभाव दिसून आला तरी कपडेलत्ते, खाण्यापिण्याच्या सवयी, औषधांची दुकाने, आणि कायम टिकाऊ उपभोग्य वस्तूंवरील मालकी यांसारख्या इतर अनेक क्षेत्रात ती दृष्टोत्पत्तीस येतात.

खर्च करण्याबाबतच्या सवयी आणि सर्वसाधारण जीवनपद्धती यात आढळून येणारा सारखेपणा उत्पन्नातील समानतेतून निर्माण झालेला नसतो. त्याची इतर अनेक कारणे आहेत: कपडयासारख्या सुस्पष्ट वर्गीय विभागणी दर्शविणाऱ्या बाबी उद्भवण्यास प्रतिबंध करणारी समतावादी परंपरा, विचारांची देवघेव करणाऱ्या जनतेपर्यंत पोहोचलेल्या माध्यमाचा प्रभाव, विद्यमान परिस्थितीला चिकटून बस-ण्याची अमेरिकन प्रवृत्ती, यांत्रिक मने आणि वैचित्र्याची ओढ असणारे अमेरिकनांचे स्वभाववैशिष्टय आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे निश्चितपणे राहणीचे उच्चमान;

यासंबंधीचा उहापोह मी तेराव्या प्रकरणात करणार आहे. यापैकी निश्चित कारण कोणतेही असो, सामाजिक समतेची जाणीव निर्माण होत आहे ही बाब अत्यंत महत्त्वाची आहे.

तिसरी गोष्ट म्हणजे खर्चाचे प्रमाण जास्त असलेल्या समाजातील वर्गाचे कमी होत जाणारे आर्थिक दडपण ही होय. ही बाब तंत्रविज्ञानाविषयक असून तिचा उल्लेख आठव्या प्रकरणात आलेला आहे. अशा समाजात दारिद्र्य जसजसे कमी होत जाते तसतसे आर्थिक संघर्षाला उद्युक्त करणारे दडपणही कमी कमी होत जाते. हवी असलेली कोणतीही उपभोग्य वस्तू मिळणे अधिकाधिक सुलभ होऊ लागते; आणि आर्थिक बाबतीतील मत्सरही कमी होऊ लागतो. कामाच्या तासांच्या मानाने फुरसदीच्या काळात वाढ होऊ लागते आणि उत्पादक संबंधांच्या मानाने विनिमयाच्या बाबींचे महत्त्व वाढू लागते. उत्पादनकार्यांत गुंतलेल्या नागरिकांच्या मानाने सेवांची व्याप्ती वाढत जाते, त्याचप्रमाणे शरीरश्रमाचे कुशल काम करणारांच्या मानाने तांत्रिक आणि बिगर शारीरिक श्रमाचे काम करणारांचे प्रमाण जास्त असते. आर्थिक वर्गाचे सुस्पष्ट अस्तित्व दर्शविणारी सीमारेषा अधिकाधिक अस्पष्ट बनत जाते. अमेरिकेत या सर्व गोष्टी ठळकपणे घडून आल्या असून त्यांचा परिणाम आर्थिक वर्गाच्या जाणिवेबरोबर येणारा सामाजिक दृष्टिकोण ब्रिटनपेक्षा कमी प्रभावी ठरण्यात घडून आला आहे.

मी यापूर्वीच म्हटल्याप्रमाणे यापैकी कशाचाही अर्थ असा नव्हे की, अमेरिकेतील समाज हा ब्रिटनपेक्षा श्रेष्ठ दर्जाचा आहे असे मला सुचवावयाचे आहे. सामाजिक समतेच्या जोडीला बेदरकार परराष्ट्रीय धोरण, नागरी हक्कांबाबत संकुचित दृष्टिकोण, जकातविषयक अदूरदर्शी धोरण, व्यापारीहितसंबंधांविषयी कमालीचा हळुवारपणा, मोठ्या प्रमाणावरील बेकारी, सामाजिक क्षेत्रातील असहिष्णुता आणि अशा अनेक दोषास्पद बाबीही तेथे असू शकतात.

त्याचप्रमाणे अमेरिकेतील उद्योगधंद्यात कामगार आणि व्यवस्थापक यांच्यात संघर्ष नसतो असेही नाही—– उलट तसा तो तेथेही जरूर आहे, आणि तेथील कामगार संघटना अनेकदा ब्रिटनमधील कामगार संघटनांपेक्षाही तो अधिक लढाऊ आणि उग्रपणे लढवतात; परंतु असे संघर्ष अस्तित्वात असतात येवढ्यावरूनच लगेच सबंध सामाजिक सिद्धांताची त्या अनुरोधाने उभारणी करता येईल असा निष्कर्ष निघत नाही. आणि एकंदर सामाजिक दृष्टिकोणाच्या दृष्टीने अमेरिकन संघर्ष फारच कमी महत्त्वाचे असतात. व्यक्तीच्या सामाजिक दृष्टिकोणाला दिशा लागण्याच्या दृष्टीने हे संघर्ष प्रभावी ठरत नसल्याने ते फारसे तीव्र स्वरूप धारण करीत नाहीत; तसेच ब्रिटनप्रमाणे केवळ उत्पादनक्षेत्राव्यतिरिक्त इतर बाबतीतील भूमिका निश्चित होत नसल्याने ते संघर्ष व्यापकही होऊ शकत नाहीत. ( उदा. राजकीय दृष्टिकोण : येथे मजूरपक्षाचा आणि तो स्थापन करण्यासाठी येणाऱ्या गंभीर

स्वरूपाच्या दडपणाचा अभाव लक्षात घेण्यासारखा आहे.) आर्थिक वर्गसंघर्ष अस्तित्वात असला तरी कामावर नसतानाच्या किंवा काम संपल्यानंतरच्या संबंधांवर त्याचा परिणाम घडून येत नाही.

त्याचप्रमाणे समतेचे प्रमाण जास्त आहे याचा अर्थ अमेरिकेत सामाजिक असंतोष नसतो किंवा तीव्र सामाजिक संघर्ष आढळून येत नाही असाही नाही. त्याची अभिव्यक्ती प्रत्यक्ष वर्गविरोधातून होण्याऐवजी ती धार्मिक किंवा वांशिक स्वरूपात होत असते इतकेच. त्याचप्रमाणे तेथे सामाजिक वर्ग असे अजिबात नसतातच किंवा सामाजिक स्थान किंवा प्रतिष्ठेची प्रतीके दर्शविणारी वर्गवारी ह्यांचा संपूर्ण अभाव असतो असेही नाही (अर्थात कोठल्याही समाजात अशी वर्गवारी राहणारच). येथे अभिप्रेत असलेला अर्थ इतकाच आहे की, वर्गावर्गातील तफावत सर्वदूर पसरलेली नाही, तशीच ती तितकीशी आनुवंशिकही नाही. सामाजिक दृष्टीकोणात वर्गीय भावना कमी असते, वातावरण अधिक नैसर्गिक आणि अनिर्बंध असते आणि सामाजिक मत्सराची आणि असंतोषाची भावनाही कमी असते. थोडक्यात अमेरिकेत सामाजिकसमता जास्त असते.

फरकाची जी कारणे वर दिली आहेत ती आठव्या प्रकरणात केलेल्या विश्लेषणाशी बरीचशी मिळतीजुळती आहेत. तंत्रविज्ञानविषयक बाब (आर्थिक विकासाची अवस्था) ही अर्थातच फार महत्त्वाची आहे हे उघड आहे. अभिसरणासंबंधी जनमानसात जी प्रतिमा निर्माण झालेली असते त्या दृष्टीने ती बाब महत्त्वाची असते. परंतु ब्रिटनमधील यासंबंधीची प्रतिमा निराळी असते. शिवाय ब्रिटनला अत्यंत प्रभावशाली असा परंपरागत आणि वाडवडिलांपासून चालत आलेला उज्ज्वल भूतकाळ आहे म्हणून अमेरिकेपेक्षा 'अंतरा' संबंधीच्या बाबी वस्तुनिष्ठ दृष्टया समतेला अधिक अनुकूल असतील असे नाही. कोणत्याही परिस्थितीत हे अगदी उघड आहे की, ब्रिटनमध्ये सामाजिक समता अधिक असावी असे वाटत असेल तर, तेथील शिक्षणपद्धतीत अधिक समता आणली पाहिजे. तसेच खर्च करण्याच्या पद्धतीतही अधिक सारखेपणा आला पाहिजे. परंतु वर दिलेल्या कारणास्तव वडलोपार्जित उत्पन्नाचे आणखी फेरवाटप होणे आणि उद्योगधंद्यातील सत्ता आणि विरोधाधिकार यात अधिक समता येणे हेही आवश्यक आहे. पुढील प्रकरणांतून अंतरासंबंधीच्या या चार बाबींचे याच क्रमाने विवेचन केले आहे.

• • •

प्रकरण बारावे

# शिक्षणाचा प्रभाव

## १. समान संधीबाबतच्या मर्यादा

ब्रिटनमधील शालेय शिक्षण पद्धती ही सामाजिक विषमतेच्या बाबतीत अत्यंत फुटीरपणाची, अन्याय्य आणि पैशाची उधळपट्टी करणारी आहे. एक तर समान संधीचे मर्यादित उद्दिष्टही त्या पद्धतीमुळे नाकारले जाते. युद्धपूर्व काळात तर अकल्पित वाटावी इतक्या मोठ्या प्रमाणात मुलांना ही संधी नाकारण्यात येत असे आणि त्यामुळे बहुसंख्य मुलांना कोठल्याही प्रकारे माध्यमिक शिक्षण प्राप्त करून घेणे केवळ अशक्य असे. १९१० ते १९२९ च्या दरम्यान जन्माला आलेल्या मुलांपैकी सहकारी प्राथमिक शाळांतून शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांपैकी अवघे १४ टक्के विद्यार्थी माध्यमिक शिक्षण घेवू शकले तर खाजगी प्राथमिक शाळांतील ८९ टक्के मुलांना माध्यमिक शाळांत प्रवेश मिळाला. दहाव्या प्रकरणात व्यावसायिक दर्जाची जी वर्गवारी दिली आहे त्या संदर्भात सांगावयाचे तर त्या वर्गवारीपैकी १ ते ३ या वर्गात मोडणाऱ्या विद्यार्थ्यांना ६ व्या ७ व्या वर्गातील मुलांपेक्षा ग्रामर स्कूलमध्ये शिक्षण घेण्याची पाचपट अधिक (आणि विश्वविद्यालयीन शिक्षणापर्यंत जाण्याची तेरापट) संधी मिळत असे. यात स्वतंत्र शाळांतून शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांचा अंतर्भाव करण्यात आलेला नाही. या शोचनीय परिस्थितीला काही अंशी प्रत्यक्ष आर्थिक बाबच कारणीभूत होती. कामगार वर्गातील एखाद्या मुलाला ग्रामर स्कूलमध्ये मोफत प्रवेश मिळाला तरीही त्याच्या पालकांना त्याचे शिक्षण पुढे चालू ठेवणे परवडत नसे. असे असले तरी सरकारचे याबाबतीतील सहानुभूतीशून्य आणि क्षुद्र-पणाचे धोरणच मुख्यत: याला जबाबदार होते.

१९४४ सालच्या शिक्षणविषयक कायद्यान्वये माध्यमिक शिक्षण सार्वत्रिक करण्याचे तत्त्व स्वीकारण्यात आले आणि औपचारिकरित्या ते अंमलातही आणले

गेले. परंतु तरीही प्रगती करून घेण्याची संधी मिळण्याच्या बाबतीत अजूनही समानता आलेली नाही.

एक : ग्रामर स्कूलचा दर्जा उच्च प्रतीचा असणार आणि त्यामुळे चांगले व्यवसाय करण्याची भेदजन्य संधी प्राप्त होणार याची जाणीव असल्याने शाळेची फी रद्द करून आणि प्रवेशाच्या बाबतीत समान निकष लागू करून समाजातील सर्व वर्गातील मुलांना ही संधी प्राप्त करून देणे हा या कायद्याचा उद्देश होता. परंतु हे उद्दिष्ट अद्याप पूर्णांशाने तडीस गेलेले नाही. ग्रामर स्कूलमधील विद्यार्थ्यांची वर्गवार विभागणी ही अद्यापही डोळयात भरण्याइतकी विषम आहे. या संबंधात १९५१साली करण्यात आलेल्या संशोधनात असे आढळून आले की, मध्यम वर्गीय विद्यार्थ्यांचे प्रमाण खूपच जास्त होते. वरिष्ठ कामगार वर्गातील मुलांना त्या शाळेतील एकतृतीयांश जागा मिळाल्या होत्या. म्हणजे त्यांना वाजवी प्रतिनिधीत्व मिळाले होते. परंतु कनिष्ठ कामगार वर्गातील मुलांना मात्र अवघ्या १५ टक्के जागाच मिळाल्या होत्या. म्हणजे त्यांचे प्रमाण खूपच कमी होते. मध्यम वर्गातील मुलांना ग्रामर स्कूलमध्ये तौलनिक दृष्टया जास्त प्रवेश मिळू शकतो इतकेच नव्हे तर एकदा प्रवेश मिळाला की, त्यांचा जमही तेथे चांगला बसतो. अशा विद्यार्थ्यांच्या एकूण संख्येपैकी १५ टक्के मुले व्यावसायिक आणि आर्थिकदृष्टया काठावर असलेल्या कुटुंबातील होती; २५ टक्के ग्रामर स्कूलमध्ये जाणारी होती आणि ४४ टक्के सहावीत शिकणारी होती. एका बाजूला अशा ७ वर्गात मोडणाऱ्या पालकांची मुले तर दुसऱ्या बाजूला अकुशल कामगार वर्गातील मुले यांच्या दरम्यान शालेय शिक्षणाचा कालावधी आणि शाळा सोडतांना मिळालेले प्राविण्य यांचे प्रमाण डोळयात भरण्याइतके घसरत असल्याचे दिसून येते.

केवळ वंशशास्त्राच्या आधारे या तफावतीचे समर्थन होऊ शकणार नाही. कामगार वर्गापेक्षा मध्यम वर्गीय मुलांचा बुद्धिगुणांक ( I. Q. ) जास्त असतो हे निःसंशय, परंतु त्या वर्गातील खूप जास्त मुलांना संधी देण्यात आली तर तेही याहून चांगली प्रगती करून दाखवू शकतील. कमी शिकलेले पालक, माणसांनी फार गजबजलेली (आणि म्हणून गोंगाट असलेली) घरे, अभ्यासक्रमाव्यतिरिक्त इतर विषयाचा अभ्यास करण्याच्या संधीची कमतरता, यासारखी सामाजिक कारणे जशी याला जबाबदार असली पाहिजेत त्याचप्रमाणे आर्थिक परिस्थितीही काही अंशी याला कारणीभूत असणार. आपल्या मुलाचे शिक्षण चालू ठेवावयाचे म्हणजे कामगार वर्गातील पालकांना अजूनही तो एक न पेलण्यासारखा आर्थिक बोजा वाटतो. परंतु कुटुंब भत्त्यात वाढ करून किंवा जीवन वेतन सुरू करून हा बोजा निदान हलका तरी सहज करता येण्यासारखा आहे. तसेच त्यायोगे मध्येच शिक्षण सोडून देण्याच्या प्रवृत्तीलाही आळा घालता येईल. परंतु सद्यः परिस्थितीत समान संधीवर निश्चित स्वरूपाच्या मर्यादा पडलेल्या आहेत.

परंतु ग्रामर स्कूलमधील जागांचा प्रश्न हा फक्त सरासरीच्या वरच्या मुलांशीच निगडित आहे. सरासरी मुलांचा विचार करता परिस्थिती अधिकच शोचनीय असल्याचे आढळून येते. सोयीस्कर अशा इमारती असलेल्या आणि वर्गात बेतशीर मुले असलेल्या शाळांतून वाजवी वयोमर्यादेपर्यंत सामान्य बुद्धीच्या सर्व मुलांना– मग सामाजिक दृष्टया ती कोठल्याही वर्गात मोडणारी असोत–चांगल्या प्रकारचे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण मिळाले पाहिजे एवढी तरी निदान याबाबतीत अपेक्षा करण्यास हरकत नाही. स्वतंत्र शाळांतून शिक्षण घेणाऱ्या सुस्थितीतील पालकांच्या मुलांना हे मिळू शकते. परंतु सरकारी शैक्षणिक पद्धती काही बाबतीत इतकी निकृष्ट प्रतीची आहे की, कामगार वर्गातील अनेक मुलांना यापैकी कशाचाच लाभ मिळू शकत नाही. शाळेच्या खराब इमारती आणि विद्यार्थ्यांची भरमसाट संख्या यामुळेच मुख्यतः अडचणी निर्माण होतात. या दोन बाबतींतील उणीवा या आता अगदी कुविख्यात झाल्या आहेत. अंदाजविषयक चिकित्सा समितीने १९५३ साली असे लिहून ठेवले आहे की, प्रत्येक ठिकाणी विद्यार्थ्यांची भरमसाट संख्या, शाळांचा अभाव, शिक्षकांची कमतरता आणि कित्येकदा झपाट्याने खराब होत चाललेल्या, किंबहुना धोकादायक झालेल्या इमारती, या अडचणी आमच्यासमोर उभ्या राहत–– ग्रामीण भागातील अनेक जुन्या शाळांची परिस्थिती ही तर अत्यंत अनिष्ट अशी नित्याची बाब होऊन बसली आहे. त्यांपैकी अनेक इमारती तर गलिच्छ वस्तीपेक्षा यत्किंचितही चांगल्या नाहीत. परिस्थिती हळूहळू परंतु अत्यंत मंदगतीने सुधारत आहे यात शंका नाही आणि १९६० साली लोकसंख्येला आलेला फुगोटा शालेय जीवनातून कायमचा बाहेर पडेल त्यावेळी परिस्थिती खूपच सुसह्य झालेली असेल हेही खरे.

परंतु सरकारी शाळांतील वर्गाच्या सरासरी आकार मानात बरीचशी काटछाट करून त्यातील विद्यार्थ्यांची संख्या कमी केल्याखेरीज समान संधीच्या दिशेने आपण हालचाल करीत आहोत असेही कोणी म्हणू शकणार नाही. सर्व वयाच्या मुलांसाठी खुल्या असलेल्या ज्या शाळांमधून अद्यापही सात लाखाहून जास्त मुलांना माध्यमिक शिक्षण मिळू शकत नाही त्यांचे आता पुनर्घटन करण्यात आले आहे काळ्या यादीतील गलिच्छ (वस्त्यांतील) शाळा बंद करण्यात आल्या आहेत; औद्योगिक शहरांतील बांधणीच्या दृष्टीने 'सुरक्षित परंतु अत्यंत महागड्या अशा व्हिक्टोरियन गॉथिक धर्तीच्या इमारतींत सुधारणा घडवून आणण्यात आल्या आहेत; शालेय शिक्षण समाप्तीची वयोमर्यादा वाढविण्यात आली आहे आणि १९४४ च्या कायद्यात ध्वनित केल्याप्रमाणे ग्रामीण भागातील (कौंटी) महाविद्यालये सुरू करण्यात आली आहेत. अर्थात या सर्व गोष्टी पैसा आणि साधनसामुग्री यावर अवलंबून असून त्यासंबंधीचे विवेचन याच प्रकरणात पुढे आलेले आहे.

## २. पब्लिक स्कूलमध्ये सुधारणा होण्याची आवश्यकता

परंतु या सर्व सुधारणा घडवून आणल्या तरी देखील श्रीमंत वर्गातील कोणत्याही मुलाला सहज प्रवेश मिळू शकणाऱ्या, परंतु गरीब वर्गातील मुलगा कितीही बुद्धिमान आणि लायक असला तरी त्याच्या आवाक्याबाहेर असणाऱ्या उच्च दर्जाच्या खाजगी शाळांची पद्धती जोपर्यंत अस्तित्वात आहे तोपर्यंत समान संधी उपलब्ध होऊ शकणार नाही. आपल्या शैक्षणिक पद्धतीत सर्वसाधारण वर्गीय विषमता निर्माण होण्याचे हेच कारण असल्यामुळे संधी मिळण्याच्या बाबतीतील ही विषमता अधिकच डोळ्यात भरते. तथापि समाजवादी ग्रामर स्कूलच्या प्रश्नाचा एवढा बाऊ का करतात आणि त्याहूनही जास्त अन्यायकारक ठरणाऱ्या खाजगी शाळांबाबत इतके औदासिन्य का दाखवतात ते मला अद्यापही समजू शकलेले नाही.

या शाळा––विशेषतः ' पब्लिक स्कूल्स '–श्रेष्ठ दर्जाच्या असतात यात वादच नाही. बहुतेक सर्व आधुनिक माध्यमिक शाळांची तर गोष्टच सोडा, परंतु ग्रामर स्कूलच्या मानानेदेखील या शाळांतील शिक्षकवर्गाचे प्रमाण जास्त असते, शिक्षकांची शैक्षणिक पात्रता ( आणि अनेकदा शिक्षकी पेशाबद्दलची समर्पण वृत्ती) वरच्या दर्जाची असते, त्यांच्या सभोवतालचे वातावरण अधिक प्रसन्न असते, अभ्यासक्रमाव्यतिरिक्त इतर सवलती खूप असतात आणि (चांगल्या शिक्षणाच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाची बाब म्हणजे) त्यांना अधिक सुट्ट्या असतात. काही वेळा असे सांगण्यात येते की, हे सर्व फायदे केवळ काही तीस चाळीस मोजक्या पब्लिक स्कूल पुरतेच मर्यादित असून उरलेल्या शाळा चांगल्या ग्रामर स्कूलपेक्षा शिक्षणाच्या बाबतीत कोठल्याही प्रकारे सरस नाहीत. अर्थात याबाबत मी साशंकच आहे. तरीही (अगदी थोड्या प्रसिद्ध ग्रामर स्कूल्सचा अपवाद सोडून) हे खरे आहे असे मानले तरीदेखील बाकीच्या चिल्लर पब्लिक स्कूलमधील विद्यार्थ्यांना देखील सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा असा फायदा मिळू शकतो तो असा की, त्यांना जास्त पगाराच्या किंवा मानमान्यतेच्या जागा मिळण्याचा संभव अधिक असतो. पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण घेऊन बाहेर पडलेली मुले जास्त विश्वासार्ह आणि स्वावलंबी असतात हा विश्वास (तो साधार आहे की निराधार हा प्रश्न अलाहिदा) हे जसे याचे एक कारण आहे तसेच चांगले व्यक्तिमत्व, उच्चार आणि रीतीरिवाज ही तितकीच महत्त्वाची परंतु लक्षात घेण्यासारखी बाबही त्याला काही अंशी कारणीभूत आहे असे सांगितले जाते. त्याचप्रमाणे आज ज्या व्यक्ती अधिकारावर आहेत आणि नव्या जागा भरण्याचे किंवा बढती देण्याचे अधिकार ज्यांच्या हाती आहेत त्यांचे शिक्षणही सर्वसामान्यपणे पब्लिक स्कूलमध्येच झालेले असल्याने अशा शाळांतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांबद्दल त्यांचा अनुकूल ग्रह बनलेला असतो हेही कारण आहेच. हा अनुकूल ग्रह पुष्कळदा सुप्तावस्थेत असू शकतो. (अर्थात आपल्या जुन्या शाळेविषयीचा

अभिमान मुळीच कमी झालेला नसतो.) परंतु त्याचा परिणाम घडून यावयाचा तो येतोच. त्यामुळे अगदी किरकोळ अशा पब्लिक स्कूलमध्ये शिक्षण घेतलेल्या मुलांना देखील कोठलीही विशिष्ट शैक्षणिक पात्रता आवश्यक असणाऱ्या जागांची निवड करताना हमखास फायदा मिळतो. या शाळांबद्दल असलेल्या पालकांचा जिव्हाळा हा देखील तर्काला न पटणारा अहंमन्यतेचा गंड असतो असे म्हणून भागणार नाही.

हा अगदी उघड उघड अन्याय आहे असे मानले तरी त्याबाबत काय करता येण्यासारखे आहे ? यावरील उपाय म्हणून तीन गोष्टी करता येण्यासारख्या आहेत. एक : श्रीमंत नागरिकांनी आपल्या पैशाच्या जोरावर इतका प्रचंड सामाजिक फायदा उघडपणे घेणे केव्हाही रास्त ठरू शकत नाही या कारणास्तव सरकारने खाजगी शाळांवर संपूर्ण बंदी घालणे. परंतु आपल्या पुढील समस्येची सोडवणूक करण्याचा हा उपाय योग्य नव्हे. देशाच्या प्रकृतीधर्माशी तो सुसंगत नसल्याने कोठल्याही परिस्थितीत राजकीय दृष्टचा तो व्यवहार्य ठरणार नाही. खाजगी क्षेत्रातील शैक्षणिक प्रयोग बंद करून टाकणे समंजसपणाचे ठरणार नाही. काही वेळा असे प्रयोग लहरीपणाचे ठरण्याचा संभव असला तरी इतर वेळी ते खरोखरीच पुरोगामी स्वरूपाचे असतात आणि स्वतंत्रतेचा पुरस्कार करण्याच्या भूमिकेनुसार असे प्रयोग सरसकट बंद करून टाकणे इष्ट नव्हे. विद्यमान सरकारची धारणा आहे त्याचप्रमाणे एकदा उत्पन्नाचे वाटप करून दिल्यानंतर युद्धाचा किंवा युद्धोत्तर आणीबाणीचा काळ सोडून इतर वेळी नागरिकांना मिळालेल्या उत्पन्नाचा आपल्या मर्जीनुरूप विनियोग करण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. त्यामुळे इतरांना उपद्रव होत नाही इतके पाहिले म्हणजे झाले. शिवाय खाजगी स्वातंत्र्यांत हस्तक्षेप करण्यात आला तर तो सहन केला जाणार नाही. सगळ्या स्वतंत्र शाळा बंद करून टाकण्यात आल्या तर त्यामुळे सहाजिकच खाजगी शिकवण्या ठेवण्याची प्रवृत्ती वाढेल. त्याचप्रमाणे परदेशातील शाळांतून प्रवेश मिळवण्याची खटपट सुरू होईल. आणि त्यामुळे जी विषमता निर्माण होईल ती रोखण्यासाठी या सवलतींवरही बंदी घालावी लागेल.

याबाबतचा दुसरा दृष्टीकोण फाजील आशावादी आहे. वरच्या उत्पन्नाला फ़ेरवाटपामुळे अधिकाधिक कात्री बसू लागेल आणि सरकारी शाळांचा दर्जा जसजसा सुधारत जाईल तसतशी पब्लिक स्कूल्स आपोआपच अस्तंगत होत जातील अशी काही आशावादी अपेक्षा करीत असतात. परंतु हा फाजील आशावाद झाला. सरकारी पद्धती कशीही जरी असली तरी शैक्षणिक दर्जा, सामाजिक प्रतिष्ठा आणि नोकरी मिळण्याची शक्यता यासारखे स्वतंत्र निवासी शाळांच्या बाबतीतील खरेखुरे फायदे दीर्घकाळपर्यंत टिकून राहणारच. आणि आपल्या मुलांना हे फायदे मिळावेत म्हणून मध्यमवर्गीय पालक बराचसा त्याग सोसावयास तयार होतात असे अलिक़डच्या काही वर्षात दिसून आले आहे. शिवाय आपली करपद्धती अशी आहे की, नेहमीच्या करपात्र उत्पन्नाव्यतिरिक्त इतर अनेक मार्गांनी मुलांची फी भरणे शक्य

होते-- केवळ भांडवलातून किंवा करमुक्त भांडवली नफ्यातूनच फी देता येते असे नव्हे तर नातेवाईकांनी केलेली करमुक्त करारपत्रे किंवा मुलांच्या जन्माच्या वेळीच उतरण्यात आलेला त्यांचा विमा या मार्गांचाही त्यासाठी अवलंब करता येतो. पुढील मजूर सरकार कदाचित या परिस्थितीत काही बदल घडवून आणू शकेल. परंतु सर्वच पब्लिक स्कूलसच्या पटावर प्रवेश मिळवू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांच्या नावाच्या मोठाल्या याद्या शिल्लक आहेत. आणि मध्यम वर्गीय पालकांची मनोवृत्ती लक्षात घेता या शाळा पैशाच्या अभावी बंद पडण्याची मला तरी कसलीही शक्यता दिसत नाही.

खाजगी पूर्वाध्ययन (प्रेपरटेरी) शाळांकडून इतरत्र विद्यार्थ्यांचा ओघ वळण्याची मात्र त्यामानाने बरीच शक्यता आहे. सर्वसाधारणपणे या शाळा शैक्षणिक बाबतीत विशेष फायदेशीर ठरत नाहीत. नोकरी मिळण्याच्या दृष्टीनेही सद्यः परिस्थितीत अंतिमतः त्यांचा फारसा प्रभाव पडू शकत नाही. आणि त्यांपैकी काही शाळांमधून कमालीची अहंमन्यता मुलांच्या मनात रुजली जात असली तरी पब्लिक स्कूलच्या मानाने सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त होण्याच्या दृष्टीने या शाळा खूपच कमी पडतात. त्यामुळे प्राथमिक शाळांचा दर्जा जसजसा उंचावत जाईल तसतसे मध्यमवर्गीय पालक आपल्या मुलांना या शाळांतून हळूहळू काढून घेऊ लागतील हे अगदी शक्य आहे. असे झाले तर हवेच आहे. त्यामुळे प्रत्यक्षात काही शैक्षणिक नुकसान होणारच असले तरी ते अगदीच क्षुल्लक असेल; आणि त्यामुळे निरनिराळ्या वर्गांची सरमिसळ होऊ लागल्याने मिळणारे सामाजिक फायदे स्पष्टपणे दिसू लागतील. परंतु निदान इंग्लंडमध्ये तरी प्राथमिक पातळीवर कोणतेही जरी बदल घडवून आणले तरी ते संपूर्णपणे निर्णायक कधीच ठरू शकणार नाहीत-- मग ते बदल वर्गीय दृष्टीकोणासंबंधीचे असोत किंवा संधीच्या कक्षा विस्तारण्याबाबतचे असोत. पब्लिक स्कूलबाबतची समस्या मात्र तशीच कायम राहणार.

तिसरा आणि सर्वांत समंजसपणाचा दृष्टीकोण म्हणजे शासकीय शिक्षण पद्धतीशी या शाळा हळूहळू एकरूप करून टाकणे हा होय. फ्लेमिंग कमेटीने केलेल्या शिफारशींव्यतिरिक्त नवीन असे यात काहीच नाही. सध्याच्या पद्धतीतील अन्यायाची जाणीव असल्यामुळे १९४४ सालीच या समितीने अशी शिफारस केली होती की, सुरुवातीला स्वतंत्र शाळांतून २५ टक्के जागा फी देऊ न शकणाऱ्या सरकारी प्राथमिक शाळांतील मुलांसाठी राखून ठेवाव्यात आणि 'सर्व विद्यार्थ्यांना शाळांची दारे सताड उघडी असली पाहिजेत आणि इतर सर्व बाबतीत लायक असूनही केवळ साधनांच्या अभावामुळे कोणताही मुलगा शिक्षणापासून वंचित राहता कामा नये या तत्त्वाची अधिकाधिक अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने' हे प्रमाण टप्प्याटप्प्याने वाढवत गेले पाहिजे.

दुर्दैवाने युद्धानंतर ही शिफारस अंमलात आणली गेली नाही. काही विभागात तिचा अवलंब करण्याचा प्रयत्नही झाला नाही, तर काही विभागातील स्थानिक

अधिकाऱ्यांनी २५ टक्क्यांपेक्षा कितीतरी कमी तडजोड स्वीकारली. या दोघाची कारणे सर्वश्रुत आहेत. आधीच किंमती भरमसाठ वाढत असतांना त्यात आणखी फीच्या च्या खर्चाचा बोजा लादण्यास स्थानिक अधिकारी सहाजिकच नाराज असत त्यामुळे त्यांना ही योजना नकोशीच असे. अनेक कामगारवर्गीय विद्यार्थ्यांचे पालकही या योजनेच्या विरुद्धच होते आणि अगदी लहान प्रमाणावर ही शिफारस लागू करण्यात आली तर त्याचे सामाजिक आणि मानसिक दृष्टचा जे परिणाम होतील ते कितपत इष्ट ठरतील ते अजिबात स्पष्ट झालेले नाही. 'गिनी पिग' प्रमाणे प्रयोगासाठी निवडलेली मुले एक तर त्यामुळे नाखूष होतील किंवा ती त्यांच्या वर्गातून उठतील. आणि कोणत्याही परिस्थितीत त्यामुळे सामाजिक चौकटीवर घडून येणारे परिणाम नगण्यच असतील. ग्रामर स्कूलचे संचालक आणि कामगारवर्गीय शिक्षणतज्ञ हे दोघेही खाजगी विभागाला टेकू देण्यासाठी उत्तमोत्तम विद्यार्थ्यांना सरकारी शाळातून काढून घेण्यास सहाजिकच नाखूष असतात.

परंतु ही योजना खरोखरी व्यापक प्रमाणावर लागू करण्याच्या दृष्टीने अगदी निराळी आहे आणि यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर सरकारपुढे फक्त दोनच पर्याय राहणार आहेत. एकतर कसलीही सरकारी मदत न मिळणाऱ्या विद्यार्थ्यांना पब्लिक स्कूलमध्ये धाडावयाचे. परंतु तसे करणे म्हणजे समाजवाद आणि समानता याबद्दलची आस्था अजिबात नष्ट झाल्याची जाहीर कबुली देण्यासारखेच आहे. किंवा दुसरा पर्याय म्हणजे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर विद्यार्थ्यांना या शाळांतून प्रवेश मिळवून देणे. यापैकी दुसरा पर्याय स्वीकारून पब्लिक स्कूलच्या संचालकांनी सुरुवातीला २५ टक्के जागा फी भरू न शकणाऱ्या मुलांसाठी राखून ठेवाव्यात आणि पुढे क्रमाक्रमाने हे प्रमाण ५० टक्के व ७५ टक्के असे वाढवीत जावे असे सरकारचे धोरण राहील असे जाहीर करावे. विद्यार्थ्यांचे पूर्वीचे शिक्षण सरकारी शाळातून झाले आहे की, खाजगी शाळातून झाले आहे याचा विचार न करता १०० टक्के विद्यार्थ्यांना स्पर्धात्मक प्रवेश मिळवून देण्याचे सरकारचे धोरण असावे. अर्थातच अशा शिक्षणसंस्थांना सरकारला आर्थिक सहाय्य द्यावे लागेल व त्यांच्या नियामक मंडळावर सरकारचे प्रतिनिधी पाठवावे लागतील हे ओघानेच आले.

यामुळे सोडवता न येण्यासारख्या सामाजिक आणि शैक्षणिक अडचणी निर्माण होतील का ? पब्लिक स्कूलसपुरताच विचार करावयाचा तर या प्रश्नाचे उत्तर निश्चितच नकारात्मक द्यावे लागेल. सरकारकडून 'प्रत्यक्ष अनुदान' मिळणाऱ्या अनेक शाळा आजही अस्तित्वात असून २५ टक्के किंवा ५० टक्के प्रवेश मोफत देण्याची योजना खूपच यशस्वी करून दाखवलेल्या काही अत्यंत प्रसिद्ध अशा ग्रामर स्कूलसचाही त्यात समावेश आहे. सरकारने नेमलेले नियामक मंडळांवरील प्रतिनिधी त्यांच्या कारभारात हस्तक्षेप करून नसत्या अडचणी उत्पन्न करतात. विद्यार्थ्यांच्या निवडीबाबत शाळेच्या स्वतःच्या अंतर्गत कसोट्यांपेक्षा निराळ्या अशा बाह्य

कसोट्या लावल्यामुळे निकाल अतिशय खराब लागतात किंवा फी देणाऱ्या आणि नादार मुलांत सामाजिक दरी निर्माण होते असे काहीही त्यांना वाटत नाही. अर्थात मोठाल्या पब्लिक स्कूलसमध्ये फी देणारी मुले ही अगदी संकुचित अशा सामाजिक वर्गांतून येत असल्यामुळे मुलांमुलांमधील विषमता तेथे अधिक स्पष्ट असणार हे उघड आहे. परंतु अखेरीस सामाजिक तफावत कमी कमी करीत आणण्यासाठी प्रथम ती एकत्र आणणे हा तर या योजनेचा निम्मा भाग आहे.

ही सुधारणा घडून आली तर अंती मध्यवर्ती सरकारलाच आर्थिक आणि शासकीय जबाबदारी पत्करावी लागणार आहे. १९४५ नंतरच्या मर्यादित प्रयोगाच्या बाबतीत परिस्थिती अशी नव्हती. मध्यवर्ती सरकार जर ही जबाबदारी उचलणार नसते तर फीच्या दरावर दृष्टी असलेले आणि वाढत्या खर्चाची धास्ती घेणारे स्थानिक अधिकारी मुळी याबाबतीत सहकार्य करावयास तयारच झाले नसते. ( किंवा त्यांनी फक्त समस्या निर्माण करणाऱ्या मुलांनाच तेवढा प्रवेश दिला असता.)

अशा तऱ्हेची सुधारणा स्वच्छेने घडवून आणता येईल का ? एखादी गोष्ट शक्यतोवर करार करून केलेली केव्हाही चांगले असते. सध्या जरी पब्लिक स्कूलसना कसलीही आर्थिक तंगी भासत नसली तरी अनेक मुख्याध्यापकांच्या, विशेषत: चांगल्या आणि अधिक प्रसिद्ध असलेल्या शाळांतील मुख्याध्यापकांच्या मनात त्यांच्या सध्याच्या निवड करण्याच्या पद्धतीबद्दल निश्चितपणे एक प्रकारची अढी निर्माण झालेली असते त्यामुळे ते सहकार्य करावयास तयार होऊ शकतील. म्हणून प्रथम सर्वमान्य अशी योजना निश्चित करण्याची तयारी दर्शवणे निश्चितच इष्ट ठरेल. आणि जर बहुसंख्य पब्लिक स्कूल्स त्यात सामील झाली तरी देखील ते पुरेसे ठरेल. परंतु बहुसंख्य शाळांनी जर या योजनेत सहभागी होण्याचे नाकारले तर मात्र समान संधीवर उघड उघड निर्बंध लादण्याच्या प्रवृत्तीचा बंदोबस्त करण्याचा आपला हक्क समाजाने बजावला पाहिजे.

या उपायाने पब्लिक स्कूल्स आपले स्वतंत्र वैशिष्टय, शिक्षकवर्ग आणि खरेखुरे शैक्षणिक फायदे कायम टिकवून पुन्हा हळूहळू सामाजिक दृष्ट्या अधिकाधिक वैधर्म्य आणू शकतील. वडलोपार्जित प्रतिष्ठा, शिक्षणाची संधी आणि स्वकर्तृत्वाने मिळवलेली प्रतिष्ठा ह्यांच्या एकमेकांवर होणाऱ्या परिणामामुळे सध्या जी सामाजिक कुंचबणा होते आणि खालून वरच्या दिशेने होणाऱ्या हालचालीवर जे निर्बंध पडतात ते रोखले जातील. त्यामुळे काही काळपर्यंत मध्यमवर्गीय मुलांचा ग्रामर स्कूलसप्रमाणे या शाळांतूनही अधिक भरणा होईल हे खरे, कारण प्रवेशाच्या बाबतीत त्यांना वांशिक आणि सभोवारच्या वातावरणाचा फायदा मिळत राहील. परंतु हा जादा भरणा निदान खरोखरीच्या बौद्धिक तफावतीमुळे तरी झालेला असेल; खाजगी साधनांवर असलेली अनाहूत मालकी तरी त्याच्या मुळाशी नसेल.

ते कसेही असो, मध्यम वर्गीयांना मिळणारा जादा प्रवेश हा निदान पहिल्याइतका ढळढळीत तरी खासच नसेल.

### ३. उच्चभ्रू शालेय पद्धतीविरुद्धची बाजू.

जन्म किंवा संपत्ती यांचा विचार न करता शक्य तेवढी समान संधी उपलब्ध करून देण्याच्या मर्यादित अर्थाने आपली शिक्षणपद्धती कमालीची न्याय्य आणि निर्दोष अशी असली पाहिजे. त्याचप्रमाणे सर्वोत्कृष्ठ विद्यार्थ्यांना निवडून त्यांना उच्च प्रतीचे शिक्षण देण्याच्या कामी ती अतिशय कार्यक्षम ठरली पाहिजे. समान संधी असलेला समाज निर्माण करण्याचे आपले ध्येय त्यावेळी बव्हंशी साध्य झालेले असेल.

परंतु दहाव्या प्रकरणात मी असे दाखवून दिले आहे की, ब्रिटनमधील समाजवाद्यांच्या दृष्टीने हे ध्येय पुरेसे नाही. स्वतःचा विकास करून घेण्याच्या उद्देशाने पृथकपणा असलेल्या शिक्षणपद्धतीवर समान संधी वरून लादण्यात आली तरीदेखील सर्वसामान्य नागरिक आणि नवा उच्चभ्रू यांच्यातील दरी तशीच राहील. अर्थात ही दरी पहिल्याइतकी रुंद असणार नाही. कारण सध्याच्या शिक्षण-पद्धतीपेक्षा नव्या योजनेनुसार ऊर्ध्वगामी प्रवर्तन पहिल्यापेक्षा अधिक मुक्तपणाने होऊ लागले असेल. आणि निवडक मुलांना मिळणारा प्रवेशही अधिक न्याय्य स्वरूपाचा असेल. अर्थात निरनिराळी विद्यापीठे, सहावी ईयत्ता किंवा वयाच्या अठराव्या वर्षापर्यंत शाळेत शिक्षण घेण्याची मुभा इ. बाबतीत काही प्रमाणात तरी उच्चभ्रू प्रवृत्ती कायम राहणे अपरिहार्य आहे. परंतु पब्लिक स्कूल्स आणि इतर शाळा यांच्यात प्रतिष्ठेच्या बाबतीत तफावत राहिली तरी त्यामुळे उच्चभ्रूंचा जो वर्ग तयार होईल तो सामाजिक न्याय, समाधान आणि लोकशाही यांच्या दृष्टीने अत्यंत अलिप्त असा दृष्टीकोण असलेला असेल. समान संधी उपलब्ध करून देण्याच्या बाबतीत युद्धोत्तर काळात सरकारच्या पृथक शिक्षणपद्धतीचा जो अनुभव आला त्यावरून देखील वरील विधानाला बळकटीच येते.

ग्रामर, सेकंडरी आणि मॉडर्न अशा त्रिविध माध्यमिक शालेय पद्धतीच्या संदर्भातच १९४४ च्या कायद्याची अंमलबजावणी करण्यात आली होती. (अर्थात त्याचा तसा उद्देश होता हे स्पष्ट झालेले नाही.) हे तीन प्रवाह ११+इयत्तेच्या वेळी होणाऱ्या निवडीपासून विभक्त होत. या तिन्ही प्रकारच्या शाळात 'समान गुणवत्ता' गृहीत धरण्यात येत असली तरी ग्रामर स्कूल्स आपले श्रेष्ठत्व दीर्घकाळ-पर्यंत टिकवून धरू शकतील हे मान्य करण्यात आलेले होते आणि ११+ची परीक्षा व त्यांच्या जोडीला ग्रामर स्कूलची फी रद्द करून टाकणे या मागील हेतू सर्व मुलांना हा उच्च प्रतीचा फायदा मिळावा म्हणून त्यांना समान संधी प्राप्त करून देणे हा होता.

युद्ध समाप्तीनंतरच्या काळात वस्तुनिष्ठ आणि व्यक्तिनिष्ठ अशा दोन्ही दृष्टीने ११+च्या परीक्षेला जे एवढे अवास्तव महत्त्व प्राप्त झाले त्याचे नेमके कारण त्यापासून मिळणारा फायदा इतका उच्च प्रतीचा होता हेच होय. ग्रामर-स्कूलमधील शिक्षणाला दीर्घकालीन प्रतिष्ठेची जी परंपरा होती ती सेकंडरी मॉडर्न शाळांना अजिबात नव्हती. ग्रामर स्कूलमध्ये कितीतरी चांगल्या प्रकारचे शिक्षण मिळे, तर त्याचवेळी सेकंडरी मॉडर्न शाळांची अगदी मुळासापासून नुकती कोठे पुनर्रचना करण्यात येत होती. सर्वसाधारणपणे गैरसोयीच्या असलेल्या त्या शाळांच्या इमारतींतही सुधारणा घडवून आणल्या जात होत्या. पण ग्रामर स्कूलमधील शिक्षण चांगल्या प्रतीचे होते इतकेच नव्हे तर चांगल्या पगाराच्या शारीरिक श्रम करावे न लागणाऱ्या नोकऱ्या आणि उच्च प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा व्यवसाय उपलब्ध होण्याचे ते एकमेव नसले तरी प्रमुख साधन होते. मोठ्या प्रमाणावरील व्यवस्थापकीय यंत्रणेची जागा जसजसा सामान्य आणि स्वतःच्या कर्तबगारीने पुढे आलेला माणूस घेऊ लागतो, आणि तंत्रविषयक कौशल्य जसजसे अधिकाधिक प्रमाणात अत्यावश्यक होऊन बसते तसतशी सामाजिक दर्जा वाढवण्यासाठी शैक्षणिक पात्रता (म्हणजे याठिकाणी ग्रामर स्कूलची पार्श्वभूमी) देखील अधिकाधिक प्रमाणात अनिवार्य होऊन बसते ही वस्तुस्थिती प्रकर्षाने जाणवते.

स्पर्धात्मक प्रवेशावर आधारलेली राष्ट्रीय स्वरूपाची शेलकी शिक्षणपद्धती कशी असेल त्याची ही छोटीशी प्रतिकृतीच म्हणता येईल. ती पद्धती जनतेत कमालीची अप्रिय ठरेल याबाबत मात्र शंका घेण्याचे कारण नाही. ११+च्या परीक्षेबद्दल जनमत अत्यंत प्रतिकूल आणि प्रक्षुब्ध होते. त्या एका दिवसाच्या परीक्षेवर मुलांचे सारे भवितव्य ठरवले जाते अशी त्याबाबतची समजूत होती. अर्थात यापैकी बरीचशी अप्रीती, अज्ञान किंवा अतिशयोक्ती यावर आधारलेली होती यात शंकाच नाही. वस्तुस्थिती अशी आहे की, एका दिवसाच्या परीक्षेवर मुलांचे निकाल कधीच अवलंबून नसत. काठावरच्या मुलांचे बाबतीत आटोकाट दक्षता घेतली जात असे. पुरवणी परीक्षेची आणि 'विकासाच्या बाबतीत मागास-लेल्या' विद्यार्थ्यांची बदली करण्याची नेहमीच तरतूद केलेली असे (अर्थात अनेकदा ती सदोषही असे). तसेच चांगल्या सेकंडरी मॉडर्न शाळांनादेखील वाढत्या प्रमाणात प्रगत अभ्यासक्रमाची सोय उपलब्ध करून देऊन वरिष्ठ व्यवसायांची वाट मोकळी करून दिली जाई.

या भीतीमागील अंतःप्रेरणा साधार ठरावी इतपत सत्यांश त्यात निश्चितच होता. विद्यार्थ्यांची निवड करण्याची पद्धती वरकरणी जरी न्याय्य दिसत असली तरी तेवढ्याने ही भीती कमी होऊ शकत नाही. उलट त्या पद्धतीमुळे मी दहाव्या प्रकरणात सूचित केल्याप्रमाणे असंतोष प्रत्यक्षात वाढला असण्याचा संभव आहे. ते कसेही असो, त्या भीतीची तीव्रता आणि तदनुषंगिक असंतोष, त्याचप्रमाणे

अंती किती भयानक परिणामाला तोंड द्यावे लागणार आहे या जाणीवेने विद्यार्थी आणि पालक या दोघांवरही लादला गेलेला मानसिक आणि शारीरिक ताण यामुळे समान संधीबरोबरच शैक्षणिक आणि सामाजिक विषमताही प्रकर्षाने नांदत असेल तर समाधानी आणि न्याय्य वाटणारा समाज निर्माण होऊ शकणार नाही या त्या प्रकरणातील विधानाला बळकटीच येते.

अर्थात ११ व्या ईयत्तेपासून विद्यार्थ्यांना अलग करण्याच्या बाबतीत तीव्र स्वरूपाचे व्यवहार्य आक्षेपदेखील घेतले जातात. विद्यार्थ्यांची निवड करताना काही चुका होणे अपरिहार्य आहे. आणि खरोखरीच तशा खूप चुका होतात हे मान्य केले जाते. शाळा बदलावी लागल्यामुळे निर्माण होणारा गदारोळ, खालच्या ईयत्तेत ढकलल्यामुळे विद्यार्थ्यांच्या पदरी येणारी सामाजिक मानखंडना आणि कामाच्या भारामुळे मुख्याध्यापक आणि शिक्षणाधिकारी यांच्यावर पडणारा ताण या गोष्टी लक्षात घेता मुलांची विभागणी उशीरा करण्याचा एखादा व्यवहार्य उपाय योजण्यात आला तर परिस्थितीत काही सुधारणा होऊ शकेल काय हा खरा प्रश्न आहे. वर उल्लेखिलेल्या त्रिविध स्वरूपाची विभागणी तरी तर्कशुद्ध आहे का याचाही नीटसा उलगडा होत नाही. वस्तुतः मुलांचे अगदी सुस्पष्ट असे तीन गट पडतात आणि त्यांची व्यवस्थित वर्गवारी करणे या पद्धतीमुळे शक्य होते. विद्यार्थ्यांचे असे तीन गट पडत असले तरी प्रत्येक गटातील विद्यार्थ्यांची नेमकी संख्या आधीच निश्चित करता येईल कारण प्रत्येक गटातील विद्यार्थ्यांसाठी स्वतंत्र शाळा उभाराव्या लागतील. म्हणजे या सर्व व्यवहाराला निश्चित असा कोणताच दंडक लागू पडणार नाही.

ग्रामर स्कूलमधील विद्यार्थ्यांना अलग करण्यामुळे जे दोष निर्माण होतात त्यात पब्लिक स्कूलमध्ये नादार विद्यार्थ्यांसाठी राखून ठेवलेल्या जागा भरण्यासाठी जी आणखी निवड करावी लागते त्यामुळे निर्माण होणाऱ्या तशाच तऱ्हेच्या दोषांची भर पडली म्हणजे समाजवादी म्हणून शिक्षणाची एखादी बहुउद्देशीय पद्धती अंमलात आणली पाहिजे असे आपल्याला वाटू लागते. अशा शिक्षण पद्धतीनुसार यच्चयावत सर्व विद्यार्थ्यांना शालेय शिक्षण संपविण्याच्या अधिकृत वयोमर्यादेपर्यंत तरी निदान समान व्यापक अनुभव घेता येण्यासारखी आदर्श परिस्थिती निर्माण झाली पाहिजे. मागील प्रकरणातील प्रतिपादन बरोबर आहे असे मान्य केले आणि सर्व गोष्टी आपल्या मनासारख्या घडणार असतील तर समतेवर आधारलेला आणि वर्गविहीन समाज निर्माण करण्याजोगी परिस्थिती निर्माण होऊ शकेल.

## ४. बहुउद्देशीय शाळा : तात्त्विक बाजू

बहुउद्देशीय नसलेल्या शाळांचा वारसा आपल्याकडे चालत आलेला असल्यामुळे आणि त्या सक्तीने नष्ट करून टाकणे शक्य नसल्याने याबाबतीत वस्तुतः

आपल्याला फारशी मुभा राहिलेलीच नसते. या आणि सहाव्या विभागात दिलेल्या इतर कारणास्तव मजूर पक्ष सबंध देशावर बहुउद्देशीय पद्धती लादू शकत नाही. तथापी काही गोष्टी आपल्याला आपल्या मर्जीनुरूप करता येण्यासारख्या आहेत आणि म्हणून सर्वंकष माध्यमिक शिक्षणाविरुद्ध सर्वसाधारणपणे जे आक्षेप घेतले जातात त्यांचा विचार केला पाहिजे.

या शिक्षणपद्धतीला सर्वात प्रखर विरोध जर कोणी केला असेल तर तो डॉ. (आता सर) एरिक जेम्स यांनी. नेतृत्वाचे गुण अंगी असणे अत्यंत महत्त्वाचे आहे– सामाजिक समस्यांची व्याप्ती आणि गुंतागुंत कमालीची वाढलेली असल्याने तर नेतृत्व गुणाला आता पूर्वी कधी नव्हते इतके महत्त्व प्राप्त झाले आहे— या नितांत श्रद्धेवर त्यांचा विरोध आधारलेला आहे. म्हणून त्यांचे प्रतिपादन असे की, या भावी नेत्यांचे स्वरूप कसे असावे याकडे शैक्षणिक पद्धतीचे सर्वात अधिक लक्ष असले पाहिजे आणि त्यासाठी विद्यार्थ्यांची निरनिराळ्या शाळांतून विभागणी करावी लागेल. आणि हे सर्वात महत्त्वाचे उद्दिष्ट तडीस नेण्याच्या बाबतीत समतावादी भावना कोठल्याही प्रकारे आड येऊ देता कामा नये.

नेतृत्वगुणाचे महत्त्व कोणताही समंजस माणूस कधीच नाकारणार नाही. परंतु याबाबत नुसती सर्वसाधारण किंवा ठोकळ स्वरूपाची विधाने करून फारसे काही साध्य होऊ शकणार नाही. उदाहरणार्थ नेतृत्वगुण असलेले निवडक लोक आणि सर्वसाधारण समाज यांच्या दर्जात कितपत तफावत असावी ? नेतृत्व आणि लोकशाही, समता किंवा समभाग यासारख्या सामाजिक दृष्ट्या इष्ट गोष्टी यापैकी अधिक गरज कशाची ते आपण कसे ठरवणार ? आणि याहीपेक्षा मूलभूत प्रश्न असा की, नेतृत्वासाठी नेमक्या कोणत्या गुणांची आवश्यकता आहे ते आपण निश्चितपणे सांगू शकतो का ? आणि आपली इच्छा असली तरी आपल्या संपूर्ण शिक्षणपद्धतीची रचना त्या अनुषंगाने करणे आपल्याला शक्य आहे का ?

डॉ. जेम्स यांनी आवश्यक गुणांची खालील यादी सादर केली आहे : कुशाग्र बुद्धिमत्ता, सखोल विश्वविद्यालयीन शिक्षण, तत्वनिष्ठा, धैर्य, निर्णय घेण्याचे सामर्थ्य, स्थैर्य, चतुराई आणि चिकाटी. परंतु अत्यंत प्रभावी ठरलेले काही इतिहास-प्रसिद्ध नेते तर अगदी निरक्षर, विश्वविद्यालयीन शिक्षणाचा गंधही नसलेले, अप्रामाणिक, अस्थिर आणि चक्क वेडे नसले तरी विकृतीने पछाडलेले होते. 'वाईट' पुढारी वगळून फक्त चांगल्या पुढाऱ्यांपुरताच विचार करावयाचा झाला तरीदेखील आपल्याला असे आढळून येईल की, त्यांतील अनेकांना सखोल विश्वविद्यालयीन शिक्षण मिळालेले नव्हते–– बहुधा असे पुढारीच बहुसंख्य असतील ( आणि अंगी चातुर्य नसलेले तर त्याहीपेक्षा जास्त असतील). वस्तुतः नेतृत्वाला आवश्यक असलेल्या गुणांची ही एक सम्यक यादी असून ती इतकी मोघम आणि ढोबळ स्वरूपाची आहे की त्यातून कोणतेही निष्कर्ष काढता येतील.

नेतृत्वासंबंधी आपल्याला इतकेच म्हणावयाचे आहे की, अप्रतिबंध किंवा निरपेक्ष कल्पना म्हणून ती जवळजवळ निरर्थकच ठरते. नेतृत्वाच्या गुणांचा विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भातच विचार करावा लागतो. एका विशिष्ट परिस्थितींत चांगल्या नेतृत्वासाठी आवश्यक असणारे गुण हे निराळ्या परिस्थितीत कदाचित चक्क प्रतिकूल देखील ठरण्याचा संभव आहे. आणि गटाचे मानसशास्त्र अद्याप पुरेसे प्रगत झालेले नसल्यामुळे निरनिराळ्या परिस्थितीनुरूप लागणारे नेतृत्वाचे गुण प्रकट करणे शक्य होईलच असे सांगता येत नाही.

तथापी सारासार विचार करून आपल्याला काही अंदाज बांधावे लागतील. अर्थात आज ज्या तऱ्हेच्या नेतृत्वाची गरज आहे ते 'शेलक्या' शिक्षण पद्धतीतून निर्माण होऊ शकणार नाही हे शाबित करणारा हवा तेवढा पुरावा उपलब्ध आहे. प्लेटो किंवा अरनॉल्ड यांनी त्या त्या परिस्थितीत लिहून ठेवलेले निःसंशय योग्य असले तरी आजच्या शिक्षणपद्धतीत एका बाजूला तत्ववेत्त्या राजाची आदर्श अल्प-जनाधिपत्य विचारसरणी आणि दुसऱ्या बाजूला अतिविस्तृत अशा ब्रिटिश साम्राज्य-शाहीची आवश्यकता प्रतिपादणारी विचारसरणी यांना योग्य अशी शिक्षणपद्धती स्वीकारण्यात आली तरी ती लोकशाही आणि समतावादी अशा विसाव्या शत-काच्या मध्यावरील समाजालाही योग्य ठरेल असे मानणे मोठे विचित्रपणाचे होईल.

माझी अशी समजूत आहे की, आजच्या नेतृत्वाला आवश्यक त्या नैतिक गुणाव्यतिरिक्त तीन गुणांची आवश्यकता आहे. याबाबत बहुतेक सर्वांचे एकमत होईल. ते गुण म्हणजे : सार्वजनिक व्यवहारासंबंधी अचूक अडाखे बांधता आले पाहिजेत, तांत्रिक बाबतीत कार्यक्षम असले पाहिजे आणि ते लोकशाहीवादी असले पाहिजे. डॉ. जेम्स यांनी यापैकी पहिल्या गुणावर विशेष भर दिला आणि ते योग्यच आहे. कारण सार्वजनिक व्यवहारांचा वाढता व्याप आणि गुंतागुंत यामुळे पूर्वी कधी नव्हता इतका आज तो गुण आवश्यक होऊन बसला आहे. अर्थात हा गुण अंगी बाणण्यासाठी सखोल विश्वविद्यालयीन शिक्षणाची मुळीच गरज भासत नाही. थोडेसे डोके (फार नाही) आणि बुद्धिमत्ता, परिस्थितीची 'नाडी', शक्याशक्यतेची अटकळ, फार मोठी मानसिक अंतःप्रेरणा, आणि सार्वजनिक व्यवहाराचे ज्ञान असले म्हणजे झाले. शैक्षणिक आणि राजकीय अशा दोन्ही क्षेत्रांत वावरणारा कोणताही माणूस वरील गुणांसाठी अभूतपूर्व स्वरूपाची शैक्षणिक पात्रता लागत नाही हे सहज सांगू शकेल. त्याचप्रमाणे त्यासाठी कसल्या खास किंवा स्वतंत्र शिक्षणाचीही आवश्यकता नसते हेही सहज लक्षात येण्यासारखे आहे. उलट, परिस्थिती त्यांच्या नेमकी उलट असल्याचे आढळून येईल. म्हणजे असे की, सध्याच्या अनेक विचारवंतात या व्यवहारी शहाणपणाचा अभाव दिसून येतो त्यावरून किंवा आपल्या नेहमीच्या अनुमानावरूनही हे सहज लक्षात येऊ शकेल.

तांत्रिक बाबतीतील कार्यक्षम नेतृत्वासंबंधी बोलावयाचे तर त्याबाबत बराच

गैरसमज असल्याचे आढळून येते. स्पर्धात्मक आणि तांत्रिक जगात ब्रिटनला टिकाव धरून रहावयाचे असेल तर अत्यंत कुशाग्र बुद्धीच्या मुलांना खास शिक्षण देणे अत्यावश्यक आहे असे काही वेळा सांगितले जाते. परंतु या तग धरून राहण्यासाठी जर कशाची आवश्यकता असेल तर ती संशोधन, व्यवहारोपयोगी विज्ञान, तंत्र शास्त्रीय महाविद्यालये इत्यादीवर सध्यापेक्षा खूप जास्त पैसा खर्च करण्याची. यासाठी काहीजण सुचवितात तशा प्रकारच्या अलग माध्यमिक शाळांची मुळीच आवश्यकता नाही. अमेरिकेतील उदाहरणाने हे स्पष्टपणे दाखवून दिलेले आहे. याबाबत आणखीही गोंधळ आहे. अमेरिकेपेक्षा ब्रिटन मागे पडतो तो विश्वविद्यालयीन किंवा ग्रामर स्कूलमध्ये शिक्षण घेतलेल्या सर्वश्रेष्ठ लोकांच्या अंगी असलेले कर्तृत्व कमी पडते म्हणून नव्हे तर खालच्या वर्गातील माणसाचे सर्वसाधारण तंत्रविषयक कर्तृत्व थिटे पडते म्हणून. या दृष्टीने विचार केला तर असे दिसून येईल की, शिक्षणात खास प्राविण्य मिळविण्यावर लक्ष केंद्रित करण्याची मुळीच आवश्यकता नसून सर्वच विद्यार्थ्यांना सर्वसाधारण दर्जाचे शिक्षण प्राप्त करून देण्यावर भर देण्याची अधिक आवश्यकता आहे. आणि हीच ब्रिटनची सर्वात मोठी उणीव आहे. ब्रिटनमध्ये 'पब्लिक स्कूल्स' आणि ग्रामर स्कूल्स असूनही ब्रिटनपेक्षा अमेरिकेत आठपट मुले विश्वविद्यालयीन (अनेकदा ही विश्वविद्यालये दुय्यम दर्जाची असतात) शिक्षण घेतांना आढळतात आणि त्यामुळे स्पर्धात्मक क्षेत्रात अमेरिका ब्रिटनच्या मानाने केवढा तरी फायदा मिळवून जाते.

शेवटचा मुद्दा नेतृत्वाच्या अंगी असणाऱ्या लोकशाहीवादी वृत्तीसंबंधीचा. डॉ. जेम्स यांचे प्रतिपादन असे की, प्लेटोने सूचित केलेल्या पद्धतीनुसार विद्यार्थ्यांना अलग अलग शिक्षण देण्यात आले तर त्यात लोकशाही कल्पनेची भरपूर बीजे असल्याचे आढळून येईल. कारण तशा तऱ्हेच्या शिक्षण पद्धतीतही आजच्याप्रमाणेच संपत्तीचा किंवा कुळाचा विचार न करता सर्व विद्यार्थ्यांना समान संधी उपलब्ध करून दिली जात असे. परंतु ही तुलना अगदीच गैरलागू आहे. आणि सर्व मुलांना साधारणपणे एकाच प्रकारचे शिक्षण मिळणाऱ्या शिक्षणपद्धतीपेक्षा विशिष्ट गटातील मुलांना निवडून त्यांना भावी काळात चांगली संधी मिळू शकेल अशा शाळात घालणारी शिक्षण पद्धती—मग ही निवड कशीही केलेली असो—अधिक लोकशाही स्वरूपाची आहे असे म्हणणे खासच समंजसपणाचे ठरणार नाही. आणि यापैकी कोणतीही शिक्षण पद्धती अधिक लोकशाहीवादी असली तरी पहिल्या शिक्षण पद्धतीमुळेच मुलांना लोकशाही वळण लागण्याचा संभव अधिक असणार हे निश्चित.

आपल्याला ज्या तऱ्हेच्या नेतृत्वाची आवश्यकता आहे तसे नेतृत्व कोणत्या शिक्षण पद्धतीमुळे निर्माण होऊ शकेल ते अद्यापही आपण ठामपणे सांगू शकणार नाही अशी माझी समजूत आहे. वस्तुतः झपाट्याने बदलणाऱ्या आजच्या जगात कशाप्रकारच्या नेतृत्वाची आपल्याला जरूर आहे तेच मुळी अद्याप पुरेसे स्पष्ट

झालेले नाही. परंतु त्यासंबंधीचे काही प्रथमदर्शनी अंदाज, आणि इतर देशांना आलेले अनुभव लक्षात घेता प्लेटोला अभिप्रेत असलेल्या अभिजनांची (Elite) निर्विवाद आवश्यकता आहे असे अजिबात सूचित होत नाही.

बाकीचे मुद्दे–जे वस्तुतः भावनात्मक असूनही तात्विक आहेत असे भासविले जाते–विचारात घेतले नाहीत तरी चालण्यासारखे आहे. हे मुद्दे म्हणजे विद्वानांच्या श्रेष्ठतेवर आक्षेप घेणे व 'सामाजिक पूर्वग्रहां'चे प्रदर्शन करण्यासारखे आहे, सामान्य दर्जाकडे आपला कल आहे असे दर्शवणे, सर्वस्वी राजकीय दृष्टीकोणातूनच आपण विचार करतो अशी कबुली देणे, किंवा विद्यार्थ्यांच्या व्यक्तिगत अडचणीं-विषयी उदासीनता दर्शविणे आणि त्यामुळे समाजाच्या गरजांकडेही दुर्लक्ष होणे इ. आपण असे धरून चालू की, या दोन शिक्षण पद्धतींच्या पुरस्कर्त्यांपैकी एकजण दुसऱ्यापेक्षा अधिक पूर्वग्रहदूषित आहे किंवा राजकारणात अधिक मुरब्बी आहे अथवा बेपर्वा अगर उलटच्या काळजाचा आहे अशातला प्रकार नाही. परंतु निर-निराळ्या बाबतीत मूल्यमापन कसे करावयाचे, समाज जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे संघटित कसा करता येईल आणि एकंदर मुलांच्या गरजा कशा भागवता येतील याबाबतीत त्यांचे प्रामाणिक मतभेद आहेत. म्हणून पूर्वग्रहदूषित भाषा वापरून काहीही साध्य करता येणार नाही.

## ५. बहुउद्देशीय शाळा : व्यावहारिक बाजू

तथापी अनेक लोक बहुउद्देशीय शाळांना तरीही विरोध करतात तो तात्विक कारणास्तव नसतो तर व्यवहारांत त्याचे परिणाम चांगले होणार नाहीत अशी त्यांना भीती वाटत असते म्हणून. या शाळांमुळे शिक्षणाचा दर्जा खालावेल आणि हुषार मुलांची प्रगती सर्वसाधारण मुलांच्या पातळीवरच रोखली जाईल ही भावना सर्वसाधारणपणे या भीतीच्या मुळाशी असते. आणि नेमके उदाहरण द्यावयाचे तर एखाद्या शाळेतून सहा ईयत्ता असतील आणि शिवाय त्यांना प्रगत शिक्षण द्यावयाचे असेल तर शाळेचा आकार फार वाढेल–डॉ. जेम्स पाच हजाराचा आकडा घेतात–आणि त्यामुळे व्यक्तिगत गुणवत्ता आणि जिव्हाळा कमी होईल आणि मुख्याध्यापकांना आपल्या सर्व विद्यार्थ्यांना व्यक्तिशः ओळखण्याची संधी मिळू शकणार नाही.

या प्रत्यक्ष वस्तुस्थितीवरूनच त्यासंबंधीचे निष्कर्ष काढले पाहिजेत. आणि देशांत ( हे पुस्तक लिहित असतांना ) अशा प्रकारच्या बहुउद्देशीय शाळा अवघ्या चौदाच असल्यामुळे त्याबाबत निर्णायक असा कोणताच पुरावा उपलब्ध नाही. परंतु आतापर्यंत या दिशेने जे प्रयोग झालेले आहेत त्याची काळजीपूर्वक छाननी केल्यास, निदान प्राथमिक स्वरूपाचा तरी पुरावा हाताशी लागेल. त्या पुराव्या-वरून असे दिसते की, वर उल्लेखिलेली भीती बाळगण्याला कसलाही आधार नाही.

तसेच दर्जा घसरल्याचे कोठलेही चिन्ह दिसत नाही. उलट कांही पुरावा तर त्याच्या विरुद्ध असल्याचेच ( म्हणजे दर्जा वाढला असल्याचे ) दिसून येते. त्याचे मुख्य कारण असे आहे की, अशा शाळांमधून वेगवेगळी बौद्धिक कुवत असलेल्या मुलांची एकाच वर्गात खिचडी करण्यांत येईल अशी अनेकांना वाटणारी भीती (आणि कांहींना आशा ) निरर्थक आहे. कारण या शाळा अशी खिचडी करण्याऐवजी साधारणपणे समान दर्जाची मुले एका वर्गात येऊ शकतील अशाच तऱ्हेने त्यांची कसोटी घेऊन त्यांची वर्गवारी लावण्याची पद्धत अवलंबितात.

'सामाजिक प्रगती' साठी अमेरिकन धाटणीप्रमाणे बुद्धिमत्तेच्या निकषाचा जवळजवळ संपूर्ण अभाव असलेली पद्धती स्वीकारली जाईल अशी आशा बाळगणाऱ्या बहुउद्देशीय शाळांच्याबाबतीत विशेष उत्साह दाखवणारांना यामुळे धक्काच बसला. परंतु सारासार विचार केला आणि या बाबतीतील अमेरिकेचा अनुभव जमेस धरला तर असे दिसून येईल की, त्यामुळे खरोखरीच दर्जा अतिशय खालावेल आणि हुषार मुलांना ते अतिशय अडचणीचे होऊन बसेल. म्हणून बुद्धिमत्तेनुसार किंवा लायकीप्रमाणे वर्गवारी करणे नेहमीच अपरिहार्य ठरणार.

बौद्धिक निकषावर निवड करण्याची पद्धत सुरू करण्यात आली तर ११+च्या परिक्षेविरुद्ध जे आक्षेप होते त्यांची पुनरावृत्ती होणार असल्याने हा सर्व प्रयोग म्हणजे वेळाचा निरर्थक अपव्यय करण्यासारखे आहे असे जे काही टीकाकार भासवतात ते खरे नाही. असा आरोप करणे म्हणजे परिस्थितीच्या यथार्थ दर्शनाकडे दुर्लक्ष करण्यासारखे आहे. सर्व प्रकारची स्पर्धा किंवा चुरस अजिबात बंदच करून टाकावयाची असा या शाळा सुरू करण्यामागील उद्देश नाही. ते कधीच करता येणार नाही. अत्यंत असमान दर्जा असलेल्या शाळांमधून मुलांना प्रत्यक्ष अलग केल्याने जी आत्यंतिक सामाजिक विभागणी होते ती टाळणे एवढाच अशा शाळांचा मर्यादित हेतु असतो. त्याचप्रमाणे ग्रामर स्कूलमध्ये प्रवेश हे मध्यम वर्गीय व्यवसाय प्राप्त करून घेण्याचे एकमेव साधन मानले जात असताना अशा ग्रामर (किंवा पुढे पब्लिक) स्कूलमध्ये प्रवेश न मिळाल्याने निर्माण होणाऱ्या तीव्र सामाजिक असंतोषाला आळा घालण्याचाही त्यामागे हेतु असतो. वर उल्लेखिलेली सामाजिक विभागणी आणि असंतोष यांचा एका शाळेतल्या शाळेत मुलांची वर्गवारी लावण्यामुळे होणाऱ्या परिणामाशी अर्थाअर्थी कसलाही संबंध पोहोचत नाही. कारण चार पावले टाकल्याबरोबर कोठल्याही क्षणी ही वर्गवारी बदलून घेणे केव्हांही शक्य असते. म्हणून आपल्याला फक्त सध्या अस्तित्वात असलेली पब्लिक स्फूल्सच तेवढी विचारात घेतली पाहिजेत. आणि असा विचार करतांना सहाव्या ईयत्तेत प्रवेश मिळू शकला नाही किंवा परिपूर्ण बनता आले नाही म्हणून जी विभागणी होते आणि असंतोष फैलावतो त्याची ग्रामर स्कूलमध्ये प्रवेश न मिळाल्याने निर्माण होणाऱ्या विभागणीशी किंवा असंतोषाशी क्वचितच तुलना होऊ शकते हेही लक्षांत घेतले पाहिजे.

सहाव्या ईयत्तेच्या मुद्यासंबंधी बोलावयाचे तर त्याबाबतचा पुरावा निश्चितच अनिर्णयात्मक स्वरूपाचा आहे. अशा सर्वच शाळा आकाराने फार मोठ्या असतील हे खरे नाही. आता सुरू करण्यांत आलेल्या बहुतेक शाळांतून १५०० पेक्षा कमी विद्यार्थी असतात आणि कांहीत तर अवघी पाच–सहाशेच असतात. परंतु अशा शाळांतील विद्यार्थ्यांची सरासरी संख्या एक हजार धरली आणि त्यांत इकडे तिकडे थोडा फार फरक झाला असे धरले तरी त्यांत एवढे अनर्थकारक काय आहे ते सामान्य माणसाला कळू शकत नाही. अनेक पब्लिक स्कूल्सचा आकारही इतपतच असतो आणि त्यांतून बाहेर पडलेल्या मुलांची मला जी माहिती आहे त्यावरून त्यांचाही त्यांच्या मुख्याध्यापकांशी व्यक्तिगत संबंध नव्हता तरी देखील ती कोणत्या बाबतींत उणी ठरली आहेत असे मुळीच नाही. निदानपक्षी, सध्याच्या ग्रामर स्कूल्समध्ये प्रगत शिक्षणाची जेवढी सोय उपलब्ध असते तेवढी तरी निदान सध्या अस्तित्वात असलेल्या बहुउद्देशीय शाळांतून होऊ शकते असे दिसते. आणि म्हणून ही टीका निदान आतापर्यंत तरी सिद्ध होऊ शकलेली नाही असेच मानावे लागेल.

अशा शाळांच्याविरुद्ध मांडण्यात येणारे बहुतेक मुद्दे उपमानात्मक म्हणजे दुसऱ्या शाळांची तुलना घेऊन मांडले गेलेले आहेत. अमेरिकेतील अनेक माध्यमिक शाळांतील शिक्षणाचा दर्जा निकृष्ट असतो याकडे हे टीकाकार बोट दाखवतात. त्या शाळांचा दर्जा चांगला नाही याबद्दल वादच नाही. परंतु त्या शाळा सर्वंकष स्वरूपाच्या आहेत या व्यतिरिक्त त्यांच्या निष्कृट दर्जाची आणखीही काही कारणे दाखवता येण्यासारखी आहेत. उदाहरणार्थ : अमेरिकन जीवनाची अभिजन विरोधी आणि पढिक पांडित्याविरुद्ध ( मोठ्या डोक्याविरुद्ध ) असलेली परंपरा, शिक्षकांचा ( विशेषत: पुरुष शिक्षकांचा) कमालीचा तुटवडा, अनेक शिक्षकांचा निकृष्ट दर्जा ( काही वेळा तर तो जवळजवळ निरक्षरतेइतका खालचा असतो ), बौद्धिक पात्रतेऐवजी केवळ वयोमानाप्रमाणे पाडलेल्या गटानुसार आपोआप सामाजिक बढती मिळत गेली पाहिजे हा आग्रह,ड्यूईवादाचे कमालीचे आकर्षण आणि शैक्षणिक क्षेत्रातील मूलभूत शिस्तीला तिलांजली देऊन ' जीवनाशी मिळते जुळते' घेणारे शिक्षण, व्यावसायिक शिक्षणक्रमांना अवास्तव अग्रक्रम, इत्यादी. या सगळ्याच्या सगळ्या किंवा त्यांतील कोणत्याच गोष्टी इंग्लंडमधील शाळांतून अस्तित्वांत नाहीत आणि त्यांची जरूरही नाही. परंतु अमेरिकेतील दर्जाला मात्र त्याच कारणीभूत असण्याचा संभव आहे.

त्रिविध शिक्षणपद्धतींऐवजी अलीकडेच स्वीडनमध्ये सर्वंकष शिक्षणपद्धतीचा जो प्रयोग करून पाहण्यात आला त्यावरूनही वरील विवेचनालाच बळकटी येते. (स्वीडनमधील सर्वंकष शाळांतून प्रत्यक्षात माध्यमिक वयोमानाच्या गटाचाही समावेश होतो.) हा प्रयोग अत्यंत यशस्वी ठरत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येत आहे.

शाळांतील मुलांच्या संख्येत फरक असतो. ग्रामीण भागात ती २०० असली तर स्टॉकहोमसारख्या शहरात १२०० पर्यंत असते. आणि ग्रामर स्कूलमधील शिक्षणाचा दर्जा प्राप्त करून घेण्यासाठी शाळांचा आकार फार मोठा असला पाहिजे असे कोणी म्हणत नाही. त्या शाळांतून शिक्षणाचा दर्जा कायम टिकवण्यात आला आहे. निरनिराळ्या प्रवाहात खर्चाच्याबाबत अनिष्ट अशी तफावत नाही, त्याचप्रमाणे असंतोषालाही तेथे वाव असल्याचे दिसत नाही. आणि त्या देशातील सर्व प्रमुख राजकीय पक्षांचा त्या प्रयोगाला पाठिंबा आहे. स्वीडन आणि अमेरिका यांचा संयुक्तपणे विचार केला तर असे दिसून येईल की, सर्वंकष शिक्षणाचे परिणाम हे काही वेळ त्यातील सर्वंकषपणावरच सर्वस्वी अवलंबून नाहीत तर संबंधित देशाच्या सांस्कृतिक परंपरावरही ते मुख्यत: अवलंबून असतात.

आणि या दृष्टीने युद्धपूर्वकाळातील पब्लिक स्कूलचा दाखला अत्यंत समर्पक ठरतो. त्यातील बऱ्याचशा शाळा आजच्या सर्वंकष शाळांच्या तोंडावळ्यासारख्याच होत्या. अनेकदा आकाराने त्या शाळाप्रमुखाला प्रत्येक विद्यार्थ्याची ओळख ठेवणे अशक्य व्हावे इतया मोठ्या असत. त्या शाळांतून सर्व विषय शिकवले जात. म्हणजेच ग्रामर, सेकंडरी मॉडर्न आणि तांत्रिक अशा तिन्ही शाळांतील प्रवाहांचा तेथे संगम झालेला असे. केवळ १५% किंवा २५% मुलांनाच तेथे प्रवेश असे असे नव्हे तर सर्व बौद्धिक पातळीवरील मुलांना त्या शाळांची दारे उघडी असत. विंचेस्टरसारखे काही उल्लेखनीय अपवाद वगळता, जवळपास कोणाही मुलाला जर तो अगदीच वेडसर नसेल तर तेथे प्रवेश मिळू शकत असे. अर्थात मुलांची सरासरी बुद्धिमत्ता वरच्या दर्जाची असे. कारण त्यांच्या घराण्याची पार्श्वभूमी त्यांना अधिक अनुकूल असे. परंतु तरीदेखील मुलांची पांगापांग मुळीच कमी नसे. शिक्षणाचे निकाल फार उत्तम लागत असत–अनुवंशिक गुणवत्तेचा फायदा मिळू न शकणाऱ्या अप्रसिद्ध शाळांचे देखील. यावरून असे दिसून येते की, सर्वंकष शाळांच्याविरुद्ध घेण्यात येणारे बरेचसे आक्षेप फी भरावी लागणारी मिश्र पब्लिक स्कूल्स चांगली आहेत या समजुतीशी सुसंगत नाहीत.

## ६. मजूर पक्षाचे शिक्षणविषयक धोरण

आपण आता शिक्षणाच्या क्षेत्रात कोऱ्या पाटीपासूनच सुरुवात करणार असतो तर विभागणी नसलेली सर्वंकष शाळांची पद्धती सुरू करावी असे मी फार आग्रहपूर्वक मांडले असते. या शाळांव्यतिरिक्त ज्या इतर शाळा असतील त्या बंद करून टाकण्याची जरुरी नाही. इतर सर्व देशात असतात त्याप्रमाणे त्या राष्ट्रीय शिक्षण पद्धतीला पूरक असल्या म्हणजे झाले. परंतु त्या इंग्लंडमधल्या सारख्या स्वतंत्र, सबंध राष्ट्रातील सर्वोच्च स्तरातील मुलांसाठी असता कामा नयेत. त्या मार्गाच्या बाजूने मांडण्यात येणारा सामाजिक युक्तिवाद मला बिनतोड वाटतो तर

त्याविरुद्ध पुढे करण्यात येणारे शैक्षणिक मुद्दे अनिर्णयात्मक आहेत असे वाटते.

परंतु आपण काही कोऱ्या पाटीपासून सुरुवात करीत नाही आहोत, तर आधीपासूनच असलेल्या आणि पाळेमुळे चांगली खोलवर रुजलेल्या पृथक शाळांपासून आपण सुरुवात करणार आहोत; आणि तशी ती खोलवर रुजलेली नसती तरीदेखील आपल्याला सरळ आपल्या उद्दिष्टापर्यंत जाऊन भिडता आले नसते. कारण सोयिस्कर इमारतींची टंचाई, जनमानसाची अवस्था आणि स्थानिक पातळीवरील शैक्षणिक बाबतीतील स्वयंनिर्णयाचा आग्रह यांसारख्या अडचणी आपल्यापुढे आ वासून उभ्या आहेत.

म्हणून अगदी सार्वजनिक क्षेत्रांच्या बाबतीतसुद्धा तेथील ग्रामर स्कूल्स अचानक बंद करून टाकण्याचा किंवा सेकंडरी मॉडर्न स्कूलचे एकदम सर्वंकष शाळात रूपांतर करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. या दुसऱ्या प्रकारच्या शाळांसाठी मुख्याध्यापकांच्या अंगी जबरदस्त कर्तृत्व असावे लागते— परंतु असा मुख्याध्यापक फार विरळा; सहावीच्या ईयत्तेकरता लागणाऱ्या चांगल्या गुणवत्तेचा कर्मचारी वर्गाही दुर्मीळच असतो. पुरेशा मोठ्या आणि सोयीस्कर इमारतीसंबंधी बोलावयाचे तर सध्याच्या सेकंडरी मॉडर्न शाळांच्या बहुतेक सर्व इमारती अत्यंत गैरसोयीच्या असून त्यांची योग्य ती दुरुस्ती करून घ्यावी लागेल. पुरवठ्याच्या बाबतीत योग्य ती परिस्थती निर्माण होईपर्यंत शिक्षणाच्या बाबतीत मान्यता पावलेली ग्रामर स्कूल्स बंद करून टाकणे चूक ठरेल. शिक्षणाचा दर्जा खालावण्यात आणि या नव्या प्रयोगाची निष्कारण बदनामी होण्यापलीकडे त्यातून काहीही निष्पन्न होणार नाही.

शैक्षणिक बाबतीत जोपर्यंत स्थानिक पातळीवर स्वायत्तता आहे तोपर्यंत अर्थातच कोणत्याही परिस्थितीत हे साध्य होऊ शकणार नाही. शिक्षण क्षेत्रातील सध्याचे फारच थोडे अधिकारी व्यापक प्रमाणावर सर्वंकष पद्धतीचा अंगिकार करण्याच्या बाजूचे आहेत. उरलेल्या शाळांचे सक्तीने रूपांतर घडवून आणावे असे मात्र कोणीच म्हणत नाही. शिवाय पब्लिक स्कूल्स सध्याच्या मोक्याच्या जागेवर कायम असताना ग्रामर स्कूल्स बंद करून टाकणे समाजवादाच्या दृष्टिकोणातूनही मूर्खपणाचे ठरेल. वरच्या आणि खालच्या स्तराच्या दरम्यान असलेला मध्यम स्तर नाहीसा केल्याने उलट वर्गीय विभागणी अधिक तीव्र बनेल. सरकारी क्षेत्रातील शाळांतून शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या बुद्धीची पातळी जवळपास सारखी असली तरी त्यांच्या जोडीला खाजगी शाळाही राहू दिल्या तर एकूण शैक्षणिक पद्धतीत बौद्धिक विषमता प्रत्यक्षात वाढतच जाईल याचे पब्लिक स्कूलसच्या प्रश्नाकडे बहुधा दुर्लक्ष करणाऱ्या समाजवाद्यांना आकलन होऊ नये हे विचित्रच म्हटले पाहिजे.

मग यावर उपाय काय? एक: मजूर सरकारने सर्वंकष तत्व आपल्याला अधिक पसंत असल्याचे नि:संदिग्धपणे स्पष्ट करावे आणि डॉ. पेडले यांनी सध्या अस्तित्वात असलेल्या सर्वंकष शाळांच्या प्रयोगाची जी पहाणी केली आहे त्यावरून

हा प्रयोग निःसंशय यशस्वी ठरत असल्याचे दिसून येत असल्याने स्थानिक अधिकाऱ्यांना त्या दिशेने धाडसाने पाऊल उचलण्याच्या कामी सक्रीय प्रोत्साहन द्यावे—अशा तऱ्हेच्या प्रोत्साहनाचा खूप उपयोग होतो.

दोन : ज्या ठिकाणी नव्याने सर्वंकष शाळा सुरू करता येत नसतील त्या ठिकाणी ११+च्या परिक्षांचे महत्त्व शक्य तितके कमी करण्याचे उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवले पाहिजे. त्याचप्रमाणे सध्याच्या त्रिविध शिक्षण पद्धतीत अनुस्यूत असलेला प्रतिष्ठेबाबतचा कर्मठपणा आणि शारीरिक अडसर विद्यार्थ्यांच्या आड येणार नाही असा प्रयत्न केला पाहिजे. काही प्रमाणात हे पैसा आणि साधनसामुग्री यांच्या उपलब्धतेवर अवलंबून राहील. जसजशा नव्या सेकंडरी मॉडर्न आणि तांत्रिक शाळा उभारल्या जातील आणि त्यांतील शिक्षक वर्गाच्या दर्जात सुधारणा होत जाईल आणि त्यायोगे शैक्षणिक दर्जातील तफावत कमी होत जाईल तसतसा काहीही करून ग्रामर स्कूलमध्ये प्रवेश मिळविण्याचा हव्यासही कमी कमी होत जाईल. विद्यार्थ्यांची वर्गवारी उशिरा करण्याचाच हा एक भाग आहे, आणि त्यामुळे ११+च्या परिक्षेमुळे 'शेवटची संधी' मिळते असे जे वातावरण आज निर्माण झालेले आहे तेही नाहीसे होत जाईल. सेकंडरी मॉडर्न स्कूलमध्ये 'ग्रामर स्कूल'चे वातावरण निर्माण करणे, सर्वसाधारण प्रमाणपत्रासाठी लागणारे विषय घेण्यास विद्यार्थ्यांना उद्युक्त करणे, अधिक प्रगत स्वरूपाचे 'खास शिक्षणक्रम' सुरू करणे, ग्रामर स्कूलमधून सहाव्या ईयत्तेत उशीरा दाखल होण्याची सवलत उपलब्ध करून देणे यासारख्या मार्गांनी ग्रामर स्कूलची उच्च प्रतीच्या व्यवसायाशी जी प्रत्यक्ष सांगड घातली गेली आहे ती दूर करण्याचा हा एक प्रयत्न आहे. परंतु प्रत्यक्षतः बौद्धिक पातळीत समानता आणण्याच्या आणि अप्रत्यक्षतः अशा इतर सुधारणांना उत्तेजन देण्याचा सर्वात महत्त्वाचा मार्ग जर कोणता असेल तर तो म्हणजे शालेय शिक्षणाची वयोमर्यादा सोळाव्या वर्षापर्यंत वाढवणे हा होय.

परंतु हे सर्व दुय्यम प्रकारचे उपाय झाले. एका शाळेतून दुसऱ्या शाळेत उशिरा करण्यात येणारी पाठवणी ही सर्वसाधारणपणे समाधानकारक नसते. आणि आपल्याला प्रतिकूल परिस्थितीवर मात करायताची आहे हे लक्षांत घेता सेकंडरी मॉडर्न स्कूलद्वारा बौद्धिक पातळीतील समानता सहजासहजी साध्य करता येणार नाही. परंतु या बदलामुळे सध्याच्या काटेकोर त्रिविध पद्धतींत निदान अधिकाधिक खंड तरी पडत जाईल—— द्विविध स्वरूपाची शैक्षणिक पद्धती किंवा नव्या धर्तीच्या माध्यमिक शाळा यासंबंधी स्थानिक अधिकाऱ्यांकडून केल्या जाणाऱ्या प्रयोगामुळे तर त्याला आणखीनच चालना मिळेल. विविधता हा समानता साध्य करण्याचा निदान एक मार्ग होऊ शकतो.

स्वतंत्र शाळांची समस्या अद्यापही आपल्यासमोर उभीच आहे. याबाबतची परिस्थिती सुधारण्याच्या दृष्टीने मी वर सुचविलेला एक महत्त्वाचा बदल

म्हणजे संपत्तीच्या बाबतीत जसजशी अधिकाधिक समानता प्रस्थापित होत जाईल तसतशा खाजगी पूर्वाध्ययन शाळा बंद करीत जाणे हा होऊ शकेल. त्यामुळे वर्ग निर्मितीचे एक प्रभावी साधन नष्ट होऊ शकेल. स्वतंत्र माध्यमिक शाळांतून नादार विद्यार्थ्यांसाठी राखून ठेवलेल्या ७५ टक्के जागांमुळे सध्याची चौकट नष्ट होण्यास मदत होईल.

ही समस्या त्रिविध स्वरूपाची आहे. एक : या शाळा म्हणजे श्रेष्ठ बुद्धिमत्ता असलेल्या शेलक्या लोकांचा नवा वर्ग निर्माण करण्याच्या जागा बनता कामा नयेत. हे साध्य करण्यासाठी, या शाळांतून नादार विद्यार्थ्यांसाठी राखून ठेवाव याच्या जागा केवळ हुषार मुलांनाच मिळता कामा नयेत, तर समाजांतील सर्व थरांत त्या विभागल्या गेल्या पाहिजेत आणि विशेषतः ज्यांना निवासी शाळांची अधिक आवश्यकता आहे किंवा अशा शाळांसाठी जे अधिक लायक असतील अशांना त्याबाबतीत अग्रक्रम मिळाला पाहिजे या फ्लेमिंग समितीने दिलेल्या इशा-ऱ्याची काळजीपूर्वक दखल घ्यावी लागेल. त्याचप्रमाणे माझ्या मते अंती यापैकी काही शाळांचा निराळ्या शैक्षणिक उपक्रमासाठी उपयोग करून घ्यावा लागेल-- उदाहरणार्थ प्रगत शिक्षण देणाऱ्या संस्था, अल्पमुदतीसाठी वसतीगृहे, कनिष्ठ (ज्युनियर) विद्यापीठे, प्रौढ शिक्षण केंद्रे इत्यादींसाठी माध्यमिक शाळांचा उपयोग करून घेता येईल.

तरी देखील सामाजिक प्रतिष्ठेच्या बाबतीत असलेली फार मोठी तफावत अनेक वर्षांपर्यंत कायम राहणार आहे. ही तफावत नष्ट करणे हे सरकारी क्षेत्रां-तील दर्जासंबंधीचा, म्हणजेच अंती सरकारी खर्चाचे अग्रक्रम ठरविण्याचाच काय तो प्रश्न आहे. याचे कारण असे की, लोकांच्या टाळ्या मिळविण्यासाठी हा मुद्दा बारंवार मांडला जात असला तरी त्याची अंमलबजावणी कर-ण्याच्या दृष्टीने मात्र कसलीही हालचाल झालेली नाही. खरोखर याबाबतीत उक्तीप्रमाणे कृती केली गेली असती--म्हणजेच मजूर पक्षाने पूर्वीपेक्षा शिक्षणाला अधिक महत्त्व दिले असते आणि समाजवादाच्या दृष्टीने मांसाच्या वसुलीइतकेच नव्हे, तर रासायनिक कारखान्यांच्या राष्ट्रीयीकरणापेक्षाही शिक्षण अधिक महत्त्वाचे आहे हे ओळखले तर शाळांच्या इमारती, जास्त आणि चांगल्या प्रतीचे शिक्षक, कल्पक व समृद्ध वातावरणातील दीर्घमुदतीचे शालेय जीवन याबाबतची वास्तवता साकार होऊ शकेल.

हळूहळू अमेरिकेप्रमाणे विद्यार्थी शिक्षण घेत असलेल्या शाळांना डोक्याची कामे करणाऱ्या किंवा वर्गीयस्थान निश्चित करणाऱ्या संस्थाचे आपोआप स्वरूप प्राप्त न होता व्यक्तिगत आवडनिवड आणि स्थानिक परिस्थिती यांना अग्रक्रम मिळू लागेल. आणि मजूरपक्षाने आपली कामगिरी योग्यप्रकारे बजावली तर सबंध शैक्षणिक पद्धती सर्वंकष शाळांच्या आधारे उभारली जाईल; परंतु उरलेल्या फार

मोठ्या बिगर सर्वंकष क्षेत्रांतील सर्व शाळांमधून देखील सामाजिक सरमिसळ अधिकाधिक प्रमाणांत होऊ लागेल; आणि विद्यापीठे आणि सर्व तऱ्हेचे व्यवसाय– मग ते उच्च प्रतीचे असोत वा कनिष्ठ प्रतीचे असोत– यांचा मार्ग मोकळा होईल. आणि तसे झाले म्हणजे नोकरीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवाराला त्याचे शिक्षण कोठल्या शाळेत झाले असे विचारण्याचा प्रसंगच मालकांवर येणार नाही. आणि मग, आज साऱ्या जगांत वर्गीय तटबंदीने कमालीचे जखडलेल राष्ट्र म्हणून ब्रिटनची जी ख्याती आहे त्यात अत्यंत मंद गतीने का होईना खंड पडू लागेल.

● ● ●

## प्रकरण तेरावे

# उपभोगाचे स्वरूप

### १. वाढते सरासरी उत्पन्न आणि विनिमयाचे स्वरूप

सामाजिक समतेवर घडून येणारा दुसरा परिणाम म्हणजे, 'जीवनाचा ढंग' आणि विनिमयाचे दृष्य स्वरुप. म्हणजेच निरनिराळ्या सामाजिक गटाच्या राहणीत आणि समाज जीवनाच्या ढंगात पडत असलेली तफावत व सर्वसामान्य माणसाला येणारी त्याची प्रचीती.

सहाजिकच, एकूण उत्पन्नाची वाटणी कशा प्रकारे होते यावरच राहणीमानातील हा फरक काही अंशी अवलंबून असतो. पण त्याच बरोबर काही ठळक व उल्लेखनीय अशा वस्तूंच्या वापरावरही राहणीमानातील हा फरक अवलंबून राहतो आणि एकूण उत्पन्नातील चढउतारा बरोबर त्यात बदल होतोच असे नाही. यापैकी आरोग्य आणि शिक्षण या सारख्या 'सामाजिक' वस्तूंचा उपभोग कसा केला जातो यासंबंधीचा उहापोह तिसऱ्या भागात आलेला आहे. एकूण उत्पन्नाची विभागणी कशीही झालेली असली, तरी सामाजिक दृष्टीकोन आणि वर्गीय समानतेसंबंधीचा सर्वसाधारणपणे अभिप्रेत असलेला अर्थ यावर समतेचा फार मोठा परिणाम घडून येवू शकतो.

परंतु या प्रकरणात आपल्याला जो विचार करावयाचा आहे तो असा की, व्यक्तिगत उपभोगाचे स्वरूप आणि व्यक्तिगत राहणीमानात दिसून येणारी आणि अनुभवास येणारी विषमता हा केवळ उत्पन्नाच्या फेरवाटपाचाच नव्हे तर सरासरी प्रत्यक्ष उत्पन्नाच्या निरपवाद पातळीच्या विभागणीचासुद्धा एक परिणाम आहे. म्हणणेच सरासरी उत्पन्नाची पातळी जितकी वरची, तितकी उपभोगाच्या दृष्य स्वरूपातही अधिक समानता असते. आणि राहणीमानातील समानतेबद्दलची व्यक्तिगत भावनाही अधिक तीव्र असते. याचे कारण असे की, खर्चाच्या काही बाबी जास्त उल्लेखनीय व सामाजिक दृष्टया जास्त महत्त्वाच्या गणल्या जातात

आणि देश जसजसा अधिकाधिक संपन्न बनत जातो, तसतसा अशा विशिष्ट बाबीं-वरील खर्च जास्त समप्रमाणात विभागला जातो व त्याचा देशाच्या एकूण उत्पन्नाच्या वाटपाशी जवळ जवळ काहीच संबंध रहात नाही.

विद्यमान ईजिप्त किंवा पर्शिया या सारख्या अगदी गरीब व अप्रगत देशा-तील संपत्तीची असमान विभागणी जनतेच्या चटकन डोळ्यात भरते. कारण तेथे फक्त श्रीमंत लोकच त्यांच्या जवळील क्रयशक्तीचा हवा तसा उपभोग कर-ण्याचे स्वातंत्र्य उपभोगू सकतात किंवा त्यांच्या किमान गरजा भागवून उरलेला पैसा आपल्या मर्जीनुरूप खर्च करू शकातात. म्हणून चांगले घर, किमती कपडा, चमचमीत खाद्यपेये, मोटारगाड्या, सुट्टया, प्रवास, हॉटेल मधील जेबणखाण किंवा टेलिव्हिजन यासारख्या प्रतिष्ठीतपणाचे लक्षण समजल्या जाणाऱ्या गोष्टीवर खर्च करणे फक्त या वर्गालाच परवडते. सगळ्यात लक्षात येणारोष्ट अशी की, अगदी थोडे श्रीमंत लोकच अशा तऱ्हेचा खर्च करू शकतात. व उरलेले बहुसंख्य लोक जेम-तेम पोटापाण्याला पुरेल इतक्या पैशावर कशीबशी आपली गुजराण करीत असतात. आणि त्यामुळेच या राहणीमानांतील विषमता प्रकर्षाने जाणवत असते.

परंतु राष्ट्रीय उत्पन्न वाढल्याबरोबर चैनीच्या समजल्या जाणाऱ्या या सर्व वस्तू सामान्य माणसाच्या आटोक्यात येतात. अगदी पराकोटीचे उदाहरण द्यावयाचे तर परवा परवापर्यंत ज्या सुखसोयी केवळ श्रीमंतांनाच उपभोगता येत असत अशा सर्व सुखसोयी आता अमेरिकेतील बहुतेकांना उपभोगावयास मिळू लागल्या आहेत; आणि तीस चाळीस वर्षांपूर्वी ब्रिटनमध्ये ज्याला मध्यमवर्गीयांचे राहणीमान समजले जात होते ते आता अमेरिकेतील साध्या कामगारांचे होऊन बसले आहे.

परंतु यामुळे विनियोगाच्या पद्धतीत समानता का यावी ? राष्ट्रीय उत्पन्नाचे सामाजिक विभाजन झाल्यावर श्रीमंत लोकांनी एक पाऊल पुढे जाऊन सामान्य लोकांच्या व त्यांच्या राहणीमानांत बरेच अंतर आहे हे दर्शविण्या-साठी चैनीच्या आणखी कोणत्या तरी नव्या नव्या गोष्टी काढून त्यावर खर्च का करू नये ? खर्चाच्या अशा बाबी त्यांचे समाजातील सत्ता व वैभव दर्शविणारे प्रतीक पूर्वीप्रमाणेच कायम ठेवण्यास खासच उपयुक्त ठरतील. येवढे मात्र खरे की, वाढत्या उत्पन्नाबरोबर प्रत्येक पिढी अशा भपकेबाज खर्चाचे नवे नवे प्रकार स्वत:पुरते निर्माण करीत राहील व त्यामुळे राहणीमानातील हे दृष्य कायमच राहील.

उपलब्ध चैनीच्या वस्तू केवळ जास्त प्रमाणात वापरून श्रीमंतांना आपला वरचढपणा कायम ठेवता येणार नाही. वस्तूंचा वापर ठराविक प्रमाणाच्या बाहेर झाल्यास त्याची उपयुक्तता कमी कमी होत जाते या नियमानुसार एक वेळ नेहमीच अशी येईल की, ज्यावेळी श्रीमंत लोकांना या चैनीच्या वस्तूंची उपयुक्तताही त्या प्रमाणात भासणार नाही. उत्पन्न वाढत गेले की, अन्नधान्यावरील खर्चाचे प्रमाण

कमी होत जाते हा नेहमीचा अनुभव आहे. आणि अत्यंत खादाड माणसाच्याबाबतीत देखील असा एक क्षण येतो की त्यावेळी त्याला जादा अन्नाचे आकर्षण रहात नाही. वस्तूंच्या उपयुक्ततेतील तुलनात्मक घटीचा हा नियम तंबाखू, मद्य व प्रकाश किंवा उष्णता यासाठी बापरावयाच्या इंधनाच्या बाबतीतही लागू पडतो.

जास्त चैनीच्या वस्तूंनासुद्धा काही तरी मर्यादा ही असतेच. शिंपी लोक असे सांगतात की, व्यवस्थित पोषाख करणाऱ्या शहरातील सर्वसाधारण माणसाला सुमारे तीस सूट लागतात. आणि याबाबतीत आपली कल्पना आणखी ताणावयाची म्हटले तरी कपड्यापासून मिळणाऱ्या समाधानाच्या दृष्टीने सुटांच्या संख्येला शेवटी काही ना काही मर्यादा ही राहणारच. विशेष श्रीमंत माणसाला हवा खाण्याच्या ठिकाणी दोन किंवा तीन बंगले, फार तर मोठे प्रासाद लागतील. परंतु त्याला दहा–वीस किंवा त्याहूनही जास्त खासच लागणार नाहीत. मोटारींच्या बाबतीतही दोन किंवा तीन रोल्स राईस गाड्या तो जवळ बाळगील. परंतु दहा–वीस किंवा त्याहूनही जास्त गाड्यांचा ताफा तो बाळगणार नाही. केन्ससारख्या ठिकाणी तो फार तर सहा आठ महिने सुटी घेऊन जाऊ शकेल, परंतु त्यालाही वर्ष वर्ष तेथेच घालवणे आवडणार नाही. यावरून हे स्पष्टपणे दिसून येईल की, राहणीमानांतील आपला वरचढपणा केवळ चैनीच्या वस्तूंचा किंवा सेवांचा भरमसाट उपभोग घेतल्याने टिकवून धरणे उत्तरोत्तर अधिकाधिक कठीण होत जाणार आहे.

परंतु तो ज्या वस्तूंचा उपभोग घेतो, अशा वस्तूंची संख्या वाढवून किंवा श्रीमंतीचे नवे प्रतीक ठरू शकतील अशा चैनीच्या नव्या नव्या वस्तू शोधून काढून, त्याला आपला वरचढपणा टिकविता येणार नाही का ? सामुदायिक वितरणाच्या आधुनिक अर्थव्यवस्थेच्या अंगभूत प्रकृतीतच याचे उत्तर सामावलेले आहे. आणि माझी अशी समजूत आहे की, या पद्धतीमुळे विकासाचा विशिष्ट टप्पा गाठला गेला की, नजरेत भरणाऱ्या काही वस्तूंच्या सामाजिक उपभोगातील तफावत कायम ठेवणे जवळ जवळ अशक्य होईल.

औद्योगीकरण घडून येण्यापूर्वीच्या समाजात अशा तऱ्हेच्या चैनीच्या वस्तूंची संख्या वाढविणे क्वचितच शक्य होत असे. तांत्रिक प्रगतीचा वेग अगदी मंद असल्याकारणाने त्यावेळी हा विचारच सोडून द्यावा लागत असे. शिवाय तशी गरजही त्यावेळी भासत नसे. गरीब लोकांचे उत्पन्न ठराविक पातळीवरच स्थिरावलेले असे, आणि श्रीमंतांच्या भपकेबाज राहणीस खालच्या वर्गाकडून मुळीच विरोध होत नसे.

औद्योगिक क्रांतीनंतर आणि त्या अनुषंगाने झपाट्याने घडून आलेल्या यांत्रिक प्रगतीमुळेच श्रीमंत वर्गापुढे हा प्रश्न उभा राहिला व त्याला समर्पक उपाय सापडणे अशक्य झाले. सुरुवातीला या प्रगतीमुळे सर्वसाधारण जनतेचे राहणीमान उंचावले आणि पूर्वापार चालत आलेले गरीब आणि श्रीमंत यामधील वस्तूंच्या

उपभोगाबाबतचे परस्पर संबंध उध्वस्त झाले हे खरे, पण त्याचबरोबर या यांत्रिक प्रगतीमुळे श्रीमंतांना आपल्या चैनीच्या वस्तूंचे क्षेत्र वाढवून आपला बडेजाव कायम ठेवता येऊ लागला. औद्योगीकरणाच्या सुरुवातीस आणि मध्यास, बरेच दिवसपर्यंत मोठ्या प्रमाणावरील ठोक उत्पादन वगळले तरी तांत्रिक सुधारणांचा वेग खूप मोठा होता व त्यामुळे गरिबांचे मूळचे राहणीमान उंचावत असले तरी त्यांना न परवडण्यासारख्या विशिष्ट प्रकारच्या चैनीच्या नव्या नव्या वस्तू विकत घेणे श्रीमंतांनाच तेवढे शक्य होत असे. ही परिस्थिती ठोक उत्पादनपूर्व काळांतील असून त्यावेळी विस्तृत प्रमाणावरील यंत्र विज्ञानाचा उपयोग आणि यांत्रिकी तंत्राचा वापर इतक्या झपाट्याने होऊ लागला होता की, त्यामानाने नवीन शोध लावण्याची गती फारच कमी होती.

अर्थात ही अवस्था प्रदीर्घ वाटत असली तरी ती फार काळ टिकत नाही. जेव्हा औद्योगिक क्रांती पूर्णावस्थेस पोहोचून अमेरिकेप्रमाणे (किंवा आता बऱ्याच प्रमाणांत ब्रिटनमध्येही तिचे आधुनिक स्वरूपाच्या ठोक उत्पादनाच्या अर्थव्यवस्थेत रुपांतर झाले तेव्हा) धनिक वर्गाला त्याच्या राहणीमानांतील आघाडी कायम टिकवणे नेहमीप्रमाणे अशक्य झाले. याचे कारण नवीननवीन मालाचे उत्पादन आणि यांत्रिकी प्रगती यांची गती मंदावली हे नव्हे. कारण या दोहोंची गती वाढतच असते. उत्पादनांत तांत्रिक ज्ञानाचा उपयोग केल्यामुळे आणि उत्पादनाच्या पद्धतींतील सुधारणांमुळे हा वेग वाढत चालला आहे. नवीन शोध आणि उत्पादनाच्या कामी होणारा त्यांचा उपयोग यांत जाणारा कालावधी वाफेची इंजिने प्रचारांत आली त्यावेळी शंभर वर्षांचा होता तो आता पाच वर्षांपेक्षाही कमी झाला आहे. आणि आता कोणताही विशिष्ट शोध लागल्याबरोबर त्यामानाने अगदी थोड्या खर्चांत ठोक उत्पादनासाठीही हळूहळू त्याचा उपयोग होऊ लागला आहे.

ही प्रगती वस्तूंच्या उपयोगांत जो बदल घडून येतो त्याच्याबरोबरीनेच होत असते. त्यावर झालेला त्याचा परिणाम तर दिसून येतोच पण शिवाय त्यामुळे मूलभूत गरजा पूर्ण झालेल्या असल्यामुळे सर्व साधारण जनतेची चैनीच्या वस्तू वापरण्याकडे प्रवृत्ती होते. सहाजिकच बाजारात आलेल्या नवीन वापराचे बाबतीत सर्वसाधारण जनता नेहमीच धनिक वर्गाच्या पाठोपाठ जात असते. हप्तेबंदीची खरेदी योजना व सुलभपणाने मिळणाऱ्या कर्जाच्या सोयी उपलब्ध झाल्यामुळे अशा वस्तूंच्या वापराला जास्तच चालना मिळाली असून त्यामुळे आता कामगार वर्गालासुद्धा त्यांची आवक पुरेशी नसली तरीही अशा प्रकारच्या वस्तू अधिकाधिक प्रमाणावर खरेदी करणे सुकर झाले आहे. घरांच्या तारणावर मिळणारी कर्जे वगळली तर सध्या अमेरिकेत नुसत्या ग्राहकांना दिलेल्या तारणावरील कर्जाचा आकडा तीस बिलियन डॉलर असून १९३९ सालापेक्षा तो पाचशे टक्क्यांनी वाढला आहे. आता जवळजवळ ५० ते ७० टक्के खरेदी हप्तेबंदीने होत

असते आणि एकूण विकल्या जाणाऱ्या मोटारगाड्यांपैकी दोन तृतीयांश गाड्या याच प्रकारे खरेदी केलेल्या असतात.

एकूण, आपण आता अशा दिशेने जात आहोत की, मोठ्या प्रमाणावरील उत्पादन व वाटप आणि पतीवर कर्ज देण्याची मोठ्या प्रमाणाबर सोय असलेली अर्थव्यवस्था यामुळे श्रीमंत माणसाला आपला रुबाब कायम ठेवण्यासाठी लागणाऱ्या वस्तूंच्या खरेदीच्या बाबतीत इतर वर्गांच्या फार पुढे राहता येणार नाही, आणि तसा तो राहिलाच तर तुलनेने फारच थोडा काळ तो तसा राहू शकेल. अर्थात वैशिष्टयपूर्ण अशा नव्या नव्या वस्तू भरमसाट प्रमाणांत बाजारात येऊ लागल्या तर हे शक्य होणार नाही व सर्वसाधारण माणूस या शर्यतीत मागे पडेल. परंतु कल्पनातीत गतीने नवे नवे शोध लागत गेले असे धरले तरी जुन्याच वस्तूंची सुधारलेली आवृत्ती म्हणून नव्हे तर व्यापक प्रमाणावर वापरल्या जाणाऱ्या वस्तूंचे प्रतीक म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अशा तऱ्हेच्या नव्या नव्या वस्तू या मधूनमधूनच बाजारांत येत राहतात व एकदा त्या बाजारांत आल्या म्हणजे मात्र त्यांचे ताबडतोब फार मोठ्या प्रमाणावर विभाजन सुरू होते. जवळजवळ चाळीस वर्षेपर्यंत ब्रिटनमध्ये मोटारगाडी हे सधनपणाचे प्रतीक समजले जात असे. परंतु अशी कोणतीच नवी वस्तु अमेरिकेत पांच वर्षापेक्षा अधिक काळपर्यंत सधनपणाचे प्रतीक मानली जाईल अशी कल्पनाही करवणार नाही. युद्धपूर्व काळांतील मोटारी व रेफ्रिजरेटर्स यांचा प्रसार किंवा टेलिव्हिजन सेट्स व धुण्याची यंत्रे यांचा युद्धपूर्व किंवा युद्धोत्तर काळांतील प्रसार किंवा वाळविण्याची यंत्रे, कपबशा धुण्याची विजेची उपकरणे, कचऱ्याची विल्हेवाट लावण्याची यंत्रे आणि घरे वातानुकूलित करण्याची यंत्रसामुग्री यांची गेल्या कांही वर्षात कशी वाढ होत गेली त्याची नुसती कल्पनाच केलेली बरी.

नेहमीच्या सामाजिक दबावामुळे या आर्थिक घडामोडींना जास्त बळकटी प्राप्त होत असते. दुसऱ्याची नक्कल करण्याची आणि नाविन्य कायम ठेवण्यात पुढाकार घेण्याची प्रवृत्ती, तसेच खर्च करण्याच्या पद्धतीवरून म्हणजे ज्या वस्तूंवर खर्च करावयाचा त्यावर सामाजिक प्रतिष्ठा कशी अवलंबून असते त्याची चर्चा आठव्या प्रकरणात येऊन गेली आहे. अर्थात हा मुद्दा एखाद्या विशिष्ट किंवा क्रांतीकारी वाटणाऱ्या नव्या नवलाईच्या वस्तूंच्या बाबतीतच लागू पडण्यासारखा आहे. आणि म्हणून, सामाजिक दडपण आणि जादा क्रयशक्ती यांच्या मिलाफातून भपकेबाज मासिकांतील गुळगुळीत कागदावरच्या जाहिराती वाचण्यात आल्या किंवा शेजाऱ्याकडे तसली एखादी वस्तू दिसली म्हणजे जनतेकडून एकदम त्याची मागणी येण्यास सुरुवात होते. ब्रिटनमध्ये बांधल्या जाणाऱ्या नव्या वसाहतींतील घरांवर टेलिव्हिजनची अँटीना असणे हे काही काळ प्रतिष्ठेचे प्रतिक समजले जात असे. यावरून खर्च करण्याच्या पद्धतीचे ‘सामाजीकरण’ कसे घडून येते ते स्पष्ट

होईल. त्याचप्रमाणे कोणत्याही नव्या 'फॅशनेबल' वस्तूंचा प्रसार इतका आश्चर्य-कारक झपाट्याने– त्या वस्तूच्या उत्पादनाला येणारा खर्च व त्यातून मिळणारे उत्पन्न यांच्या अनुषंगाने कसलाच मेळ बसू शकणार नाही इतक्या झपाट्याने-कसा होतो त्याचाही यावरून उलगडा होऊ शकतो.

## २. समाजवादी उद्दिष्ट व वाढता खर्च

विशिष्ट अशा नव्या वस्तूंची मालकी फक्त आपल्या स्वतःकडेच ठेवून श्रीमंत वर्गाला अशा वस्तूंवरील खर्चाच्या बाबतीतील आपले वर्चस्व टिकवून धरता येत नाही. त्यामुळे पैशाचा विनियोग करण्यासाठी बाजारात उपलब्ध असलेल्याच, परंतु त्यातल्या त्यात भारी किमतीच्या वस्तू निवडाव्या लागतात. मात्र सर्वसाधारण राहणीमानाचा तुलनात्मक विचार करता असा खर्च कितीही उधळेपणाने होत असला तरी त्याला जवळपास कसलेच महत्त्व नसते.

याचे कारण असे की, अशा उंची वस्तूंच्या उपयोगाचे स्वरूप बव्हंशी घरगुती स्वरूपाचे असते. त्यांचा उपयोग खाजगीरित्याच होत असल्यामुळे श्रीमंतीचे बिरुद म्हणून बाहेरच्या जनतेचे तिकडे लक्ष वेधले जात नाही. अशाप्रकारे श्रीमंत लोक जुन्या प्रकारचे लाकडी फर्निचर, मनोरंजन, पत्नीसाठी दागदागिने, जुन्या नामवंत चित्रकारांची अस्सल चित्रे खरीदणे, उंची खाद्यपदार्थ आणि पेये, घराची अंतर्गत सजावट, पुस्तकांची खरेदी किंवा एखाद्या नामवंत चित्रकाराकडून स्वतःची तसबीर काढवून घेणे इत्यादी बाबींवर आपले पैसे खर्च करीत राहतील.

आणि असा भरमसाट उधळलेला पैसा शेजाऱ्यापाजाऱ्यांस जरी माहीत झाला तरी त्यापासून तसाच खर्च करण्याची त्यांना प्रेरणा मिळत नाही किंवा त्यामुळे त्यांच्यात न्यूनगंडाची भावनाही निर्माण होत नाही. कारण सर्वसाधारण माणसाच्या दृष्टीने उच्च प्रतीचे राहणीमान ठेवण्यासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चाचा अग्रक्रम ठरवतांना त्याला अशा प्रकारचा खर्च फालतूच वाटत असतो. अमेरिकेत याचे प्रत्यंतर पहावयास सापडते. चांगले–वाईट कसेही असो अमेरिकेतील सर्वसाधारण कामगार किंवा मध्यमवर्गीय सुखवस्तु नवी गाडी, फ्रीज बाळगणाऱ्यांचा किंवा उन्हाळ्यांत सुट्टीवर जाणाऱ्यांचा हेवा जरूर करतो आणि या गोष्टी आपल्याला मिळत नाहीत म्हणून स्वतःला गरीब व वंचितही समजत असतो. परंतु एखाद्या फ्रेंच चित्रकाराची कलाकृती सोडून (ज्याच्या पुनर्मुद्रित प्रती निघाल्या आहेत अशा सामान्य कलाकृती सोडून), पंधराव्या लुईच्या वेळचे फर्निचर, चांदीची सुबक पात्रे किंवा मद्याचे प्याले अगर मुरलेले जुने मद्य यांसारख्या वस्तूंचे त्याला विशेष असे आकर्षण नसते. मोटार, फ्रीज यासारख्या वस्तू मिळण्यासारख्या असल्या आणि सुट्टीवर जाता येत असले म्हणजे मग वरील गोष्टींच्या उणीवेबद्दल तो खंत करीत नाही किंवा त्यावरून आपला सामाजिक

दर्जा किंवा राहणीमान व्यक्त होत असते असेही तो मानीत नाही. त्याचप्रमाणे अशा वस्तू दुसऱ्या कोणाच्या घरात असल्या तरी तेवढ्यामुळे लगेच त्याची राहणी आपल्यापेक्षा भलतीच उच्च दर्जाची ठरते असेही त्याच्या मनात येत नाही.

तरीदेखील एखाद्याचे सामाजिक मूल्यमापन करीत असताना तो वापरीत असलेल्या वस्तूंचा उच्च दर्जा जरूर विचारात घेतला जातो. परंतु आधुनिक तंत्रामुळे त्यांचे उत्पादन आता हवे तेवढे करता येते व त्यामुळे त्याचे अंगभूत श्रेष्ठत्व कमी झाले नाही तरी सर्वसाधारण माणसाला त्याविषयी वाटणारे मानभावी आकर्षण मात्र जरूर कमी होते; तर दुसऱ्या टोकाला, फार मोठ्या प्रमाणावर बनविण्यात आलेले जुन्या प्रकारचे फर्निचर किंवा सर्वसाधारण जनतेचे समाधान होऊ शकेल अशा प्रकारच्या नामवंत चित्रकारांच्या कलावस्तूंच्या प्रतिकृती आता हव्या तेवढ्या उपलब्ध झालेल्या आहेत. बरबॉन हे मद्य आता पूर्वीच्या स्कॉचइतकेच आवडू लागले आहे किंवा 'साऊथ आफ्रिकन' मद्याचा स्पॅनिश शेरू म्हणून सर्रास उपयोग होऊ लागला आहे. खुद्द ब्रिटनमध्ये 'हट्समन'कडील शिलाईच्या कपड्याच्या जागी माँटेग्यू बरटॉन सूट खुशाल खपू लागला आहे, तर अमेरिकेतदेखील कॅडिलॅक गाडीला शेवरोलेटपेक्षा कितो तरी अधिक किंमत मोजावी लागत असली तरी तिच्या रंगारूपांतील फरक इतका नाममात्र असतो की, एखाद्या इंग्रज माणसाच्या तर तो लक्षांतही यावयाचा नाही आणि पुढल्यावर्षीची शेवरोलेट गाडी या वर्षाच्या कॅडिलॅक सारखी दिसणार हे तर नक्कीच.

अर्थात लहान सहान दर्जाचा क्रम ठरविण्याच्या बाबतीत असली नाममात्र किंवा काठावरची तफावतही अत्यंत महत्त्वपूर्ण ठरते. परंतु आपल्याला त्या मुद्याची चर्चा येथे अभिप्रेत नाही. आणि अशी तफावत ठोकळ स्वरूपांतील वर्गीय विभागणी घडून येण्यास कारणीभूत ठरत नाही त्याचप्रमाणे राहणीमानात फार मोठी विषमता निर्माण झाल्याची भावनाही त्यामुळे निर्माण होत नाही.

अशा रीतीने अर्थव्यवस्था एकदा या अवस्थेपर्यंत येऊन ठेपली म्हणजे श्रीमंत लोकांना, त्यांनी अगदी जारीने मनात आणले तरी देखील, अशा प्रकारचा डोळ्यात भरण्यासारखा खर्च करून इतरांबरोबरचे त्यांचे अंतर कायम ठेवता येत नाही. तथापी पूर्णावस्थेस पोहचलेल्या औद्योगिक संस्कृतीत अभिप्रेत असलेल्या काही सामाजिक दडपणामुळे धनिक वर्गाची आपला वरचढपणा दाखविण्याची प्रवृत्ती आपोआपच काबूत राहते. एकतर, सामाजिक उद्दिष्टांत आताच वर्णन केलेल्या मर्यादांची भर पडली म्हणजे तोच सधन वर्ग एका विशिष्ट पातळीवर पोहोचल्यानंतर बहुधा आपला वरचढपणा सिद्ध करण्याचा नाद सोडून देतो आणि आपण होऊनच आपला खर्च मर्यादित ठेवू लागतो. त्याऐवजी तो मोठमोठ्या देणग्या देऊ लागतो किंवा शिक्षणसंस्थांवर तो पैसा खर्च करू लागतो आणि त्यामुळे आश्रयदाता अशी जी ख्याती होऊ लागते त्यामुळे मिळणाऱ्या मानसिक वैभवावर समाधान मानू लागतो. नफील्ड,

रॉकफेलर, कारनेजी, किंवा फोर्ड यांनी उभारलेल्या मोठमोठ्या विश्वस्त निधींच्या मागची भूमिका हीच आहे.

त्याशिवाय, आठव्या प्रकरणात सूचित करण्यात आल्याप्रमाणे डोळ्यात भरण्यासारख्या बाबींवरचा खर्च निश्चितपणे 'फॅशनेबल' नसलेला ठरतो इतकेच नव्हे तर डोळ्यात भरण्याइतक्या काटकसरीने राहण्याची फॅशन होऊन बसते. युरोपातील बुद्धिवाद्यांचा एक विशिष्ट गट जुनीपानी मोटार, जाडयाभरड्या ट्वीडचे जाकीट वापरतो किंवा हलक्या प्रतीच्या इटालियन हॉटेलात जाऊन खान पान करतो हे याचेच द्योतक आहे. आता हा प्रघात इंग्लंडमधीलच नव्हे तर अमेरिकेतील मध्यम आणि उच्च वर्णीय लोकात देखील पसरू लागला आहे. वारेमाप खर्च करणे हे आता हीन अभिरुचीचे समजले जाऊ लागले आहे. श्रीमंत लोकांतसुद्धा आपण इतके श्रीमंत नाही असे दाखविण्याची वृत्ती वाढत आहे. आणि खर्च बेताचाच करणे हीच फॅशन बनू लागली आहे. यामुळे साहजीकच राहणीमानाच्या बाह्यस्वरूपातील समानतेला चालना मिळू लागली आहे.

अशा प्रकारची प्रवृत्ती अमेरिकेत बरीच पसरली आहे. समाजातील निरनिराळ्या थरांतील लोकांच्या राहणीमानात डोळ्यांत भरण्यासारखी तफावत दिसत नाही हे बाहेरून येणाऱ्या प्रवाशांना प्रकर्षाने जाणवते. त्याचप्रमाणे राहणीमानातील समानतेची सर्वसाधारण जाणीव झाली असल्याचे, म्हणजेच प्रत्येक गोष्ट आपल्या आवाक्यातील असून सर्वस्वी अप्राप्त अशी कोणतीच गोष्ट राहिली नाही याची तेथील जनतेला जाणीव असल्याचे चटकन लक्षात येते. व्यापक प्रमाणावर सामाजिक समता प्रस्थापित होण्याचे, त्याचप्रमाणे वर्गीय भावना तीव्र न बनण्याचे हे एक मूलभूत कारण आहे.

हीच प्रवृत्ती आता इंग्लंडमध्येही स्पष्टपणे दिसू लागली असून अन्न, निवारा, सरपण आणि दिवाबत्ती याव्यतिरिक्त होणाऱ्या कामगार वर्गाच्या खर्चाचे प्रमाण १९०४ साली पाच टक्के होते ते १९३७–३८ सालात तीस टक्क्यापर्यंत गेले आणि आता तर त्यात आणखीही कितीतरी वाढ झालेली असणार हे उघडच आहे. आजचा कामगार, कामगार वर्गाच्या परंपरागत चैनीच्या वस्तूंसाठी बरीच मोठी रक्कम बाजूस काढून ठेवू शकतो इतकेच नव्हे तर, सिनेमा, नियतकालिके आणि पुस्तके यावरही तो खर्च करू शकतो. ब्रिटनमध्ये तंबाखू व मद्य यावर घरटी सालीना सरासरी ११० पौंड खर्च होतात आणि त्याव्यतिरिक्त ५० पौंड दरवर्षी जुगारावर खर्च होतात. तेथील कामगार घरभाडे, पाणी पट्टी किंवा इतर आवश्यक बाबींपेक्षा दारूवर जास्त खर्च करीत असतो तर दिवाबत्ती व सरपण यावरील खर्चापेक्षा तंबाखूवर दुप्पट रक्कम खर्च करीत असतो. सर्वसाधारणपणे ब्रिटनमधील प्रत्येक कुटुंबातील सरासरी दोन माणसे आठवड्याला सिनेमा बघतात. पिक्चर पोस्ट, इलस्ट्रेटेड जॉन बुल, एव्हरीबडीज् वूमन आणि वूमेन्स ओन यांसारख्या नियतकालिकांचा

एकूण खप (एकूण दीड कोटीहून थोड्याशा कमी इतक्या कुटुंबांपैकी) एक कोटीपेक्षा अधिक आहे. आणि प्रत्येक दुसऱ्या घरात दर आठवड्याला सार्वजनिक वाचनालयातून निदान एक तरी पुस्तक वाचावयास आणणारा एखादा माणूस आढळतो.

अशा प्रकारच्या खर्चांमुळे राहणीमान निश्चितपणे उंचावत असले तरी त्यामुळे समतेचे वातावरण फारसे निर्माण होत नाही. कारण अशा खर्चास उच्च प्रतीच्या उपभोग्य वस्तूंचे प्रतीक म्हणून संबोधले जात नाही. कामगार जगातील पारंपारिक चैनीच्या वस्तू म्हणूनच त्यांच्याकडे बघितले जाते; मात्र आपण जेव्हा मध्यमवर्गीयांच्या चैनीकडे, म्हणजेच खऱ्याखुऱ्या अर्थाने प्रतिष्ठेच्या द्योतक समजल्या जाणाऱ्या जादा खर्चाच्या बाबींकडे नजर टाकतो तेव्हा मात्र या बदललेल्या प्रवृत्तीस महत्त्व प्राप्त होते. १९४९ ते १९५४ या काळात टेलिव्हिजन वापरणारांची संख्या दसपटीने वाढली आणि याच हिशेबाने ती वाढत गेली तर १९६९ पर्यंत बहुसंख्य घरांतून टेलिव्हिजन सेट आलेला असेल. सध्या रस्त्यावर जवळजवळ चाळीस लक्ष खाजगी गाड्या धावतात. याच गणिताने त्या वाढत राहिल्या तर, १९५७ मध्ये दर चार घरांमागे एक गाडी धावू लागेल. (खाण कामगारांच्या गाड्यांचा पहिला मेळावा यॉर्कशायरमध्ये १९५७ साली भरला होता.) लोकसंख्येपैकी पन्नास टक्के लोक वर्षाकाठी निदान आठवडाभर तरी सुट्टी घेऊन कोठेतरी बाहेर जातात आणि त्यांपैकी दोन तृतियांश लोक समुद्रकिनारी, वीस लाख लोक हॉलिडे कॅम्पमध्ये तर सव्वा बारा लाख लोक (युद्धपूर्वकाळाच्या तिप्पट) परदेशी जात असतात.

मला अर्थातच असे म्हणावयचे नाही की, कामगार वर्गाला या सर्व चैनीच्या वस्तू घेणे परवडते. वस्तुस्थिती त्याच्या नेमकी उलट आहे. अद्यापपर्यंत तरी निदान ही नुसती एक प्रवृत्ती आहे-सुबत्तेच्या युगाचा उंबरठा अद्याप आपल्याला ओलांडावयाचा आहे. अद्यापही आठवड्याला सात आठ पौंड मिळविणारे आणि अनेक सामाजिक सेवांचा लाभ घेत असूनही ज्यांना रोजच्या उदरनिर्वाहाची विवंचना लागून राहिलेली असते असे कामागार अनेक आहेत. पण प्रगती होत आहे हे मात्र निश्चितपणे दिसून येत आहे. आणि महत्त्वाची गोष्ट अशी की, अगदी गरीब स्थितीतील कामगारदेखील हा उंबरठा ओलांडण्याची आपणहून धडपड करीत आहेत. नव्या राहणीमानाचे सामाजिक संकेत त्यांनी मान्य केले असून त्या वस्तू प्राप्त करून घेण्याचा दिवस केव्हा येतो याची ते वाट पहात आहेत.

या सर्व गोष्टींचा कामगार वर्गाच्या मानसशास्त्रावरही बराच परिणाम घडून येत असणार. बऱ्याच वर्षांपूर्वी म्हणजे १८१८ सालीच एंजल्सने असे लिहून ठेवले आहे की, '—इंग्रज कामगारांत आता खरोखरीच सुखवस्तू मध्यमवर्गीयांचे स्वभाव विशेष वाढत्या प्रमाणात उतरू लागले आहेत. सर्वात जास्त 'बूर्झ्वा' (भांडवलशाही) म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या देशाचीदेखील शेवटी अशीच इच्छा आहे की, येथे भांडवलशाही— उमरावशाही प्रस्थापित व्हावी आणि प्रत्यक्ष

भांडवलदार वर्गाच्या जोडीला खुद्द कामगार वर्गदेखील भांडवलदार सदृश व्हावा.' १९५५ साली घरांच्या नव्या वसाहतीत प्रचार करण्यासाठी जाण्याची पाळी आली असती, किंवा लोक स्वत:ला कोणत्या वर्गाचे समजू पाहतात त्यासंबंधीच्या चाचणी मताचे वृत्तान्त त्याच्या वाचनात आले असते तर, त्याला याहूनही आधिक धक्का बसला असता. मजूर पक्षाच्या दृष्टीने यावरून काही निश्चित निष्कर्ष निघतात ते असे की, बहुसंख्य जनतेचे राहणीमान हळूहळू मध्यम वर्गासारखे होऊ लागले आहे इतकेच नव्हे तर, मध्यमवर्गीय मनोवृत्तीही स्पष्टपणे दिसू लागलेली असताना जनतेला पुन्हा पुन्हा कामगारवर्गीय आवाहने करीत राहणे योग्य ठरणार नाही.

परंतु आपल्यापुढे प्रश्न आहे तो वाढत्या खर्चाचे क्षेत्र व्यापक होत गेल्याने घडून येणाऱ्या मानसशास्त्रीय परिणामासंबंधीचा. त्यामुळे निकृष्ट व असमान राहणीमान आणि सर्वसाधारणपणे वर्गीय विषमता यासधील सत्यांश जसा कमी कमी होत जातो त्याप्रमाणे त्यासंबंधीची जाणीवही अस्पष्ट होत जाते आणि त्यातील सत्यांशही अर्थातच कमी होत जातो. म्हणून या घटनेमुळे आर्थिक कल्याणावर उघडपणे दिसून येणारे त्याचे प्रत्यक्ष परिणाम बाजूस ठेवले तरी, समानतेच्या मूलभूत भूमिकेवरून समाजवादी ध्येयासंबंधीचे निवेदन करतांना वाढत्या व्यक्तिगत खर्चाचा विचार करावाच लागेल. यासंबंधीची चर्चा पुढे आलेली आहे.

## ३. यामुळे लोभी समाज निर्माण होणे अपरिहार्य आहे काय ?

परंतु असा प्रश्न उपस्थित करणे म्हणजे मोठे वादळ ओढवून घेण्यासारखेच आहे. कारण याचा अर्थ जीवनाकडे बघण्याची टोरी पक्षाची, भांडवलशाही, जडवादी इतकेच नव्हे तर (यापैकी सर्वांत वाईट) अमेरिकन विचारसरणी मान्य केल्यासारखे, निदानपक्षी अनैतिक आणि बिगर समाजवादी असे काही तरी कबूल करून बसल्यासारखे होईल. याचा अर्थ असा दिसतो की, राहणीचा दर्जा वरच्या प्रतीचा ठेवावयाचे ध्येय स्वीकारले गेले की, त्याबरोबरच ऐहिक फायदे, पराकोटीची व्यक्तिनिष्ठा आणि आक्रमक स्पर्धा यावर अधिकाधिक भर देणे क्रमप्राप्त ठरते. म्हणून एकीकडे सुरक्षितता, फुरसद, संस्कृती, स्थैर्य, यासारख्या महत्त्वाच्या सामाजिक मूल्यांकडे दुर्लक्ष होत असलेल्या, तर दुसरीकडे व्यक्तिगत चारित्र्य आणि सामाजिक संबंध यांना असभ्य आणि खालच्या पातळीवर नेऊन बसविल्या जाणाऱ्या लोभी आणि संघर्षपूर्ण समाजात ते अनिवार्य आहे असे समजले जाते. अशा तऱ्हेने ऐहिक पातळी उंचावण्याचा हव्यास एकदा सुरू झाला म्हणजे बंधूभाव आणि प्रेम यांनी युक्त असा समाज उभारण्याच्या परंपरागत समाजवादी ध्येयाला मुकावे लागते.

**बंधूभाव आणि वाढता खर्च हे परस्पर विरोधी का असावे ? बंधू-बंधू म्हणून**

सर्वजण संपन्नस्थितींत का राहू शकू नयेत, किंवा पुरेशा सुख सवलती मिळू लागल्या की, लगेच एकमेकांबद्दलचा प्रेमभाव का आटावा ते मी कधीच समजू शकत नाही. ते कसेही असो, ही सर्व टीका गैरसमजावर आधारलेली असावी असे वाटते. एक तर, आपण पाचव्या प्रकरणात पहिल्याप्रमाणे स्पर्धेचे प्रत्यक्ष सामाजिक परिणाम, ती स्पर्धा ज्या समाजात चालू असते त्या समाजाच्या स्वरूपावरच सर्वस्वी अवलंबून असतात. शंभर वर्षांपूर्वीचे असले परिणाम तिरस्करणीय असत. कारण त्यामागे संपूर्णपणे अनिर्बंध आर्थिक व्यवहारांची पार्श्वभूमी होती. परंतु आताची स्पर्धा समाजविघातक आणि प्रतिकूल परिणाम घडून येऊ नयेत म्हणून बनविलेल्या कायद्याच्या आणि सांकेतिक नियमांच्या काटेकोर चौकटीबाहेर जाऊ शकत नाही. हे नियम पुरेसे नाहीत असे वाटत असेल तर ते आधिक कडक बनविणे समाजाच्या पूर्णपणे अखत्यारीतील आहे.

अद्यापही असे म्हणता येईल की, खर्चाचे प्रमाण सतत वाढते रहावे आणि त्यासाठी आर्थिक विकास झपाट्याने घडून यावा असे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवणे म्हणजे आक्रमक स्पर्धेवर आधारलेल्या सामाजिक संबंधांना प्रोत्साहन देण्यासारखे आहे. आणि स्पर्धेमुळे समाजावर प्रत्यक्ष प्रतिकूल परिणाम घडून येऊ नयेत अशी तरतूद करण्यात आली असली तरीही सामाजिक आणि नैतिक दृष्टीने असे संबंध अनिष्टच ठरतात. परंतु अशा तऱ्हेच्या संबंधांना प्रोत्साहन मिळत असल्याचे कसलेही चिन्ह आज ब्रिटनमध्ये दिसत नाही. अनिवार्य अशी सहकाराची प्रेरणा, त्याचप्रमाणे संघभावना उद्योगधंद्यात वसत असल्याचे मागच्या प्रकरणांतून दाखवून दिले असून चढाओढीच्या बाबतीत साऱ्या जगात बहुधा ब्रिटन सर्वात मागे असावे असा अंदाज व्यक्त करण्यात आलेलाच आहे. आणि असे असूनही प्रगतीचा आजचा वेग कायम राहिला तर पुढील वर्षात राहणीमानात दुपटीने वाढ होईल.

अशा प्रकारच्या वर्तणुकीत बदल घडून येण्याचाही काही संभव दिसत नाही. जलदगतीने विकास घडून येण्यासाठी लोभीपणावर आधारलेली आणि व्यक्तिनिष्ठ विचारसरणी आवश्यकच असते असे मानण्याचे कारण नाही. उलट अशी प्रगती आणि निरनिराळ्या स्वरूपाचे सामाजिक संबंध आणि आर्थिक संस्था यांत विसंगती असते असे मुळीच नाही. संस्था, उद्देश, राष्ट्रीय स्वभाववैशिष्ट्ये, मालकी हक्कांचे प्रकार आणि समतेचे प्रमाण यात भिन्नता असलेल्या रशिया, जर्मनी, ब्रिटन, अमेरिका यांसारख्या देशांतही फार मोठ्या प्रमाणावर प्रगती झाल्याचे दिसून येते. भांडवलशाहीच्या भरभराटीच्या काळात आक्रमक अशी व्यक्तिनिष्ठ विचारसरणी आणि चढाओढ अभिप्रेत असलेला समाज यामुळे प्रगती फार द्रुतगतीने घडून आली. म्हणून या गोष्टी असतील तरच प्रगती झपाट्याने घडून येऊ शकते असे अनुमान काढण्यास कोणताही आधार नाही.

वस्तुस्थिती अशी आहे की, उत्पादनक्षमता आणि तांत्रिक शोध यात आज जी

प्रगती दिसून येत आहे ती केवळ व्यक्तिगत फायद्यासाठी स्पर्धेत उतरलेल्या लोकांमुळेच मुख्यत: दिसून येत आहे असे नव्हे, तर मोठ्या प्रमाणावरील व्यवस्थापकीय क्षेत्रात काम करणाऱ्या पगारदार नोकरांमुळेही ती होत आहे. गळेकापू चढाओढीमुळे ही प्रगती होत नसून निरनिराळे कारखाने, उद्योगधंदे आणि सरकार व विद्यापीठे, तसेच व्यवस्थापक आणि कामगार यांच्यातील सहकार्यामुळेच अनेकदा ती घडून येत असते. विस्तृत प्रमाणावरील तांत्रिक ज्ञानात पुरेशी प्रगती घडून येणे आणि संशोधनावर भर देणे शक्य असलेल्या समाजात झपाट्याने प्रगती घडून येणे शक्य आहे, मात्र त्यासाठी मोठ्या प्रमाणावरील मागणी आणि सर्वमान्य झालेली विकासाची आवश्यकता याची जोड मिळाली पाहिजे. विकासाची कूर्मगती व परस्पर सहकार्यावर आधारलेली सामाजिक परिस्थिती, त्याचप्रमाणे विकासाची शीघ्र गती व हिंसक स्पर्धा एकरूपच आहेत असे मानण्याचे मला तरी काहीही कारण दिसत नाही. वाढते राहणीमान आणि जीवघेणी स्पर्धा असलेली संस्कृती परस्परपूरक असतातच असे नाही. तरीही वाढत्या राहणीमानाच्या उद्दिष्टावर आणखीही एक आक्षेप घेता येईल. तो आक्षेप असा की, व्यक्तिगतस्वार्थावर आधारलेल्या स्वयंकेंद्रित उदिष्टांनाच त्यामुळे चालना मिळण्याचा आणि समाजात नि:स्वार्थी हेतूने कार्य करणाऱ्या प्रवृत्तींना तो मारक ठरण्याचा संभव आहे. तथापि राजकारणी किंवा बुद्धीजीवी वर्गाकडून वाढत्या राहणीमानाचे ध्येय स्वीकारले गेले काय किंवा अव्हेरले गेले काय, सर्वसामान्य जनतेच्या मनोवृत्तीत त्यामुळे फारसा फरक पडेल असे मला वाटत नाही. कारण सर्वसाधारण माणसाच्या मनोवृत्तीची पाळेमुळे इतकी खोलवर रुजलेली असतात की, ती सहसा बदलत नाही. अर्थात राजकारणी लोक भरमसाट कर आकारणीसारख्या मार्गांनी ( काही प्रमाणात तरी ) भौतिक फायद्याच्या उद्दिष्टाला आळा घालू शकतात. परंतु त्यामुळे मुळात ते उद्दिष्ट नष्ट होऊ शकत नाही तर राहणीमानातील वाढ झपाट्याने होवो की मंदगतीने, ते उद्दिष्ट कायमच असते. म्हणून उद्दिष्टात मूलभूत बदल घडवून आणावयाचा असेल तर आपल्या समाजातच मोठ्या प्रमाणावर बदल घडवून आणला पाहिजे. परंतु तो घडवून आणण्याचा सुस्पष्ट मार्ग सापडू शकत नाही हे मी पाचव्या प्रकरणात दाखवून दिलेच आहे.

म्हणूनच व्यक्तिगत राहणीमानात वाढ होत जाण्याची आवश्यकता मान्य करणे म्हणजे समाजवादाला न शोभण्यासारखे आहे किंवा त्यामुळे व्यवहारत: समाजाची नैतिक पातळी खाली येण्यासारखे काही घडून येईल असे मला वाटत नाही. अर्थात तशी आवश्यकता मान्य केल्याने इतर बाबींपेक्षा घरखर्चाच्या आवश्यक बाबींना अग्रक्रम दिल्यासारखे होते असे मुळीच नाही. यासंबंधीची चर्चा याच प्रकरणातील पाचव्या भागात आलेली आहे. याचा अर्थ इतकाच की, योग्य अशा अनेक सामाजिक धोरणांपैकी वाढते राहणीमान हेही एक आहे.

## ४. पितृश्रेष्ठत्ववादी विरोध

परंतु काही वेळा त्यामुळे समाजकल्याणात भरमसाट वाढ होईल किंवा माणसे फार समाधानी होतील अशा काहीतरी मूलतःच भ्रामक असलेल्या कल्पनांमुळे या उद्दिष्टावर टीका केली जाते. असे म्हटले जाते की, विद्यमान गरजा भागल्याबरोबर त्यांच्या जागी नवीन गरजा निर्माण होतात. त्यामुळे प्राप्त आणि प्राप्य किंवा फलित आणि वांच्छित यांतील अंतर नेहमी कायमच राहते. सहाजिकच, व्यक्तिगत उत्पन्नात वाढ होत गेली तरी देखील माणसे आजच्याइतकीच असमाधानी राहतील. याचाच 'टेलिव्हिजन–रेफ्रिजरेटर संस्कृती' म्हणून तुच्छतापूर्वक उल्लेख केला जातो.

या प्रकरणात सुरुवातीला या मुद्याचे विवरण येऊन गलेले असले, तरी मी त्याला फारसे महत्त्व देत नाही. आणि ज्या कारणासाठी याठिकाणी त्या मुद्याला विरोध दर्शविण्यात येत आहे तोच आधार घेऊन त्यावेळी त्याचे प्रतिपादन करण्यात आले होते असेही नव्हे. प्राप्त आणि प्राप्य यातील अंतर पूर्णपणे कधीच भरून येत नाही हे खरे असले तरी संपूर्ण समाधान देणारे क्षण कधीच येत नाहीत, म्हणून हे अंतर नेहमी सारखेच राहते असे अनुमान मात्र त्यातून निघतेच असे नाही. तसे झाले असते तर माणसाचे उत्पन्न वाढत गेले तरी त्याची आर्थिक स्थिती सुधारत नाही असा त्याचा अर्थ झाला असता. आणि राहणीमानात सुधारणा झाली तरी त्यामुळे व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या आर्थिक सुस्थितीवरही त्याचा कसलाच परिणाम घडून आला नसता. (निदान एका विविक्षित मर्यादेनंतर तरी, भौतिक वस्तूंना अगदी गौण मानणारांच्या दृष्टिकोणातून पाहिले तरी देखील कमालीचे दारिद्रय आणि उपासमार यांतून सुटका झाली तर आर्थिक कल्याणात वाढ होईल हे कबूल करावेच लागेल असे मला वाटते.)

परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, माणसाला आपण आर्थिकदृष्टचा मागासलेले आहोत किंवा पुढारलेले आहोत यापैकी काहीतरी सारखे वाटत असते. आणि आहे त्यापेक्षा अधिक चांगल्या स्थितीत असावे असेही त्याला खास करून वाटत असते. युद्धपूर्व काळापेक्षा आपण आता जास्त सुस्थितीत आहोत असे कामगारांना वारंवार म्हणताना आपण पहातो. आणि मध्यम वर्गही हे कबूल करतो की, काही वर्षांपूर्वी होती त्यापेक्षा आर्थिक परिस्थिती आता पुष्कळच सुधारलेली आहे. आणि हे विचार निरर्थक आहेत असे खासच म्हणता येणार नाही. आणि एखाद्या संशयात्म्याला त्याबद्दल शंका वाटत असेल तर त्याने गेल्या मतदानाचा कौल काय दर्शवितो ते पहावे. राहणीमानाची पातळी उंचावली की, त्याबरोबर आर्थिक असंतोषही कमी होऊ लागतो असा निष्कर्ष अलीकडील मतदानाच्या निष्कर्षावरून निघतो हे त्याच्या लक्षात येईल. आर्थिक परिस्थितीत जर असा फरक दिसून आला नसता

तर गेल्या पन्नास वर्षांच्या सामाजिक व राजकीय इतिहासाची संगती लागणे खरो-खरीच कठीण गेले असते.

सहाजिकच मी पूर्वी एका निराळ्या संदर्भात म्हटल्याप्रमाणे, वाढत्या भौतिक गरजा किंवा अन्य कोणताही सामाजिक–आर्थिक बदल यामुळे लोक जास्त सुखी होतील असे आग्रहपूर्वक कोणीही म्हणू शकणार नाही. मला स्वतःला मात्र असे वाटते की, बहुधा ते तसे होत असावेत. परंतु कदाचित असमाधानाच्या कारणांबाब-तच्या दृष्टिकोणात अशा रीतीने फरक घडून येईल की, ते राजकीय किंवा आर्थिक बाबतीतील अडचणींच्या द्वारा व्यक्त होण्याऐवजी त्याला अधिक व्यक्तिगत स्वरूप प्राप्त होईल. तरीसुद्धा राहणीमानाचा दर्जा वाढत राहणे आवश्यक आहे असेच मी म्हणेन. कारण एक तर मागे म्हटल्याप्रमाणे अडचणी सामुदायिक स्वरूपाच्या असण्याऐवजी त्या व्यक्तिगत स्वरूपाच्या असलेल्याच चांगल्या. आणि दुसरे असे की, वाढत्या राहणीमानाचा सौख्यावर काहीही जरी परिणाम होत असला तरी त्यामुळे व्यक्तिगत सुखाची निवड करण्याच्या कक्षा वाढतात आणि सुसंस्कृतपणाच्या संभाव्य सीमा विस्तारत असतात.

परंतु सदोदित कुरकुर करणाऱ्या बुद्धीजीवी लोकांत, विशेषतः नीतिनिय-मांचा बडेजाव माजविणारे काहीशा चमत्कारिक प्रवृत्तीचे असे कांही सोवळे लोक असतात की, त्यांना हे सुद्धा पटत नाही. राहणीमानात वाढ झाली तर समाज सुखी होणार नाही या भीतीनेच ते आपला स्वाभाविक विरोध दर्शवितात असे नव्हे तर चांगल्या राहणीमानामुळे समाजाला जे स्वरूप प्राप्त होते त्याचाच त्यांना तिटकारा असतो. एकीकडे कामगार वर्ग आपले सगळे जादा उत्पन्न दारू, धूम्रपान आणि जुगार यात उडवून टाकतो अशी बालंबाल खात्री आणि दुसऱ्या बाजूला संयम हाच नैतिक गुण होय असा विश्वास यांचे आपल्या मनात त्यांनी समीकरण बांधून ठेवलेले असते. अशा तऱ्हेचे कर्मठपणाचे व पितृश्रेष्ठत्व वादाचे मिश्रण ब्रिटन-मधील बुद्धीजीवी वर्गात पहावयास सापडते हे विशेष. वेब पतिपत्नींनी अर्थातच त्यास पूर्णत्वास नेऊन बसविले. ब्रिॲट्रिसकडून सर्वसाधारण माणसाचा उल्लेख 'विषयासक्त' म्हणून व्हावा हे किती बोचक वाटते !

याबाबतीत एक अगदी अलिकडचे उदाहरण देता येण्यासारखे आहे. इतर बहुतेक सर्व उदाहरणांपेक्षा ते वाईट आहे म्हणून नव्हे तर, अगदी अलिकडचे आहे म्हणूनच केवळ ते येथे ऊदधृत केले आहे: 'ब्रिटनसारख्या देशात अद्यापही अनावश्यक आणि वाया जाणारा असा किती तरी खर्च होत असतो. . . . भरपूर श्रमाची कामे करणाऱ्या कामगार आणि गरीब मध्यम वर्गाची कितीतरी चरबी झडून जाणे अद्यापही आवश्यक आहे. याठिकाणी होणारी एकूण उधळपट्टी ही काठावरच्या छोटयाशा "चैनी"पेक्षा किंवा "समस्या निर्माण करणाऱ्या" गटाकडून अधिक नेत्रदीपक प्रमाणावर होणाऱ्या उधळपट्टीपेक्षाही कितीतरी जास्त असण्याचा संभव असतो. अलिकडे

करण्यात आलेल्या पाहणीसंबंधीच्या चांगल्या चांगल्या अहवालावरून अशी समजूत होते की, ब्रिटिश जनतेच्या खर्चाच्या मुख्य बाबी म्हटल्या म्हणजे दारू, जुगार व वेश्या या होत– थोडीशी काटकसर आणि थोडीशी विरक्ती हा चांगल्या जीवनाचा एक भाग असून ब्रिटिश ग्राहकाने तो आत्मसात केला आहे असा दावा क्वचितच कोणी करू शकेल. वस्तुतः अशी कधी वेळ येणार नाही आणि तशी ती येऊ नये अशी आशा करू या.

हा दृष्टिकोण कोणीच मान्य करीत नाही याव्यतिरिक्त त्याबाबत आणखी काहीही सांगता येण्यासरखे नाही. आपली मते विक्षिप्तपणाची आहेत याची जोपर्यंत ती व्यक्त करणारांना जाणीव आहे, आणि देशाची सर्वसाधारण इच्छा किंवा मनोवृत्ती त्यात प्रतिबिंबित होत नाही तोपर्यंत टीकाकारांना ती मते धारण करण्याचा जरूर अधिकार आहे. पण सरकारी धोरणाच्याद्वारा त्यांना अभिव्यक्ती देणे किंवा त्या कारणास्तव राहणीमानात वाढ करण्याचे उद्दिष्टे हाणून पाडण्याचा प्रयत्न करणे हे मात्र सर्वस्वी अयोग्य आणि पितृश्रेष्ठत्व वादाचे व लोकशाही विरोधी घटपट ठरेल.

वास्तविक अशा तऱ्हेची टीका ही कामगार आपले जादा उत्पन्न कशा प्रकारे खर्च करतो त्याबाबत दिशाभूल करणारी असते. दारू किंवा तंबाखू यावरील खर्चात बरीच वाढ झाल्याचे त्यासंबंधीच्या आकड्यांवरून सहाजिकपणेच दिसून येते. परंतु वस्तुतः कामगारांच्या खर्चातील यापैकी बरीचशी वाढ कर वाढल्यामुळे झालेली असते- परंतु दारू किंवा तंबाखू या कामांगार वर्गाच्या परंपरागत चैनीच्या वस्तू असल्यामुळे वाढत्या उत्पन्नाच्या प्राथमिक अवस्थेत त्यात जादा प्रमाणात वाढ होणे स्वाभाविक आहे; पण त्यातही कमाल तृप्तीची मार्यादा गाठली जाण्याची वेळ जवळ येत चालली आहे आणि आता अशी आशा करण्यास जागा आहे की, यापुढे सर्वांना योग्य अशाच बाबींवर वाढलेले उत्पन्न खर्ची पडू लागेल. उदा. मुलाबाळांना अधिक चांगले जीवन प्राप्त करून देणे, शरीरस्वास्थ सुधारणे, वृद्धापकाळासाठी अधिक चांगली तरतूद करून ठेवणे, घर खरेदी करणे, प्रवास आणि रजा, निरनिराळ्या प्रकारची विजेची यंत्रे (धुण्याची) किंवा अन्य उपकरणे खरेदी करून घरकामाचा त्रास वाचविणे इ.

उत्पन्नातील वाढीचा काही भाग अर्थातच फुरसद किंवा रिकामपणा मिळविण्यासाठी, म्हणजे रजेवर जाण्यासाठी, इतकेच नव्हे तर सांस्कृतिक बाबींवरही खर्च होईल. मॅथ्यू अरनॉल्ड याने असे म्हटले आहे की, आपल्या भौतिक विकासाच्या हव्यासामुळे घडून येणाऱ्या पाशवी परिणामासंबंधाने "आतापर्यंत काहीही म्हटले गेले असले, तरी या विकासामुळे अंती बौद्धिक जीवनाचा ऱ्हास होईल असे खात्रीपूर्वक जरी सांगता आले नाही तरी तसा संभव मात्र जरूर दिसतो. माणसाने एकदा पुरेशा सुखसवलती उपलब्ध करून घेतल्या आणि यापुढे जीवन कसे व्यतीत करावयाचे असा प्रश्न त्यापुढे उभा राहिला म्हणजे आपल्याला मन म्हणून काही आहे

आणि ते मत हेही सौख्य प्राप्त करून घेण्याचे एक साधन असू शकते असे त्यालाच वाटू लागेल. हे साध्य करण्यासाठी आपल्या आगगाड्या, उद्योगधंदे किंवा नशीब काढण्याच्या इतर जागा यावर विसंबून राहणे ही आज तरी निदान केवळ श्रद्धेचीच बाब आहे. परंतु इतरत्र अनुभव येतो त्याप्रमाणे निष्ठाच शेवटी आपल्याला हात देते का ते पाहू ?'

ते कसेही असो, मला अजूनही असे आटते की भौतिक राहणीमानात सतत वाढ होत जाणे हेच सर्वस्वी युक्त होय. याचे कारण बहुधा असे असावे की, त्यामुळे आत्मतुष्टता वाढत गेली तरी त्याबरोबर व्यक्तीगत स्वातंत्र्याच्या कक्षाही वाढत जातील. कारण वाढत्या राहणीमानाबरोबर कधिकाधिक संधी पण उपलब्ध होत जाते. सामाजिक न्यायाच्या दृष्टिने पाहिले तर इतर लोक उपभोगीत असलेल्या चैनीपासून सर्वसाधारण जनता जी आजवर वंचित राहिली होती तिला देखील भौतिक सुखसोयींचा लाभ करून दिला पाहिजे हे अभिप्रेत असले तरी तिला प्रत्यक्ष तो लाभ होतो की नाही ते पाहिले पाहिजे; काटेकोर समतावादी दृष्टिकोणातूनही ते समर्थनीय ठरते. कारण वाढत्या राहणीमानामुळे सामाजिक समतेची जाणीव वाढत असल्यामुळे समाजवादाच्या मूलभूत उद्दिष्टांत भरच पडत असते. तसेच लोकशाहीवादी व पितृश्रेष्ठत्वाला विरोध असणाऱ्या दृष्टिकोणातूनही राहणीमानात वाढ होत जाणेच इष्ट ठरते. कारण कामगार वर्गाला नेमके तेच हवे असते. जे कोणी कामगारांना असे सांगतील की, (राहणीमानात वाढ व्हावी ही) त्यांची भूमिका चूक आहे आणि त्यामुळे त्यांचे भ्रष्ट अमेरिकीकरण होणार आहे त्यांचा चांगलाच मुखभंग केला जाईल. विशेषत: असे टीकाकार स्वत: भौतिक ऐश्वर्यात लोळत असतील तर त्यांचा अधिकच उपहास केला जाईल.

सर्वसाधारणपणे ज्यांचे राहणीमान सामान्य लोकांपेक्षा उंचावलेले आहे त्यांनी भौतिक समृद्धीच्या धोक्याबद्दल त्यांच्यापेक्षा कमनशिबी असणारांना काही सुनावण्यापूर्वी जरा विचार करावा.

## ५. अग्रक्रमाचा सवाल

वाढत्या अंतर्गत खर्चाचा पाठपुरावा करणारांना निश्चितपणे काहीजणांकडून विरोध होणार आणि त्यांच्या म्हणण्याचा विपर्यास केला जाणार हे नक्की. म्हणून समाजवादाच्या दृष्टिने राहणीमानाचे नेमके स्थान कोणते ते आधी स्पष्ट झाले पाहिजे.

सर्वप्रथम मला असे सांगावयाचे आहे की, अशा खर्चाला मी अवास्तव महत्त्व देत नसलो तरी समाजवादी उद्दिष्टांच्या दृष्टीने त्याला फार महत्त्व आहे. त्यामुळे पहिली काही वर्षे मागासलेल्या विभागाच्या गरजा पुऱ्या करण्यावर किंवा निर्यात आणि भांडवल गुंतवणूक वाढविण्यावर सर्वांत जास्त भर देण्याचे आपल्याला ठरविता येईल, परंतु त्याबरोबर हे लक्षात ठेवले पाहिजे की त्यासाठी ब्रिटनमधील भौतिक

राहणीमान घसरणे हे मुळातच इष्ट आहे असे नव्हे. कारण राहणीमान चांगले असेल तर जनतेचा नैतिक कणा चांगला मजबूत राहतो आणि अमेरिकन जीवन आणि भोगवाद यासारख्या मोहात ती सापडत नाही; परंतु राहणीमान ढासळू दिले तर त्यामुळे निश्चित स्वरूपाच्या समाजवादी उद्दिष्टाचाच नव्हे तर ब्रिटनमध्ये लवकरात लवकर सामाजिक समानता प्रस्थापित करण्याच्या आपल्या आशेवरच पाणी सोडावे लागेल. परंतु त्याला आपोआपच सर्वात खालचा क्रम मिळता कामा नये तर समाजवादी गुणवत्तेच्या संदर्भात इतर बाबींबरोबरच त्याचाही विचार झाला पाहिजे.

दुसरी आवश्यक बाब जादा संपत्तीच्या वाटपाशी संबंधित आहे. याठिकाणी हुजूरपक्षीय आणि समाजवादी यांच्या दृष्टीकोणातील फरक उघड होतो. खर्चाचे प्रमाण वाढत जावे हे मान्य करीत असतांनाच हुजूरपक्षीयांची भूमिका अशी असते की, आर्थिक परिस्थितीनुसार आवश्यक ठरल्यास त्यात घट होऊ शकेल. उत्पादक प्रक्रियेतील विशिष्ट स्थानामुळे ज्यांना सुरुवातीपासून वाढता खर्च करण्याची संधी प्राप्त झालेली असते त्यांचे ते राहणीमान टिकून राहिले तरी त्यात हुजूरपक्षीय समाधान मानतात. याचा अर्थ असा की, अनिर्बंध अर्थव्यवस्थेत कामगार वर्गापेक्षा तुलनात्मक दृष्टीने मध्यम व वरिष्ठ वर्गांना अधिक फायदा होतो, पगार किंवा रोजमजुरीपेक्षा भांडवली खर्चावरील फायदा अधिक असतो, उक्ती मजुरी आणि बोनस योजना लागू असणाऱ्या कामगारांना किमान दरावरील मजुरीपेक्षा अधिक फायदा सुटतो. सर्वसाधारणपणे कमी कर आकारणी आणि उत्पन्नाचे किमान हस्तांतर यावर त्यांचा विश्वास असतो आणि सामाजिक सेवांचा फायदा घेणारांपेक्षा श्रमजीवी जनतेचा कमी फायदा व्हावा अशी त्यांची इच्छा असते. १९५१ सालापासूनचा अनुभव हेच दर्शवितो आणि हुजूरपक्षाच्या कर आकारणी, वेतन निश्चिती आणि भांडवलाची बाजारपेठ यासंबंधीच्या दृष्टिकोणावरूनही हेच सूचित होते. याउलट समाजवाद्यांनी जवळपास यदृच्छेने आर्थिक क्रमानुसार वाटप व्हावे हे मान्य न करता सामाजिक अग्रक्रम निश्चित करून त्या अनुषंगाने फेरवाटप करण्यावर भर दिला पाहिजे. अर्थात तसे घडवून आणण्यासाठी सरकारचा कडक हस्तक्षेप अत्यावश्यक ठरतो.

या प्रकरणात मजूर पक्षाच्या धोरणात नेमके कोणते बदल घडून आले पाहिजेत यापेक्षाही मनःप्रवृत्ती आणि विचारप्रणाली यात बदल घडवून आणला पाहिजे असे प्रतिपादन करण्यात आले आहे. मजूर पक्ष म्हणजे साधेपणा, शिधावाटप आणि निर्बंधात्मक नियंत्रण वाढविणारा पक्ष अशी जनमानसात प्रतिमा उमटवणे अत्यंत धोकादायक ठरणार आहे आणि त्यामुळे टोरी पक्ष सुबत्ता आणि वाढते राहणीमान आणणारा पक्ष म्हणून श्रेय उपटण्याचा फार मोठा धोका निर्माण होणार आहे हे मजूर पक्षाने ओळखले पाहिजे. वस्तुतः तशी गरज आहे यावर कोणाचा विश्वासदेखील बसणार नसला तरी नागरिक सुखी व सधन झालेला आहे आणि पूर्वी केवळ वरिष्ठ

वर्गालाच ज्या चैनींचा उपभोग घेता येत असे त्या आता त्याच्या आवाक्यात आल्या आहेत, असा समज आम्हाला निर्माण करावयाचा आहे अशी घोषणा पक्षाने मोठ्या अभिमानाने केली पाहिजे आणि हे साध्य करण्यासाठी वर्गविहीत समाज स्थापन करण्याच्या दृष्टीने फार मोठी मजल मारली पाहिजे. अर्थात इतर बाबींच्या निकडी-वर आपल्या प्रगतीची गती अवलंबून राहणार हे उघड आहे. परंतु आपले उद्दिष्ट काय आहे ते तरी निदान स्पष्ट केले पाहिजे.



## प्रकरण चौदावे

# संपत्तीची विभागणी (१)

### १. सध्याची अन्याय्य विभागणी

तिसरा दूरान्वयाने विचारात घ्यावयाचा मुद्दा म्हणजे संपत्तीची वाटणी. म्हणजेच व्यक्तीचे एकूण आर्थिक साधनसामुग्रीवर किंवा खर्च करण्याच्या ताकतीवर असलेले नियंत्रण. पण येथे असा प्रश्न उपस्थित होईल की, वाढत जाणाऱ्या निव्वळ उत्पन्नाची कशीही वाटणी करण्यात आली तरी कोणत्याही परिस्थितीत राहणीमानाचा साचा हळूहळू समान होत जाणे शक्य आहे का ? शिवाय संपत्तीचे आणखी फेरवाटप करण्यात आले तर त्यामुळे आर्थिक सुस्थितीत निश्चितपणे वाढ होणार नाही का ?

दोन कारणांमुळे या प्रश्नाची उत्तरे महत्त्वाची ठरतात. एक तर ब्रिटनसारख्या जुन्या पद्धतीच्या समाजात अमेरिका किंवा अन्य नव्या वासाहतिक देशांपेक्षा सरासरी मूळ उत्पन्नाच्या प्रत्येक पातळीवर खर्चामध्ये सामाजिक दृष्टया महत्त्वाचे आणि सहज दिसण्यासारखे फरक पडत असतात. याचे कारण असे की, पूर्वीच्या अमीर उमरावांच्या काळापासून संपत्तीची किंवा वरिष्ठ वर्गाच्या प्रतिष्ठेची काही प्रतीके आपण घेतली आहेत. ही प्रतीके अशा प्रकारची आहेत की, त्यांची जशीच्या तशी वाटणीही करता येणार नाही आणि काही ऐतिहासिक कारणांमुळे त्या प्रतीकांचा संबंध एका विशिष्ट समाजाशी किंवा वर्गाशी असा काही जोडला गेला आहे की, सध्याच्या नव्या देशांमध्ये त्यांच्याशी साम्य असणारे काही आढळणार नाही. यावरून असा निष्कर्ष निघतो की, दृष्य राहणीमानातील समानता, अभिप्रेत असलेल्या ठराविक मर्यादेपर्यंत नेण्यासाठी संपत्तीची वाटणी अधिक समान झाली पाहिजे.

दुसरे आणि जास्त महत्त्वाचे कारण म्हणजे, ब्रिटनमधील उत्पन्नाची हल्लीची

विभागणी कमालीची अन्याय्य असून या वाटणीचा उपभोग्य वस्तूंच्या खर्चाच्या स्वरूपाशी, आर्थिक सुखसोयीशी आणि अन्यायाबद्दल तिरस्कार असण्याशी अथवा नसण्याशी कसलाही संबंध पोहोचत नाही. येथे लक्षात घेण्याजोगा मुद्दा फक्त एकच आढळतो आणि तो हा की, समाजात संपत्तीची आत्यंतिक विषम वाटणी झाली आहे आणि त्या विषम वाटणीमुळे काही मंडळींना संपत्तीचा विनियोग कसाही झाला तरी सामाजिक व आर्थिक फायदे भरपूर प्रमाणात मिळतात. या फायद्यांची वाटणी कशा तऱ्हेने होते हा सामाजाच्या दृष्टीने विचार करण्यासारखा प्रश्न असतो.

वारसा हक्काने मिळालेल्या किंवा कोणतेही श्रम न करता निर्माण झालेल्या संपत्तीमुळे येणारी विषमता अन्याय्य मानण्यास हरकत नाही. कारण प्रत्येक व्यक्तीला अत्युच्च स्थान प्राप्त करून घेण्याची संधी मिळाली पाहिजे या तत्वाशी वरील गोष्ट विसंगत ठरते आणि काही व्यक्तींनाच स्वकष्टार्जित फळाशी कसलाही संबंध नसलेल्या काही भेदजन्य सवलती केवळ विशिष्ट कुटुंबात जन्मल्यामुळेच प्राप्त होतात.

कष्टार्जित संपत्तीमधील तीव्र विषमता ही व्यक्तीच्या कर्तृत्वामुळे नव्हे तर त्या व्यक्तीला विशेष अशी संधी उपलब्ध झाल्यामुळेच, म्हणजेच व्यक्ती–व्यक्तीत अनैसर्गिक तफावत निर्माण झाल्याचे दिसून येत असल्यास तीही अन्याय्यच मानावी लागेल. बदललेल्या परिस्थितीमुळे ज्यावेळी एखाद्या जागेची किंमत भरमसाठ वाढते त्यावेळी मिळणारे भाडे (भाटक), तसेच एखाद्या व्यक्तीला तिच्या आर्थिक कर्तृत्वाच्या मानाने प्रमाणाबाहेर संपत्ती मिळालेली असेल तर त्या संपत्तीमुळे निर्माण होणारी विषमताही अन्याय्यच म्हटली पाहिजे.

एकाच प्रकारच्या उत्पन्नावरील करआकारणीत काहींच्या बाबतीत खास मेहरबानी दाखविण्यात येत असेल म्हणजे करआकारणी करतांना व्यक्तींची कर भरण्याची पात्रता नीट विचारात घेतली जात नसेल तर त्यामुळेही अन्याय होऊ शकेल.

संपत्तीच्या असमान वाटणीची आणि विषम न्यायाची ही तिन्ही कारणे ब्रिटनमध्ये दिसून येतात आणि या तीन कारणांपैकी मुख्यत: जेथे वडलोपार्जित संपत्ती कमी महत्वाची मानली जाते आणि उत्पन्नाची कमाल मर्यादा गाठण्याची प्रत्येकाला सारखीच संधी असते अशा उत्तर अमेरिका किंवा वसाहतिक देशापेक्षा ब्रिटनमध्ये ठराविक मर्यादेतील असमानता अधिक अन्याय्य आणि तिरस्करणीय का त्याचा यामुळे खुलासा होतो.

खर्च करण्याच्या पात्रतेतील विषमतेचे. असमान वाटणी हे अजूनही प्रमुख कारण आहे. स्थावर मिळकतीपासून मिळणाऱ्या नेहमीच्या उत्पन्नाच्या आकड्यांवरून त्याचे महत्त्व आपणास कळू शकते. १९५२–साली जे उत्पन्न जादा सरटॅक्सच्या कक्षेत येत होते त्यापैकी कमीत कमी ३७% उत्पन्न (१११० मिलियन पौंडांपैकी ४१५ मिलियन पौंड) श्रम केल्याशिवाय मिळालेले होते. शिवाय या अकष्टार्जित

उत्पन्नाची विभागणी श्रम करून मिळविलेल्या उत्पन्नावर मोठ्या प्रमाणावर कर भरणाऱ्यांना पूरक अशा सरटॅक्स भरणाऱ्यांमध्ये समप्रमाणात झालेली नव्हती. उलट कष्टार्जित व बिनकष्टार्जित मोठे उत्पन्न सहसा एकत्र आढळत नाही आणि सरटॅक्स भरणाऱ्यांचे उत्पन्न मुख्यत्वेकरून कोणत्यातरी एकाच प्रकारचे असे कष्टार्जित उत्पन्नाच्या ७०% उत्पन्न मुख्यत्वेकरून कष्टार्जित आहे असे मानले आणि अशा प्रकारचे तेवढेच उत्पन्न कष्टार्जित धरले तर असे दिसून येईल की, सरटॅक्स पात्र असलेले ६१% उत्पन्न कष्टार्जित, २१% मुख्यतः अकष्टार्जित आणि फक्त १८% उत्पन्न या दोन्हींचे मिळून असते हेच निराळ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे सरटॅक्स भरणाऱ्यांपैकी बरेचसे लोक त्यांच्या गुंतवणुकीमुळेच श्रीमंत झालेले असतात.

आपण कराच्या जसजसे वरच्या पातळीवर जाऊ तसतसे अकष्टार्जित उत्पन्नाचे महत्त्व वाढतच जाते. ज्यांचे उत्पन्न दोन हजार ते पंचवीसशे हजार पौंड आहे त्यातील ७०% लोकांचे उत्पन्न मुख्यतः कष्टार्जित असते व फक्त १८% लोकांचे उत्पन्न अकष्टार्जित असते. परंतु वीस हजार पौंडाहून अधिक उत्पन्न असणारांमध्ये मात्र ही परिस्थिती एकदम उलटी होते, आणि तेथे फक्त ३०% लोकांचे उत्पन्न मुख्यतः कष्टार्जित तर ५३% लोकांचे मुख्यतः अकष्टार्जित असते. म्हणजेच श्रीमंत लोकांपैकी जादा लोकांचे उत्पन्न मुख्यतः स्थावर मालमत्तेपासून मिळणारे असते.

परंतु या आकड्यांवरून वस्तुस्थितीच्या फारच थोड्या भागाचे आकलन होते. कारण मालकी हक्कामुळे असे काही महत्त्वाचे आर्थिक फायदे होतात की, जे अशा उत्पन्नाच्या गुंतवणुकीमुळे प्राप्त होणाऱ्या फायद्यांच्या मानाने कितीतरी जास्त असतात. नियमित वेळी आणि नियमानुसार भांडवली उत्पन्न हातात येत असल्याने फार मोठ्या प्रमाणावरील दैनंदिन खर्चाची पातळी टिकवून धरता येते हा फायदा त्यापासून निश्चितच मिळू शकतो. पुढे होणाऱ्या उत्पन्नातील तोट्याचा विचार करता सरटॅक्सच्या दराने तो क्षुल्लक ठरतो आणि भांडवलातून केलेल्या खर्चावर कर बसत नसल्याने त्यापासून फायदा मात्र सपाटून मिळतो. मोठमोठ्या इस्टेटीतील अगदी थोडासा जरी पैसा दरवर्षी उधळला गेला तरी त्या मालकाच्या कर भरल्यानंतरच्या उत्पान्नाच्या दोन ते तीनपट रक्कम तो टिकवून ठेवू शकतो आणि म्हणूनच या प्रमाणात मालमत्ता विकून टाकणे हे श्रीमंत वर्गात नित्याचे होऊन बसले आहे. अशा तऱ्हेने आर्थिक धोरणातील समानता घडवून आणण्याचे हेतू असफल होत आहेत आणि कर भरल्यानंतरच्या उत्पन्नाच्या वितरणापेक्षा खर्चाच्या वितरणात खूपच असमानता दिसून येत आहे.

शिवाय त्यांच्याजवळ आधीपासून भांडवल आहे ते जर धोरणी आणि हुषार असतील (किंवा भांडवलाची चांगली उलाढाल करू शकत असतील) तर विशेषतः शेअर बाजारात आपल्या भांडवलावर चांगला नफा मिळवू शकतील. हा नफा करमुक्त असतो. औद्योगिक क्षेत्रातील वाढत्या नफ्याचे चालू प्रमाण आणि त्यावर

मिळणारे व्याज यांच्या मानाने त्यात गुंतवलेल्या रकमा कमालीच्या मोठाल्या असतात आणि संपत्ती धारकांची खर्च करण्याची क्षमता वाढविण्यास मुख्यत: हेच कारणीभूत असते.

त्याचप्रमाणे वडलोपार्जित संपत्तीपासून जे असंख्य फायदे मिळत असतात त्याची किंमत पैशाने मोजता येण्यासारखी नसते; परंतु तरीही त्याचे महत्त्व मात्र फार असते. त्यामुळेच सर्वोत्तम शिक्षण आणि व्यावसायिक ज्ञान प्राप्त करून घेण्याची संधी मिळू शकते. विशेषत: वृद्धापकाळासाठी आवश्यक असलेली सुरक्षितता लाभू शकते आणि प्रसंगी धोका पत्करण्याचाही हिय्या करता येतो. तसेच व्यवसायाची निवड करतांना किंवा काम केव्हा करावयाचे आणि आराम केव्हा करावयाचा हे ठरविण्याच्या बाबतीतदेखील आर्थिक दृष्टचा फार मोठी सवड मिळू शकते.

खाजगी भांडवलाच्या वाटणीचे जे आकडे खाली दिले आहेत त्यावरून त्या फायद्याची वाटणी किती असमान असते ते दिसून येईल. इंग्लंड व वेल्समधील एकूण खाजगी भांडवलापैकी पन्नास टक्के भांडवल पंचवीस वर्षावरील अवघ्या १% लोकांच्या हातात असते; १०% लोकांजवळ ८०% तर ६१% लोकांजवळ अवघे ५% भांडवल असते. एकूण निव्वळ ऐवज (खेळते भांडवलक+कर्जरोखे+मालमत्ता+खाजगी उद्योग+कर्जाऊ दिलेल्या रकमा+मोटार गाड्या–बँकेचे ओव्हर ड्राफ्टस–घेतलेले कर्ज) म्हणजे काय याची अधिक व्यापक व्याख्या केली तर आपणास असे दिसून येईल की, १९५४ साली लोकसंख्येच्या एक तृतियांश लोकांजवळील 'एकूण निव्वळ ऐवज' शून्य होता. अर्ध्याहून अधिक लोकांजवळ शंभरापेक्षा कमी तर फक्त ५ टक्के लोकांजवळ तो ५००० पौंडांच्यावर होता. या वरच्या पाच टक्के लोकांकडे ६०% एकूण ऐवज निश्चित स्वरूपात असते. तर १२ टक्क्यांजवळ ८०% व ६२% जवळ फक्त १ टक्का असतो. (अनेक लोकांजवळ स्वत:च्या मालकीची घरे असतात म्हणून नाही तर या आकड्यांवरून यापेक्षाही जास्त असमानता आढळून आली असती.)

विषमतेचे दुसरे कारण म्हणजे श्रमातून मिळालेल्या उत्पन्नाचे वाटप कर आकारणीत देखील वरपासून खालपर्यंतच्या विभागणीचे प्रमाण २०:१ इतके असते. आणि बहुतेक सर्व समाजवाद्यांच्या दृष्टीने ज्याला 'न्याय्य' विभागणी असे म्हणता येईल त्याहूनही हे प्रमाण जास्त आहे. परंतु याठिकाणी न्यायाचा विचार कार्यक्षमतेच्या दृष्टीनेही करावा लागेल. त्याचप्रमाणे प्रोत्साहक बाबीसंबंधी प्रश्नही या ठिकाणी उपस्थित होतात. मी वर म्हटल्याप्रमाणे या प्रश्नासंबंधी काहीसा आक्षेप वादी दृष्टिकोन स्वीकारणे जरूर आहे. त्यामुळे कदाचित प्रत्यक्ष कराच्या रूपाने उत्पन्नाचे मोठ्या प्रमाणावर फेरवाटप करण्याचा प्रश्नच उद्भवणार नाही. या शक्यतेसंबंधी अधिक उहापोह करण्यात आलेला नाही. परंतु आर्थिक कार्यक्षमता कमी न होताही कामातून मिळणारे एकूण उत्पन्न आणखीही कमी करता येईल आणि त्यामुळे सामाजिक न्यायात स्पष्ट वाढ होईल.

शिवाय वरच्या थरातील उत्पन्नातील निरनिराळ्या व्यक्तींमध्ये होणारी विभागणी उघड उघड अन्याय्य असते. कारण त्यासाठी जी संधी उपलब्ध व्हावी लागते त्यात कसलीही समानता नसते. मागणीच्या मानाने कुशल कामगारांचा पुरवठा अपुरा पडल्यामुळे कदाचित असे काम करणाऱ्यांच्या उत्पन्नात वाढ झालेली दिसत असेल. ही कमतरता कधी कधी कायमची होऊन बसते आणि तल्लख बुद्धीच्या कामगारांचा पुरेसा पुरवठा नाही हे त्याचे कारण असू शकते. पण बरेच वेळा ते तसे नसते आणि जादा प्राप्तीही खरोखरीच्या असामान्य कर्तबगारीमुळे मिळालेली नसते तर मक्तेदारीमुळे निर्माण होणाऱ्या विचित्र परिस्थितीमुळे मिळणारा मोबदला हे तिचे कारण असते. चांगले शिक्षण आणि जरूर ते कौशल्य मिळविण्यासाठी लागणाऱ्या सवलतींचा अभाव, विशिष्ट व्यवसाय करण्यावर घातलेली बंधने किंवा वशिलेबाजी यामुळेही अशी जादा प्राप्ती मिळत असते.

संपत्तीची फेरवाटणी झाली तर अशा प्रकारचे खंडाच्या स्वरूपातील उत्पन्न नष्ट होण्यास बरीच मदत होईल. इतर उत्पन्नासाठी बाराव्या प्रकरणात सांगितल्या-प्रमाणे शिक्षणाच्या पद्धतीतच सुधारणा घडवून आणली पाहिजे. त्यामुळे लॉंइड्स किंवा स्टॉक एक्सचेंज यांसारखे व्यवसाय करण्यावर असलेले प्रतिबंध कोलमडून पडतील व इतरांना ते व्यवसाय करण्यास मोकळीक मिळेल. तसेच प्रतिबंधात्मक करार असलेले जे उद्योगधंदे आहेत ते सुरू करण्याची मोकळीक मिळेल. त्यामुळे वशिलेबाजीचा संपर्क नसलेले सामाजिक संबंध सर्वसाधारणपणे निर्माण होतील. आणि संधी मिळण्याचे क्षेत्र वाढल्याने अधिक किफायतशीर व्यवसायाच्या बाबतींतील निवड अधिक उचित ( आणि अधिक कार्यक्षम ) अशी होईल इतकेच नव्हे तर त्यामुळे केवळ मक्तेदारीमुळे मिळणारे मलिदे कमी होत जातील व कष्टार्जित उत्पन्नातील वाढ पिरॅमिडसारखी होत जाणार नाही. या सर्व गोष्टी आर्थिक धोरणाच्या अवाक्याबाहेरच्या असल्यामुळे या किंवा पुढील प्रकरणात त्यासंबंधी उहापोह केलेला नाही.

अन्यायाचा तिसरा प्रकार म्हणजे ब्रिटनमधील कर आकारणी कर भरण्याची कुवत नीट अजमावली जात नाही व त्यामुळे कराचे ओझे व्यक्ती–व्यक्तीत योग्य प्रकारे विभागले जात नाही हा होय. याची अनेक कारणे आहेत. त्यांपैकी मुख्य कारण म्हणजे भांडवलावर मिळालेला नफा हा उत्पन्नाच्या व्याख्येतून वगळलेला असतो आणि त्यावर कर आकारला जात नाही. तसेच काही वर्गांना कर आकारणीच्या वेळी खर्चाच्या रकमा वजा करतांना इतर वर्गापेक्षा जास्त सवलती दिल्या जातात. शिवाय कर चुकविण्यासाठी कायद्यात उघड उघड दिसणाऱ्या अनेक पळवाटा असतात.

अन्यायाचा हा तिसरा प्रकार सारखीच संपत्ती असणाऱ्या परंतु कराच्या बाबतीत मात्र निरनिराळ्या गटात मोडणाऱ्या व्यक्तींच्याच बाबतीत घडून येतो असे भासते; परंतु याला आणखीही एक बाजू आहे आणि ती म्हणजे पिरॅमिडसारखी

होणारी संपत्तीची विभागणी. कारण व्यवहारात प्रामुख्याने मोठ्या उत्पन्न धारकांनाच कराच्या बाबतीत सूट देण्यात येते. रॅडक्लिफ कमिशनच्या अहवालाला जोडण्यात आलेल्या भिन्न मतपत्रिकेत म्हटल्याप्रमाणे आपण जसजसे उत्पन्नाच्या वरच्या गटात जातो तसतसे कर आकारणीचे कायदेशीर प्रमाण हे कर भरणाऱ्या खऱ्याखुऱ्या पात्रतेच्या मानाने चढत्या श्रेणीने मागे पडत आहे. म्हणूनच हा अन्याय दूर केल्यावर मोठ्या उत्पन्नाच्या निरनिराळ्या व्यक्तींना तर न्याय मिळेलच परंतु त्याचबरोबर जास्त उत्पन्न असणारे व इतर या दोघांच्याही वर कराची रास्त विभागणी होऊ शकेल.

भांडवली नफ्यावरील सूट ही कर आकारणीतील सर्वांत अन्याय्य बाब होय. तसेच खाजगी भांडवलाच्या असमान विभागणीशी तो निगडित आहे आणि म्हणून असमानतेच्या या बाजूवरच या व पुढील प्रकरणात भर देण्यात आलेला आहे. कारण ती बाब तत्त्वतःच अत्यंत असमर्थनीय आहे. असमानतेच्या इतर बाजूंची चर्चा अन्यत्र आलेली आहे.

## २. मिळकतीच्या फेरवाटपाचे अन्य प्रकार

खाजगी संपत्तीच्या अन्याय्य विभागणीवर अनेक बाजूंनी हल्ले चढवणे शक्य आहे. त्याची चर्चा पुढे करण्यात आली आहे.

परंतु राष्ट्रीय उत्पन्नात जसजशी वाढ होत जाते तसतशी मालमत्तेची किंमतही हळू हळू वाढू लागते. आणि या वाढलेल्या उत्पन्नाचे वाटपच आजच्यापेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेने होणे आपल्या दृष्टीने आवश्यक आहे. दुसरे असे की, खाजगी उत्पन्नात घट होऊन सार्वजनिक उत्पन्नात वाढ होत जाण्याच्या दृष्टीने सार्वजनिक व खाजगी मालमत्तेचे प्रमाण वाढते राहील अशी दक्षता घ्यावी लागेल. मृत्यूकर हे उत्पन्न न समजता भांडवल समजले गेले तर, मृत्यूकराचा या दृष्टीने उपयोग करून घेता येईल. यासाठी सर्वसाधारपणे सार्वजनिक बचतीचे प्रमाण जास्त ठेवावे लागेल व हे राष्ट्रीय उद्योगधंदे फायद्यात चालण्यासाठी त्यांना उत्तेजन द्यावे लागेल. अंदाजपत्रकात शिल्लक दाखवावी लागेल; त्याचप्रमाणे कंपन्यांच्या नफ्यावर जबरदस्त कर लादून खाजगी बचतीवर मर्यादा घालावी लागेल. यासंबंधींची चर्चा पाचव्या भागात केलेली आहे.

परंतु जोपर्यंत आपली अर्थव्यवस्था मिश्र स्वरूपाची आहे आणि विकासाच्या प्रमाणात जलदगतीने वाढ होत आहे तोपर्यंत विशेष करून वाटल्या न गेलेल्या नफ्याच्या स्वरूपातील खाजगी बचतीचे प्रमाण जास्त राहणे अपरिहार्य आहे. म्हणून श्रीमंत लोकांच्या संपत्तीत झालेल्या वाढीत प्रतिबिंबित होत असलेल्या मर्यादा घालून हे साधता येईल. त्यासाठी भांडवली नफ्यावर कर बसवावा लागेल.

किंवा भागभांडवलाची जास्त समानतेने विभागणी करावी लागेल अगर कामकरी वर्गाला बचत करून गुंतवणूक करण्यासाठी प्रोत्साहन द्यावे लागेल.

### ३. देणग्यांवरील आणि मृत्यूकरातील वाढ

विद्यमान संपत्तीचे फेरवाटप करण्याची नेहमीची पद्धत म्हणजे मृत्यू कर लादणे. हा कर सध्या विशेष जास्त नसतो हे खरे. मुळात अपेक्षा केली होती त्यामानाने संपत्तीच्या विभाजनाच्या स्वरूपावर या करामुळे फारसा परिणाम घडून आलेला नाही हेही खरे आहे. उपलब्ध आंकडेवारीवरून असे दिसते की, गेल्या चाळीस वर्षांत अगदी अल्पप्रमाणात प्रगती झालेली आहे. अगदी वरच्या श्रेणीतील वयात आलेल्या व्यक्तींपैकी फक्त एक टक्का लोकांजवळ खाजगी भांडवलापैकी ५० टक्के भांडवल आहे. १९३६–३८ साली हे प्रमाण ५५ टक्के होते, १९२४–३० च्या दरम्यान ६० टक्के, तर १९११–१३ मध्ये ७० टक्के होते. त्याचप्रमाणे अगदी वरच्या श्रेणीतील १० टक्के लोकांजवळ हल्ली ८० टक्के उत्पन्न आहे तर युद्धापूर्वी ते ८५ टक्के होते. इतक्या दीर्घ काळात झालेली इतकी मंद प्रगती समाधानकारक आहे असे खासच म्हणता येणार नाही. याला प्रतिबंध करणारी संचय करण्याची प्रवृत्ती वाढीस लागली असून करामुळे घडून येणारे परिणाम चुकविण्याच्या दृष्टीने ती पुरेशी प्रबळ ठरली आहे. या करामुळेही अन्याय्य विभाजन टाळण्याव्यतिरिक्त फारसे काही साध्य झालेले नाही.

डाल्टन आणि सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांनी अनुक्रमे १९४६ व १९४९ साली करांचे प्रमाण अधिक कडक केले हे खालील तक्त्यांवरून दिसून येईल.

**१९१९–१९४५ च्या दरम्यान मृत्यूकराचे प्रमाण**

( मृत्यूकर भरल्यानंतरची शिल्लक रक्कम. )

| प्राप्तीची किंमत | १९१९ | १९२९ | १९४० | १९४५ | १९४६ | १९४९ |
|---|---|---|---|---|---|---|
| पौं. १०,००० | ९,६०० | ९,६०० | ९,६०० | ९,६०० | ९,६०० | ९,६०० |
| ,, १००,००० | ९१,००० | ८१,००० | ७७,२०० | ७५,३०० | ७०,००० | ५५,००० |
| ,, ५००,००० | ४२०,००० | ३६५,००० | ३०८,००० | २९२,३०० | २२५,००० | १७५,००० |
| ,, १,०००,००० | ८१०,००० | ७१०,००० | ५४४,००० | ५०६,००० | ३५०,००० | २५०,००० |
| ,, २,०००,००० | १,६००,००० | १,३००,००० | ९२०,००० | ८९०,००० | ६००,००० | ४००,००० |

१९४६ व १९४९ साली झालेल्या वाढीचा एकत्रितपणे विचार केल्यास असे दिसून येईल की, तिचे प्रमाण खूप मोठे होते. कालांतराने ती वाढ आपला प्रभाव दाखविल्याशिवाय रहात नाही. परंतु वारसाकडे जाणाऱ्या रकमा अजूनही इतक्या मोठ्या आहेत की, येथे सर्वांना समान संधी उपलब्ध आहे आणि सर्वांच्या जीवनाची सुरुवात सारख्याच परिस्थितीत होते हा आपला दावा मूर्खपणाचा ठरावा. अजूनही लोकांना एक लाखाहून अधिक रक्कम वारसा हक्काने मिळू शकते आणि तेवढ्या रकमेतून पाच हजार पौंड किंवा त्याहूनही जास्त उत्पन्न कसलेही कष्ट न करता सहज मिळू शकते. त्याशिवाय भांडवलावरील नफा आणि मालमत्तेचा चाणाक्षपणे उपयोग करून मिळालेले जादा उत्पन्न या देशात कष्टार्जित उत्पन्नावर मोठाले कर बसविल्यानंतर खर्चाची जी पातळी होती त्याहूनही वरची पातळी सांभाळता येते.

कराचे प्रमाण वाढते ठेवल्याने परिस्थितीत हळूहळू सुधारणा होत जाईल अशी आशा बाळगणारांनी हे लक्षात ठेवावे की, या प्रयत्नांना मागे खेचणाऱ्या प्रबळ शक्तीही विद्यमान आहेत. अशा प्रयत्नांपैकी पहिली बाब म्हणजे हल्ली विशेषेकरून वाढत असलेला आपापसात देणग्या देण्याचा प्रकार. अगदी काही वर्षांपूर्वीपर्यंत अशी परिस्थिती होती की, वाढत्या करांची पातळी स्थिर झाली आहे हे करदात्यांच्या लक्षात आले नव्हते. तसेच मृत्यूपूर्वी निदान पाच वर्षे अगोदर केलेल्या देणगीपत्रावर कर बसत नाही ही पळवाट प्राप्तीकर सल्लागारांच्या लक्षात आलेली नव्हती. परंतु ती लक्षात आल्यापासून धनिक लोक आपल्या मृत्यूपूर्वीच मिळकतीची विभागणी दिवसेंदिवस जास्त प्रमाणावर करू लागले आहेत आणि भविष्य काळात तर हे प्रमाण अधिकच वाढण्याचा फार मोठा संभव आहे. पाच वर्षांच्या मुदतीच्या नियमामुळे या कराच्या 'उत्पन्नावर होणारा परिणाम आता स्पष्ट होत आहे पण यापुढे तो हळूहळू जास्त जाणवू लागेल.

शिवाय वाढती रोजगारी, आणि विकासाची जलद गती यामुळे पूर्वीपेक्षा भांडवलाच्या किंमतीत सरासरी वार्षिक वाढ खूपच जास्त झाली आहे. आणि परिस्थिती आणखी बिघडू न देण्यासाठीच मृत्यूकराचे प्रमाण वाढविणे जरूरीचे ठरणार आहे. प्रत्यक्ष खाजगी भांडवलात प्रतिवर्षी काही ना काही वाढ होणार हे निश्चित. दीर्घ मुदतीच्या काळात ही वाढ प्रतिवर्षी कमीत कमी ६०० ते १००० दशलक्ष पौंड इतकी होईल असा अंदाज आहे. सध्या मृत्यूकरापासून सुमारे १६० दशलक्ष पौंड उत्पन्न मिळते. प्रतिवर्षी प्रत्यक्ष वाढणाऱ्या भांडवलाशी तुलना करता हे प्रमाण योग्य आहे असेच म्हणावे लागेल. आणि मृत्यूकराचे व तो चुक-विण्याचे प्रमाण सारखेच राहिले तर भांडवलाच्या किंमतवाढीबरोबर करापासून मिळणाऱ्या उत्पन्नाचे प्रमाणही वाढेल. तरीदेखील परिस्थिती अधिक बिघडू न देण्याच्या दृष्टीने ते पुरे पडणार नाही.

कर चुकविण्याची वाढती प्रवृत्ती आणि त्याच्या जोडीला भांडवलाच्या किमतीत होत असलेली वाढ यांना टक्कर देण्याच्या बाबतीत कराचे वाढते प्रमाण पुरे पडत नाही हे खालील आकडेवारीवरून दिसून येईल : भांडवल गुंतवणुकीतून सालीना १२,००० पौंडाहून अधिक उत्पन्न मिळविणाऱ्या सरचार्ज भरणारांच्या संख्येत १९४९-१९५३ च्या दरम्याच्या चारही वर्षांत भर पडत गेली आहे. भाग भांडवलावरील नफ्यामुळे आणि सहाजिकच त्यामुळे होणाऱ्या भांडवलाच्या किमतीतील वाढीमुळे ही संख्या वाढली. मृत्यूकरापासून मिळणाऱ्या उत्पन्नातही त्या प्रमाणात वाढ व्हावयास हवी. परंतु तशी ती झालेली दिसत नाही. कराच्या दरात वाढ करूनही त्यापासून येणारे उत्पन्न पैशाच्या स्वरूपात देखील हळूहळू वाढताना दिसत नाही. उलट प्रत्यक्षात ती आणखीच कमी झालेली दिसते. १९५३-५४ साली त्या आधीच्या वर्षाच्यामानाने ती वाढ अगदीच अत्यल्प होती तर १९५०-५१ पेक्षा ती आणखीनच कमी होती. सधन वर्गातील वृद्ध मृत्यूपूर्वीच आपल्या संपत्तीचे वाटप करून टाकण्याची हुषारी करू लागले आहेत हे बहुधा याचे कारण असावे.

यामुळेच यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर सरकारला देणगीवरील कर चुकविण्याच्या प्रवृत्तीस आळा घालावा लागेल. ते केले नाही तर मृत्युकराचे नुसते दर वाढवून काहीही उपयोग होणार नाही. कारण त्याने कर चुकविण्याचे प्रकार आणखीनच वाढतील. आणि आपापसातील देणग्यांचा तर इतका सुळसुळाट होईल की, मृत्यूकर हा एक थट्टेचा विषय होऊन बसेल आणि करवाढीच्या मूळ उद्दिष्टाला संपूर्ण हरताळ फासला जाईल. म्हणून वारसाकर ज्या स्वरूपात आणि ज्या दराने आकारला जाणार असेल त्याच दराने हयातीतील देणग्यांवरही आकारण्यात आला पाहिजे; अमेरिकेत आणि इतर अनेक देशांत देणगीवर कर आहे. उदाहरणार्थ स्वीडनमध्ये दहा वर्षाच्या कालावधीत आपल्या वारसांना दिलेल्या देणग्या, संपत्ती करावर जी सूट मिळते त्या मर्यादेपेक्षा जास्त असतील तर अशा देणग्यांवर संपत्तीकराच्या दराप्रमाणेच कर आकारला जातो. त्याशिवाय ज्याला देणगी मिळते त्यालाही वरील दराने कर आकारला जातो. त्याशिवाय ज्याला देणगी मिळते त्यालाही वरील दराने कर भरावा लागतोच व हा दर देणगी देणारा व घेणारा यांच्यातील रक्ताच्या नातेसंबंधावर अवलंबून असतो. या मागील उद्देश मृत्यूकर चुकविण्याच्या प्रवृत्तीला पायबंद घालावा हाच आहे आणि त्यामुळे स्वीडनमधील संपत्तीकर व वारसाकर यांची एकमेकात अगदी सरमिसळ होऊन गेली आहे. सध्याची करआकारणी परिणामकारक होण्यासाठी करआकारणीची अशाच प्रकारची पद्धत ब्रिटनमध्येही तातडीने अंमलात आणली गेली पाहिजे.

कोणी कर चुकवला नाही तर सध्याच्या मृत्यूकरानुसार सरकारला काही उत्पन्न मिळू शकते तसेच सर्वांना रोजगार उपलब्ध झाल्यामुळे खाजगी भांडवलाची प्रत्यक्ष किंमतही वाढण्याचा संभव असतो. म्हणूनच सध्या अस्तित्वात असलेल्या कर

आकारणीच्या दरात नाममात्र वाढ करणे समर्थनीय ठरते. याचे मुख्य कारण असे की, करांच्या इतर प्रकारांपेक्षा मृत्यूकरात विशेष फायदे आहेत. राजकीय दृष्टीने पाहिले तर ते सगळ्यात कमी वादग्रस्त ठरतात. आता सर्वांना सारखी संधी मिळावी आणि व्यक्तिगत श्रमानुसार त्या सर्वांना सारखा मोबदला मिळावा या तत्त्वानुसार नैतिक दृष्टयाही फार मोठी संपत्ती वारसा हक्काने मिळण्यास असलेला विरोध मोठया प्रमाणात मान्य होत आहे. तसेच मृत्यूकराच्या कक्षेत येणाऱ्यांची संख्याही अगदी थोडी असते.

एकेकाळी सर्वमान्य असलेला विचार म्हणजे 'उत्पन्नावरील कर वाजवी असला तरी तो संपत्तीवर असणे वाजवी नाही. कारण त्यात माणसाच्या आपल्या-जवळील वस्तूंची वाटेल तशी विल्हेवाट लावण्याचा नैसर्गिक हक्क हिरावून घेतला जातो' पण आता हा विचार क्वचितच मान्य केला जातो. उत्पन्न किंवा नफा आणि संपत्ती यामधील फरक नेहमीच फार सूक्ष्म असे. आणि 'मृत्यूकराचा जनक समजला जाणारा सर विल्यम हारकोर्ट याने १९४८ सालच्या आपल्या अर्थसंकल्पा-वरील सुप्रसिद्ध भाषणांत त्या करावरील आक्षेप एकदाच आणि कायमचा खोडून काढला आहे.

विधवा स्त्रिया व मुले यांचा मयताच्या मालमत्तेवरील नैसर्गिक हक्क डाव-लला जातो या सबबीवर मृत्यूकरावर हल्ला चढवणे ही एका काळी पद्धतच पडून गेली होती. परंतु ही विचारसरणी मान्य केली तर त्यामुळे ब्रिटिश वारसा-हक्कांच्या कायद्यानुसार विधवा स्त्रिया व मुले यांना मृत्यूपत्रान्वये एक पै देखील मिळू शकणार नाही. आणि म्हणून त्या कायद्यातच अजिबात बदल करावा लागेल. पण ते काहीही असले तरी या विचारसरणीला आता फार करून कोणाचा पाठिंबा राहिलेला नाही. गरीब विधवांचे पती साधारणपणे गरीब स्थितीतीलच असतात तर सधन इसमांच्या विधवांजवळ स्वतःची अशी थोडी फार तरी संपत्ती सर्वसाधारण-पणे असतेच. ज्या 'मुलांना' वारसा हक्काने संपत्ती प्राप्त होते त्यांचे वय सरा-सरीने चाळीसच्या घरात असते. म्हणजे त्या सुमारास महागडया शिक्षणाचा फायदा त्यांना मिळून गेलेलाच असतो. इतकेच नव्हे तर स्वतःचे संरक्षण करण्याची आणि चरितार्थ चालविण्याची कुवतही त्यांच्यात आलेली असते. शिवाय विधवा व अज्ञान मुले यांच्यासाठी योग्य ती शिल्लक टाकण्याचा उपक्रम वाजवी असला तरी एका मर्यादेपर्यंतच त्याचे समर्थन करता येईल. संपत्ती धारकांच्या वरच्या गटातील लोकांवर कितीही भारी मृत्यूकर बसवला तरीही मर्यादित रक्कम शिल्लक टाकणे त्यांना सहज शक्य होईल. अर्थात लाखो पौंडाची मालमत्ता मात्र या करामुळे त्यांना मागे ठेवता येणार नाही.

आर्थिक परिणामाच्या दृष्टीने विचार करता मृत्यूकराचा सर्वात मोठा फायदा हा की, काम किंवा कष्ट न करण्यास त्यामुळे कोणत्याही तऱ्हेने प्रोत्साहन

मिळू शकत नाही. मृत्यूनंतर खूप संपत्ती मागे ठेवण्यापेक्षा आपल्या हयातीतच मुलांना त्यांच्या संसाराची सुरुवात चांगल्या तऱ्हेने करता येईल अशी परिस्थिती निर्माण करणे हे त्यांना कष्ट करण्यास प्रवृत्त करण्याच्या अनेक (आर्थिक आणि बिन-आर्थिक) प्रकारच्या प्रोत्साहनांपैकी एक असू शकते. अर्थात तेच सर्वात महत्त्वाचे असते असे म्हणता येणार नाही. आपल्या मृत्यूनंतर आपल्या संपत्तीचा बराचसा भाग सरकारच खाऊन बसेल आणि वयात आलेल्या आपल्या मुलाबाळांना फार थोडी संपत्ती शिल्लक राहील व त्यामुळे उद्योगी आणि महत्त्वाकांक्षी व्यक्तींपैकी बरेच जण कोणतेच धाडस किंवा परिश्रम करण्यास तयार होणार नाहीत असे मानण्यास जागा नाही. सगळ्याच प्रत्यक्ष करामुळे माणसाच्या काम करण्याच्या इच्छेवर प्रतिकूल परिणाम घडून येत असतो. मृत्यूकर हा असा एकच कर आहे की, ज्यामुळे हा परिणाम घडून येणार नाही.

हे खरे की, यामुळे बचतीवर जास्त गंभीर परिणाम घडून येतील अशी अपेक्षा केली जाईल. जीवनात यशस्वी ठरणारी माणसे मृत्यूनंतर आपली मालमत्ता दुसऱ्यास देता येईल. या इच्छेव्यतिरिक्त इतर अनेक हेतू मनात बाळगून असतात हे खरे असले तरीसुद्धा मृत्यूकराचे दर वाढविल्यास ते कमी शिल्लक टाकतील असा मुद्दा मांडला जाणे फार संभवनीय आहे. महत्त्वाकांक्षा, स्पर्धा, सत्ता आणि मानसन्मान, त्याचप्रमाणे प्रचलित असलेले उच्च दर्जाचे राहणीमान उपभोगावयास मिळावे ही इच्छा यासारख्या बचत करण्यास आवश्यक ठरणाऱ्या गरजांपेक्षा आपल्या कुटुंबियांसाठी पैसे मागे ठेवण्याची इच्छा तुलनेने अधिक तीव्र असते. आपल्या संपत्तीपैकी ८० टक्के रक्कम कुटुंबियांकडे न जाता सरकारकडे जाणार आहे हे सरळ सरळ दिसत असताना श्रीमंत मनुष्य स्वतःची संपत्ती वाढविण्याच्या भरीस न पडता तो ती संपत्ती प्रचलित ऐषारामात खर्च करून टाकणेच अधिक पसंत करील.

तथापी हा मुद्दा अतिशयोक्ती करूनही मांडता येईल. प्रा. पिगौ म्हणतो की, ‘संपत्तीचा संचय करून ठेवण्याची इच्छा साधी नसते. निरनिराळ्या माणसांच्या निरनिराळ्या प्रवृत्तींच्या मिश्रणाने ती तयार होते. एखाद्या कणखर माणसात, एखादा मोठा उद्योग हाताशी असल्यामुळे जी एक मोठी शक्ती वापरण्याची हिंमत येत असते, तशी हिंमत बाळगण्याची ईर्षा ही एक प्रवृत्ती होय. दुसरी प्रवृत्ती म्हणजे संपत्तीमुळे मिळणारी समाजात अधिकार प्राप्त करून घेण्याची आकांक्षा आणि समाजांत नावलौकिक किंवा दुर्लौकिक मिळविण्याची हाव, आयुष्याच्या शेवटी शेवटी श्रम न करता भरपूर उत्पन्न मिळत रहावे ही इच्छा किंवा मरणोत्तर श्रीमंत माणूस अशी प्रसिद्धी मिळावी अगर केवळ निष्क्रीयता या अशा प्रकारच्या इतर प्रवृत्ती होत. . वर उल्लेखिलेल्या या नाना प्रकारच्या प्रवृत्तींमुळेच माणूस शिल्लक टाकीत असला तरी त्या माणसाच्या हयातीतच फक्त त्या प्रस्तुत ठरतात. त्याच्या

मृत्यूनंतर त्याची संपत्ती नाश पावत नाही हे सत्य हा त्या प्रवृत्तींच्या संदर्भात केवळ योगायोगाचाच भाग असतो.'

संपत्तीचा संचय करण्याची जी विविध कारणे संभवतात त्यास थोडेफार तरी महत्त्व द्यावयासच हवे. शिवाय मृत्यूपूर्वी संपत्तीचे विभाजन करून टाकण्याची वाढती प्रवृत्ती दिसून येत असली तरी ती कुटुंबियांमधील बचत करण्याची प्रवृत्ती प्रोत्साहित करीत असते हा एक विरोधाभासच म्हटला पाहिजे. मृत्यूकरात जर फार मोठी आणि लक्षांत येण्यासारखी वाढ झाली तर त्याचा परिणाम बचत करणे आणि न करणे या दोन्हीही प्रवृत्तींवर घडून येणे अपरिहार्य आहे. सर्वांना रोजगार आणि चलनवाढ यामधील सीमारेषा जेव्हा अगदी अस्पष्ट असते त्यावेळी करांमुळे होणारा थोडा परिणामही गंभीर स्वरूप धारण करण्याची शक्यता असते. तरीही चलनवाढ करण्याची धमकी देऊन सरकारला पेचांत आणण्याचा प्रयत्न संपत्तीधारक करतील म्हणून सरकारने त्यास मोकळे सोडता कामा नये. आणि जेणे करून आपली परिस्थिती हास्यास्पद ठरेल असे कोणतेही धोरण आखता कामा नये. म्हणून संपत्तीवरील वाढत्या कराच्या बाबतीत आपले पाऊल पुढेच पडत राहिले पाहिजे. पण त्याचबरोबर त्याचा उपसिद्धांत म्हणून भांडवलामधून खर्च करण्याच्या प्रवृत्तीस प्रतिबंध करण्याची आणि बचतीस उत्तेजन देण्याची जरुरीही मान्य केली पाहिजे.

हा कर किती वाढवावा ? समाजवादी तत्त्वाप्रमाणे वारसाहक्काने कायदेशीर रित्या जेवढी संपत्ती मिळणे शक्य आहे त्यावर तो सर्वात जास्त प्रमाणांत बसवावा. परंतु हे प्रमाण नक्की किती असावे ते मात्र निश्चित ठरविता येणार नाही. एखादा हुशार व यशस्वी धंदेवाला आपल्या हयातीत संपत्ती साठविण्याची जी वाजवी अपेक्षा करील तेवढ्या संपत्तीपर्यंत, किंबहुना त्याहून थोड्या जास्त मर्यादेपर्यंतही कर आकारता येईल. ५०,००० पौंड ही मर्यादा ठरवून २५००० ते ५०००० पौंडापर्यंतच्या संपत्तीवरील कराचे प्रमाण वाढते ठेवता येईल. अर्थात अशा तऱ्हेचे उद्दिष्ट अर्थविषयक निर्णयाच्या फटकाऱ्यासरशी साध्य होऊ शकणार नाही, आणि तसा प्रयत्नही केला जाऊ नये. परंतु यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर सरकारने वरील टप्पा गाठण्यासाठी निश्चितपणे पाऊल उचलले पाहिजे. मात्र हा पल्ला फार दूरवरचा असला पाहिजे.

वरील आकडेवारी मान्य केली तर करपात्र संपत्तीच्या फक्त पंधरा टक्के किंवा सरासरी ५००० कुटुंबियांवर त्याचा परिणाम होईल; म्हणजेच वडलोपार्जित मिळकतीमुळे श्रीमंत असणारांचा एक लहानसा वर्गच त्यांत मोडेल. अतिशय कष्ट करणारे व्यावसायिक किंवा पगारदार यांना त्यामुळे कसलाही धक्का बसणार नाही. आणि त्यांना स्वतःच्या कष्टाने बचत करूनच आपल्यावर अवलंबून असणारांची वाजवी परंतु त्यांना सहाय्यभूत होईल इतपत—अगदी भरपूर प्रमाणांत—सोय करून ठेवण्यांत कसलाच प्रत्यवाय येणार नाही. कोणतीही विधवा स्त्री एकदम दरिद्री

होणार नाही आणि वारसाहक्काने मिळणाऱ्या संपत्तीचे प्रमाण भरपूर असेल—उदा. मध्यम वर्गीय विवाहित तरुणास घर विकत घेता येईल आणि त्या दोघांना मिळून अगदी आरामांत आपल्या आयुष्याची सुरुवात करता येईल. त्याचबरोबर कोणाही एका व्यक्तीला, कसलाही कामधंदा न करता उत्पन्नावर किंवा नुसत्या व्याजावर दीर्घकालपर्यंत सुखासीन जीवन जगण्याइतकी दौलत वारसाहक्काने त्याच्याकडे जाऊ दिली जाणार नाही.

समाजवाद काटकसर किंवा बचत यांच्या विरुद्ध आहे किंवा कौटुंबिक जीवनाचे सातत्य किंवा मध्यमवर्गीय राहणीमान त्याला मानवत नाही अशी समजूत करून घेतलेल्या टीकाकारांना वरील विचारसरणीमुळे चोख उत्तर मिळू शकेल. कारण समाजवादात असे काहीच अभिप्रेत नाही. समाजवादाचे उद्दिष्ट संपत्तीच्या मालकीचे असमान विभाजन टाळणे हे आहे. सर्वांना अगदी खालच्या पातळीवर नेऊन बसवणे हे नाही.

## ४. मृत्यूकरांतही सुधारणा करण्याची आवश्यकता

तेव्हा समाजवादाचे व्यापक उद्दिष्ट हे असे असले पाहिजे. परंतु सध्याच्या संपत्तीकरात नुसती वाढ करणे हा ते उद्दिष्ट गाठण्याचा सर्वोत्तम मार्ग ठरेल असे निश्चितपणे सांगता येणार नाही. संपत्तीवरील कर हा एकूण संपत्ती असेल त्या प्रमाणात आकारावयाचा असतो. पण वारसाहक्काने मिळणाऱ्या संपत्तीवर भरावयाच्या कराचा हा सगळ्यात सोपा प्रकार असला तरी तो एकमेव प्रकार नव्हे; त्या व्यतिरिक्त कर आकारणीचे आणखीही दोन प्रकार आहेत. संपत्ती ज्याला मिळावयाची त्याचे ती ज्याच्याकडून मिळावयाची त्याच्याशी जवळचे किंवा लांबचे असे जे नाते असेल त्या मानाने कराचा दर ठरविणे (उदा. वारसा हक्काने मिळावयाच्या संपत्तीवरील १९४९ साली रद्द करण्यात आलेला कर किंवा स्वीडनमधील वारसा कर) अथवा व्यक्तीला मिळालेल्या संपत्तीच्या आकारमानानुसार (वैयक्तिक देणगीवर किंवा निरनिराळ्या मार्गांनी मिळालेल्या एकूण देणग्यांवर) कर आकारणे.

संपत्तीवरील करापेक्षा वारसा करामुळे बचतीच्या मार्गात कमी अडथळे येतात. कारण अगदी जवळच्या आप्तांना मृत्यूनंतर मिळालेल्या संपत्तीवरील कर-आकारणी अगदीच कमी असते. पण याच्याउलट समानतेच्या दृष्टीने पाहिले तर ती फारशी परिणामकारक नसते. कारण सगळ्यात मोठ्या रकमा जवळच्या नातेवाईकांना मिळत असतात व त्यावर कर कमी असतो.

मिळकतीच्या प्रमाणात कर आकारला जावा हे तत्त्वच जास्त संयुक्तिक वाटते. सामाजिक न्यायाच्या दृष्टीने एकूण संपत्ती किती आहे यापेक्षा ती कोणाला किती प्रमाणात मिळाली हे जास्त महत्त्वाचे आहे. परंतु संपत्तीकराची आकारणी

करतांना ह्या संपत्तीची विल्हेवाट कशी झाली आहे याची अजिबात दखल घेतली जात नाही. संपत्तीच्या आकाराकडेच फक्त लक्ष पुरवले जाते. समाजवादाच्या दृष्टीने हे अजिबात तर्कशुद्ध नाही. मोठी मालमत्ता जशीच्या तशी एकाच व्यक्तीच्या हाती जाते, तिचे बारीक बारीक हिस्से पडून ते निरनिराळ्या व्यक्तींकडे जातात की, धर्मादाय कार्यासाठी (चर्चची देखभाल करण्यासाठी काढून ठेवण्यात आलेल्या देणग्यांवर अद्याप कर द्यावा लागतो.) तिचा विनियोग होतो याबद्दल आपण उदासीन असता कामा नये. उलट पहिल्या प्रकारच्या संपत्तीच्या विभागणीस आपण कसून विरोध केला पाहिजे. दुसऱ्या प्रकारास त्यापेक्षा कमी आणि तिसऱ्या प्रकारास तर मुळीच विरोध होता कामा नये. सहाजिकच पहिल्या प्रकारच्या विभाजनावर दुसऱ्या प्रकारच्या विभाजनापेक्षा जास्त दराने कर आकारला जावा आणि दुसऱ्या प्रकारावर तिसऱ्या प्रकारच्या विभागणीपेक्षा जास्त दर आकारला जावा हे क्रमप्राप्त ठरते. संपत्तीकराच्या बाबतीत अशी आकारणी शक्य होणार नाही. परंतु मृत्यूनंतर दुसऱ्या व्यक्तीकडे आलेल्या संपत्तीवर आकारमानानुसार वाढत्या प्रमाणातील कराची आकारणी केली तर आपला हेतू बऱ्याच मोठ्या प्रमाणात साध्य होऊ शकेल. अशा तऱ्हेने कराची आकारणी झाली तर आपले मुख्य उद्दिष्ट (मृत्यूपत्र करणाराने मोठाल्या रकमा देऊन टाकण्यापेक्षाही एकाच नियुक्त वारसाकडे फार मोठी अकष्टार्जित मालमत्ता जाण्यास प्रतिबंध करणे) बिनचूकपणे तडीस जाईल इतकेच नव्हे तर मोठ्या मालमत्तेचे लहान लहान हिस्से पडून त्यायोगे कराच्या उत्पन्नापेक्षाही आपोआपच मालमत्तेचे मोठ्या प्रमाणावर विभाजन होण्यास त्यामुळे चालना मिळेल.

एकूण मालमत्तेवर कर आकारण्यापेक्षा इतर मार्गाने हा कर आकारला गेला तर त्यात अंमलबजावणीबाबत अडचणी उत्पन्न होतील हे खरे. मृत्यूपत्रातील तरतुदींशी कर आकारणी करणाऱ्या अधिकाऱ्यास कसलेही कर्तव्य नसल्यामुळे संपत्तीवरील कर म्हणजे एक सुसंधीच वाटत असते. परंतु एकदा मृत्यूपत्रातील तरतुदींचा विचार करावयाचा म्हटले की, गुंतागुंत निर्माण होते. उदाहरणार्थ एखाद्यावेळी मालमत्तेचा ट्रस्ट करण्यात आलेला असतो आणि त्याच्या उत्पन्नाचा विनियोग ठराविक कालावधीनंतर निरनिराळ्या प्रकारे करावयाचा असतो. त्यामुळे कर आकारणीची प्रत्यक्ष वेळ येईपर्यंत बराच अवधी उलटून गेलेला असतो आणि मग त्यावेळी हक्कदारांना सहजासहजी हुडकून काढता येतेच असे नाही. तरीदेखील आंतरदेशीय महसूल खात्याने (Inland Revenue) कोलविन कमेटीस असे कळविले होते की, अशा प्रकारची कर आकारणी अंमलबजावणीच्या दृष्टीने अशक्य नाही. ज्या प्रमाणात मृत्यूपत्रान्वये संपत्ती मिळाली असेल त्या प्रमाणात चढत्या श्रेणीने कराचे प्रमाण ठरविणे निश्चितच समर्थनीय ठरेल. अर्थात एकूण मालमत्तेपेक्षा देणग्यांवर कमाल कर आकारणी करणे हे केव्हाही अधिक संयुक्तिक ठरेल.

ही सर्व पर्यायी तत्त्वे एकत्रित करण्याची कल्पक पद्धती म्हणजे रिग्नॅनो योजना (रिगनॅनो नावाच्या विख्यात इटालियन अर्थशास्त्रज्ञाच्या नावावरून ओळखली जाणारी योजना). या योजनेवर समाजवादी व अर्थशास्त्रीय साहित्यात एकाकाळी बरीच चर्चा घडून आली होती. त्याची मूळ सूचना अशी होती की, संपत्ती पहिल्यांदा वारसाकडे जाते त्याला एक दर असावा, दुसऱ्यांदा तिचे हस्तांतर होईल त्यावेळेस त्या दरात वाढ करण्यात यावी व तीच संपत्ती पुन्हा तिसऱ्या वारसाकडे जाईल त्यावेळी तो कर १०० टक्के असावा.

या सूचनेत प्रशंसनीय भाग पुष्कळच आहे. त्यामुळे संपत्ती तिसऱ्या खेपेस वारसाकडे जाण्याची वेळ येईल त्यावेळी ती सरकारजमाच होईल. तसेच या सूचनेमुळे वारसाहक्काने आलेल्या मिळकतीपेक्षा बचत करून साठवलेल्या मिळकतीवर कर कमी आकारला जाईल व जवळच्या नातेवाईकांना मिळालेल्या संपत्तीवर लांबच्या नातेवाइकांना मिळालेल्या संपत्तीपेक्षा कमी कर द्यावा लागेल. ही दोन्ही वैशिष्टये आधिकाधिक बचत करण्याच्या दृष्टीने प्रोत्साहक ठरतील. परंतु त्यात गंभीर व्यावहारिक अडचणी निर्माण होण्याचा संभव आहे. कालानुसार करात वाढ होण्याची जी प्रवृत्ती या योजनेत अनुस्यूत आहे त्यामुळेच अशा अडचणी निर्माण होतात. विरोधाचे दुसरे मुख्य कारण म्हणजे दुसऱ्या खेपेस संपत्तीचे विभाजन होण्याच्या वेळेस कर चुकविला जाण्याची शक्यता असते. समजा एखाद्या वारसाने त्याला वारसाहक्काने मिळालेली संपत्ती उधळून टाकली तर त्याच्या मृत्यूनंतर, त्याची स्वतःची संपत्ती, कालांतराने त्यावर भरावा लागणारा कर भरण्यासाठी पुरी पडणार नाही. खरोखरी एखादा सत्प्रवृत्त वारससुद्धा त्याला मिळालेल्या संपत्तीची घसरत चाललेली किंमत रोखून धरण्यास असमर्थ ठरेल (मंदी किंवा व्याजाच्या दरात एकदम वाढ झाल्याने). किंमत घसरू लागते त्यावेळी, एक तर कालांतराने त्यास भरावे लागणारे कर तो चुकते करू शकणार नाही किंवा त्याला ते आपल्या साठवलेल्या मिळकीतून द्यावे लागतील. आणि हे अर्थातच अगदी गैरवाजवी आणि अशा प्रकारच्या कर आकारण्याच्या उद्दिष्टांवर बोळा फिरवण्यासारखे होईल.

हे सर्व आक्षेप दूर करण्यासाठी, अनेकदा निरनिराळ्या दुरुस्त्या सुचविण्यात आल्या आहेत. त्यातील सर्वांत संयुक्तिक सूचना म्हणजे डाल्टन यांनी प्रथम केलेली सूचना. या सूचनेप्रमाणे दोन प्रकारच्या संपत्तीवर अगदी भिन्न भिन्न असे वेगवेगळे कर बसवावेत. प्रथम एकूण संपत्तीवर नेहमीच्या पद्धतीप्रमाणे संपत्तीकर आकारावयाचा व त्याला पूरक असा वडलोपार्जित संपत्तीवर व्यक्तीच्या वाट्यास आलेल्या संपत्तीच्या प्रमाणात पुन्हा दुसरा कर बसवावयाचा. हा पूरक कर ज्यावेळी संपत्ती प्रथमच वारसदारास मिळते तेव्हा रिगनॅनोच्या योजनेप्रमाणे वारसदाराच्या निधनानंतर आकारण्यात येतो तर डाल्टनच्या योजनेप्रमाणे संपत्ती मिळाल्याबरोबर या कराचा भरणा करावा लागतो व त्यावरील व्याज वारसदाराच्या

हयातीत त्यास दिले जाते. वारसदाराने देणे असलेल्या कराची रक्कम रोखीने, जमिनीच्या किंवा कर्जरोख्याच्या रूपात भरली तर त्याच्या बदल्यात त्याला तितकेच उत्पन्न येईल असे मुदतबंद वर्षासन देता येईल.

त्यामुळे कर चुकवण्यातील अंतिम धोका संपूर्णपणे टळू शकेल, आणि ज्यामुळेएरवी करात वाढ झाली असती अशा बचत न करण्याच्या प्रवृत्ती रोखण्यासाठी त्याचा खूपच उपयोग होऊ शकेल. तसेच त्यामुळे बचत करण्यासाठी द्यावयाचे प्रत्यक्ष प्रोत्साहन रिग्नॅनोच्या शिफारसीप्रमाणे चालू ठेवता येईल. कारण बचत करून साठवलेल्या संपत्तीचा उपभोग त्या परिस्थितीतही विधवा स्त्रिया व मुले यांना घेता येईल. याच्या उलट वारसाहक्काने आलेली संपत्ती मृत्यूनंतर नाहीशीच झाली असती. देणगीच्या रूपाने मिळालेल्या संपत्तीच्या प्रमाणात करात वाढ करण्याचे तत्त्व यात अवलंबिले जाते, आणि वारसाहक्काने मिळावयाच्या वैयक्तिक मिळकतीवर कमाल मर्यादा घालणे सुकर होते.

म्हणून वरील सूचनांबरहुकूम मृत्यूकरविषयक कायद्यात सुधारणा घडवून आणण्यास सबळ कारणे आहेत. समाजवादी आणि इतर अर्थशास्त्रज्ञ यांच्याकडून कित्येक वर्षांपासून याला सतत पाठिंबा मिळत आलेला आहे. डाल्टन अर्थमंत्री असताना त्याने ही सूचना मागे टाकली याचे कारण इतकेच की, ' इतर अनेक महत्त्वाच्या बाबी हाताळावयाच्या असल्यामुळे जरा स्थिरस्थावर झाल्यावर करावयाच्या चांगल्या गोष्टींची जी यादी मी बनविली आहे त्यात याचा समावेश करून ठेवला आहे. त्यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर पक्षाच्या अर्थमंत्र्याने या यादीची दखल घेणे इष्ट ठरेल. '

पण यात सुधारणा घडून आल्या किंवा न आल्या तरी एकदा अगदी वरच्या पातळीवर हा कर बसवला गेला की, त्याचा भरणा कसा होईल हा प्रश्न निर्माण होईलच. मोठ्या मालमत्तेच्या वारसदारांना जवळ जवळ सर्व संपत्ती विकून टाकणे सोयीचे जाणार नाही आणि बाजारातील परिस्थिती अशा व्यवहारास अनुकूल असली तरीदेखील सामाजिकदृष्ट्या ते योग्य ठरणार नाही. इतर ठिकाणांप्रमाणे येथेही जास्त समानतेची दुसरी बाजू म्हणजे श्रीमंतांकडूत केल्या जाणाऱ्या खर्चामुळे इतरांना मिळणाऱ्या फायद्याचा ओघ संपुष्टात येत असेल तर त्याची जबाबदारी सरकारवर जास्त आहे. उदाहरणादाखल मोठमोठ्या इतिहासप्रसिद्ध प्रासादांकडे बोट दाखवता येईल. अशा इमारतींची नीट निगा राखली जावी असे जनतेला वाटते कारण त्यांची कमालीची पडझड चाललेली असते आणि ती जनतेला पहावत नाही. मृत्यूकराचे प्रमाण वाढविले तर त्यांची स्थिती आणखीनच शोचनीय होत जाणार हे उघड आहे. ज्याच्याकडे ती इमारत आली असेल त्याला ती वास्तु आणि तिच्यातील बहुतेक सारी चीज–वस्तू विकून टाकल्याशिवाय कर भरता येणे शक्य नसेल तर त्या वास्तूचे पुढे काय होणार हा विचारसुद्धा मन

बेचैन करणारा आहे. कित्येक गैरवाजवी आणि विध्वंसक प्रकार होण्याचा संभव असतो. त्याला आळा घातला गेलाच पाहिजे. अशावेळी सरकारने कराची रक्कम रोख पैशाऐवजी वस्तूच्या स्वरूपात स्वीकारण्याचे मान्य करून अशा वास्तूंची देखभाल करण्याची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेतली पाहिजे. त्यासाठी सरकारला अशा वास्तू एखाद्या राष्ट्रीय विश्वस्त निधीच्या हवाली करून त्यांना अनुदानाच्या रूपाने खर्चासाठी जरूर ती रक्कम उपलब्ध करून देता येईल.

जमिनीच्याबाबतीत कराची रक्कम वस्तूच्या स्वरूपात स्वीकारण्याचे तत्त्व डाल्टनने सुरू केले. आणि त्यामुळे मोठमोठ्या जमिनी सरकारकडे आल्याही होत्या. आता हे तत्त्व स्थावर मालमत्तेला व बाजारात देवघेव होणाऱ्या कर्जरोख्यांनाही लागू करण्यात यावे. जमीन व अशाप्रकारची स्थावर मालमत्ता यांच्याबाबतीतील ही नवी जबाबदारी कार्यक्षमतेने पार पाडू शकतील अशा सरकारी आणि निमसरकारी संस्था आजही अस्तित्वात आहेत. कर्जरोख्यांच्या बाबतीत मात्र अशा प्रकारच्या नव्या संस्था उभाराव्या लागतील. आणि ही बाब फार आकर्षक ठरेल. सर्व उद्योगधंद्यांचे संपूर्ण राष्ट्रीयकरण करणे निश्चितपणे दोषास्पद आहे हे आता सर्वमान्य झालेले आहे. तरीसुद्धा समाजवादी लोकांना असे वाटते की, स्थावर मालमत्तेवरील उत्पन्न आणि भांडवलावरील उत्पन्न संपत्ती धारकांच्या लहानशा वर्गाकडे जाण्याऐवजी ते समाजाकडे जावे. मृत्यूकराचा भरणा वस्तूच्या रूपात केला गेल्यास संपत्ती हळूहळू आणि क्रमशः सरकारी मालकीची होईल आणि मग हा पेच सुटेल.

राष्ट्रीय कर्जासाठी जसे आयुक्त असतात तसेच पण निराळे अधिकार असलेले 'मृत्यूकर आयुक्त' सरकारला यासाठी नेमावे लागतील. पहिल्या प्रकारच्या आयुक्तांचे काम सरकारच्या चलनविषयक धोरणाचा पाठपुरावा करून त्या अनुषंगाने सोन्याचे तारण असलेले कर्जरोखे व नाणेबाजार यांचे व्यवहार चालविणे हे राहील तर 'मृत्यूकर आयुक्ताचे' काम पैसे गुंतवून जास्तीत जास्त उत्पन्न मिळविणाऱ्या विश्वस्तांचे राहील. याठिकाणी करापासून येणारे एकूण उत्पन्न हे भांडवल समजले जाईल आणि त्यात रोखीने किंवा वस्तूंच्या रूपाने भरलेल्या करांचा समावेश होईल. अर्थशास्त्रीय विचारसरणीप्रमाणे मृत्यूकर हे नेहमीचे सर्वसाधारण उत्पन्न न समजता त्यास भांडवली वाढ असे समजावे. त्यासाठी अंदाजपत्रकाच्या खातेवारीत बदल करणे ज्याप्रमाणे आवश्यक होईल त्याप्रमाणेच ते सहज शक्यही होईल. नाही तरी अर्थशास्त्राच्या विचारसरणीप्रमाणे ते आवश्यकच असते. मृत्यूकर हे नेहमीचे परंतु 'सरासरीपेक्षा जास्त' उत्पन्न न समजता त्यास भांडवली उत्पन्न समजावे हे त्या विचारसरणीचे सूत्र असते.

याच्याच अनुषंगाने आणखीही एक फायदा होण्यासारखा आहे. बऱ्याच लोकांना अशी भीती वाटते की, समानतेत अधिकाधिक वाढ होत गेली तर ज्यात

धोका पत्करावा लागतो अशा भांडवलाची उभारणी करण्यास अडचण पडेल आणि अशा विशिष्ट धंद्यासाठी नेहमीच्या ठिकाणाहून भांडवल मिळणे कठीण जाईल. यासंबंधीची चर्चा पुढील प्रकरणात केली असून धंद्याला लागणारे भांडवल पुरविण्याकरिता एखाद्या सरकारी भांडवल गुंतवणूक मंडळाचा कितपत उपयोग होईल याचाही विचार त्या प्रकरणात करण्यात आला आहे. सरकारच्या मृत्यूकराच्या उत्पन्नात सोन्याचे तारण असलेल्या ठेवींचा किंवा ज्यांची बाजारात सुलभतेने विक्री होऊ शकेल अशा औद्योगिक कंपन्यांच्या भागभांडवलाचा भरणा अधिक असेल तर या सरकारी भांडवल गुंतवणूक मंडळाचे कार्य फार सोपे होईल. हे दोन नवे मार्ग अनुसरल्यास निरनिराळ्या आर्थिक क्षेत्रात भांडवल सतत खेळते राहण्यासाठी आश्चर्यकारक मदत होत राहील हे निश्चित.

ते काहीही असले तरी वस्तूंच्या रूपाने कर स्वीकारले जाण्याची पद्धत म्हणजे एक आकर्षक सामाजिक प्रयोग ठरेल आणि खाजगी संपत्तीचे असमाधानकारक विभाजन नाहीसे करण्याचा आपण जसजसा प्रयत्न करीत जाऊ तसतसे हे कर वस्तूंच्या स्वरूपात स्वीकारणे अपरिहार्यही ठरेल.

## ५. भांडवलावरील मोठ्या कराला विरोध

मृत्यूमुळे होणारे संपत्तीचे विभाजन साधारणपणे दर तीस वर्षांनी एकदा होत असल्याने मृत्यूकराच्या उत्पन्नाची फेरविभागणी सहाजिकच मंद गतीने होत असते आणि मध्यंतरीच्या काळात वेगवेगळ्या क्षेत्रात धनसंचयाची प्रक्रिया उलट दिशेने चालूच असते. त्यामुळे काही समाजवादी भांडवलावरच कर बसवून आपला कार्यभाग लवकर साधून घ्यावा असे प्रतिपादन करीत असतात. अनेक वर्षांपासून या मुद्यावर खूप वाङ्मय निर्माण झाले आहे. पण यापैकी बरेच लिखाण अशा वेळी लिहिले गेले आहे की, त्यावेळी परिस्थिती आजच्यापेक्षा अगदी भिन्न होती आणि त्यावेळी अशा करांच्या बाजूने किंवा विरुद्ध केलेला युक्तीवाद आज केवळ गैरलागू ठरणारा आहे इतकेच नव्हे तर त्यातील काही मुद्दे मुळातच असत्य आहेत.

१९२० सालच्या सुमारास ज्यावेळी प्रथम या करासंबंधीची चर्चा सुरू झाली त्यावेळी बऱ्याच लोकांना पटणारा युक्तीवाद आता तितका महत्त्वाचा राहिलेला नाही. त्यावेळी ही चर्चा राष्ट्रीय कर्जाच्या बोजाच्या संदर्भात होत होती. तेव्हापासून या कर्जाचा बोजा आता खूपच फुगला आहे हे खरे पण त्या कर्जाची प्रत्यक्ष विल्हेवाट लावण्याची जबाबदारी मात्र प्रत्यक्षात कमीच झाली आहे. कारण व्याजाचे दर कमी झाले आहेत, करांचे प्रमाण वाढले आहे आणि अर्थातच राष्ट्रीय उत्पन्नातही वाढ झाली आहे. राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानाने व्याजावर होणारा नक्त खर्च अगदीच क्षुल्लक आहे आणि म्हणून त्यापासून होणारी बचत इतकी अत्यल्प असेल की, त्यासाठी एवढ्या मोठ्या स्वरूपाची उपाय योजना करणे प्रमाणशीर ठरणार नाही.

त्याचप्रमाणे अशा प्रकारचे कर लादण्याविरुद्ध करण्यात येणारा युक्तीवादही निर्णायक स्वरूपाचा नसतो. उदाहरणार्थ मिळकतीची किंमत ठरविण्याचा प्रश्न सोडवता न येणारा आहे हा एक मुद्दा (यासंबंधी नक्की पुरावा मात्र कोणत्याच बाजूने मिळत नाही). किंवा दुसरा मुद्दा म्हणजे असा कर बेकायदा ठरून त्याला केवळ मालमत्तेच्या जप्तीचे स्वरूप येईल. (ही जप्ती उत्पन्नावरील व वारसाहक्कावरील करापेक्षा जास्त असणार नाही.) किंवा या करामुळे संपत्ती बाळगणारे सर्वच लोक एकाच वेळी आपल्या संपत्तीचे रोख रकमेत रूपांतर करू लागले तर मालमत्तेच्या किंमती एकदम कोसळून गंभीर परिस्थिती निर्माण होईल. (असे होण्याची वस्तुतः शक्यता नाही. वस्तूच्या स्वरूपांत कर स्वीकारले जाऊ शकतील हे विचारात घेतले नाही तरी जमाखर्चासाठी अशा परिस्थितीतसुद्धा पुरेसा पैसा खेळता रहावा यासाठी आधुनिक चलनविषयक व्यवहारात अनेक तरतुदी असतात.)

आता आपण मुख्य प्रश्नाकडे वळू. एकतर अशा करांचे प्रमाण काय असावे ? माझ्या माहितीप्रमाणे गेल्या कांही वर्षांत याबाबतीत एकच तपशीलवार सूचना पुढे आली आहे आणि म्हणून तीच मी आता उदाहरणादाखल घेणार आहे. या संदर्भात कराचे जे प्रमाण सुचविण्यात आले आहे ते पहिल्या महायुद्धानंतर मजूर पक्षाने मुळात जे प्रमाण सुचविले होते त्याहूनही किती तरी जास्त आहे असे दिसून येईल. याला तसे सबळ कारणही आहे. प्राप्तीवरील कराचा हेतूच विफल करून टाकण्यासाठी उत्पन्नच खर्च करून संपवून टाकण्याची धनिक लोकांची जी प्रवृत्ती असते तिला आळा घालणे हा अशा करामागील प्रमुख हेतू असतो. परंतु सधन इसमांच्या संपत्तीतील केवळ निम्मा भाग कराच्या रूपाने काढून घेतला तरी उरलेला भाग खर्च करून टाकण्यास त्याला प्रोत्साहनच मिळेल– नव्हे असा कर पुन्हा लादला जाण्याची शक्यता गृहीत धरून, असा खर्च करण्याचा मोह त्याला आवरता येणार नाही. परंतु असे होणार नाही अशी सरकारने त्याला हमी दिली पाहिजे. अर्थात ‘कोणताही कर बसविला तरी त्याबद्दल गैरसमज हे पसरवले जाणारच. तसे झाले नाही तर राजकारण कसले ?’ या जुन्या वचनाप्रमाणे मृत्यूकराबद्दल देखील सधन लोक टीका करणारच. काही झाले तरी चालू सरकार कोठल्याही कराबाबत मागून येणाऱ्या सरकारबद्दल ग्वाही देऊ शकणार नाही. म्हणून बेताची कर आकारणी म्हणजे धनिक लोकांना त्यांची उरलेली संपत्ती उधळून टाकण्याला प्रत्यक्ष निमंत्रण देण्यासारखेच होईल. आणि एकदा अशी बेसुमार उधळपट्टी सुरू झाली की, सामाजिक व चलनवाढविषयक परिणाम घडून येतील ते समाजाला मानवणार नाहीत. तेव्हा कर हे केवळ मोठ्या इस्टेटी कमी करण्याच्या उद्देशाने लादले जाऊ नयेत तर त्या संपूर्णपणे नष्ट करण्याचा हेतु ठेवूनच कर आकारणी झाली पाहिजे या म्हणण्यात खूपच तथ्यांश आहे.

सुचविण्यात आलेले कर आकारणीचे दर पुढीलप्रमाणे होते :

| वैयक्तिक संपत्ती | शेकडा कर |
|---|---|
| पहिले २०,००० पौंड .. .. .. .. .. .. | ०० |
| त्या पुढील १०,००० पौंड (२० हजार ते ३० हजार पौंड) .. .. | ५० |
| त्यापुढील २०,००० पौंड (२० हजार ते ५० हजार पौंड) .. .. | ७५ |
| त्या पुढील ५०,००० पौंड (५० हजार ते १,००,००० पौंड) .. .. | ९० |
| उर्वरित म्हणजे १,००,००० पौंडाच्या वर .. .. | ९५ किंवा १०० |

या आकारणीचे परिणाम काय होतील ते दाखविणारी काही उदाहरणे देता येतील. सगळ्यात वरचा दर जर शंभर टक्के असेल तर वारसाला जास्तीत जास्त ३५,००० पौंड मिळू शकतील. आणि त्यापेक्षा जास्त असलेली संपत्ती एका फटकान्यासरशी या मर्यादेपर्यंत आणून ठेवली जाईल. शेवटच्या पायरीचा दर जरी ९५ टक्के धरला तरी १००,००० पौंड इस्टेटीपैकी वारसाच्या हातात ३५,००० पौंडच पडतील आणि पाच लाखाची इस्टेट ५५ हजारावर येईल तर दशलक्षाची ८० हजारापर्यंत खाली येईल.

ही श्रेणी कधी स्वीकारली जाईल अशी शक्यता मला तरी दिसत नाही हे नमूद केले पाहिजे. त्या श्रेणीविरुद्ध सामाजिक, आर्थिक, राजकीय (आणि तंत्र वैज्ञानिक देखील) असे अनेक आक्षेप येऊ शकतील.

विचारात घ्यावयाचा पहिला मुद्दा म्हणजे याचे सामाजिक परिणाम काय होतील हा. अशा करामुळे इस्टेटी आणि धनदौलत एकदम नाहीशी होईल आणि सर्व धनिक वर्गच (आणि त्यातूनही विशेषेकरून स्थैर्य प्राप्त झालेला जमीनदार वर्ग– नगद पैसा हाती असलेला वर्ग त्यातून थोडी फार तरी पळवाट काढू शकेल) गोफणीतून सुटलेल्या दगडाप्रमाणे भिरकावला जाईल. त्यामुळे कोणते सामाजिक परिणाम घडून येतील त्याची कल्पनाही करवत नाही. इतकेच काय पण वरिष्ठ मध्यमवर्गीय कुटुंबियांकडूनसुद्धा ५००० ते २०,००० पौंडापर्यंतची मागणी केली जाईल व त्यामुळे त्यांना आपल्या राहणीमानात फार मोठे फेरफार करून घ्यावे लागतील. मिळकत निरनिराळ्या स्वरूपात सतत हस्तांतरित होत राहील, मोठाली घरे विकावी लागतील, कलात्मक वस्तू काढून टाकाव्या लागतील, शेतजमिनी दुसऱ्यांच्या नावावर चढवाव्या लागतील, औद्योगिक रोख्यांची देवघेव वाढेल, छोट्या धंद्यासाठी गहाणावर नवी कर्जे काढावी लागतील आणि भिन्नभिन्न प्रकारच्या मोठमोठ्या मालमत्तेचा ओघ सरकारकडे वळू लागेल. बऱ्याच प्रमाणात संपत्तीचा हा ओघ सुस्थिर आणि संपन्न अशा कुटुंबांकडून काही प्रमाणात सरकारकडे जाईल हे खरे असले तरी काही प्रमाणात राष्ट्रीय कर्जरोखे घेणाऱ्या संस्थांकडे आणि स्वस्तात मालमत्ता लुबाडण्याची संधी साधणाऱ्या नवश्रीमंत सट्टेबाजांकडे वळेल. परंतु हे सर्व इष्ट आहे का ते स्पष्ट झालेले नाही.

वस्तुस्थिती अशी आहे की, आपला समाज हा एकजिनसी आणि मॅकिंडरच्या भाषेत सांगावयाचे तर 'चलती असलेल्या धंद्यासारखा' ( Going Concern ) आहे. हा समाज कमालीचा संघटित असून त्यांतील निरनिराळे घटक इतके परावलंबी आहेत की, तणाव, रेटा आणि अंतर्गत दडपण यांच्यातील समतोलावर हा समाज आधारलेला असतो. म्हणूनच सरकारने एखाद्या ठिकाणी हस्तक्षेप केल्यास त्याचे परिणाम अनेक ठिकाणी घडून येतात आणि अनेकदा ते अगदी अनपेक्षित अशा ठिकाणीही घडून येऊ शकतात. म्हणून एका विशिष्ट मर्यादेपलीकडे अशा समाजाला जोराचा धक्का देता येत नाही. कारण त्यामुळे सबंध समाजाच्या बांधणीलाच धोका निर्माण होतो. हा नियम दूरगामी परिणाम करणाऱ्या मालमत्तेवरील कराबाबतही लागू पडतो. कारण अशा करांमुळे अनेक अनपेक्षित परिणाम घडून येत असतात व त्यांतून मार्ग काढण्याची कोणतीही तरतूद आपल्याला करता येत नाही. याबाबतीत हळूहळू बदल घडवून आणावा असे म्हणण्यामागे एक महत्त्वाचा मुद्दा आहे. आणि तो म्हणजे तसा बदल घडवून आणतांना आपल्याला प्रयोग करण्यास भरपूर अवसर असतो. अशा हळूहळू घडून येणाऱ्या बदलामुळे निर्माण होणाऱ्या समस्या इतक्या मंदगतीने समाजापुढे येतात की, त्या सोडविण्यासाठी समाजाला भरपूर वेळ मिळतो. झटदिशी होणाऱ्या बिघटनामुळे असा अवधी मिळत नाही. नवे उदयाला येऊन जुन्याची जागा घेण्यापूर्वीच जुने नष्ट होते. त्यामुळे धोकादायक अशी एक पोकळी निर्माण होते. समाजाशी आपण फार माकडचेष्टा करू नयेत. तसे केले तर इतिहास आपल्याला न कळत अनेक धोके देऊ शकेल.

याचे आर्थिक परिणामही तितकेच अनपेक्षित असतील. गुंतवणूक आणि आर्थिक क्षेत्रांतील खाजगी कंपन्यांच्या बाबतीत पत्करावा लागणारा धोका, जमीन धारणेच्या स्वरूपांत सक्तीने घडवून आणलेल्या फार मोठ्या बदलामुळे शेती उत्पादनावर घडून येणारे परिणाम, एकाएकी भांडवल मोठ्या प्रमाणात सरकारच्या हाती जावू लागल्यामुळे भांडवलाच्या पुरवठ्यावर होणारे परिणाम, परकी चलन आणि खेळते भांडवल, त्याचप्रमाणे ठळक व्यक्ती ( औद्योगिक त्याचप्रमाणे सरकारी क्षेत्रांतीलही ) या कर आकारणीच्या व्यवहारांतच गुंतून पडलेल्या असतात अशा वेळी सर्वसाधारण आर्थिक व्यवहारावर घडून येणारे परिणाम–हे सर्वच आधी लक्षांत न येण्यासारखे असतात. परंतु उत्साह निर्माण करण्याच्या दृष्टीने मात्र त्यांचा कधीच उपयोग होऊ शकत नाही.

सर्वात साधा मुद्दा म्हणजे निरनिराळ्या प्रकारची संपत्ती कराच्या रूपाने स्वीकारली गेली असे गृहीत धरले तरी सरकारला या अचानक आलेल्या बहुढंगी मालमत्तेची व्यवस्था लावण्याचे काम जमू शकेल का? मी वर अशी सूचना केली होती की मृत्यूकर वस्तूच्या स्वरूपात स्वीकारण्याचा नवा प्रयोग उपयुक्त ठरेल

परंतु त्याची सुरुवात क्रमाक्रमानेच झाली पाहिजे व दरवर्षी थोडीथोडीच मालमत्ता सरकारकडे गेली पाहिजे. त्यामुळे ज्या नवीन समस्या किंवा पर्याय उपस्थित होतील, आणि ज्याविषयी आधी कसलीही अटकळ बांधता आलेली नसेल त्यांचा निवांतपणे विचार करता येईल. परंतु कर आकारणीच्या या दरामुळे कर्जरोखे, इमारती वगैरे वरील कर ७,००० दशलक्ष पौंडांच्या वर जाईल आणि त्याची व्यवस्था कशी लावावयाची किंवा एवढ्या मोठ्या रकमेचे काय करायचे ते कोणालाही कळनासे होईल.

एका संभाव्य आर्थिक परिणामाचा आपण जास्त खोलवर विचार करू : तो परिणाम म्हणजे कौटुंबिक व्यवसाय. यापैकी बरेच व्यवसाय–शेती विषयक, त्याच-प्रमाणे कारखानदारीच्या किंवा व्यापारी स्वरूपाचेही – करमुक्त मर्यादेबाहेरचे असतील. त्या धंद्याच्या मालकांनी आपले बरेचसे भांडवल जर गुंतविलेले असेल आणि कर भरण्यास उपयुक्त पडणारी इतर फारच थोडी जिंदगी त्यांच्यापाशी उरली असेल तर कर भरण्यासाठी एकतर त्यांना कर्ज तरी काढावे लागेल, नाही तर आपल्या कुटुंबाच्या धंद्यापैकी काही भाग तरी त्यांना विकून टाकावा लागेल. आता हे खरे की, पैशाच्या व्यवहारावर नियंत्रण ठेवणारे अधिकारी पैसा खेळता ठेवण्याची तयारी दाखवतील तर संभाव्य खरेदीदार किंवा धनको यांची वाण पडणार नाही आणि मग पैशाच्या टंचाईचा प्रश्नच निर्माण होणार नाही.

परंतु मालमत्तेची बाजारपेठ अर्थातच एकजिनसी आणि पूर्णावस्थेस पोहोचलेली नसते तर निरनिराळ्या बाजारपेठांचा तो एक समूह असतो. आणि कराची रक्कम भरल्यानंतर रोख रक्कम हाती असलेल्यांचा (म्हणजे सरकारी कर्जरोख्यात गुंतव-लेले पैसे मोकळे झालेल्यांचा) वर्ग अशा लोकांचा असेल की, जे सहसा शेतीत किंवा कारखानदारीत मोठ्या प्रमाणावर पैसे गुंतविण्याचे धाडस करीत नाहीत. विक्रीसाठी बाजारात येऊ लागलेली आणि त्यात पैसे गुंतविण्यात नवे अपरिचित असे धोके असलेली शेती किंवा औद्योगिक मालमत्ता यात त्यांनी आपल्या जवळची रोकड गुंत-वावी म्हणून त्यांचे मन वळवावयाचे झाले तर अशा मालमत्तेच्या किमती झपाट्याने खाली येत आहेत असे त्यांच्या निदर्शनास आणून द्यावे लागेल. सर्वसाधारणपणे निर-निराळ्या प्रकारच्या मालमत्तेचे याच प्रमाणावर हस्तांतर होत असेल तर स्वखुषीने विकत देणारे आणि स्वखुषीने विकत घेणारे यांची सर्वत्र सांगड घालून देण्यासाठी तौलनिक भांडवली मूल्यात बराच बदल घडून यावा लागेल. विशेषतः सुरक्षित आणि रोखीच्या स्वरूपात आलेल्या मालमत्तेवर बऱ्याच मोठ्या प्रमाणात जादा रक्कम आकारली जाईल आणि लहान लहान व असुरक्षित धंद्यातील भांडवलापेक्षा सोन्याचे तारण असलेल्या रोख्यांची किमत तुलनात्मक दृष्ट्या खूपच वाढेल. अशा व्याजाच्या दरातील वरील प्रकारचे तौलनिक बदल उत्पादन कार्याच्या दृष्टीने खचितच चांगले नसतात.

शिवाय औद्योगिक किंवा शेतीच्या मालमत्तेतील हिश्शाचा किंवा गहाणाचा ताबा ज्या नवीन मालकांकडे राहील त्यांची परिस्थिती काहीशी चमत्कारिकच होईल. कारण ते सर्वजण वसूल होऊन गेलेल्या कर्जाचे मालक बनतील, म्हणजेच मुख्यत: खाजगी पैसा गुंतविण्याच्या बाबतीत फारसे धाडस न करणाऱ्यांच्या विमा कंपन्या किंवा भांडवल गुंतवणूक करणाऱ्या संस्था यांचा त्यात समावेश असेल. मोठा शेतकरी किंवा लहान प्रमाणावर धंदा करणारा यांच्या जिवावर या वर्गाचा अर्थ-व्यवस्थेवरील वरचष्मा वाढावा असे आपल्याला का वाटते त्याचा उलगडा होत नाही. तरीही अपेक्षित प्रमाणात मालकी हक्कांत बदल घडवून आणणारा हा परिणाम वैशिष्ट्यपूर्ण होय. ब्रिटनची अर्थव्यवस्था स्थिर आणि सुरक्षित असती तर कदाचित हा आणि इतर अनेक आर्थिक धोके पत्करणे योग्य ठरले असते. परंतु बॅलन्स ऑफ पेमेंट्सच्या (आंतरराष्ट्रीय देवघेवींचा ताळेबंद) बाबतीत आपली परिस्थिती काहीशी गंभीर बनलेली असतांना असा धोका पत्करणे मूर्खपणाचे ठरेल.

परंतु या प्रकारच्या करांविरुद्ध अनेक आक्षेप घेतले जात असल्यामुळे त्यांच्या आर्थिक व सामाजिक परिणामांचा विचार करण्याचेही कारण पडणार नाही. मोठ्या प्रमाणावरील करांमुळे समाजातील विशिष्ट सामाजिक वर्ग जवळजवळ नामशेष होतो. आणि तोही दशकानुदशके हळूहळू उत्क्रांत होत जाणाऱ्या प्रक्रियेमुळे (ब्रिटिश इतिहासाला हीच प्रक्रिया परिचित आहे) नव्हे तर एका फटकाऱ्यासरशी. अर्थात हा वर्ग संख्येने मोठा नाही—एक लाख पौंडापेक्षा जास्त संपत्ती असलेले लोक फक्त १७,०००च आहेत—परंतु तरीही अशा लोकांचे समाजातील स्थान महत्त्वाचे असते. आणि यापेक्षा मोठ्या सामाजिक वर्गाला मात्र याची चांगलीच झळ बसणार—इतकी की, मृत्यूकराच्या बाबतीत ती मान्य करण्यात आली तरी हयात असलेल्या व्यक्तींच्या फार मोठ्या संख्येलाही त्याचबरोबरच झळ बसू लागली तर मात्र ती अशी सहजासहजी मान्य केली जाणार नाही. (सुमारे १,१७,००० व्यक्तींजवळ २५,००० पौंडांचे वर भांडवल आहे. आणि त्यांचे कुटुंबीय आणि त्यांच्यावर अवलंबून असणारी इतर माणसे जमेस धरता त्यांची संख्या खूपच मोठी होते.

सामाजिक जीवनाची वाताहात करून टाकणारी संपत्तीशी येवढ्या प्रमाणा-वरील विभागणी ही जवळजळ क्रांतिकारक घटनाच म्हटली पाहिजे आणि खरोखरच एका रात्रीत सर्व संपत्तीचे राष्ट्रीयीकरण करणाऱ्या पार्लमेंटच्या कायद्याशी आणि १८३२ च्या सुधारणा कायद्यापेक्षाही अधिक तातडीचे सामाजिक परिणाम घडवून आणणाऱ्या १९११ च्या उमराव सभेच्या सुधारणांशी किंवा सार्वत्रिक संपत्तीशी या क्रांतिकारक घटनेची तुलना करता येईल. याबाबतीत अंदाज करीत बसण्यापलिकडे आपल्या हातात काहीही नाही. परंतु माझी अशी पक्की समजूत आहे की, ब्रिटिश राजकीय मनोभूमिकेला ही गोष्ट मानवणारी नाही आणि ज्यावर लोकशाही पद्धतीचे

भवितव्य अवलंबून आहे अशा परस्पर सहिष्णुता आणि तडजोडीची तयारी यासंबंधीच्या महत्त्वाच्या, परंतु अव्यक्त सीमारेषांवर त्यामुळे अतिक्रमण होते.

संपत्तीधारकांकडून होणारा वेसनदशीर नसलेला जोरदार विरोध धाब्यावर बसवून अशा तऱ्हेचा कर बसविणारा कायदा पास करून घेण्यासाठी उरलेल्या जनतेचा पाठिंबा तरी कितपत मिळू शकेल याचीही वस्तुतः शंकाच आहे. आणि त्याहीपेक्षा पक्षांच्या कार्यक्रमविषयक जाहिरनाम्यात हा कर सूचित करण्यात आला तर (कोणत्याही प्रकारे तसे सूचित न करणे अनैतिक ठरेल.) निवडणुकी जिंकता तरी येतील की नाही हाही प्रश्नच आहे, मध्यम वर्गापैकी बराच मोठा भाग जरी करमुक्त उत्पन्नाच्या मर्यादेच्या बराच खालचा असला तरी तो अशा करामुळे एकदम बिथरेल. कारण आज ना उद्या या कराची झळ आपल्याला लागणार अशी वृथा भीती त्यांना वाटत राहील हे एक आणि एकंदरीने कोणतेही जालिम उपाय योजण्याच्या बाबतीत ते स्वाभाविकपणेच विरुद्ध असतात हे दुसरे.

कामगारवर्गसुद्धा अशा करास उत्साहाने एकमुखी पाठिंबा देईलच असे नाही. त्यांना स्वतःला त्यापासून काही विशेष आर्थिक फायदा होईल असे वाटणार नाही आणि त्यांचा कल काहीतरी क्रांतिकारक घडवून आणण्याकडे असेल असे म्हणणे चुकीचे ठरेल. अशाच एका तरतुदीबद्दल ई. एफ्. एम्. डर्बिनने एकेठिकाणी असे म्हटले आहे की, "कामगारवर्ग आपणहून अशा तरतुदींना पाठिंबा देणार नाही. गेले महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच्या अगदी लगतचा आणि ते युद्ध संपल्यानंतरचा तसाच काळ सोडला तर जवळ जवळ शंभर वर्षेपर्यंत कामगारवर्ग क्रांतिकारक असे काहीही करण्याच्या मनःस्थितीत नव्हता.... कोणतेही मजूर सरकार एखादी क्रांतीकारी कृती करण्याला स्वतःला बांधून घेण्याचा वेडेपणा करील तर ज्याच्या पाठिंब्यावर ते अस्तित्वात येते तो मतदारांचा पाठिंबाच ते गमावून बसेल व नेतृत्व करावयाला पाठिशी फौजफाटा नसतांनाच त्याला हे युद्ध लढावे लागेल. आणि जनतेशी लढाई करणाऱ्या भ्रांतचित्त जॅकोबाइन्ससारखी त्यांची अवस्था होईल." सोळा वर्षांपूर्वी डर्बिनने हे लिहिले त्यावेळेपेक्षाही आज ते जास्त खरे आहे.

तथापि या करारासंबंधीचा कायदा पास करून घेण्याइतका पाठिंबा मिळण्यासारखा असला तरीदेखील मजूर पक्षाने तसा प्रयत्न करण्याच्या भरीस न पडणे हेच शहाणपणाचे ठरेल. काहीवेळा वर्गीय अत्याचार उफाळून आले असले तरी सर्वसाधारणपणे सामाजिक व राजकीय क्षेत्रातील सहिष्णुतेच्या परंपरेमुळच ब्रिटनमधील उदारमतवादी लोकशाही टिकून राहिली आहे आणि त्यामुळे सर्व देशाचा कल्पनातीत फायदा झालेला आहे. सामाजिक शांतता आणि तौलनिक सदिच्छा याबाबतीत वातावरणात फार मोठे स्थित्यंतर घडून आलेले असल्यामुळे विशेषतः समाजवाद्यांच्या दृष्टीने तर ते फारच फायदेशीर ठरले आहे. या परंपरेकडे

उघड उघड डोळेझाक करून या सापेक्ष सहिष्णुतेऐवजी सुप्त विरोध ओढवून घेऊ तर (त्याहूनही हानिकारक परिणामाला तोंड द्यावे लागले नाही तरी निदान) सुस्थिर असा समाजवादी समाज आपण कधीच निर्माण करू शकणार नाही.

साधनांवरूनच साध्य निश्चित होत असते या उक्तीचे उदाहरण म्हणून मोठ्या दराच्या संपत्तीकराकडे बोट दाखविता येईल. समाजवाद्यांना जास्त प्रमाणावरील समता प्रस्थापित करण्याचे आपले ध्येय साध्य करावयाचे असेल तर समाज अधिक समाधानी आणि न्यायावर आधारलेला असला पाहिजे. परंतु संपत्तीची विभागणी जास्त समानतेने झाल्यामुळे समाज जरी जास्त समाधानी आणि न्यायी बनला असला तरी संपत्तीच्या फेरवाटणीसाठी योग्य ते मार्ग अवलंबिल्यावाचून हे घडून येऊ शकणार नाही. कराच्या दरात वाढ झाली तर कराविषयीचा असंतोष आणि असमाधान कमी होण्याऐवजी उलट ते वाढतच जाणार हे अगदी उघड आहे. यामुळे समतेवर आधारलेला वर्गविहीन समाज निर्माण करण्याचे औपचारिक ध्येय गाठण्यास मदत होईल पण समाज आधीच समानतेवर आधारलेला व वर्गविहीन असल्याने तो अधिक न्यायी आणि अधिक समाधानी बनविण्याचे खरेखुरे ध्येय गाठण्यास मात्र ते सहाय्यभूत ठरणार नाही. असा समाज हळूहळू आणि उत्क्रांतीच्या टप्प्यानेच निर्माण करता येईल.



# प्रकरण पंधरावे

# संपत्तीची विभागणी ( २ )

## १. संपत्तीधारकांना अनुकूल अशी कर आकारणी

समानतेकडे हळूहळू आगेकूच करावयाची असेल तर नुसत्या मृत्यूकराने काम भागणार नाही. मृत्यूकराचा प्रभाव मंदगतीने घडून येत असतो आणि मध्यंतरीच्या काळात वारसा हक्काने आलेल्या संपत्तीमुळे श्रीमंतांच्या लहानशा वर्गाला कमालीच्या बाहेर फायदा मिळत असतो. शिवाय वडलोपार्जित संपत्तीवर बसविलेल्या करामुळे हयात असलेल्या व्यक्तींपैकी वडलोपार्जित किंवा स्वकष्टार्जित संपत्ती असलेले आणि यापैकी कोणतीच संपत्ती नसलेले यांच्यातील विषमता दूर करण्यास मदत होत नाही. वारसाहक्काने मिळणारी संपत्ती किंवा उत्पन्नाची सरळ उतरंडीसारखी विभागणी याबद्दल कोणाचे काहीही मत असो, ब्रिटनमधील करपद्धती, संपत्ती असणारे आणि संपत्ती नसणारे यांत कराच्या बोजाची न्याय्य विभागणी करण्यास असमर्थच ठरली आहे.

या असमर्थतेचे कारण ती उत्पन्नावर आधारलेली असते व मोठ्याप्रमाणावर खाजगी संपत्ती अस्तित्वात असलेल्या कोठल्याही समाजात करपात्र उत्पन्नाची व्याख्या हे खरीखुरी क्रयशक्ती किंवा कर भरण्याची पात्रता यांचा अचूक अंदाज बांधण्याचे गमक ठरू शकत नाही हे होय. ( सध्या अस्तित्वात असलेल्या स्वकष्टार्जित उत्पन्नावर सूट देण्याच्या पद्धतीमुळे निर्माण होणारा किरकोळ भेदाभेद वगळता ) समान उत्पन्न असलेल्या परंतु एकीजवळ लाख पौंडाची मालमत्ता असलेल्या आणि दुसरीजवळ अजिबात मालमत्ता नसलेल्या दोन व्यक्तींत कसलाच भेदाभेद केला जात नाही.

खरे पाहिले तर दोघांची क्रयशक्ती किंवा संपत्ती मुळीच सारखी नसते. पहिल्या वर्गातील व्यक्ती भविष्यकाळाबद्दल उदासीन वृत्ती बाळगू शकते. परंतु दुसऱ्या

वर्गातील व्यक्ती तशी उदासीन राहू शकत नाही. कारण, श्रीमंत मनुष्याला निवृत्ती नंतरची तरतूद करून ठेवण्याची जरूरीच भासत नाही. अपघातामुळे किंवा आजार-पणामुळे आपले उत्पन्न एकदम कमी होईल किंवा त्यांत खंड पडेल अशी कसलीच भीती त्यास नसते. आणि विशेष म्हणजे आपला खर्च भागविण्यासाठी भांडवल विक्रीस काढून किंवा भांडवलावरील नफ्यातून त्याला बरीच रक्कम उभी करता येते. या दोन व्यक्तींच्या आर्थिक बाजूंची कोणत्याही तऱ्हेने तुलना होऊ शकत नाही. तसेच ती त्यांच्या उत्पन्नावरून दिसूनही येत नाही. म्हणूनच स्वकष्टार्जित उत्पन्न पायाभूत मानून बसविलेल्या करपद्धतीचा कल स्वाभाविकपणे वडलोपार्जित संपत्तीधारकांना अनुकूल असतो कारण स्वकष्टार्जित उत्पन्नधारकांपेक्षा अशा प्रकारच्या व्यक्तींची कर देण्याची कुवत याबाबतीत कमी लेखली जाते. आणि वारसा हक्कासंबंधी काहीही जरी निर्णय घेण्यात आला तरी ही असमानता दूर करणे अगत्याचे ठरते. ही असमानता दूर करण्यासाठी योजावयाच्या उपायां-मुळे वडलोपार्जित मिळकतीची क्रयशक्ती सुद्धा दरम्यानच्या काळात कमीकमीच होत जाईल हे खरे. परंतु ही प्रक्रिया घडून येत असतानाच मृत्यूकरही आपले काम हळूहळू बजावीत असतो.

हे जे उपाय योजले जातील त्यांचे स्वरूप पुढीलप्रमाणे राहील : मिळकतीवर प्रत्यक्ष वार्षिक कर आणि स्वकष्टार्जित उत्पन्नाशी तुलना करता वडलोपार्जित संपत्तीपासून आलेल्या उत्पन्नाच्या बाबतीत करावा लागणारा विशेष भेदाभेद व भांडवली उत्पन्नावरील कर.

## २. संपत्तीवरील वार्षिक कर

भांडवलावर वार्षिक कर बसविणे शक्य आहे. या कराचे स्वरूप एक छोटचा पण सतत द्याव्या लागणाऱ्या भांडवली करासारखे (कॅपिट्ल लेव्ही) राहील. तथापी या शक्यतेबद्दल समाजवादी किंवा अर्थशास्त्रज्ञांनी सुद्धा फारशी चर्चा केलेली दिसत नाही, हे विचित्र वाटले तरी खरे आहे. या करांत फायदे निश्चितच आहेत. मोठचा प्रमाणावर एकदाच भांडवलीकर लादल्यावर होणारे आधी वर्तविता न येण्याजोगे परिणाम त्यामुळे टळतील. तरीही संपत्तीचे विभाजन होण्यात त्याची एकसारखी परिणती होत राहील. आणि त्याचबरोबर प्रयत्न व साहस यांना प्रोत्सा-हन मिळण्याच्या बाबतीत कसलाच अनिष्ट परिणाम घडून येणार नाही.

या विषयावर आतापर्यंत जी काही थोडी चर्चा झाली आहे त्यांत असे गृहीत धरले गेले होते की, संपत्तीवरील वार्षिक कर किंवा मिळकतीवरील कर यांचे प्रमाण अगदी बेताचेच असेल व असे कर, ते कसेही आकारण्यात आले तरी, नेहमीच्या उत्पन्नांतून भागविण्यात येतील. आज मात्र तशी परिस्थिती राहिलेली नाही. भांड-वलावरील कराचा दर अगदी माफक धरला तरी हल्लीच्या सरचार्जच्या दरामुळे

एकूण कराचे ओझे पौंडामागे वीस शिलिंगापेक्षाही (म्हणजे पौंडापेक्षाही) जास्त होते. आणि जास्त संपत्ती असेल तेथे तर हे कर भांडवलामधूनच भरावे लागतात. याचे उत्तम उदाहरण म्हणजे, १९४८ साली स्पेशल काँट्रिब्यूशन या नावाचा एक कर बसविण्यांत आला होता. हा कर आकारतांना व्यक्तीचे उत्पन्न पायाभूत मानण्यांत आलेले असले तरी त्याचे स्वरूप एकदाच देऊन टाकाव्या लागणाऱ्या संपत्तीकरासारखे होते, याबाबत सर्व समीक्षकांचे एकमत होते. आणि कर बसविण्याचा उद्देश जर संपत्तीची वाटणी अधिक समान व्हावी हा असेल तर तो भांडवलावर बसवला गेला नाही तर सहाजिकच त्याला काहीच अर्थ उरणार नाही. म्हणून उत्पन्नातून भरावयाच्या करांच्या संदर्भात यापूर्वी जी चर्चा झाली ती यापुढे उपयोगी पडणार नाही.

कर भांडवलावर आकारावा की गुंगतविलेल्या भांडवलावरील उत्पन्नावर ? (अर्थात धंद्यात गुंतविलेल्या भांडवलापेक्षा खाजगी भांडवलापुरताच हा सवाल मर्यादित आहे) शेवटी मिळकतीपासून उत्पन्न किती मिळते त्यावरून त्या संपत्तीचे मूल्य ठरते असे गृहीत धरले तर सकृतदर्शनी त्यात कसलाही फरक आढळणार नाही. परंतु भांडवलाचे कित्येक प्रकार असे आहेत की, ज्यात पैशाच्या स्वरूपात काहीच उत्पन्न मिळत नाही तर पैशांऐवजी फक्त मानसिक समाधान भरघोस मिळते. यालाच भावनात्मक किंवा मानसिक उत्पन्न म्हणता येईल. उदाहरणार्थ मोटारी, नौका, कलात्मक वस्तू, जडजवाहीर इ. संपत्तीवर कर बसवला गेला तर, या सर्व वस्तूंवर कर बसविण्यात येईल. पण तो पैशाच्या स्वरूपातील उत्पन्नावरच बसवावयाचा असेल तर यापैकी कोणत्याच वस्तूंवर तो बसवता येणार नाही. आणि ज्या इसमाने अशा वस्तूंत फार मोठा पैसा गुंतवला असेल तो इसम, ज्याने आपला पैसा रोख उत्पन्न येईल अशा रीतीने गुंतविला असेल त्याच्यापेक्षा (कराच्या बाबतीत) थोडक्यावर सुटून जावा हे संयुक्तिक वाटत नाही.

सहाजिकच येथे असा मुद्दा उपस्थित होतो की, उत्पन्नावर कर लादण्याविरुद्ध असा मर्मघातक आक्षेप तरी कोणता ? हा आक्षेप म्हणजे व्यक्तीचा एकूण कर जेव्हा पौंडामागे वीस शिलिंगापेक्षाही जास्त होत जातो त्यावेळी अशा कराचा काही परिणामच होत नाही. मग उत्पन्न मिळवून देणारे भांडवल काढून घेऊन ते रोखीतच (किंवा मोटारी, जडजवाहीर, चित्रे किंवा लाभांश न देणारे शेअर्स) ठेवून देणे फायद्याचे ठरेल. कारण त्यामुळे करच आकारला जाणार नाही. (पैसा गुंतविणारा माणूस हुशार असेल तर तो भांडवली नफा मिळविण्यासाठी लाभांश मिळण्याची वेळ येण्यापूर्वीच आपले भाग विकून टाकील आणि ते भाग लाभांश मिळण्याजोगे होतील त्यावेळी तो ते पुन्हा विकत घेईल.) असे केल्याने त्याला आपल्या खर्चाची पूर्वीची पातळी कायम राखण्यासाठी भांडवलच मोडावे लागले तरी ठराविक मर्यादेपलीकडे आपली संपत्ती सरकारच्या घशात जाऊ न

देण्यात तो यशस्वी होवू शकेल. पण कर आकारणीचा उद्देश बचत न करण्यास भाग पाडणे हा नसून संपत्ती एकत्र आणून तिची फेरवाटणी करणे हा असतो. मोठमोठ्या मिळकतीवर कराच्या रूपाने सरकारच्या ताब्यात जाणार असा रंग दिसू लागताच त्या मिळकतीचा मालक करमुक्त वस्तूंवर पैसा गुंतवून संपत्तीकर भरावा लागणार नाही अशी व्यवस्था करतो व त्यामुळे हा कर बसविण्यामागील हेतूच धुळीला मिळतो. स्पेशल काँट्रिब्युशनच्यावेळी हा प्रश्न निर्माण झाला नाही कारण तेव्हा त्याची कल्पना आली नव्हती. कर भरण्यासाठी जे तक्ते भरून येत त्यावरूनच कराची आकारणी होत असे. आणि त्यामुळे कर चुकविण्यास संधीच मिळत नसे. पण कर वार्षिक किंवा ठराविक मुदतीनंतर घ्यावयाचा असेल तर वरच्या श्रेणीतून फार मोठ्या प्रमाणात कर चुकविले जातातच.

म्हणूनच उत्पन्न पायाभूत मानून बसविलेला भांडवली कर हा सरतेशेवटी भांडवलावरील कर न ठरता तो केवळ अकष्टार्जित उत्पन्नावरील, परंतु कडक स्वरूपाचा कर ठरेल. अशा कराची चर्चा पुढील विभागात करण्यात आली आहे. भांडवलावरच बोजा पडणारा नेहमीचा कर भांडवल पायाभूत मानूनच आकारावयास हवा. त्यामुळे खाजगी भांडवलाचे मूल्य ठरविण्याचे शासकीय प्रश्न निर्माण होतील. वैयक्तिक मालमत्तेवर मृत्यूकर आकारताना हल्ली अधूनमधून समस्या निर्माण होतात. परंतु या कराच्या बाबतीत भांडवलाच्या किंमतीत होणाऱ्या बदलांच्या अनुषंगाने सर्वच मिळकतीवर एकसमयावच्छेदेकरून आणि पुन्हा दर काही वर्षांनी या समस्या उभ्या राहतीलच. हे शक्य आहे किंवा नाही हे ठरविणे सर्वसामान्य माणसाच्या आवाक्याबाहेरचे असते आणि त्याबाबतचा अंतिम निर्णय आंतरदेशीय महसूल खातेच घेऊ शकेल. परंतु अशा प्रकारचा संपत्तीवर आकारलेला कर स्वीडनमध्ये अस्तित्वात आहे व तेथे अनुल्लंघ्य अशा शासकीय अडचणी आलेल्या नाहीत. असा कर वसूल करणे शक्य असेल व तो प्रमाणात असेल तर विषमता नाहीशी करण्याचे एक पूरक साधन म्हणून त्याचा उपयोग होईल. मृत्यूकराप्रमाणे पुरेसे उत्पन्न हा आरंभ बिंदू मानून त्या रकमेपासून तो कर सुरू होईल. आणि एक पूरक उपाय म्हणूनच या कराचा उपयोग करावयाचा असल्यामुळे त्याचा दर जास्त किंवा भराभर वाढत जाणारा असता कामा नये. मात्र मोठ्या प्रमाणावरील विषमता दूर करण्यासाठी या कराचा उपयोग करावयाचा असल्याने त्याचे प्रमाण स्वीडनमधील या स्वरूपाच्या कराच्या प्रमाणापेक्षा (स्वीडनमध्ये ते संपत्तीच्या ०·५ टक्क्यांपासून १·८ टक्क्यांपर्यंत वाढत जाते) जास्त असू नये. कराचे प्रमाण कमी असल्यामुळे, आणि नवीन बचतीला फारसा धक्का न लावता तो सबंध संपत्तीवर आकरला जात असल्यामुळे अशा कराचा बचत करण्याच्या प्रवृत्तीवर प्रतिकूल परिणाम घडून येण्याचा जवळपास अजिबात संभव नाही. आर्थिक धोका पत्करण्याच्या प्रवृत्तीवर तर त्याचा काहीही परिणाम घडून येणार नाही. कारण कर आकारणी

जर भांडवल पायाभूत मानून होणार असेल तर मग धोकादायक परंतु जास्त उत्पन्न देणाऱ्या आणि कमी धोकादायक परंतु कमी उत्पन्न देणाऱ्या अशा उत्पन्न मिळविण्याच्या दोन प्रकारच्या मार्गाबाबतची परिस्थिती बदलत नाही.

## ३. अकष्टार्जित उत्पन्नाबाबत अधिक प्रखर भेदाभेद

परंतु संपत्तीवर कर न लादता त्या संपत्तीमुळे जे उत्पन्न मिळते त्यावर कर बसवूनसुद्धा संपत्ती धारण करणारास मिळणारे सापेक्ष फायदे आपणास कमी करता येतील. हे अगदी सुलभतेने घडवून आणण्याचा मार्ग म्हणजे कष्टार्जित उत्पन्नाच्या मानाने अकष्टार्जित उत्पन्नावर जादा दराने कर आकारणी करणे. कर आकारणीच्या बाबतीत कष्टाने मिळविलेल्या एक पौंडाची बरोबरी भांडवल गुंतवणुकीतून येणाऱ्या एक पौंड उत्पन्नाशी केली जाऊ नये हे तत्त्व ब्रिटनमध्ये १९०७ पासून मान्य झाले आहे. त्यावेळी 'कष्टार्जित उत्पन्नावरील सूट' या स्वरूपात कर आकारणीच्या पद्धतीत बुद्धिपुरस्सर, परंतु थोड्या प्रमाणात कष्टार्जित उत्पन्नाबाबत भेदभाव करण्यात येतच असे. कष्टार्जित मिळकत ही जास्त अनिश्चित असते या मुद्यावर प्रथम त्याचे समर्थन केले जात असे. पण वरील चर्चेवरून हे स्पष्ट होईल की, संपत्तीवरील उत्पन्नाची जास्त निश्चिती असणे हा संपत्ती असणाऱ्या इसमास मिळणारा फायदा अगदी अल्प असतो. आणि कष्टार्जित उत्पन्नावरील करात थोडीशी सूट देऊन या एकंदर फायद्याची वजावट होऊ शकेल याबाबत फार करून कोणाचा मतभेद होणार नाही.

कष्टार्जित उत्पन्नावरील करातील सूट वाढवून, म्हणजेच कष्टार्जित उत्पन्नापैकी जो थोडासा भाग करमुक्त असतो त्यात काही प्रमाणात (समजा एकतृतीयांश किंवा अर्धा टक्का) वाढ करून ही सवलत अधिक परिणामकारक करता येईल. त्याचप्रमाणे कष्टार्जित उत्पन्नावरील कर व भांडवल गुंतवणुकीपासून मिळणाऱ्या उत्पन्नावरील कर हे दोन अगदी वेगळे करून आणि दुसऱ्या प्रकारावरील कराचे प्रमाण त्यामानाने वाढवूनही हे साध्य करता येईल. यापैकी पहिला मार्ग अवलंबावयाचा असेल तर करात सूट मिळण्याची सध्याची मर्यादा काढून टाकण्याचे पाऊल उचलावे लागेल कारण मग अशी मर्यादा समर्थनीय ठरणार नाही. दुसरा मार्ग अनुसरण्याचे ठरवून अकष्टार्जित उत्पन्नावरील करात वाढ केली तर कमी व मध्यम प्रमाणात बचत करणारांना त्यापासून नुकसान पोहोचू नये म्हणून कर वाढीचे प्रमाण सरचार्जच्या करापेक्षा जास्त ठेवणे व त्याचबरोबर अल्पशा भांडवल गुंतवणुकीवरील उत्पन्नावर मिळणारी सध्याची सूट कायम ठेवणे क्रमप्राप्त ठरते. परंतु कष्टार्जित व अकष्टार्जित उत्पन्नावरील कर आकारणीत वाढता फरक ठेवण्याच्याबाबतीत तत्त्वाच्या दृष्टीने निवड करण्यासारखे असे काहीच नाही.

अकष्टार्जित मिळकतीवर जादा कर लादण्याविरुद्ध केला जाणारा नेहमीचा

रूढ युक्तीवाद म्हणजे कराचा उपयोग धोका पत्करण्याच्या विरुद्ध केला जाईल हा. असे म्हटले जाते की, धोका जितका जास्त, तितके गुंतवणुकीवरील ' उत्पन्न जास्त ' आणि म्हणून त्या उत्पन्नावरील कराचा बोजाही जास्त. जो मनुष्य आपला पैसा नुसता बँकेत ठेवून देईल त्याला काहीच कर द्यावा लागणार नाही आणि धोका पत्करून पैसे गुंतविणारापेक्षा सोन्याच्या तारणावरील कर्जरोख्यात पैसा गुंतविणारा, कराच्या बाबतीत आणखीनच सहजपणे सुटून जातो. जास्त नफा देणाऱ्या शेअर्सचेही तसेच होते. यावरून असा निष्कर्ष निघतो की, कर असा असला पाहिजे की, ज्यामुळे भांडवल गुंतवणूक करणाराला आपले उत्पन्न आणि त्या अनुषंगाने येणारा (कराचा) बोजा कमीत कमी करता यावा म्हणून धोका टाळावयाचा मोह व्हावा.

वरवर पाहता जरी हे ठीक दिसत असले तरी प्रत्यक्ष व्यवहारात धोका पत्करून गुंतवावयाच्या भांडवलाचा ओघ वळावा असे जे आपल्याला वाटते त्या तऱ्हेची भांडवल गुंतवणूक हे जादा उत्पन्नाचे एकमेव गमक ठरेलच अशी खात्री देता येत नाही. वायदे बाजारातून मिळणाऱ्या उत्पन्नाची घडण कशी असते याची छाननी केली तर तेथे दोन प्रकारच्या भिन्न भिन्न प्रवृत्ती आपला प्रभाव गाजवीत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येईल. त्यातील पहिली प्रवृत्ती म्हणजे धोका पत्करण्याचे एक विशिष्ट प्रमाण. याठिकाणी धोका हा शब्द रूढार्थाने घ्यावयाचा आहे. म्हणजेच व्यापारातील चढउतारात अनुस्यूत असलेला धोका आणि त्यामुळे नफा व व्याज यांच्या वितरणावर होणारा परिणाम व त्यातून निर्माण होणारे धोके. किंमतीतील पारंपारिक चढ-उतारामुळे त्या वस्तू निर्माण करणाऱ्या कारखान्यांच्या शेअर्समध्ये जी वटवट होते त्यामुळे हा धोका निर्माण होतो. तसेच विशेषतः अस्थिर बाजारपेठांवर जे उद्योगधंदे अवलंबून असतात त्यांच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. अशा उद्योगधंद्यांची काही उदाहरणे म्हटली म्हणजे निर्यातीसाठी निर्माण केल्या जाणाऱ्या क्रयवस्तूंचे कारखाने, किंवा फर्निचर, विजेची उपकरणे यांसारख्या वस्तूंच्या बाबतीत हप्तेबंदीच्या नियमात अचानक होणाऱ्या फेरबदलांचा त्रास ज्यांना सहन करावा लागतो असे गृहोद्योग, ठराविक व्याज मिळणारे कर्जरोखे आणि बँका किंवा विमा कंपन्या यांसारखे मागणीची पातळी कमालीची स्थिर असलेले उद्योगधंदे.

दुसऱ्या प्रकारांतील गुंतवणुकीपेक्षा पहिल्या प्रकारच्या गुंतवणुकीत व्याज जास्त मिळेल आणि अकष्टार्जित उत्पन्नावरील कर वाढविला गेला तर त्या गुंतवणुकीबाबत विशेष आकर्षण राहणार नाही. दोहोबाजूंचा अगदी काटेकोरपणाने विचार केला तर ही गोष्ट अनिष्ट ठरेल. भांडवलाचा ओघ क्रयवस्तूंच्या कारखान्यांतील भागांकडे वळणे अनेकदा इष्ट ठरते. परंतु हप्तेबंदीच्या खरेदी योजनेनुसार व्यवहार करणाऱ्या कंपन्यांत फार मोठ्या प्रमाणावर पैसे गुंतविणे आपण पसंत करतो हे तितकेसे स्पष्ट होत नाही.

परंतु याच्या अगदी उलट परिणाम घडवून आणणारी आणखीही एक प्रवृत्ती

आहे. पैसे गुंतविणारा उत्पन्नाचा विचार करतांना लाभांशाच्या चालू दराचाच फक्त विचार करीत नाही तर चालू लाभांशाबरोबर भांडवलांतील अपेक्षित वाढही तो विचारांत घेतो. म्हणून ज्या शेअर्सची किंमत वाढण्याचा संभव असतो त्यापासून मिळणारे चालू उत्पन्न कमी दिसते. ( किंबहुना अजिबातच मिळत नाही) आणि ज्या शेअर्सची किंमत वाढण्याचा संभव कमी असतो त्यापासून जादा उत्पन्न मिळत असते. उत्पन्न हा पाया धरून कर आकारण्यांत आला की सहाजिकच पहिल्या प्रकारास तो अनुकूल ठरेल आणि दुसऱ्या प्रकारातील शेअर्सच्या उत्पन्नावर तो प्रतिकूल ठरेल. अणुशक्तीची उपकरणे, अवजड विद्युत व अभियांत्रिकी अवजारे, रसायने, तेले यासारख्या उद्योगांच्या झपाट्याने होणाऱ्या वाढीचा, किंमत वाढण्याचा दाट संभव असलेल्या परंतु कमी उत्पन्न देणाऱ्या भांडवलाशी फार निकटचा संबंध असतो. वरील कारणास्तव असा भेदाभेद केला जाणे स्वाभाविक आहे असे कोणी म्हणेल. याउलट जास्त उत्पन्न देणाऱ्या शेअर्सची किंमत भविष्यकाळांत फारशी वाढण्याचा संभव नसतो. किंवा काही वेळा तर ती खाली घसरण्याचीच भीती असते. या प्रवृत्ती विशेषेकरून ज्यांची वाढ थांबली आहे किंवा जे उतारास लागले आहेत अशाच धंद्यांत दिसून येते. कापड, दारू गाळणे ही अशा प्रकारच्या उद्योगांची उदाहरणे होत. गुंतवणुकीसाठी उपलब्ध असलेल्या पैशाचा ओघ या धंद्याकडे— निदान फार मोठ्या प्रमाणांत तरी वळता कामा नये.

काही असले तरी साहस पत्करून गुंतविल्या जाणाऱ्या भांडवलाचा ओघ भलतीकडे वळत आहे या म्हणण्यांत बरीच अतिशयोक्ती आहे. ज्यांच्याविषयी फारशी माहिती नाही अशा किंवा अन्य खाजगी कंपन्यांना नवीन भांडवल मिळविण्यासाठी आपल्या शेअर्सवर जादा उत्पन्न मिळत असल्याचे दाखवावे लागत असेल ( आणि अशा गुंतवणुकीचे परिणाम वाईट होतही असतील ). परंतु शेअर बाजारांत येणाऱ्या असंख्य शेअर्सच्या बाबतीत वरील कारणामुळे होणारा भांडवलाचा गैरवाजवी ओघ अगदी दुर्लक्ष करण्याजोगाच असतो.

या सूचनेला असलेला खरा विरोध जास्त मूलभूत स्वरूपाचा आहे. भांडवलदार निरनिराळया तऱ्हेने आपले भांडवल गुंतवीत असतात. ते कसे गुंतविले गेले आहे हे लक्षांत घेऊन या कराची अंमलबजावणी होत असते. म्हणजेच या कर आकारणीत एकसूत्रता नसते. याहीपेक्षा या करांत आणखी एक महत्त्वाची उणीव असते. ती म्हणजे संपत्तीधारकांना भांडवलापासून 'उत्पन्न देणारे' जे फायदे असतात त्यांना या करामुळे अजिबात हात लागत नाही. केवळ नेहमीचे उत्पन्न पायाभूत मानून बसविलेला कोणताही कर आणि मालमत्तेपासून येणाऱ्या उत्पन्नाबाबत केला जाणारा कोणत्याही प्रकारचा भेदाभेद क्रयशक्तीच्या बाबतीत असलेली विषमता नष्ट करण्यास असमर्थ ठरतो. बिन बचतीची शक्यता आणि भांडवली फायदे या दोन्ही कारणांमुळे क्रयशक्तीतील विषमता निर्माण झालेली

असते. ही सूचना अविचाराने केलेली आहे म्हणून नव्हे तर तीत अपुरेपणा आहे म्हणून तिच्यावर जास्त चर्चा झाली पाहिजे. काही अगम्य कारणास्तव इतर सर्व उपाय अयशस्वी ठरले तरच या उपायाची उठाठेव करणे योग्य ठरेल.

## ४. भांडवली नफ्यावरील कर

संपत्तीधारकाचे करपात्र उत्पन्न हे त्याच्या क्रयशक्तीचे महत्त्वाचे गमक आहे असे वाटत नसेल तर असा प्रश्न उद्भवतो की, कर आकारणीसाठी सध्या उत्पन्नाची जी व्याख्या केली जाते ती तर्कशुद्ध आणि बरोबर आहे की नाही? सध्याचे उत्पन्न व करपात्रता यांच्यातील सादृश्याचा अभाव हा टाळता न येण्यासारखा किंवा त्यातून मार्ग न सापडणारा असा आहे कां? आणि तसे असेल तर प्राप्तीकरांत सुधारणा करून परिस्थिती कधीच सुधारता येणार नाही कां? का करपात्र उत्पन्नाची कल्पनाच काहीशी अपुरी आहे. ?

एक ढोबळ उणीव अशी आहे की, उत्पन्नाच्या व्याख्येतून भांडवली नफा संपूर्णपणे वगळण्यात आला आहे. अर्थशास्त्रज्ञांनी उत्पन्नाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे : 'एका आठवडयात पैशाचा जास्तीत जास्त उपयोग करून मनुष्य आठवडयाच्या शेवटीसुद्धा तितक्याच सुखवस्तू परिस्थितीत राहू शकतो असे मूल्य.' म्हणजेच- "खर्च करण्याच्या ताकदीतील" नक्त वाढ किंवा "आर्थिक शक्ती.... किंवा ठराविक मुदतीत व्यक्तीच्या साधनसामुग्रीवरील हुकमतीत झालेली वाढ."

या व्याख्येप्रमाणे पाहिले तर भांडवली नफा उत्पन्नाच्या सदरात मोडेल असे दिसते. हे उत्पन्न आठवडयाभरात खर्च करता येऊनही पहिले भांडवल अगदी जसेच्या तसे राहूनसुद्धा आठवडयाच्या आरंभाइतकीच आठवडयाच्या शेवटीही ती व्यक्ती संपन्न राहू शकेल. या उत्पन्नामुळे क्रयशक्तीत निश्चित वाढ होईल आणि उत्पन्नावर जास्त ताबा राहील. आणि अर्थशास्त्रज्ञच नव्हे तर सर्वसाधारण पैसे गुंतविणारा माणूसही या संपत्तीला उत्पन्नच म्हणेल व भांडवल कमी होत जाईल असा विचार मनात न आणता हे उत्पन्न तो खर्च करील. म्हणून असे उत्पन्न करपात्र ठरावे हे अगदी तर्कशुद्ध ठरते आणि अमेरिकेत गेली कित्येक वर्षे ते तसे गणले जात आहे.

तर्कशास्त्र किंवा कर भरणाऱ्यांमधील समानता हा भाग जरी क्षणभर बाजूस ठेवला तरी उत्पन्नाची फेरवाटणी व्हावी या मुद्यावर असा कर बसवणे अगदी संयुक्तिक ठरते. हे कर ज्यांच्याजवळ संपत्ती आहे अशांवरच बसतात. आणि मागच्या प्रकरणात म्हटल्याप्रमाणे सध्याची संपत्तीची विभागणी नुसतीच मोठया प्रमाणात असमान आहे असे नाही तर संपत्तीचा बराच मोठा भाग वारसाहक्काने मिळालेला असल्यामुळे विषमतेच्या या पैलूचे कधीही समर्थन होऊ शकणार नाही. तात्पर्य खाजगी भांडवलाच्या अन्याय्य विभाजनात अनुस्यूत असलेले दुष्परिणाम भांडवली

नफा करमुक्त ठरविल्या कारणाने जास्त ठळकपणे दिसून येतात आणि कर आकारणीतही सूट दिल्या कारणाने भांडवलात वाढ होत जाते. त्याचप्रमाणे क्रयशक्तीतील असमानताही त्यामुळेच आणखी वाढीस लागते. म्हणूनच अशा फायद्यांवरील कर हा समाजवादी तत्त्वानुसार आवश्यक ठरतो.

शिवाय विकास पावणाऱ्या अर्थव्यवस्थेत भांडवली नफ्याचे प्रमाण बरेच मोठे असून त्याला अर्थव्यवस्थेत फार महत्त्व आहे. १९५० ते १९५४ या काळात फक्त शेअर बाजारात नोंदल्या गेलेल्या रोख्यांची किंमत पाच हजार दशलक्ष पौंडांनी वाढली. अर्थात त्यावेळच्या बाजारावर तेजीत धंदा करणारांचा विशेष प्रभाव असल्यामुळे ते शक्य झाले होते. पण सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या अर्थव्यवस्थेत खाजगी संपत्तीचे प्रत्यक्ष मूल्य सालिना निदान एक हजार दशलक्ष पौंडांनी वाढणे संभवनीय आहे. खाजगी संपत्तीचा एवढा मोठा वाढलेला भाग कष्टार्जित उत्पन्नावर जबर कर बसविला जात असताना करमुक्त ठेवणे मुळीच समर्थनीय ठरणार नाही.

रॅडक्लिफ समितीच्या अहवालात या कराच्या बाजूने व प्रतिकूल अशा आर्थिक कारणांची सांगोपांग चर्चा करण्यात आली आहे. तिचाच आता थोडक्यात परामर्ष घ्यावयाचा आहे. या कराच्या विरुद्ध केला जाणारा नेहमीचा युक्तिवाद म्हणजे, एक: चलन फुगवट्यामुळे भांडवली नफ्यात जी वाढ झालेली दिसते ती खरी वाढ नसते तर तो वाढीचा केवळ आभास असतो, हे खरे आहे. पण म्हणून त्यावर कर बसवू नये असा निष्कर्ष त्यावरून निघत नाही. ‘या वाढलेल्या नफ्यामुळे जे फायदे मिळत असतात तसेच फायदे करपात्र उत्पन्न खर्च केल्यामुळेही मिळत असतात. भांडवली नफा साचवून ठेवला गेला तर ते उत्पन्न फसवे म्हणावे लागेल हा युक्तीवाद सर्व प्रकारच्या बचतींबाबत करावा लागेल. फक्त भांडवलाच्या वाढलेल्या किंमतीबाबतच तो करून चालणार नाही. जर एखादा मनुष्य आपल्या मिळकतीतून नियमितपणे शिल्लक टाकून ती बचत ठेवीत किंवा विम्याच्या हप्त्यात खर्च करीत असेल तर चलन फुगवट्यामुळे त्याच्या साचलेल्या पैशाची खरी किंमतही खाली खाली जाऊ लागेल. मग या माणसात आणि भांडवलाची किंमत वाढल्यामुळे ज्याच्या भांडवलाची पैशाच्या रूपातील किंमत वाढली असेल अशा माणसात काहीच फरक राहणार नाही.’

वस्तुतः भांडवली नफ्यावर कर लादण्याच्या बाजूने हा एक बिनतोड युक्तीवाद आहे असे मानले जाईल. ज्याचे उत्पन्न ठराविक रकमेच्या स्वरूपातील असते– म्हणजे सेवानिवृत्त वगैरे– किंवा ज्यांचे उत्पन्न ठराविक व्याजाच्या कर्जरोख्यात असते अशांच्या मानाने जो संपत्तीधारक चलन फुगवट्यामुळे आपले उत्पन्न वाढवीत असतो त्याच्या क्रयशक्तीत त्यामानाने वाढच होत असते. चलनवाढीपूर्वी खरी संपत्ती विभागून देणे हे जर योग्य असेल तर चलनवाढीमुळे मिळणाऱ्या जादा

उत्पन्नावर, मनात नसताना केवळ संपत्तीचे, करावे लागणारे फेरवाटप टाळण्यासाठी, नुसते कर लादले जावेत.

दोन : असे म्हटले जाते की, व्याजाचे दर घसरल्यामुळे जे फायदे मिळतात तेही भ्रामकच असतात. कारण त्यामुळे पैसे गुंतविणाराचे पुढील उत्पन्न वाढत नाही हेसुद्धा खरे असेल. परंतु हेही त्या फायद्यावर कर न बसविण्याचे सबळ कारण होऊ शकत नाही. बचत ठेवीत पैसे गुंतविणाऱ्यांपेक्षा दीर्घ मुदतीच्या रोख्यात पैसे गुंतविणारांची बाजू खासच फायद्याची असते. कारण त्यांच्या व्यवहारात व्याजात होणारी घट त्याच्यापाशी असलेल्या रोख्यांची किंमत वाढल्यामुळे भरून निघते. काही झाले तरी या वटघटीमुळे त्यांना जे गमवावे लागत असते ते त्यांना वाकड्यातिकड्या मार्गाने परत मिळत असते. व्याजाचे दर खाली येणे ही दीर्घकालीन प्रवृत्ती दिसून येत नाही आणि व्याजाच्या दरात कधी वाढ तर कधी घट होत असली तरी त्यामुळे एकंदर आर्थिक परिस्थितीत म्हणण्यासारखा फरक पडत नाही.

परंतु भांडवलावरील नफ्याचे बरेच मोठे प्रमाण हे चलनवाढीमुळे किंवा व्याजाचा दर खाली आल्यामुळे वाढलेले नसते तर नफ्याचे वाढते प्रमाण व खाजगी उद्योगातील लाभांशाच्या वाटणीमुळे हे घडून येते. भांडवली फायद्याची वाढ अनियमित असते आणि ती वाढ मिळविणारा माणूस त्याच्या पाठीमागे लागलेला नसतो. म्हणून भांडवली फायद्यावर कर बसवू नये असा जो युक्तिवाद केला जातो त्यास यामुळे उत्तर मिळते. वार्षिक पगार मिळविणाऱ्यांपेक्षा किंवा ठराविक व्याजाचे उत्पन्न घेणाऱ्यांपेक्षा भांडवली नफा कमी नियमित असतो हे खरे. पण तसे पाहिले तर ( लेखक किंवा नट यासारख्यांच्या ) काम करून मिळविलेल्या उत्पन्नावर कर आकारला जात असतो. तथापी विकसनशील असलेल्या अर्थव्यवस्थेत भांडवली नफ्यात हळूहळू नव्हे तर किमान पक्षी ठराविक अंतराने वाढ होत जाते व भांडवलधारकांचे उत्पन्न म्हणून ती ओळखली जाते. श्रीमंत मनुष्य तर उत्पन्नातील ही वाढ, कालांतराने मिळणारी असली तरी, त्याच्या एकूण जमेच्या दृष्टीने महत्त्वाची समजत असतो आणि म्हणून पैसे गुंतविणारा माणूस अशा चढउताराची अपेक्षा करीत नसतो किंवा त्याच्यामागे लागत नसतो असे म्हणणे मूर्खपणाचे आहे. शेअर दलालांच्या गुंतवणुकीसंबंधीच्या कोठल्याही पत्रकावर नजर टाकली तरी असे दिसून येईल की, त्यात भांडवली फायदा नुसता अपेक्षितच नसतो तर भांडवल गुंतवणुकीचे ते प्रधान उद्दिष्ट असते.

शेवटचा आक्षेप, अपेक्षित उत्पन्नासंबंधीचा आहे. असे दाखविले जाते की, अमेरिकेतील करांपासून मिळणारे उत्पन्न सर्वसाधारणपणे फार मोठे असत नाही. आणि ब्रिटनमधील अंतर्गत महसूल समितीने भांडवली फायद्यावर प्राप्तीकर व सरटॅक्स द्यावा लागेल आणि मिळालेल्या वाढीवर तो आकारण्यात येईल असे

गृहीत धरून या करापासून सालीना पंचाहत्तर ते शंभर दशलक्ष पौंड उत्पन्न येईल असा अंदाज वर्तविला होता. परंतु हा अंदाज दोन महायुद्धांच्या दरम्यान भांडवलाच्या किंमतीत ज्या दराने वाढ झाली होती ती विचारात घेऊन करण्यात आला होता – हा काल निदान एका संपूर्ण व्यापारी आवर्तीचा आणि अर्थव्यवहाराच्या इतिहासातील भयानक मंदीचा होता. १९३१ सालसारखी मंदी पुन्हा कधी डोके वर काढणार नाही अशी कदाचित कोणाची कल्पना असेल किंवा व्यापारातील चढउताराचे हे चक्र जुन्या पद्धतीनुसारच फिरत राहील अशी त्यांची अटकळ असावी. वस्तुतः सर्वांना रोजगार उपलब्ध करून देण्यास आणि जलदगतीने विकास घडवून आणण्यास सगळेच पक्ष बांधलेले आहेत. आणि म्हणून युद्धपूर्व व्यापाराच्या संकेतावरून पुढील अंदाज बांधणे निरर्थक ठरते.

रॅडक्लिफ कमिशनच्या अहवालाला जोडण्यात आलेल्या भिन्न मतपत्रिकेत जे अंदाज दिले आहेत ते अधिक वास्तववादी म्हणता येतील. युद्धपूर्व काळातील उत्पादनाचा कल आधारभूत धरून, त्याचप्रमाणे एकूण नफा व कंपनीची राखीव शिल्लक यांचा विचार करून, या भिन्न मतपत्रिकेत असा निष्कर्ष काढण्यात आला आहे की, खाजगी भांडवलाच्या किंमतीतील वार्षिक वाढ ६०० ते १,००० दशलक्ष पौंडांच्या घरात जाईल. या आधारावर या कराचे सालीना नक्त उत्पन्न ( मृत्यू-कराच्या उत्पन्नात ओघानेच होणारी घट जमेस धरून ) फक्त प्राप्तीकरावरील करच धरला तरी १६० ते ३१० दशलक्ष पौंड येईल. हा आकडा विचारात न घेण्याइतका क्षुल्लक मुळीच नाही.

अशा करामुळे उत्पन्न वाढविण्याची प्रेरणा किंवा आर्थिक कार्यक्षमता यावर कोणता परिणाम घडून येईल ? अगदी खळबळजनक नसला तरी डोळ्यात भरण्याइतपत खर्च करण्याच्या प्रवृत्तीस त्यामुळे आळा बसून बचतीचे प्रमाण वाढेल. पुष्कळ वेळा भांडवली फायदा हा खर्च करण्यासाठीच मिळवावयाचा असतो आणि शेअरबाजारातील तेजीच्या काळात चैनीच्या वस्तूंचा खप विशेष प्रमाणात वाढलेला असतो हे सर्वश्रुतच आहे. प्रत्यक्ष पदरात पडलेल्या फायद्यांवर बसविण्यात आलेल्या करांमुळे बचतीत दोन प्रकारे वाढ होते. एकीकडे गुंतवणूक करणाराच्या पदरात कमी पैसे पडतात आणि तेवढ्याच प्रमाणात भांडवली शिल्लक वाढते तर दुसरीकडे पैसे गुंतविणाराला मिळालेला फायदा प्रत्यक्ष पदरात पाडून न घेण्यास किंवा तो खर्चून न टाकण्यास प्रोत्साहन मिळते. अर्थात याबद्दल तितकीशी खात्री देता येत नाही. तसेच आपल्या मिळकतीचे मूल्य वाढावे म्हणून मिळालेला हा फायदा बचत म्हणून साठविण्यास सरकार परवानगी देते.

मुद्दलाच्या वाढलेल्या मिळकतीवर कर आकारला जाणार नाही या आशेवर पैसे गुंतवणारी व्यक्ती खुशीने धोका पत्करण्यास तयार होते. परंतु असा कर बसविण्यात आल्यास या प्रवृत्तीवर त्याचा अनिष्ट परिणाम घडून येईल. व्यक्तीच्या

धोका पत्करण्याच्या या प्रवृत्तीवर जो परिणाम घडून येईल त्याचा स्वतंत्रपणे विचार करता येणार नाही. कंपन्यांवर त्याचा काय परिणाम होतो त्याचाही विचार करावा लागेल. भांडवली फायद्यावर फार मोठ्या प्रमाणावर करमाफी दिल्यास त्याचे काही सामाजिक आणि आर्थिक परिणाम घडून येतील अशी भीती वाटत असल्यामुळेच सरकार कंपन्यांच्या विरुद्ध कारवाई करते. त्याचप्रमाणे भांडवली फायद्याची व्याप्ती मर्यादित रहावी म्हणूनही काही उपाय अंमलात आणते. कंपन्यांवरील जबर कर, विभाजनावर बसविण्यात येणारा भेदजन्य कर आणि लाभांशावर मर्यादा घालण्यासाठी योजण्यात येणारे उपाय या तिन्ही गोष्टींचा उगम सरकारला वाटणाऱ्या भितीतच असतो. धंदा वाढविण्याबाबत ( उपलब्ध असलेले भांडवल कमी करणे आणि नव्या भांडवलाची विक्री करताना त्याची किंमत कमी करणे यासारखे दोन्ही प्रकारचे ) जे निर्णय घेतले जातात त्यामुळे काही अनिष्ट परिणाम घडून येत असले तरी गेल्या महायुद्धानंतरच्या काळात त्याबावत कमालीची अतिशयोक्ती करण्यात आली. परंतु भांडवलावरील नफ्यावर कर बसविण्यात आला तर त्यामुळे कंपन्यांवरील करांची पातळी खाली आणणे शक्य होईल ( किंवा कष्टार्जित उत्पन्नावरील कर कमी करणेही पसंत करता येईल ). आणि मग पत्करावा लागणारा धोका आणि आर्थिक भरभराट या दोहोंचा परिणाम फायदेशीरच ठरतो असे आढळून येईल.

तथापी भांडवल गुंतवणूक करण्याचा धोका पत्करण्यामागील वैयक्तिक दृष्टीकोणालाही थोडेफार महत्त्व असतेच. ( अर्थात भांडवली फायद्यावर जबर कर बसविल्यास छोटा भांडवलदार निरुत्साही होण्याची शक्यता असते. विशेषत. चलनवाढीच्या परिस्थितीत एखाद्या उद्योगाची उभारणी करून त्याहीपेक्षां मोठ्या उद्योगात पडण्यासाठी स्वतःच उभारलेला तो उद्योग विकून टाकण्यास तो सहसा तयार होणार नाही. ) कोणतेच पाऊल उचलले जावू नये ऐवढ्यासाठी हा युक्तिवाद नाही. परंतु मिळत असलेले इतर कायदे नेहमीच्या उत्पन्नांत संपूर्णपणे समाविष्ट करून चढत्या क्रमाने सरटॅक्स व प्राप्तीकर बसवावा या सूचनेच्या विरुद्ध हे प्रतिपादन आहे. या युक्तिवादात विशेष तथ्य असण्याचे कारण असे की, मोठी प्राप्ती असणाऱ्या गटाकडेच मुख्यतः भांडवलावरील हे फायदे जात असल्याने त्यावरील कराची आकारणी फार मोठ्या प्रमाणावर म्हणजे पौंडामागे १८ शिलिंग सहा पेन्स इतकी होत असते. अशा भारी दरामुळे धोका पत्करण्याच्या प्रवृत्तीवर अतिशय तीव्र आघात होईल, इतकेच नव्हे तर संपत्तीधारकांना तिचे विभाजन करण्याचा मोह उत्पन्न होऊन त्यामुळे बचतीवर अनिष्ट परिणाम घडून येतील. म्हणून अशा फायद्यावर फक्त प्राप्तीकरच घेण्यात यावा; त्यावर सरटॅक्स बसवू नये. असे झाले म्हणजे कर एकाच दराने आकारला जाईल आणि एकूण उत्पन्नावरील प्राप्तीकर नेहमी ज्या दराने घेतला जात असेल त्यापेक्षा हा दर जास्त असेल.

कर वाढत्या दराने न आकारता एकाच सारख्या दराने आकारला जावा याचे आणखीही एक कारण आहे. पुढच्या परिच्छेदात दिलेल्या कारणास्तव हा कर वसूल झालेल्या फायद्यापुरताच मर्यादित ठेवण्यात आला तर अनेक वर्षात मिळून झालेल्या भांडवलवृद्धीवर एकाच वर्षात तो आकारला जाईल. सहजासहजी खरेदी विक्री होणाऱ्या कर्ज रोख्यांचा मालक मग सहाजिकच ते कर्जरोखे परतफेडीसाठी केव्हा रुजू होतात त्याचा हिशेब करून त्यामानाने एक वर्षातच सरासरी कराचा बोजा वाढू नये असा प्रयत्न करील. परंतु एकाच वर्षी मुदत संपणारे रोखे एकत्र येऊ न देणे काही जणांना जमणार नाही. आणि कराचा दर वाढत्या प्रमाणावरील असेल तर अशा व्यक्तींना त्याची वाजवीपेक्षा अधिक झळ बसेल. उदाहरणार्थ चालू स्थितीतील एखादा धंदा विकला गेला असेल अशा वेळी किंवा जेथे भांडवल सहजासहजी बाजारांत येऊ शकत नाही आणि मोठ्या प्रमाणातच ते विकावे लागते अशा कोणत्याही परिस्थितीत ही झळ जास्त असेल.

कारभारविषयक किंवा शासकीय अशा महत्त्वाच्या कारणास्तव हा कर केवळ कागदावर दिसणाऱ्या फायद्यावर न बसता, प्रत्यक्ष मिळालेल्या फायद्यावरच बसवावयास हवा. बाजारातील ह्या वर्षीच्या घडामोडी काटेकोरपणाने लक्षात घेऊन भांडवलाच्या अचूक वार्षिक मूल्यमापनाचा विचार करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. शिवाय हाती आलेल्या फायद्यावर कर बसविण्यात आला काय, किंवा येणे असलेल्या फायद्यावर तो वसूल केला गेला काय, अंतत: त्यात काहीच फरक पडत नाही. कारण देणग्या आणि वारसा हक्काने आलेली संपत्तीही प्रत्यक्ष जमा झालेली संपत्ती समजण्यात आली–आणि तशी ती समजण्यात आलीच पाहिजे–तर उत्पन्नाचे हे दोन्ही प्रकार (अर्थात कोणत्या वेळी हे उत्पन्न हाती येते हा मुद्दा त्या व्यक्तीच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो.) साधारणपणे कर भरणाराच्या दृष्टीने सारखेच महत्त्वाचे ठरतील (उदाहरणार्थ जो माणूस आपले भांडवल दुसरीकडे नेत नाही अशा माणसाच्या दृष्टीने हा कर म्हणजे दुसरा मृत्यूकरच ठरेल).

थोड्या मुदतीत मिळालेला नफा आणि दीर्घ मुदतीत मिळालेला नफा यामध्ये अमेरिकेतील कर पद्धतीत जो फरक करण्यात येतो त्याबाबत विशेष तपशीलवार चर्चा करण्यासारखे फार थोडे आहे. प्रत्यक्ष झालेले तोटे आणि प्रत्यक्ष मिळालेले फायदे यांची वजावट करण्याची (अर्थात इतर उत्पन्नाच्या बाबतीत नव्हे) आणि नक्त नफा किंवा तोटा पुढील सालाकरता ओढण्याची मुभा असावी, अंमलबजावणीतील अडचणी टाळण्यासाठी निदान सुरुवातीला तरी हा कर धंदा विकल्यामुळे झालेला फायदा त्याचप्रमाणे शेअर्स, रोखे आणि दृष्य मिळकतीच्या विक्रीतून झालेल्या नफ्यापुरताच मर्यादित असावा. किरकोळ फायदा किंवा लहानसहान मिळकती यांना वगळण्यासाठी करात सूट किती द्यावयाची त्याची मर्यादा ठरवून दिलेली असावी आणि मालक स्वत: रहात असलेले घर विकून त्याला नफा झाला असला, पण तो

नफा त्याने स्वतःसाठी दुसरे घर विकत घेण्यासाठी खर्च केला असला तर असा नफा करमुक्त असावा.

भांडवली नफ्यावर कर बसविल्यास काकू करण्याचे काहीच कारण नाही. अमेरिका आणि अन्य देशातील अनुभव असा आहे की, असा कर बसवणे अगदी व्यवहार्य ठरते. युद्धानंतरच्या लगेचच्या काही वर्षात महसूल खात्यातील नोकरवर्ग अपुरा आणि जादा कामाने वाकलेला होता. त्यावेळी सहाजिकच शासकीय अडचणी अनुल्लंघनीय भासल्या. या करापासून बहुधा फारसे उत्पन्न मिळू शकणार नाही. तथापि व्यक्ती–व्यक्तीच्या संबंधातील न्यायाची भावना आणि वर्ग–वर्गातील समानता या दोन्ही दृष्टीने असा कर निश्चितच अत्यंत समर्थनीय ठरतो.

## ५. संपत्तीच्या असमाधानकारक विभागणीवरील संयुक्त हल्ला

या दोन प्रकरणात सुचविलेल्या उपायांची एकत्रितपणे अंमलबजावणी करण्यात आली तर संपत्तीतील विषमता बऱ्याच प्रमाणात कमी होईल. विशेषतः पुढील प्रकरणात ज्या औद्योगिक धोरणाची चर्चा करण्यात आली आहे त्या धोरणाची या संकल्पित उपायाला जोड मिळाली तर हे कार्य सूकर होईल. शेअर्सच्या किंमती भरमसाठ वाढू नयेत हाच या औद्योगिक धोरणामागील उद्देश असतो. जबरदस्त भांडवली कर बसविला तर समाजाचे रूप चटकन पालटू शकले तसे वर उल्लेखिलेले उपाय योजल्यामुळे ते बदलू शकणार नाही. परंतु यापूर्वीच मी असा मुद्दा मांडला आहे की, जबरदस्त भांडवली कराचा हा मार्ग अवलंबिणे शहाणपणाचे ठरणार नाही. या सर्व उपायांची एकत्रितपणे अंमलबजावणी केली तर त्यामुळे संपत्तीची योग्य व समान विभागणी होण्याच्या दृष्टीने हळूहळू प्रगती घडून येईल.

सरतेशेवटी गैरसमजाला जागा राहू नये (कदाचित ते अपरिहार्य असतील) म्हणून मला हे स्पष्ट केले पाहिजे की, विशेषतः वारसा हक्काने मिळालेल्या संपत्तीत समानता यावी, मोठमोठ्या संपत्तीच्या बाबतीत तर हे प्रकर्षाने घडून यावे हाच या सर्व उपायांमागील हेतू आहे. त्यापैकी कोणत्याही उपायांमुळे कष्टार्जित मिळकतीला धक्का पोहोचत नाही, तसेच ठराविक मर्यादेपर्यंत सूट मिळण्याची तरतूद असल्यामुळे लहान आणि मध्यम आकाराच्या बचतींचे त्यापासून परिणामकारक संरक्षण होते. संपत्तीचे अन्याय्य विभाजन हेच विषमतेचे सर्वात प्रमुख आणि सर्वस्वी असमर्थनीय असे कारण आहे. वर उल्लेखिलेले सर्व उपाय अमलात आणल्याने वस्तुतः त्याचे हळूहळू संपूर्ण उच्चाटन करता येईल. ज्या प्रमाणात हे साध्य होत जाईल त्या प्रमाणात छोट्या मालमत्तेच्या वाढीस आणि स्वकष्टार्जित उत्पन्नावर कर बसविण्याच्या बाबतीत जास्त अनुकूलता दर्शविण्याच्या दृष्टीने अधिक सक्रीय प्रोत्साहन देणे शक्य होईल. एकूण कष्टार्जित उत्पन्नातील भाड्याचा भाग दूर करण्यासाठी योजलेले इतर उपाय यशस्वी झाले तर हा कर अधिकच उपयुक्त

ठरेल. लहान लहान बचती किंवा उद्योगधंदे आणि उपक्रमशीलता यावर समाजवाद्यांचा रोष नसतो. सामाजिक न्याय, आणि खरीखुरी समान संधी उपलब्ध करून देणे हे त्यांचे ध्येय असते. एकदा हे ध्येय साध्य झाले आणि वारसा हक्कामुळे निर्माण होणाऱ्या समस्या दूर झाल्या म्हणजे स्वकष्टार्जित उत्पन्नावरील कराचे ओझे हलके करणे आणि संपत्तीच्या असमान विभागणीमुळे वैयक्तिक श्रम किंवा साहस यापासून मिळणारे फायदे आज जे कराच्या रूपाने हिरावून घेतले जातात, त्याचा त्यांना पुन्हा उपभोग घेऊ देणे आपल्याला सहज शक्य होईल.



प्रकरण सोळावे

# उद्योगधंद्यातील सत्ता आणि विशेषाधिकार

## १. कामगारांचा दर्जा

सरतेशेवटी माणसामाणसातील अंतर कायम ठेवणाऱ्या आणखी दोन मुद्यांचा विचार करावयाचा. ते मुद्दे म्हणजे सत्तेची असमान विभागणी आणि बिनकिफायतशीर धंद्यांची प्रतिष्ठा. आठव्या प्रकरणात स्पष्ट केल्याप्रमाणे या दोन मुद्यांपैकी विशेषतः पहिल्या मुद्याला राजकीय, आर्थिक किंवा सामाजिक अशा निरनिराळ्या बाजू आहेत. परंतु सामाजिक व आर्थिक सुधारणांचा विचार करताना मोठ्या धंद्यांवर त्याचा जो आघात होतो तो अत्यंत महत्त्वाचा असतो कारण त्या आघाताचा बऱ्याच लोकांशी संबंध पोहोचतो आणि कामासंबंधीच्या संबंधाचा सामाजिक दृष्टी-कोणावर अद्याप जबरदस्त पगडा असतो.

पहिल्या प्रकरणात असे सूचित केले होते की, गेल्या दोन दशकातील बदलां-मुळे (मजुरांचा पुरवठा, औद्योगिक क्षेत्रात आणि राजकारणात डाव्या गटांचे प्राबल्य, आणि धंद्यांतील अंतर्गत क्रांती) कामगारांची परिस्थिती मालकांशी तुलना करता खूप सुधारली आहे. आणि आता मालकाला एकतर्फी किंवा आरेरावीने काहीही करणे शक्य नाही. तरी अजूनही विशेषतः मोठ्या उद्योगधंद्यांत प्रतिष्ठा, विशेषाधिकार किंवा सत्ता यांच्या बाबतीत बरीच असमानता दिसून येते.

पीटर ड्रुकरसारख्या लेखकांनी काही वेळा व्यापक समाजशास्त्रीय परिभाषेत या मुद्याची चर्चा केलेली आढळते. असे म्हटले जाते की, 'ठोक उत्पादनातील जाग-तिक क्रांतीने' कामगाराचे तंत्रवैज्ञानिक क्षेत्रातील स्थान व्यवहारात खालीच आले आहे. अशा उत्पादन प्रक्रियेत गुंतलेल्या कामगाराला औद्योगिक युगापूर्वीच्या कसबी कारागिरांच्या मानाने कोणतीच व्यक्तिगत कामगिरी किंवा जबाबदारी पार पाडावी लागत नाही. जे स्वतः काही निर्माण करू शकतील असे कलाकार किंवा

व्यावसायिक लोक अगदीच अल्पसंख्येत असतात. इतर सर्वांना काहीही निर्माण करावयाचे असले तरी त्यासाठी एखाद्या संघटनेवर अवलंबून रहावे लागते. जेव्हा एकच काम पुन्हा पुन्हा करावे लागते अशा वेळी कामगार म्हणजे निष्काळजीपणाने बनलेले आणखी एक यंत्रच होऊन बसतो आणि कामाबाबतची त्याची वैयक्तिक जबाबदारी एकीकडे कमी होत जाते तर त्याचबरोबर शैक्षणिक दृष्टचा तो अधिकाधिक प्रगल्भ बनत जातो आणि त्याच्या कामाव्यतिरिक्त इतर जबाबदारीची व्याप्तीही वाढत असते. याचा परिणाम असा होतो की, त्याच्या फुरसदीच्या वेळांतील त्याचे स्थान आणि तो काम करीत असतांनाचा दर्जा यात डोळ्यात भरण्यासारखा फरक दिसून येतो.

यात अजिबात अतिशयोक्ती नाही असे कोणी म्हणेल तर त्यावर विश्वास बसणे कठीण आहे. ठोक उत्पादनातील क्रांतीमुळे वस्तू उत्पादन करताना एकेका कामगाराला त्यातील विशिष्ट काम नेमून देऊन तेच पुन्हा पुन्हा करवून घेण्याची प्रक्रिया (Assembly line) निर्माण होते. परंतु आपण एकूण कामगारवर्गाचा साकल्याने विचार केला तर या प्रक्रियेबरोबरच बिनकसबी कामगारांच्या संख्येच्या प्रमाणातही लक्षात येण्यासारखी घट झाली आहे. अमेरिकेत एकूण कामगारात सध्या बिनकसबी कामगारांचे प्रमाण २० टक्के कमी आहे तर निमकसबी कामगारांचे प्रमाण बावीस टक्क्यापर्यंत वाढले आहे आणि कसबी कामगार, कारकून व इतर व्यावसायिक नोकरवर्ग यांचे प्रमाण बेचाळीस टक्क्यांपर्यंत आहे. स्वयंचलित यंत्रांच्या बाबतीत बिनकसबी कामगारांच्यामानाने कसबी कामगार जेथे अतिशय जास्त (जवळ १०० टक्के) असावे लागतात, तेथे कसबी व बिनकसबी कामगारांचे प्रमाण असेच वाढत जाणार. आणि मग चार्ली चॅपलिनने आपल्या मॉडर्न टाईम्स या सिनेमात दाखविलेला नमुनेदार कामगार हा तीच ती क्रिया एकसारखी करीत राहणारा यांत्रिक माणूस राहणार नाही तर तो स्वयंचलित कारखान्यातील यंत्रांची माहिती असणारा आणि त्यावरील गुंतागुंतीच्या नोंदी करून घेणारा अत्यंत निष्णात असा कामगार बनेल.

ते कसेही असले तरी ठोक उत्पादन करण्याचे जे दुसरे परिणाम होत असतात त्याबाबत मतभेद संभवत नाही. एकाच केंद्रातून सर्व निर्णय घेण्याची आणि सत्ता अधिकाधिक थोड्या लोकांच्या हाती केंद्रित होण्याची प्रवृत्ती निर्माण होते. याचा परिणाम असा होतो की, सत्ता कोठे तरी दूर केंद्रित झाली आहे असे वाटते. हा परिणाम खालच्या पातळीवर सत्ता सरळ समोरासमोर गाजविण्याच्या अधिकारात प्रतिबिंबित होतो. अर्थात छोटे धंदे असणाऱ्या समाजात ज्या प्रमाणात ही सत्ता अस्तित्वात असते त्यापेक्षा ठोक उत्पादन करणाऱ्या समाजात ती कितीतरी अधिक असते.

या सत्तेची फेरवाटणी करून तिच्यातील बराचसा भाग धंद्यातील इतर

गटांकडे राहू न देता तो कामगाराकडे हस्तांतरित करावा. या म्हणण्याचे समर्थन समाजात अधिक समानता प्रस्थापित करण्याची पहिल्या प्रकरणात जी दोन कारणे दिली आहेत त्यापैकी एका कारणास्तव करता येईल. कारणे म्हणजे सामाजिक समाधान आणि सामाजिक न्याय.

## २. औद्योगिक असंतोषाची कारणे

या प्रश्नाची सामाजिक समाधानाच्या दृष्टिकोणातून चर्चा करू लागलो तर आपणाला गुंतागुंतीच्या परिस्थितीला तोंड द्यावे लागेल. कारण समाजांत जे असमाधान पसरलेले असते त्याच्या निदानाबाबत तज्ज्ञांचे मतभेद असतात असे नव्हे तर त्यावरील तोडगा म्हणून ज्या निरनिराळ्या सुधारणा सुचविल्या जातात त्यावरही व्यवहार्यतेच्या दृष्टिकोनांतून अत्यंत जोरदार आक्षेप घेतले जातात.

निरनिराळ्या देशांची आपण तुलना करू लागलो म्हणजे लगेच सामाजिक असंतोषाची कारणे शोधून काढण्यातील अडचणी पुढे उभ्या राहू लागतात. मी नवव्या प्रकरणात असे सूचित केले होते की आपण काही मर्यादेपर्यंत, उद्योग धंद्यांतील ही कटुता, उदासिनता, आणि संताप राहू दिला आहे. बेकारी आणि घसरगारी मजुरी यांसारखी असंतोषाची कारणे शिल्लक राहिलेली नसतानासुद्धा वरील तीन गोष्टी टिकून राहाव्यात हे विशेषच आश्चर्यकारक वाटते. इतर देशांत आपल्याप्रमाणेच मोठ्या प्रमाणावरील उद्योग असूनही तेथे हे संतापाचे वातावरण आढळत नाही. आपल्यापेक्षा त्या देशांत उद्योगांचे फार मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीयीकरण झाले आहे, तेथे औद्योगिक लोकशाही विशेष विकसित झाली आहे, किंवा कामगारांना उद्योगांत सहभागी करून घेण्यांत आले आहे अशातला काहीहीं प्रकार नाही. औद्योगिक संबंध कमालीचे सलोख्याचे आहेत आणि संप क्वचित घडून येतात अशा स्वीडनमध्ये, त्याचप्रमाणे जेथे कामगार संघटना आपल्यापेक्षा जास्त लढाऊ आहेत आणि औद्योगिक क्षेत्रातील संघर्ष अधिक उग्रस्वरूपाचे असतात अशा अमेरिकेतही आपल्या इतका वर्गीय असंतोष एकसारखा धुमसत नसतो किंवा मालक आणि मजूर यांच्यातील झगडा कधी मिटणारच नाही अशीही भावना नसते. त्याचप्रमाणे कोणाला जादा नफा झाला किंवा कोणी जादा लाभांश वाटला तर त्याबद्दलही शत्रुत्वाची भावना नसते. आणि या तीन देशांपैकी फक्त ब्रिटनमध्येच औद्योगिक क्षेत्रांत महत्त्वाचे बदल घडून यावेत—मग ते राष्ट्रीयीकरणाच्या स्वरूपाचे असोत वा कामगारांच्या नियंत्रणाच्या स्वरूपातील असोत– म्हणून सतत दडपण येत असते यावरून ही तफावत दिसून येते.

यासारखेच औद्योगिक संबंध आणि मालकी हक्क असलेल्या इतर देशांतील उद्योगांच्या बाबतीत नवव्या प्रकरणात म्हटल्याप्रमाणे हा फरक सामाजिक समतेच्या कमी–जास्त प्रमाणातील आहे असे कोणी सांगू लागेल तर त्यावर विश्वास

ठेवणे कठीण आहे. इतर देशांत संघर्षाबाबतची जाणीव कमी आहे याचे कारण तेथील कामगाराला असे वाटते की, त्याला व्यवस्थापनाच्या श्रेणीपर्यंत पोहोचण्याची वाजवी संधी मिळू शकेल. त्याला असा संशय येत नाही की, त्याचा वरिष्ठ अधिकारी हा केवळ वशिलेबाजीने, वंशपरंपरेने किंवा वायद्यांच्या संपत्तीच्या जोरावर त्या जागेवर आलेला आहे. तसेच तेथील कामगार स्वतःला सामाजिक दृष्टया कोठल्याही तऱ्हेने कमी प्रतीचा मानीत नाही—तो सुद्धा व्यवस्थापकाप्रमाणे स्वतःच्या मोटारीतून कामाला जात असतो, दोघांना शिक्षणही जवळजवळ सारखेच मिळालेले असते आणि दोघांच्या राहणीमानांतही तशी विशेष तफावत नसते. आणि शेवटची बाब अशी की, कामगार आणि व्यवस्थापक वर्गातील लोक एकाच वेळी कामावर येत असतात तसेच कामगार आणि कर्मचारी असा भेदाभेद करून सामाजिक क्षेत्रांत खास अशा सवलतींवर व्यवस्थापक वर्ग क्वचितच हक्क सांगत असतो.

हा मुद्दा विशेष महत्त्वाचा आहे. ब्रिटिश उद्योगांत पैशाव्यतिरिक्त प्रतिष्ठेमुळे मिळणाऱ्या फायद्याचे स्वरूप कमालीचे व्यापक असते. आणि त्यांचे कायम अस्तित्व सदैव तापदायक ठरलेले आहे. उद्योगांतील शिस्तीच्या किंवा प्रोत्साहकांच्या कारणास्तवही अशा फायद्यांचे समर्थन करता येणार नाही. कारण ज्या अमेरिकन उद्योगांतील कार्यक्षमता निर्विवाद आहे तेथे असले फायदे फारच थोडया प्रमाणात दिसून येतात. जेव्हा एखादी अमेरिकन कंपनी, अमेरिकन व्यवस्थापक व पर्यवेक्षक अधिकारी यांच्या मदतीने ब्रिटनमध्ये एखादा उद्योग उभारतात त्यावेळी विशेषाधिकाऱ्यांच्या बाबतीतील या दोन देशातील तफावत विशेषच जाणवते. फॉले येथील एसोचा तेलशुद्धीकरणाचा कारखाना हे या प्रवृत्तीचे उत्तम उदाहरण आहे हे पुराव्यानिशी सिद्ध करता येईल. या कारखान्याच्या अहवालात पर्यवेक्षी कर्मचारी वर्ग आणि इतर यांच्या स्थानांतील 'विषमतेच्या प्रतीका'वर सर्वात कमी भर देण्यात आला आहे. अमेरिकन नोकरवर्ग इतर कामगारांइतकेच तास काम करी, घाणेरडे काम करण्याची जरूर असेल त्यावेळी त्यालाही तो मागे नसे, इतर कामगारांना समानतेने वागवी आणि पर्यवेक्षक व साधा मजूर यामध्ये आपल्याकडे दिसून येणाऱ्या लब्धप्रतिष्ठितपणाच्या प्रवृत्तीचा त्यांच्यात लवलेशही नसे. सामाजिक बंधनांचा हा उघडउघड दिसून येणारा अभाव, उत्तम व्यवस्थापन आणि शिस्त यात कोणत्याही प्रकारची कमतरता तर येऊ देत नाहीतच उलट व्यवस्थापक व नोकर यांचे संबंध चांगले राहण्याचे ते एक प्रमुख कारण ठरते व त्यामुळे उद्योगांची कार्यक्षमताही वाढते.

प्रतिष्ठेतील ही असमानता घालविण्यासाठी बऱ्याच निरनिराळया आघाडयांवर उपाययोजना करावी लागेल. सामाजिक सेवा उपलब्ध करून देऊन आणि कर-आकारणीबाबत विशिष्ट धोरणाचा अवलंब करून अप्रत्यक्षपणे ही असमानता कमी करणे शक्य आहे. ब्रिटनमध्ये तीव्रतेने वसत असलेली वर्गभावना पूर्वीच्या प्रकरणात

दाखविल्याप्रमाणे शैक्षणिक आणि इतर बदलांमुळे कमी होत जाईल. आणि त्यामुळे
व्यवस्थापक वर्गाच्या अंगात भिनलेली सामाजिक श्रेष्ठत्वाची भावना नाहीशी
होईल. कामगार चळवळीमुळेही ही भावना क्षीण होऊ लागेल. त्यासाठी देवाण-
घेवाण करून सामुदायिक फायदे मिळविण्याचे क्षेत्र विस्तृत करावे लागेल. आणि
निवृत्ती वेतनयोजना, पगारी सुट्ट्यांत वाढ, आजारीपणातील सवलती यासारख्या
वेतनविरहित फायद्यांची बरोबरी करू शकणाऱ्या योजना अंमलात आणण्यासाठी
दिवसेंदिवस अधिकाधिक प्रत्यक्ष दबाव आणण्याची आवश्यकता आहे. अर्थात कामगार
संघटना सध्याही थोड्याफार प्रमाणात हे काम करीत आहेत. या सर्वांचे पर्यवसान
रोज मजुरी व जादा पगार यामधील उरलेला सामाजिक भेदाभेद नष्ट करण्यात
आणि त्याचवेळी कामगाराला ठराविक वार्षिक पगाराची हमी देण्यात होईल.

ब्रिटनमध्ये खोलवर पसरलेला असंतोष हा सर्वस्वी औद्योगिक क्षेत्रातील
अंतर्गत कारणामुळेच उद्भवलेला असतो असे नाही तर अंशतः ते सामाजिक
असंतोषाचेही लक्षण असते. म्हणजेच वेगळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास, काम
आणि उत्पादनविषयक संघर्ष याबाबतचा असंतोष ही अंशतः मानसिक बदला-
बदलीची किंवा समर्थनाची प्रक्रिया आहे हा सिद्धांत जर खरा असेल तर या
दुखण्यातून मुक्त होणे ही एक प्रदीर्घ प्रक्रिया ठरेल. तिचे यशापयश आपण या
अगोदरच्या प्रकरणात चर्चिलेल्या समानताविषयक व्यापक उपायांची अंमलबजावणी
करण्यात कितपत यश येते त्यावर अवलंबून राहील.

याला औद्योगिक क्षेत्रांतर्गत अशीही काही कारणे आहेत. ब्रिटन व अमेरिका
यातील दुसरा महत्त्वाचा फरक म्हणजे अमेरिकेन कामगारांबरोबरचे संबंध आणि
नोकरवर्गविषयक व्यवस्था या सर्व प्रश्नाकडे जास्त लक्ष पुरविले जाते. व्यवस्थापन
कार्यातील हा एक मध्यवर्ती आणि विशेष व्यासंगाची जरूरी असलेला असा विषय
समजला जातो आणि त्याचा अभ्यास ब्रिटनपेक्षा अमेरिकेत जास्त गंभीरपणे आणि
पद्धतशीरपणे केला जातो. याचा परिणाम असा होतो की, साधारणपणे व्यवस्था-
पकीय विभागाची वृत्ती जास्त कल्पक, पुरोगामी आणि कामगारविषयक धोरणाच्या
बाबतीत अधिक समजूतदारपणाची असते व त्यामुळे कामगारांबरोबरचे त्यांचे संबं-
धही अधिक चांगले असतात.

तसेच अमेरिकेतील कामगार जास्त नफा आणि लाभांश यांच्याविषयी कमी
संशयी आहेत. कारण त्यांची अशी खात्री असते की, उत्पादनात कोणत्याही प्रकारची
वाढ झाली तरी त्यातील मोठा हिस्सा वेतनाच्या रूपाने त्यांच्या पदरात पडणारच.
आणि वस्तुस्थिती तशीच आहे. तेथे वरचेवर वेतनवाढ होत असते आणि उत्पादना-
तही भराभर वाढ होत असल्याने वेतनातील वाढही खूप मोठी असते. खुद्द व्यव-
स्थापक वर्गातही पगारवाढीला अनुकूल अशीच विचारप्रणाली बनत असते. १९५०

नाली यूएडब्ल्यू. ( युनायटेड अटोमोबाइल वर्कर्स ) आणि जीएम्. ( जनरल मोटार्स) यांच्यात घडून आलेल्या सुप्रसिद्ध करारापासून मजुरीच्या दरातील वाढ, उत्पादनातील वाढ गृहीत धरुन काही वर्षे आधीच निश्चित करावी (आणि राहणीमानाच्या खर्चात वाढ झाल्यावरही मजुरीच्या दरात वाढ व्हावी) अशीही मागणी कामगार संघटनांकडून होत आहे. साहजिकच, त्यांच्या श्रमांच्या मोबदल्याच्या बाबतीत त्यांची फसवणूक केली जाईल, अशी संशयी भीती कामगारांना सहसा वाटत नाही. आपल्या हिताचे रक्षण निश्चितपणे केले जाईल अशी त्यांची खात्री असल्यामुळे नफ्यातील वाटा इतर गटांकडे गेला तरी त्याबद्दल त्यांच्या मनात फारशी अढी रहात नाही.

## ३. स्थानिक व्यवस्थापनाचे महत्त्व आणि मालकी हक्काचे गौणत्व

म्हणजे ब्रिटनमधील कामगारांच्या असंतोषाचे मूळ, प्रत्यक्षपणे आपल्या औद्योगिक ढाचात नसून सर्वसाधारणपणे ते आपली समाजरचना, व्यवस्थापनाचा दर्जा आणि जादा वेतनाचा पुरस्कार करणाऱ्या निश्चित विचारप्रणालीचा अभाव यात असावे. अमेरिकेच्या मानाने जवळजवळ तेवढयाच आकाराच्या व तशाच स्वरूपाच्या संघटना असलेल्या ब्रिटनमधील औद्योगिक संस्थांच्या नीतिधैर्यांत जी कमालीची तफावत दिसून येते त्यामुळे व्यवस्थापन आणि खुद्द त्या उद्योगांचा ढाचा याला विशेष महत्त्व नसल्याचे प्रकर्षाने ध्यानात येते.

एकूण परिस्थितीचा साकल्याने विचार केला तर असे आढळून येते की, कामगारांबरोबरचे संबंध आणि व्यवस्थापकीय वर्ग व कामगार यांच्यातील खरीखुरी सहकार्याची वृत्ती बऱ्याच कारखान्यांतून पहावयास मिळते. जेथे व्यवस्थापकवर्ग कार्यक्षम असूनही प्रगल्भ विचारांचा असतो आणि जेथे मजुरीच केवळ सरासरीपेक्षा अधिक असते असे नाही तर कल्याणकारी सुविधा चांगल्या असतात आणि ते कारखानेही तांत्रिकदृष्टया कार्यक्षम आणि आधुनिक यंत्रसामुग्रीने सुसज्ज असतात. त्याचबरोबर (आणि हा मुद्दा बहुधा अधिक महत्त्वाचा असावा) कामगारविषयक अधिकारी हे चांगले प्रशिक्षित असतात, पर्यवेक्षी कर्मचारी आपल्या कामात अधिक तरबेज असतात आणि कामगार प्रतिनिधींकडूनही त्यांच्या भावी योजना आणि मागील प्रगती यासंबंधी भरपूर माहिती उपलब्ध होत असते. तसेच कामगारांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडण्यासाठी प्रभावी यंत्रणा अस्तित्वात असते. अशा कारखान्यांत भाग धारकांना भरपूर लाभांश मिळत असला आणि शिस्त कडक असली व संयुक्त सल्लागार समित्या औपचारिकपणे अस्तित्वात नसल्या तरीही तेथील कामगारांचे नीतिधैर्य खूप चांगले असते.

हे कारखाने मुख्यत्वेकरून असे असतात की, जेथे अमेरिकेतील उद्योगांप्रमाणे

कामगारविषयक व्यवस्थापन पुरोगामी दृष्टी असलेले असेल याकडे लक्ष पुरविले जाते. मागे उल्लेख केलेल्या फाउले तेल शुद्धीकरण कारखान्याची जी पहाणी करण्यात आली आहे त्यावरून या संबंधीच्या अभ्यासास उपयुक्त ठरेल अशी खूप माहिती उपलब्ध झाली आहे. त्या ठिकाणी औपचारिकपणे एकत्र येऊन विचार-विनिमय करण्याचा प्रयत्न करण्यात आला नाही. ब्रिटनमध्ये नेहमी पहावयास सापडते त्याहूनही तेथील शिस्त जास्त कडक होती. प्रतिनिधींचे अधिकार नेहमीपेक्षा बरेच कमी करण्यात आले होते आणि वेतन व कल्याण–सवलतीसुद्धा साधारणपणे असतात त्या मानाने विशेष जास्त नव्हत्या.

तरीसुद्धा कामगारांबरोबरचे संबंध कमालीचे सलोख्याचे होते. याचे कारण व्यवस्थापनाच्या कामगारांसंबंधीच्या पुरोगामी धोरणात सापडते. कामगार संघटनां-बरोबर सहसा कोठेही आढळणार नाही इतके सहकार्य होते. तक्रारींचे निवारण करण्यासाठी व्यवस्थितपणे काम करणारी यंत्रणा होती आणि तक्रारी शक्यतोवर जागच्या जागी आणि तातडीने मिटविण्याची तयारी होती. त्याचबरोबर काम-गारांच्या बरोबरीने आणि कामगारांइतकेच काम करणारा कर्तृत्ववान पर्यवेक्षी अधिकाऱ्यांचा मोठा वर्गही होता. हे सर्व अधिकारी कारखान्यात काय आणि कसा करता चालले आहे त्याची साद्यंत माहिती जास्तीत जास्त कामगारांपर्यंत पोहोचावी म्हणून सतत प्रयत्नशील असत. हे अधिकारी कामगारांना कधीही भेटू शकत असत असे त्या पहाणीत आढळून आले. निराळ्या शब्दात सांगावयाचे तर पुरोगामी आणि बुद्धिमान व्यवस्थापकांकडून कामगारविषयक संबंधांना सर्वात वरचे स्थान देण्यात येत असे. त्याचा परिणाम असा होई की, औपचारिक स्वरूपाची संयुक्त यंत्रणा अस्तित्वात नसूनही कामगाराची अशी भावना असे की त्या कारखान्याचा तो एक महत्त्वाचा घटक आहे आणि त्यालाही तेथे मानाचे स्थान आहे.

यावरून हे स्पष्ट होईल की, एखाद्या विशिष्ट चौकटीत खेळीमेळीचे वातावरण कितपत राहते ते मुख्यतः त्या कारखान्यातील व्यवस्थापक वर्गाच्या गुणवत्तेवर अव-लंबून राहते. कामगारांचा व्यवस्थापनावर विश्वास असला आणि विशेषतः आपली गाऱ्हाणी ऐकून घेऊन त्यांचा परिहार होईल अशी त्यांना खात्री वाटत असली म्हणजे औपचारिक बदल घडवून आणण्याची कसलीच आवश्यकता भासत नाही. जेथे असा विश्वास नसतो तेथे असंतोष उद्‌भवतो. परंतु त्यावरून असा निष्कर्ष निघतो की, हा असंतोष बव्हंशी स्थानिक संघर्षातून उद्‌भवलेला असल्यामुळे एकदम राष्ट्रीय किंवा त्या उद्योगाच्या पातळीवरील उपाय योजून हे संघर्ष मिटणार नाहीत. म्हणजेच त्या उद्योगात राष्ट्रीयीकरण करणे किंवा त्यातून मिळणाऱ्या लाभांशावर मर्यादा घालणे अथवा त्या उद्योगाच्या सबंध यंत्रणेत काही कायदेशीर बदल घडवून आणल्याने ते संघर्ष संपुष्टात येणार नाहीत. अशा उपायांमुळे राष्ट्रीय किंवा त्या

उद्योगाच्या पातळीवरील कामगार संघटनांच्या धोरणावर परिणाम घडून येऊ शकेल आणि त्यामुळे वेतनविषयक धोरणाच्या संदर्भात ते उपाय योग्यही ठरतील. परंतु व्यवस्थापकीय दोषांमुळे निर्माण झालेल्या स्थानिक तणातणीवर, आणि बहुतेक ठिकाणी अशीच परिस्थिती असते, मात्र त्याचा फारसा परिणाम घडून येत नाही.

म्हणून कामगारांबरोबरच्या अनिष्ट संबंधावर राष्ट्रीयीकरण हा एकमेव तोडगा होऊ शकत नाही. त्यामुळे काही विवक्षित गाऱ्हाणी विशेषतः कोळशाच्या उद्योगात सोडविण्यात आली आहेत हे खरे, परंतु सार्वजनिक क्षेत्रातील उद्योगांमधील नीतिधैर्य सर्वत्र सारखेच असते किंवा चांगल्या खाजगी कारखान्यापेक्षाही ते सरस असते असा दावा कोणीच करू शकणार नाही. कोळसा आणि रेल्वे या दोन उद्योगांत तर त्याची पातळी आणखीनच खाली गेलेली आहे. हेही पुन्हा व्यवस्थापकांच्या कर्तृत्वावरच अवलंबून राहते. कामगारांच्या नीतिधैर्याबद्दल हे दोन उद्योग कधीच प्रसिद्ध नव्हते. आणि सार्वजनिक क्षेत्रातील असूनसुद्धा राष्ट्रातील एकूण उद्योगांच्या मानाने पहाता हे दोन उद्योग बऱ्याच खालच्या पातळीवर आहेत.

राष्ट्रीयीकरणाची काही प्रचलित अंगे अशी आहेत की, ती औद्योगिक संबंधांना खात्रीपूर्वक विघातक ठरतात. त्याचे उदाहरण म्हणजे विशेषतः रेल्वेच्या बाबतीत सत्तेच्या केंद्रीकरणासाठी सतत येणारे दडपण. पराकोटीचे केंद्रीकरण आणि एकसारखेपणा यामुळे पूर्वीच्या प्रादेशिक परंपरा आणि विविधता यांना खो बसला आहे. दुसरा प्रकार म्हणजे रेल्वे बोर्डावर आलेल्या कामगार संघटनेतील अननुभवी आणि विशेषज्ञ नसलेल्या एखाद्या प्रतिनिधीवर कामगारविषयक धोरणाची सर्व जबाबदारी सोपवून देण्याची प्रवृत्ती. आणि तिसरा प्रकार म्हणजे खाजगी उद्योगधंद्यांच्या मानाने सर्वसाधारणपणे कमी वेतनात आणि व्यवस्थापनाच्या मधल्या श्रेणीत त्यामुळे ओघानेच येणारे सुमार कर्तृत्व.

अन्य कारणास्तव राष्ट्रीयीकरण इष्ट असो वा नसो केवळ राष्ट्रीयीकरणामुळे औद्योगिक संबंधात आपोआप सुधारणा घडून येईल अशी आशा करण्यास फारशी जागा नाही. म्हणजे याचा अर्थ असा की, प्रतिनिधी आणि लढाऊ कामगार यांचा लाभांश, बोनस, शेअर्स किंवा खाजगी नफा या संबंधीच्या तक्रारींना कसले महत्त्वच नाही ! अनेकदा वस्तुस्थिती तशीच असते. कारण कार्यक्षम कारभार असलेल्या खाजगी कारखान्यांतून अशा तक्रारी उद्‌भवतच नाहीत, मग त्या कारखान्यातून नफा किंवा लाभांश कितीही मिळत असो. अशा उद्योगांचे राष्ट्रीयीकरण झाले तरीदेखील पूर्वीच्या तक्रारी कायमच राहतात. फक्त त्या व्यक्त करण्याची भाषा बदललेली असते. आणि बहुधा केवळ स्थानिक स्वरूपाचा असंतोष (अरेरावी वृत्तीचा कार्यदेशक (फोरमन), विचारविनिमयाच्या बाबत कुचराई किंवा सर्वसाधारण अकार्यक्षमता) त्यातून व्यक्त होत असतो.

ज्यावेळी या असंतोषाचे समर्थनदेखील करता येण्यासारखे नसते त्यावेळी

वर दिलेल्या दुसऱ्या दोन गोष्टी त्याकरवी व्यक्त होत असतात असे दिसते. त्या दोन गोष्टी म्हणजे: सतत उघडपणे दिसून येणारी वर्गीय विषमता आणि अपेक्षे- इतक्या लवकर वेतनात वाढ होत नसल्याचा संशय. त्या दोहोंपैकी कोणतीही गोष्ट राष्ट्रीयीकरणामुळे दूर होईलच असे नाही. तिसऱ्या प्रकरणात स्पष्ट केल्याप्रमाणे मालकी हक्काचा प्रकार हे समाजाची उभारणी कशी झाली आहे ते ठरविण्याचे आता मुख्य गमक उरलेले नाही. कारण रेल्वेच्या उदाहरणात दाखवून दिल्या- प्रमाणे योग्य ती मजुरी मिळत नाही ही समजूत सार्वजनिक क्षेत्रातही तितक्याच ठामपणे वसत असते.

## ४. सहभाग आणि संयुक्त सल्लामसलत

कामगारांचे नीतीधैर्य अनेकदा स्थानिक व्यवस्थापनाच्या दर्जावर अवलंबून असते ही वस्तुस्थिती आहे. आणि आपण जेव्हा समाजशास्त्रज्ञ आणि औद्योगिक मानसशास्त्रज्ञ यांच्या सूचनांचा विचार करू लागतो तेव्हा या वस्तुस्थितीमुळेच अड- चण उपस्थित होते. शिवाय याठिकाणी आणखीही एक अडचण उद्भवते ती अशी की, सुचविलेल्या उपायांत अगदी थोडक्या काळात फार मोठे स्थित्यंतर घडून आलेले असते. कामगारांना प्रोत्साहन मिळेल इतपत वेतन मिळण्याच्याबातीत योजा- वयाच्या पद्धती पुरेशा तपशीलवार किंवा धूर्तपणाच्या नसल्या तर कामगारांचे नीतिधैर्य खालावते हे प्रतिपादन त्यामानाने अगदी अलीकडेपर्यंत केले जात होते. त्याचप्रमाणे कल्याणकारी व मनोरंजनाच्या साधनांचा अभाव, अपुरा उजेड, (कामाच्या ठिकाणी) सदोष आर्द्रता, योग्य तऱ्हेने रंगरंगोटी न केलेले छत किंवा 'तुम्ही काम करीत असताना' संगीताचा अभाव असणे या गोष्टींचाही नीतिधैर्यावर परिणाम घडून येतो असेही सांगितले जाते. परंतु आता ही कारणे कोणी पुढे करीत नाही. त्याऐवजी आता नीतिधैर्याच्या बाबतीत कामगारांना त्यांच्या प्रतिष्ठेची व जबाबदारीची जाणीव करून देण्यावर भर देण्यात येत असून व्यक्तीच्या ऐवजी गटाला उत्तेजन देणे आणि कामगारांना व्यवस्थापनात सहभागी करून घेणे याबाबी अधिक महत्त्वाच्या समजल्या जाऊ लागल्या आहेत.

'सहभागी करून घेणे' या शब्दप्रयोगामुळे काहीशी चीड येणे अपरिहार्य आहे. कोणत्याही सामाजिक आपत्तीवरील रामबाण उपाय असा शिक्का बसलेली ती केवळ एखादी कंठाळी घोषणा राहिलेली नाही, तर या समानभागीदारीचा हिरीरीने पुरस्कार करणारे खरोखरीच असे मानू लागले आहेत की, वैयक्तिक कृतीपेक्षा सामुदायिक कृती नेहमीच श्रेष्ठप्रतीची असते आणि म्हणून या ना त्या स्वरूपाचे काम करणाऱ्या कोठल्या तरी गटात सर्वांना समाविष्ट करून टाकले पाहिजे. 'अप्पलपोटेपणाने एकलकोंडे राहिल्याने माणसाच्या आशा आकांक्षा सफल होऊ शकत नाहीत...आपल्या सर्जनशील प्रवृत्ती स्वतःचे घर आणि बाग

येवढयापुरत्या मर्यादित ठेवू शकेल पण त्यामुळे समाजाविषयीच्या आपल्या जबाबदारीकडे त्याला पाठ फिरवावी लागेल. तसेच त्या समाजापलिकडच्याही संबध मानव समाजाविषयी त्याची जी कर्तव्ये असतात ती त्याला पार पाडता येणार नाहीत. आणि एकदा ही जबाबदारी त्याने अंगाबाहेर टाकली की, त्याचे व्यक्तिमत्वही खुरटत जाईल आणि मानवी सहानुभूतीचा त्याच्या मनातील झराही आटून जाईल. '

याला दुसरीही बाजू आहे हे मी सांगितलेच आहे. एखाद्या गटात सामील झाल्यानेदेखील व्यक्तिमत्व खुरटू शकते. कारण गट हे स्वतःच अनेकदा लोकशाही विरोधी आणि स्वार्थी प्रवृत्तीचे बनू लागतात. ते कसेही असले तरी जो तो आपलीच जबाबदारी समजून ज्यात त्यात नाक खुपसून गोंधळ उडवून देत आहे आणि स्वतःच्या कर्तव्याची मात्र हेळसांड करीत आहे असे जग आपल्याला खासच अभिप्रेत नाही. १९७० साली उत्तर इंग्लंडच्या दौऱ्यावर असताना जुन्या चार्टिस्ट पंथाच्या लोकांना असे आढळून आले होते की, कामगारांची भौतिक परिस्थिती सुधारली असली तरी त्यांची नैतिक आणि बौद्धिक पातळी मात्र खालावली आहे. आणि या गोष्टीमुळे ते व्यथित झाले होते. याबाबत त्यांनी असे लिहून ठेवले आहे की, 'आमच्या जुन्या चार्टिस्ट काळात लँकेशायरमधील हजारो कामगारांच्या अंगावर चिंध्या झालेले कपडे असत आणि त्यांच्यातील अनेकांना अन्नाची भ्रांत असे हे खरे. परंतु कामगार गटागटाने राजकीय न्यायासंबंधीच्या मोठमोठया सिद्धांतांची किंवा समाजवादी शिकवणुकीची चर्चा करीत असलेले तुम्हांला दिसले असते. पण आता तुम्हाला असे गट दिसणार नाहीत. त्याऐवजी झकपक कपडयातील कामगार, सहकारी भांडार, त्यांचे त्यातील शेअर्स, किंवा हाऊसिंग सोसायटी यासंबंधीची चर्चा करतांना आढळतील किंवा आणखी काही कामगार वेडयासारखे कुत्र्यांच्या अंगावर झुली चढवून त्यांना हिंडवत असलेले दिसतील तर काही जण रेसला जाऊन तेथे पैसे लावण्याच्या तयारीत असलेले आढतील. '

आणि त्यांनी तरी तसे वर्तन खरोखरी का करू नये ? जर खरोखरी पूर्वापार कोणीतरी शिकवण देत आले आहे म्हणूनच समाजवाद मानायचा अशी परिस्थिती राहिली नसेल आणि समाजवाद म्हणजे व्यक्तिगत स्वातंत्र्य आणि आपली आवड-निवड यांच्या कक्षा वाढविण्याचे एक साधन म्हणूनच समाजवादाचा स्वीकार केलेला असेल तर पूर्वीसारखे धकाधकीचे जीवन आणि साऱ्या जगाचे ओझे जणू आपल्याच शिरावर आहे अशी समजूत करून घेऊन रोज संध्याकाळी गटागटातून चर्चेचा काथ्याकूट करणारा कामगार असण्याची तरी काय जरूर आहे ? बर्ट्रांड रसेल यांनी एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे व्यक्तिगत कार्यक्षेत्र हे नैतिकदृष्टया सामाजिक कर्तव्याच्या मानाने कमीपणाचे मानता कामा नये. उलट मनुष्याच्या काही उत्तमोत्तम हालचाली या निदान भावनात्मक दृष्टीने तरी सामाजिक नसून व्यक्तिगतच असतात. प्रेषित, गूढवादी, कवी, संशोधक या सर्वांच्या जीवनावर

स्वप्नाळूपणाचा फार मोठा पगडा असतो. धर्म, कला, विज्ञान या क्षेत्रातीलच नव्हे तर शेजाऱ्याविषयीच्या आपल्या भावना व्यक्त होण्यासाठी सामाजिक कर्तव्याच्या जाणीवेत व्हावयास हवी असलेली सुधारणा घडून येण्यासाठी किंवा अशाच इतर कारणांसाठीही अशा एकलकोंड्या माणसाची मदत होत असते. अशा माणसांच्या भावनांवर व विचारांवर समूहाचा परिणाम होत नाही.

तथापी आपल्यापैकी बहुतेक कोणीच प्रेषित किंवा गूढवाद्यांच्या कोटीतले नसतात. आणि व्यक्तिनिरपेक्ष समूहात काम करणाऱ्या लोकांनादेखील आपल्याशी कोणी सल्लामसलत करावी, मान द्यावा असे वाटत असते. आणि आपल्यालाही काही महत्त्व आहे अशी त्यांची भावना असते. तसेच (या ना त्या स्वरूपात) व्यवस्थापनातही आपल्याला सहभागी होता यावे असे त्यांना वाटत असणार. अर्थात याबाबत निश्चयात्मक विधान करणे कठीणच आहे हे कोणीही एकदम मान्य करील. यापैकी विशेषेकरून सल्लामसलतीचा भाग अधिक महत्त्वाचा असून कामगारांना विश्वासात घेण्याच्या दृष्टीने ती आवश्यक बाब आहे. बरेचसे संप व असंतोष कामगारांना व्यवस्थापनात सहभागी करून घेण्यासाठी नुसत्या तपशीलवार योजना आखल्याने कमी होऊ शकणार नाहीत तर त्यासाठी व्यवस्थापक वर्गाने कामगारांना विश्वासात घेऊन त्यांना जरूर ती माहिती दिली पाहिजे आणि त्यांची मते समजून घेतली पाहिजेत.

परंतु दुर्दैवाने यापैकी कोणतीही गोष्ट वरून दडपण आणून साध्य होऊ शकणार नाही. चांगल्या कारखान्यात व्यवस्थापनाच्या पुरोगामी व समंजस धोरणाचा भाग म्हणून ते आपोआपच घडून येते– मग अशा कारखान्यांतून संयुक्त-सल्लागार समित्या असोत वा नसोत. वाईट कारखान्यांतून मात्र अशी तपशीलवार यंत्रणा उभी केली तरी तेवढ्याने कसलाही बदल घडून येणार नाही. व्यवस्थापकीय किंवा कामगारविषयक दृष्टिकोण हेच साऱ्या तक्रारींचे मूळ असते. त्यामुळे ते कायमच राहील. आणि ही नवी यंत्रणा अयशस्वी ठरली तर कामगारांच्या असंतोषाचे ते एक नवेच कारण होऊन बसेल.

व्यवस्थापकीय दर्जात हळूहळू सुधारणा होत गेल्यामुळे त्याचाच एक भाग म्हणून केवळ संयुक्त विचारविनिमयाच्या परिणामकारक तत्त्वांचा फैलाव होत जाईल आणि कामगार संघटनांच्या दृष्टिकोणातही हळूहळू बदल घडून येईल. यात अपयश आले तर त्याचा दोष नेहमीच व्यवस्थापकांकडे असतो असे नाही. कामगार संघटनांचा प्रत्यक्ष विरोध जरी नसला तरी अशा यंत्रणांबद्दल त्या उदासीन असतात कारण त्यांना अशी धास्ती वाटत असते की, सल्लागार समित्या स्थापन झाल्या तर व्यवस्थापकांबरोबर वाटाघाटी करण्याचा मक्ता त्यांच्याकडेच जाईल. वस्तुतः कामगार संघटनांचे खरे सामर्थ्य अशा वाटाघाटी करण्याच्या ताकदीत असते. (आणि तीच ताकद कामगार संघटना गमावून बसतील.) उदाहरणार्थ

स्वीडनमध्ये उद्योगांतील संयुक्त समित्यांचा खूप प्रसार झाला असून त्या चांगल्या प्रभावी ठरल्या आहेत. परंतु त्यांचे काम चालू शकते याचे कारण असे की, त्या त्या उद्योगातील दोन्ही पक्ष, धंद्याच्या आर्थिक घडामोडीत उदारदृष्टी ठेवून लक्ष घालीत असतात आणि सर्व उद्योगाचाच ते गंभीरपणे विचार करीत असतात. हा अत्यंत इष्ट असा परिणाम असून त्यामुळे औद्योगिक वातावरण सुधारण्यास मदत होते. केवळ व्हाईट हॉलमधून फतवे काढून औद्योगिक क्षेत्रातील समाधान वाढविता येणार नाही.

यावरून असा निष्कर्ष निघतो की, उद्योगातील सत्तेची असमान विभागणी, म्हणजेच एका अर्थाने संयुक्त सल्लामसलतीच्या बाबतीत आलेले अपयश, हे अप्रत्यक्षपणे असंतोषाचे कारण ठरते. परंतु असंतोषाचे हे एवढे एकच कारण नाही. त्याचप्रमाणे उद्योगाच्या घडणीत किंवा प्रस्थापित कायद्यात महत्त्वाचे बदल घडवून आणणे हा तो असंतोष दूर करण्याचा संभाव्य उपाय ठरत नाही. सकृत्‌दर्शनी, औद्योगिक क्षेत्रात समाधान नांदण्यासाठी तीन गोष्टींची आवश्यकता असते. एक म्हणजे सामाजिक विषमता आणि सर्वसाधारणपणे वर्गीय विशेषाधिकार यावर हल्ला चढवणे– हे विशेषाधिकार काही अंशी त्या त्या उद्योगातीलच (पैशाशी संबंध नसलेल्या क्षेत्रातील प्रतिष्ठा) असले तरी त्यांचे मुख्य क्षेत्र त्या उद्योगाबाहेरचे असते. दुसरी गोष्ट म्हणजे कामगाराला त्याच्या हक्काच्या वेतनवाढीपासून वंचित ठेवले जात नाही अशी त्याची खात्री पटवून देणे. कामगार ज्या धंद्यात काम करीत असेल त्या धंद्याच्या पातळीवर वेतनासंबंधी अधिक कल्पकतेने देवाणघेवाण करून काही अंशी हे साध्य करता येईल. त्याचप्रमाणे कधीकधी निरनिराळ्या कारखान्यात उत्पादन बोनसबाबतचे करार घडवून आणूनही हे साधता येईल. आणि तिसरी गोष्ट म्हणजे कामगार संघटनांच्या धोरणासंबंधी जास्तीत जास्त ठिकाणी प्रगतीशील व्यवस्थापन प्रस्थापित करणे आणि अधिक उन्नत दृष्टीकोण स्वीकारणे. परिणामकारक असा परस्पर विचारविनिमय करणे हा याचाच एक भाग असून त्यामुळे सत्तेचे खरेखुरे हस्तांतर घडून येईल.

## ५. औद्योगिक लोकशाही आणि संयुक्त व्यवस्थापन

न्यायाच्या दृष्टीने पाहिले तर सत्तेची फेरवाटणी करण्यासाठी औद्योगिक घडणीत केलेले बदल समर्थनीयच ठरतात– मग नीतिधैर्य टिकविण्याच्या बाबतीत त्यांचा काहीही परिणाम होवो.

ऐतिहासिक दृष्ट्या उद्योगांची संघटना अधिक न्यायी पायावर उभारली जावी अशी ईर्षा औद्योगिक लोकशाहीच्या किंवा कामगारांच्या उद्योगावरील नियंत्रणाच्या मागणीत अंतर्भूत आहे. कामगार चळवळीत याला फार मोठा इतिहास आहे व तो ओवेनच्या १८३२ मधील ऑपरेटिव्ह बिल्डर्स यूनियन या महत्त्वाकांक्षी संघटनेपासून

सुरू झाला असून पहिल्या महायुद्धापूर्वीच्या वादळी दशकात ब्रिटनमधील कामगार संघटनेत क्रांतीकारी सिंडिकॅलिझम झपाट्याने पसरू लागला तेव्हा या चळवळींनी परमोच्च बिंदू गाठला. त्याचवेळी गिल्ड सोशॅलिझम या अधिक विचारी आणि शांततावादी अशा पंथाने तरुण समाजवादी लेखकांची मने भारून टाकली. पण ती अगदी शेवटची पायरी होती. आणि पहिले महायुद्ध संपताच या विचारांची लाट ओसरू लागली. उद्योगाची व्याप्ती जसजशी वाढू लागली तसतशी सिंडिकॅलिझमची विचारसरणी अधिकाधिक अव्यवहार्य आणि सरकार व ग्राहक यांना कटाक्षाने बाजूला ठेवण्याच्या त्यातील विचारामुळे अधिकाधिक अनिष्ट वाटू लागली. गिल्ड सोशॅलिझमला ओहोटी लागली आणि सार्वजनिक सेवेच्या क्षेत्राव्यतिरिक्त इतरत्र 'व्हिटलेइझम'ने मूळ धरले नाही. शेवटी १९३० साली बऱ्याच वादविवादानंतर मजूर चळवळीनेच, प्रत्यक्ष मजुरांचे प्रतिनिधित्व नसलेल्या सार्वजनिक महामंडळाला मान्यता दिली त्यावेळी गिल्ड सोशॅलिझमला अखेरचा तडाखा बसला.

या प्रश्नाचा नव्याने विचार करावयाचा झाला तर त्यावरील जुने वाङ्मय फारसे उपयोगी पडणार नाही. उदाहरणार्थ चौथ्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे गिल्ड सोशॅलिझम हा हल्लीच्या परिस्थितीशी अजिबात संबंध नसलेल्या 'वेतनाच्या गुलामगिरी'च्या सिद्धांताशी तत्त्वप्रणालीच्या दृष्टीने अत्यंत निगडित आहे. आणि राष्ट्रीय चळवळीवरील कमालीचा अविश्वास हे १९१४ पूर्वीच्या दशकाचे वैशिष्टयही त्याच्या जोडीला होते. त्याचप्रमाणे संघटनेच्या दृष्टीने पहाता, स्वयंशासित गिल्डसची कल्पनाही तांत्रिक बाबतीत घडून आलेल्या बदलामुळे जुनीपुराणी झाली आहे. म्हणून या प्रश्नाची चर्चा पुन्हा अगदी नव्याने करणे अत्यावश्यक होऊन बसले आहे.

अनेकदा 'लोकशाही' च्या मागणीच्या स्वरूपात हा प्रश्न मांडला जातो. दुर्दैवाने, पूर्व पश्चिमेकडील राजनैतिक वर्तुळातील खलित्यांवरून हे स्पष्ट होते की, हा विचार अत्यंत संदिग्ध आहे. प्रत्यक्ष प्रत्यय येणाऱ्या कोणत्याही घटनांचा किंवा अनौपचारिक गृहीत गोष्टींचा त्यावरून अर्थबोध होत नाही. शासनसंस्थेविषयीचे निरनिराळे सिद्धांत, विशिष्ट उद्देशाने चालविल्या जाणाऱ्या प्रत्यक्ष राजकीय चळवळी आणि भिन्नभिन्न ऐतिहासिक राज्यपद्धती यांच्या संदर्भात अत्यंत भोंगळ स्वरूपात हा शब्द वापरला गेला आहे. त्यामुळे काळाच्या प्रवाहाबरोबर या शब्दाचा अर्थही बदलला आहे. औद्योगिक धोरणाला लागू पडेल अशी या शब्दाची व्याख्या करावयास सांगितले असता त्यांच्याकडूनही वरील पद्धतीचीच उत्तरे येतील.

अशा तऱ्हेने लोकशाहीच्या संदर्भात काहीजण फक्त भाषण व टीकास्वातंत्र्य यावरच भर देतील. इतर काहीजण सर्व नागरिकांना समान हक्क उपभोगता येणे हे महत्त्वाचे मानतील व त्या दृष्टीने विकासाची समान संधी मिळण्याकडे बोट दाखवतील. अल्पसंख्यांकांविषयी आदरभाव ( त्यासाठी साचेबंद विचारसरणीला तिलांजली द्यावयास हवी ), नागरिकांनी सरकारच्या कामात प्रत्यक्ष सहभागी होणे

व त्यासाठी संयुक्त विचारविनिमयाच्या कक्षा खूपच वाढविणे, कायद्याचे राज्य, कायदेशीर विरोधाला मान्यता– कामगार संघटनांच्याद्वारा औद्योगिक क्षेत्रात हे यापूर्वीच घडून आले आहे– नागरिकांच्या संमतीने चालवलेला कारभार व त्याशाठी असलेली संयुक्त विचारविनिमयाच्या यंत्रणेची आवश्यकता, निवडणुकीच्या द्वारा लोकांनी निवडून दिलेले सरकार व त्यासाठी बऱ्याच व्यापक सुधारणा घडून येण्याची जरूरी अशा निरनिराळ्या गोष्टी निरनिराळ्या लोकांना लोकशाहीच्या संदर्भात अभिप्रेत असतात. यावरून हे स्पष्ट होईल की या शब्दाचा विविक्षित असा एकच अर्थ लावता येत नाही. किंबहुना तसा तो लावता आला तरी राजकीय शासनाप्रमाणेच औद्योगिक क्षेत्रालाही तसाच लागू करणे तर्कशुद्ध किंवा योग्य ठरणार नाही.

तथापी आता आपण सध्या अत्यंत लोकप्रिय असलेल्या औद्योगिक लोकशाहीच्या मागणीबाबत म्हणजे व्यवस्थापनातील कामगार संघटनांच्या सहभागासंबंधी जे बोलले जाते त्याचा विचार करू.

संयुक्त व्यवस्थापनेच्या कल्पनेत अनेक गोष्टींचा समावेश होऊ शकेल. पोस्ट ऑफिस वर्कर्स युनियनतर्फे केल्या जाणाऱ्या संयुक्त शासकीय समितीच्या तपशीलवार सूचनेपासून तो– ही समिती व्यवस्थापक आणि कामगारसंघटना यांनी संयुक्तपणे नेमलेली असावी अशीही त्या संघटनेची मागणी होती– मजूर पक्षाच्या प्रत्येक परिषदेत राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगाच्या समित्यावर (नॅशनल बोर्ड्स) कामगार संघटनांनीच थेट आपल्या प्रतिनिधींची नेमणूक करावी या त्यामानाने कमी महत्त्वाकांक्षी सूचनेपर्यंत सर्व सूचना त्यात बसू शकतात. परंतु अशा समित्यांवर अधिकृत कामगार संघटनांना प्रत्यक्ष प्रतिनिधित्व देणे आणि व्यवस्थापनाच्या कामकाजात त्यांनी सक्रीय सहभागी होणे हे या कल्पनेचे खरे सार आहे.

तेव्हा व्यवस्थापनात सहभागी होता यावे म्हणून कामगार संघटनांनी आपले स्वातंत्र्य गमावून बसावे का? हा खरा तत्वाचा मध्यवर्ती मुद्दा आहे. संयुक्त व्यवस्थापनात सहभागी होण्यास नकार देणे, म्हणजे प्रत्येक उद्योगात दोन बाजू असतात आणि त्यापैकी व्यवस्थापकांच्या सत्तेला जरादेखील धक्का लागलेला नसतो तर कामगार संघटनांचे कार्यक्षेत्र कामगारांची मजुरी आणि कामाच्या सुखसोयी येवढ्यापुरतेच मर्यादित असते ही कल्पना कायमची मान्य करून टाकण्य-सारखेच आहे असे यावर प्रतिपादन केले जाते. आद्य समाजवंद्यांच्या आशाआकांक्षांची ती प्रतारणा ठरेल इतकेच नव्हे तर लोकशाही, औद्योगिक क्षेत्रातील बंधुभाव आणि सर्व थरांतील कर्मचाऱ्यांनी नियंत्रणात सहभागी होणे व कामगारांना उद्योगातील त्यांचे भवितव्य घडवून आणण्याच्या बाबतीत मत स्वातंत्र्याचा मूलभूत हक्क नाकारल्या सारखे होईल.

हा शेवटचा मुद्दा बरेच वेळा मान्य केला जात नाही. उदाहरणार्थ असे म्हटले जाते की, उद्योगात जास्त उत्पादन हेच समान उद्दिष्ट असते. आणि त्यामुळे पूर्वीच्या विरोधाची जागा आता हे उद्दिष्ट गाठण्यासाठी परस्पर सहकार्याने भरून काढली जावी. आता जास्त उत्पादन हे समान उद्दिष्ट आहे हे उघडच आहे. त्यामुळे जास्त प्रमाणातील सहकार्य नुसते समर्थनीयच ठरते असे नव्हे तर ते अपरिहार्य होऊन बसते. परंतु दोन गटांचे हित काही बाबतींत समान असले तरी दोहोंचे हित तंतोतंत सारखे असते असा निष्कर्ष त्यावरून निघत नाही. व्यवस्थापन विभाग आणि इतर कर्मचारी यांच्यात हितविरोधाचेही काही मुद्दे असतात. त्यांच्यांत जे समान हितसंबंध असतात ते या हितविरोधावर संपूर्णपणे मात करू शकत नाहीत. वेतन ठरविण्याच्या वेळी उत्पादनाचा खर्च व किंमतीची पातळी यांची वाटणी करतांना संघर्ष निर्माण होतो त्यावेळी दोघांच्या हितसंबंधांतील विरोध स्पष्ट होतो. शिस्तीचे पालन, प्रतिनिधींचे कार्य, नवीन यंत्रसामुग्रीचा अवलंब, एखादा कारखाना किंवा विभाग बंद ठेवणे, कामगारांची संख्या, अशा मुद्यांवरूनसुद्धा संघर्ष उद्‌भवतो. दोन गटात समान हितसंबंध असले तरीसुद्धा शेवटी अशा बाबींवरून तात्पुरत्या स्वरूपाचे संघर्ष निर्माण होणे शक्य असते. शिवाय असे किती निर्णय असतात की, त्यात जादा उत्पन्नाचा कसलाही संबंध येत नाही. परंतु परस्पर हितसंबंध मात्र अगदी भिन्न असतात. पूर्वीच्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे संघर्षाचा मुद्दा पैशाशी संबंध नसणाऱ्या सवलतींनाही लागू पडतो.

यावरून हे स्पष्ट होईल की, व्यवस्थापन आणि कामगार यांमध्ये सुप्त स्वरूपातील संघर्ष नेहमी राहणारच. धंद्यात दोन बाजू असतात आणि बऱ्याच प्रमाणात त्या तशा राहाव्यातही. कामगारांच्या बाजूला त्यांच्या हिताचे संरक्षण करण्यासाठी कामगार चळवळ विर्वेधपणे उभी ठाकलेली असणारच. नीती विषयक कल्पनांचा प्रसार करणाऱ्या एम्. आर. ए. वाल्यांनी कितीही दौरे काढले, प्रगतीशील व्यापाऱ्यांनी एकमेकांना कितीही प्रीतीभोजने दिली किंवा सिंडिकेट वाद्यांनी हवेत कितीही मनोरे बांधले तरी हे कठोर सत्य त्यांना नाहीसे करता येणार नाही. कामगार संघटनांनी आपली स्वतंत्र भूमिका सोडून कामगारांचे योग्य प्रतिनिधीत्व न करता त्यांना वाऱ्यावर सोडून दिले तर कामगार को (Caux) कडे (एम्. आर्. ए. केंद्र) न जाता किंग स्ट्रीटकडे वळतील.

अशा दोन बाजू असतात हे एकदा मान्य केले म्हणजे उद्योगातील व्यवस्थापक हे स्वःकडे सरकारची भूमिका घेतात असे म्हणणे संयुक्तिक ठरते. आणि त्यावरून असा उपसिद्धांत निघतो की, त्या उद्योगावर लोकांचे नियंत्रण रहावे, आणि कामगारांच्या हक्कांचे संरक्षण करता यावे यासाठी विरोधी पक्ष आवश्यक ठरतो. क्लेग यांनी "औद्योगिक लोकशाही आणि राष्ट्रीयीकरण" या आपल्या महत्त्वाच्या ग्रंथात कामगार संघटनांच्या या विरोधी भूमिकेवरच जोर दिला आहे. यामुळे कारखान्याच्या

किंवा त्यातील एखाद्या विभागाच्या पातळीवर संयुक्त विचारविनिमय किंवा सहकार्य करण्याची कल्पना बाद ठरत नाही. निरनिराळे कारखाने असलेली एखादी मोठी कंपनी किंवा सबंध उद्योग यासारख्या प्रचंड संघटनेचा तो विचार करतो त्यावेळी विरोधी पक्षाचे स्थान लोकशाहीला अत्यंत पोषक ठरते, नव्हे विरोधी पक्षाची ही भूमिका परिणामकारकपणे पार पाडण्यासाठी कामगार संघटना स्वतंत्र असणे अत्यावश्यक असते. कामगार संघटना व्यवस्थापनावर वाढता प्रभाव पाडू शकतात– नव्हे त्यांनी तसा तो पाडला पाहिजे. त्यांचा हा प्रभाव जसजसा वाढत जातो तसतशी त्या संघटना आपली भूमिका आधिकाधिक परिणामकारक-पणे पार पाडू शकतात. आणि कामगार संघटनांचा प्रभाव वाढत गेला तर त्यामुळे प्रत्यक्ष व्यवहारात श्रमजीवी जनतेला आपले औद्योगिक भवितव्य ठरविण्याच्या कामी काही अधिकार असला पहिजे या लोकशाही हक्काची व्याप्ती वाढण्याचा हाच थेट मार्ग आहे याचा प्रत्यय येतो. परंतु हा प्रभाव प्रत्यक्ष व्यवस्थापनाच्या बाहेरूनच पाडला पाहिजे, त्याचप्रमाणे संघाच्या विरोध करण्याच्या मूलभूत स्वातंत्र्याला त्या-मुळे बाधा येता कामा नये.

काही वेळा असे म्हटले जाते की, वेतनधारकांच्या हाती आता फार मोठी सत्ता आली असल्याकारणाने विरोधाचे काही कारणच राहिलेले नाही. हे म्हणणे अतिशयोक्तीचे आहे. सत्तेचे फार मोठ्या प्रमाणावर हस्तांतर घडून आले हे खरे; पण याचा अर्थ असा नव्हे की, व्यवस्थापकांची सर्व सत्ता संपुष्टात आली आहे. आणि आता ते आपण होऊन वाजवी पगारवाढ देऊ लागतील किंवा कसल्याही दबावाशिवाय पूर्वीच्या प्रकरणात दाखविल्याप्रमाणे कामगारांच्या इतर मागण्या-पुढेही ते सहजासहजी मान तुकवतील. उद्योगातील प्रशासक (मग ते खाजगी क्षेत्रा-तील असोत वा सार्वजनिक क्षेत्रातील) प्रत्येक वेळी शरणागती पत्करण्यास तयार होतील किंवा सर्व तंटे आपोआपच कामगारांच्या बाजूने मिटतील अशीही शक्यता नाही. खाजगी नफ्याचा प्रश्न उपस्थित न होणारा राष्ट्रीयीकरण झालेला उद्योग-देखील तोटयात चालविण्याचा किंवा किंमतवाढ केल्याचा ठपका टाळण्यासाठी व्यवस्थापक वेतनवाढीस कणखरपणे विरोध करतील. कामगार संघटनांनी तीव्र झगडा दिल्यानंतरच विशेषत: रेल्वे कामगारांना सामाजिक दृष्टया सुसह्य असे वेतनमान मिळू लागले.

कामगार संघटनांचे सामर्थ्य वाढलेले असल्यामुळे त्या सरकारशी सहकार्य करतात व उद्योगाच्या व्यस्थापनात सहभागी होतात हे म्हणणे बरोबर नाही. याचे मुख्य कारण असे आहे की, अंतिम दृष्टया विचार केला तर यापैकी कशावरच त्यांचे सामर्थ्य अवलंबून नसते. कामगारांचा संप घडवून आणणे किंवा उत्पादनात विचित्र-पणे खीळ घालणे (उदा. अंगावर काम घेण्यापासून किंवा जादा वेळ काम करण्या-पासून कामगारांना परावृत्त करून ) आणि प्रस्थापित सरकारच्या मार्फत

निरनिराळ्या प्रकारे दडपण आणण्याची अप्रत्यक्ष परंतु तरीही अत्यंत जोरदार धमकी संघटना देऊ शकतात हेच त्यांच्या सामर्थ्याचे खरे कारण असते. जी संघटना व्यवस्थापनाच्या जबाबदारीत गुंतून पडली असेल ती यापैकी कोणताच अंतिम उपाय सहजासहजी प्रत्यक्षांत आणू शकणार नाही आणि स्वतःवर विशेष बंधने लादून न घेतलेली व स्वतःचे डावपेच आखण्याचे भरपूर स्वातंत्र्य असलेली बाह्य शक्ती हे स्वरूप गमावून बसतील तर कामगार संघटनांवर त्याचा अत्यंत विपरीत परिणाम घडून येईल. कामगार संघटनांची शक्ती वाढता वाढता ती इतक्या मर्यादेपर्यन्त जाते की, संयुक्त सरकारात सहभागी होणे अपरिहार्य होऊन बसते. वरवर पाहता हे समीकरण जरी तर्कशुद्ध वाटले तरी कामगार संघटनांना आपली शक्ती सुरक्षित राखावयाची असेल तर त्यांनी असे करता कामा नये.

सध्या समाजवादी– लोकशाही वातावरणात खूपच वाढ झालेली असली तरी देखील परस्पर हितविरोध आणि विरोधाची आवश्यकता उरतेच. याचा अर्थ असा होतो की, कामगार संघटनांनी उद्योगाच्या व्यवस्थापनात सहभागी होण्यावर व्यावहारिक आणि तांत्रिक असे अनेक आक्षेप घेता येण्यासारखे आहेत. ट्रेड यूनियन काँग्रेसच्या १९४४ सालच्या अहवालतील निष्कर्ष याच आक्षेपावर आधारलेले होते. ते निष्कर्ष असे होते की, निरनिराळ्या राष्ट्रीय महामंडळांवर नियुक्त करण्यात आलेल्या कामगार संघटनांच्या प्रतिनिधींनी कामगार संघटनांतील आपापल्या पदाधिकाराचे राजीनामे देऊन टाकावेत म्हणजे एका बाजूला कामगार संघटनेचे सभासद आणि दुसऱ्या बाजूला महामंडळ आणि सबंध समाज यांच्या संबंधीच्या त्यांच्या निष्ठेत संघर्ष निर्माण होणार नाही. अशा संघर्षाचा ताण त्यांच्यावर पडू लागला तर धड कामकागारांचे प्रतिनिधी म्हणूनही ते योग्य ती कामगिरी पार पडू शकणार नाहीत आणि धड प्रशासकाची जबाबदारीही ते चांगल्या तऱ्हेने सांभाळू शकणार नाहीत आणि त्यामुळे शेवटी दोघांवरही त्याचा अनिष्ट परिणाम घडून येईल. उद्योगाच्या संचालक मंडळावर कामगारांचे प्रतिनिधी घ्यावयाचे असतील तर ते कामगार संघटनांनी नियुक्त केलेले नसावेत तर त्याऐवजी प्रत्येक कारखान्यातील कामगारांनी ते प्रत्यक्षपणे निवडलेले असावेत.

## ६. उच्च पातळीवरील औद्योगिक लोकशाही

संयुक्त व्यवस्थापनास नकार दिला तर त्या उद्योगातील सत्ता आणि प्रतिष्ठा यांचे योग्य विभाजन करण्यासाठी आपल्यापुढे सध्यातरी तीनच पर्याय राहतात. पहिला पर्याय असा की, पैशाव्यतिरिक्त इतर सवलतींचे अधिक समान पातळीवर विभाजन करणे आणि कर्मचारी आणि कामगार यांच्यातील सामाजिक तफावत कमी करणे.

दोन : उत्पादनाच्या पातळीवर परिणामकारक विचारविनिमय करणे. एक

तर त्यामुळे समोरासमोरची सत्ता कमी करून त्याबाबतीत समानता आणता येईल शिवाय कामगाराच्या कामाशी आणि तेथील परिस्थितीशी निगडित असलेल्या बाबी व त्याची सल्लामसलत घेणे हे केव्हाही न्यायाचेच ठरते. असे केल्याने कामगारांच्या समाधानात वाढ होईल त्याचप्रमाणे त्यांना अधिक न्याय मिळू लागेल; परंतु तिसऱ्या विभागात दर्शविल्याप्रमाणे वरून दडपण आणून हे साध्य होऊ शकणार नाही. वातावरण जसजसे अधिकाधिक पुरोगामी बनत जाईल तसतसे हे साध्य होऊ शकेल.

तीन : कामगार संघटनांचा प्रभाव जास्तीतजास्त वाढवीत जाणे. अर्थात हा प्रभाव उद्योगाच्या राष्ट्रीय पातळीवर व्यवस्थापनात सहभागी न होता बाहेर राहून घडवून आणणे. त्यामुळे अगदी दूरगामी निर्णय देखील कामगार प्रतिनिधींशी सल्लामसलत केल्यानंतरच घेतले जातील. काही उद्योगात अशा प्रकारची 'उच्च पातळीवरील औद्योगिक लोकशाही' आजही मर्यादित स्वरूपात अस्तित्वात आहे. उदा. कोळशाचा धंदा. या उद्योगात संचालक मंडळावर कोणताही निर्णय घेण्याच्या बाबतीत एन्. यू. एम. ( राष्ट्रीय खाणकामगार यूनियन )चा फार मोठा प्रभाव पडलेला असतो किंवा पादत्राणे, सुती कापड इ. मोठ्या प्रमाणावर कामगारांचे सहकार्य असलेल्या उद्योगांची परिस्थितीही अशीच आहे.

माझी अशी समजूत आहे की, उच्च पातळीवरील औद्योगिक लोकशाहीच्या कक्षा वाढवावयाच्या म्हणजेच कामगार संघटनांचे कार्यक्षेत्र वाढवावयाचे ही अतिशय महत्त्वाची सुधारणा असून ब्रिटिश उद्योगांच्या दृष्टीने तिची अत्यंत जरूरी आहे. कामगार संघटनांना आपल्या कार्याच्या कक्षा कोणत्या प्रकारे रुंदावता येतील ते मी वर सांगितलेच आहे. उदा. वेतनाव्यतिरिक्त मिळवावयाच्या सवलती त्याचप्रमाणे मजुरी व उत्पादनक्षमता याबाबत अधिक महत्त्वाकांक्षी दृष्टीकोणातून त्या हे प्रश्न हाताळू शकतील.

तथापी कामगार संघटनांच्या कार्याची व्याप्ती अद्यापही पारंपारिक सामुदायिक सौद्यापुरतीच स्थूलमानाने मर्यादित राहिलेली आहे. आणि त्या त्या काळांतील परिस्थितीनुरूप ही व्याप्ती नेहमीच फार संकुचित राहते. पहिल्या प्रकरणात नमूद केलेल्या बदलांच्या धर्तीवर व्यवस्थापकांना सध्यापेक्षा किती तरी विविध विषयांवर विचारविनिमय करण्यास भाग पाडण्याइतके सामर्थ्य कामगार संघटनांना प्राप्त होईल त्यावेळी त्यांच्या कार्याच्या कक्षा वाढविता येतील आणि आपल्याशी तुलना करता येण्यासारख्या इतर देशांत त्या खूप मोठ्या प्रमाणात वाढविलेल्याही आहेत. व्यवस्थापनांतील कार्यक्षमता, उद्योगधंद्याच्या दीर्घकालीन विकासाचे नियोजन, मजुरी आणि किंमती यांचे परस्पर संबंध, उत्पादनक्षमतेवर परिणाम घडवून आणणाऱ्या बाबी, स्वयंचालित यंत्रे उपयोगात आणण्याजोग्या परिस्थितीचे निकष, उद्योगांतील कामगारांची संख्या आणि सर्वसाधारणपणे त्या त्या

उद्योगातील आर्थिक समस्या आणि भावी परिस्थिती इ. प्रश्नात स्वीडन व अमेरिकेतील कामगार संघटना कसोशीने लक्ष घालतात आणि त्यावर आपला फार मोठा प्रभावही पाडतात.

ब्रिटनमधील कामगार संघटना अशा प्रश्नांत विशेष स्वारस्य दाखवीत नाहीत असे दिसून येते. अर्थात या सर्व विषयांवर कामगार संघटनांतील अनेक वरिष्ठ नेत्यांनी खाजगीरित्या अत्यंत पुरोगामी आणि आग्रही विचार व्यक्त केलेले आहेत. परंतु सर्वसाधारणापणे मजुरी व कामाची परिस्थिती या नेहमीच्या प्रश्नांव्यतिरिक्त इतर प्रश्नांच्या जबाबदारीतून या कामगार संघटनांनी आपले अंग काढून घेतले आहे किंवा असे म्हणता येईल की, त्यांना प्राप्त झालेल्या आर्थिक सत्तेच्या प्रमाणात त्यांनी आपल्या कार्याच्या आणि प्रभावाच्या कक्षा वाढविलेल्या नाहीत. आणि मोठ्या प्रमाणावर संघटनात्मक बदल घडवून आणल्याशिवाय या संघटनांना आपल्या कार्यक्षेत्राची व्याप्ती वाढविताही येणार नाही. संघटनेतील हे अंतर्गत बदल म्हणजे उदा. पूर्ण वेळ काम करणाऱ्या पदाधिकाऱ्यांच्या संख्येत ( आणि बहुधा त्यांच्या वेतनांतही ) वाढ करणे, संशोधनाच्या कामांत गुंतलेल्या त्यांच्या कर्मचाऱ्यांत फार मोठी वाढ करणे, आणि कदाचित विश्वविद्यालयीन पदवीधरांना लावून घेण्याबाबत नवा दृष्टीकोण स्वीकारणे. परंतु कामगार संघटना जर उच्च पातळीवरील औद्योगिक लोकशाहीचे ध्येय स्वीकारण्यास तयार असतील तर त्यामुळे आर्थिक सत्तेत जे महत्त्वपूर्ण स्थित्यंतर घडून येईल ते उद्योगाच्या घडणीत किंवा कायद्यात सुधारणा घडवून आणल्यानेही होणार नाही.

अर्थातच ज्यावेळी कामगार संघटनांचे स्वातंत्र्य नाहीसे होण्यास सुरुवात होईल किंवा कामगारांच्या मागण्या त्यांना मनापासून जोराने मांडता येईनाशा होतील किंवा सत्तेच्या मानाने त्यांच्यावर जबाबदारीचा जादा बोजा लादला जाईल त्या क्षणापासून त्यांनी अशी जबाबदारी स्वीकारण्याचे थांबवले पाहिजे. त्याची कारणे मागच्या प्रकरणात दिलीच आहेत. परंतु इतर देशांतील अनुभवाने दाखवून दिल्याप्रमाणे विरोधाची आवश्यकता प्रतिपादन करणाऱ्या युक्तीवादामुळेही निर्णय घेण्याच्या पातळीवर देखील विधायक प्रवृत्तीने प्रभाव पाडण्याचा उपक्रम आड येत नाही. त्यामुळे सामाजिक न्यायात निश्चितच भर पडेल आणि यापुढे कोणतेही दूरगामी निर्णय देखील कामगार संघटनांशी विचारविनिमय केल्यानंतरच घेतले जातात हे ठाऊक झाल्यामुळे कदाचित संशयाचे आणि असंतोषाचे वातावरणही पहिल्याइतके राहणार नाही.

● ● ●

प्रकरण सतरावे

# खाजगी उद्योगांचा ढाचा

## १. कार्यविहीन भागधारक

उद्योगातील दर्जा आणि सत्ता यासंबंधीच्या आणखी तीन प्रश्नांचा विचार अद्याप आपल्याला करावयाचा आहे. कंपनी कायद्यात दुरुस्ती घडवून आणल्या तर सामाजिक न्याय किंवा समाधान यात सुधारणा होऊ शकेल का हे एक आणि दुसरे म्हणजे नफ्यातील सहभाग अधिक व्यापक केल्याने किंवा लाभांशावर कायद्याने मर्यादा घालून हे उद्दिष्ट साध्य होऊ शकेल का ?

कंपनी कायद्याबाबत दोन विचारसरणी प्रचलित आहेत. एका बाजूला शहरी लेखक भागधारकांविषयींच्या कायद्यातील तरतुदींचे समर्थन करतात आणि भाग-धारकांनी आपले अधिकार अधिक कसोशीने बजावून घ्यावेत असे आग्रहाने प्रतिपादन करतात तर, दुसऱ्या बाजूला सध्याच्या कायद्याचा वास्तवतेशी कसलाही संबंध राहिलेला नसल्याने त्यात महत्त्वाच्या मूलभूत सुधारणा करून कामगारांच्या आणि समाजाच्या हक्कांची कायदेशीर तरतूद करण्यात यावी असे मत व्यक्त करणारे काही टीकाकार आहेत. या वादात मी कोणतीच बाजू घेऊ इच्छित नाही हे मी कबूल करतो. यापैकी पहिली विचारसरणी तत्वत: मला संपूर्णपणे अमान्य असली तरी महत्त्वाचे बदल घडवून' आणणे व्यवहारत: इष्ट ठरेल का ? आणि खरोखरी कायद्याचे प्रश्न इतके महत्त्वाचे तरी आहेत का याविषयी माझ्या मनात शंका आहे.

सध्याच्या कायद्यासंबंधी तत्त्वत: बोलण्यासारखे काही आहे असे मला वाटत नाही. या कायद्यानुसार कोणत्याही कंपनीच्या संचालकांची नेमणूक करण्याचा आणि ताळेबंद मंजूर करण्याचा अधिकार फक्त भागधारकांकडेच ठेवण्यात आलेला आहे. इतर कोणालाही तो देण्यात आलेला नाही. अशा भागधारकांकडे त्या त्या कंपनीच्या शेअर्सची मालकी असल्याने ते त्या कंपनीचे 'कायदेशीर' सभासद

ठरतात आणि त्यामुळेच फक्त त्यांच्याकडेच हा अधिकार राहू शकतो. कंपनीचे कामगार ग्राहक किंवा सरकार यापैकी कोणीच कंपनीच्या कारभाराबद्दल कायदेशीररित्या जबाबदार नसतात. त्याचप्रमाणे त्यापैकी कोणाला कसले कायदेशीर हक्कही नसतात.

ही परिस्थिती काहीशी अस्वाभाविक वाटते. व्यवहारतः कोणताही उद्योग हा एक संयुक्त व्यवहार असतो. कंपनीचे भागधारक, त्याचप्रमाणे व्यवस्थापक आणि कामगार हे सारेच त्यात सहभागी झालेले असतात, आणि खरोखरीच व्यवस्थापक आणि कामगार त्यात खूप क्रियाशील भाग घेत असतात हे कोणालाच नाकरता येणार नाही. त्यामुळे केवळ भागधारकांकडेच हे सारे अधिकार सुपूर्द करण्यात त्या कायद्याने प्रत्यक्ष वस्तुस्थितीकडे पाठ फिरविली आहे इतकेच नव्हे तर तिचा संपूर्ण विपर्यास करून टाकलेला आहे. एका विख्यात हुजूरपक्षीय मुत्सद्यानेदेखील असे म्हटले आहे की, 'वस्तुतः मानवी सहयोगातून संपत्तीचे उत्पादन आणि वितरण होते. परंतु कामगार, व्यवस्थापक, तंत्रविशारद आणि संचालक यांचा सहयोग होत असतो हे मात्र कायद्यात मान्य करण्यात आलेले नाही. कायद्याने फक्त भागधारक, धनको आणि संचालक यांचाच तेवढा सहयोग मान्य केला आहे. परंतु त्यांच्या सहयोगातून उत्पादन होऊ शकत नाही, त्याचप्रमाणे त्याचे वितरणही होऊ शकत नाही.'

तात्त्विक भूमिकेवरून कायद्याने स्वीकारलेल्या या भूमिकेचे यापुढे समर्थन होऊ शकणार नाही. राजकीय तत्त्वप्रणालीत संपत्ती धारण करण्याच्या तत्त्वाला फार जुना आणि मानाचा इतिहास आहे हे खरे. या सिद्धांताला आधुनिक स्वरूप देण्याचे श्रेय लॉककडे जाते. आणि खाजगी हक्क हे नेहमीच अबाधित असतात ही त्याची तत्वप्रणाली त्यावेळच्या परिस्थितीत पुरोगामी होती इतकेच नव्हे तर ती क्रांतीकारी होती. परंतु कोणताही राजकीय सिद्धांत चिरकाल टिकणारा असत नाही. आणि आजची परिस्थिती संपूर्णपणे बदललेली असतांना उद्योगाच्या रचनेत बदल घडवून आणण्याच्या कामी हा सिद्धांत आड येता कामा नये.

खाजगी संपत्तीमुळे मिळणाऱ्या हक्काचा ज्यावेळी समाजातील इतर हक्कांशी ( उदा. कामगार, ग्राहक किंवा प्रादेशिक हक्क ) संघर्ष निर्माण होतो त्यावेळी त्यापैकी कोणते हक्क राहू द्यावेत असा प्रश्न उपस्थित झाला तर माझ्या समजुतीने बहुतेक लोकांना प्रामुख्याने पुढील दोन गोष्टी विचारात घ्याव्या असे वाटेल. त्यापैकी पहिली गोष्ट ही की, हे हक्क राहू देण्यासारखे कोणते कार्य खाजगी संपत्ती बजावीत असते आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्या संपत्तीचे वितरण कशा पद्धतीने होत आहे ? आणि सर्व नागरिकांना ती संपत्ती धारण करण्याची समान संधी उपलब्ध आहे की नाही ?

शंभर वर्षांपूर्वी उद्योगांवरील मालकीशी क्रियाशील व्यवस्थापक प्रत्यक्षपणे

निगडीत असत. त्यामुळे त्या मालकीमुळे काही महत्त्वाची आर्थिक कामगिरी बजावली जात असे. परंतु आजच्या उद्योगात मालकी आणि व्यवस्थापन यांची बव्हंशी फारकत झालेली असून त्यासंबंधीचा पुरेसा उहापोह या पुस्तकात अन्यत्र करण्यात आलेला आहे. उद्योगाचा मालक हा आता पहिल्यासारखा क्रियाशील कारखानदार अजिबात राहिलेला नाही तर तो आता नेहमीच्या पहाण्यातला निष्क्रीय भागधारक बनला आहे. आज त्याच्या कारखान्यावर त्याचे कसलेही नियंत्रण राहिलेले नाही आणि त्याने मनात आणले तरी देखील ते आता राहू शकणार नाही. कारण भागधारकांनी जातीने कारखान्याचा कारभार पहाणे ही गोष्ट आता अशक्य होऊन बसली आहे एक तर भागधारकांची संख्या भरमसाठ वाढली आहे. काही अवाढव्य उद्योगात लाखालाखाच्यावर भागधारकांची नावे त्यांच्या पटावर असतात तर बहुतेक सर्व सार्वजनिक कंपन्यांतील भागधारकांची संख्या दोन हजाराच्यावर असते. आणि दुसरे असे की भौगोलिक दृष्टयाही ते इतस्तत: पसरलेले असतात.

त्याचप्रमाणे कारखाना चालवण्याची त्यांना इच्छाही नसते. बहुतेक भागधारक उद्योगाच्या बाबतीत अगदी अनभिज्ञ असतात. चाळीस टक्के भागिदार स्त्रिया असतात आणि इतरांना आपले नित्याचे व्यवसाय असतात आणि त्यांना आपला सर्व वेळ त्यासाठीच द्यावा लागतो. नेहमीच्या व्यवसायाच्या व्यतिरिक्त आणखी उत्पन्न मिळावे किंवा गाठी असलेले पैसे गुंतवून त्यात वाढ करावी या उद्देशाने त्यांनी शेअर्स खरेदी केलेले असतात. कारखान्यावर नियंत्रण ठेवता यावे म्हणून ते त्या फंदात पडलेले नसतात. धंद्यात हिरीरीने भाग घ्यावा असे वाटत असते तर त्यांनी आपले पैसे निरनिराळ्या कंपन्यात गुंतविले असते पण तसे न करता ते आपले पैसे निरनिराळ्या कंपन्यांत गुंतवतात. शिवाय बहुतेक सर्व मोठ्या कंपन्यांतील शेअर्सचे फार मोठ्या प्रमाणावर हस्तांतर होत असते. ( कामगारसुद्धा इतक्या मोठ्या प्रमाणावर या कारखान्यांतून त्या कारखान्यात जात नाहीत.) भागधारकांनी एकाच कारखान्याचे शेअर्स कायमचे धारण केले असते तर त्या कारखान्याच्या बऱ्यावाईटाची त्यांना खरोखरीच तळमळ लागून राहिलेली असते असे म्हणता आले असते परंतु कोणत्याही एका कंपनीत शेअर्सच्या बाबतीत अशी स्थिरता कधीच आढळत नाही.

भागधारकांचे कैवारी यापैकी कशाचाही इन्कार करीत नाहीत. मरहूम हरग्रीव्हस पार्किनसन यांची भागकारकांच्या कैवाऱ्यांत प्रामुख्याने गणना होते. पण त्यांनी देखील असे म्हटले आहे की, ‘फारच थोडे भागधारक वार्षिक सभांना हजर राहतात किंवा आपल्यातर्फे मतदानासाठी दुसरा कोणीतरी प्रतिनिधी पाठवतात. अशा भागधारकांचे मुख्य काम संचालक जे काही निर्णय घेतील त्यावर शिक्कामोर्तब करणे एवढेच असते. हे मान्य करावे लागेल की, सामान्यत: भागधारकाला कंपनीच्या कामकाजात रस नसतो. म्हणजे असे की, तो कंपनीच्या कारभारात

अधूनमधून देखील लक्ष घालत नाही. धंद्यातील उलाढाली त्याला समजत नाहीत किंवा त्या समजावून घेण्याचा तो कधी प्रयत्नही करीत नाही हा जवळजवळ नियमच होऊन बसला आहे... सर्व भागधारकांना सांधणारा जर कोणता दुवा सध्या अस्तित्वात असेल तर तो म्हणजे जास्तीत जास्त लाभांश मिळविण्याची सर्वांची समान इच्छा.'

खुद्द भागधारकांनाही आपले आर्थिक कार्य कमी कमी होत चालल्याची मनातून जाणीव असावी असे दिसते. त्यामुळेच त्यांच्या पूर्वीच्या हक्कांचे रक्षण करण्यासाठी त्यांना संघटित करण्याचे जे प्रयत्न होतात त्याबद्दलही ते बेफिकीर आणि उदासीन असतात. भांडवलशाहीच्या पद्धतीनुसार शेअर्सच्या गठ्ठ्यांतून कारखान्याची इमारत आणि यंत्रसामुग्री उभारली जात असल्यामुळे संपत्तीमागील मूळ कल्पनेचा गाभाच उखडल्यासारखा होतो... 'आपल्या' कारखान्यासाठी आणि त्या कारखान्यावरील 'आपल्या' नियंत्रणासाठी आर्थिक, शारीरिक आणि राजकीय लढा देण्याची, त्यासाठी प्रसंगी कारखान्याच्या पायरीवर देह ठेवण्याची जिद्दच भागिदारांपाशी राहिलेली नसते.. ज्याचे महत्व नष्ट झालेले आहे, ज्याला कसलेही कार्य उरलेले नाही आणि ज्याची मालकी केवळ नाममात्र आहे किंवा मालक म्हणून जो कधी हजरही नसतो त्याची छाप ती काय पडणार आणि त्याला नैतिक प्रतिसाद तरी कसा मिळणार ? त्यामुळे जो मनापासून त्याची बाजू उचलून धरील असा कोणीच रहात नाही. मोठमोठ्या कारखान्यांशी संबंध असलेले सुद्धा त्यात क्वचितच लक्ष घालतात.

ब्रिटनमध्ये निदान अद्याप तरी परिस्थिती या थरावर गेलेली नाही. परंतु शेअर्सची मालकी असलेल्यांच्या वर्गाची प्रतिकार करण्याची इच्छा आणि आत्मविश्वास यांचा लोप होत असल्याचे मात्र स्पष्टपणे निदर्शनास येत आहे. शंभर वर्षापूर्वी लहान मुलांना कामावर ठेवण्याच्या बाबतीत निर्बंध घालण्यास जितका विरोध झाला त्यापेक्षा १९४५-५१ या काळात राष्ट्रीयीकरणाचे उपाय योजतांना फारसा जास्त विरोध झाला नाही. आणि भागधारकांचा कैवार घेण्यासाठी आपणहून पुढे आलेल्यांची खरी शोकांतिका भागधारकांच्या राजकीय निष्क्रीयतेत समावलेली आहे. त्यानंतर पुढे आलेल्या सूचनांना (उदा. पोलाद किंवा रासायनिक उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करावे) अर्थातच जास्त विरोध झाला. परंतु तो विरोधसुद्धा अपेक्षेप्रमाणे फारसा हिंसक किंवा आक्रमक स्वरूपाचा नव्हता इतकेच नव्हे तर तो सर्वस्वी व्यवस्थापनाकडूनच होत होता. भागधारकांनी त्या विरोधात कसलाही भाग घेतलेला नाही. राष्ट्रीयीकरणाच्या सूचनेची पार चिरफाड करून टाकणारी अत्यंत प्रखर (आणि अत्यंत यशस्वी) अशी राष्ट्रीयीकरण विरोधी मोहीम टेट अँड लाईल या सार्वजनिक कंपन्यांपैकी एका अत्यंत मोठ्या कंपनीने आणि त्या कंपनीचे एक भागीदार मरहूम लार्ड लाईल या व्यक्तीने उभारली होती हे विशेष. परंतु

भागधारकांत लढ्याची जिद्द निर्माण करण्याच्याबाबतीत सर्वसाधारणपणे कमालीचे अपयशच या आंदोलनाच्या पदरी आले. जणू काही त्यांचा त्यांच्या विरोधकांवर ज्याप्रमाणे फारसा विश्वास नव्हता त्याचप्रमाणे त्यांच्या स्वतःच्या मागणीच्या यथार्थतेबद्दलही ते साशंक होते.

१९५१ पासून भागधारकांच्या चळवळीचे काही प्रमाणात पुनरुज्जीवन झाले हे खरे. या चळवळीचे स्वरूप भागधारकांची संघटना स्थापन करणे आणि उद्योगांवर पुन्हा ताबा मिळविण्याचा प्रयत्न करणे अशा स्वरूपाचे होते. परंतु असे प्रयत्न किती झाले यापेक्षाही ते इतके अत्यल्प कसे होते हीच खरी आश्चर्याची बाब आहे. कारण त्यावेळचे वातावरण या चळवळीला कमालीचे अनुकूल होते. त्यापूर्वी लाभांशावर लादण्यात आलेली मर्यादा, जिंदगी आणि शेअर्स यांच्या मूल्यात डोळ्यात भरण्याइतकी असलेली तफावत, उत्पन्नावर असलेली भारी कर आकारणी परंतु त्यामानाने भांडवली फायद्यांचा मात्र संपूर्ण अभाव, हुजूरपक्षीय सरकारची राजवट, शहरांतील सर्व वृत्तपत्रांचा जोरदार पाठिंबा आणि पंधरा वर्षे विक्रेत्यांना अनुकूल असलेल्या चढ्या बाजारपेठेनंतर व्यवस्थापक वर्गात निश्चितपणे आलेले बरेचसे शैथिल्य—इतक्या सगळ्या गोष्टी अनुकूल असतांना भागधारकांची चळवळ झाली त्यापेक्षा वस्तुतः कितीतरी अधिक व्हावयाला पाहिजे होती. उद्योगावर ताबा मिळविण्यासाठी भागधारकांनी केलेल्या चळवळीच्या काळाचा आढावा घेतांना भागधारकांच्या एका खंद्या पाठीराख्याने भागधारकांची निष्क्रीयता तशीच चालू रहावी याबद्दल अत्यंत खेद व्यक्त केला असून भागधारकांना त्याने भांडवलशाहीचा ट्रोजन हॉर्स (म्हणजे छुपे सैन्य) म्हणून संबोधले आहे. त्या काळाबद्दल अत्यंत खेदाने तो लिहितो : ' प्रगती घडून आली असली तरी त्या काळात एकूण कामगिरी स्फूर्तीप्रद होती असे म्हणावयाला माझे मन घेत नाही. '

उद्योगातील प्रत्यक्ष कारभाराच्या संदर्भात भागधारकांच्या नियंत्रणाचे तत्त्व आता सर्वस्वी अमान्य झालेले असले तरी भांडवल गुंतवणुकीत जो धोका पत्करावा लागतो तो विचारात घेता ते अद्यापही समर्थनीय ठरू शकेल.

भांडवल गुंतवणुकीच्या बाबतीत मर्यादित जोखमीची कल्पना रूढ होण्यापूर्वीच्या काळात हा धोका खरोखरीच फार मोठा असे. त्यापायी एखाद्यावेळी संपूर्ण दिवाळे वाजण्याचीही पाळी येई. परंतु आता त्याचे प्रमाण कितीतरी कमी झाले आहे. भांडवल गुंतविणाऱ्याला तो एखाद्या कंपनीत जेवढी रक्कम गुंतवील तेवढ्यापुरताच आता धोका पत्कारावा लागतो. आणि पैसे गुंतविणारे बहुतेक सर्वचजण एकाच कंपनीत सर्व पैसे न गुंतविता अनेक निरनिराळ्या कंपन्यांचे शेअर्स खरेदी करून हा धोका आणखी कमी करीत असतात. आणि त्यांनी तसे केले नाही तरी देखील सार्वजनिक कंपन्यांच्या बाबतीत तरी तो धोका फार मोठा असत नाही. दिवाळे निघण्याची प्रवृत्ती दिवसेदिवस कमी होत चालली आहे असे दिसते. आणि

भागधारकांना, गुंतवलेले सारेच्या सारे पैसे गमावून बसावे लागेल या अर्थाने धोकादायक म्हणता येतील अशा मोठाल्या कंपन्या आज फारच थोड्या दाखवता येतील. बऱ्याचशा कंपन्यांना बाजारपेठेच्या बाबतीत एकाधिकाराचे काही ना काही तरी संरक्षण उपलब्ध असते तर त्याहूनही जास्त कंपन्या अनेक प्रकारचे उत्पादन करून भांडवल गुंतवणुकीतील संभाव्य धोका विखरून ठेवतात. त्याशिवाय सर्वांना रोजगार आणि चलन वाढ यामुळे त्यांना भरपूर संरक्षण मिळत असते ते निराळेच.

अर्थात भांडवलाच्या अवमूल्यनाचा धोका शिल्लक उरतोच (परंतु पूर्वीपेक्षा आता तो खूपच कमी असतो)— परंतु हमी असलेल्या भांडवलाच्या बाबतीतही तो संभवतोच. कारण व्याजाचे दर वाढले की त्याची किंमतही झपाट्याने घसरू लागणे शक्य असते. परंतु तेवढ्यावरून असे रोखे धारण करणाऱ्यांना नाणेविषयक धोरण ठरविण्याचे कायदेशीर अधिकार असावेत असे काही कोणी सुचवीत नाही. त्याचप्रमाणे उत्पन्नात घट येण्याचाही धोका असतो (अर्थात हाही पहिल्यापेक्षा खूपच कमी असतो). त्यामुळे हा धोका भरून निघू शकेल इतके उत्पन्नाचे प्रमाण मोठे असले पाहिजे ही मागणी समर्थनीय ठरते. परंतु भांडवलात कायमची खोट येण्याचा धोका मात्र अगदी क्षुल्लक असतो. वस्तुतः केवळ धोक्याचाच विचार करावयाचा झाला तर आपल्यालाही नियंत्रणाचे कायदेशीर अधिकार मिळाले पाहिजेत या कामगारांच्या भूमिकेतही तितकेच तथ्य आहे असे म्हणावे लागेल. भागधारकांप्रमाणे तो आपला धोका निरनिराळ्या कंपन्यात विखरून ठेवू शकत नाही. तो ज्या कारखान्यात कामाला असेल त्याचे दिवाळे निघाले, किंवा त्या कंपनीने या कामगाराला कामावरून दूर केले तर (बेकारीची परिस्थिती नसता-नाही) त्याला सक्तीने दुसऱ्या मालकाकडे काम शोधावे लागते व तसे करतांना कदाचित त्याला कमी पगारावर आणि वाईट परिस्थिती असलेल्या ठिकाणीही नोकरी पत्करावी लागते. एखादाच मोठा कारखाना असलेल्या गावात तो रहात असेल तर एकतर त्याला दीर्घकाळापर्यंत बेकार तरी रहावे लागते किंवा बायका-मुलांना घेऊन एखाद्या परक्या ठिकाणी जाणे भाग पडल्यामुळे त्याच्या कौटुंबिक जीवनात फार मोठ्या उलथापालथीही घडून येऊ शकतात. ही सर्व परिस्थिती लक्षात घेता हा विषय केवळ थट्टेवारी न्यावयाचा नसेल तर भागधारकाला धोका पत्करावा लागतो. येवढ्या कारणावरून भांडवलाचे नियंत्रण सर्वस्वी त्याच्या हातात असले पाहिजे असा आग्रह धरणे जरासे अप्रस्तुतच वाटते.

भांडवल गुंतवणुकीतील धोका कमी होत आहे हेही भागधारकांच्या प्रवक्त्यांना संपूर्णपणे मान्य आहे. 'एकादी सुस्थितीतील कंपनी नफा मिळविण्याची आपली सर्वच्या सर्व शक्ती गमावून बसेल असा धोका फार करून संभवत नाही. पैसे गुंतविणारेही त्याकडे बव्हंशी दुर्लक्ष करू शकतात—आणि ते तसे करतातही. सर्वसाधारण शेअर्समध्ये एक फार मोठी शक्ती असते आणि ती दीर्घ कालावधीत

लाभांश आणि बाजारातील मूल्य यातील वाढीच्या रूपाने व्यक्त होते. त्यामुळे खरोखरींच्या चांगल्या सर्वसाधारण शेअर्सची खरेदी करण्यात पत्करलेला 'धोका' हा एकंदरीने पाहता 'फायदेशीर धोका ठरतो' हे लेखक धोका कमी होत असल्याचे मान्य करतात इतकेच नव्हे तर आता सर्वसाधारण शेअर्स हे अल्प बचतीचे सोयिस्कर असे साधन बनले असून त्यामुळेच आपल्या समाजाचे रूपांतर हळूहळू 'संपत्ती-धारकांच्या लोकशाहीत' होणार आहे या आपल्या विचाराला त्याचाच आधार घेतात. परंतु त्यांना असे दोन्ही बाजूंनी बोलता येणार नाही. एक तर अद्यापही पैसा गुंतवण्यात बराच धोका आहे असे मानले पाहिजे आणि तसे मानले तर गरिबागुरिबां-नाही त्यांनी अडीअडचणीसाठी बाजूला काढून ठेवलेली शिल्लक सर्वसाधारण शेअर्स-मध्ये गुंतवून टाकण्यास सांगणे म्हणजे त्यांची क्रूर फसवणूक केल्यासारखे ठरते. किंवा त्यांत जवळपास अजिबात धोका नाही असे मानावे लागते. त्या परिस्थितीत अल्पबचतीचा विनियोग औद्योगिक कंपन्यांच्या भागभांडवलांत गुंतविण्याकडे कर-ण्यास सांगणे वाजवी ठरते. परंतु मग धोक्याच्या कारणास्तव भागधारकांना नियं-त्रणाचा अधिकार असला पाहिजे हा दावा बिनबुडाचा ठरतो. वस्तुतः प्रत्यक्ष परिस्थिती ही दुसऱ्या प्रकारात मोडणारीच असते.

यावरून हे स्पष्ट होईल की, गुंतवणुकीचे स्वरूप किंवा शेअर बाजाराचे कार्य यामुळे गुंतवणूक करणाराला भांडवलाच्या संपूर्ण कायदेशीर नियंत्रणाचा नैसर्गिक 'हक्क' प्राप्त व्हावा असे आज काहीही दाखवता येणार नाही. भांडवल गुंतवणु-कीमुळे कोणतीही सामाजिक जबाबदारी अंगावर येऊन पडत नाही. आणि त्या-मुळे चोरापासून किंवा जबरदस्तीने संपत्ती ताब्यात घेतली जाण्यापासून संरक्षण, या इतर सर्व नागरिकांना मिळणाऱ्या हक्काव्यतिरिक्त इतर कोठलेही जादा सामा-जिक आधिकार गुंतवणुक करणाराला मिळता कामा नयेत. पैसे गुंतविणाराला अधिक धोका जरूर पत्करावा लागतो आणि म्हणून तो धोका भरून निघेल इतका आर्थिक मोबदला काय तो त्याला मिळाला पाहिजे.

## २. सरकारी संचालक नेमण्याची सूचना

पण मग प्रश्न असा उपस्थित होतो की, सध्याच्या परिस्थितीत बदल घडवून आणण्यासाठी कंपनी कायद्यात मोठ्या प्रमाणावर दुरुस्ती करणे कितपत इष्ट ठरेल ? या सुधारणांमुळे जी गुंतागुंत निर्माण होईल आणि त्यापासून प्रत्यक्षात नेमके कोणते फायदे (केवळ तर्कसंगतीचे फायदे नव्हेत) अभिप्रेत आहेत यावर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून राहील. अशी सुधारणा घडवून आणली पाहिजे असा आग्रह धरणारे ड्रकर, गॉयडर आणि आल्बू यांनी या संबंधात केलेल्या सूचनांचे परिशीलन केल्यानंतर या दोन्ही मुद्यांबाबत माझ्या मनात काही शंका निर्माण झाल्या आहेत. औद्योगिक क्षेत्राची उभारणी अधिक तर्कशुद्ध व्हावी म्हणून या

लेखकांनी प्रारंभी प्रयत्न केले याबद्दल त्यांना कमालीचे धन्यवाद दिले पाहिजेत. परंतु तरीदेखील इतके कष्ट घेतल्यासरसे त्या सुधारणांतून काही निष्पन्न होईल किंवा नाही याविषयी मी साशंकच आहे.

यापैकी अगदी नेहमीची सूचना म्हणजे प्रथम सरकारला आणि त्यानंतर कामगारांना कंपन्यांच्या संचालक मंडळावर आपले प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क मिळाला पाहिजे. यापैकी सरकारी प्रतिनिधित्वाविषयी अशी तरतूद सुचविण्यात आली आहे की, प्रत्येक सार्वजनिक कंपनीत 'बोर्ड ऑफ ट्रेड'चा एक शेअर आणि त्याबरोबर मंत्र्याला योग्य वाटल्यास 'बोर्ड ऑफ ट्रेड'ला कंपनीच्या संचालकांची नियुक्ती करण्याचा कायदेशीर अधिकार राहील. त्यामुळे सार्वजनिक जबाबदारीची हमी राहील आणि त्याचबरोबर एकूण सर्वच अर्थव्यवस्थेवर परिणामकारक नियंत्रण राहू शकेल.

परंतु पहिल्या प्रकरणात दिलेले बदल घडून आल्यानंतर मोठमोठ्या सार्वजनिक कंपन्यातून जर कोणता दोष दिसून येत असेल तर तो 'सार्वजनिक जबाबदारीचा' अभाव; म्हणजे सरकारच्या इच्छेकडे दुर्लक्ष केले जाते हा नव्हे. अशा कंपन्यांचा सरकारच्या निरनिराळ्या खात्यांशी सतत संपर्क असतो आणि सर्वसाधारणपणे सरकारी धोरणाबद्दल (अर्थात सरकारी धोरण असे काही असेल तर) त्या जागरूक असतात आणि सार्वजनिक हित डोळ्यापुढे ठेवून वागण्याचा त्या जाणीवपूर्वक प्रयत्नही करीत असतात आणि तसा प्रयत्न त्या करीत नसतील तर संचालक म्हणून एक दोन त्रयस्थ इसमांना तेथे पाठविण्याऐवजी कंपन्यांना तसे करावयास लावण्यासाठी दुसरे अधिक प्रभावी उपाय योजता येण्यासारखे आहेत. कारण अशा त्रयस्थ संचालकांवर टीकेचा जरासा भडिमार झाल्याबरोबर व्हाईट हॉलमधील कलबर्ट या लोकपालासारखी भूमिका स्वीकारावी असे त्यांना वाटू लागेल.

परंतु ही सर्वसाधारण जबाबदारीची बाब सोडली तरी उद्योगावर नियोजनाच्या बाबतीत अधिक परिणामकारक नियंत्रण राहण्यासाठी सरकारनियुक्त संचालक असणे आवश्यक आहे असा युक्तिवाद केला जातो. परंतु आधुनिक स्वरूपाच्या सरकारी नियोजनाबद्दल हा युक्तिवाद करणाऱ्यांच्या मनात कसला तरी गोंधळ असावा असे वाटते. बेसुमार चलनवाढीचा अपवाद सोडला तर अगदी प्रत्येक कारखान्यापर्यंत तपशीलवार नियोजनाची आवश्यकता नसते तर सर्व उद्योगांवर किंवा अनेकदा उद्योगांच्या निरनिराळ्या गटांवर व्यापक स्वरूपाचे नियंत्रण ठेवणे आवश्यक असते आणि विशिष्ट परिस्थितीत एकेका कारखान्याचे नियोजन करून देणे आवश्यक ठरले तरी त्यासाठी सरकारनियुक्त संचालकाची नेमणूक करण्यापेक्षा प्रत्यक्ष नियंत्रणे बसविण्याचा मार्ग अधिक योग्य ठरतो. कारण नियंत्रणे अधिक लवचिक असतात आणि ती जरूर तेव्हा बसविता येतात व

आवश्यकता नसेल तर काढून घेता येतात. शिवाय अशा नियंत्रणांची अंमलबजावणी देशभर पसरलेल्या शेकडो व्यक्तींवर न सोपवता मध्यवर्ती सत्तेकडूनच नियंत्रणांच्या धोरणाचे सूत्रसंचालन होत असल्याने त्यात कार्यक्षमता अधिक राहते.

अर्थात नियंत्रणाच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीत प्रचंड अडचणी उभ्या राहतात. सरकाने नियुक्त केलेले संचालक कंपनीचेच होऊन जातील, नाही तर त्यांच्याबद्दल एकसारखा संशय तरी घेतला जाईल. त्यामुळे यापैकी कोणत्याही परिस्थितीत तो आपले कर्तव्य योग्य तऱ्हेने पार पाडू शकणार नाही असा आक्षेप नेहमीं घेतला जातो. त्याचप्रमाणे ज्या ज्या वेळी धोरणाविषयी काही मतभेद निर्माण होतील त्यावेळी एक तर सरकारनियुक्त संचालकांना नकाराधिकार तरी असला पाहिजे नाही तर पराभव पत्करण्याची तरी त्यांनी तयारी ठेवली पाहिजे. त्यापैकी नकाराधिकार वापरण्याची मुभा मिळाली तर त्यामुळे व्यवस्थापनातील कार्यक्षमतेवर प्रतिकूल परिणाम घडून येईल आणि सरकारी संचालकांचा पराभव होऊ लागला तर सरकारी संचालक नियुक्त करण्यामागील मूळ हेतूच निरर्थक ठरेल. शिवाय या योजनेसाठी जे शेकडो संचालक लागतील ते आणावयाचे कोठून? ज्यांची या क्षेत्रातील पात्रता सिद्ध झालेली आहे आणि शिवाय ज्यांचा दृष्टिकोण पुरोगामी आहे, मजूरमंत्र्यांनी नियुक्त केले तर जे आपली कामगिरी उत्साहाने आणि कार्य-क्षमतेने बजावू शकतील अशा व्यक्तींची आजच आपल्याला तीव्र टंचाई भासत आहे. या टंचाईमुळेच सध्याच्या सार्वजनिक क्षेत्रातील कामगारविषयक संबंधांत बेबनाव निर्माण होत असून सार्वजनिक क्षेत्रातील असंख्य संस्थांवर कर्तबगार माणसांची नेमणूक करणे मजूर सरकारला अतिशय कठीण होऊन बसले आहे. यापुढील प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे स्पर्धात्मक सार्वजनिक क्षेत्राचा विस्तार होत गेला तर परिस्थिती अधिकच बिघडेल कारण असा विस्तार घडवून आणा-वयाचा तर नेमकी ही योग्यता असलेली माणसे उभी करावी लागतील. हे उद्दिष्ट इतर मार्गांनी साध्य होण्यासारखे असतांना इतक्या चांगल्या कर्तबगारीची आणि बुद्धिमत्तेची क्वचितच आढळणारी माणसे अशा तऱ्हेने वाया घालवणे खासच शहाणपणाचे ठरणार नाही.

शेवटचा मुद्दा असा की, या सूचनेमुळे राजकीय वातावरण अतिशय तापेल. परंतु त्यामानाने प्रत्यक्षात घडून येणारा त्याचा प्रभाव मात्र अगदी अत्यल्प असेल. कोठलेही निश्चित असे उद्दिष्ट न देता सरकार सर्व उद्योगांवर नियंत्रण ठेवण्याची फार मोठी सत्ता आपल्या हाती घेत आहे अशी सरकारची प्रतिमा उभी केली जाईल. व्यवस्थापक आणि भागधारक हे प्रत्येक ठिकाणी बाह्या सरसावून लढ्याच्या पावित्र्यात उभे ठाकतील. नागरिकांबरोबरचे सरकारचे संबंध कसे असतील ते कायद्याने स्पष्ट झाले पाहिजे या म्हणण्यात बरेच तथ्य आहे. कारण त्यामुळे प्रत्येक नागरिकाला आपले नेमके स्थान कोणते, कोणत्या वर्तनाबद्दल आपल्यावर ठपका

ठेवण्यात येईल आणि कोणत्या वर्तनाबद्दल ठेवण्यात येणार नाही हे समजून येईल. आणि कोणतेही निश्चित अधिकारक्षेत्र नसल्यामुळे सहाजिकच मनमानेल तसे निर्णय घेणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांवर त्यासाठी विसंबून रहावे लागणार नाही.

## ३. कामगारांतून संचालक नेमण्याची सूचना

राहता राहिली कामगारांच्या कायदेशीर स्थानाविषयीची सूचना. याबाबतीतील पहिली सूचना अशी की, कामगार ज्या कारखान्यांत काम करीत असतील त्या कारखान्यांचे त्यांना, जर त्यांची इच्छा असेल तर, (त्या कारखान्यात त्यांची निश्चित केलेली किमान नोकरी झाल्यानंतर) कायदेशीर सभासद नेमण्यात यावे आणि भागधारकांप्रमाणेच कारखान्याची आर्थिक जाणकारी प्राप्त करून घेण्याची आणि वार्षिक सर्वसाधारण सभेत एकूण मतदानाच्या अधिकारात त्यांचेही काही निश्चित प्रमाण ठरवून देण्यात यावे. गॉयडर यांच्या सूचनेप्रमाणे बिनव्याजी शेअर्सचा एक स्वतंत्र वर्ग करण्यात आला तर हे साध्य होऊ शकेल. दुसरी सूचना अशी की, संचालक मंडळावरील काही प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार सभासदांना देण्यात यावा. सर्वच्या सर्व संचालक मंडळ कामगारांनीच निवडावे असे याठिकाणी सूचित करण्यात आलेले नाही – कारण कामगारांचे संपूर्ण नियंत्रण प्रस्थापित करावे असा या सूचनेचा हेतूच नाही तर त्यांना प्रतिनिधित्व मिळावे एवढाच मर्यादित हेतू त्यामागे आहे. कामगारांनी निवडून द्यावयाच्या प्रतिनिधींची संख्या नेमकी किती असावी ते चर्चा करून ठरविता येईल. जर्मनीतील 'मिट्बेस्टिमंग' कायद्यान्वये संचालक मंडळावर कामगारांच्या प्रतिनिधींसाठी एकतृतीयांश जागा राखून ठेवण्यात आल्या आहेत. गॉयडर यांची सूचना अशी आहे की, कामगार आणि भागधारक यांनी प्रत्येकी दोनपंचमांश प्रतिनिधी निवडावेत आणि व्यवस्थापनाला एकपंचमांश प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार असावा. मागील प्रकरणात दिलेल्या कारणास्तव कामगारांतून निवडावयाचे संचालक हे कामगार संघटनांनी निवडलेले असता कामा नयेत. ज्या कंपनीचा एकच कारखाना असेल तेथील सर्वच्या सर्व कामगारांनी मिळून संचालक मंडळावरील आपले प्रतिनिधी निवडले पाहिजेत. आणि ज्या कंपन्यांचे एकाहून जास्त कारखाने असतील तेथे संयुक्त सल्लागार समितीवरील कामगार प्रतिनिधींनी त्यांची निवड केली पाहिजे.

अशा तऱ्हेने प्रतिनिधित्व मिळाले पाहिजे या कामगारांच्या नैतिक (आणि तर्कशुद्ध) मागणीला कोणाला विरोध करता येईल असे मला वाटत नाही. परंतु त्याबाबत खरी अडचण जर कोणती असेल तर ती ही की, त्यांना स्वतःलाच हा हक्क बजवावा असे मनापासून फारसे वाटत नाही हे एक आणि दुसरे म्हणजे ही सूचना अंमलात आणतांना अनेक व्यवहार्य अडचणी उभ्या राहतील हे तर झालेच पण त्याशिवाय त्यामुळे निश्चित असा काही फायदा होईलच अशीही खात्री देता येत नाही.

यापकी पहिल्या मुद्याबाबत असे म्हणता येईल की, असा बदल घडवून आणण्याच्या कल्पनेला कामगार संघटनांकडून प्रत्यक्ष विरोध जरी झाला नाही तरी त्यांची वृत्ती उदासीनतेचीच राहणार. कारण त्यांना अशी भीती वाटते की, त्यामुळे कामगारांच्या प्रतिनिधींची संघटनेला समांतर अशी एक उतरंड निर्माण होईल. बरे त्या प्रतिनिधींची निवड कामगार संघटनांनी केलेली नसणार किंवा ते प्रतिनिधी कामगार संघटनेला जबाबदार नसणार. त्यामुळे कामगार संघटनांना आज सभासद कामगारांकडून जी निष्ठा मिळते त्यात एक प्रतिस्पर्धी निर्माण होणार. आणि त्यातून व्यवस्थापक वर्गाबरोबर वाटाघाटी करण्याच्या कामगार संघटनांच्या नित्याच्या कार्यात हस्तक्षेप केला जाण्याचा धोका निर्माण होणार. ही भीती वेडगळपणाची असो वा नसो कामगार संघटनांच्या मनात ती वसत असते एवढे खरे; आणि कामगारांचे प्रतिनिधी ज्याच्याबद्दल कसलेही औत्सुक्य दाखवीत नाहीत अशा सुधारणा कामगारांच्या वतीने पुढे रेटणे सोपे जात नाही. शिवाय सर्वसामान्य कामगारांनाही असा बदल मनापासून हवा असल्याचे कसलेही लक्षण दिसत नाही. त्यापैकी बहुतेकांना आणखी कसली जबाबदारी स्वत:वर ओढवून न घेता निवांतपणी जगता येईल तर बरे असे वाटत असावे. आणि जे थोडेसे कामगार लढाऊ असतात तेही कामगार संघटनांच्या किंवा मजूर पक्षाच्या सभांतून या प्रश्नावर चर्चा करताना किंवा त्यात विशेष लक्ष घालताना दिसत नाहीत.

त्यातील तांत्रिक अडचणी सहज लक्षात येण्यासारख्या आहेत; योग्य पात्रता असलेल्या भावी कामगार संचालकांची दुर्मिळता— संचालक म्हणून निवड होणाऱ्या कामगाराचे व्यक्तिमत्व उठावदार असावयास पाहिजे त्याचप्रमाणे त्याला आर्थिक आणि तांत्रिक बाबींसंबंधीचे काही ज्ञान असावयास पाहिजे आणि समितीच्या कामकाजात भाग घेण्याची कुवत त्यांच्यात असली पाहिजे; संचालक मंडळाचा सल्ला एकमुखी न राहिल्यामुळे उपक्रमशीलता कमी होण्याचा धोका; कामगार संचालक आणि कामगार संघटना यांच्यातील, विशेषत: वेतनासारखे प्रश्न उपस्थित होतात त्यावेळी, दुरावलेले संबंध; विघातक प्रवृत्तीवरच सर्वस्वी भर असलेले कम्युनिस्ट बहुसंख्येने निवडून येण्याचा संभव इ. सर्व मुद्दे नेहमीचेच आहेत.

आर्थिक दृष्ट्या याचे काय परिणाम घडून येतील हे सांगणे कठीण आहे. कारण निरनिराळ्या आकाराच्या आणि ढाच्याच्या कंपन्यांच्या बाबतीत अगदी बारीक सारीक तपशीलापर्यंत ही योजना कशी काय अमलात येऊ शकेल ते कोणालाच सांगता येणार नाही; (अर्थात ही योजना फक्त सार्वजनिक कंपन्यांनाच लागू करावयाची आहे.) येथे दोन प्रश्न उपस्थित होतात: एक, व्यवस्थापनेच्या कार्यक्षमतेवर आणि दोन, भांडवलाच्या पुरवठ्यावर त्यामुळे घडून येणारे परिणाम. त्यापैकी पहिली बाब ही अर्थातच कामगार संचालकांचा दर्जा कसा असेल आणि संचालक मंडळावरील आपल्या कर्तव्यासंबंधी ते स्वत:ची काय समजूत करून घेतात

म्हणजे आपल्या भाईबंदांचे तात्कालिक फायदे आणि गाऱ्हाणी यावर ते भर देतात की, धंद्यातील साहस किंवा कार्यक्षमता याला ते अधिक महत्त्वाचे स्थान देतात, यावर ते अवलंबून राहील. यातून नेमके काय निष्पन्न होईल ते कोणालाच सांगता येणार नाही. परंतु अनेक टीकाकार ब्रिटनमधील सर्वोच्च व्यवस्थापकांच्या कर्तृत्वाविषयी आताच चिंता व्यक्त करू लागले आहेत हे लक्षात घेता आणि संचालक मंडळ हे असे एक क्षेत्र आहे की जेथे सर्वांचे मतैक्य आणि त्याच बरोबर कृतीस्वातंत्र्य यांची विशेष आवश्यकता असते, त्याचप्रमाणे निवडून येण्यासाठी जे गुण अंगी असावे लागतात त्यापेक्षा कार्यक्षम संचालक होण्यासाठी अगदी निराळ्या गुणांची आवश्यकता असते हे सर्व लक्षात घेतले म्हणजे कार्यक्षमता कमी होणारच नाही असे कोणालाही खात्रीपूर्वक सांगता येणार नाही.

साधारण भागाच्या (ईक्विटी) स्वरूपातील भांडवलाच्या पुरवठ्यावर याचे काय परिणाम घडून येतील ते सांगताना अतिशयोक्ती केली जाण्याची शक्यता निश्चितच आहे. भांडवल जमा करण्याचे एक साधन म्हणून भागधारकांचे जे स्थान आहे ते नेहमीच फुगवून सांगितले जाते हे मी विसाव्या प्रकरणांत दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणे भागधारकाला मिळणाऱ्या नक्त मोबदल्यावर मर्यादा घालण्याचे अनेक उपायही (विशेषत: भांडवली नफ्यावर कर बसविणे, आणि लाभांश देण्यावर मर्यादा घालण्यासाठी उपाय योजणे) या पुस्तकांत सुचविण्यात आले आहेत. परंतु जोपर्यंत फार मोठ्या प्रमाणात खाजगी क्षेत्रांतील उद्योग आपण चालू देत आहोत तोपर्यंत ईक्विटीच्या स्वरूपांतील भांडवलाचा पुरवठा करण्याबाबात आपण किती धोका पत्करावयाचा यालाही कांही मर्यादा आहेत. विसाव्या प्रकरणांत नमूद केलेल्या कारणास्तव, करांच्याबाबतीत आपण ती मर्यादा गांठली आहे, किंवा तसेच पाहिले तर लाभांशावर मर्यादा घालण्याची कोणतीही ज्ञात आणि निश्चित अशी पद्धती अद्यापपर्यंत आपल्याला सापडली आहे असे मला वाटत नाही. तथापी करआकारणी किंवा लाभांशावर मर्यादा यासारख्या निश्चित उपायांपेक्षा अशा तऱ्हेचे बदल घडून आल्यामुळे जी कमालीची अनिश्चितता निर्माण होईल त्याचा भांडवल निर्मितीवर निश्चितच अत्यंत प्रतिकूल परिणाम घडून आल्याशिवाय राहणार नाही. अशा तऱ्हेने निर्माण करण्यांत आलेल्या आणि जवळजवळ प्रतिवर्षी त्यावरील सभासदांत बदल होणाऱ्या बोर्डाचे धोरण काय राहणार त्याचा भांडवल गुंतवणूक करणारांना कधीच थांगपत्ता लागणार नाही. सुस्थितीत असलेल्या सार्वजनिक कंपन्यांवर याचा नेहमीच अनिष्ट परिणाम घडून येईल असे नाही; परंतु खाजगी कंपन्यांना मात्र जनतेत आपले शेअर्स विकणे अशक्य होऊन बसेल— अशा खाजगी कंपन्यांचे सार्वजनिक कंपन्यांत रूपांतर झाल्याबरोबर संचालक मंडळात फेरबदल घडून येणार असल्याने वितरणाबाबत संचालक मंडळाचे धोरण काय राहील याची काहीच कल्पना करता येणार नाही. कर आकारणीच्या उपायाने लाभांशाचे

प्रमाण खाली आणणे सहज शक्य असल्यामुळे नवीन भांडवल उपलब्ध करून घेण्याच्या बाबतीत अशा तऱ्हेच्या अडचणी निर्माण करून घेण्याचे काहीच कारण नाही हे सहज समजण्यासारखे असल्यामुळे वर उल्लेखिलेला बदल घडवून आणण्याच्या विरुद्ध बाजू मांडणाऱ्यांच्या भूमिकेला काही वजन प्राप्त होते.

परंतु या सर्व अडचणी दूर करता येण्यासारख्या आहेत; आणि त्या अडचणींचे पर्यवसान अंती समाधान आणि सामाजिक न्याय यात निश्चित वाढ होणार असेल तर त्या सहन करण्यासही हरकत नाही. परंतु त्याबाबत जरा शंकाच वाटते.

मागील प्रकरणांत केलेले निदान बरोबर असेल तर समाधान किंवा औद्योगिक नीतिमत्ता यांत वाढ होईल अशी आशा करण्यास फारशी जागा नाही. स्थानिक पातळीवरील व्यवस्थापन आणि पर्यवेक्षण यांचा दर्जा यावर ते अवलंबून असावे असे दिसते. उत्पादनाच्या ठिकाणी कामगारांबरोबर विचारविनिमय कितपत प्रभावीपणे केला जातो, पगाराच्या बाबीसंबंधीच्या वाटाघाटीचे स्वरूप काय असते आणि सामाजिक समतेसंबंधी व्यापक दृष्टीकोणातून कितपत विचार होतो या गोष्टीही समाधान किंवा औद्योगिक नीतिमत्ता यांना पुष्कळ अंशी जबाबदार असतात. मोठमोठ्या सार्वजनिक कंपन्यांच्या मध्यवर्ती बोर्डावर कामगारांपैकी काहीजण संचालक म्हणून बसले, अर्थात ते नेहमी अल्पमतातच राहणार, म्हणून तेवढ्याने वरील बाबींवर फारसा परिणाम घडून येऊ शकणार नाही. आणि त्यामुळे सुचविण्यात आलेल्या बदलांबद्दल कामगार मनातून जे एवढे उदासीन असतात ते एकंदरीने योग्यच ठरते. खरोखरी कामगारांतून त्यांच्या संचालकांची निवडणूक करावयाची झाली तर त्याला त्यांच्याकडूनच विरोध होण्याचा संभव आहे. ज्या कामगारांनी निवडून दिले त्या कामगारांच्या ताबडतोबीच्या मागण्यांना कारखान्याचे दूरवरचे हित लक्षात घेऊन कामगार–संचालक विरोध दर्शवितील तर लगेच ते 'मालकांचे बगलबच्चे' बनले अशी हाकाटी त्यांच्याविरुद्ध सुरू होईल; आणि कामगारांच्या वेतनविषयक मागणीबाबत व्यवस्थापनाच्या भूमिकेला त्यांनी पाठिंबा दिल्याची बातमी कामगार वर्गात पसरताक्षणीच (किंवा अशा एखाद्या कामगार–संचालकाची बायको कंपनीच्या अलिशान मोटारीतून हिंडताना दिसल्याबरोबर) त्यांच्या विरुद्ध टीकेचा एकच गदारोळ उठेल. असंतोषाचा मोहरा विद्यमान व्यवस्थापनांविरुद्ध वळवणे हे नेहमी जास्त इष्ट ठरते. कारण कोणावरही पंचमस्तंभी असल्याचा किंवा दुसऱ्याचा हस्तक बनल्याचा आरोप करण्याने कमालीची कटुता निर्माण होते आणि सगळ्यांनाच त्याची झळ लागते.

न्यायात सुधारणा होऊ शकेल का? म्हणजेच आर्थिक सत्तेचे अधिक समान पातळीवर विभाजन होऊ शकेल का? आणि काही प्रमाणात तरी भागधारक आणि व्यवस्थापक यांच्या हातातून ती कामगार, शासन किंवा ग्राहक यांच्यापर्यंत पोहोचू शकेल का? पहिल्या प्रकरणात दिलेल्या आर्थिक सत्तेसंबंधीच्या निर्णायक

बाबी लक्षात घेतल्या तर केवळ कंपनी कायद्यात बदल केल्याने हे घडून येईल अशी अपेक्षा करता यावयाची नाही. एखाद्या कंपनीच्या स्वरूपावर ही सत्ता आता अजिबात अवलंबून राहिलेली नाही. भागधारकांच्या हाती सारी सत्ता असली तरी ती केवळ नाममात्र, खरी सत्ता त्यांच्या हातात फारच थोडी असते. आणि इतरांच्या हाती जी खरीखुरी सत्ता असते ती त्यांना संचालक मंडळावर प्रतिनिधित्व आहे किंवा नाही यावर अजिबात अवलंबून नसते. शासनाला कर आकारणी, प्रत्यक्ष नियंत्रणे किंवा कायदेकानू यांच्याद्वारा हवी असेल तेवढी सत्ता गाजविता येते. कामगार संघटनांची सत्ता कामगारांना मागणी कितपत आहे, कारखान्यावर किंवा उद्योगावर त्या संघटनेचे बाहेरून वजन कितपत आहे आणि सरकारचे कामगारविषयक धोरण काय आहे यावर अवलंबून असते. त्याचप्रमाणे व्यक्तिगत कामगाराची सत्ता काही अंशी रोजगार मिळण्याची परिस्थिती कशी काय आहे आणि उत्पादनाच्या पातळीवर व्यवस्थापकांकडून कामगारांबरोबर विचारविनिमय कितपत केला जातो यावर अवलंबून असते तर ग्राहकाच्या हातातील सत्ता मात्र मक्तेदारी आणि चलन फुगाव किती प्रमाणावर आहे यावरच काय ती अवलंबून असते. कंपनी कायद्यात बदल केल्याने यापैकी कोणाच्याही सत्तेत कसलीही वाढ होण्याची शक्यता नाही.

घटना आणि कायदेबाजी यात रंगून जाणे सोपे असले तरी परिणामकारक ठरणाऱ्या सत्तेचे काही प्रमाणात तरी विभाजन करणे हे जे आपले मूळचे उद्दिष्ट त्याला चिकटून बसावयचे ठरविले तर कायद्यातील बदल कितीही तर्कशुद्ध वाटला तरी त्यामुळे प्रत्यक्ष वस्तुस्थिती अजिबात बदलत नाही. सध्याच्या कायद्यात विशिष्ट तरतुदी असूनही भागधारकांच्या हाती फार थोडी सत्ता आहे तर सरकार आणि कामगार संघटना यांच्या हाती त्या मानाने किती तरी अधिक सत्ता असते. म्हणून सामाजिक न्याय किंवा जनतेचे सुखसमाधान यात विशेष वाढ होणार नसेल तर सुधारणांचा तपशीलवार आराखडा सादर करण्याने आणि त्यामुळे निर्माण होणाऱ्या कायदेशीर गुंतागुंतीत गुरफटून जाणे हे केव्हाही फायद्याचे ठरणार नाही.

## ४. नफ्यातील भागीदारी

नफ्यात कामगारांना भागीदार करून घेणे हा यावर तडजोडीचा मार्ग म्हणून निघू शकेल का ? दोन युद्धांच्या दरम्यानच्या काळातील दुःखदायक इतिहासानंतर या कल्पनेविषयी लोकांचे औत्सुक्य अलिकडे पुन्हा खूपच वाढले आहे. आणि युद्धपूर्व काळापेक्षा आजचे वातावरणही त्याला निश्चितच जास्त अनुकूल आहे. अधिक पुरोगामी विचारांच्या व्यवस्थापकांकडूनच याबाबतीत पुढाकार घेतला जात असून नफ्यातील भागीदारीची मागणीही पूर्वीप्रमाणे आता कामगारांबरोबरचे व्यक्तिगत संबंध बिघडल्याची द्योतक समजली जात नाही. सर्वांना रोजगार मिळण्याची हमी

निर्माण झाल्यामुळे नफ्याला अधिक स्थैर्य प्राप्त होते आणि त्यामुळे कंपनीचे दिवाळे निघून फायदा अजिबातच बंद होण्याचा धोका पुष्कळच कमी संभवतो. पूर्वीच्या योजनांपेक्षा युद्धोत्तर काळात हाती घेण्यात आलेल्या योजना या अधिक कल्पकतेने आखण्यात आलेल्या असून त्यापासून मिळणारे संभाव्य फायदेही पहिल्यापेक्षा काहीसे जास्त अपेक्षित आहेत. शिवाय कामगार संघटनांची ताकदही आता इतकी वाढलेली आहे की, नफ्यातील भागीदारीच्या मोबदल्यात आपल्याला कामगारांच्या वेतनात कपात करता येईल किंवा यूनियनबद्दलच्या त्यांच्या निष्ठेला खिंडार पाडता येईल असे कोणताही कारखानदार मनातसुद्धा आणू शकणार नाही. युद्धपूर्व काळात कामगार संघटनांच्या मनात जी एक प्रकारची संघर्षाची भावना असे तीही आता राहिलेली नाही. इतकेच नव्हे तर अलिकडच्या काही योजना तर त्यांच्या सहकार्यानेच कार्यान्वित केल्या गेल्या आहेत.

अशा परिस्थितीत नफ्यातील भागीदारीबाबत मजूर पक्षाने कोणती भूमिका स्वीकारावी ? कोठल्याही वैयक्तिक अडीअडचणींवर तोच एक रामबाण उपाय आहे असा हुजूर पक्षीय मंडळींना अचानक साक्षात्कार झालेला दिसतो. तर त्याउलट काही समाजवादी, कारखानदारांनी किंवा व्यवस्थापकांनी एखादी योजना सुचविली म्हणजे ती कामगार हिताच्या विरोधीच असणार या भावनेने त्या योजनेकडे संशयाने पहाताना आढळतात. परंतु प्रत्यक्षात मात्र अशा योजनेबद्दल फाजील उत्साह दाखविणे योग्य ठरणार नाही त्याचप्रमाणे तिच्याकडे फार संशयी नजरेने बघणेही समर्थनीय ठरणार नाही.

नफ्यातील भागीदारीमुळे पुढील तीन उद्दिष्टांपैकी एक साध्य होऊ शकेल. एक– पहिल्यापेक्षा नफ्यातील मोठा भाग या योजनेमुळे कामगार वर्गाकडे वळविला जाणार असल्याने आणि त्यामानाने भागधारकांत तो कमी प्रमाणात वाटला जाणार असल्याने संपत्तीच्या वितरणाच्या दृष्टीने ती योजना काही प्रमाणात तरी परिणामकारक ठरू शकेल. व्यवहारात मात्र ही योजना फारशी परिणामकारक ठरू शकणार नाही. कारण एक तर बहुतेक सर्व विद्यमान योजनेनुसार कामगारांना नफ्यातील वाटणीचा भाग म्हणून ज्या रकमा दिल्या जातात त्या एकूण नफ्याच्या मानाने अगदीच क्षुल्लक असतात. आणि दुसरे म्हणजे उक्त्या कामाचे दर, उत्पादन, लाभांश आणि वेतनवाढ याबाबत वाटाघाटी करण्यात कामगार संघटना कितपत यशस्वी ठरतात यावरच कारखान्याच्या वाढत्या उत्पादनाचा किती भाग कामगारांच्या पदरात पडणार ते अवलंबून असते.

तथापी संपत्तीच्या वितरणावर या योजनेचा जो काही प्रभाव पडत असेल तो योग्य दिशेने पडत असतो. आणि आपण साधे बोटही न उचलता जे फायदे मिळत असतात त्याबद्दल निष्कारण रागवारागव करण्यात काय अर्थ आहे ? या दृष्टीने विचार करता नफ्याचे वाटप कशा तऱ्हेने घडून येते त्याला कसलेही महत्व

उरत नाही आणि सामुदायिक उत्पादन, लाभांश आणि अधिक तपशीलवार योजना यापासून सारखेच परिणाम घडून येतात.

दुसरे म्हणजे भागधारकांच्या मानाने कामगारांचे कायदेशीर स्थान उंचावले जावे हा जो अल्बू गॉयडर यांनी सुचविलेल्या सुधारणांचा उद्देश तो नफ्यातील भागीदारीच्या या पर्यायी योजनेमुळे तडीस जावू शकेल. अर्थात नफ्याचे हे वाटप मताधिकार असलेल्या शेअर्सच्या स्वरूपात केले गेले आणि मताधिकार असलेल्या भागभांडवलाच्या तुलनेने हे नफा वाटप थोडेफार तरी परिणामकारक असेल तरच वरील उद्दिष्ट साध्य होऊ शकेल. (परंतु सध्या अस्तित्वात असलेल्या नफ्यातील भागीदारीच्या बहुतेक सर्व योजनांत या दोन्ही बाबींचा अभावच असतो.) जे कामगार नफा वाटणीमुळे त्यांना मिळालेले शेअर्स ठेवून घेतात ते आपोआपच कंपनीचे सभासद बनतात. आणि त्यांनाही विद्यमान भागधारकांइतकेच मतदानाचे आणि निवडणुकीला उभे राहण्याचे हक्क प्राप्त होतात. त्यासाठी कंपनी कायद्यात गुंतवणुकीबाबत बदल करण्याची कसलीही आवश्यकता पडत नाही.

प्रगतीचा हा एक मार्ग असू शकेल. हल्लीच्या योजनांत दिखाऊपणाचा भाग अधिक असला तरी त्यामुळे मूळ उद्दिष्टाला थोडाफार तरी हात घातला जातो. मजूर सरकारला तो आणखी पुढे रेटता येईल. सर्व उद्योगांसाठी एकच एक योजना लागू करणे किंवा नफा वाटणीचे प्रमाण कायमचे ठरवून देणे हे अर्थातच सर्वस्वी अप्रस्तुत ठरते. परंतु मताधिकार असलेल्या शेअर्सचे कामगार वर्गात मोठ्या प्रमाणात विभाजन घडवून आणण्याच्या उद्देशाने आखण्यात आलेल्या कोणत्याही परिणामकारक योजनांना (मग त्यांचे निश्चित स्वरूप कसेही असो) सरकारचा पाठिंबा राहील हे पार्लमेंट किंवा संयुक्त सल्लागार समित्यांच्याद्वारा सरकार स्पष्ट करू शकेल; त्याचप्रमाणे या आवाहनाला कारखानदार किंवा उद्योगांचे संचालक यांच्याकडून कशा प्रकारचा प्रतिसाद मिळतो त्यावर त्यांच्याबाबतचे सरकारचे धोरण अवलंबून राहील किंबहुना गेट्स्केल आणि इतर काहीजणांनी सुचविल्याप्रमाणे कोणताही बोनस द्यावयाचा झाला तर त्याचा काही अंशभाग तरी प्रत्यक्ष कामगारांच्या हाती दिला पाहिजे किंवा एखाद्या विश्वस्त नाही तर धर्मादाय निधीत जमा केला पाहिजे असा कायदा करण्याचा सरकारला विचार करावा लागेल असे सरकारला जाहीर करता येईल.

अशा तऱ्हेने कामगारांना किंवा त्यांच्या प्रतिनिधींना कंपनीत काही ना काही तरी कायदेशीर हक्क प्राप्त व्हावा हे निश्चितच अगदी संयुक्तिक आणि तर्कशुद्ध असले तरी त्यामुळे काही खळबळजनक परिणाम घडून येतील अशी मात्र समजूत करून घेता कामा नये. कारण वर दाखवून दिल्याप्रमाणे अनेकदा व्यवस्थापक याबाबत अत्यंत उत्साही दिसत असले तरी कर्मचारी मात्र आपल्या हक्काबद्दल तितकेच उदासीन आणि नाराज असलेले दिसतात.

परंतु उत्पादन क्षमतेत होणाऱ्या वाढीच्या प्रमाणात कामगारांना त्यांच्या वेतनात वाढ मिळत नाही हा त्यांच्या मनातील संशय नाहीसा करता आला, निदान तो थोडाफार कमी करता आला तर औद्योगिक संबंधात सुधारणा घडून येऊ शकेल अशी कल्पना करण्यास जागा आहे. परंतु आज अशा तऱ्हेचा संशय कामगारांच्या मनात वसत आहे ही वस्तुस्थिती—ज्याचा उहापोह मागील प्रकरणात होऊन गेला आहे-नफ्यातील भागीदाराला अत्यंत अनुकूल अशी बाब ठरू शकेल. आणि ज्या कंपन्यांत अशा योजना लागू करण्यात आलेल्या आहेत तेथील कामगारांबरोबरचे संबंध नेहमीपेक्षा सर्वसाधारणपणे जरा बरे आहेत हे प्रत्यक्ष दाखवून देता येण्यासारखे आहे तर पूर्वी व्यक्तिगत कामगारांच्या बाबतीत अत्यंत पुरोगामी धोरण असलेल्या कंपन्या-देखील आज नफ्यात भागीदारी मिळावी म्हणून चाललेल्या चळवळीच्या समर्थक बनलेल्या आहेत असाही अप्रत्यक्ष पुरावा सादर करता येण्यासारखा आहे. तरीदेखील सध्या लोकप्रिय होत असलेल्या अशा तऱ्हेच्या योजनांमुळे लगेच काही चमत्कार घडून येतील असे मानण्याचे मुळीच कारण नाही. ते कसेही असले तरी ज्या कार-खान्यांतून अशा योजना लागू करण्यात आलेल्या असतात त्यांचे कामकारांबरोबरचे संबंध सर्वसाधारणपणे चांगले असतात. त्यावरून असे म्हणता येईल की, कामगा-रांच्या बरोबर चांगले तंबंध प्रस्थापित करण्याचे या योजना हे साधन नसून त्या योजनांचा तो परिणाम असतो. आणि ज्या कारखान्यांतील कामगारांबरोबरचे संबंध आधीच बिघडलेले असतात आणि व्यवस्थापक आणि कर्मचारी यात विश्वासाचे वातावरण राहिलेले नसते तेथे अशा प्रकारच्या अगदी व्यापक योजना लागू केल्या तरीही तेथील परिस्थितीत सुधारणा तर घडून येणार नाहीच उलट एखादे वेळी त्यामुळे नसता संशय आणि गैरसमज यांनाच त्या कारणीभूत ठरून परिस्थिती अधिकच बिघडण्याचा संभव असतो. म्हणून वातावरण मूलत: समाधानकारक असेल तेथेच अशा तऱ्हेच्या योजना मुद्दाम करून लागू करण्यात आल्या तरच त्या आपले उद्दिष्ट साध्य करण्याला आणखी सहाय्यभूत ठरू शकतील.

परंतु नफ्यात भागीदार करून घेण्याच्या बाबतीत परिश्रमपूर्वक आखलेल्या इतर उपायांचा विसर पडू दिला तर वेतनासाठी खर्च करावी लागणारी एकूण रक्कम आणि कारखान्याचे एकूण कार्य यात या उपायांचा प्रत्यक्ष संबंध असतो व वाढलेल्या उत्पादनाच्या वितरणाबद्दलच्या संशयाचे निराकरण करण्यास तो सहाय्य-भूत ठरतो. मात्र हा प्रत्यक्ष संबंध सहज लक्षात येण्याइतका सुस्पष्ट असला पाहिजे आणि त्या रकमाही खूप मोठ्या असल्या पाहिजेत. काही ब्रिटिश कंपन्या सामुदायिक उत्पादन— लाभांश योजनेच्या द्वारा आधीपासूनच हा परिणाम साध्य करून घेत आहेत. त्याचप्रमाणे अमेरिकेत आणि त्याहीपेक्षा वाढत्या प्रमाणात फ्रान्समध्ये तेथील कामगार संघटना (अर्थात तेथील कामगारांच्या संघटनांच्या वाटाघाटी या त्या त्या कारखान्याच्या पातळीवर होत असल्याने त्यांना आपले प्रश्न सोडवून

घेणे सोपे जाते) अनेकदा मूळ वेतनाचे दर आणि भावी काळात उत्पादन क्षमतेत होणारी वाढ या दोन गोष्टी परस्परांशी निगडित करून ठेवतात. कायद्याच्या दृष्टीने विचार करावयाचा झाला तर उद्योगाच्या रचनेत गुंतागुंतीच्या सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा अशा तऱ्हेच्या परस्पर संबंधांची कायदेशीर तरतूद करून ठेवणे अधिक श्रेयस्कर ठरेल. परंतु या ठिकाणीही खाजगी उद्योगधंद्यातील विविधता लक्षात घेता सर्वांना लागू पडेल असा सर्वसाधारण कायदा करण्यात अनंत अडचणी उभ्या राहतील. त्यापेक्षा कामगार संघटनांची चळवळ अधिक प्रभावी ठरू शकेल. म्हणून नफ्यातील भागीदारीचे क्षेत्र वाढविण्याच्या कल्पनेचे सौम्यसे स्वागत करीत असतांनाच मी असे म्हणेन की, कामगार संघटनांनी वेतनवाढीबाबतच्या वाटाघाटीसंबंधी अधिक महत्त्वाकांक्षी भूमिका स्वीकारावी म्हणजे वाढत्या उत्पादन क्षमतेतील मोठा वाटा वेतनात समाविष्ट केला जाईल इतकेच नुसते नव्हे तर तो तसा समाविष्ट केला जात आहे याची सर्वांना स्पष्ट जाणीवही होत राहील.

## ५. भागधारकांचा नफ्यावरील हक्क

शेवटचा मुद्दा विचारात घ्यावयाचा तो राष्ट्रीय पातळीवरील सार्वजनिक पर्यवेक्षण, नफा आणि लाभांश याविषयीच्या धोरणासंबंधीचा. या बाबी आर्थिक नियंत्रणाशी प्राधान्येकरून निगडित नसल्या तरी इतर उत्पन्नाच्या मानाने भागधारकांचे उत्पन्न फार वाढू देण्याचे टाळण्यासाठी त्यासंबंधी विचार करणे आवश्यक ठरते.

भागधारकांच्या मोबदल्यावर मर्यादा घालणे नैतिक दृष्टचा बरोबर ठरते हा मुद्दा नवव्या प्रकरणांत समानतेसंबंधी जे विवेचन करण्यात आले आहे त्यावर प्रत्यक्षपणे आधारलेला आहे. युद्धपूर्वकाळापासून इतर उत्पन्नांच्या मानाने लाभांशात कमी वाढ झाली आहे–अर्थात १९५३ पासून ती जास्त झालेली आहे–हे खरे असले तरी समाजवादी दृष्टीकोणातून बघता लाभांशाच्या प्रमाणांतील वाढ कमी करण्याची मागणी नाकारता येण्यासारखी नाही. खाजगी मालमत्ता बऱ्याच प्रमाणात वारसाहक्काने मिळालेली असते त्याचप्रमाणे अद्यापही तिची विभागणी अत्यंत असमान असते आणि शेअर्सची मालकी तर एकूण खाजगी मालमत्तेपेक्षाही अधिक असमानतेने विभागली गेलेली असते.

ऑक्सफर्ड सेव्हिंग्ज सर्व्हेवरून असे दिसून येते की, अवघ्या ५ ते ७ टक्के कुटुंबाजवळच कोठल्या ना कोठल्या स्वरूपातील शेअर्स अथवा रोखे असतात. आणि त्याचेही पुन्हा विकेन्द्रीकरण झालेले दिसते. उदा. ०·१ टक्के कुटुंबात जास्तीत जास्त म्हणजे एकूण शेअर्स आणि रोख्यांपैकी २० टक्के शेअर्स असतात. भागधारकांची एकूण संख्या जवळ जवळ १·२५ दशलक्ष म्हणजे लोकसंख्येच्या ३ टक्के आणि अविवाहित प्रौढ नागरिकांच्या आणि विवाहित दांपत्यांच्या ५ टक्के इतकी अस-

त्याच्या पूर्वीच्या पाहणीच्या प्रसिद्ध निष्कर्षाशी ही माहिती मिळतीजुळती अशीच आहे. १९४१ सालीदेखील (तेव्हापासून किमतीत खूप वाढ झाली आहे) सरासरी गुंतवणूक शेअर बाजारांतील किमतीनुसार ८०० पौंड इतकी होती. बहुतेक भागधारकांजवळ एकापेक्षा अधिक कंपन्यांचे शेअर्स होते. आणि मोठ्या भागधारकांचे प्रमाण लहान भागधारकांपेक्षा किती तरी जास्त होते– ७० टक्के शेअर्सची रक्कम एकूण दर्शनी भांडवलांच्या अवघी १३ टक्के होती तर १९४१ साली प्रत्येकी दहा हजार पौंड गुंतवणुकीपैकी अवघी ०·२५ टक्के रक्कम एकूण सर्वसाधारण शेअर्सच्या एक तृतियांशाइतकी होती. तुलनात्मक दृष्टया पहाता ब्रिटनमधील एक तृतियांश कुटुंबांजवळ भांडवली स्वरूपाची जिंदगी अशी नसतेच आणि निम्म्याहुन अधिक कुटुंबाजवळ ती शंभर पौंडापेक्षा कमी असते.

काही वेळा असे सांगितले जाते की, लाभांश हा शेवटी कामगारांकडेच जातो. कारण लाभांशांची रक्कम, निवृत्तीवेतन आणि विमा निधी यामध्येच गुंतविली जाते व या दोन्ही गोष्टींचा लाभ कामगार वर्गाला होत असतो. परंतु वस्तुस्थिती तशी नाही. सर्व प्रकारच्या संस्थात्मक भांडवल गुंतवणूकीचे शेवटी अशा तऱ्हेने फेरविभाजन होत असते (वस्तुतः तसे ते होत नाही) असे गृहीत धरले तरीदेखील ती बाजारात आलेल्या एकूण भांडवलाच्या १० ते १२ टक्के इतकीच भरते.

उत्पन्नाचे अवमूल्यन करणे किंवा भागधारकांचे हक्क कमी करणे म्हणजे संपत्तीची मालकी अभिप्रेत असलेल्या लोकशाहीमागील मूळ विचारसरणीलाच तिलांजली देण्यासारखे आहे. परंतु ती विचारसरणी हा जसा कंपनी कायद्याचा पाया आहे त्याचप्रमाणे ते एक महत्त्वाचे सामाजिक उद्दिष्टही आहे. परंतु हा आक्षेप चुकीचा कसा आहे ते या आकडेवारीवरून सिद्ध होते. संपत्तीच्या मालकीवर आधारलेली लोकशाही आपल्या देशांत विद्यमान असती तर अगदी निराळ्या दृष्टीकोणांतून या प्रश्नाचा विचार झाला असता हे निःसंशय; यासंबंधीचा थोडा फार उल्लेख तेविसाव्या प्रकरणात आला आहे. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, तशी लोकशाही आपल्या देशात विद्यमान नाही. आणि सध्या तरी आहे ती परिस्थिती लक्षात घेऊनच आपल्याला विचार केला पाहिजे.

हुजूर पक्षाकडून असे प्रतिपादन केले जाते की, ज्या प्रमाणात भांडवलाचा उपयोग केला जाईल त्या प्रमाणात तरी निदान लाभांशात वाढ व्हावयास हवी. परंतु प्रगतीशील अर्थव्यवस्थेत उपयोगांत आणले गेलेले भांडवल ( अशा व्याख्येनुसार) राष्ट्रीय उत्पन्नापेक्षाही झपाट्याने वाढत जाण्याची शक्यता असते त्यामुळे हुजूरपक्षाची सूचना अमलात आणावयाची झाली तर राष्ट्रीय उत्पन्नाचा ओघ समाजातील इतर घटकांकडून सतत भागधारकांकडे वळविण्यात यावा असाच त्याचा अर्थ होईल. परंतु ही गोष्ट कोणालाच मान्य होणार नाही.

ते कसेही असले तरी या मागणीला बळकट असा नैतिक आधारही नाही.

भांडवलाचा जादा पुरवठा पूर्ण भरलेले भागभांडवल विक्रीला काढून करण्यात आला असेल तर सहाजिकच त्या भांडवलाच्या उभारणीसाठी भागधारकांनी जो धोका पत्करला असेल त्या प्रमाणात तरी निदान त्यांना लाभांशाचे उत्पन्न मिळाले पाहिजे. परंतु जुन्याच भागभांडवलातून मिळणारे हे उत्पन्न पुन्हा त्याच उद्योगात गुंतविल्यामुळे होणारा फायदा आपल्याला मिळावा ही भागधारकांची मागणी समर्थनीय कशी काय ठरते ते स्पष्ट होत नाही.

असे प्रतिपादन करण्यात येते की, पूर्वीच्या संयमित वृत्तीमुळे ही गंगाजळी साठलेली असते; भागधारकांनी आधिक लोभीपणा दाखवला असता तर गंगाजळीत पैसा जमा होण्याऐवजी तो प्रतिवर्षी जादा लाभांशाच्या रूपाने उद्योगातून काढून घेतला गेला असता. परंतु तसे न होता तो पैसा पुन: पुन्हा भांडवल उभारणीत गुंतविला गेला आहे. आणि भागधारकांच्या या संयमाचा रास्त मोबदला त्यांना मिळणे केव्हाही समर्थनीय ठरेल. संयम हे उत्पादनाचे साधन आहे हा सिद्धांत प्रथम नास्सू सीनियर याने १८३६ साली मांडला. आणि तेव्हापासून संपत्तीवरील मोठमोठ्या उत्पन्नाच्या मागणीबाबत समाजवादी काहीशी आधीरताच दाखवीत आले आहेत. परंतु मार्क्सने यावर प्रथम हल्ला चढविला. याबाबत अत्यंत बोचक शैलीत तो लिहितो : ‘सवंग अर्थशास्त्राचा असा इरसाल नमुना शोधूनही सापडणार नाही ! आर्थिक विश्लेषण करण्याऐवजी ‘व्हाइला टाऊट’ या वाक्प्रचारासारखा तोंडपुजेपणाच केला जातो. . . . श्रमाच्या प्रक्रिया पुऱ्या होण्यासाठी आवश्यक असलेल्या परिस्थितीऐवजी अचानक भांडवलदाराच्या संयमाच्या गोष्टी बोलल्या जातात. सगळे धान्य खाऊन न टाकता त्यापैकी काहीची पेरणी केली की, भांडवलदाराच्या दृष्टीने तो लगेच संयम होतो. दारू मुरायला वेळ लागला तरी तोही भांडवलदाराचा संयमच. भांडवलदार ज्या ज्या वेळी वाफेची इंजिने, कापूस, आगगाडी, खते, घोडे यांसारखीं सर्व उत्पादनसाधने संपवून न टाकता— (उत्पादन साधने) वापरीत असतो त्या त्या वेळी तो त्या गोष्टींचा स्वत:साठी उपभोग घेत नसतो. तो ‘त्यांचे मूल्य’ ऐषारामात आणि इतर उपभोग्य वस्तूंत उधळून टाकीत नाही अशी एकाद्या ‘पाचकळ अर्थशास्त्रा’—प्रमाणे बालिशपणे वडबड केली जाते. भांडवलदारांनी वर्ग म्हणून ही अचाट कामगिरी कशी बजावून दाखवावयाची त्याचा गौप्यस्फोट करण्याचे मात्र या सवंग अर्थशास्त्राने कटाक्षाने टाळलेले आहे. खरेच, भांडवलदाररूपी या पश्चातापदग्ध आधुनिक ‘विष्णूच्या’ आत्मक्लेशामुळेच केवळ जगाचा गाडा कसा तरी रेटला जात आहे हेही काही थोडे नाही.’

‘संयम’ या शब्दांत अभिप्रेत असलेल्या स्थितप्रज्ञ वृत्तीने सहन करावयाचा क्लेशदायक त्याग सूचित करणारे काहीसे अवास्तव चित्र क्षणभर बाजूला ठेवले तरी, कंपनीच्या गंगाजळीत होणारी वाढ न्यायाच्या किंवा अर्थशास्त्राच्या दृष्टीने

पाहता भागधारकांच्या मालकीची होते असे कसे म्हणता येईल ? ही वाढ अत्युत्कृष्ठ कार्यक्षमतेमुळे झाली असण्याचाही संभव आहे. त्या परिस्थितीत मग कदाचित असे प्रतिपादन केले जाईल की, विद्यमान भांडवली जिंदगीच्या स्वरूपातील भागधारकांची मालमत्ता आधिक परिणामकारकपणे वापरल्यामुळेच हे शक्य झाले. तथापी उत्पादनाच्या कोठल्याही एका घटकामुळे उत्पादनात वाढ झाली आहे असा दावा कधीच करता येणार नाही. ही वाढ कामगारांच्या प्रयत्नामुळे झाली असणे शक्य आहे त्याचप्रमाणे व्यवस्थापकांचे परिश्रमही तिला कारणीभूत झाले असणे सक्य आहे. आणि वस्तुसः कामगार संघटना वेतनवाढीच्या आपल्या मागण्यांसाठी अनेकदा नेमक्या याच मुद्याचा आधार घेतात. निव्वळ नफ्यातील वाढ (जादा उत्पन्नातील ऊर्वरित वाढ कामगारांना देऊन टाकल्यानंतरही उरली तर) ही कामगार किंवा व्यवस्थापक यांच्या जादा उत्पादनक्षमतेपेक्षाही भांडवलाच्या वाढीव उत्पादनक्षमतेमुळेच प्राप्त होत असते असे प्रतिपादण्यास कोणताही शास्त्रीय आधार देता येणार नाही.

उलटपक्षी, जास्त कार्यक्षमता हे जादा नफ्याचे कारण असण्याऐवजी मागणी वाढल्यामुळे विक्रीचे प्रमाण वाढणे किंवा चलन फुगाव अथवा एकाधिकाराच्या प्रमाणात झालेली वाढ यामुळे नफ्याच्या प्रमाणात वाढ होणे ही देखील त्याची कारणे असू शकतील. आणि असे असेल तर जादा परिश्रम किंवा कार्यक्षमतेच्या नावावर जादा शिलकीवर कोणालाच आपला दावा सांगता येणार नाही तर ग्राहकाचाच इतर कोणापेक्षाही त्यावर अधिक हक्क पोहोचतो असे म्हणता येईल.

सत्यपरिस्थिती अशी आहे की, नफ्यातील वाढ त्यावर दावा सांगणाऱ्यात वाटून देण्याचा सर्वमान्य असा निकष निघालेला नसल्याने यापैकी कोणताही मुद्दा पुढे करणे जवळपास निरर्थकच ठरणार आहे. भागधारक सांगत असलेल्या हक्काचा एकमेव आधार कोणता असेल तर तो कायद्याचा. कारण सध्याच्या कंपनी कायद्याप्रमाणे भागधारक हेच सगळ्या नफ्याचे अधिकारी मानले गेले आहेत. आणि एक वर्षपर्यंत आपला नफा घेण्यास ते पुढे आले नाहीत तरी त्यानंतरही त्यावरील उत्पन्नावर त्यांचाच हक्क राहतो. परंतु नफ्याच्या या कायदेशीर उपपत्तीला नैतिक किंवा आर्थिक पाया मात्र कसलाही नाही. तसे पाहिले तर कामगारही असे म्हणू शकतील की, वेतनाच्या बाबतीत एका अर्थी मागच्या वर्षातील जादा शिल्लक संपवून न टाकण्यात त्यांनी संयमच दाखवलेला आहे आणि म्हणून भावी काळात त्यांनाही तितकाच मोबदला मिळाला पाहिजे. सरतेशेवटी एकूण उत्पन्नाचे योग्य वितरण कशाला म्हणावयाचे यावरच जादा शिलकीचे वाजवी विभाजन अवलंबून असते.

## ६. लाभांशावर मर्यादा घालण्याच्या पद्धती

अशा तऱ्हेचे वाजवी विभाजन व्हावे आणि एकूण उत्पन्नात निव्वळ लाभांशाचे

प्रमाण काय असावे हे ठरविण्याची खाजगी व्यवस्थापकांच्या हातातील सत्ता काढून घ्यावी हाच जर लाभांशासंबंधीच्या धोरणावर नियंत्रण ठेवण्यामागील मुख्य हेतू असेल तर वैयक्तिक (उदाहरणार्थ भांडवली नफ्यावरील कर) आणि सामूहिक अशा दोन्ही प्रकारच्या करविषयक उपायांनी ते सहज साध्य करून घेता येईल. यापैकी सामूहिक उपाययोजनेमुळे नफ्यावरील करआकारणी आणि शिलकींचा पुरवठा या संबंधीचा सगळा प्रश्नच पुन्हा उभा राहतो. त्याचा समग्र ऊहापोह विसाव्या प्रकरणात करण्यात आला आहे. परंतु आपल्या अधिकार क्षेत्रांच्या मर्यादेत राहून करआकारणीच्या निरनिराळ्या पद्धतींचा अवलंब करून एकूण नफ्याशी लाभांशाचे प्रमाण काय असावे ते ठरवून देऊन त्याची अंमलबजावणी करणे सरकारला सहज शक्य आहे. आणि या दृष्टीने पहाता त्यासाठी करविषयक धोरणाच्या कक्षेच्या मर्यादांचे उल्लंघन करण्याची जरूर नाही.

तथापी औद्योगिक संबंध सुधारण्यासाठी काही कायदेशीर नियंत्रणे असण्याची तर आवश्यकता भासणार नाही ना ? असे मानण्याला निश्चित असा पुरावा देता येण्यासारखा नाही. आपल्या समाजात घर करून बसलेली सामाजिक विषमता, ब्रिटनमधील व्यवस्थापनाचा सुमार दर्जा, आणि वाढत्या उत्पादनक्षमतेच्या प्रमाणात वेतनासह योग्य ती वाढ होत नाही अशी राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगातही आढळणारी शंका ही औद्योगिक क्षेत्रातील कायमच्या असंतोषाची कारणे असू शकतील. यामुळे करआकारणीच्या धोरणानुसार लाभांशात फार मोठी वाढ होऊ दिली नाही तर कायदेशीर बंधने घालून तरी त्यात असा काय मोठा बदल होणार आहे ते स्पष्ट होत नाही.

तरी देखील काही विशिष्ट परिस्थितीत– एखादी व्यवहार्य योजना लागू करता आली तर– ही शक्यता नाकारता येणार नाही. तथापी दुर्दैवाने ते इतके सोपे नाही. उदाहरणार्थ अल्बू असे सुचवितो की, भांडवल गुंतवणुकीतील धोके जमेला धरून निरनिराळ्या प्रकारच्या कंपन्यांसाठी निरनिराळ्या प्रमाणावरील कायमच्या कायदेशीर निर्बंधांची तरतूद करावी. परंतु माणसे कितीही चाणाक्ष आणि दूरदर्शी असली तरी प्रत्येक कंपनीच्या बाबतीत पत्करलेल्या धोक्याची भरपाई कशाने होऊ शकेल त्याचा नेमका अंदाज बांधणे त्यांच्याही आवाक्यापलीकडचे आहे. सामुदायिक ज्ञानाचा फायदा मिळू शकणाऱ्या शेअर बाजाराकडूनसुद्धा हे काम तितकेसे चांगले होत नाही आणि बदलत्या परिस्थितीनुसार (भागधारकांच्या धोक्या संबंधीचे) सतत फेरमूल्यांकन चाललेले असते. धोक्याच्या बाबतीत अगदी गणिताइतकी अचूक प्रतवारी आहे असे कल्पून सरकारी अधिकारी फूटपट्टीने त्याची मोजदाद घेऊ लागतील तर ते सर्वज्ञ आहेत असे गृहीत धरावे लागेल. ग्राहकांची आवड निवड किंवा उद्योगात असणारी चढाओढ आणि निर्यातीतील चढउतार यांचा संपूर्ण अभाव असलेल्या अर्थव्यवस्थेतच कदाचित अशी सर्वज्ञता लाभू शकेल.

या प्रश्नाचे अगदी साधे उत्तर सहाजिकच असे आहे की, सध्या ज्या दराने लाभांश दिला जातो त्यात भागधारकांना पत्कराव्या लागणाऱ्या मोक्याचा पुरेसा विचार होतच असतो असे धरून लाभांशावर कायदेशीर निर्बंध घातले पाहिजेत. परंतु असे केल्याने ज्या कंपन्या मुक्तहस्ताने इतकेच नव्हे तर वारेमाप लाभांश आपल्या भागधारकांना वाटत असतात त्यांच्या मानाने आजपर्यंत लाभांश देण्याच्या बाबतीत ज्यांनी हात आखडता घेतला होता त्यांना मात्र भुर्दंड बसेल. कंपन्यांकडून पूर्वी दाखवला गेलेला हा संयम सरकारच्या विनंतीवरून त्या कंपन्यांनी दाखवलेला असेल तर या सूचनेला त्यांच्याकडून विशेषच विरोध दर्शविला जाईल कारण ज्या कंपन्या सरकारचे आदेश एकनिष्ठेने पाळतात त्यांना असा भुर्दंड आणि ज्या सरकारचे आदेश धाब्यावर बसवतात त्यांची चंगळ अशातला प्रकार व्हावयाचा. कार्यक्षम आणि अकार्यक्षम किंवा विकसनशील आणि आहे त्याच स्थितीत रखडणाऱ्या कंपन्यात भेदाभेद न करता वाढ किंवा चांगला कारभार याबद्दल त्यांना पारितोषिक नाकारणे योग्य ठरणार नाही. आणि नफ्यात जसजशी वाढ होत जाईल तसतसा शेअर्सच्या मूल्यांचा जिदगीच्या मूल्याशी अजिबात संपर्कच राहणार नाही. त्याचप्रमाणे लाभांशाच्या रकमेचा व उत्पन्नाच्या रकमेचाही परस्परांशी असलेला संपर्क संपुष्टात येईल. याचा परिणाम असा होईल की, नफ्याच्या वाढीचा दर एकच न राहता तो निरनिराळा राहणार असल्यामुळे निरनिराळ्या शेअर्सच्या किंमतींना कमालीचे विकृत वळण लागेल इतकेच नव्हे तर उत्पन्न किंवा जिंदगी यांच्या तुलनेने शेअर्सच्या किमती आहेत त्यापेक्षा कमी दाखवल्या जातील. या अनिष्ट परिणामासंबंधी अनेकदा अतिशयोक्ती केली जाते हे खरे; परंतु शेअर्सच्या किंमतीतील असमानता पराकोटीला पोहोचली तर विद्यमान भागधारकांकडून आपल्या कंपन्यांवर त्यांनी नव्या सर्वसाधारण (ईक्विटी) भाग भांडवलाची कधीही उभारणी करता कामा नये म्हणून जबरदस्त दडपण आणले जाईल. त्याचप्रमाणे, कंपन्यांवर आपला ताबा प्रस्थापित करण्याची एकच झुंबड उडेल आणि ज्या ज्या वेळी हुजूर पक्ष परत अधिकारावर येईल त्या त्या वेळी शेअर बाजारात स्फोटक स्वरूपाची तेजीची लाट उसळण्यात त्याचे पर्यवसान होईल.

म्हणून नफ्यांत होणाऱ्या वाढीच्या विशिष्ट प्रमाणांत लाभांशामध्येही वाढ करण्यास मुभा देणे हाच यावरील व्यवहार्य तोडगा दिसतो. त्यामुळे त्यांत निदान योग्य तो लवचिकपणा तरी राहील. आर्थिक परिस्थितीनुरूप ठरवून दिलेल्या प्रमाणांत बदल करता येईल इतकेच नव्हे तर कंपन्या त्या त्या वेळी उत्पन्नाच्या बाबतीत जी कर्तबगारी दाखवीत असतात त्यांना त्याप्रमाणे आपला कारभार चालविता येईल. ज्या कंपन्या आपल्या नफ्यांत जास्तीतजास्त वाढ करून दाखवतील त्यांना आपल्या लाभांशातही जास्तीत जास्त वाढ करता येईल किंवा नफा न दाखवणाऱ्या कंपन्यांची परिस्थिती याउटलही होवू शकेल. अशा तऱ्हेने ज्या

कंपन्यांचा विकास घडून येईल त्यांना त्याचा मोबदला मिळेल आणि ज्या कंपन्यांना, त्यांच्या विस्तारामुळे शेअरबाजारांतून आणखी भांडवल उभारण्याची गरज भासेल त्यांना त्यादृष्टीने अत्यंत अनुकूल अशी परिस्थिती उपलब्ध होवू शकेल. त्याचबरोबर शेअरचे मूल्य आणि जिंदगी यांच्या किंमतीची किंवा लाभांश आणि उत्पन्न यांचीही संपूर्ण फारकत होण्याचे टळेल.

ही योजना बरीचशी व्यवहार्य असली आणि त्यांत कसलाही धोका नसला तरी काही विशिष्ट प्रकारच्या कंपन्यांच्या बाबतीत—उदाहरणार्थ ज्या कंपनीची आपल्या उत्पन्नांतील मोठा भाग वाटून टाकण्यांची परंपरा आहे, जिच्या नफ्याचे प्रमाण वाढते आहे आणि असे असूनही ज्या कंपनीला आपल्या उत्पादनक्षमतेत वाढ करून घेण्यासाठी मोठे भांडवल उभारण्याची इच्छा वा गरज भासत नाही किंवा ज्यांना फार मोठा धोका पत्करावा लागतो, भांडवल वाया घालवूनही धंदा चालू ठेवावा लागतो आणि ( कमालीचे अस्थिर असलेले ) आपले फायदे जवळपास शेवटच्या मर्यादेपर्यंत वाटून टाकावयाची ज्यांची परंपरा असते व परदेशांत कच्चा माल उत्पादन करतात अशा कंपन्या—काही समस्या निर्माण होतील. या अडचणी दूर करता येणार नाहीत असे नाही. परंतु त्यामुळे योजनेतील गुंतागुंत आणि त्यातून निर्माण होणारी अस्वस्थता मात्र वाढीस लागेल.

म्हणून कायदेशीर मर्यादेचा अवलंब अगदी निर्वाणीचा उपाय म्हणून करणे आणि कायदा करण्यासंबंधीचा युक्तिवाद तितकाच भरभक्कम असल्याचे सिद्ध होईपर्यंत ( कामगारविषयक संबंधाच्या बाबतीत तसा तो सिद्ध होत नाही ) कर आकारणीच्या उपायांवरच विसंबून राहणे केव्हाही श्रेयस्कर ठरेल हे अगदी उघड आहे.

यासंबंधांत आणखीही एक महत्त्वाची बाब आहे. परंतु तिच्याकडे फारसे लक्ष पुरविले जात नाही. कांही वेळा असाही विचार मांडला जातो की लाभांश आणि नफा यासंबंधीचे धोरण, आर्थिक परिस्थिती किंवा उद्योगांची विशिष्ट संघटना यावरूनच कठोरपणे निर्धारित केले जाते, आणि खाजगी मालकी, स्पर्धात्मक अर्थव्यवस्था आणि आर्थिक प्रोत्साहकांना सर्वोपरी महत्त्व असेल तर लाभांशासंबंधीचे विशिष्ट धोरण ( याठिकाणी उदार ) यावरच कार्यक्षमता आणि विकासाची गती सर्वस्वी अवलंबून असते.

परंतु या मताला पुष्टी देणारा पुरावा व्यहारात आढळत नाही. उलट खाजगी मालकीच्या कंपन्यांतही नफा आणि लाभांश यांच्या संबंधीचा दृष्टीकोण, निदान काही प्रमाणात तरी सांस्कृतिक आणि ऐतिहासिक दृष्ट्या निश्चित होत असतो. व्यवस्थापकांना लाभांश देण्याचा जो दर अगदी योग्य आणि नेहमीसारखाच आहे असे वाटते आणि भागधारकांनाही तो स्वीकारतांना तसेच वाटते, तो परंपरा, सामाजिक वैशिष्ठ्य, वर्गीय सत्तेचा समतोल आणि संबंधित देशातील सर्वसाधारण

नैतिक वातावरण, अशा अनेक बाबींवर अवलंबून असतो. ब्रिटन, अमेरिका, जर्मनी आणि स्वीडन या सर्व देशांत खाजगी मालकी असलेली अनिर्बंध अर्थव्यवस्था रूढ आहे. तरीदेखील भागधारकांना असलेले महत्त्व, शेअरबाजाराचे स्थान आणि लाभांशाबाबतचा दृष्टीकोण याबाबत या चार देशांत मोठी तफावत असल्याचे आढळून येते.

आणि काळाबरोबर या दृष्टीकोणात झपाट्याने बदलही घडून येऊ शकेल. उदा. ब्रिटनमध्ये १९४८ ते ५० च्या दरम्यान क्रिप्सप्रणित संयमाचा जमाना चालू होता तेव्हापेक्षा आताचा दृष्टीकोण अगदी निराळा आहे; आणि भागधारकांच्या अपेक्षाही आज खूप उंचावलेल्या आहेत. त्यात पुन्हा बदल घडून येणारच नाही असे सांगता येत नाही. अधिकाधिक प्रमाणांवरील समाजवादी लोकशाहीच्या रोखाने हळूहळू जसजशी प्रगती होत जाईल आणि भागधारकांच्या मानाने कामगार आणि व्यवस्थापक यांच्या सत्तेत आणखी वाढ होत जाईल तसतशी सध्याच्या कायद्यात किंवा मालकी हक्कांच्या पद्धतीत कोठल्याही प्रकारचा फेरबदल न करतासुद्धा भांडवलाची मालकी असलेल्यांच्या अपेक्षा खाली येऊ लागतील आणि सांस्कृतिक दृष्ट्या निर्धारित होणारे धोरण अधिकाधिक सौम्य करण्याकडे त्यांचा कल होत जाईल. समाजवादी लोकशाही स्वीडनचे आज ते वैशिष्ट्य मानले जाते.

या आणि याच्या मागल्या प्रकरणातील सर्व चर्चेचा उद्देश व्यापक सामाजिक प्रभाव पडणाऱ्या बाबींचे महत्त्व विशेषत्वाने लक्षात आणून देणे हाच होता. औद्योगिक सत्तेचे वितरण सध्यापेक्षा जास्त प्रमाणात समानतेच्या पायावर घडवून आणण्याची काहीच आवश्यकता नाही, किंवा कायद्यात बदल घडवून आणल्याने ते शक्यही होणार नाही. त्यासाठी जर सर्वांत कशाची आवश्यकता असेल तर ती सर्वांना रोजगार उपलब्ध करून देण्याची आणि राजकीय वातावरण अनुकूल ठेवण्याची. त्याशिवाय व्हाईट हॉलच्या फर्मानाला कामगार आणि व्यवस्थापक यांच्या बाबतीत दृष्टिकोणाइतकेच महत्त्व असते आणि व्हाईट हाऊसवर सोशालिस्ट पार्टीचा प्रभाव असेल तर बहुधा त्या कृतीला आणखीनच महत्त्व प्राप्त होईल. त्यामुळे समानता प्रस्थापित करण्याच्या ध्येयापैकी हा भाग अंमलात येणे न येणे हे मुख्यत: कामगार संघटनांच्या हाती असते. बिगर वेतनविषयक विशेषाधिकार, परिणामकारक विचारविनिमयाचे क्षेत्र वाढवणे आणि राष्ट्रीय व औद्योगिक पातळीवर 'उच्च प्रतीची लोकशाही' स्थापन करणे यासाठी कामगार संघटनांनी जर यशस्वीपणे आग्रह धरला आणि तेवढे सामर्थ्य त्यांच्यापाशी असते—तर औद्योगिक क्षेत्रात समाजवादी लोकशाही वातावरण निर्माण करण्यास त्या मदत करू शकतात. आणि तसे वातावरण निर्माण झाले तर या पुस्तकात सुचविलेले समानतेला पोषक असे इतर बदलही त्यामुळे घडून येतील.

● ● ●

प्रकरण अठरावे

# अर्थशास्त्राचे महत्त्व किती ?

## १. जलद विकासाच्या बाजूची कारणे

मजूर सरकारने कोणते आर्थिक धोरण स्वीकारावे याचा विचार करतांना आर्थिक कार्यक्षमता आणि झपाट्याने होणाऱ्या उत्पादन वाढीचे प्रमाण याला किती महत्त्व द्यावयाचे ते सर्वप्रथम ठरवावे लागेल.

एकतर राहणीमानाचा दर्जा आधीच इतका उंचावलेला असतो की, माणसे आणखी सुखसवलती मिळविण्यासाठी जिवाचा आटापिटा करीत नाहीत म्हणून म्हणा, किंवा अर्थव्यवस्था अशा अवस्थेला पोहोचलेली असते की, त्यात आणखी सुधारणा घडवून आणावयाला फारसे कष्ट पडत नाहीत म्हणून म्हणा, उत्पादनाची समस्या सहाजिकच गौण समजली जाते अशा समाजाची कल्पना करणे अशक्य नाही. उदाहरणार्थ अमेरिकेत या दोन्ही गोष्टी काही अंशी साध्य झालेल्या आहेत. त्या देशातील राहणीमान इतके उंचावलेले आहे की, जाहिरातबाजी किंवा नानाप्रकारच्या भपकेदार आणि नाविन्यपूर्ण वस्तूंचे ठोक उत्पादन करण्यात साधन-सामुग्रीची जी वारेमाप, निदानपक्षी अनावश्यक उधळपट्टी चालते ती तेथील लोक खुशाल खपवून घेऊ शकतात. (अमेरिकेपेक्षा कमी भाग्यवान लोकांच्या दृष्टीने 'खपवून घेतात 'असा शब्दप्रयोग केलेला आहे.) सहाजिकच 'दुर्मिळ साधनसामुग्री' ही कल्पनाच अशा देशांत गैरलागू ठरते. शिवाय शीघ्र गतीने नवेनवे शोध लावण्याकडे असलेला मानसिक कल, आणखी भांडवल गुंतवणुकीसाठी अगदी सहजपणे मोठमोठ्या रकमा बाजूला काढून ठेवण्याची शक्यता आणि परराष्ट्रीय व्यापाराबाबतची अनुकूलता यामुळे उत्पादनात जवळजवळ आपोआप मोठ्या प्रमाणावर वाढ होण्याची फार मोठी शक्यता असते. अशा परिस्थितीत आर्थिक कार्यक्षमता हाच खूप महत्त्वाचा मुद्दा आहे असे म्हणणे मूर्खपणाचेच ठरेल.

आणि सर्वांना नेहमीचा रोजगार उपलब्ध असेल तर ज्याला सुधारणा घडवून आणावयाची आहे तो विकासाच्या गतीची फारशी फिकीर करीत न बसता आपले मुख्य लक्ष बिगर आर्थिक समस्यांवर केन्द्रित करू शकेल.

युद्धापूर्वी बहुतेक समाजवादी ब्रिटनमध्येही अगदी अल्पावकाशात अशाच प्रकारचा समृद्धीचा जमाना सुरू होईल अशी आशा बाळगून होते. आणि त्यामुळे उत्पादनक्षमतेच्या वाढीसंबंधीच्या प्रश्नांबाबत काहीसे बेफिकीर होते. त्यावेळच्या परिस्थितीत हे धोरण योग्यच होते. उपयोगात आणली न गेलेली साधनसामुग्री हाताशी उपलब्ध होती आणि ती उत्पादन कार्यासाठी वापरता आली तर राहणीमानात सहजासहजी वाढ होऊ शकेल अशी परिस्थिती होती. शिवाय उत्पन्नाच्या वितरणात अतिशय असमानता होती. त्यामुळे विद्यमान संपत्तीचे नुसते हस्तांतर केले तरीदेखील कामगार वर्गाच्या राहणीमानात निःसंदिग्ध सुधारणा घडून येण्याची सहज शक्यता होती. त्याचप्रमाणे त्यावेळी परदेशीय व्यापारावर सर्वस्वी अवलंबून राहावे लागत असले तरी त्यामुळे फार मोठा अडथळा निर्माण होत होता असेही नाही. खाद्यपदार्थ आणि इतर वस्तू अगदी स्वस्तात मिळत होत्या आणि व्यापारातील परिस्थीतीमुळे गेली दोन दशके ब्रिटनचे प्रत्यक्ष उत्पन्न जे टिकून राहिले होते त्याला ओहोटी लागण्याची कोणतीही चिन्हे दिसत नव्हती.

त्यावेळच्या जगात जिकडे तिकडे मागणीपेक्षा पुरवठा अधिक होता आणि मजूर पक्षातर्फे दर आठवड्याच्या शेवटी होणाऱ्या सभांतून अंतर्गत बेकारीबरोबरच ब्राझीलमध्ये जाळून टाकण्यात येणाऱ्या कॉफीचा, अमेरिकेत पिके नष्ट करून टाकण्यात येत असल्याचा किंवा निर्बंधात्मक योजनांसाठी जिवंत गुरांच्या कत्तली करून टाकण्यात येत असल्याचा उल्लेख हमखास करण्यात येत असे. राहणीमानात सगळीकडे वाढ करण्यास निश्चितच भरपूर वाव होता. साधनसामुग्रीचा संपूर्ण उपयोग करून घेता येईल आणि संपत्ती श्रीमंतांकडून गरिबांकडे वळविता येईल अशा तऱ्हेने अर्थव्यवहाराची आखणी करण्याचाच काय तो प्रश्न आहे. 'उत्पादनाचा प्रश्न सुटला असून वितरणाचाच काय तो प्रश्न शिल्लक आहे' असे समाजवाद्यांनी वारंवार म्हणावे हे अगदी साहजिकच होते. याबाबत त्यांना नाही म्हटले तरी खुद्द केन्ससारख्या अधिकारी व्यक्तीचाच भारदस्त आधार होता. कारण अवघ्या एका पिढीनंतर भांडवली वस्तूंच्या उत्पादनाची इतकी रेलचेल होऊन जाईल की भांडवलाची किमान आवश्यक कार्यक्षमता शून्यावर येऊन बसेल असे ते समजत असत.

परंतु आज सहजासहजी उपयोगात आणता येतील असे राखीव साठे उपलब्ध नाहीत. १९३५ साली होती त्यापेक्षा रोजगाराच्या परिस्थितीतही सुधारणा झालेली नाही. त्यामुळे याहून अधिक फेरवितरण घडवून आणले तरी बहुसंख्य जनतेच्या भौतिक परिस्थितीत फारशी सुधारणा घडून येणार नाही. राहणीमानाचा सुधारलेला

दर्जा किंवा इतर कोणतीही आर्थिक मागणी पुरी व्हावयाची असेल तर ती आता दरडोई उत्पादनात वाढ करूनच पुरी करता येणे शक्य आहे. विकास आणि कार्यक्षमता हे प्रश्न तातडीने लक्ष देण्याइतके महत्त्वाचे होऊन बसतात.

परंतु त्यांना नेमके किती महत्त्व द्यावयाचे? आज परिस्थिती बदललेली असूनही काही समाजवादी त्यांना फारसे महत्त्व द्यावयास तयार नाहीत. जादा परिश्रम किंवा आर्थिक बाबींबद्दल चिंता करीत न बसता अधिकाधिक आराम करण्यात आणि सांस्कृतिक कार्याला वाहून घेण्यातच आपण स्वतःला गुंतवून घ्यावे असे त्यांना वाटते. तत्त्वतः मी त्यांच्याशी सहमत असलो तरी त्यासाठी ते ज्या काळाची निवड करीत आहेत त्याबाबत माझे मतभेद आहेत. याबाबतीतील त्यांचे म्हणणे आणखी दोन दशकानंतर मी मान्य करीन. परंतु आज तरी आधीच पूर्णपणे उपयोगात आणल्या गेलेल्या आपल्या साधनसामुग्रीला इतकी मागणी आहे की, विकासाच्या गतीकडे दुर्लक्ष करून चालण्यासारखे नाही.

एक तर अविकसित राष्ट्रातील विकासाला गती देण्याच्या कामी सहाय्य करण्यासाठी आपल्याला परदेशात अधिक भांडवल गुंतविणे आवश्यक आहे. युद्धोत्तर काळातील मजूर सरकारने या दिशेने फारच थोडी हालचाल केलेली आहे. परंतु हुजूर पक्षीय सरकार अधिकारावर आल्यापासून तर याबाबतीत आणखी प्रगती होणे जवळपास बंदच झाले आहे. काही वेळा या प्रश्नाची सांगड कम्युनिझम विरोधी लढ्याशी घातली जाते. परंतु अर्थातच या मागील खरी विचारसरणी ही नैतिक आणि मानवतावादीच अधिक आहे. सध्या परकीय मदतीवर होणारा आपला निवळ खर्च अगदी क्षुल्लक आहे. काही समाजवादी, राष्ट्रीय उत्पन्नांतील दोन किंबहुना तीन टक्के खर्च मदतीवर करणे ही किमान मर्यादा समजतात आणि तसे करणे सद्सद् विवेकबुद्धीस धरूनच होईल. मदतीचा नक्की आकडा कोणताही असला तरी आपल्या निर्यातीत बरीचशी वाढ होणे आवश्यक आहे हे नक्की.

दुसरा मुद्दा अंतर्गत अडचणी आणि आपत्ती यासंबंधीचा. या पुस्तकाच्या तिसऱ्या भागात यासंबंधीची चर्चा येऊन गेलेली असून यापुढील कित्येक वर्षेपर्यंत सामाजिक खर्चात बरीच वाढ करावी लागेल आणि तरीही मदतीसाठी करण्यात आलेल्या अनेक तातडीच्या मागण्या काही काल नाकाराव्या लागतील हे स्पष्टपणे दाखवून देण्यात आले होते.

तिसरा मुद्दा म्हणजे सामाजिक गुंतवणुकीचा तुंबून राहिलेला बोजा. वीस वर्षेपर्यंत दुर्लक्षित राहिलेल्या आणि त्यातच युद्धाच्या आणि युद्धोत्तर काळातील टंचाईची भर पडल्यामुळे रुग्णालये, मानसिक रोग्यांची वसतीगृहे, नव्या शाळा, गलिच्छ वस्त्यांचे निर्मूलन करण्यासाठी बांधण्यात आलेली घरे, वृद्धाश्रम, यासारख्या सामाजिक भांडवलाची वाढती टंचाई आपल्याला अद्यापही सतावत आहे. केवळ बऱ्यापैकी राहणीमानाचा एक भाग म्हणून नव्हे तर श्रीमंत वर्गाला उपलब्ध असलेल्या

सर्वोत्तम राहणीमानाशी ज्याची तुलना होऊ शकेल अशा तऱ्हेचे सार्वत्रिक आरोग्य आणि शिक्षण सर्वांना प्राप्त करून देणे हे जर आपण आपले उद्दिष्ट ठरवले तर आपल्याला खर्चात फार मोठी वाढ करावी लागेल.

चौथी गोष्ट म्हणजे व्यक्तिगत खर्चातील वाढ समाजवादी दृष्टीकोणातून या बाबीला बराच वरचा क्रमांक देणे कसे आवश्यक आहे. त्यासंबंधीचा उहापोह गेल्या प्रकारणात केलेला आहे. लेखक आणि बुद्धिजीवी हा युक्तिवाद मान्य करोत वा न करोत खुद्द सर्वसामान्य जनतेचा मात्र आपल्या राहणीमानात सुधारणा घडवून आणण्याचा निर्धार असून सरकारला जनतेच्या या इच्छेकडे लक्ष पुरविणे भाग आहे.

पाच: आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाबाबतची आपली परिस्थिती अद्यापही बिकट असून त्यात केवळ सुरक्षितता आणण्यासाठीदेखील निर्यातीत जादा वाढ होणे अत्यावश्यक आहे. अविकसित विभागासाठी अशा निर्यातीची आवश्यकता असते ती निराळीच. आणि दूरवर विचार करता व्यापाराच्या बाबतीत परिस्थती खालावण्याची संभाव्यता विचारात घेता निदान आहे ते राहणीमान तरी टिकवून धरण्यासाठीदेखील निर्यातीत वाढ करणे आवश्यक ठरणे अगदी शक्य आहे.

आणि शेवटचा मुद्दा असा की, कारखानदारीतील भांडवल गुंतवणुकीतील वाढ वरील सर्व बाबींचा समावेश करून घेण्यासाठी अत्यावश्यक ठरेल इतकेच नव्हे तर आजपर्यंत दुर्लक्षित राहिलेल्या बिगर कारखानदारी (उदा. रस्ते) गुंतवणु-कीत वाढ करणेही तितकेच निकडीचे होऊन बसते. यासंबंधीचे अधिक विवेचन खाली केलेले आहे.

यामुळे एकूण मागणीत भूपत्र वाढ होते. त्यामुळे आणखी कित्येक वर्षेपर्यंत तीव्र गतीने विकास घडवून आणणे हेच महत्त्वाचे उद्दिष्ट राहणार आहे आणि यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर पक्षीय सरकारला आर्थिक बाबतीत अधिक चापल्य आणि खंबीरपणा दाखवावा लागणार आहे हा निष्कर्ष नाकारणे कसे शक्य आहे ते मला समजू शकत नाही.

आता काही समाजवादी विचित्रपणे समजतात त्याप्रमाणे अर्थिक विकासाला बराच वरचा क्रम देणे म्हणजे टोरी तत्वज्ञान मान्य करणे नव्हे. उलट परिस्थिती त्याच्या नेमकी उलट आहे असे म्हणावयास हरकत नाही. यापैकी बहुसंख्य बाबींना बहुतेक समाजवादी हजूर पक्षीयांपेक्षा बरेच वरचे स्थान देतात. पहिल्या तीन बाबींना तर निश्चितच आणि चौथ्या बाबीलाही बहुधा फार महत्त्व देत असतात. आणि शेवटच्या दोन बाबींचे भवितव्य इतर बाबी पूर्ण होण्यावर अवलंबून असतात. म्हणून विकासाला तीव्र गती देणे हे निदान पुढील दहा वर्षे तरी समाजवादी उद्दिष्टांशी विसंगत तर ठरणार नाहीच उलट ती साध्य होण्यासाठी अनिवार्य ठरणार आहे. त्याचप्रमाणे पुन्हा सत्तेवर येण्यासाठीदेखील त्याची नितांत

आवश्यकता भासणार आहे–नव्हे त्या वाचून अधिकारावरदेखील येता येणार नाही. कारण उत्पादनवाढीच्या उद्दिष्टांकडे जर मजूर पक्षाचे दुर्लक्ष झाले तर ब्रिटिश जनतेची अप्रीती तो संपादन करील व ते योग्यच म्हणावे लागेल.

## २. विकासाला सर्वाधिक महत्त्व द्यावे काय ?

पण याचा अर्थ असा नव्हे की, दुसऱ्या टोकाला जाऊन आपण विकासालाच सर्वात वरचा अग्रक्रम द्यावा. कारण ब्रिटनमध्ये आजही खूप झपाट्याने विकास घडून येत असून वर नमूद केलेल्या बाबी अगदी समाधानकारक कालावधीत साध्य होण्याच्या दृष्टीने विकासाचा तो वेग पुरेसा आहे.

युद्धानंतरची काही वर्षे परिस्थिती अशी नसल्याचे आढळून येत होते. याचे कारण असे होते की, उत्पादनातील वार्षिक वाढ ऐतिहासिक प्रमाणाच्या दृष्टीने पहाता बरीच वाटली तरी दुसऱ्या जागतिक युद्धामुळे आणि कोरियन युद्धामुळे रचनात्मक स्वरूपाच्या ज्या अनेक अपवादात्मक मागण्या पुढे येत होत्या–तशा त्या पुन्हा येणार नाहीत अशी आशा करू या–त्या पुऱ्या करण्यासाठी ती आवश्यकच होती. युद्धामुळे झालेले नुकसान भरून काढणे, तुंबून राहिलेली नियोजित भांडवल गुंतवणूक, वस्तूंच्या सूचित (व्यापारी त्याचप्रमाणे घरगुतीही) जरूर ती भर घालणे, युद्धपूर्व काळातील पातळीपेक्षा ७५% नी निर्यातीत वाढ करण्याची आवश्यकता, कोरियन युद्धाला तोंड लागल्यामुळे शस्त्रास्त्रावर कराव्या लागणाऱ्या खर्चाचा अवाढव्य बोजा आणि व्यापाऱ्यांच्या दृष्टीने खालावलेली परिस्थिती हे त्या मागण्यांचे स्वरूप होते. युद्धामुळे निर्माण झालेल्या या सर्व मागण्यांमुळे उत्पादनात झालेली वाढ आपल्या देशातील गिऱ्हाइकांपासून हिरावली गेली आणि टंचाई आणि आर्थिक तणाव असलेले वातावरण निर्माण झाले.

परंतु या अपवादात्मक मागण्यांपैकी बहुतेक सर्व मागण्या कित्येक दिवसांपूर्वीच आटोक्यात आल्या आहेत. आणि उत्पादनातील वार्षिक वाढ कशा तऱ्हेने विनियोगात आणावयाची हा आता स्वेच्छेचा प्रश्न बनला आहे. पूर्वीसारखे गरजेनुरूप अपरिहार्यपणे ते ठरत नाही. अशी परिस्थिती असल्यामुळे विकासाचा सध्याचा वेग कोणत्याही संयुक्तिक उद्दिष्टांच्या दृष्टीने जवळजवळ समाधानकारक ठरेल असा आहे. वर उल्लेख करण्यात आलेल्या शांततेच्या काळातील काही बाबीदेखील ( लोकसंख्या जवळजवळ स्थिर असेल तर ) एकदा आणि अखेरच्याच स्वरूपाच्या असतात आणि आणखी काही वर्षानंतर त्यांचे निराकरण होऊ शकेल अशी अपेक्षा करता येईल. सामाजिक भांडवल गुंतवणुकीच्या ( घरबांधणीसकट ) बाबतीत तर हे विशेषच लागू पडते. काही अंशी मुलांच्या संख्येत फार मोठी वाढ झाल्यामुळे, त्याचप्रमाणे मख्यतः अनेक गरजा तुंबून राहिलेल्या असल्यामुळे या सामाजिक गुंतवणुकीत कमालीची वाढ होणे अत्यावश्यक झाले असून तशी ती

झाली पाहिजे. परंतु जननसंख्येच्या प्रमाणात अचानकपणे काही नवाच बदल घडून आला नाही तर पुढील दहा वर्षे जादा खर्चाची घालविल्यानंतर येथील परिस्थिती पुष्कळच निवळेल.

शिवाय एकूण उत्पादनात वाढ होण्यासाठी औद्योगिक भांडवल गुंतवणुकीतही त्या प्रमाणात वाढ करणे आवश्यक होऊन बसत असले तरी ती वाढ अमर्याद करीत रहावे लागत नाही. एकदाच आणि सौम्यशी वाढ केली तरी ती पुरेशी होते. परदेशांतील भांडवल गुंतवणुकीविषयीही व्यवहारतः असेच म्हणता येईल. आणि शेवटची गोष्ट अशी की, संरक्षणावरील खर्चाने यापूर्वीच कमाल मर्यादा गाठली असू एकूण राष्ट्रीय उत्पन्नाच्या दृष्टीने त्या खर्चाचे प्रमाण खाली येत चालले आहे.

दहा वर्षे झपाट्याने विकास होत गेला तर यापैकी अनेक मागण्यांचा कणाच मोडून पडेल आणि उत्पादनात होणारी त्यानंतरची वाढ मुख्यतः उपभोग्य वस्तूंसाठी उपयोगी पडू शकेल. मागणीतील इतर घटकांची एकंदर प्रवृत्ती काय राहील त्यासंबंधीची संभाव्यता गृहीत धरली तर त्या आधारावर आपल्या सध्याच्या विकासाच्या गतीने पुढील पंचवीस वर्षांत राहणीमानात दुपटीने देखील सहज वाढ होऊ शकेल. हे चित्र बरेच उत्साहजनक वाटते. म्हणून पुढील दहा वर्षे जर आपण यशस्वीपणे निभावून नेऊ शकलो तर आपल्याला खूप उसंत मिळू शकेल आणि आर्थिक प्रश्नांना दुय्यम स्थान देता येईल. तसेच आपल्या वाढत्या संपत्तीचा उपभोगही निवांतपणे घेता येईल. परंतु काही मागण्या इतक्या तातडीच्या आहेत की त्यांना अग्रहक्क द्यावाच लागतो. अशा तऱ्हेने, झपाट्याने विकास होण्याला कसलेही महत्त्व नाही असे म्हणणे मूर्खपणाचे असले तरी विशेषतः यानंतर अधिकारावर येणाऱ्या मजूर सरकारला तरी त्याचाच एक ध्यास राहण्याचे किंवा वाटेल तेवढी जबर किंमत मोजावी लागली तरी विकासाचा वेग जास्तीत जास्त वाढविण्यासाठी आपली शक्ती सर्वस्वी पणाला लावण्याचे काहीही कारण नाही.

परंतु काही लोक आपण नेमके तेच करावे असा आग्रह धरीत असतात. आंतरराष्ट्रीय क्षेत्रात ज्या वेगाने प्रगती घडून येत आहे त्याच्याशी तुलना करून या खडतर विचारसरणीचे ते समर्थन करीत असतात. आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील विकासाच्या आकड्यांवरून असे दिसून येते की, ब्रिटनपेक्षा इतर काही देशांतील उत्पादनात अधिक वेगाने वाढ होत आहे. आणि यावरूनच ते असले भयावह निष्कर्ष काढीत असतात.

एकः आपल्या परकीय गंगाजळीवर घडून येणाऱ्या परिणामांबाबत चिंता व्यक्त केली जाते. उदाहरणार्थ ब्रिटनपेक्षा अमेरिकेतील उत्पादनक्षमतेच्या विकासाचा वेग जास्त असल्याने अमेरिकेत तयार होणाऱ्या वस्तूंच्या किंमती ब्रिटिश मालापेक्षा साहजिकच स्वस्त पडतील व त्यामुळे डॉलरचा समतोल कायमचा बिघडून जाईल असे फार मोठ्या प्रमाणावर सूचित केले जाते. त्यामुळे आपल्या आंतरराष्ट्रीय

व्यापाराचा समतोल सुरक्षित राखण्यासाठी ब्रिटनला मधून मधून पौंडाचे अवमूल्यन करणे भाग आहे. हेच जरा हिरवट भाषेत सांगावयाचे तर अमेरिका जलदीने श्रीमंत बनत जाणे इतर देशांच्या दृष्टीने अनिष्ट ठरणार आहे.

परंतु इतका साधा दृष्टीकोन आता अर्थशास्त्रज्ञांना फार करून मान्य होणार नाही. वस्तुतः परकीय गंगाजळीवर विकासाच्या गतीचा परिणाम घडून येतो अशा प्रकारचा कोणताही ठोकळेबाज दृष्टीकोन कोणीच मान्य करणार नाही. एका बाजूने हे अगदी उघड आहे की, विकासाची गती मंद असेल तर त्यामुळे अडचणी निर्माण होतील. त्याची कारणे आत्ताच सूचित करण्यांत आली आहेत. म्हणजेच परदेशांतील किमतीच्या मानाने ब्रिटनमधील किमतीची पातळी उंचावणे ब्रिटनला अडचणीचे जाणार आहे. उलटपक्षी त्यावरून असाही निष्कर्ष निघेल की, परदेशातील प्रत्यक्ष उत्पन्न आणि त्यामुळे ब्रिटिश मालाला असलेली परदेशातील मागणी ही ब्रिटनमधील प्रत्यक्ष उत्पन्न व त्याबरोबर ब्रिटनमधील परदेशी मालाला असलेल्या मागणीपेक्षा झपाट्याने वाढत आहे. एक तर या दोन परिणामांचा एक-मेकाला छेद जाईल. दुसरा परिणाम अधिक प्रभावी ठरून परकीय गंगाजळीत वस्तुतः सुधारणाच घडून येईल. वस्तुस्थिती अशी आहे की, याबाबत अर्थशास्त्र-ज्ञांचे एकमत होऊ शकत नाही. आणि किंमती व उत्पन्न यांतील चढउतारासंबं-धीच्या आडाख्यावरच सर्व काही अवलंबून असल्याने कोणताही एक निष्कर्ष काढता येण्यासारखा निर्णायक पुरावा उपलब्ध होऊ शकत नाही.

विकासाच्या पुरस्कर्त्यांनी आता आपले लक्ष जगाच्या निराळ्या विभागावर केंद्रित केले असून त्यांनी आपल्या युक्तिवादांतही बदल केला आहे. सोव्हिएट युनियनच्या औद्योगिक यशामुळे ओढविणाऱ्या आपत्तीचीच भाषा आता जिकडे तिकडे ऐकू येंत आहे. असे सांगितले जाते की, रशियन अर्थव्यवस्थेतील विका-साचे सरासरी वार्षिक प्रमाण शेकडा सहा असून हे प्रमाण प्रमुख अशा पाश्चिमात्य राष्ट्रांतील सध्याच्या आर्थिक विकासाच्या मानाने, इतकेच नव्हे तर आतापर्यंत कधीही साध्य झालेल्या विकासापेक्षा कितीतरी जास्त आहे. परंतु अधिक धोका-दायक गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे सोव्हियट युनियनमधील औद्योगिक उत्पादनक्षमतेतील वाढही जास्त आहे.

खरे म्हणजे विद्यमान आकडेवारीबाबत काही वाद आहे आणि त्याबाबत विशेषतः श्री. कोलिन क्लार्क यांनी कडाडून टीका केली आहे परंतु भविष्यकाळाशी त्या आकडेवारीची नीट संगती लावता येईल की नाही याबाबत तर अधिकच अनिश्चितता आहे. गेली तीस वर्षे सोव्हिएट युनियनमधील विकास टिकून राहिला आहे त्याला काही अनैसर्गिक शक्ती कारणीभूत आहेत: पहिल्या पंचवार्षिक योज-नेच्या काळांत कमालीच्या खालच्या पातळीपासून ( १९२८ सालच्या उत्पन्नांत १९१३ सालच्या उत्पन्नापेक्षा जवळपास कसलीच वाढ झालेली नव्हती ) ही वाढ

सुरू झाली होती; पाश्चात्य देशांत तंत्रविज्ञानांत झालेल्या प्रगतीचे अनुकरण करणे शक्य होते—म्हणजेच कोणाच्याही मदतीशिवाय सुरवातीपासून इतकी प्रगती घडवून आणण्यासाठी जो वेळ आणि साधनसामुग्री वाया गेली असती तिची बचत होऊ शकली; हा सर्वात मोठा फायदा होता; लोकसंख्येत झपाटयाने होणारी वाढ आणि त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे ( उत्पादन क्षमता कमी असलेल्या आणि त्यांत फारशी वाढ होत नसलेल्या) कृषि व्यवसायांतून ( जास्त उत्पादनक्षमता असलेल्या आणि त्यांत झपाटयाने वाढ होत असलेल्या) औद्योगिक क्षेत्राकडे वळविण्यात आलेला कामगारांचा ओघ.

यापैकी पहिल्या दोन बाबी कालांतराने आपोआपच नष्ट होऊन जातील. अनुकरणामुळे मिळणारे फायदेही हळूहळू कमी होत जातील. उलट विकासाच्या सुरवातीच्या अवस्थेत जसजशी वाढ होत जाईल तसतशी आणखी नेत्रदीपक प्रगती साध्य करून घेणे अधिकाधिक अवघड होत जाईल. परंतु शेवटच्या दोन बाबी देखील कदाचित संपुष्टांत येतील. औद्योगिक कामगारांच्या संख्येत सध्याच्या प्रमाणांत यापुढे कधीच वाढ होत राहणार नाही. रशियांतील कृषिव्यवसायांत कामगारांच्या टंचाईची चिन्हे दृग्गोचर होऊ लागली आहेत. इतकेच नव्हे तर लोकसंख्येच्या वाढीचे प्रमाणही खाली येऊ लागल्याचे दृष्टोत्पत्तीस येत आहे. त्यामुळे सध्याच्या विकासाची गती फार काळपर्यंत तशीच टिकून राहू शकेल असे निश्चितपणे कोणालाही सांगता येणार नाही. शिवाय तज्ञांचेही याबाबतीत मतभेद आहेत.

परंतु रशियाचा विकास अगदी खळबळजनक जरी नाही तरी आपल्यापेक्षा काहीसा अधिक वेगाने होत राहिला असे गृहीत धरले तरी चिंता वाटण्यासारखे काय आहे ? सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की अर्थ व्यवहाराचा हेतू मानवी गरजांची परिपूर्ती करणे हा असल्यामुळे जास्तीत जास्त वेगाने विकास घडवून आणणे हेच तर्कदृष्टया आर्थिक धोरणाचे उद्दिष्ट असले पाहिजे. आणि दुसऱ्या एखाद्या देशातील प्रगतीचा वेग वाढला तर आपल्या देशातील नागरिकांसाठी आपल्यालाही तावडतोब तो आत्मसात केला पाहिजे. चिंतेची बाब आहे ती हीच. याबाबत डावपेचात्मक असाही एक मुद्दा असून त्याचे विवेचन खाली केले आहे.

परंतु अर्थव्यवहारासंबंधीचा विचार अर्थातच अलगपणे कधीच करता येणार नाही. आर्थिक बाबतीतील निर्णयांचा परिणाम सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक क्षेत्रावरही घडून येत असतो. आणि ते निर्णय चांगले की वाईट ते या क्षेत्रात त्यामुळे घडून येणारे परिणाम विचारात घेतल्याशिवाय ठरविता येणार नाही. असेही होवू शकेल की, ब्रिटन आणि सोव्हिएट यूनियनमधील विकासाच्या गतीतील (मानलेली) तफावत आपण भरून काढली तर आपण भौतिक गरजा अधिक प्रमाणात भागवू शकू. परंतु त्यामुळे इतरत्र घडून येणारे अत्यंत दुःखद परिणाम सहन करावे लागतील.

उदाहरणार्थ प्रोत्साहक योजनांच्या मजबुतीसाठी विषमतेत फार मोठी वाढ करावी लागली तरी ती सहन करावी लागेल; किंवा कामगारांना विशिष्ट वळण लावावे लागेल आणि त्यांचा संपाचा हक्क काढून घ्यावा लागेल; तसेच फुरसदीचा काळ. सांस्कृतिक चळवळी किंबहुना साधे मनःस्वास्थ यांना देखील फाटा द्यावा लागेल. विकासाच्या दृष्टीकोनातून मिळणाऱ्या सुस्पष्ट फायद्यांपासूनच हुकूमशाही राजवटीची वाटचाल सुरू होत असल्याने या सर्व गोष्टींना विशेषच महत्त्व प्राप्त होते. हुकुमशाही राजवटीत सरकारच्या वेतन आणि किंमत विषयक धोरणाला आव्हान देऊ शकणारी स्वतंत्र कामगार चळवळ असू शकत नाही. त्याचप्रमाणे त्या राजवटीच्या आर्थिक धोरणाला लगाम घालू शकतील असे स्वतंत्र मतदार संघही असू शकत नाहीत. परंतु तेवढ्यासाठी लोकशाहीचा त्याग करून हुकुमशाही पत्करणे योग्य ठरणार नाही. उलट आर्थिक कल्याणाच्या नांवावर विकासाला अवास्तव महत्त्व देण्याच्या कल्पनेला बहुतेक लोक सक्त विरोधच करतील.

काही झाले तरी अशा तऱ्हेचे पाऊल उचलेले पाहिजे असे म्हणणारांच्या मनांत आर्थिक विकास आणि खर्चाच्या प्रमाणातील वाढ यासंबंधी गोंधळ असतो व त्यावरच यासंबंधीचा त्यांचा युक्तिवाद आधारलेला असतो. अर्थात आर्थिक विकास आणि खर्चातील वाढ या निरनिराळ्या बाबी आहेत. हे खरे की, सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या अर्थव्यवस्थेत प्रथम आर्थिक विकास घडून आल्याशिवाय खर्चाच्या प्रमाणात वाढ होऊच शकणार नाही. परंतु आर्थिक विकासाची आवश्यकता काय किंवा त्याचा उपयोग कसा करून घेता येईल यावर खर्चाच्या प्रमाणातील वाढ अवलंबून नसते.

अंतर्गत खर्चाच्या प्रमाणात सतत टिकून राहणारी जलद वाढ हे तर मी समाजवादाचे मुख्य उद्दिष्ट समजतो. आणि विकासाचा वेग अशा वाढीला पोषक नसेल तर त्याबद्दल मला अत्यंत असमाधान वाटेल. परंतु यादृष्टीने आपल्या विकासाचा सध्याचा वेग अपुरा आहे असे खासच म्हणता येणार नाही. कारण काही वाजवी गोष्टी गृहीत धरल्या तर पंचवीस वर्षांत आपल्या राहणीमानात दुपटीने वाढ होईल अशी परिस्थिती आहे. हे चित्र काही वाईट नाही. आणि इतर देशांनी जगड्व्याळ परिश्रम घेऊन आपली स्थिती थोडीफार सुधारून घेतली तरी त्याबद्दल चडफडाट करून घेण्याचे काहीही कारण नाही. कारण त्यात बढाई मारण्यासारखे काहीही नाही.

म्हणून भौतिक दर्जा सुधारणे चांगले की वाईट या वादाशी ब्रिटनमधील विकासाला गती देण्याच्या प्रश्नाचा तसा काहीच संबंध पोहोचत नाही. विकासाचा सध्याचा वेग एकदा मान्य केला की, मग तो वाद उरत नाही असे मी मानतो. हा वेग आणखी बराच वाढविण्याचा विचार कल्याणकारी योजनांपेक्षा, म्हणजे खर्चाच्या प्रमाणात अधिक वाढ करण्यापेक्षा इतर बाबींवरच अवलंबून ठेवला पाहिजे.

सोव्हिएट विकासाबद्दल जी एवढी भीती व्यक्त केली जाते त्यामागील मुख्य कारणे राजकीय आणि डावपेचात्मक स्वरूपाची आहेत. एक तर त्यामुळे घडून येणारे संभाव्य लष्करी परिणाम धोकादायक वाटतात. अनुक्रमे सोव्हिएट आणि नॅटो गटातील पोलादाच्या उत्पादन वाढीचे जे आकडे दिले जातात ते भयचकित करणारे आहेत. परंतु युद्ध शास्त्राच्या दृष्टीने हा दृष्टीकोन अणुयुगापूर्वीचा व आता काहीसा जुनाट किंवा कालविसदृश म्हणावा लागेल. एकूण औद्योगिक उत्पादनात सोव्हिएट यूनियन पाश्चात देशांवर आघाडी मारील असा खरोखरीच एखाद्याचा विश्वास असला (मला मात्र तसे वाटत नाही) तरी त्यामुळे लष्करी सत्तेच्या समतोलात खरोखरीच काही क्रांती घडून येणार आहे का ? या प्रश्नाचे उत्तर आता हैड्रोजन बॉम्ब्सचा साठा कोणाजवळ किती आहे, आणि नव्या नव्या (व्यूह रचनात्मक, त्याचप्रमाणे डावपेचात्मक) अण्वस्त्र निर्मितीचा आणि विकासाचा वेग कोणाचा किती आहे त्यावर काही प्रमाणात अवलंबून आहे. त्याचप्रमाणे 'परंपरागत' शस्त्रास्त्रांच्या बाबतीतही नवी आणि अधिकाधिक श्रेष्ठ दर्जाची हत्यारे कोण किती प्रमाणात बनवू शकतो यावर ते अवलंबून राहणार आहे. विशेष ज्ञानाची आणि तंत्रविज्ञानाची आवश्यकता असलेल्या या क्षेत्रातील प्रगती ही केवळ पोलादाचे उत्पादन कशा प्रकारे होते यावर किंवा पाश्चात्य देशात ते फार कमी प्रमाणात होते यावर अवलंबून आहे असे मानण्याचे काहीही कारण नाही.

याच्या जोडीला असाही मुद्दा मांडला जातो की, रशियातील प्रगतीचा वाढता वेग आणि त्या अनुशंगाने (निदान सैद्धांतिक दृष्टचा तरी) रशियाच्या राहणीमानात झपाट्याने होणारी वाढ यामुळे लोकांचे साम्यवादाबाबतचे आकर्षण वाढेल तर त्याप्रमाणात अनिर्बंध लोकशाही बाबतचे आकर्षण कमी होऊ लागेल. कारण अविकसित विभागातील जनता त्यावरून असाच निष्कर्ष काढील की त्यांच्या स्वतःच्या राहणीमानात त्यांना अभिप्रेत असलेली वाढ फक्त साम्यवादी नियोजनामुळेच होऊ शकेल. परंतु रशिया आणि पाश्चात्य देश यातील विकासाच्या प्रमाणात असलेल्या अल्पशा तफावतीची त्या देशातील जनतेला फार करून जाणीवही नसते. आणि प्रगतीतील या तफावतीवरून ते रशियाच्या किंवा पाश्चात्य देशांतील समृद्धीविषयीचा अंदाज थोडाच बांधीत असतात ? आणि मनावर ठसा उमटविणाऱ्या इतर कोणत्याही मार्गाने, ते असा अंदाज बांधू लागले तरी रशियाच्या मानाने ब्रिटन किंवा अमेरिकेतील राहणीमानाचा दर्जा निकृष्ट आणि मागासलेला आहे असे दर्शविणारा दिवस कधीकाळी उगवेल असे मला मुळीच वाटत नाही.

परंतु यापेक्षा गंभीर मुद्दा पुढे केला जातो तो हा की, अविकसित विभागांना मदत देण्याची रशियाची आणि पाश्चात्य देशांची पात्रता त्यांच्या विकासाच्या प्रमाणावर अवलंबून राहणार आणि तसे ते अवलंबून असले तरी पाश्चात्य देशातील प्रगतीचा वेग मंद असूनही त्यामुळे कधी कधी वर्तविले जातात

तसे भयावह राजकीय परिणाम घडून येतील असे मला वाटत नाही. रशियाशी मैत्री करावयाची की पाश्चात्य देशाशी करावयाची ते ठरविण्याची अविकसित देशावर पाळी आली तर परराष्ट्रासंबंधीच्या आर्थिक धोरणापेक्षांही राजकीय धोरणावरूनच त्यांना त्याबाबतचा निर्णय घ्यावा लागेल. म्हणजेच आशिया आणि आफ्रिका खंडात रशिया आणि पाश्चात्य देशांची जी राजकीय 'प्रतीमा' तौलनिकदृष्टया उभी राहते त्यावरूनच या प्रश्नाचे उत्तर दिले जाईल. या दृष्टीने पाहता अविकसित देशांना आर्थिक मदत म्हणून ब्रिटनकडून नेमकी किती रक्कम मिळते यापेक्षांदेखील सायप्रस किंवा केनिया याबद्दल ब्रिटनचे धोरण काय राहणार ते अधिक महत्त्वाचे ठरते.

अर्थात यामुळे अविकसित देशांना भरपूर मदत दिली पाहिजे या मुद्याला बाध येत नाही. कारण हा मुद्दा मुख्यत: नैतिक आणि मानवतावादी दृष्टीकोनावर आधारलेला आहे. अर्थात व्यवहारतः आपल्या मदतीची व्याप्ती, विकासाची गती नेमकी कितीराहील त्यावर क्वचितच अवलंबून असते.मदत म्हणून द्यावयाच्या रकमांवर अनेकदा अपेक्षेपेक्षा फार मर्यादा पडतात. या मर्यादा देऊ केलेल्या रकमा खर्च करण्याच्या अविकसित देशांच्या क्षमतेमुळे जशा पडतात त्याचप्रमाणे मदत करणाऱ्या कोठल्याही देशावर फार विसंबून न राहण्याचा त्यांनी जो निर्धार केलेला असतो त्यामुळेही पडू शकतात. लोकशाही राष्ट्रांतील अर्थव्यवस्थेत कोंडी निर्माण झालेली असती तर ही मर्यादित मदत देणेदेखील त्यांना अत्यंत दुरापास्त होऊन बसले असते हे खरे. कारण तशा अवस्थेत दुसऱ्या राष्ट्रांना मदत द्यावयाची म्हणजे स्वत:च्या राहणीमानाला प्रत्यक्ष चिमटा घेऊनच ती द्यावी लागली असती. (कम्युनिस्ट राष्ट्रांना मात्र अशा कोणत्याच अडचणींना तोंड द्यावे लागत नाही.) या दृष्टीने पाहता पुरेशा मदतीसाठी विकासाचा वाजवी वेग ही अत्यावश्यक अशी अट ठरते. परंतु सगळ्या पाश्चात्य देशात झपाट्याने प्रगती होत असून दरवर्षी उत्पादनात जी वाढ होत आहे त्यातून मदतीसाठी रकमा बाजूला काढणे सहज शक्य आहे. स्वत:च्या खर्चाच्या प्रमाणात होणाऱ्या वाढीत त्यामुळे थोडी घट होईल, परंतु ती लक्षांतही न येण्याइतकी क्षुल्लक असेल.

मदत म्हणून प्रत्यक्षात जी रक्कम देऊ केली जाते, ती त्या देशांच्या एकूण विकासाच्या गतीपेक्षाही निराळ्याच तीन बाबींवर अवलंबून असते. त्या बाबी अशा एका-: दोन्ही देशांतील सरकारे आणि मतदार संघ यांचा राजकीय दृष्टीकोन; दोन : चलन फुगावामुळे पडणारे दडपण आणि तीन : परदेशातील गंगाजळी आणि बाहय जिंदगी व बोजा यासंबंधीची परिस्थिती. यातील एकही गोष्ट विकासाच्या गतीवर अवलंबून नाही. यांपैकी पहिली बाब ही बहुधा सर्वात अधिक निर्णायक ठरते—मदत देण्याच्या बाबतीत आपण मागे पडलो तर आर्थिक अडचणीपेक्षाही राजकीय निर्णय आणि धूर्तपणाच त्याला अधिक जबाबदार असणार.

## ३. विकासावर परिणाम घडवून आणणाऱ्या बाबी

त्यामुळे विकासाला जास्तीत जास्त गती देणे हे सध्याच्या ब्रिटनमधील समाजवादी धोरणाचे मुख्य उद्दिष्ट मानण्याचे काही कारण आहे असे मला वाटत नाही. युद्धोत्तर काळातील आपला विकासाचा वेग आपण टिकवून धरला किंवा त्यात थोडी वाढ केली तर काही कालावधीत विशेष अडचणींना तोंड द्यावे न लागता आपल्याला सर्व वाजवी मागण्या पुऱ्या करता येतील. म्हणून आर्थिक कार्यक्षमता आणि सामाजिक किंवा सांस्कृतिक मूल्ये यांच्यात जेव्हा जेव्हा संघर्ष उद्भवेल तेव्हा तेव्हा मजूर सरकारने आर्थिक कार्यक्षमतेस डोळे मिटून अग्रक्रम देता कामा नये.

परंतु या ठिकाणी इशारेवजा काही पूर्व सूचना देऊन ठेवल्या पाहिजेत. त्यापैकी पहिली गोष्ट अशी की, वरील विधान हे केवळ माझे वैयक्तिक मत आहे. मतदार संघाला ते मान्य असेलच असे नाही. खर्चाबाबतच्या अपेक्षा राहणीमानातील वाढीलाही मागे टाकणार असतील तर जे सरकार आणखी विकास घडवून आणण्याला सर्वांत जास्त प्राधान्य देईल त्याचीच निवड करण्याचा मतदार बहुधा आग्रह धरतील.

दुसरी गोष्ट अशी की, विकासाच्या सापेक्ष महत्त्वासंबंधीचा हा दृष्टीकोन सध्याच्या ब्रिटनला आणि तशाच तऱ्हेची परिस्थिती असलेल्या देशांनाच फक्त लागू आहे. अविकसित किंवा अत्यंत गरीब देशांना तो अजिबात लागू नाही. त्यांच्याबाबतीत विकासाला असलेले सर्वाधिक महत्त्व गृहीतच धरलेले असते. त्याचप्रमाणे ज्या राष्ट्रांच्या विकासाची कोंडी झालेली आहे, निदानपक्षी जेथील विकास मोठ्या वेगाने होत नसेल अशा विकसित देशांनाही वरील विधान लागू नाही. अगदी सुरुवातीपासूनच ज्या देशाची विकासाची पातळी वरची आहे आणि जेथे आधीच फार वेगाने विकासाची चक्रे फिरत आहेत अशाच देशांना फक्त हे विधान लागू आहे.

तिसरी बाब म्हणजे आपला सध्याचा काही प्रमाणात वाढत असलेला विकासाचा वेग अबाधित रहावा म्हणून मजूर सरकारने सावध राहिले पाहिजे. इतकेच नव्हे तर तसे करतांना आर्थिक क्षेत्राबाहेरही समाजवा ी धोरणाच्या चौकटीत राहून ती सावधगिरी बाळगली पाहिजे. उत्पादनांतून काही सामाजिक सेवा तातडीने पुरविण्याची जी निकड निर्माण होते त्यामुळेही कदाचित मजूर सरकारला अशी सावधगिरी बाळगणे भाग पडत असेल. हे साध्य कसे करून दाखवता येईल त्याचा उहापोह उरलेल्या पृष्ठांत करण्यात आला आहे. निरनिराळ्या अनेक बाबींवर विकास अवलंबून असतो हे तर उघडच आहे. त्यांतील काही आर्थिक बाबी असतात तर इतर राजकीय, समाजशास्त्रीय, ऐतिहासिक वगैरे स्वरूपाच्या असतात. विकास हा या पुस्तकाचा विषय नाही. आणि वर निर्दिष्ट केलेल्यांपैकी अनेक बाबींसंबंधीची चर्चा या पुस्तकात आलेली नाही. या प्रश्नाच्या सांगोपांग विवेचनासाठी वाचकांनी प्रोफेसर लुईस यांनी अलिकडेच लिहिलेल्या पुस्तकाचे परिशीलन करावे.

परंतु काही वेळा असे म्हटले जाते की, समानता आणि जलद विकास यांचे जुळणे शक्य नाही. याचा अर्थ असा की, समाजवाद्यांचे धोरण प्रगतीचा वेग कमी करण्याचेच हमखास असले पाहिजे. या पूर्वीच्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे हे अगदी उघड आहे की, प्रोत्साहक योजनेविषयीची आपली माहिती अत्यंत अपुरी असल्यामुळे यासंबंधी निश्चित असे कोणतेच विधान आपल्याला करता येणार नाही. परंतु याबाबतचा सकृत्दर्शनी पुरावा जो उपलब्ध आहे तो वर ध्वनित केलेल्या अर्थाला पोषक नाही. आर्थिक पद्धती, कराचे प्रमाण, आर्थिक संस्था आणि उत्पन्नाचे वितरण याबाबत सर्वस्वी भिन्न असलेल्या देशांतही आता उत्पादनक्षमतेच्या वाढीचे प्रमाण खूप मोठे आहे. सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या परिस्थितीतील आजचे आधुनिक तंत्रविज्ञान आणि विकासाची सर्वसाधारण विचारप्रणाली यात अशी एक शक्ती आणि जोम अंगभूतच असतो की त्यामुळे विकास फार झपाट्याने घडून येतो आणि संस्थात्मक पार्श्वभूमीची बंधने तो जवळपास अजिबात जुमानीत नाही. ते कसेही असले तरी अकराव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे आर्थिक प्रेरणांबाबत (प्रोत्साहकांबाबत) आपण जरी अगदी संकुचित आणि सनातनी दृष्टीकोण स्वीकारला तरीदेखील चौथ्या भागांत मांडण्यात आलेल्या सूचनांवर त्याचा कोणताही परिणाम घडून येणार नाही. कारण कष्टार्जित उत्पन्न किंवा प्रत्यक्ष कर यापैकी कशावरच त्याचा आघात होत नाही.

तथापी काही धोरणे जलदगती विकासाला बाधक ठरतील तर काही उपयुक्त ठरतील. अशी एक अवस्था येईल की, ज्यावेळी समतेमुळे कार्यक्षमतेवर अनिष्ट परिणाम घडून येण्यास सुरुवात होईल हे अगदी उघड आहे. त्यामुळे यापुढील प्रकरणात समाजवादी धोरणांचा आर्थिक बाजूवर काय परिणाम घडून येईल याची चर्चा केली आहे. आर्थिक बाबीच्या प्रत्येक अंगोपांगाचा परामर्ष घेण्याचाही मी प्रयत्न करणार नाही– त्यापैकी अनेकांचा सर्वंकष उहापोह अन्यत्र येऊन गेला आहे. त्यापैकी सर्वांत विवाद्य आणि विशेषत: समाजवादी धोरणाशी अत्यंत निगडित असलेल्या काही निवडक बाबीच मी विचारात घेणार आहे.

यापैकी सर्वात नजरेत भरणारी बाब म्हणजे औद्योगिक भांडवल गुंतवणुकीची पातळी. जलदगती विकासासाठी गुंतवणुकीची पातळी खूप वरची असली पाहिजे हे आता सर्वचजण मान्य करतात. परंतु यात अडचण उद्भवते ती अशी की, पातळी खूप वरची असली पाहिजे म्हणजे नेमकी किती उंच असली पाहिजे हे कधीच सांगता येत नाही किंवा आपण फार मोठी किंवा फार थोडी भांडवल गुंतवणूक करीत आहोत किंवा भांडवल गुंतवणूक अमुक एका टक्क्यांनी वाढली पाहिजे किंवा कमी केली पाहिजे असे एकदम ठोकूनही देऊ शकत नाही. भांडवल निर्मितीसाठी आवश्यक असलेल्या प्रमाणापेक्षा अत्यंत कमी असलेल्या अविकसित देशासारख्या अगदी अत्यंतिक स्वरूपाच्या काही उदाहरणात अशा तऱ्हेची निश्चित विधाने सहज करता येतील.

परंतु भांडवलाच्या बाबतीत आधीच समृद्ध असलेल्या आणि आपल्या राष्ट्रीय उत्पन्नातील बराचसा भाग नव्या निव्वळ गुंतवणुकीवर खर्च करणाऱ्या विकसित देशांत अशा तऱ्हेचे निश्चित मत व्यक्त करणे कठीण आहे. एक तर विकासाचा वेग वाढविण्यासाठी अग्रक्रम कशाला द्यावयाचा त्यावर आणि दुसरे म्हणजे विकासाची गती वाढविण्यासाठी खरोखरीच जादा भांडवल गुंतवणुकीची आवश्यकता आहे की, इतर मार्गांनीही (व्यवस्थापकीय कार्यक्षमता वाढविण्यासाठी अधिक चांगल्या प्रोत्साहक योजना अस्तित्वात असलेले निरनिराळे निर्बंध काढून टाकणे किंवा अधिक चांगल्या प्रकारचे तांत्रिक शिक्षण देणे इ.) ते साध्य करता येईल त्यावरही ते अवलंबून राहील. तिसरे असे की, आणखी भांडवल गुंतवणुकीची आवश्यकता आहे असे मानले तरी, भांडवल निर्मिती आणि उत्पादनक्षमता यांचे अगदी सुरुवातीचे परस्पर संबंध कसे राहातात यावरही ते अवलंबून असते.

यापैकी पहिल्या प्रश्नाचे उत्तर निःसंदिग्धपणे देता आले तरी, भांडवल गुंतवणुकीचा निव्वळ दर (उदाहरणार्थ) शेकडा दहा असावा की बारा असावा याची चर्चा करताना दुसऱ्या आणि तिसऱ्या प्रश्नाचे तितकेच निश्चित उत्तर क्वचितच देता येईल. आपल्याला फार तर असे म्हणता येईल की, (१) निदान पुढल्या दहा वर्षांसाठी सध्यापेक्षा विकासाचा वेग काहीसा जास्त राहण्याच्या बाजूने सांगण्यासारखे काही आहे. (२) हे (विकासाचा वेग) साध्य करण्यासाठी मोठ्या प्रमाणावरील भांडवल गुंतवणूक ही अत्यावश्यक बाब आहे असा सिद्धांत नसला तरी व्यवहारात मात्र ती अपरिहार्य ठरते. (३) ब्रिटनमधील गुंतवणूक अत्यल्प आहे या समजुतीला इतर प्रमुख देशात (राष्ट्रीय उत्पन्नाच्या प्रमाणात) ती जास्त आहे या वस्तुस्थितीमुळे अगदी निर्णायक स्वरूपाची जरी नाही तरी काही प्रमाणात बळकटी येते. (४) गेल्या दोन वर्षांत भांडवल गुंतवणुकीत झपाट्याने वाढ झाली असली तरीही अद्याप ती खूपच कमी आहे असे बहुतेक सर्व अर्थशास्त्रज्ञ मानतात; मग त्या म्हणण्यात तथ्य असो वा नसो.

अशा तऱ्हेने, एकंदर उत्पादनाशी असलेल्या भांडवल निर्मितीच्या गुणोत्तरात वाढ करण्यासारखा सकृत दर्शनी पुरावा दिसतो. त्याशिवाय आणखी काही वर्षे सामाजिक भांडवल आणि रस्ते बांधणी यात अधिक गुंतवणूक करणे ही आपली तातडीची गरज आहे. म्हणून व्यक्तिगत भांडवल गुंतवणुकीची (विशेषतः घरबांधणी) आवश्यकता कमी झाली तरी एकूण भांडवल गुंतवणुकीत विशिष्ट प्रमाणात वाढ करण्याचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवणे अप्रस्तुत ठरत नाही. इतर क्षेत्रांतील समाजवादी धोरणाशी यांची सांगड कशी घालावयाची याचे विवेचन पुढील दोन प्रकरणात केले आहे. त्यानंतरच्या प्रकरणात सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या परिस्थितीत वेतनासंबंधी काय समस्या असतात त्याचा उहापोह केला आहे आणि त्यापुढील प्रकरणात राष्ट्रीयीकरण आणि नियोजन यांचे स्थान काय त्याची चर्चा केली आहे.

परंतु मजूर पक्षापुढील सर्वात महत्त्वाचे कार्य आर्थिक स्वरूपाचे असण्याऐवजी मानसशास्त्रीय स्वरूपाचेही असू शकेल. १९३० साली ज्यासंबंधी प्रचार केला जात होता त्याच्याशीच अद्यापही समरस झालेले अनेक लोक पक्षात आहेत. आणि याहून मोठ्या प्रमाणावर फेरवाटप करता आले किंवा भांडवलशाहीशी संलग्न असलेल्या अपप्रकृतींचे निर्मूलन करता आले तर त्यापासून अद्यापही पक्षाला फार मोठा फायदा करून घेता येईल असे मानणारेही अनेक लोक पक्षात आहेत. विद्यमान जीवनासंबंधीची प्रत्यक्ष वस्तुस्थिती सर्वसामान्य जनतेला समजावून सांगण्याइतके धैर्य पक्षातील सर्व गटांत अद्याप आढळत नाही. परंतु उत्पादनक्षमतेतील वाढ ही तर वाढत्या समृद्धीची गुरुकिल्ली आहे हे सबंध कामगार चळवळीला पटवून देणे ही आर्थिक यशाची पहिली अट आहे.

❁ ❁ ❁

प्रकरण अेकोणीसावे

# भांडवल गुंतवणूक, बचत आणि चलनवाढ

## १. वाढत्या भांडवल गुंतवणुकीसाठी येणारे दडपण

भांडवल निर्मिती जास्त वेगाने होण्यासाठी खालील तीन अटी पुऱ्या व्हाव्या लागतात : एक – उद्योगांतील कार्यकारी अधिकाऱ्यांना भांडवल गुंतवणुकीसाठी पुरेशी प्रेरणा वाटली पाहिजे. दोन– भांडवल गुंतवणुकीसाठी पुरेसा पैसा उपलब्ध असला पाहिजे आणि तीन–भौतिक साधनसामुग्री म्हणजेच सामाजिक बचत हाताशी असली पाहिजे.

यापैकी कोणत्याही जरी गोष्टीची निरनिराळ्या वेळी कमतरता पडली तरी ती भांडवल गुंतवणुकीवर मर्यादा पडण्यास कारणीभूत होईल. अर्थात या तीन गोष्टी निरनिराळ्या आहेत हे लक्षांत घेणे महत्त्वाचे आहे. परंतु दुर्दैवाने यासंबंधी ज्यावेळी सार्वजनिकरित्या चर्चा होते, त्यावेळी त्यासंबंधी बराच गोंधळ केला जातो. उदाहरणार्थ अगदी अलिकडच्या वर्षात बचतीच्या तुटवड्यामुळे भांडवल गुंतवणुकीवर मर्यादा पडल्या असून भांडवली वस्तूंचे उत्पादन करणाऱ्या उद्योगां-वर त्यामुळे ताण पडू लागला आहे. वस्तुत: उद्योगांपाशी पुरेसा पैसा असून बऱ्याच मोठ्या प्रमाणावर ते तो कर्जाऊ देत असतात. तरी देखील उद्योगपती व शहरां-तील त्यांचे प्रवक्ते सतत अशी तक्रार करीत असतात की, पैशाची टंचाई आणि भांडवल गुंतवणुकींत असलेला धोका यामुळे भांडवल गुंतवणूक थोपवून धरली जाते. आणि करवाढीमुळे ही सर्व आपत्ती ओढवते असा त्यांचा आक्षेप असतो.

पुढील काळाचा विचार केल्यास भांडवल गुंतवणुकीवर मुख्य मर्यादा कोण-त्या बाजूने येण्याचा संभव आहे ? अत्यंत सुसंघटित आणि उच्चप्रतीची अर्थ-व्यवस्था असल्याचा दावा करणाऱ्या औद्योगिक दृष्ट्या विकसित देशांत ( निदान सबंध उद्योगांच्या दृष्टीने तरी) प्रत्यक्ष पैशाच्या कमतरतेमुळे किंवा भांडवल

गुंतवणुकीत धोके असल्यामुळे गुंतवणुकीवर मर्यादा पडतील हे मला अशक्य वाटते. आणि अगदी अनपेक्षितपणे तसे घडून आलेच तरी, सरकार खंबीर असेल तर त्याला तोंड देण्यासाठीं अनेक मार्गांचा ते अवलंब करू शकेल. त्यासंबंधीचे विवेचन पुढील प्रकरणांत केले आहे.

दोन युद्धांच्या मधल्या काळांत नवीन भांडवली खर्च करण्याबाबत धंदेवाले उत्सुक नसल्यामुळे भांडवल गुंतवणुकीवर सर्व साधारणपणे एक मर्यादा पडत असे. फार मोठ्या प्रमाणावरील बेकारी व सर्व प्रकारच्या वस्तूंच्या बाजारपेठेतील मंदी यामुळे नफ्यासंबंधीच्या अपेक्षाही अत्यंत निराशाजनक असत. आणि विद्यमान क्षमतेचा सहसा संपूर्ण उपयोग करून घेतला जात नसे त्यामुळे उद्योग धंद्याचा विस्तार करण्यास प्रोत्साहन मिळत नसे. अर्थात बेकारीमुळे बचतीत मात्र खूप वाढ होत असे—याचा अर्थ असा की, उद्योगपती आपल्या उद्योगांत जेवढी साधनसामुग्री सामावून घ्यावयास तयार असत त्यापेक्षा खाजगी आणि सार्वजनिक वितरणाच्याद्वारा समाज अधिक साधनसामुग्री उपलब्ध करून देत होता.

परंतु ऐतिहासिक दृष्टचा पाहता तो काल याबाबतीत नेहमीपेक्षा अगदी निराळा होता असे आता दिसून येते. आणि यापुढील काळांतील चित्र तर अगदीच निराळे असेल. आपल्याला सतत दहा वर्षेपर्यंत सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या शांततेच्या काळांतील वातावरणाचा फायदा मिळालेला आहे—ही परिस्थिती फक्त ब्रिटनमध्येच आहे असे नाही तर, इतर प्रमुख देशातील अनुभवही तसाच आहे. याचा अर्थ असा की, आर्थिक परिस्थितीत सबंध जगातच एक स्थित्यंतर घडून आले आहे. त्याची अनेक निरनिराळी कारणे आहेत. उपभोगाचे वाढते प्रमाण, बचतीतील घट व त्याच्या जोडीला उत्पन्नात आणण्यात आलेली वाढती समानता, सामाजिक खर्चाबाबत वाटणारे संवेदनाक्षम नैतिक विधीनिषेध, कामगार संघटनांना प्राप्त झालेली प्रचंड ताकद, मुद्दाम सुस्थिरता निर्माण करण्याचे उपाय योजल्यामुळे मोठमोठ्या अंदाजपत्रकांच्या द्वारा व्यक्त होणारी सुस्थिरता निर्माण करणारा प्रभाव, जागतिक लोकसंख्येच्या प्रमाणात झपाटयाने होत असलेली वाढ आणि त्यामुळे आंतरराष्ट्रीय व्यापाराचा वाढलेला आवाका ही ती कारणे होत.

या बाबी पलटी खातील असा संभव दिसत नाही. आणि वरच्या पातळीवरील मागणी आणि त्यामुळे रोजगार यासाठी येत असलेले दडपण चालूच राहील असा संभव दिसत आहे. परंतु त्याची तीव्रता काही प्रमाणात कमी झाली आणि चलनवाढ कमी होण्याचा धोका पुन्हा निर्माण झाला तरी त्या जागी तितकेच जोरदार राजकीय दडपण निर्माण होईल. मतदारांना आता अशी खात्री वाटू लागली आहे की, सर्वांना रोजगाराची परिस्थिती सहज टिकवून धरता येईल आणि त्यामुळे तशी परिस्थिती टिकवून धरण्यात अपयश आले तर मतदार ते खपवून घेणार नाहीत. जरा दीर्घ काळपर्यंत एखाद्या सरकारच्या राजवटीत बऱ्याच मोठ्या

प्रमाणावर बेकारी टिकून राहिली तर काही प्रमाणात तरी त्या सरकारला निवड-णुकीत पराभव पत्करावा लागेल. आणि त्यामुळे सर्वांना रोजगार असताना जितकी मागणी आली असती तितकी पातळी टिकवून धरण्यास सरकारला प्रवृत्त करण्यास यामुळे जोराची चालना मिळते.

आणि युद्धोत्तर काळात, विशेषतः अमेरिकेत आलेल्या अनुभवावरून असे दिसून येते की मागणीची पातळी टिकवून धरण्यासाठी आणि ती पातळी खाली जात असेल तर पुन्हा पहिली अवस्था गाठण्यासाठी उपाय योजना करणे शक्य आहे. त्याचप्रमाणे ते उपाय चांगले प्रभावीही ठरू शकतात या मताला बळकटी येते. अधुनिक अर्थशास्त्रज्ञांनी केलेले उत्पन्नासंबंधीचे विश्लेपण (काही अर्थशास्त्रज्ञ मात्र त्याबद्दल आश्चर्य व्यक्त करीत असले तरी) योग्य आहे असे प्रत्यक्षात आढ-ळून येत आहे. मागणी संबंधीच्या निरनिराळ्या घटकांची परिस्थिती कशी राहील यासंबंधी वर्तविण्यात येणारे आडाखे अद्यापही अनिश्चित आणि अविश्वासार्ह अस-तात हे खरे. त्याचप्रमाणे सुरुवातीला होणारी थोडीशी पीच्छेहाट थोपवून धरणे नेहमी शक्य होतेच असे नाही ही देखील वस्तुस्थिती आहे. परंतु महत्त्वाची गोष्ट जर कोणती असेल तर ती ही की, या परिस्थितीत सुधारणा घडवून आणणे आता सहज शक्य आहे. कारण मागणी वाढविता येते हे आता सिद्ध झालेले आहे आणि आर्थिक धोरण (कर आकारणी आणि खर्च या दोन्ही बाबतीत), ग्राहकांना कर्ज मिळण्यासंबंधीच्या नियमातील फेरबदल आणि काही अंशी नाणेविषयक धोरण यांच्या योगेही मागणीत वाढ घडवून आणता येते. मंदी येणे अपरिहार्य आहे अशी भाकिते पुन्हा पुन्हा वर्तविण्यात येत असली आणि सार्वजनिक कामांच्या कार्यक्रमाचे राखीव हत्यार उपसण्याची मागणी केलेली नसतानाही अमेरिकेतील भरभराट १९४५ पासून टिकवून धरण्यात आली आहे. यावरून हेच सिद्ध होते की, सर्वांना रोजगार उपलब्ध व्हावा म्हणून ज्या प्रमाणे स्वतंत्रपणे दडपण येत राहते त्याचप्रमाणे हे घडवून आणण्यासाठी अधुनिक शासनाची सत्ता उपयोगात आणणे अत्यावश्यक आहे याचे प्रत्यंतर आणून देते.

ही राजकीय आणि स्वयंसिद्ध अशी दोन्ही प्रकारची दडपणे अमेरिकेपेक्षा ब्रिटनमध्ये अधिक जोरकस आहेत इतकेच नव्हे तर, ज्या शिलकी गरजांचा सरकार परिणामकारकपणे उपयोग करून घेऊ शकेल त्याही अमेरिकेपेक्षा ब्रिटनमध्ये अधिक आहेत. यापैकी काहींचा निर्देश मागील प्रकरणात केलेला आहे. उदा. अविकसित विभागातील गरजा, वाढत्या प्रमाणावरील सामाजिक खर्चाची तातडीची निकड, तुंबून राहिलेली सामाजिक भांडवल गुंतवणूक इत्यादि आणि यापैकी काहीही जरी अस्तित्वात नसते तरी देखील ऐतिहासिक दृष्टया आधीच जास्त असलेले कर सहज कमी करता येतील व त्याचे सर्वांकडून स्वागतच होईल. दृष्टीच्या टप्प्यांत येऊ शकेल इतक्या दूरवरच्या भविष्यकाळात ब्रिटनमधील संभाव्य मागणीवर संभाव्य उत्पादन

ताण करू शकेल असे म्हणणे कोठल्याही अर्थाने शहाणपणाचे ठरणार नाही.

सर्वांना सतत रोजगार मिळत राहिला तर त्यामुळे आर्थिक कार्यक्षमतेवर आणि विकासाच्या प्रमाणावर घडून येणारे परिणाम एकंदरीने अनुकूलच असतील. मंदीच्या काळापेक्षा या परिस्थितीत भांडवल गुंतवणूक ही प्रत्यक्षात जास्त असेल एवढेच त्याचे सहज लक्षात येणारे कारण नसून त्याला सर्वसाधारण अशी आणखाही बरीच कारणे आहेत. बेकारीमुळे काम करण्याच्या प्रेरणेला (तथाकथित) अधिक चालना मिळते आणि त्यामुळे कारखानदाराच्या खर्चात कपात व्हावी म्हणून येणारे दडपण हे उत्पादन क्षमतेच्या दृष्टीने निश्चितच फायदेशीर ठरते अशी समजूत करून घेणे अगदी भ्रामक आहे. खर्चात थोडी फार कपात होणे हे अर्थातच अत्यंत इष्ट ठरेल यात शंकाच नाही. यासंबंधीचे आणखी विवेचन पुढे आले आहे. परंतु खर्चाचे प्रमाण जाणवण्याइतकी बेकारी निर्माण होण्याइतके खाली घसरले तर ते एकंदरीने फायदेशीर ठरण्याऐवजी तो समतोल उलट बिघडेल कारण मग कामगार आणि व्यवस्थापक हे दोघेही संरक्षणात्मक योजनांचा आश्रय घेऊ लागतील व त्याचा तर खर्चावर अत्यंत प्रतिकूल परिणाम घडून येतो.

कामगारांसंबंधी बोलावयाचे तर बेकारीसंबंधीची त्यांची नैसर्गिक प्रतिक्रिया कोठलीही नवी यंत्रणा सुरू करण्याचा प्रयत्न झाला तर त्याचा प्रतिकार करण्याची आणि 'संथ-काम' (go slow) यासारख्या मार्गांनी उपलब्ध असलेले काम लांबविण्याची असते तर व्यवस्थापकांच्या बाजूने आपल्या उद्योगधंद्यातील निरनिराळ्या कंपन्याचे एकत्रिकरण करणे आणि विक्रीची समान व्यवस्था करणे यासारख्या सुरक्षिततेच्या योजनांसाठी धावपळ करणे अशी समांतर प्रतिक्रिया आढळून येते. ज्याठिकाणी नाममात्र स्पर्धा टिकवून धरली जाते तेथे देखील तिचे स्वरूप आपल्या मालाची किंमत कमीत कमी राहावी किंवा आपल्या उत्पादनात जास्तीत जास्त कार्यक्षमता यावी अशा तऱ्हेचे न राहता ते उद्योगधंद्याला निर्माण झालेला धोका विभागला जावा म्हणून उत्पादनात जास्तीत जास्त विविधता आणणे आणि इतर कारखानदारांपेक्षा आपल्या उत्पादनातील फरक (ग्राहकांच्या मनावर) जास्तीत जास्त प्रमाणात ठसविणे या प्रकारचे राहते. याचा परिणाम मालाच्या बाबतीतील विशेषता आणि प्रमाणितता घटण्यात होतो किंवा निराळ्या शब्दात सांगावयाचे तर, थातुर मातुर उत्पादन सुरू होते आणि मोठ्या प्रमाणावरील उत्पादनातील सुप्त फायदे गमावून बसण्याची वेळ येते. कार्यक्षमतेवर याचा अनिष्ट परिणाम होतो हे इंग्लंड अमेरिकेतील उत्पादन क्षमतेसंबंधीच्या असंख्य अहवालांनी स्पष्टपणे निदर्शनास आणून दिले आहे. ब्रिटनमधील उत्पादनक्षमतेचे प्रमाण विशेष नसण्याचे मुख्य कारण हेच आहे आणि ब्रिटनमधील उद्योगांच्या नेमक्या याच वैशिश्टचांवर या अहवालात बोट ठेवण्यात आले आहे. ब्रिटिश उद्योगांची ही वैशिष्टचे काही अंशी युद्धपूर्व काळातील बेकारीमुळे निर्माण झालेली आहेत.

सर्वांना रोजगार उपलब्ध असला म्हणजे या सगळ्या दडपणांना उलट दिशा प्राप्त होते. बाजारपेठा वाटून घेण्याची संरक्षणात्मक व्यवस्था करण्याचा फारसा मोह होत नाही. त्याचप्रमाणे विक्री आणि उत्पादन यांच्या बाबतीत बचावात्मक पवित्रा घेण्याचीही फारशी गरज पडत नाही. मागणीच्या उत्साहवर्धक पातळीमुळे केवळ उद्योगांच्या क्षमतेत प्रत्यक्ष वाढ करण्याचाच नव्हे तर अधिक धाडसाने धोक्याला सामोरे जाण्याच्या, शीघ्र गतीने तांत्रिक सुधारणा घडवून आणण्याच्या आणि संशोधनावर अधिकाधिक खर्च करण्याच्या प्रवृत्तीलाही चालना मिळते. शिवाय कामगारांची टंचाई भासू लागली की, त्याचा परिणाम उत्पादनात अधिकाधिक काटकसर घडून येईल अशी पद्धती सुरू करण्याचा आणि ज्यामुळे उत्पादनासाठी कमीत कमी कामगार लागतील अशा तऱ्हेची यंत्रणा निर्माण करण्याची जोरदार प्रेरणा निर्माण होते. कामगारांच्यासंबंधी बोलावयाचे तर, रोजगाराच्या बाबतची सुरक्षितता वाढली म्हणजे मालक–कामगारसंबंध किंवा कामगारांची शिस्त (उदा. घरबांधणी सारख्या उद्योगांतील) यासंबंधी काही अडचणी निश्चितपणे उद्भवत असल्या तरीदेखील निर्बंधात्मक उपायांसंबंधीचे आकर्षण कमी होऊ लागते आणि तंत्रविषयक बदल स्वीकारण्यास कामगार अधिकाधिक राजी होऊ लागतात.

परंतु सर्वात महत्त्वाचा बदल कशात घडून येत असेल तर तो भांडवल-गुंतवणुकीसंबंधीच्या निर्णयाबाबत. पुरेसा रोजगार उपलब्ध नसलेल्या अर्थव्यवस्थेपेक्षा सध्याची गुंतवणूक अधिक राहील हे तर खरेच. कारण भांडवल गुंतवणुकीत वाढ झाल्याशिवाय मंदीचे रूपांतर तेजीत क्वचितच होऊ शकेल. परंतु त्याचबरोबर त्यात आणखी वाढ करण्यासही त्यामुळे उत्तेजन मिळेल.

याला अर्थातच काही अंशी आर्थिक कारणे जबाबदार आहेत. सार्वजनिक, त्याचप्रमाणे खाजगी क्षेत्रातील भांडवल गुंतवणुकीसंबंधीचे निर्णय हे येणारी मागणी, किंमत आणि नफा यासंबंधीच्या अपेक्षांवर अवलंबून असतात आणि या अपेक्षांवरही पुन्हा चालू मागणी आणि नफा यांची जी पातळी असेल त्याचा प्रभाव पडलेला असतो. उत्पादन क्षमतेचा पुरेपूर उपयोग करून घेणाऱ्या अर्थव्यवस्थेत चालू नफ्याचे प्रमाण जास्त असते इतकेच नव्हे तर, आताच नमूद केलेल्या कारणामुळे संपूर्ण रोजगाराच्या परिस्थितीत उत्पादन क्षमतेच्या प्रमाणातही सुयोग्य अशी वाढ होण्यास चालना मिळत असल्याने आणि त्यामुळे व्यक्तिगत उत्पन्न आणि खर्च यांतही वाढ होत असल्याने नफ्याचे प्रमाणही वाढते राहील आणि अशा वाढत्या नफ्याबरोबर सर्वांना सतत रोजगार मिळत राहील तसतसा प्रत्येक वर्षी भविष्यासंबंधीच्या अपेक्षाही वाढत जातील. याचा परिणाम भांडवल गुंतवणुकीच्या योजनात अधिकाधिक भर घालण्याची आणि भांडवल निर्मितीची पातळी उंचावण्याची प्रवृत्ती बळावण्यात होईल,

अर्थात सर्वांना सतत रोजगार मिळत राहील आणि पूर्वी अनेकदा अनुभवास आल्याप्रमाणे एका विशिष्ट अवस्थेत मंदीचे आवर्त पुन्हा उद्भवणार नाही या भरवशावरच अशा प्रकारच्या आशावादी अपेक्षा अवलंबून असतात. युद्धानंतर अगदी काल परवापर्यंत हा भरवसा सर्वत्र दिसून येत नव्हता. बहुतेक सर्व धंदेवाल्यांना असे वाटत होते की, युद्धानंतर येणाऱ्या पारंपारिक तेजीचाच हा झपाटा असून तशाच पारंपारिक मंदीचा फेरा यानंतर ( खरे म्हणजे म्हणजे यापूर्वी केव्हाच तो यावयास हवा होता ) येणार आहे. १९५२–५३ साली भांडवल गुंतवणुकीच्या कार्यक्रमात जी काटछूट करण्यात आली त्यामागे देखील त्या काळातील अल्पप्रमाणावरील मंदी ही फार काळापासून अपेक्षित असलेल्या मंदीची नांदीच ठरणार ही भीती होतीच.

परंतु दहा वर्षांहून अधिक काळ राहिलेल्या शांततेच्या काळात सतत सर्वांना रोजगार उपलब्ध होत राहिल्याने मंदीच्या धास्तीने आलेली आपली मनोविकृती आता बऱ्याच प्रमाणात कमी झाली आहे. दोन युद्धांच्या दरम्यानच्या काळात या मनोविकृतीचा औद्योगिक दृष्टीकोनावर पगडा बसलेला होता आणि त्याचे परिणामही फार भयानक घडून आले होते. धंदेवाले आता ही वस्तुस्थिती मान्य करतात की, ही समृद्धी आता येथे अशीच टिकून राहणार आहे. ती संपूर्ण रोजगार कायम राखून टिकवून ठेवली जाणार आहे म्हणूनच केवळ नव्हे तर, व्यक्तिगत उत्पन्न आणि खर्च यात शीघ्रगतीने वाढ होण्याच्या काळात आपण पदार्पण केले आहे हेही त्याचे कारण आहे. आता मंदीची मनोविकृती जाऊन त्या जागी उलट चलनफुगवट्याचा हव्यास निर्माण झाला आहे. धंद्यासंबंधीच्या या मनोवृत्तीत घडून आलेली परंतु अजिबात लक्ष न गेलेली ही क्रांती ही आपल्या पिढीतील सर्वांत महत्त्वाची घटना आहे. आणि भांडवल निर्मितीच्या प्रमाणावर घडून येणारे त्याचे परिणाम इतके उघड आहेत की, त्यावर विशेष भर देवून सांगण्याचे कारण नाही.

या आर्थिक दडपणांना त्याहूनही जास्त धूर्तपणाच्या अशा सामाजिक दडपणामुळे अधिकच बळकटी येते. युद्धपूर्व काळातील जादा क्षमतेच्या जमान्यात जलद विकासाची आवश्यकता आणि ती पुरी करण्यासाठी जादा भांडवल गुंतवणुकीची गरज एक प्रकारे अमान्य केली जात असे. परंतु देशाने ती गरज आता मान्य केली असून राष्ट्रीय आकांक्षा म्हणून ती आता मान्यता पावली आहे. एकामागून एक येणारे अर्थमंत्री, सर्व राजकीय पक्ष, शहरांतून व्यक्त होणारे मत, साप्ताहिक नियतकालिके, अर्थशास्त्रज्ञ इतकेच नव्हे तर विशेष प्रख्यात नसलेले वर्तमानपत्रकार हे सर्वजण भांडवलगुंतवणूक करणे हे प्रत्येक राष्ट्रभक्ताचे कर्तव्य आहे असा उद्योगपतींना उपदेश करीत असतात आणि जे उद्योगपती त्याप्रमाणे वर्तन करतात त्यांचा गौरव करतात ते एका बाजूला ब्रिटन आणि दुसऱ्या बाजूला जर्मनी किंवा अमेरिका या देशातील भांडवल निर्मितीचे प्रमाण असमान असल्याचे वारंवार सांगितले जाते.

याची माहिती नसणारे किंवा त्या प्रश्नाबाबत जागृत नसणारे उच्चपदस्थ व्यवस्थापक आता सहसा आढळणार नाहीत. अशा तऱ्हेच्या प्रश्नासंबंधीच्या सामाजिक जाणीवेचा आर्थिक निर्णयावर, कोणताही परिणाम घडून येत नाही अशी समजूत करून घेणे चुकीचे ठरेल— आर्थिक निर्णयावर त्याचा जरूर परिणाम घडून येतो आणि उद्योगांचा विस्तार ही 'प्रत्यक्ष आचरणात आणलेली गोष्ट' होऊन बसली असून तिचे स्वागत केलेले आहे ही वस्तुस्थिती उद्योगाच्या विकासाच्या दृष्टीने अत्यंत प्रेरक ठरली आहे.

या परिणामाचा उद्योगांतील प्रशासकांचे व्यक्तिगत हेतू साध्य करून घेण्याकडेही उपयोग करून घेतला जातो. पहिल्या प्रकरणात मी हे यापूर्वीच दाखवून दिले आहे की, अर्थव्यवहार करणाऱ्या कुटुंबाचे रूपांतर हे मोठ्या प्रमाणावर व्यवहार पार पाडणाऱ्या जॉईंट स्टॉक कंपन्यात झाल्यानंतर कंपन्यांच्या वाढीबरोबर व्यक्तिगत खर्च हे जे पूर्वीचे अर्थव्यवहारामागील मुख्य सूत्र त्याला आता महत्त्व राहिलेले नाही. आणि त्यामुळे अर्थव्यवहारातून होणारा फायदा पुन्हा भांडवल म्हणून मोठ्या प्रमाणावर गुंतविण्याच्या धोरणास चालना मिळते. झपाट्याने विस्तार करणे हे आता केवळ व्यावसायिक उद्दिष्ट राहिलेले नाही तर, त्याला राष्ट्रीय उद्दिष्टाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. त्याचप्रमाणे कंपन्यांची आणि त्यांच्या प्रशासकांची प्रतिष्ठा ही देखील आता त्या कंपन्यांच्या उत्पादनाच्या व नफ्याच्या वाढीचा वेग किती आहे त्यावर आणि अर्थविषयक नियतकालिकांतून त्या कंपन्यांनी घडवून आणलेल्या तंत्रविषयक सुधारणा किंवा नव्या भांडवल गुंतवणुकीसंबंधीच्या योजना याबद्दल अधून मधून जो मजकूर प्रसिद्ध होतो त्यावर सर्वस्वी अवलंबून असते. सहाजिकच व्यवस्थापकांच्या भांडवल गुंतवणुकी संबंधीच्या दृष्टीकोनावरही याचा फार मोठा परिणाम घडून येतो. पुष्कळदा असे सांगितले जाते की, एकोणीसाव्या शतकात झालेली भांडवलशाहीची वाढ हे विशिष्ट आर्थिक संस्थांचे फलित नसून भांडवलदारांची साहसी मनोवृत्तीच त्याला मूलतः कारणीभूत आहे. हे म्हणणे खरे असो वा नसो, इतके मात्र स्पष्ट दिसते की, (राष्ट्रीयीकरण झालेल्या त्याचप्रमाणे खाजगी धंद्यांतीलही) सध्याच्या सर्वोच्चपदी असलेल्या व्यवस्थापकांचे हेतु आणि सामाजिक आणि संस्थात्मक दृष्ट्या त्यांचे कार्यक्षेत्र सर्वस्वी निरनिराळे असले तरी त्या सर्वांना समान असलेले गटाचे मानसशास्त्र सारखेच आक्रमक आणि विस्तारवादी असते.

अर्थात आर्थिक प्रवाहाबाबत कोणतीही ठोकळेबाज विधाने करणे कधीच शहाणपणाचे ठरणार नाही. बऱ्याच कालावधीनंतर परिस्थिती कशी असेल ते कोणालाच सांगता येणार नाही. किंबहुना अगदी नजीकच्या काळातदेखील बचतीचा आणि धोका पत्काराव्या लागणाऱ्या भांडवलाचा पुरवठा लक्षात घेऊन जितकी भांडवल गुंतवणूक करणे शक्य आहे, त्या मर्यादेपर्यंत जाण्याची उद्योग किंवा सरकार यांची

तयारी नसण्याचा संभव आहे. परंतु पुढील दहा वर्षासंबंधीचे भाकित वर्तविण्याचा धोका पत्करावयाचाच असेल तर असे म्हणता येईल की, युद्धोत्तर काळातील थोड्या-फार प्रमाणात समानता प्रस्थापित झालेल्या, सर्वांना रोजगार उपलब्ध असलेली अर्थव्यवस्था असलेल्या आणि लोकशाहीवादी अशा ब्रिटनसारख्या देशात भांडवल गुंतवणुकीस जोरदार प्रोत्साहन मिळत राहील तर त्या उलट परिस्थिती असलेल्या देशात जास्त खर्च करण्याकडे आणि शिल्लक कमी टाकण्याकडे कल राहील. त्या परिस्थितीत भांडवलनिर्मितीच्या पातळीवर बचतीच्या पुरवठ्याच्या अनुशंगाने फार मोठ्या मर्यादा पडतील. आणि विकासाचे प्रमाण हे मुख्यत:, भविष्यकालीन संचया-साठी समाज आपल्या उत्पन्नातील बराचसा भाग बाजूला काढून ठेवावयास तयार आहे किंवा नाही त्यावरच अवलंबून राहील.

## २. चलनबाढीचा धोका

आर्थिक विकासासाठीच केवळ नव्हे तर, स्थैर्य टिकवून धरण्यासाठीही पुरेशा बचतीची आवश्यकता असते. युद्धपूर्व काळात अशी परिस्थिती नव्हती. त्यावेळी अस्थिरतेचा अपुऱ्या बचतीशी कसलाही संबंध नसे. भांडवल गुंतवणुकीतील चढ-उताराच्या आवर्तामुळे अस्थिरता निर्माण होत असे आणि तेजीच्या काळात देखील कुटुंबांना सतत मिळणारा अपुरा रोजगार हे मूलत: जादा बचतीचे द्योतक होते.

आज कुटुंबातील अपुरा रोजगार नष्ट झालेला आहे. त्याची कारणे मागच्या विभागात दिलीच आहेत. परंतु यावरून असे मात्र म्हणता येत नाही की, व्यापारातील चढउताराचे आवर्तही नष्ट झालेले आहे. आजही भांडवल गुंतवणुकीत फार मोठे चढउतार होत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येऊ शकेल. मात्र या चढउताराच्या पातळीची रेषा आणि सहाजिकच त्या चढउताराच्या काळातील रोजगाराची सरासरी पातळी बरीच वरची असेल. तरी देखील माझा असा विश्वास आहे की, चढउताराचे हे आवर्त त्याच्या अभिजात स्वरूपात म्हणजे तीव्र आणि लयबद्ध स्वरूपात ब्रिटनमध्ये पुन्हा कधीच अवतरणार नाही. चढउताराचे हे चक्र पुन्हा डोके वर काढण्याची चिन्हे दिसू लागताच त्याचे निर्मूलन करण्याइतकी सरकारे आता समर्थ व जागरूक आहेत. इतकेच नव्हे तर, भांडवल गुंतवणुकीचे स्वरूप आता अधिकाधिक स्थिर स्वरूपाकडे झुकू लागले आहे. भांडवली खर्चापैकी निम्म्याहून अधिक खर्च आता सार्वजनिक संस्थांच्यामार्फत (मध्यवर्ती आणि स्थानिक सरकारे व राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांची महामंडळे) होत असतो. आणि अशा मोठ्या घटकाच्या या बाब-तीतील वर्तनासंबंधी अंदाज वर्तवणे काही वेळा बरेचसे अशक्य होऊन बसत असले तरी नफ्यासंबंधीच्या अपेक्षात जे अल्पकालीन चक्राकार बदल होतात त्याबरहुकूम या घटकात निदान तसे चढउतार तरी घडून येत नाहीत. खाजगी क्षेत्रातील परि-स्थिती देखील हळू हळू बदलत आहे. भांडवल गुंतवणुकीतील चढउताराचे प्रचंड

चक्र फिरू लागते त्यावेळी असे गृहीत धरलेले असते की, भांडवल गुंतवणुकीसंबंधीच्या बहुतेक सर्व योजना सहजासहजी आणि आगदी अल्पावधीच्या सूचनेने एकतर स्थगित ठेवणे आणि पुन्हा सुरू करणे, त्यात काटछुट करणे किंवा त्यात वाढ करणे शक्य असते. आणि दुसरे म्हणजे, भांडवल गुंतवणुकीसंबंधीचे निर्णय हे अल्पकालीन आवर्तासंबंधीच्या अपेक्षांच्या अनुशंगाने घेतले जात असतात.

परंतु यापैकी कोणतीच गोष्ट आता पूर्वीइतकी खरी राहिलेली नाही. प्रत्यक्षतः भांडवल गुंतवणूक ही अधिकाधिक प्रमाणात विस्तारविषयक मोठमोठ्या योजनांचा एक भाग बनू लागली आहे. पुढील अनेक वर्षांसाठी आखण्यात येणारे लांबवरचे नियोजन आणि यंत्रसामुग्री, आवजारे, कारखान्याची इमारत आणि संशोधन यासाठी करावा लागणारा व एकमेकांशी संबंधित असलेला खर्च या साऱ्याचा परिणाम भांडवल गुंतवणुकीवर होत असतो. अशा योजना अनेकदा इतक्या अविभाज्य असतात की, त्यात सहजासहजी काटछूट करता येत नाही. त्याचप्रमाणे त्या इतक्या मोठ्या असतात की, त्या सोडूनही देता येत नाहीत. आणि त्या कार्यवाहीत आणण्याला इतका दीर्घ काळ लागणारा असतो की, अल्पावधीच्या सूचनेने त्यांची कार्यवाही बंदही करून टाकता येत नाही. त्याचप्रमाणे भांडवल गुंतवणुकीसंबंधीचे निर्णय हे भौतिक बाबींमुळेच केवळ नव्हे तर, बाजारपेठांतील अल्पकालीन चढउतारापेक्षा दीर्घकालीन विक्रीकडे अधिक लक्ष पुरविण्याकडे आता धंदेवाल्यांचा मानसिक कल होऊ लागला असल्यामुळेही, अधिकाधिक व्यापक स्वरूप धारण करू लागले आहेत. शिवाय, अनेक धंद्यातील भांडवल गुंतवणुकीचे प्रमाण हे संशोधन आणि तंत्रविज्ञानाच्या वेगाबरोबर जवळजवळ फरपटत जात असते हेही याचे एक कारण आहे. अशा तऱ्हेने बऱ्याच दूरवरच्या काळासंबंधी काही अपेक्षा बांधून त्या आधारावर आखण्यात आलेले दीर्घकालीन भांडवली अर्थसंकल्प ही हळूहळू नित्याची बाब होऊ लागली आहे. आणि यामुळे १९५५ साली घडून आले तसे तीव्र चढउतार पुन्हा पुन्हा होणारच नाही असे जरी निश्चितपणे सांगता येत नसले तरीदेखील व्यापारातील अगदी अव्वल दर्जाचे तेजी–मंदीचे आवर्त पुन्हा उद्‌भवण्याचा संभव बराचसा कमी झाला आहे.

स्थैर्यालाही आता याच्या उलट बाजूने म्हणजे बचतीत होणाऱ्या चढउतारामुळे ठराविक मुदतीनंतर येणाऱ्या चलनवाढीच्या अरिष्टामुळे जवळजवळ तितकाच धोका निर्माण झाला आहे. चलनवाढ आणि संपूर्ण रोजगाराची परिस्थिती यामध्ये फारच थोडे अंतर आहे आणि स्वतंत्र कामगार संघटना, मतदारांना वारंवार केली जाणारी आवाहने आणि खर्चांचे वाढते प्रमाण या गोष्टी असलेल्या लोकशाही देशात हे अंतर ओलांडले जाण्याचा सतत धोका असतो. भांडवल गुंतवणुकीतील बदलाप्रमाणेच बचत आणि खर्च यात अचानक होणारा बदलही त्याला तितकाच कारणीभूत असतो. एका बाजूने सरकारमुळे देखील हे घडून येऊ शकेल. सरकारमुळे असे

घडून येते म्हणजे सरकारने सादर केलेल्या अत्यंत लोकप्रिय अर्थसंकल्पामुळे निव्वळ सार्वजनिक बचतीत घट होते. आणि दुसऱ्या बाजूला ग्राहक जे निर्णय घेतात तेही त्याला कारणीभूत होतात. वाढत्या उपभोगाला टिकावू वस्तूंवर अधिकाधिक प्रमाणात केल्या जाणाऱ्या खर्चाचे स्वरूप प्राप्त होत असल्याने आणि तशा वस्तूंची खरेदी एक तर स्थगित करता येत असल्याने किंवा खरेदीचा वेग वाढवता येत असल्याने दुसरी शक्यताच अधिक संभवते. खर्चातील या वाढत्या अवजडपणामुळे व्यक्तिगत बचत आणि खर्च यात चढउतार होणे हे जवळजवळ अपरिहार्य होऊन बसते.

ज्या ज्या वेळी बचतीत एकाएकी वाढ होते आणि त्या बाबतची सीमारेषा ओलांडली जाते त्या त्या वेळी लहान प्रमाणावरील अरिष्ट उद्भवते. बहुधा त्याचे पर्यवसान गंगाजळीला ओहोटी लागून राखीव साठ्याला गळती लागण्यात होते व माल पुरवण्याच्या तारखा तर त्यामुळे निश्चितच पुढे ढकलल्या जातात. आणि एकूण मागणीपैकी हमखास आपल्या ताब्यात असलेली बाब जी भांडवली गुंतवणूक तिच्यात कपात करावी अशी प्रतिक्रिया बहुतेक सर्व सरकारांची झालेली दिसून येते. अशा तऱ्हेने नियोजित अर्थव्यवस्था असूनही भांडवल गुंतवणुकीतील दुसरे दुष्ट चक्र पुन्हा उद्भवावे (अर्थात ते अगदी अनियमित असले तरी) हे किती विचित्र ! मागणीत अचानक वाढ झाली म्हणजे सरकारकडून त्या मागणीला जो घावरत घाबरत प्रतिसाद दिला जातो त्यामुळे असे घडून येते.

भांडवल गुंतवणुकीत कपात करण्याचे मधून मधून केले जाणारे प्रयत्न आताच दाखवून दिल्याप्रमाणे भांडवलासंबंधीच्या योजना त्यांच्या दूरगामी स्वरूपामुळे केवळ काही प्रमाणातच यशस्वी होत असल्या तरी विकासाच्या दृष्टीने असे प्रयत्न होणे निश्चितच चांगले नाही. अशा प्रयत्नांमुळे भांडवल गुंतवणुकीच्या ताबडतोबीच्या प्रक्रियेत अडथळे येतात आणि ते लांबणीवर पडतात इतकेच नव्हे तर, त्यामुळे असा एक मानसिक परिणाम घडून येण्याचा संभव असतो की, तात्कालिक अरिष्ट निघून गेल्यावरही पुढील विकासाची गती त्यामुळे मंदावते. वर दाखवून दिल्याप्रमाणे झपाट्याने विकास होण्यासाठी विकासाची विद्यमान गती टिकवून ठेवली जाईल असा विश्वास निर्माण व्हावा लागतो. त्याचप्रमाणे भांडवल गुंतवणूक करणे सर्वस्वी योग्यच आहे अशी धारणा असलेले वातावरण असावे लागते.

काही वेळा असा युक्तिवाद केला जातो की, अधून मधून डोके वर काढणारी मागणीत वाढ होण्याची प्रवृत्ती फारशी धोकादायक ठरत नाही आणि भांडवल गुंतवणूकीत कपात करून मागणी खाली आणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा बचतीच्या राखीव साठ्यातून तो ताण सहन करण्याची मुभा देणे हाच काय तो यावरील शहाणपणाचा मार्ग होय. त्यामुळे उत्पादन क्षमतेत सतत वाढ होत राहून परिस्थिती हळूहळू योग्य ते वळण घेऊ लागेल; आणि अर्थव्यवस्थेला जोराची गती दिल्यामुळे जे प्रचंड फायदे होतात त्यासाठी हुंडणावळीत थोडीशी अस्थिरता

पत्करावी लागली तर ती किंमत फार म्हणता येणार नाही. ही कामगिरी पार पाडण्याच्या दृष्टीने आपले सध्याचे राखीव साठे अत्यंत अपुरे आहेत. तसेच केवळ उत्पादन क्षमतेत वाढ झाली म्हणजे तेवढ्याने चलन वाढ नष्ट होईलच अशी खात्री देता येत नाही या सारखे अत्यंत व्यवहार्य आक्षेप बाजूला सारले तरी मागणीत फुगवटा आल्यामुळे कसलाही धोका निर्माण होत नाही हे कितपत खरे आहे ?

वर नमूद केल्याप्रमाणे अर्थव्यवस्था योग्य त्या पातळीवर ठेवणे हे एकंदरीने उत्पादन क्षमतेच्या दृष्टीने निःसंशय फायदेशीर ठरते इतकेच नव्हे तर त्यामुळे उद्योगात जे एक विश्वासाचे वातावरण निर्माण होते त्यायोगे होणाऱ्या जादा प्रमाणावरील भांडवल गुंतवणूक आणि जलद विकास यासाठी ती पूर्वावश्यक बाब असते. म्हणून मागणीचे प्रमाण हे नेहमी खूप वरचे ठेवले पाहिजे. तथापि अशी एक वेळ येते की, ज्यावेळी सर्वांना सारखा रोजगार उपलब्ध होत राहिल्यामुळे मागणीत निश्चितपणें फाजील वाढ होते आणि चलन फुगवटा घडून येतो. असे झाले म्हणजे फायद्याचा समतोल ढळू लागतो आणि फायद्यापेक्षा तोटेच जास्त होऊ लागतात.

अर्थात हा मुद्दा असा नाही की, ज्याची तत्वतः अचूक व्याख्या करता येईल किंवा व्यवहारात तो दाखवून देता येईल. रोजगार आणि चलनवाढ यांच्यात 'वस्तऱ्याच्या पात्यासारखे' तीक्ष्ण अंतर आहे असे मानल्यामुळे एक भ्रामक समजूत निर्माण होते– जणू काही या दोन्ही कल्पना अगदी निश्चित स्वरूपाच्या असूनही उत्पादन पद्धतीत उत्पादनाच्या बाबतीत कसलाही लवचिकपणा नसतो. त्याचप्रमाणे या नाजूक मुद्याची व्याख्या करता आली आणि प्रत्यक्षात त्याची प्रचीती आली तरी मागणीवर अगदी योग्य वेळी तापस्थायी (थर्मोस्टॅटिक) नियंत्रण ठेवून ती नेमकी आपल्याला हवी त्या पातळीवर ठेवण्याइतके नियोजनाचे तंत्र अचूक आणि परिणत थोडेच झाले आहे ?

तरीदेखील मनावर जे परिणाम घडून येतात त्यांच्या अनुषंगाने काही ठोकळ स्वरूपाचे आडाखे बांधता येतात आणि ते अगदीच निरर्थक नसतात. बहुतेक आयात मालाच्या बाजारपेठेतील विद्यमान किंमतीनुसार पुरवठ्यापेक्षा मागणी अधिक आहे असे दिसून आले तर सर्वांना मिळणाऱ्या रोजगाराचे रूपांतर चलनवाढीत होते असे म्हणणे चुकीचे ठरणार नाही—– म्हणजेच बाजारपेठेत वस्तूंचा पुरवठा करण्याचे लांबणीवर पडत असेल आणि त्यासाठी नंबर लावून ठेवावा लागत असेल तर, आणि किंमती चढया रहाव्यात अशी परिस्थिती असेल आणि कामगारांच्या बाजारपेठेत अर्जदारांपेक्षा नोकऱ्यांच्या जागात झपाट्याने वाढ होत असेल तर असे घडून येईल.

आणि असे घडून आले म्हणजे त्याचे काही प्रतिकूल परिणाम घडून येतात. एक : व्यवस्थापकीय कार्यक्षमता खालावण्याचा संभव असतो. या क्षेत्रात नेहमी

अनुभवास येते त्याप्रमाणे याबाबतही सुवर्णमध्य निघू शकतो. चलन संकोच आणि बेकारी असणे कार्यक्षमतेच्या दृष्टीने निश्चितच विघातक ठरते. त्याची कारणे मागील विभागात स्पष्ट करण्यात आलेलीच आहेत. परंतु दुसऱ्या टोकाला मागणीत झालेल्या कमालीच्या वाढीमुळे किमतीविषयीच्या सर्वसाधारण निष्काळजीपणाची प्रवृत्ती निर्माण होते आणि मालासाठी गिऱ्हाईक नंबर लावून बसलेले असले म्हणजे खर्चात वाढ होत असली तरी विक्रीच्या किमती वाढवून नफ्याचे प्रमाण अगदी सहज कायम टिकवून धरता येते. खर्चाचे प्रमाण किंवा किमती यात प्रत्यक्ष वाढ होत असली तरीही किमतीत पुरवठ्याच्या मानाने भरमसाठ वाढ झाली तर खर्चात कपात करण्यासाठी स्पर्धात्मक दडपण येण्याचा संभव दिसत नाही. ब्रिटिश आणि अमेरिकन धंदेवाल्यांतील महत्त्वाचा मानसशास्त्रीय फरक हा धंद्याच्या विस्तारासंबंधीच्या त्यांच्या दृष्टीकोनातून उद्‌भवलेला असतो असे अनेकदा म्हटले जाते. परंतु आजच्या परिस्थितीत हे खरे असेल असे मला वाटत नाही. त्यापेक्षा आता तो फरक खर्चाच्या जाणीवेमुळे निर्माण होत असावा अशी माझी खात्री आहे. ब्रिटनमधील धंदेवाल्यांपेक्षा अमेरिकेतील धंदेवाले खर्च कमी कसा करता येईल ते अविरतपणे शोधून काढण्यात कितीतरी पटीने अधिक व्यग्र असतात. कमी कामगारात काम होणारी यंत्रसामुग्री, स्वयंचलित यंत्राचा तातडीने करण्यात येणारा उपयोग, कर्मचाऱ्यांच्या व्यवस्थापनेसंबंधीचा अभ्यास आणि शास्त्रज्ञांपासून तो आदानप्रदाना-( इन पुट–आऊट पुट ) संबंधीच्या विशेषज्ञांपर्यंत अनेक क्षेत्रांतील तज्ज्ञांची जवळजवळ सामुदायिक प्रमाणावर केली जाणारी भरती इत्यादी मार्गांचा अमेरिकन धंदेवाले खर्च कमी करण्यासाठी अवलंब करीत असतात. या दोन धंदेवाल्यांमधील फरकाला निश्चितपणे काही ऐतिहासिक कारणेही आहेत. परंतु मंदी नसलेल्या काळातही अमेरिकेत मागणीत फारशी वाढ होत नसल्याने अमेरिकन धंदेवाल्याला विक्रीवरच अधिक लक्ष देणे भाग असते तर ब्रिटनमधील धंदेवाल्याला तसे करावे लागत नाही ( निदान तितक्या मर्यादेपर्यंत तरी ) ही वस्तुस्थितीही याला काही प्रमाणात जबाबदार असते. सर्वांना रोजगार उपलब्ध असेल तर विक्रीबाबतचे काही स्पर्धात्मक दडपण नाहीसे करण्याची व त्यामुळे खर्चावर लक्ष केंद्रित करण्याची गरज भासत नाही. परंतु मागणीत भरमसाठ वाढ झाली तर मात्र तशी गरज भासते.

दुसरा संभवनीय परिणाम असा की, भरमसाठ मागणीमुळे निर्यातीबद्दलची प्रेरणा कमी होण्याचा संभव असतो. युद्धोत्तर काळात संरचनात्मक (Structural) कारणामुळे आर्थिक परिस्थिती अगदी अपवादात्मक बनली होती आणि निर्यातीत इतक्या झपाट्याने आणि इतक्या मोठ्या प्रमाणावर वाढ करणे आवश्यक झाले होते की, त्यामुळे अंतर्गत मागणीतील प्रत्यक्ष फेरबदलामुळे विशेष असा काहीच फरक पडला नसता. त्यावेळी या मुद्द्याची खूप चर्चा झाली असून तो सर्वांच्या

परिचयाचा झालेला आहे. परंतु आज परिस्थिती बदललेली आहे. युद्धकाळातील निर्यातीबाबतची लक्ष्ये जवळजवळ गाठण्यात आली आहेत आणि अगदी वाईट वर्षांतही वाजवी शिलकीच्या मानाने परकीय शिलकीतील तफावत अगदीच थोडी आहे– पेचप्रसंगाच्या वर्षातदेखील निर्यातीतील वाढ ७० टक्क्यांऐवजी फक्त दहा टक्क्यांनीच हवी आहे. अशा तऱ्हेने निर्यातीच्या एकूण आकारात त्यामानाने जो थोडासा फरक घडून येतो त्यामुळेच पुरेशी शिल्लक आणि धोकादायक तूट यामध्ये तफावत दिसून येते.

आता अंतर्गत मागणीत जे चढउतार होतात त्याची निर्यातीच्या आकारमानावर घडून येणारी प्रतिक्रिया तीव्र स्वरूपाची खासच नसते. कारखानदारांनी निर्यातीच्या बाबतीत असे काही संबंध प्रस्थापित करून ठेवलेले असतात आणि आपल्या मालाच्या विक्रीची अशी काही संघटना उभारून ठेवलेली असते की, विक्री आणि उत्पादन याविषयी त्यांचे संपूर्ण धोरण एकंदरीने वाढत्या निर्यात विक्रीच्या आकारमानावर अवलंबून असणारे आणि त्याच्याशी मिळतेजुळते असे आखलेले असते. परंतु अगदी तळाला देशांतर्गत मागणीच्या पातळीला निश्चितच महत्त्वाचे स्थान असते. कारखाने आपल्या सर्वच्या सर्व उत्पादनक्षमतेचा उपयोग करून घेत असतील आणि त्याचबरोबर देशांत माल नेण्यासाठी ग्राहकांच्या लांबच लांब रांगा लागलेल्या असतील तर, आपली निर्यात वाढविण्याची ते तरी कशाला यातायात करीत बसतील ? आणि विशेषत: जेथे खूप स्पर्धा आहे अशा बाजारपेठांतील निर्यातीत घट झाली तर परदेशांतील विक्रीचे आकारमान टिकवून धरण्यासाठी आटापिटा करण्याऐवजी आपल्या देशांतील विक्रीतच त्यांनी तो माल सामावून का घेऊ नये ? उदाहरणार्थ जर्मनी आणि अमेरिका या देशांतील मोटार कारखानदारांना परदेशांतील विक्रीसाठी जे एवढे प्रयत्न करावे लागले त्याचा त्यांच्या देशांतील बाजारपेठांच्या जादा स्पर्धात्मक स्वरूपाशी कसलाही संबंध नव्हता असे मानणे कठीण आहे. कारण परदेशांतील विक्रीस मंदी आली तरी ती देशांतील विक्रीने भरून काढता येईल अशी परिस्थिती नव्हती.

निर्यातीबाबत वाटणाऱ्या उत्साहावर परिणाम घडून आला नाही तरी गिऱ्हाईकांना माल पोहोचता करण्यास विलंब होऊ लागला तर, त्यामुळे देखील परदेशी गिऱ्हाईक नाराज होऊन दुसऱ्या कारखानदारांकडे वळते आणि त्यामुळे निर्यातीच्या ऑर्डरींमध्ये घट होऊ लागते. सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या अर्थव्यवस्थेत भांडवली मालाचा सगळाच्यासगळा पुरवठा ताबडतोबीने करण्याची तयारी बहुधा कधीच दाखविता येत नाही. (गुंतवणुकीच्या) मालाच्या क्षेत्रात अशा परिस्थितीत पुरवठ्यापेक्षा मागणी नेहमी जास्त राहते. पण मागणीचे हे वाढलेले प्रमाण जास्त तरी असेल किंवा कमी तरी असेल आणि मागणीत कमालीची वाढ झाली तर, त्यामुळे निर्यातीवर होणारे परिणाम अतिशय गंभीर स्वरूपाचेही होऊ शकतील.

वस्तुत: अलिकडच्या काळातील निर्यातीच्या एकूण आकारमानात (तौलनिक दृष्टया) जे बदल घडून आले त्याची जबाबदारी किंमत किंवा मालाचा दर्जा यातील तौलनिक बदलापेक्षाही विक्रीसाठी करण्यात आलेले प्रयत्न आणि माल पोहोचता करण्याचे वायदे यावरच मुख्यत: पडते आणि या दोहोंवरही देशांतर्गत मागणीत वाढ होते किंवा नाही याचा अवश्यमेव परिणाम घडून येत असतो.

तिसरा एक परिणाम घडून येण्याचा संभव असतो तो असा की, कामगारांच्या बाजारपेठेंत जर कामगारांना अधिक मागणी असेल तर त्यामुळे देखील किंमतींवर अत्यंत धोकादायक परिणाम घडून येऊ शकेल. कारण त्यामुळे वेतन आणि किंमत यांचे घातचक्र सुरू होते. एकविसाव्या प्रकरणात यासंबंधी सविस्तर उहापोह करण्यात आला असून असे दाखवून देण्यात आले आहे की, वेतनाच्या प्रमाणात होणारी वाढ लोक अनेकदा समाजात तितकी अनिष्ट किंवा धोकादायकही कदाचित ठरणार नाही. तसेच मागणीत होणाऱ्या वाढीव्यतिरिक्त वेतन वाढीला इतरही कारणे असू शकतील. तरीदेखील मागणीतील फुगवटयामुळे धोकादायक ठरू शकेल इतक्या प्रमाणावरील वेतनवाढ सहज घडून येऊ शकेल हे अगदी उघड आहे.

गतेतिहासाच्या दृष्टीने पहाता, युद्धोतरकालीन अडचणीचे मुख्य कारण चलनफुगवटा हे होते किंवा अधिक चलन फुगाव झाला नसता तर दुसरे महायुद्ध आणि कोरियन लढाई यामुळे रचनात्मक स्वरूपाच्या ज्या अपवादात्मक समस्या निर्माण झाल्या त्यावर काही विशेष परिणाम घडून आला असता असा अर्थ यापैकी कशातूनच ध्वनित होत नाही. त्याचप्रमाणे याचा अर्थ असाही नव्हे की, केवळ चलनफुगाव टाळणे आर्थिक विकासाच्या दृष्टीने पुरेसे आहे. वरील सर्व विवेचनाचा अर्थ एवढाच की, नेहमीच्या शांततेच्या काळात विकास आणि कार्यक्षमता यांच्यासाठी इतर गोष्टींबरोबरच ठराविक मुदतीने येणारे जादा मागणीचे गंभीर स्वरूपाचे अरिष्ट टाळणेही अत्यावश्यक असते. (तथापी सौम्य स्वरूपाची कायमची चलनवाढ सर्वांना ज्यावेळी रोजगार उपलब्ध असतो त्यावेळी अटळ असण्याचाही संभव असेल.)

अशा तऱ्हेने स्थैर्य आणि विकास या दोहोंचाही विचार करताना बचतीचे प्रधान स्थान, आणि चलनफुगवटयाचे अरिष्ट टाळण्याइतकी स्थिर आणि भांडवल निर्मितीचे इच्छित प्रमाण बऱ्याच कालपर्यंत टिकून राहू शकण्याइतक्या मोठ्या प्रमाणावर एकूण बचत प्राप्त करून घेण्याबाबतची सरकारची जबाबदारी याकडे लक्ष वेधले जाते.

## ३. बचतीचा पुरवठा : (अ) व्यक्तिगत

तीन प्रकारे बचत होत असते : व्यक्तिगत, कंपन्यांमार्फत आणि सार्वजनिक संस्थांच्याद्वारा.

निरनिराळया व्यक्तींची निव्वळ व्यक्तिगत शिल्लक ही आता (विम्याचे हप्ते, सेवानिवृत्ती वेतन आणि घरबांधणी संस्थांचे हप्ते यांसारख्या) करारामुळे होणारी बचत आणि स्वतःच्या धंद्यातील शिल्लक यांची मिळून बनत असते. युद्धानंतर अनेक वर्षेपर्यंत अगदी खालच्या पातळीवर असलेली ही शिल्लक आता बऱ्याच प्रमाणात सावरली आहे. १९५० साली देखील १०० दशलक्ष पौंडाहून कमी असलेली अशा प्रकारची शिल्लक गेल्या काही वर्षात जवळजवळ ९०० दशलक्ष पौंडापर्यंत गेली आहे. हा बदल घडून येण्याची अनेक सामान्य कारणे दाखवता येण्यासारखी असली (युद्धानंतर व्यक्तिगत गुंतवणुकीचा नव्याने आढावा घेण्याचे काम पूर्ण होणे इ.) तरी त्याबाबत निश्चिती देता येणार नाही. कारण बऱ्याच मोठ्या प्रमाणावरील विस्तार हे अशा बचतीच्या विभागणीचे स्वरूप असते. बहुसंख्य कुटुंबे फारच थोडी रक्कम शिल्लक टाकतात किंवा अजिबातच टाकत नाहीत आणि फार मोठाल्या रकमा शिल्लक टाकणाऱ्या किंवा न टाकणाऱ्या अल्पसंख्य कुटुंबांकडून जे निर्णय घेतले जातात त्यामुळेच एकूण शिलकीत फार मोठे बदल घडून येऊ शकतात.

परंतु कोणत्याही परिस्थितीत, अलीकडे झालेली सुधारणा लक्षात घेऊनही व्यक्तिगत बचतीला एका पिढीपूर्वी जे महत्त्वाचे स्थान होते ते आता परत मिळण्याचा संभव नाही. उत्पन्नातील वाढती समानता, लोकसंख्येच्या वाढीला बसलेला आळा व त्यामुळे वृद्धापकाळात कफल्लक बनण्याची पाळी येऊ नये म्हणून आपल्या धंद्याच्या वाढीसाठी स्वतःच्या शिलकीवर विसंबून राहणाऱ्या फार लहान धंदेवाल्यांच्या संख्येत होत असलेली घट आणि सामाजिक सेवा प्राप्त झाल्यामुळे आलेली जादा सुरक्षितता या सर्व परिणामकारक बाबींमुळे यापुढे व्यक्तिगत बचतीच्या एकूण आकारमानात ताबडतोब किंवा झपाट्याने वाढ झालेली आपणास पहावयास मिळेल अशी शक्यता फार कमी आहे. अर्थात उत्पन्नात जसजशी वाढ होत जाईल तसतशी शिलकीतही काही निश्चित वाढ होईल हे खरे; परंतु जोपर्यंत सध्याची सामाजिक आणि आर्थिक व्यवस्था कायम आहे तोपर्यंत बचतीच्या प्रमाणात महत्त्वाचा फरक घडून येईल अशी आशा करावयास नको.

मग ही परिस्थिती सुधारण्यासाठी काही उपाय योजण्याची आवश्यकता आहे की नाही ? अर्थात अनेकदा शहरातून उठविला जाणारा टीकेचा काहीसा गूढ आवाज किंवा उजव्यांच्या राजकीय हक्कांसंबंधीच्या मागण्या यांच्या आहारी जाता कामा नये. त्याचप्रमाणे इतर स्वरूपाच्या बचतीपेक्षा व्यक्तिगत बचत ही या ना त्या प्रकारे अधिक उपयुक्त आणि उत्पादक असते असे सूचवू पहाणारांच्याही नादी लागता कामा नये. सहाजिकच वस्तुस्थिती अशी नाही– विशेषतः बचत ही इतक्या मोठ्या प्रमाणावर प्रत्यक्षात सावधगिरी बाळगणा-या संस्थांच्यामार्फत गुंतविली जात असल्याने असे होत नाही. त्याचप्रमाणे कमी प्रमाणावरील व्यक्तिगत बचत हे केवळ ब्रिटनचेच वैशिष्टच आहे असेही आपण समजता कामा नये;

अमेरिकेतील व्यक्तिगत उत्पन्नाचे प्रमाण लक्षात घेता, व्यक्तिगत गुंतवणुकीसाठी केलेला खर्च वजा जाता तेथील व्यक्तिगत शिल्लक ब्रिटनपेक्षा फारशी जास्त असल्याचे आढळणार नाही.

सहाजिकच व्यक्तिगत बचतीत फार मोठी वाढ घडवून आणण्याचा सर्वात प्रभावी मार्ग जर कोणता असेल तर, तो म्हणजे निव्वळ उत्पन्नातील असमानतेत वाढ घडवून आणणे. प्रत्यक्ष करात सूट देऊन व्यक्तिगत बचतीला उत्तेजन देण्याचे हुजूर पक्षाचे जे धोरण आहे त्यामागे नेमका हाच उद्देश आहे आणि त्याची अपरिहार्य परिणतीही असमानता वाढण्यात होणार. हे धोरण परिणामकारक होण्यासाठी सरकारी खर्चात (म्हणजेच प्रत्यक्षात सामाजिक सेवांवर केल्या जाणाऱ्या खर्चात) तितकीच कपात करावी लागेल आणि करात सूट मिळाली तर त्यातला काही भाग व्यक्तिगत बचतीसाठी बाजूला काढू शकतील अशा वर्गावर, म्हणजे श्रीमंतावरील करात सूट देण्याच्या बाबतीत भर द्यावा लागेल. परंतु हा तोडगा समाजवाद्यांना मान्य होण्यासारखा नाही. अर्थात समतेमुळे व्यक्तिगत बचतीसंबंधीची समस्या उभी राहते. परंतु त्यामुळे समता डावलता येणार नाही. निराशेने मूळ प्रश्नाकडे पाठ न फिरवता तो सोडवण्याचा मार्ग आपल्याला शोधून काढावयाचा आहे.

उत्पन्नातील समानतेला धक्का लागू न देता हे घडवून आणण्याचा हमखास खात्रीचा मार्ग म्हणजे सावधगीरीचे उपाय योजण्याची प्रवृत्ती. हा जो व्यक्तिगत बचतीमागील सर्वात प्रधान उद्देश, त्याला प्रोत्साहन देणे हा होय. सामाजिक सुरक्षितेमुळे हा हेतू तात्पुरता काहीसा मागे पडत असला तरी तो पुन्हा पहिल्या इतकाच प्रभावी ठरू पहात असल्याची चिन्हे दिसत आहेत. हातपाय चालू असतानाच्या राहणीमानात जी वाढ होते त्यामुळे वृद्धापकाळासंबंधीच्या आकांक्षा देखील उंचावतात. आणि आणखी कांहीतरी तरतूद करून शासनाकडून मिळणाऱ्या वेतनात भर टाकावी असे आधिकाधिक प्रमाणात वाटू लागते. खाजगी स्वरूपाच्या अतिवयस्कता योजना का लागू केल्या जातात त्याचा उलगडा यावरून होऊ शकतो. व्यक्ती व्यक्तीमधील समानतेच्या कारणास्तव राष्ट्रीय अतिवयस्कता योजना लागू करण्यात यावी अशी सूचना यापूर्वीच्या प्रकरणात आधीच करण्यात आली आहे. विमा शास्त्राच्या आधारे ही योजना अमलात आणली गेली तर, सुरुवातीची काही वर्षे या योजनेनुसार द्याव्या लागणाऱ्या सवलतींसाठी जो खर्च येईल त्या मानाने उत्पन्नातील शिलकीची रक्कम खूप मोठी असेल. आणि या योजनेत सहभागी होणारे लोक जसजसे अधिकाधिक प्रमाणात निवृत्तीच्या घरात पोहचतील तसतशी ही शिल्लक हळुहळु कमी होत जाईल हे खरे असले तरी निदान सुमारे तीस वर्षेपर्यंत तरी ती संपूर्णतया नाहीशी होणार नाही आणि तेवढ्या काळात या योजनेचा हेतू पूर्णांशाने तडीस गेलेला असेल. परंतु जास्तीतजास्त शिल्लक पडणारा सुरवातीचा काळ आणि आधीच्या प्रकरणांतून दाखवून दिलेला एकदाच करावयाच्या

गुंतवणुकीची जास्तीत जास्त जरूरी असलेला काळ एकच असेल. त्यामुळे सामाजिक न्याय आणि राष्ट्राच्या दृष्टीने आर्थिक फायदा यांची सांगड घालण्याची महत्वाची संधी आपल्याला प्राप्त होते.

खाजगीरित्या घर खरेदीसाठी बचत करण्यास प्रोत्साहन मिळेल असे प्रयत्न आपण करावेत असे काही वेळा सुचविण्यात येते. (दहा टक्क्यांहून अधिक कुटुंबे घराच्या तारणावर घेतलेल्या कर्जाचे हप्ते फेडण्यासाठी बचत करीतच असतात.) परंतु मोठ्या प्रमाणावर छोट्या निर्वेध घराच्या मालकीबाबत सामाजिक आणि आर्थिक अशा दोन्ही स्वरूपाच्या काही अडचणी निर्माण होतात. छोटे खाजगी मालक त्यांच्या जिंदगीच्या घसाऱ्याच्या प्रमाणात अनेकदा पुरेशी शिल्लक टाकू शकत नाहीत इतकेच नव्हे तर, कुटुंबांतील मुलांच्यासाठी जास्तीतजास्त पैसा खर्चावा लागतो आणि पालकांचे उत्पन्न सर्वोच्च पातळीला पोहोचलेले नसते अशा वेळीच तारणावरील कर्जाचे जास्तीतजास्त हप्ते भरावे लागतात. त्यामुळे या क्षेत्रातील बहुतेक तज्ञ तारणाच्या स्वरूपातील बचतीत फार मोठी वाढ करण्याला तितकेसे अनुकूल नसतात.

काही विशिष्ट राष्ट्रीय बचत रोख्यांवर जादा दराने व्याज देणे, पैशाचे मूल्य घसरले तरी मुद्दल कायम राखले जाईल अशी हमी देणे, किंवा सर्वांत प्रभावी म्हणजे शिल्लक टाकलेल्या उत्पन्नाचा काही भाग प्राप्तीकरांतून मुक्त करणे या सारख्या मार्गांनी बिगरसंस्थात्मक व्यक्तिगत बचतीला उत्तेजन देता येणे शक्य आहे. यापैकी सगळचात शेवटचा मार्ग सर्वांत प्रभावी आहे. याविषयी जर्मनीतील अलिकडेच आलेल्या अनुभवावरून कसलीही शंका उरलेली नाही. करातील सवलत एका मर्यादेपलीकडे दिली गेली तर, एकतर शिल्लक टाकणारे आणि न टाकणारे यामध्ये कर आकारणीच्या बाबतीत भेदाभेद केला जात आहे अशी बहुतेक लोकांची समजूत होऊन बसेल आणि दुसरे म्हणजे श्रीमंतांना त्यापासून अवास्तव फायदा मिळू लागेल अशा काही अडचणी त्यात प्रथमदर्शनीच निर्माण होतात.

तथापी आपली आर्थिक परिस्थिती अता अशी आहे की, बचतीवर सर्वसाधारण करात काही सूट दिली तर ते समर्थनीय ठरेल. बचतरोख्यांवर जे व्याज जमा होते ते करमुक्त करण्यासारख्या सध्याच्या व्याजाबाबतच्या सवलतींपेक्षा ही सूट जास्त असली पाहिजे (अर्थात एकाद्या करांत सूट देण्याच्या दृष्टीने एखाद्या व्यक्तीजवळ असलेल्या रकमेची कमाल मर्यादा ठरविण्यात आली पाहिजे). अशा तऱ्हेने या सवलतीची व्याप्ती प्रत्यक्ष भांडवलापर्यंत वाढवीता येईल; म्हणजेच खास स्वरूपाच्या बचतरोख्यांच्या खरेदीसाठी उपयोगात आणल्या गेलेल्या चालू उत्पन्नाचा विशिष्ट कमालमर्यादेपर्यंतचा काही भाग प्राप्तीकरातून मुक्त करता येईल. अशा तऱ्हेने शिल्लक टाकलेल्या रकमा साचत जातील; सध्याप्रमाणेच त्यावरील व्याज काढून घेतले जाईपर्यंत त्या करमुक्त राहतील. परंतु व्याज काढून घेतल्यानंतर मात्र करदात्याच्या चालू मुदतीतील करपात्र उत्पन्नात ते समाविष्ट केले जाईल. आपल्या

आर्थिक व्यवहारांना सतत चलनवाढीची झळ लागणार असेल आणि त्यामुळे आर्थिक क्षेत्रात कायम गोंधळ माजून राहणार असेल तर मजूर पक्षाने अशा प्रकारच्या सुधारणांचा गंभीरपणे विचार केला पाहिजे. ज्या मर्यादेपर्यंत त्या परिणामकारक ठरतील तितक्या मर्यादेपर्यंत त्या अंमलात आणल्या गेल्या तर, त्यामुळे कामगार वर्गात मालमत्ता धारण करण्याच्या प्रवृत्तीला उत्तेजन देण्याचा आणखी एक फायदा पदरात पडू शकेल.

## ४. बचतीचा पुरवठा : (ब) राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग

परंतु व्यक्तिगत बचतीत घट झाली तर, स्वत: जादा बचत करून ते नुकसान भरून काढण्याची संपूर्ण जबाबदारी कोणत्याही परिस्थितीत सरकारवरच राहते. सार्वजनिक बचत मुख्यत: खालील दोन क्षेत्रांतून उपलब्ध होते किंवा तशी शक्यता असते. ती क्षेत्रे म्हणजे राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग आणि अर्थसंकल्प. यापैकी पहिल्या क्षेत्राकडून बचतीला अद्याप कसलाही हातभार लागलेला नाही. एकामागोमाग अधिकारावर येणाऱ्या सरकारांनी आखलेले किंमतविषयक धोरणच याला जबाबदार आहे. राष्ट्रीयीकरणासंबंधीच्या कायद्यान्वये राष्ट्रीयीकरण करण्यात आलेल्या उद्योगांच्या संचालक मंडळास आवक आणि खर्च यांच्यांत बरोबर समतोल राखण्याची दृष्टी ठेवून सरासरी वर्षातील उत्पादनाचा खर्च ठरविण्याचे अधिकार बहाल करण्यात आले आहेत. या धोरणामुळे काही फार मोठे तोटे होतात. राष्ट्रीय विकासाच्या गतीवरही त्याची प्रतिक्रिया घडून येण्याचा संभव आहे. खुद्द उद्योगासंबंधी बोलावयाचे तर, पुरेशी शिल्लक पडली नाही तर त्यामुळे कायमची आर्थिक टंचाई निर्माण होते. त्यामुळे मग अनेकदा तुटपुंजे वेतन द्यावे लागते. आणि त्यामागोमाग कार्यक्षमता खाली येते. तसेच संशोधन आणि प्रयोग यांनाही फार मोठ्या प्रमाणावर मुरड घातली जाते आणि धंदा नुकसानीत येईल या भयाने एकंदर वातावरण अत्यंत सावधगिरीचे बनून जाते. अशा तऱ्हेने संशोधनावर फार मोठा खर्च करण्याची किंवा धंद्यातील धोका विभागण्याची शक्यता हे जे मोठ्या किंवा ठोक प्रमाणावरील कारखानदारीचे मुख्य फायदे तेच बऱ्याचअंशी गमावून बसण्याची वेळ येते.

या धोरणाचे पर्यवसान दुर्मिळ साधनसामुग्री अकार्यक्षमतेने वापरली जाण्यात होते. सार्वजनिक क्षेत्रांत मुख्यत: संबंध अर्थव्यवस्थेच्या दृष्टीने अत्यंत मूलभूत असलेल्या मालाचे आणि सेवांचे उत्पादन होते. आणि गेली काही वर्षे त्यांपैकी बऱ्याच गोष्टींचा तुटवडा भासत आहे. अशा प्रकारच्या वस्तू, उत्पादनखर्चापेक्षाही कमी किंमतीने जरी नाही तरी उत्पादनखर्च जेमतेम भागेल इतक्या किंमतीत, बाजारपेठेतील परिस्थिती कोठल्याही प्रकारे विचारात न घेता, विकणे हेच समंजसपणाचे धोरण होय अशी मूर्खपणाची कल्पना ब्रिटनमध्येच काय ती टिकून राहिलेली आहे.

अर्थात समाजकल्याणाच्या भूमिकेवरून एकादी वस्तू ( उदा. दूध ) कृत्रिमरित्या कमी केलेल्या किमतीत विकण्याच्या विचाराचे क्वचित समर्थन करता येईलही, परंतु कोळशासारख्या वस्तूंच्या बाबतीत हा न्याय लागू करता येणार नाही. (त्याचप्रमाणे वितरणाच्या किंवा घ्याव्या लागणाऱ्या परिश्रमाच्या कारणास्तवही असा युक्तिवाद करता येणार नाही, कारण चढ्या किमतीचे विभागणीवर होणारे परिणाम कर-आकारणीत किंवा सामाजिक खर्चात बदल करून दूर करून घेता येतात.) आणि कोळशाची किंमत कमी ठेवण्याच्या विरुद्ध केला जाणारा युक्तिवाद खूपच प्रभावी ठरतो. मागणीच्या मानाने कोळशाची इतकी तीव्र टंचाई भासते की, परकीय हुंडणावळीवर त्याचा सतत प्रतिकूल परिणाम घडून येतो. आणि उद्योगाचा झपाट्याने विकास घडवून आणण्याच्या मार्गांत मोठाच अडथळा निर्माण होतो. तरीदेखील त्याची बारेमाप उधळपट्टी केली जाते आणि योग्य उपाय योजले गेले तर त्यात पुष्कळ काटकसर करता येण्यासारखी आहे हे सर्वमान्य आहे. अशा परिस्थितीत टंचाईमुळे येणाऱ्या किमतीचा फायदा न घेता तो कमी किमतीत विकून टाकण्याच्या बाजूने काहीही बोलता येण्यासारखे नाही.

या किंमतविषयक धोरणाचा तावडतोबीचा परिणाम म्हणजे सार्वजनिक क्षेत्रांतील उद्योगांतील बचत (शून्याच्याही खाली गेली नाही तरी) शून्यावर येईल. यावरून असा निष्कर्ष निघतो की, एकूण राष्ट्रीय बचत जरूरीपेक्षा कमी आहे इतकेच नव्हे तर, एकतर खाजगी उद्योगात किंवा जादा करआकारणीच्याद्वारे दाखविण्यात येणाऱ्या अर्थसंकल्पीय शिलकीत ती केन्द्रित झालेली आहे. सार्वजनिक उद्योग बऱ्याचशा प्रमाणात प्रत्यक्ष शिल्लक दाखवू शकले तर ते फार चांगले होईल. कारण त्यामुळे एकूण बचतीत वाढ होईल; अर्थसंकल्पावरचा ताण कमी होईल किंवा त्यामुळे खाजगी क्षेत्रांपेक्षा सार्वजनिक क्षेत्रातून अधिक बचत गोळा होऊ शकते अशी खात्री पटवून देता येईल. खाजगी कंपन्यांप्रमाणेच सार्वजनिक क्षेत्रातील संचालक मंडळांनाही बाजारपेठांची परिस्थिती पाहून त्या अनुशंगाने किंमत ठरविण्याची आणि राखीव साठे करून ठेवण्याची मुभा दिली तरच हे शक्य आहे. अर्थातच हे धोरण लोकप्रिय ठरणार नाही. डाव्या गटांकडून राष्ट्रीयीकरणाचे मुख्य समर्थन असे केले जाते की, अशा उद्योगांतील मालाच्या किमतीत सरासरीपेक्षा नेहमीच कमी वाढ होते. परंतु या धोरणामुळे त्याला बाध येणार असल्यामुळे ते जहाल किंवा डावे धोरण आहे असे मुळीच म्हणता येणार नाही. त्याचप्रमाणे त्यात अनेक व्यवहारिक अडचणीही जाणवतील ( उदा. कामगार संघटनांच्या वेतनविषयक दृष्टीकोनाच्या संदर्भात). परंतु ही सूचना अत्यंत तर्कशुद्ध आहे हे आणखी राष्ट्रीयीकरण करण्याच्या शक्यतेचा विचार करता दिसून येते. जे खाजगी उद्योग सध्याही प्रतिवर्षी मोठमोठ्या रकमा पुन्हा गुंतवणुकीसाठी खर्च करीत आहेत त्यांचे राष्ट्रीयीकरण करावे आणि नंतर त्यांचे किंमतविषयक धोरण असे ठेवावे की,

त्यामुळे त्यांच्या सध्याच्या वार्षिक बचतीचा पार निकाल लागेल असे निश्चितच सुचविण्यात आलेले नाही. कारण त्यामुळे इतकेच होईल की, करवाढ करावी लागेल किंवा होणारा तोटा भरून काढण्यासाठी उतरलेल्या खाजगी क्षेत्रातील उद्योगांना सध्यापेक्षाही जास्त नफा कमवावा लागेल.

## ५. बचतीचा पुरवठा : (क) सरकार

सरकारच्या दृष्टीने पहाता या प्रश्नाच्या आणखी दोन बाजू विचारात घ्याव्या लागतील. एक : दीर्घ मुदतीच्या आर्थिक विकासात सरकारच्या निव्वळ शिलकीमुळे पडणारी भर आणि दोन; स्थैर्य टिकविण्याच्या बाबतीत सरकारच्या आर्थिक धोरणाचे स्थान.

वाजवी प्रमाणावर विकास घडवून आणवायचा असेल तर, सरकारची निव्वळ शिलकीची एक विशिष्ट पातळी टिकवून धरणे आवश्यक ठरेल. राष्ट्रीय उत्पन्नाच्या सध्याच्या पातळीपेक्षा हे प्रमाण फारसे निराळे असणार नाही. परंतु हा विकास खरोखरीच अत्यंत झपाट्याने घडवून आणवायचा असेल तर, राष्ट्रीय उत्पन्नाशी सरकारी बचतीचे सध्या जे प्रमाण आहे त्यात वाढ करावी लागेल. करांच्यामार्फत काढून घेण्यात येणाऱ्या उत्पन्नाच्या प्रमाणात वाढ होऊ द्यावयाची नसेल तर सरकारी खर्चात (प्रत्यक्ष स्वरूपात) राष्ट्रीय उत्पन्नापेक्षा अधिक वेगाने वाढ होऊ देता कामा नये ही त्याची अगदी प्राथमिक आणि मामुली अट राहील. आणि राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानाने खर्च कमी करणे ही त्याची दुसरी अट राहील.

भावी काळातील सरकारी खर्चाच्या संभाव्यतेच्यासंबंधीची चर्चा सहा प्रकरणात केली असून त्या चर्चेचा निष्कर्ष असा होतो की, खर्चात निश्चित वाढ होणे अपरिहार्य आहे. त्याचप्रमाणे राष्ट्रीय उत्पन्नाच्या प्रमाणात जरी खर्चात वाढ करावयाची झाली तरी, त्यासाठी पडणारे दडपण बरेच असते. यापैकी दुसरी गोष्ट घडून येण्यासाठी विकासाच्या सध्याच्या प्रमाणाच्यादृष्टीने देखील प्रतिकूल परिणाम घडवून आणणारी सरकारी बचतीतील घट थोपवून धरावी लागेल व त्यासाठी करपात्र ठरविल्या जाणाऱ्या उत्पन्नाच्या प्रमाणात वाढ करावी लागेल. त्याचप्रमाणे असे घडून आले नाही तरी देखील विकासाचा अधिक जलदवेग सामावून घेण्यासाठी आपल्याला (त्या मानाने) सरकारी बचत अधिक व्हावी असे वाटत असेल तर त्या त्यासाठीही त्याची गरज भासेल.

केवळ राजकीयदृष्ट्या विचार करावयाचा तर, कर आकारणीत खरोखर ठळक वाढ करण्याचा विचार आता बहुधा सोडूनच द्यावा लागेल. जादा खर्चामुळे जे फायदे होतात त्याने समाजवादी स्वाभाविकपणेच इतके भारावून जातात की, ते कर आकारणी किती अप्रिय असते ते कित्येकदा विसरूनच जातात. जनतेकडून सतत वाढत्या प्रमाणावर पैसा उकळण्याची राक्षसी महत्वाकांक्षा बाळगल्याबद्दल

मजूरपक्षाला धन्यवाद दिले–अर्थात तसे करणे अन्यायाचेच होईल–तरी जनमानसातून मात्र तो पक्ष अजिबात उतरेल आणि पुन्हा अधिकारावर येऊन त्या महत्वाकांक्षी योजना प्रत्यक्षात उतरविण्याची संधीच पक्षाला कधी मिळणार नाही.

शिवाय कर आकारणीची विशेषतः प्रत्यक्ष कर आकारणीची पातळी वाढविण्यालाही आर्थिक मर्यादा असते. कोरियन युद्धानंतरच्या १९५१ सालच्या अपवादात्मक परिस्थितीत आपण जवळ जवळ त्या मर्यादेपर्यन्त गेलोही असू. पारंपारिक शहरी किंवा उद्योगपतींच्या चर्चेत यासंबंधी जी मर्यादा गृहित धरलेली असते त्यापेक्षा या मर्यादेची पातळी निश्चित वरची आहे. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, अशा चर्चेच्यावेळी करआकारणीत निव्वळ राष्ट्रीय उत्पन्नाच्या २५ टक्क्याहून अधिक वाढ झाली तर दारुण चलनवाढ होणे अपरिहार्य आहे या कॉलिन क्लार्कसारख्यांच्या मोठ्या अधिकारवाणीने केलेल्या उद्गारांचा आगदी तिखट मीठ लावून उल्लेख केला जातो. उत्पादनाच्या प्रत्यक्ष उलाढालीवरून मात्र असे दिसून आले की, ही भाषा केवळ अतिरंजित होती. परंतु याचा अर्थ असा नव्हे की, राजकीय बाबींकडे दुर्लक्ष करूनही आपल्याला खुशाल हवी तेवढी करवाढ करता येईल. तळावरील उत्पन्नावर बसविण्यात येणाऱ्या प्रत्यक्ष करामुळे एकवेळ अशी येते की प्रोत्साहक योजनांवर त्याचा प्रतिकूल परिणाम घडून येतो. शिवाय बचत वाढविण्याचे एक साधन म्हणून जादा प्रमाणावरील प्रत्यक्ष कर आकारणी अल्पावकाशातच निष्फळ ठरते कारण श्रीमंत वर्ग भांडवली मालमत्ता मोडून आपला खर्च पूर्वीप्रमाणे सहज चालू ठेवू शकतो.

त्याचप्रमाणे मजूर सरकार अप्रत्यक्ष कर किती बसवू शकेल त्यालाही मर्यादा आहे. समाजवादी पूर्वी धरून चालत असत त्याप्रमाणे खरोखरीच ते प्रतिगामी (Regressives) ठरतात म्हणून या मर्यादा पडतात असे नव्हे. खरेदीवरील कराने दाखवून दिल्याप्रमाणे कामगार वर्गाला लागणाऱ्या वस्तूंपेक्षा मध्यम आणि वरिष्ठ वर्गाला लागणाऱ्या वस्तूंवर त्यामानाने जास्त प्रमाणात जकात बसवता येणे आणि तत्त्वतः तरी जकात आकारणी हवी तेवढी चढत्या श्रेणीची ठेवता येणे सहज शक्य आहे हेही यावरून दिसून आले आहे.

काही अंशी ही मर्यादा राजकीय आणि आर्थिक बाबींच्या अनुषंगाने ठरत असते. उभारावयाची एकूण रक्कम मोठी असेल तर सध्या उपभोगाचे जे प्रमाण आहे त्याचा विचार करता मुख्यतः कामगारवर्गाच्या उत्पन्नाला तिची झळ बसणे अपरिहार्य आहे. शिवाय अप्रत्यक्ष करही तितकेच अप्रिय असतात. आणि निवडणुकीवर घडणाऱ्या परिणामामुळे तेही बारगळण्याचा संभव असतो. आणि शेवटचा मुद्दा असा की, आपले निव्वळ प्रत्यक्ष उत्पन्न टिकवून धरण्यासाठी पैशाच्या स्वरूपात मिळणाऱ्या वेतनांत वाढ करून घेण्याचे कामगार वर्गाकडून प्रयत्न होऊ

लागले तर किंमत फुगवटा होण्यास चालना मिळेल किंवा आधीच असलेला चलन-फुगवटा अधिक तीव्र स्वरूप धारण करील.

अर्थात सध्यापेक्षा कर वाढविता येतील. हुजूरपक्षाने काही प्रत्यक्ष करांत केलेली कपात रद्द करता येईल आणि काही अप्रत्यक्ष कर सध्यापेक्षा वाढविता येतील. परंतु याबाबत हालचाल करावयास हवा तेवढा वाव आहे अशी समजूत करून घेणे मात्र चुकीचे ठरेल. विशेषत: देणगीकर, जादा प्रमाणावरील मृत्यूकर, मालमत्तेवरील कर, भांडवली नफ्यावरील कर, आणि अकष्टार्जित उत्पन्नाच्या-बाबतीतील वाढता भेदाभेद यासारख्या वितारणाच्या कारणास्तव सुचविण्यात आलेल्या कोणत्याही करामुळे सरकारच्या निव्वळ बचतीत फारशी भर पडणार नाही. बऱ्याच अंशी ते कर विद्यमान भांडवली जिंदगीतूनच भरले जातात आणि त्यामुळे खाजगी खर्चात फारशी कपात घडून येणार नाहीत (निदान अल्पावकाशात तरी). त्याशिवाय नवे कर बसवीत असतानाच सध्या अस्तित्वात असलेल्यांपैकी काही कर कमी करावेत म्हणून सतत जोराचे दडपण आणले जाते आणि त्यासाठी मोठ्या हिरिरीने युक्तिवाद केला जातो हेही ध्यानात घ्यावयास हवे.

यापासून मजूरपक्षाने काय बोध घ्यावयाचा ते अगदी स्पष्ट आहे. सरकार-कडून वसूल केल्या जाणाऱ्या जादा महसूली रकमेलाही काही मर्यादा असल्याने विकासाला जोरदार गती प्राप्त करून द्यावयाची असेल आणि त्याचबरोबर चलन-वाढ टाळावयाची असेल (निवडणुका जिंकण्याची तर गोष्टच बोलावयास नको) तर, पक्षाने निवडणूक जाहिरनाम्यातून द्यावयाच्या भरमसाठ आश्वासनांच्या बाब-तीत काहीसा संयम बाळगला पाहिजे आणि सरकारी खर्चाच्या बाबतींत कशाला अग्रक्रम द्यावयाचा त्यासंबंधी पक्षाचा दृष्टीकोन स्पष्ट असला पाहिजे. सहा-जिकच उत्पादनांत जसजशी वाढ होत जाईल तसतशी सामाजिक खर्चात वाढ करणे शक्य होईल. आणि पुढील सुमारे दहा वर्षांनंतर सर्वात बिकट अडचणीही संपलेल्या असतील. परंतु निदान भावी मजूर सरकारने तरी या क्षेत्रांत जपून पदार्पण केले पाहिजे.

## ६. चलनविषयक धोरण

स्थैर्य टिकवून धरण्याचे आणि अल्पकालीन मागणीवर नियंत्रण ठेवण्याचे साधन यादृष्टीने अर्थसंकल्पाचा सतत सारख्याच प्रमाणात उपयोग होईल असे नाही. काही बाबतीत अर्थसंकल्प प्रभावी ठरू शकतो तर, इतर काही बाबतीत तो तितका प्रभावी ठरू शकत नाही.

अर्थसंकल्पाच्याद्वारे मागणीत वाढ करून घेणे सोपे आहे. विशेषत: खर्चात वाढ करून किंवा कर कमी करून ग्राहकांकडून येणारी मागणी वाढवून घेणे सहज शक्य आहे. यावरून असा निष्कर्ष निघतो की, अर्थ संकल्पाच्याद्वारा ही कामगिरी

पार पाडून घ्यावयाची असेल तर, त्या अर्थसंकल्पाला मंदीला अटकाव करणाऱ्या अत्यंत सामर्थ्यशाली साधनाचे स्वरूप प्राप्त झाले पाहिजे. पण त्याचबरोबर सर्वांना रोजगार उपलब्ध असताना अर्थसंकल्पाची चुकीची आखणी केली गेली तर, त्यामुळेही चलनवाढीची प्रक्रिया अगदी सहज सुरू होऊ शकते किंवा ती आधिक तीव्रही बनू शकते. अशा तऱ्हेने चलनवाढ विरोधी उपाय म्हणून अर्थसंकल्पाचे नकारात्मक महत्त्व निर्णायक स्वरूपाचे असते.

परंतु आत्ताच दिलेल्या कारणामुळे, खाजगी मागणीला सक्तीने कात्री लावून चलनवाढीच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्याचे अर्थसंकल्पाचे सकारात्मक सामर्थ्य मात्र मर्यादित असते. ग्राहकांच्या मागणीच्या बाबतीत तर हे विधान विशेषच लागू पडते. याची कारणे जशी राजकीय आहेत– निवडणुकीत पराभव पत्करावा लागल्यामुळे किंवा पक्ष सभासदांतील तीव्र मतभेदांमुळे १९५१ प्रमाणे करवाढीची योजना बारगळू शकते– तशीच ती आर्थिकही आहेत. आर्थिक स्वरूपाचे काही कायदे पास झाले तरी ते केवळ पुस्तकांतच राहतात कारण करदाते एक तर खाजगी मालमत्ता विक्रीस काढून किंवा पैशाच्या स्वरूपात मिळणाऱ्या वेतनांत वाढ करून घेऊन ते निष्फळ करून टाकतात. त्यामुळे अर्थमंत्र्याच्या अंदाजाप्रमाणे तत्त्वत: कर आकारणीत कमी जास्त बदल होत असला तरी प्रत्यक्षात मात्र ती स्थिर आहे किंवा तिच्यात कसलाही बदल घडून येत नाही असेच काही वेळा धरून चालावे लागते. सध्याच्या कराच्या प्रमाणात वाढ करण्याच्या दृष्टीने फारसा वाव नसल्यामुळें करआकारणीच्या बाबतीत त्याचे हात बरेच बांधले जातात.

अर्थसंकल्प हे भांडवल गुंतवणुकीचा खर्च कमी करण्याचे एक अत्यंत प्रभावी साधन आहे हे खरे आहे. पुढील प्रकरणांत दाखवून दिल्याप्रमाणे भांडवल गुंतवणुकीवर मिळणारी सूट व नफ्यावरील कर यांची सांगड घातली गेली तर बचत आणि भांडवल गुंतवणूक या दोन्हींचा खाजगी क्षेत्रांतील उद्योगांकडून घेतल्या जाणाऱ्या निर्णयावर परिणाम घडवून आणण्याच्या दृष्टीने उपयोग करून घेता येण्यासारखा आहे. आणि अर्थमंत्र्यांची इच्छा असेल तर त्यांना भांडवल गुंतवणुकीची मागणी एकदम मोठ्या प्रमाणावर कमी करून घेता येते. परंतु मागणी कमी करणे हा अर्थातच अर्थमंत्र्यांचा मुख्य उद्देश नसतो, उलट मोठ्या प्रमाणावरील भांडवल गुंतवणुकीच्या आधारे जलदगतीने विकास होऊ देणे हेच त्यांचे उद्दिष्ट असते. म्हणून भांडवल गुंतवणुकीपेक्षासुद्धा शक्य तो खर्चांवर नियंत्रण ठेवावे लागते. आणि याबाबतीत मात्र स्थैर्य प्राप्त करून देण्याचे एक साधन म्हणून अर्थसंकल्पीय धोरणावर काही निश्चित स्वरूपाच्या मर्यादा पडतात.

याला पर्यायी किंवा पूरक असे साधन म्हणजे चलनविषयक धोरण. युद्धोत्तर काळातील मजूर मंत्रिमंडळांनी या साधनाचा फारसा उपयोग करून घेतला नाही.

कारण ' महाग पैशा 'बाबत पहिल्यापासूनच त्यांच्या मनात खोलवर रुजलेली अढी होती. काही अंशी १९२० सालची सामुदायिक स्वरूपाची बेकारी आणि बँकेच्या व्याजाचा भारी दर यामुळे ती अढी निर्माण झाली होती तर, बाजारपेठांतील अर्थ-व्यवस्था आणि किंमत नियंत्रणाचा वास येणाऱ्या कोणत्याही पद्धतीबद्दलचा संशय, राष्ट्रीय कर्जाच्या बोजा विषयीची चिंता, त्याचप्रमाणे सावकार आणि त्यांचे सर्व मार्ग याबद्दलचा परंपरागत ( आणि प्रतिसाद मिळणारा ) तिरस्कार या बाबीही त्याला काही अंशी कारणीभूत होत्या. शिवाय १९४५ साली अनेकांना अशी भीती वाटत होती की, १९२० सारखीच युद्धोत्तर मंदीची पुन्हा एकदा लाट पसरणार. त्यामुळे चलनात वाढ करून तिला आळा घालावा असे त्यांना वाटत असे.

म्हणून युद्धानंतर काही काळपर्यंत अर्थखात्याने जाणून बुजून पैशाचे मूल्य कमी करून तो सहज उपलब्ध करून देण्याचे धोरण अवलंबिले. आणि हे धोरण सोडून देण्यात आल्यानंतरही जाणीवपूर्वक व्याजाचे दर वाढविण्याचे प्रयत्न कर-ण्यात आले नाहीत. त्याचप्रमाणे विशेष परिणामकारक ठरतील अशा अन्य मार्गांनी एकूण कर्जावर नियंत्रण ठेवण्याचेही प्रयत्न झाले नाहीत. एका मागोमाग एकेका अर्थमंत्र्यांनी बँकांना कर्ज देण्याच्या बाबतीत हात आखडता घेण्याचे आवाहन कर-णारी पत्रे लिहिली आणि बँकांच्या अध्यक्षांनीही शक्य ते सर्व करण्याचे आश्वासन देणारी उत्तरे पाठविली. परंतु सौजन्याने भरलेल्या या पत्रव्यवहाराचा कर्जाच्या आकारमानावर आणि विशेषत: तसलमात म्हणून अगाऊ पैसे देण्यावर कस-लाच दृश्य परिणाम घडून आला नाही. उलट त्यांची घोडदौड झपाट्याने चालूच राहिली.

पैशाचे मूल्य कमी झाल्याने किंवा तो सहजगत्या मिळू लागल्याने काही फायदे जरूर झाले. एकतर त्यामुळे राष्ट्रीय कर्जाचे हप्ते भरण्यासाठी कमी खर्च येऊ लागला. तसाच स्थानिक अधिकाऱ्यांच्या आर्थिक विवंचनाही बऱ्याच कमी झाल्या. शहरांतून व्यक्त होणारी सनातनी मते खोडून काढण्याचा मजूर पक्षाने केलेला प्रयत्न योग्यच होता. कमी व्याज आणि भरपूर कर्ज ही युद्धोत्तर काळांतील अपवादात्मक परिस्थितीतील चलनवाढीची मुख्य कारणे नव्हती. त्यावेळी व्याजाचे दर कितीही व्यवहार्य ठेवले गेले असते तरी चलनवाढीचे दडपण अजिबात कमी झाले नसते. किंवा अधिक सर्वसाधारणपणे बोलावयाचे तर व्याजाच्या दरामुळे बचत आणि भांडवल गुंतवणूक यांचे आपोआप नियंत्रण कधीच होत नसते. केवळ चलनविषयक धोरणाच्या अनुषंगाने केलेल्या चलनवाढीला आळा घालण्याच्या कोणत्याही प्रयत्नामुळे समतोल निर्माण होईल असा आग्रह धरणे हे देखील उचितच होते. व्याजाच्या दरांतील फेरबदलांचा ज्याच्यावर परिणाम घडून येत नाही अशा बचतीला उत्तेजन देऊन नव्हे तर, भांडवल गुंतवणुकीत मोडता घालून हा समतोल साधता येतो.

तथापी चलनवाढीला आळा घालण्याच्या बाबतीत चलनविषयक धोरणालाही काही जबाबदारी उचलता येणे शक्य आहे आणि तशी ती उचलली जावी. सरकारच्या इतर बाबींतील धोरणाच्याविरुद्ध जावून सतत कर्ज वाढत राहील आणि सरकार मागणी कमी करण्यासाठी जास्तीत जास्त प्रयत्न करीत असताना ती सतत वाढत राहील असे काही व्हावयास नको. त्यामुळे अर्थसंकल्पीय शिल्लक आणि प्रत्यक्ष नियंत्रणे यावर जादा ताण मात्र पडतो; आणि मुख्य म्हणजे त्यामुळे करआकारणीत अवास्तव वाढ करणे जरूर होऊन बसते. या करआकारणीत इतर उणीवा तर असतातच पण त्याशिवाय चलनवाढ विरोधी उपाय म्हणून ती स्वतः कशी निष्फळ ठरते त्याची कारणे वर दिलीच आहेत.

कर्जावरील निर्बंध दोन तऱ्हेने विशेष उपयुक्त ठरतात. भांडवलाचा उपयोग काटकसरीने करण्यास त्यामुळे उत्तेजन मिळते आणि चलनवाढ होण्याचा धोका दिसू लागताच भांडवल साठविण्याची प्रेरणा कमी होऊ लागते. युद्धोत्तर काळात आंतरराष्ट्रीय देवीघेवीच्या ताळेबंदाच्या बाबतीत निर्माण झालेल्या पेचप्रसंगाच्या वेळी भांडवलातील फेरबदलाने अनेकदा निर्णायक अशी कामगिरी पार पाडली आहे. आणि सरकारकडून केली जाणारी कान उघाडणी किंवा प्रत्यक्ष नियंत्रण यांचा त्यावर यत्किंचितही परिणाम होत नाही हे विचारात घेता ही बाब बरीच महत्त्वाची ठरते.. दुसरे असे की, कर्जरोख्यांची किंमत आणि व्यक्तिगत किंवा व्यावसायिक कामांसाठी बँकांकडून मिळणारी तसलमात या दोहोंतही घट झाल्यामुळे विशेषतः सुस्थितीत असलेल्या वर्गाला आपल्या खर्चात कपात करण्यास चालना मिळते..

हे इतक्यावरच थांबले तर अत्यंत उपयुक्त ठरू शकेल. पण जर ते यापेक्षा अधिक ताणले गेले तर मात्र स्थिर गुंतवणुकीत कपात करून चलनविषयक धोरणामुळे परिस्थिती सुधारू लागते. दोन दृष्टींने हे आक्षेपार्ह ठरते. एक तर क्रमिक पुस्तकात दिलेल्या सरळ आणि धोपट मार्गाऐवजी ते कसेही वळण घेते. कर्ज काढण्यासाठी व्याजाचा खर्च फार येतो म्हणून भांडवल गुंतवणुकीवर निर्बंध पडतात असे नव्हे. युद्धपूर्व काळात केलेल्या पहाणीवरून असे आंढळून आले आहे की, व्याजाच्या दरात होणाऱ्या बदलांचा उद्योगासंबंधीच्या निर्णयावर फारसा परिणाम घडून येत नाही. कारण भांडवलगुंतवणुकीच्या बहुतेक सर्व योजनांच्या एकूण खर्चावर व्याजाच्या दरातील बदलामुळे घडून येणारा परिणाम अगदीच नगण्य असतो. युद्धपूर्वकाळातील पहाणीच्या या निर्णयास युद्धोत्तर काळातील पहाणीमुळे दुजोराच मिळाला आहे. त्यामुळे गेल्या शंभर वर्षांच्या तुलनेने १९४७ ते १९५१ च्या दरम्यान दीर्घ मुदतीच्या व्याजाच्या दरात झपाट्याने वाढ झाली असली तरी भांडवल गुंतवणुकीवर मात्र त्यामुळे जवळपास अजिबातच परिणाम घडून आला नाही.

या निर्बंधाचा परिणाम मागणीपेक्षाही पुरवठ्यावर अधिक होतो. किंमतवाढ झाल्यामुळे हे निर्बंध लादले जात नाहीत तर बँकांच्या रोकड सुलभतेचे (लिक्विडिटी)

प्रमाण घटले म्हणजे त्या कर्ज देण्याला काकू करू लागतात व त्यामुळे एकूण कर्जाच्या रकमेचा जो संकोच होतो आणि सोन्याच्या तारणाची किंमत कमी झाल्याने बँकांच्या राखीव साठ्यावर जो ताण पडू लागतो त्यामुळे हे निर्बंध अपरिहार्य ठरतात, म्हणजेच किमतीच्या योगाने कर्जपुरवठा नियंत्रित केला जातो असे नाही. त्याचप्रमाणे शहरातून व्यक्त होणाऱ्या सनातनी विचारसरणीनुसार कर्ज पुरवठा बाजारपेठेच्या प्रभावाखाली आणला जातो असेही नाही. अशा निर्बंधांतून इतकेच निष्पन्न होते की, बँका स्वतःच प्रशासकीय निर्णय घेऊन कर्ज पुरवठा अधिक काटेकोरपणे नियंत्रित करतात– म्हणजे प्रत्येक बँकेचे व्यवस्थापक अधिकर्ष किंवा अतिकाढ ( ओव्हर ड्राफ्ट ) कोणाला द्यावयाचा आणि कोणाला द्यावयाचा नाही ते स्वतःहून ठरवत असतात. भांडवल गुंतवणुकीला मुरड घालण्याचा हा मार्ग अत्यंत अनिष्ट आणि अर्धवट स्वरूपाचा म्हटला पाहिजे. भांडवल गुंतवणुकीत थोडी-फार कपात घडवून आणणे आवश्यक आहे असे मानले तरी देखील निर्बंधात्मक चलनविषयक धोरणाचा उपयोग अधिक आवश्यक असलेल्या गुंतवणुकीच्या निवडक क्षेत्रात प्रत्यक्ष विस्तार घडवून आणण्यासाठी केला गेला व त्यायोगे विकासाला अधिक वाव करून दिला तरच हा मार्ग समर्थनीय ठरेल.

चलनविषयक धोरण चढ्या किमतीमुळे लागू पडत नाही तर कर्जाचे जे प्रशासकीय नियंत्रण केले जाते त्यामुळे त्याची अंमलबजावणी होते. ही वस्तुस्थिती असे दर्शविते की, मजूर सरकारला अनुशंगाने येणारे तोटे टाळून हे धोरण अमलात आणणे शक्य आहे आणि सरकारने ते अमलात आणावेही. बँकेच्या व्याजाच्या भारी दरामुळे होणारा भयानक अपव्यय, सोन्याच्या तारणावरील व्याजापायी कराव्या लागणाऱ्या वाढत्या खर्चामुळे अर्थसंकल्प, स्थानिक संस्थांकडून होणारा पत पुरवठा; आंतरराष्ट्रीय देवघेवीचा ताळेबंद यावर (यापैकी आंतरदेशीय पूर्ण ताळेबंदाची बाब ही सर्वात गंभीर स्वरूपाची असून अनेकदा त्याकडे दुर्लक्ष होते) पडणारा जादा ताण हे सर्व तोटे मजूर सरकारने हे धोरण अमलात आणतांना टाळले पाहिजेत. उदाहरणार्थ बँकांची रोकड सुलभता कमी करण्याचे उद्दिष्ट डोळ्यापुढे ठेवून कर्ज पुरविण्याचे व्यवहार केले गेले तरी देखील तसलमात किंवा आगावू दिल्या जाणाऱ्या रकमांत घट होऊ शकेल. किंवा रोकडसुलभतेचे प्रमाण ३०% असावे या परंपरागत संकेताकडे दुर्लक्ष केल्यामुळे हे साध्य होऊ शकले नाही तरी बँक ऑफ इंग्लंडच्या राष्ट्रीयीकरणाच्या कायद्यातील चौथ्या कलमान्वये मिळणाऱ्या अधिकारांचा आधार घेऊन रोकड सुलभतेचे विशिष्ट प्रमाण पाळण्यात आले पाहिजे असा आदेश काढूनही ( स्वीडनमध्ये असे करण्यात आले आहे) हे उद्दिष्ट तडीस नेता येईल. तसेच विविक्षित प्रकारच्या कर्जदारांना देण्यात येणाऱ्या तसलमात रकमांवर निर्बंध घालता येतील किंवा तशाच प्रकारच्या आणखीही कित्येक मार्गांचा अवलंब करता येईल. अशा तऱ्हेने अर्थ खात्याला व्याजाच्या कमी दरामुळे

मिळणारे फायदे व चलनविषयक निर्बंधामुळे होणारे राष्ट्रीय अर्थव्यवस्थेचे फायदे यांची सांगड घालता येईल.

तरी देखील चलनविषयक धोरणाचे स्थान नेहमी मर्यादितच राहते. कारण त्याचा भांडवल गुंतवणुकीवर होणारा अर्धवट परिणाम सोडला तरी विशिष्ट अवस्थेनंतर जवळपास फक्त गुंतवणुकीवरच त्यांचा प्रभाव दिसून येतो. ही वस्तुस्थितीच त्या धोरणातील उणीवा दर्शवते. अर्थात अनपेक्षितपणे आणि एकदम भांडवल गुंतवणुकीत तेजी निर्माण होते अशावेळी भांडवली खर्चात तात्पुरती कपात करण्यासारखी परिस्थिती निर्माण होणे शक्य आहे. परंतु सर्वसाधारणपणे भांडवल गुंतवणुकीपेक्षा खर्चावर निर्बंध घालणेच अधिक पसंत केले पाहिजे. चलनविषयक धोरण करविषयक धोरणावर जितके जास्तप्रमाणात अवलंबून ठेवले जाते तितका राखीव साठा अधिक प्रमाणात जमा होण्याचा संभव असतो.

केवळ चलनविषयक धोरणावरच सर्वस्वी विसंबून रहाणे इतर दृष्टीनेही अनिष्ट असते. प्रत्यक्ष नियंत्रणाचा अवलंब न करता आयातीत कपात घडवून आणणे आणि त्याच बरोबर सर्वांना रोजगार उपलब्ध करून देणे अत्यंत दुरापास्त असते. भांडवल गुंतवणुकीतील कपात अगदी बिनहिशेबी आणि मनमानेल तशी का होते त्याची काही कारणे वर दिलीच आहेत. सामाजिक गुंतवणूक ही मुख्यत: मंत्र्यांच्या आदेशानुसार होत असल्यामुळे त्यात कमालीची घट होण्याचा संभव असतो. त्यामुळेही काही अंशी असे घडून येते. आणि शेवटचा मुद्दा म्हणजे वितरणामुळेही अनेकदा अनिष्ट परिणाम घडून येतात. कारण अर्थसंकल्पाचा उपयोग प्रत्यक्षपणे खर्चावर नियंत्रण घालण्यासाठी करून न घेता तो व्यक्तिगत बचतीला ( तथाकथित ) उत्तेजन देण्यासाठी करून घ्यावयाचा असेल तर त्यासाठी करविषयक सवलती प्राधान्येकरून श्रीमंत वर्गालाच द्याव्या लागतात.

वर नमूद केलेल्या सर्व अडचणी लक्षात घेता मजूर पक्षाचे चलनवाढविरोधी धोरण हे मुख्यत: करविषयक उपायांवर आणि काही काळ खर्चात होणाऱ्या वाढीवर निर्बंध घालण्यावर अवलंबून असले पाहिजे. अर्थात मजूर सरकारच्या धोरणाचे दूरवरचे उद्दिष्ट म्हणून हे योग्य ठरणार नाही. वस्तुत: खर्चात सतत होणाऱ्या वाढीमुळेच जलदगतीने विकास होणे आवश्यक ठरते आणि कोणत्याही परिस्थितीत खर्चात दर वर्षी भरपूर प्रमाणात वाढ होत जाणारच. ठराविक मुदतीने येणाऱ्या चलनवाढीचे अरिष्ट आपण परतवून लावू शकू असा विश्वास असेल तरच (खर्चांच्या) या वाढीच्या प्रमाणावर मधून मधून मर्यादा घालणे समर्थनीय ठरू शकेल. आणि जर आपल्याला तसा विश्वास वाटत असेल तर विकासाचा अधिक जलद वेग टिकवून धरण्यासाठी आणि त्यामुळे दूरवरच्या दृष्टीने खर्चात वाढ होण्याच्या दृष्टीने भांडवल गुंतवणुकीला जास्तीत जास्त संरक्षण देणे हेच योग्य धोरण ठरेल.

याचा अर्थ असा नव्हे की, मजूर सरकारने चलनविषयक धोरणाकडे अजिबात दुर्लक्ष करावे. उलट चलनविषयक धोरणाला उपयुक्त अशी पूरक कामगिरी पार पाडता येण्यासारखी आहे आणि म्हणून मजूर सरकारने १९४५ नंतर जितक्या उत्साहाने त्या धोरणाचा अंगिकार केला होता त्यापेक्षाही अधिक उत्साहाने आता ते धोरण अमलात आणावे. परंतु स्थैर्य प्रस्थापित करण्याचे मुख्य साधन म्हणून त्यावर विसंबून राहणे 'आदर्श' आर्थिक धोरणाच्या दृष्टीने व्यवहारतः विसंगत ठरते. कारण आदर्श आर्थिक धोरण म्हणजे भांडवल गुंतवणुकीत आस्तेकदम विकास घडवून आणण्याची आणि विकासाच्या या प्रमाणाशी मिळती जुळती राहील इतक्या प्रमाणावर शिलकीची पातळी ठेवण्यासाठी योजना आखणे होय. अर्थात आदर्श परिस्थिती पूर्णत्वाने कधीच गाठता येत नाही. परंतु त्यामुळे धोरणाची दिशा तरी निदान निश्चित होऊ शकते.



प्रकरण विसावे

# खाजगी नफ्यासंबंधीची समस्या

## १ नफा : राखीव संचयासाठी अतिरिक्त मूल्य

व्यक्तिगत किंवा सरकारी बचतीच्या क्षेत्रांत काहीही जरी घडून आले तरी एकूण बचतीची ठरलेली पातळी कायम राखण्यासाठी धंद्यातील शिलकीचे प्रमाण मोठे असले पाहिजे आणि त्यासाठी खाजगी, त्याचप्रमाणे सार्वजनिक क्षेत्रांतील धंद्यातून जास्त नफा मिळाला पाहिजे. झपाट्याने विकास होण्यासाठी ही आवश्यक अटच आहे. त्यामुळे शिलकीत भर पडेल, इतकेच नव्हे तर धंद्याचा विस्तार करण्याच्या दृष्टीने ते एक प्रलोभन ठरेल आणि त्यातून नवीन भांडवलाची उभारणीही होऊ शकेल. म्हणून जोपर्यंत बऱ्याच मोठ्या प्रमाणावर खाजगी उद्योगधंदे चालू दिले जातात तोपर्यंत समाजवाद्यांनी खाजगी नफ्याच्या संचयाचे स्वागत करणे तर्कशुद्ध ठरते.

परंतु त्यामुळे फार मोठी राजकीय समस्या उभी राहते. एक तर मोठ्या प्रमाणावरील नफ्याबद्दल लोकांच्या मनात कमालीची अप्रीती असते (विशेषतः मजूर सरकारच्या कारकिर्दीत—कारण त्यांना आळा घालणे हे मजूर सरकारचे कर्तव्य आहे, अशी जनतेची समजूत असते.) येवढेच नव्हे तर कामगार चळवळीच्या सुरुवातीपासूनच नफा हा तिरस्करणीय मानला गेला आहे. आणि अशा परिस्थितीत मजूर सरकारने जाणून बुजून खाजगी नफ्याला उत्तेजन देणे म्हणजे समाजवादाच्या साऱ्या कल्पनांवर बोळा फिरवण्यासारखेच होईल म्हणून नफा हा सध्याच्या समाजवादी लोकशाहीपुढील आर्थिक क्षेत्रातील एक मोठा कूट प्रश्न होऊन बसतो आणि तो सोडविण्याचा प्रयत्न करताना डाव्या गटाच्या भावनांचा तीव्र प्रक्षोभ होणे अपरिहार्य ठरते. मार्क्सच्या मते भांडवलशाहीतील अंतर्विरोध प्रचंड प्रमाणावर नफ्याचा संचय करण्याचा प्रवृत्तीत साठवलेला आहे. परंतु बदलत्या परिस्थितीत अशा संचयाची

जरूर आहे हे न ओळखता त्याचा अव्हेर केला तर त्यामुळे समाजवादी लोकशाहीत अंतर्विरोध निर्माण होईल.

खाजगी नफ्यामुळे साधनसामुग्रीचे असमान वाटप घडून येणे किंवा प्रोत्साहन म्हणून खाजगी नफ्याचे आमीष दाखवणे अनैतिक आहे या त्यावर घेण्यात येणाऱ्या सामाजिक आक्षेपासंबंधीची चर्चा याच्या आधीच्या प्रकरणात केलेलीच आहे. या ठिकाणी आपल्याला संचयासाठी लागणारे अतिरिक्त मूल्य या दृष्टीने नफ्याचे अर्थ-व्यवस्थेतील स्थान काय, त्याचाच फक्त विचार करावयाचा आहे.

पूर्वीचे समाजवादी, नफ्याला असे काही स्थान आहे हे उघडपणे अमान्य करीत नसले तरी तसे ध्वनित मात्र निश्चितच करीत असत. कारण संचयाचे साधन म्हणून असलेले नफ्याचे स्थान आणि नफा म्हणजे पिळवणूक हा मार्क्सचा दृष्टीकोण याबाबत ( समाजवाद्यांच्या मनात ) अतिशय गोंधळ होता. मार्क्सच्या सिद्धांतानुसार सध्याच्या राहणीमानाप्रमाणे स्वतःचा रोजमुरा मिळविण्यासाठी जितके काम करणे आवश्यक आहे, त्यापेक्षा अधिक काळ कामगाराला सक्तीने राबवून घेतले जाते. म्हणजेच त्याला मिळणाऱ्या वेतनापेक्षा तो एकूण जास्त मूल्य निर्माण करीत असतो हे सर्वश्रुत आहे. उत्पादनाची साधने कामगारांच्या मालकीची असती तर हे अतिरिक्त मूल्य वस्तुतः कामगारांच्याच पदरात पडले असते. परंतु प्रत्यक्षात मात्र उत्पादन साधने बळकावून बसलेले भांडवलदारच त्याचा लाभ उठवतात. आणि नफ्याच्या स्वरूपात हे अतिरिक्त मूल्य भांडवलदार स्वतःसाठी उपयोगात आणतात तीच पिळवणूक.

परंतु अतिरिक्त मूल्य किंवा नफा यांचा उगम हा वस्तुतः भांडवलशाही उत्पादन पद्धतीवर अजिबात अवलंबून नसतो. समाजपद्धती कशीही असली किंवा उत्पादन साधनांवर कोणाचीही जरी मालकी असली तरी पुढे दिलेल्या दोन अटी पूर्ण होत असतील तर नफा निर्माण होत राहणारच. त्यापैकी पहिली अट इतकीच की, अर्थव्यवस्था स्थिर असता कामा नये, ती गतिमान असली पाहिजे. उत्पादनाच्या हत्यारात वाढ किंवा सुधारणा घडवून आणण्यासाठी विद्यमान उत्पादनातील काही भाग बाजूला काढून ठेवला तरच आर्थिक विकास साधता येतो. म्हणजेच आर्थिक विकासासाठी अतिरिक्त मूल्य कमी करून भांडवल म्हणून त्याचा उपयोग करणे आवश्यक ठरते. त्यामुळे अतिरिक्त मूल्य निर्माण करणे आणि त्याचा विनियोग करणे या दोन्ही बाबी आर्थिक विकासासाठी सर्वस्वी अपरिहार्य ठरतात. त्या असल्याशिवाय आर्थिक विकास संभवतच नाही. भांडवलशाही देशांप्रमाणे कम्युनिस्ट देशांनाही हे तितकेच लागू आहे. अतिरिक्त मूल्य सुरुवातीला कसे आणि कोणाकडे जाते यावर ते मुळीच अवलंबून नाही. अतिरिक्त मूल्य कमी करून भांडवल गुंतव-णुकीसाठी त्याचा उपयोग न करता सर्वच्या सर्व उत्पादित वस्तूंचा सुखोपभोगा-साठी फन्ना उडविणारा समाज हा स्थितिजन्यच असणार. तेथील जनता, राहणीमान,

शास्त्रीय ज्ञान हे सारेच स्थितिजन्य बनलेले असणार; तंत्रविषयक सुधारणांचा मागमूसही अशा समाजात पाहावयास मिळणार नाही.

किंबहुना संपूर्णपणे स्थितिशील समाजातही शासनाची राजकीय, लष्करी, आणि प्रशासकीय कामे करण्यासाठी येणारा खर्च भागविण्यासाठी थोडेफार तरी अतिरिक्त मूल्य लागणारच. जे ही कामे पार पाडतात ते मुळी मार्क्सवादी दृष्टीने 'मूल्य' निर्माणच करीत नाहीत. आणि त्यांना द्यावा लागणारा मोबदला कामगारांनी निर्माण केलेल्या अतिरिक्त मूल्यामधूनच चुकता करावा लागेल. हेही पुन्हा कम्युनिस्ट किंवा भांडवलशाही देशांतील उत्पादन संबंध कशाही प्रकारचे असले तरी त्यांना सारखेच लागू पडते. त्यामुळे आर्थिक विकास आणि मध्यवर्ती शासन संस्थेचे अस्तित्व या दोन्ही गोष्टी मार्क्सवादी 'पिळवणुकी'ला जशा कारणीभूत असतात तशाच अत्यावश्यकही असतात.

अतिरिक्त मूल्य किंवा नफा हा इतका अनिवार्य आहे हे उघड उघड दिसत असताना समाजवाद्यांनी तात्त्विक भूमिकेवरून त्यावर आक्षेप घेणे मुळीच संयुक्तिक ठरत नाही. सोव्हियट युनियनमधील पाषाणहृदयी राज्यकर्त्यांना हे ओळखण्यास अजिबात वेळ लागला नाही आणि पिरॅमिड बांधणाऱ्या फॅरोहापासून तो आजपर्यंतच्या कोणाही राज्यकर्त्याने आपल्या प्रजाजनांकडून सोव्हियट राज्यकर्त्यांइतके अतिरिक्त मूल्य उकळले नसेल. समाजवादी समाजव्यवस्थेतही पिळवणूक होऊ शकेल हे मार्क्सने कधी विचारातच घेतले नाही. कारण एका बाजूला शासनसंस्था हळूहळू 'अस्तंगत' होत जाईल असे तो धरून चालला होता. आणि दुसऱ्या बाजूला अधिक विकास निरर्थक ठरण्याइतक्या मर्यादेपर्यंत उत्पादन पद्धतीच्या विकासाचा परमोच्च बिंदू गाठण्याचे भांडवलाचे ऐतिहासिक कार्य तडीस गेल्यानंतरच समाजाचे समाजवादात संक्रमण घडून येईल अशी त्यांची समजूत होती.

परंतु साहजिकच या दोन्ही अटी पूर्ण होणे कधीच संभवनीय दिसत नाही. आणि कम्युनिस्ट देशात प्रचंड लष्करी आणि नोकरशाही यंत्रणा शाबूत राखण्यासाठी कल्पनातीत प्रमाणावर अतिरिक्त मूल्याची आवश्यकता भासते आणि त्याप्रमाणे ती उपयोगातही आणली जाते, इतकेच नव्हे तर भांडवल निर्मितीसाठी नफा साठवीत जाणे याच एका आर्थिक धोरणाने त्यांना पछाडून टाकले आहे. सोव्हियट सरकारने भांडवल गुंतवणुकीचे प्रमाण इतके वाढवले आहे ( म्हणजे इतके अतिरिक्त मूल्य शोषून घेतले जात आहे ) की, भांडवलशाही देशातील भांडवलशाहीच्या अगदी भरभराटीच्या काळातील भांडवल गुंतवणुकीलाही त्याने मागे सारले आहे—निदान कम्युनिस्टांचे भाट तसा दावा करतात— इतकेच नव्हे तर त्यासाठी राज्यकर्त्यांना इतकी निर्घृण पिळवणूक करावी लागली आहे आणि नाखूष आणि मागासलेल्या शेतकऱ्यांना त्यासाठी इतक्या हालअपेष्टा सोसाव्या लागल्या आहेत की पाश्चिमात्य देशातील औद्योगिक क्रांतीच्या काळांतही इतकी पिळवणुक आणि

हालअपेष्टा कोणाच्या वाट्याला आल्या नसतील. अधिक उदारमतवादी आणि करुणात्मक मूल्यांचा बळी देऊन सोव्हियट रशियात पिळवणूक आणि हालअपेष्टा यांना जो एवढा अग्रक्रम देण्यात आला त्याला कोणाचा कितीही विरोध असला तरी कोणत्याही विकसनशील देशांतील आर्थिक घडामोडींचा मुख्य उद्देश भांडवल उभारणी हाच असला पाहिजे हे खरेच आहे. आणि त्यासाठी अतिरिक्त मूल्यांची निर्मिती म्हणजेच नफ्याचा संचय गृहीत धरावा लागतो.

साहजिकच ब्रिटनमधील प्रत्येक समाजवादी अशा प्रकारच्या संचयाची आवश्यकता मान्य करील असे धरून चालावयास हरकत नाही. परंतु हा नफा—निदान त्यांतील काही भाग-भांडवल गुंतवणुकीसाठी वापरला न जाता भांडवलदारांच्या खर्चातवाढ करण्यासाठी तर तो वापरला जाणार नाही ना (सध्या तो तसाच वापरला जातो अशी त्यांची समजूत असते) अशी शंका सहाजिकपणेच त्याला भेडसावीत असते. उत्पादनसाधनांवरील खाजगी मालकीमुळे अशी शक्यता निर्माण होते. कारण खाजगी मालकीमुळे अतिरिक्त मूल्यांचा विनियोग कशा प्रकारे करावयाचा ते ठरविण्याचा अधिकार भागधारकांना प्राप्त होत असतो आणि स्वतःच्या खर्चासाठी ते तो वापरू शकतात.

वस्तुतः खाजगी मालकीमुळे ही शक्यता निर्माण होते असे नाही. सरकारी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेतही तशी शक्यता असते. कारण अतिरिक्त मूल्य ताब्यात घेऊन त्याचा विनियोग करण्याची जबाबदारी ज्या सरकारी नोकरशाहीवर असते ती नोकरशाही त्याबाबत स्वतःकडे विशेषाधिकार राखून ठेवण्यासाठीही त्याचा तसाच उपयोग करून घेऊ शकेल. म्हणजेच अतिरिक्त मूल्यांचा दुरुपयोग करण्याची ‘ शक्यता ’ जे प्रत्यक्षपणे उत्पादन साधनांवर काम करतात, त्यांच्याकडून वरील मालकी हिरावून घेतल्यामुळेच निर्माण होते. परंतु उत्पादन जेथे फार मोठ्या प्रमाणावर होत असते तेथे मालकीहक्क दुसऱ्याने काढून घेण्याचा प्रश्नच फारसा उद्‌भवत नाही. ब्रिटनमधील कामगारापेक्षा सोव्हियटमधील कामगाराला अतिरिक्त मूल्याचा विनियोग कसा करावयाचा ते ठरविण्याचा अधिकार जास्त असतो असे मुळीच नाही. उलट गॉस्प्लॅनचा व्यवस्थापक देखील ब्रिटिश भागधारक किंवा संचालक यांच्या इतक्याच सहजपणे अतिरिक्त मूल्याचा, पुन्हा भांडवलात गुंतवण्यासाठी म्हणून नव्हे तर स्वतःचे भेदजन्य उत्पन्न म्हणून उपयोग करून घेऊ शकतो. स्वतंत्र कामगार संघटना किंवा राजकीय विरोधाला त्याला तोंड द्यावे लागत नसल्यामुळे तर प्रत्यक्षात त्याला तसे करणे अधिकच सोपे जाते. अतिरिक्त मूल्याचा विनियोग कसा करावयाचा ते जेथे वरून ठरविले जाते अशा कोणत्याही समाजात (लहान प्रमाणावरील शेतीप्रधान किंवा सिंडिकॅलिस्ट समाज सोडून इतर सर्व) तिचा उपयोग विशेषाधिकार असलेल्यांसाठी करण्याची शक्यता राहाणारच. परंतु असे होण्याची शक्यता मालकीच्या स्वरूपापेक्षाही लोकशाही संस्थांच्या सामर्थ्यावरच

जास्त अवलंबून असते.

म्हणून ब्रिटिश समाजवाद्यांपुढे जी समस्या उभी आहे ती खाजगी क्षेत्रांतील नफा (तात्पुरता किंवा अंतिमत:) खाजगी भागधारकांत वाटून देण्यासाठी वापरला न जाता तो मुख्यत: पुन्हा भांडवल गुंतवणुकीसाठीच वापरला जाईल अशा तऱ्हेने समाजवादी संस्था कशा राबवावयाच्या ही होय. म्हणजेच अतिरिक्त मूल्यांचा उपयोग व्यक्तिगत उत्पन्नाचा एक प्रकार म्हणून नव्हे तर, सामुदायिक भांडवल संचयाचे अेक साधन म्हणून कसा करता येईल असे त्या समस्येचे स्वरूप आहे. भाग-धारक भांडवल गुंतवणुकीत जो धोका पत्करतात तेवढ्या प्रमाणात उत्पन्न घेण्याचा त्यांना साहजिकपणेच अधिकार असला पाहिजे. परंतु व्याजाचे उत्पन्न याहून जास्त असेल तर त्याचे मात्र प्रत्यक्ष औद्योगिक कामगिरी म्हणून किंवा (सौम्य शब्दात सांगावयाचे तर) एकूण व्यक्तिगत उत्पन्नाचे योग्य वाटप या भूमिकेवरूनही समर्थन होऊ शकणार नाही. या प्रकरणांतील उरलेल्या भागात श्रीमंतांना अतिरिक्त उत्पन्नाच्या स्वरूपात मिळणारा, परंतु समाजवादी सिद्धान्तानुसार त्यांच्याकडून काढून घेण्याजोगा नफा आणि (योग्य अशा) कोठल्याही समाजवादी सिद्धान्तानुसार वाढ करण्यास योग्य असा संचय आणि वाढ यांच्यासाठी लागणाऱ्या अतिरिक्त मूल्याच्या स्वरूपातील नफा या दोन गोष्टी वेगवेगळ्या कशा करावयाच्या त्यासंबंधीच्या व्यवहार्य मार्गांचा उहापोह करण्यात आला आहे.

## २. नफ्यावरील कर आकारणी आणि बचत.

याबाबत तीन मार्ग संभवतात : संयुक्त आकारणीच्या द्वारा (म्हणजे नफ्या-वरच अशा तऱ्हेने करआकारणी करावयाची की त्यामुळे मोठ्या प्रमाणावर (लाभांश वाटण्याच्या प्रवृत्तीला आळा बसावा.) व्यक्तिगत करआकारणी करून; (अनिर्बंधपणे लाभांश वाढण्याची मुभा ठेवावयाची; परंतु त्या लाभांशावर कर लादावयाचा आणि त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे तो लाभांश ज्याला मिळेल त्याला त्यायोगे मिळणाऱ्या भांडवली नफ्यावर कर बसवावयाचा) किंवा कायद्यानेच लाभांशावर मर्यादा घालून द्यावयाची. युद्धोत्तर काळातील मजूर सरकारचा मुख्य भर पहिल्या मार्गावर होता. एकूण संयुक्त कराचे प्रमाण त्या सरकारने जास्त ठेवले होते, इतकेच नाही तर त्या व्यतिरिक्त वितरित न केल्या गेलेल्या नफ्याऐवजी वितरित केल्या गेलेल्या नफ्यावरही जादा भेदजन्य कर आकारला जात असे.

हे धोरण विशेष प्रभावी ठरले होते. १९३८ ते १९५३ च्या दरम्यान कंपन्यांच्या करआकारणीपूर्वीच्या व्यापारी नफ्यात जवळजवळ चौपट वाढ झाली होती. परंतु करआकारणीनंतर अधिमान आणि साधारण (प्रेफरन्स आणि ऑर्डिनरी) लाभांशामध्ये २०% हून कमी वाढ झाली तर राखीव साठा म्हणून बाजूला काढून ठेवण्यात आलेल्या रकमेत साडेचार टक्क्यांनी वाढ झाली. वितरित आणि अवितरित

नफ्याच्या चढउतारातील ही तीव्र तफावत कर आकारणीतील वाढीशी निगडित असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. करआकारणी पूर्वीच्या निव्वळ नफ्यांपैकी ३१% भाग १९३८ साली कराच्या रूपाने भरला गेला होता. १९५३ साली हे प्रमाण ५३% पर्यंत वाढले. परंतु ही वाढ सर्वस्वी निव्वळ लाभांशाच्या जिवारच झालेली होती–(प्रेफरन्स आणि ऑर्डिनरी अशा दोन्ही) लाभांशाच्या प्रमाणात ४८%पासून १६%पर्यंत घट झाली तर राखीव साठ्यातील निव्वळ वाढ २२ टक्क्यावरून ३० टक्क्यावर गेली.

याचा परिणाम लाभांशाच्या उत्पन्नाच्या निरपेक्ष आणि त्याहीपेक्षा सापेक्ष पातळीत बरीच मोठी घट होण्यात झाला. १९३८ आणि १९५३ च्या दरम्यान किंमत पातळी दुपटीने वर गेली आणि वेतनाचे सरासरी उत्पन्न जवळजवळ तिप्पट झाले तर (करआकारणीपूर्वीच्या) एकूण ऑर्डिनरी लाभांश मात्र फक्त ५० टक्क्यांनीच वाढले. १९५४ साली हुजुरपक्षीय सरकारच्या आमदानीत वितरणात झपाट्याने वाढ होऊनही लाभांशाची क्रयशक्ती १९३८ च्या किंमतीच्या मानाने अवघी ७५% च होती आणि त्यातून कराची रक्कम वगळता तर ती ६०%च होती.

लाभांशाच्या नफ्याशी असलेल्या प्रमाणात घट झाल्यामुळे भागाच्या मूल्यावर ठळक स्वरूपाचे परिणाम घडून आले कारण रोखे बाजारात (स्टॉक एक्स्चेंज) भागांच्या विक्रीच्या किंमतीपेक्षाही त्यावर व्याज किती येईल, यावरून भागांचे मूल्य ठरविण्याची रोखे बाजाराची प्रवृत्ती असते. त्यामुळे एकूण नफ्यात झपाट्याने आणि कायम स्वरूपाची वाढ होत राहिली तरी साधारण (ऑर्डिनरी) भागांच्या किंमतीत होणारी वाढ पैशाच्या मूल्यात जी घट होते त्यापेक्षा कमीच असते आणि हुजूर सरकारच्या अमदानीतील अधिक मुक्त हस्ताने होणाऱ्या वितरणाच्या काला-वधीनंतर १९५४ साल उजाडेपर्यंत युद्धपूर्व काळातील पातळीच्या दुपटीपर्यंत देखील ती जावू शकली नाही.

यावरून हे स्पष्ट होते की, एकूण नफा आणि नफारूपी उत्पन्न अलग करून उत्पन्नांत होणाऱ्या वाढीमुळे जे फायदे अन्यथा भागधारकांना मिळाले असते ते कमी करण्याच्या बाबतीत मोठ्या प्रमाणावरील संयुक्त करआकारणी अत्यंत परिणाम-कारक ठरते. १९५३ नंतर लाभांशात झालेली वाढ वरील मुद्दा नाशाबित करू शकत नाही. कारण लाभांशामधील वाढ आणि प्राप्तीवरील कराच्या ठराविक दरात नफ्यावरील करातील सूट आणि रद्द करण्यात आलेली जादा नफ्यावरील कर-आकारणी, अशा दोन प्रकारे होणारी घट यांचे साहचर्य असते. परिणामी नफ्यातील जो भाग कर म्हणून दिला जातो त्यात घट झाली असून नफ्याचे जे प्रमाण वितरित केले जाते त्यात त्या प्रमाणात वाढ झाली असल्याचे दिसून येते. परंतु या दोन्ही गोष्टी परस्परावलंबी आहेत म्हणजे पहिली वाचून दुसरी घडून येऊ शकली नसती.

जास्त प्रमाणावर आणि भेदजन्य संयुक्त करआकारणीचे धोरण भागधारकांची अनाठायी नाकेबंदी होऊ न देण्यात यशस्वी ठरले असले तरीदेखील उजव्या गटाकडून आणि शहरातील सनातनी प्रवृत्तीच्या लोकांकडून तर त्यावर टीका होतेच परंतु डाव्या गटातील काही अर्थशास्त्रज्ञही त्यावर टीका करताना आढळतात. हे धोरण अत्यंत हानीकारक ठरणार आहे असे उजव्या गटातील लोक प्रतिपादित असतात तर, डाव्या गटातील अर्थशास्त्रज्ञ वरील शहरी टीका अतिरंजित म्हणून त्याज्य समजत असले तरी व्यापारी करांमुळे काही वाईट परिणाम घडून येतील आणि त्यामुळे ते संपूर्णपणे किंवा काही प्रमाणात रद्द करून त्याऐवजी व्यक्तिगत करआकारणी करावी असा त्यांच्या टीकेचा सूर असतो. ही टीका तपासून पाहिली पाहिजे.

व्यापारी करामुळे बचतीचा एकूण पुरवठा, भांडवल गुंतवणुकीस मिळणारे प्रोत्साहन किंवा गुंतवणुकीसाठी लागणाऱ्या पैशाचा पुरवठा यावर प्रतिकूल परिणाम घडून येत असण्याची शक्यता आहे. त्यासंबंधीचा विचार पुढे आला आहे.

संयुक्त करआकारणीमुळे एकूण बचतीत घट होते या युक्तिवादाचा पाठपुरावा करावयाचा असेल तर तो कर, कंपन्या आपल्या वितरित नव्हे तर अवितरित नफ्यातून भरत असतात हे प्रथम दाखवून द्यावे लागेल. त्याचप्रमाणे करापासून मिळणाऱ्या उत्पन्नाचा विनियोग सरकारी खर्चात वाढ करण्यासाठी केला जातो, अर्थसंकल्पीय शिल्लक वाढविण्यासाठी किंवा तूट कमी करण्यासाठी ते वापरले जात नाही हेही सिद्ध करून दाखवावे लागेल. जर या दोन्ही अटी पुऱ्या होत असतील तर त्या करामुळे खाजगी बचतीचे सार्वजनिक खर्चात रूपांतर घडून येईल. परंतु त्याच्या नेमके उलट जरी घडून आले तरी करातील कपातीमुळे बचतीत वाढ होईल. मात्र खर्चाला त्याची झळ बसल्यावाचून राहणार नाही.

सरकारी खर्च किंवा बचत यापैकी विशिष्ट भाग हा अमुक एका करातून मिळणाऱ्या उत्पन्नातून भागवला जातो असे सांगता येणे शक्य नसल्यामुळे वर नमूद केलेल्यांपैकी दुसरी अट पुरी झाली आहे किंवा नाही यासंबंधी ठोकळेबाजपणाने निश्चित असे विधान कधीच कोणाला करता येणार नाही. परंतु अलिकडच्या सर्वच शासनसंस्थांना असा अनुभव येत आहे की, सरकारी खर्चात कपात करणे अतिशय कठीण होऊन बसले आहे. आणि करात ज्या ज्या वेळी सूट दिली जाते त्या त्या वेळी अपरिहार्यपणे सरकारी खर्चाऐवजी बचतीतच त्या प्रमाणात घट होत असते. संयुक्त करातील घट ही या नियमाला अपवाद ठरत नाही.

करांतील या कपातीचा उपयोग कंपन्या जर राखीव साठा म्हणून बाजूला काढलेल्या निव्वळ रकमेत वाढ करून घेण्यासाठी करून घेतील आणि अधिक मुक्तहस्ताने लाभांश म्हणून ती वाटून टाकणार नसतील तर त्यातून हेच निष्पन्न होईल की, एकूण बचतीवर या बदलाचा काहीही परिणाम घडून येणार नाही. सार्वजनिक

आणि खाजगी बचतीत होणारी अदलाबदल काय ती त्यामुळे दिसून येईल. परंतु असे सहसा होणार नाही. ( युद्धपूर्व काळाच्या तुलनेने ) जादा प्रमाणावरील कर अवितरित नफ्यातून भरला न जाता तो वितरित नफ्यातूनच भरला जातो हे यापूर्वी दाखवून दिलेच आहे. त्याहीपुढे जाऊन हुजूर पक्ष अधिकारावर आल्यापासून व्यापारी करांतील कपातीमुळे वितरणाच्या प्रमाणात प्रत्यक्ष वाढ झाली आणि त्यामुळे अपरिहार्यपणे खर्चात वाढ होऊन बचतीत मात्र त्यामानाने घट झाली हेही आपण यापूर्वी पाहिले आहे. लाभांशाचा फायदा मुख्यतः सधन लोकांच्याच पदरात पडत असल्यामुळे आणि फार वरच्या पातळीच्या दराने लाभांशावरील कर आकारला जात असल्याने, लाभांशाला स्वयंसिद्ध असे फारसे महत्त्व नसते. खरे महत्व असते ते करमुक्त भांडवली फायद्याला. त्यामुळेच लाभांशात वाढ होत जाते. उदाहरणार्थ भागांच्या किमती दुप्पट झाल्या तर भागधारकांच्या भांडवली संपत्तीत सुमारे १२,००० दशलक्ष पौंडांची भर पडेल आणि यातील अगदी लहानसा भाग जरी खर्च केला तरी त्यामुळे चलनवाढीचे दडपण फार प्रचंड प्रमाणावर वाढेल.

त्यामुळे संयुक्त कर कमी करण्यात आले तर त्यामुळे एकूण खर्चात वाढ होण्याचा आणि एकूण बचतीत घट होण्याचा ( आणि त्याशिवाय वेतनावर मर्यादा घातली जाण्याची शक्यता दुरावण्याचा ) फार मोठा संभव असतो. निदानपक्षी त्यामुळे प्रत्यक्षात एकूण बचतीत वाढच होईल असा उलटा युक्तिवाद करणे तरी अवघड होऊन बसते.

## ३. नफ्यावरील कर आणि प्रेरक योजना

नफ्यावर जास्त प्रमाणात कर बसवला तर त्यामुळे भांडवल गुंतवणुकीबद्दलची प्रेरणा कमी होईल आणि त्यामुळे खाजगी भांडवल, गुंतवणूक, बचतीचा पुरवठा, आणि धोका पत्करावा लागणारे भांडवल यांच्या आधारे निश्चित होणाऱ्या पातळीच्याही खाली घसरेल, हा टीकेचा दुसरा मुद्दा. युद्धोत्तर काळात हा धोका प्रत्यक्षात अनुभवावा लागला नाही हे स्पष्ट आहे. १९४९ सालानंतर पुढे भांडवल गुंतवणुकीची फारशी इच्छा नव्हती ( किंवा गुंतवणुकीसाठी पैशाची कमतरता होती ). हे भांडवल गुंतवणुकीवर मर्यादा पडण्याचे मुख्य कारण होते असे नव्हे तर, भांडवली वस्तूंचे उत्पादन करणाऱ्या उद्योगांना लागणाऱ्या ( घरबांधणीचे आणि अभियांत्रिकी उद्योग ) भौतिक साधनसामुग्रीचा काहीसा तुटवडा भासत होता त्यामुळे ही मर्यादा पडत होती. आपल्या आवाक्याबाहेरची असली तरीही खूप मोठ्या प्रमाणावर भांडवल गुंतवणूक करावी अशी एकूण धंद्याची मनोवृत्ती होती ( आणि त्यासाठी लागणारी साधनसामुग्रीही होती ); परंतु सरकारची परवाना पद्धती किंवा इतर नियंत्रणे यामुळे गुंतवणुकीच्या योजनात भौतिक क्षमतेइतकी काटछाट करावी लागे किंवा गुंतवणुकीसाठी लागणाऱ्या मालाचे उत्पादन

करणाऱ्या कारखान्यांकडे फार मोठ्या प्रमाणावर मागणी येऊ लागल्यामुळे मालाचा पुरवठा करण्याचे लांबचे वायदे करावे लागत. त्यामुळेही भांडवल गंतवणुकीच्या योजनांना कात्री लागण्याचा प्रसंग येई.

म्हणून कराचा बोजा कितीही कमी केला आणि त्यामुळे भांडवल गुंतवणुकीला प्रोत्साहन देण्याचा उद्देश अगदी सफल झाला असे धरले तरी तेवढ्याने भांडवल उभारणीच्या प्रमाणात वाढ घडून येऊ शकली नसती. त्यामुळे चलनवाढीचे दडपण मात्र वाढले असते आणि अभियांत्रिकी आणि इमारतबांधणीच्या उद्योगांवर कमालीचा ताण पडला असता. निर्यात, वरबांधणी, संरक्षण इत्यादींसारख्या इतर प्रत्यक्षपणे स्पर्धा करणाऱ्या मागण्यात वाढ झाली असती किंवा अधिक ठोकळमानाने बोलावयाचे तर बचतीच्या पुरवठ्यात वाढ झाली असती ( गुंतवणुकीवर शेवटी त्यामुळेच मर्यादा पडते ) तर भांडवल गुंतवणूक वाढली असती.

तथापि असाही युक्तिवाद करता यईल की, प्रथम युद्धकाळापासून साचत आलेल्या मागण्यांचे दडपण आणि त्यानंतर कोरियन युद्धामुळे चलनवाढीला आलेला ऊत यामुळे युद्धोत्तर काळातील परिस्थिती अगदी अपवादात्मक बनली होती. त्या मानाने आता परिस्थिती बरीच निवळली असल्याची चुणूक १९५२–५३ च्या घटनांनी दाखवून दिली आहे. या परिस्थितीत भांडवल गुंतवणुकीवर मर्यादा पडतात. त्या भौतिक साधनसामुग्रीमुळे पडत नाहीत तर मुख्यत्वेकरून नफ्यासंबंधीच्या अल्पकालीन अपेक्षांवर आधारलेल्या धंद्यासंबंधीच्या प्रेरणांमुळे पडत असतात. परंतु मी मागच्या प्रकरणात हे दाखवून दिले आहे की, सर्वसाधारणपणे असे असण्याची शक्यता नाही. तथापी मोठ्या प्रमाणावरील संयुक्त कराचा दर आणि लाभांशाबद्दलचा प्रतिकूल ग्रह यामुळे परिस्थितीचे चित्र बदलून भांडवल गुंतवणुकीविषयी वाटणारे प्रलोभन एकदमच कमी होऊन बसणार नाही का ?

तसे कां व्हावे ते प्रथमदर्शनी स्पष्ट होत नाही. सध्याच्या नफ्यावरील करातील भेदजन्य बाबीमुळे नफा टिकवून धरण्याच्या दृष्टीने अनुकूल असा ग्रह निर्माण होतो. आणि अंतर्गत भांडवलाची मोठ्या प्रमाणावरील उपलब्धता (भेदजन्य नसलेल्या करांतून येणाऱ्या तितक्याच उत्पन्नाच्या तुलनेने) यामुळेच विस्ताराला अनुकूल असे वातावरण निर्माण होते. नफ्यावरील करआकारणी ही सरतेशेवटी प्रमाणात्मक असते. ती अनुक्रमिक किंवा वाढती नसते आणि प्रमाणात्मक कराचा प्रोत्साहक बाबींवर फारसा परिणाम घडून येत नाही, हे सर्वमान्य झालेले आहे. पुष्कळदा असे म्हटले जाते की, मिळालेल्या नफ्यापैकी अर्धा–अधिक भाग सरकारी तिजोरीत जाणार असेल तर धंदेवाल्यांनी आपल्या धंद्याचा विस्तार करण्याचा धोका तरी कशासाठी पत्करावा ? परंतु हा सवाल दिशाभूल करणारा आहे. कारण फायद्याप्रमाणेच धंद्यात तोटा आला तर त्याचा देखील अर्धा अधिक भाग सरकार उचलीत असते, ही गोष्ट नजरेआड केली जाते. एकाद्या उपक्रमात

तोटा आला तर दुसऱ्या एकाद्या उपक्रमात झालेल्या करपात्र नफ्यामुळे तो भरून काढता येतो. आणि एकूण धंद्यातच तोटा आला तर तो पुढे ओढून पुढे होणाऱ्या नफ्यातून त्याला छेद देता येईल. त्यामुळे धोक्याच्या भांडवल गुंतवणुकीबाबत नफ्यावरील करामुळे भेदाभेद केला जातो असे म्हणणे बरोबर होणार नाही.

भारी लाभांशाबाबत प्रतिकूल ग्रह करून घेतल्यामुळे उद्योगपतींच्या व्यक्तिगत प्रेरणांवर या ना त्या स्वरूपात अनिष्ट परिणाम घडून येतो असे काही वेळा सांगितले जाते. त्यांच्यापैकी बहुतेकांच्या व्यवस्थापनेखाली असलेल्या धंद्यातील रोख्यांवर मालकी असलीच तर ती अगदी अत्यल्प प्रमाणावर असते. त्यामुळे अनिष्ट परिणाम काय म्हणून घडून यावा हे स्पष्ट होत नाही. धंद्यातील ठेवींवर फारशी मालकीच नसल्यामुळे मुख्यतः जास्तीत जास्त लाभांश मिळावा म्हणून कमाल नफा व्हावा असे त्यांना वाटत असणे संभवनीय दिसत नाही. किंवा लाभांश खाली आल्याबरोबर लगेच धंद्याच्या विस्तारात त्यांना रस वाटेनासा होत असेल हेही शक्य दिसत नाही. अशी समजूत करून घेणे म्हणजे, आम्ही केवळ भागधारकांनाच जबाबदार आहोत असे नव्हे तर कामगार आणि ग्राहक यांच्या बाबतीतही आमची काही जबाबदारी आहे, आणि (भागधारक, कामगार आणि ग्राहक) या तिघांतही समतोल साधण्याचा आमचा प्रयत्न असतो, या उद्योगपतींनी पुन्हा पुन्हा केलेल्या (आणि ते विधान त्यांनी मनापासून केलेले असते) निवेदनांशी विसंगत ठरेल. त्याचप्रमाणे अनेक मोठमोठ्या कंपन्यांची वितरणाबाबतच्या धोरणासंबंधीची कमालीची सनातनी मनोवृत्ती आणि त्यामुळे व्यवस्थापक आणि भागधारकांचे प्रतिनिधी याच्यात उद्‌भवणारा (उघड अथवा छुपा) संघर्ष लक्षात घेता ही वरील समजूत कशी चुकीची आहे हे दिसून येईल. आज अनेक व्यवस्थापक मोठ्या प्रमाणावरील वितरणाच्या भागधारकांच्या मागणीबाबत उदासिन असतात इतकेच नव्हे तर कित्येकदा त्याला जोराचा विरोधही करतात. आणि युद्धोत्तर काळात लाभांशाला आवर घालण्याचे अर्थमंत्र्यांकडून वारंवार केले जाणारे आवाहन कंपन्यांच्या संचालक मंडळांना अजिबात आवडत नसते असेही नाही. कारण त्यामुळे व्यवस्थापकांना मनातून जे करावेसे वाटे—म्हणजे कंपनीला झालेला नफा धंद्याच्या विस्तारासाठी पुन्हा त्यांतच गुंतविण्याला अग्रक्रम देणे—ते करण्याला आयतीच सबब मिळते.

सर्वसाधारणपणे भागधारकांचा दृष्टीकोण मांडणाऱ्या शहरी नियतकालिकांतून येणाऱ्या तक्रारीवरूनही हे स्पष्ट होते. 'सर्वसामान्य भागधारकाबद्दलची ही "शालेय" वृत्तीही आजकाल संचालक किंवा संचालक मंडळाच्या बाबतीत अगदी नित्याची बाब होऊन बसली आहे. साधारण भाग (ईक्विटी शेअर्स) असलेले भागधारक आणि आपला धंदा यांची ते मनातल्या मनात फारकत करीत असतात आणि आपण केवळ भागधारकांचे प्रतिनिधी आहोत हे ते विसरूनच जातात.

सरकारच्या बाजूने लाभांशावर मर्यादा घालण्यास अनुमती मिळाली म्हणजे सर्व-सामान्य भागधारकाबद्दलचे आपले चिक्कूपणाचे धोरण पुढे चालू ठेवण्याच्या बाबतीत संचालक मंडळाचे हात वळकटच होतात.' वर्तमानपत्रात ही टीका येऊन गेल्यानंतर कंजुषपणाच्या या धोरणाला थोडासा आळा बसला तरी कंपनीला मिळणाऱ्या नफ्यावर भागधारकांचा हक्क पहिला असला पाहिजे किंवा लाभांशातील वाढ हाच धंद्याच्या उलाढालीचा मुख्य उद्देश असला पाहिजे हे बहुतेक व्यवस्थापक मानीतच नाहीत हे खरे आहे.

अशा परिस्थितीत मग आधुनिक उद्योगपतींचा कमाल नफा मिळविण्यामागील हेतू कोणता असावा ? पगाराच्या प्रमाणात त्यांना लाभांश मिळत असेल तर स्वत:ला मिळणाऱ्या मोबदल्यात जास्तीत जास्त वाढ व्हावी, असाही कदाचित त्यामागे हेतू असावा. परंतु मी मागच्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे त्यामागे मुख्यत: मानसशास्त्रीय आणि सामाजिक असे दोन्ही प्रकारचे हेतू गुंतलेले असतात. स्वत:ला आपल्या कंपनीशी एकरूप करून घेण्याची त्यांची वृत्ती असते. कारण त्या कंपनीत स्वत:चे व्यक्तिमत्व प्रतिबिंबीत झाले आहे, आणि भागधारकां-पेक्षा त्यांचे हितसंबंध अगदी निराळे आहेत, असे ते मानीत असतात. आणि कंपनीविषयी केंद्रीभूत झालेली त्यांची निष्ठा, इतकेच नव्हे तर त्यांच्या मनातील सगळ्या प्रेरक शक्ती–व्यावसायिक ताण, व्यापारी क्षेत्रात प्रतिष्ठा मिळावी अशी इच्छा, आत्मानुभूती आणि सत्तेची आकांक्षा–या उत्पादनात खूप वाढ झाली आणि कंपनीचा झपाट्याने विकास घडून आला तरच फलद्रूप होतात. त्यासाठी नफ्याचे प्रमाणही अर्थातच वाढले पाहिजे कारण व्यावसायिक प्रतिष्ठा आणि सत्ता अंती प्राप्त करून घेण्याचे तेच एक परंपरागत साधन मानले गेलेले आहे.

आता या प्रेरक योजनांच्या (इन्सेंटिव्हज) दृष्टीने विचार करता निव्वळ नफ्याची निरपवाद पातळी ही तौलनीय पातळीच्या मानाने कमी महत्त्वाची असते. या वर्षापासून पुढच्या वर्षापर्यंत उत्पादन आणि नफा यांच्या प्रमाणात किती वाढ झाली किंवा एका कंपनीतील नफ्याचे प्रतिस्पर्धी कंपनीच्या नफ्याशी असलेले संबंध यावरून व्यावसायिक सत्ता आणि प्रतिष्ठा अजमावली जाते. कारण ती त्यावरच अवलंबून असते. यावरून असा निष्कर्ष निघतो की, दरवर्षी सर्व कारखान्यांना सारख्या प्रमाणात लागू पडणाऱ्या नफ्यावरील सरसकट दराच्या करामुळे जास्तीत जास्त नफा मिळ-विण्याच्या व्यवस्थापकांच्या प्रेरणांवर फारसा परिणाम घडून येत नाही. कारण (कारखान्याच्या) तौलनिक आकारमानावर त्याचा कसलाही परिणाम घडून येत नाही. त्यामुळे लाभांशावर मर्यादा घातल्याने किंवा कंपन्यांच्या करआकारणीची परममर्यादा खूप वरची ठेवल्याने उद्योगपतींच्या वैयक्तिक प्रोत्साहनांना (incen-tives) धोका कसा काय पोहोचू शकतो ते समजणे कठीण आहे.

परंतु अधिक गुंतवणूक करण्याची उद्योगपतींची व्यक्तिश: इच्छा असली तरी

अशा गुंतवणुकीसाठी नव्या भांडवल पुरवठ्याची आवश्यकता भासत असल्यास भेदजन्य आणि भारी करआकारणीमुळे त्यांना त्यापासून परावृत्त केले जाईल असे काही वेळा सांगितले जाते. अशा करांमुळे लाभांशाच्या उत्पन्नाशी असलेल्या प्रमाणात घट होते हे आपण पाहिलेच आहे आणि शेअर बाजारातील किंमत ही सर्वसाधारणपणे उत्पन्नाऐवजी लाभांशाशी निगडित असल्याने साधारण भागांवरील उत्पन्नाच्या नफ्याचे प्रमाण कमालीच्या बाहेर जास्त असते हे ओघानेच येते. (युद्धपूर्व काळातील पातळीच्या मानाने आज ते २–३ पट आहे.) विद्यमान शेअर्सवर पडणारे उत्पन्नाचे भारी प्रमाण लक्षात घेता कंपन्या आपल्या विस्तारासाठी पैसा उभा करण्याकरिता नवे शेअर्स विक्रीला काढण्यास कांकू करतात, असे सांगितले जाते. कारण अशा शेअर्सवर सध्याच्या शेअर्सइतकेच उत्पन्न सुटणार असेल तर ज्या योजनांसाठी या नव्या भांडवलाची आवश्यकता असते त्या योजनांमधून खूपच मोठ्या प्रमाणावर नफा मिळण्याची शक्यता असली पाहिजे. म्हणून किफायतशीरपणाचे प्रमाण वाढवून, अर्थात नव्या योजनांच्यामार्फत तशी हमी मिळाली पाहिजे, मिळकतीवरील जादा उतारा मिळवता आला तर हाती घेण्यात आलेल्या योजनांची संख्या घटेल. निदान, त्यासाठी बाहेरच्या भांडवलाची जरूर असेल तर निश्चितच असा परिणाम घडून येईल.

अशा तऱ्हेच्या सूचनेबाबत ठोकळेबाज भूमिका घेऊन चालणार नाही. कारण भांडवल गुंतवणुकीच्या निर्णयावर परिणाम घडवून आणणाऱ्या नेमक्या बाबी कोणत्या त्यासंबंधीचे आपले ज्ञान अद्याप अत्यंत तुटपुंजे आहे. परंतु प्रत्यक्षात त्याला गुणात्मक महत्व किती द्यावयाचे याबद्दल मी साशंक आहे. कारण एक तर लाभांशाच्या वितरणात कपात करून रोखे बाजारातील मिळकतीच्या उताऱ्यात वाढ करणाऱ्या प्रक्रियेमुळेच धंद्याच्या विस्तारासाठी उपलब्ध असलेला नफा टिकवून धरल्याने हाताशी येणाऱ्या रकमेत वाढ करून नवे भांडवल विक्रीस काढण्याची तितकीशी आवश्यकता राहात नाही. आणि अलिकडच्या बहुतेक सर्व वर्षात कंपन्यांनी जेवढे पैसे गुंतवायचे ठरवले होते त्यापेक्षा जास्त रक्कम त्यांना उपलब्ध होती हे आपल्याला पुढे दिसून येणारच आहे. आणि बाहेरच्या भांडवलासंबंधी बोलावयाचे तर ज्या सार्वजनिक कंपन्यांना आपल्या धंद्याचा झपाट्याने विस्तार घडवून आणण्याची इच्छा होती, परंतु त्यासाठी लागणारा पैसा त्यांच्यापाशी स्वतःचा असा नव्हता, त्यांना बाजारात येऊन पैसा उभारण्यास किंवा साधारण भागाच्या स्वरूपातील नव्या भांडवलाच्या अभावी विकासाच्या योजना आखडत्या घेण्यास त्यांना कोणी मना केले होते असे दर्शविणारा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. अलीकडील काळात असे दृष्टोत्पत्तीस येत आहे की, एकामागोमाग एक कंपन्या भांडवल उभारणीसाठी बाजाराकडे धाव घेत आहेत आणि त्यांनी विक्रीस काढलेल्या नव्या शेअर्सवर लोकांच्या हावरटासारख्या उड्या पडत आहेत. अनेकदा

ज्यांचा विस्तार राष्ट्रीय महत्वाचा ठरतो अशा मोठमोठ्या कंपन्यांच्या बाबतीत ही अडचण विशेष महत्त्वाची ठरते असे खासच म्हणता येणार नाही. आणि लहान-लहान किंवा नव्या धंद्यांच्या बाबतीत अशी अडचण उद्भवली तर तिचे निवारण करण्यासाठी खास मार्गांचा अवलंब करता येण्यासारखा आहे. यासंबंधीचा उहापोह पुढे आला आहे.

सर्वसाधारणपणे मला असे वाटते की, वर जे मुद्दे दिले आहेत त्यापेक्षा गेल्या प्रकरणात दर्शविलेले उद्योगांच्या विकासासाठी येणारे सामाजिक आणि आर्थिक दडपण आता अत्यंत जोरकस बनले आहे. वर दिलेल्या मुद्यांवरून भांडवलाची काठावरील कार्यक्षमता नेमकी किती असेल त्याचे अचूक मोजमाप सतत घेता येईल असे सूचित होते. आणि आर्थिक ( व राजकीय ) वातावरणात अगदी अनपेक्षित असे काही बदल घडून आले नाहीत तर धंद्यातील प्रोत्साहक शक्तींमुळे सध्याची ( किंवा अलीकडची ) करआकारणीची पातळी गृहीत धरूनही भांडवल गुंतवणुकी-वर फार मोठ्या मर्यादा पडतील असे मला वाटत नाही.

परंतु यदाकदाचित तसे झाले तरी देखील नफ्यावरील करात धसमुसळेपणाने मन मानेल तशी कपात करून त्याला उत्तर देण्याची काही जरूर आहे असे नाही. कारण गुंतवणुकीसाठी अधिक पैसा आकर्षित करण्याची अनेक प्रभावी साधने सरकारपाशी असतात आणि लाभांशासंबंधीच्या धोरणावर किंवा शेअर्सच्या मूल्या-वर कोणताही अनिष्ट परिणाम घडून येऊ न देता त्या साधनांचा उपयोग करणेही आता सहज शक्य आहे.

असे एक साधन म्हणजे गुंतवणुकीवरील सूट. १९५४ सालच्या अर्थसंकल्पात प्रथम ते उपयोगात आणले गेले. परंतु सध्या मात्र ते तात्पुरते तहकूब करण्यात आले आहे. गंमत अशी की, त्यासंबंधी फारशी चर्चा घडून आली नाही. प्राप्ती-वरील आणि नफ्यावरील कर हा कंपनीच्या बचतीवर बसविण्यात आलेला प्रत्यक्ष कर असतो तर गुंतवणुकीवरील सूट हा एक प्रकारे नकारात्मक कर असतो. म्हणजेच गुंतवणुकीसाठी देण्यात आलेले ते अनुदान असते. त्यामुळे या दोन्ही गोष्टी एकत्र आल्या म्हणजे कंपनीला कर कमी भरावा लागतो. आपल्या नफ्यापैकी मोठा भाग ती कंपनी पुन्हा भांडवल म्हणून गुंतवते आणि लहान भाग लाभांश म्हणून वाटते किंवा राखीव साठ्यात जमा करते. त्याचप्रमाणे याच्या उलटही घडून येते. करात आणि / किंवा अनुदानात फेरफार करून सरकार धंद्यातील गुंत-वणूक त्याचप्रमाणे बचत यासंबंधीच्या निर्णयावर प्रत्यक्षपणे जोरदार दडपण आणू शकते.

प्रदुष्टिनयन ( Reductio ad absurdum ) च्या आधारे १०० टक्के दराचे आत्यंतिक उदाहरण घेऊन हे दाखवून देता येईल. गुंतवणुकीवर १०० टक्के सूट मिळाली असे धरले तर ती कंपनी आपल्या नफ्यापैकी जेवढा भाग पुन्हा गुंत-

वील तेवढ्यावर तिला अजिबात कर द्यावा लागणार नाही आणि जी कंपनी आपला सगळाच्या सगळा नफा पुन्हा गुंतवणुकीत घालील तिच्यावर कराचा कसलाच बोजा पडणार नाही. नफ्यावर १०० टक्के कर धरला तर पुन्हा गुंतवणुकीत न घातलेला सगळाच्या सगळा नफा सरकारी तिजोरीत जमा होईल आणि जी कंपनी अजिबात गुंतवणूक करणार नाही तिला आपला सगळाच्या सगळा फायदा कराच्या रूपाने देऊन टाकावा लागेल. या दोहोंचा संयोग झाला तर त्यामुळे व्यवस्थापकांना भांडवल गुंतवणुकीचे आकर्षण वाटू लागेल. कारण नाहीपेक्षा सगळा नफा देशाच्या महसूल खात्याकडे जाऊ देण्याव्यतिरिक्त दुसरा पर्यायच उरणार नाही. ( मजूर सरकार अधिकारावर असेल तर व्यवस्थापकांचा राजकीय कल लक्षात घेता गुंतवणुकीसंबंधी त्यांना वाटणारे आकर्षण अधिकच तीव्र बनेल. आपल्याजवळील सर्वच्या सर्व देऊन टाकण्याकडे आधीच कोणाचा ओढा नसतो, त्यांत यामुळे अधिकच भर पडेल. गिबनने याचाच उल्लेख एकदा ‘ महसूल वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या उद्धटपणाचा त्रास ’ असा केला होता. आणि असे म्हटले होते की, भांडवली खर्चात वाढ करून महसूल अधिकाऱ्यांना फसविण्याची अहमिहमिका सुरू होईल. )

नकारात्मक आणि प्रत्यक्ष करांच्या निरनिराळ्या प्रकारच्या संयोजनामुळे गुंतवणूक करणे किंवा न करणे या विषयीच्या पसंतीच्या प्रमाणातही फरक पडत राहील.त्याशिवाय गुंतवणुकीत मिळणारी सूट, नफ्यावरील वितरित आणि अवितरित कर, यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या संयोजनामुळेही गुंतवणूक लाभांशाचे वितरण, आणि राखीव साठ्यांचा संचय याविषयीची पसंतीही निरनिराळ्या प्रमाणावरील असेल. अशा तऱ्हेने आपल्याला पाहिजे असेल तेवढ्या प्रमाणावरील गुंतवणूक लाभांशाच्या दराची पातळी व नफ्यावरील करामुळे एकूण मिळणारे उत्पन्न मिळविण्यासाठी वरील गोष्टींचे संयोजन कशाप्रकारे केले जावे ते ठरविणे तत्त्वतः शक्य आहे. आणि मजूर सरकार गुंतवणुकीवरील सुटीच्या प्रमाणात वाढ करून गुंतवणुकीला उत्तेजन देऊ शकेल. परंतु त्याचबरोबर नफ्यावरील दरात वाढ करून त्यामुळे मिळणाऱ्या एकूण उत्पन्नात होणारी घट किंवा लाभांशावरील वाढ थोपवूही शकेल. (नफ्यावरील करांत सरळसरळ कपात करण्यापेक्षा हे अर्थातच अधिक चांगले. कारण नफ्यावरील करात कपात केल्यामुळे महसूल कमी होण्यात तर त्याचे पर्यवसान होईलच परंतु करमुक्त करण्यात आलेल्या रकमा जास्त गुंतवणूक करण्यासाठीच उपयोगात आणल्या जातील आणि जादा लाभांश देण्यासाठी त्या खर्च केल्या जाणार नाहीत अशी हमीही कोणी देऊ शकणार नाही.) म्हणून एकाद्या धंद्यात भांडवलनिर्मितीच्या बाबतीत कसलेच आकर्षण आढळत नसेल तर गुंतवणुकीवर सूट देण्याचा उपयोग आपल्याला खूप सामर्थ्य आणि बिनचूकपणा असलेल्या एकाद्या राखीव हत्यारासारखा करून घेता येईल.

## ४. नफ्यावरील कर आणि धोक्याच्या भांडवलाचा पुरवठा

चर्चेच्या ओघात उद्योगांवर फार मोठ्या प्रमाणात कर बसवला तर त्यामुळे धोक्याच्या भांडवल (Risk capital) पुरवठ्यावर अनिष्ट परिणाम घडून येईल. आणि त्यामुळे जरूर त्या पैशाच्या अभावी कंपन्या त्यांच्या इच्छेनुरूप गुंतवणूक करू शकणार नाहीत या तिसऱ्या तथाकथित धोक्यासंबंधीची चर्चा अप्रत्यक्षपणे येऊन गेलेली आहेच.

शहरात आणि औद्योगिक वर्तुळात हा विषय खूप चर्चिला जात असला तरी अद्यापपर्यंत असे घडून आलेले नाही. राष्ट्रीय उत्पन्नासंबंधीच्या 'ब्लू बुक्स'वरून असे दिसते की, जवळ जवळ प्रत्येक वर्षी होणारा नफा इतका असतो की, कराचा बोजा, लाभांश आणि व्याज यासाठी भराव्या लागणाऱ्या रकमा चुकत्या केल्या-नंतर आणि स्थिर व चालू भांडवलात गुंतवणूक केल्यानंतरही बँकेकडून घेतलेले कर्ज परत करण्यासाठी आणि तारण ठेवण्यासाठी किंवा इतर प्रकारे कर्ज देण्या-साठी पुरेसा पैसा शिल्लक उरतो. हा कर बसविल्यानंतरही असे दिसून आले आहे की, ठेवी किंवा स्थिर भांडवलाच्या स्वरूपातील एकूण गुंतवणुकीपेक्षाही युद्धपूर्व कालाच्या मानाने अवितरित नफा आणि घसारा यांत वाढ झालेली आहे. त्यामुळे १९३८ साली कंपनीची शिल्लक आणि गुंतवणूक यांची साधारणपणे बरोबरी झाली तर गेल्या काही वर्षात या कंपन्यांनी दरवर्षी टाकलेली निव्वळ शिल्लक आणि इतर आर्थिक क्षेत्रांना केलेला कर्जपुरवठा २०० ते ६०० दशलक्ष पौंडांपर्यंत गेलेला आहे.

अर्थात ही आकडेवारी पैशाच्या स्वरूपातील असून स्थिर जिंदगीच्या पुन-र्स्थापनेसाठी आणि ठेवी घेण्यासाठी येणाऱ्या जादा खर्चाची त्यात दखल घेतली जात नाही. परंतु पुनर्स्थापनेसाठी येणाऱ्या खर्चावरून घसाऱ्याची किंमत काढली आणि ठेवींच्या किमतीत होणारी वाढ कंपनीच्या बचतीतून वजा केली तरीदेखील जवळजवळ प्रत्येक वर्षी कंपन्यांजवळ असलेली साधनसामुग्री देशांतर्गत एकूण निव्वळ भांडवल उभारणीपेक्षाही जास्त असेल. त्याचे प्रमाण प्रतीवर्षी २०० पासून ५०० दशलक्ष पौंडांपर्यंत असते. प्रत्यक्ष त्याचप्रमाणे पैशाच्या स्वरूपातील कंपन्यांच्या निव्वळ शिलकीत युद्धापूर्वी त्यांच्या गुंतवणुकीपेक्षाही वाढ झाली आहे. आणि जादा कर बचतीवर आकारले जात नाहीत तर ते भागधारकांच्या उत्पन्नातून वसूल केले जातात.

अशा तऱ्हेने गुंतवणुकीला अटकाव करणारा पैशाचा सर्वसाधारण तुटवडा निर्माण होण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही. जादा कर आकारणीमुळे भांडवलाचा संकोच होण्याची शक्यता तर त्यापेक्षाही कमी असते. गुंतवणुकीत अडचणी निर्माण होतात ही कल्पना वर दिलेल्या आकडेवारीशी तर विसंगत आहेच परंतु १९३८

पासून औद्योगिक उत्पादनातही प्रचंड वाढ झाली आहे. आणि युद्धपूर्व काळात उद्योगांतील स्थिर भांडवलात बरीच वाढ झाल्याचे दर्शविणारी जी आकडेवारी आता उपलब्ध झाली आहे. त्यावरून ही कल्पना बरोबर नसल्याचेच प्रत्ययास येते.

अर्थात कंपन्या भांडवल गुंतवणूक वाढविण्याचा जसाजसा प्रयत्न करीत जातील व भौतिक साधनसामुग्रीमुळे ते शक्य होत जाईल आणि त्या प्रमाणात उद्योगधंद्याला लागणाऱ्या आर्थिक साधनांवरील ताण जसजसा वाढत जाईल तसतशी ही परिस्थिती पुढे बदलेलही. वारंवार अशी भीती व्यक्त केली जाते की, जादा आकारणींमुळे वितरणाचे प्रमाण घसरत असल्याने कंपन्यांना बाहेरून भांडवल उभारणी करणे कठीण होऊन बसेल कारण 'कृत्रिमरित्या' खाली आणलेले हे लाभांश भागधारकांकडून धोक्याचे भांडवल पुरेशा प्रमाणात जमा करण्याच्या दृष्टीने पुरे पडणार नाहीत. अशा परिस्थितीत नव्या भांडवलाचे साधन म्हणून भागधारक कितपत महत्त्वाचे ठरतात ?

पहिल्याप्रथम हे लक्षात घेतले पाहिजे की, ऐतिहासिकदृष्टया ब्रिटनमधील उद्योग हे नव्या उद्योगांचा अपवाद वगळता, स्वतःला लागणारा पैसा स्वतःच उभारीत आले आहेत. ऐका पिढीपूर्वीदेखील, जेव्हा व्यक्तिगत शिल्लक आताच्या मानाने खूप जास्त होती, त्यावेळी तो पैसा मुख्यतः परदेशांतील गुंतवणूक, घरबांधणी, रेल्वे आणि इतर उपयुक्त बाबींत गुंतविला जात असे. आणि उद्योगांतील आपला फायदा परत धंद्यात घालून आपले काम भागवावे अशी अपेक्षा बाळगली जात असे.

आजही ही प्रवृत्ती आढळून येते— वर दर्शविल्याप्रमाणे भागधारकांच्या मोबदल्यात कपात घडवून आणणारा वितरणावरील भेदजन्य करच अवितरित नफ्याच्या रकमेत वाढ करण्यास कारणीभूत होतो आणि त्यामुळे बाहेरील भांडवलाचा आश्रय घेण्याची तितकीशी गरज राहात नाही. पूर्वीप्रमाणेच सार्वजनिक कंपन्या आजही बऱ्याच मोठ्या प्रमाणावर स्वतःला लागणारा पैसा स्वतःच उभा करीत आहेत आणि आपल्या भांडवल गुंतवणुकीच्या योजना बाजारपेठेकडे धाव न घेता पार पाडीत आहेत. आणि त्यामुळे फार मोठ्या प्रमाणावर लाभांश देऊ करून भांडवल गुंतवणूक करणारांना आकर्षून घेण्याचीही त्यांना जरूर पडत नाही. खाजगी धंद्यातील नव्या भांडवली खर्चापैकी जवळजवळ दोनतृतियांश रक्कम अवितरित नफ्यातून उभी केली जाते आणि सार्वजनिक कंपन्यांच्या दृष्टीने हे प्रमाण निश्चितच फार मोटे आहे. या दृष्टीने पाहता लाभांश देण्यासाठी खर्च करावी लागणारी रक्कम आणि औद्योगिक वाढ यातील परस्परसंबंध काही वेळा कल्पना केली जाते तितके घनिष्ठ नसतात.

नवा पैसा उभारण्यासाठी कंपन्या ज्या प्रमाणात बाजाराचा आश्रय घेतात

त्या मर्यादेपर्यंतदेखील त्यांना मुक्त हस्ताने लाभांश देण्याची सदैव तयारी दाखवावी लागतेच असे नाही. धोक्याचे भांडवल हे सर्वस्वी साधारण भागाच्या स्वरूपातीलच असते ही समजूत भ्रामक स्वरूपाची आहे. उद्योगधंद्यासाठी काढलेले बरेचसे कर्ज विक्रीला काढलेल्या शेअर्सच्या स्वरूपातील नसते तर ते निरनिराळ्या स्वरूपातील ऋणपत्रे (डिबेंचर्स) आणि ठराविक व्याजाच्या निरनिराळ्या प्रकारच्या कर्जाच्या स्वरूपातील असते. अलीकडच्या काही वर्षांत अशा तऱ्हेची कर्जे बरीच लोकप्रिय झाली आहेत. यावरून हेच सिद्ध होते की, मोठमोठ्या ब्रिटिश कंपन्यातून भांडवल गुंतवणूक करणे हे विशेष धोक्याचे मानले जात नाही आणि ठेवी घेण्यासाठी पुरेसा पैसा उपलब्ध होऊ शकतो व त्यामुळे उत्पन्नात वाढ होण्याची शक्यता नसणाऱ्या कर्जरोख्यांत ( Stock ) पैसे गुंतवायला लोकांची तयारी असते. शिवाय ईक्विटीच्या स्वरूपातील भांडवलाचा पुरवठा करतानादेखील सोन्याच्या तारणावर मिळणाऱ्या उत्पन्नापेक्षा थोडेसे जास्त उत्पन्न कसे मिळेल आणि त्याचबरोबर मोठ्या प्रमाणावर सुरक्षितता कशी लाभेल याची शोधाशोध चाललेली असते. खाजगी रित्या भांडवल गुंतवणूक करणाऱ्या श्रीमंतांना हे लागू नाही हे खरे असले तरी, भांडवल गुंतवणूक करणाऱ्या संस्थांना बऱ्याच प्रमाणात हे लागू पडते. त्याचप्रमाणे अगदी लहान प्रमाणावर गुंतवणूक करणारांच्या बाबतीत हे खरे ठरते. कारण फोनवरून सतत शेअर दलालांशी संपर्क ठेवून रोजच्या रोज कोणत्या शेअर्समुळे भांडवली फायदा अधिक होईल त्याचा कानोसा घेत राहण्याइतकी त्यांना सवडही नसते आणि त्यांचा तसा पिंडही नसतो.

अशा तऱ्हेने नव्या भांडवलाचा बराच मोठा भाग अंतर्गत मार्गाने मिळवता येतो. त्याचप्रमाणे उरलेल्या भांडवलापैकी काही भाग ठराविक व्याजाच्या रोख्यातून आणि बाकीचा भाग विक्रीला काढलेल्या नव्या शेअर्सच्या रूपाने मिळतो. नव्या भांडवलाचा आणखी काही भाग मोठ्या प्रमाणावरील भांडवली फायद्यापेक्षाही सुरक्षित गुंतवणुकीच्या शोधात असलेल्या ठेवीदारांकडून उपलब्ध होत असल्याने खालच्या पातळीवरील वितरणाचा (त्यामुळे अद्यापही काही प्रमाणात वितरणात वाढ होण्याची आणि भांडवलाचे मूल्य वाढण्याची शक्यता संभवते) नव्या भांडवलाच्या एकूण पुरवठ्यावर फारसा परिणाम घडून येणे संभवनीय वाटत नाही.

आपल्यापेक्षा भांडवल गुंतवणुकीचे प्रमाण जास्त असूनही ज्या देशात भागधारकांच्या मागण्यांबाबत सनातनी, इतकेच नव्हे तर कद्रुपणाची भूमिका स्वीकारली जाते, तेथील अनुभवावरून या निष्कर्षाला बळकटीच येते. युरोपातील इतर कोठल्याही देशापेक्षा आपल्या देशात युद्धोत्तर काळातील स्थिर गुंतवणुकीचे एकूण राष्ट्रीय उत्पादनाशी असलेले प्रमाण जास्त आहे असा दावा करणाऱ्या नॉर्वेत लाभांशावरील कायदेशीर बंधनें कायम ठेवण्यात आली आहेत. स्वीडनमध्ये एकूण

राष्ट्रीय उत्पादनापैकी जवळजवळ २०% भांडवल म्हणून गुंतविले जाते आणि तेथील उत्पादन क्षमतेत विशेष झपाट्याने वाढ होते. परंतु असे असूनही युद्ध संपल्यापासून त्या देशात लाभांश आणि शेअर्सच्या किंमतीत झालेली वाढ अगदी सौम्य आहे. नव्या भांडवलाचा पुरवठा होण्याच्या बाबतीत विक्रीला काढलेल्या नव्या शेअर्सकडून अगदीच मामुली स्वरूपाची कामगिरी बजावली जाते. कारण भांडवलाची उभारणी मुख्यत: कंपनीचा राखीव साठा, बँकेचे कर्ज, आणि कर्जरोखे यांच्याद्वारा होत असते. शेअर्सचे मूल्य आणि जिंदगीचे मूल्य यातील परस्परसंबंधाविषयी कोणाला फारशी चिंता वाटत नाही. आणि सामाजिक व राजकीय वातावरण अशा प्रकारचे असते की, उद्योगातील उलाढाली अन्य प्रकारे होऊच शकत नाहीत.

परंतु जर्मनीचे उदाहरण एकदम डोळ्यात भरण्यासारखे आहे. खाजगी उद्योगांचा पुरस्कार करणारांनी या देशाचा केवळ विक्रमी भांडवल गुंतवणुकीसाठीच गौरव केला आहे असे नव्हे तर, अनिर्बंध अर्थव्यवस्थेतील तथाकथित अभिजात गुणाबद्दल या देशाला वाटत असलेली आस्था आणि धोक्याबद्दल मिळणारा भरपूर मोबदलाही त्यांना तितकाच गौरवास्पद वाटतो. तरीदेखील १९४८ नंतर जर्मनीतील उत्पादनात आणि भांडवल गुंतवणुकीत झालेल्या नेत्रदीपक वाढीव भांडवलाच्या अनिर्बंध बाजारपेठेचा भाग अगदी अत्यल्प होता. वस्तुत: त्या देशातील उद्योगांना होणारा भांडवलाचा पुरवठाही मुख्यत्वे सरकारच्या अखत्यारातीलच बाब होती. जी काही बाजारपेठ शिल्लक होती तिच्यावर नगरपालिकांचे आणि सरकारकडून मिळणारे कर्ज आणि त्यापेक्षा बऱ्याच कमी प्रमाणात ठराविक व्याज मिळणाऱ्या औद्योगिक कर्जरोख्यांचे वर्चस्व होते. विक्रीला काढलेल्या शेअर्सनी बजावलेली कामगिरी अगदी नगण्य स्वरूपाची होती. उदाहरणार्थ १९५३ साली म्हणजे खाजगी भांडवल गुंतवणुकीचे प्रमाण सर्वात जास्त होते त्यावर्षी बाजारात फक्त ९% नवे शेअर्स विक्रीसाठी आले होते. आणि तेदेखील कंपनीच्या पुनर्रचनेमुळे बाजारात आलेले होते. नव्या भांडवल उभारणीसाठी ते विक्रीला काढलेले नव्हते.

जर्मनीतील स्थिर भांडवल गुंतवणुकीत झालेली जवळजवळ सर्वच वाढ, स्वत:चाच पैसा गुंतविण्याची प्रक्रिया, बँकेचे कर्ज आणि सरकारी निधी यामुळे घडून आली होती. जर्मनीतील या वाढीमुळे ब्रिटनमधील जनमत भयचकित होणे सहाजिक आहे. नव्या भांडवलाकरिता बाजारपेठेवर जवळजवळ कोणीच विसंबून नव्हते. त्याचप्रमाणे भागधारक आणि लाभांश यांना कसलेही महत्त्व नव्हते. याची संगती केवळ युद्धोत्तर काळातील अपवादात्मक घटनांकडे बोट दाखवून लावता येणार नाही. कारण जर्मनीतील उद्योग विक्रीस काढलेल्या नव्या सर्वसाधारण शेअर्सवर फार मोठ्या प्रमाणात कधीच अवलंबून नव्हते. किंवा तेथील उद्योगांचे वितरणविषयक धोरणही कमी उदार स्वरूपाचे नव्हते हे सर्वश्रुतच आहे. ईक्वि-

टीच्या स्वरूपातील नवे शेअर्स विक्रीला काढणे हे नव्या भांडवल उभारणीचे हमखास सर्वात प्रमुख साधन असते. किंवा लाभांशावर कोणतेही निर्बंध घातले की, त्यामुळे लगेच विकासाची गती मंदावते अशी समजूत करून घेणारांना जर्मनीतील अनुभवामुळे त्यासंबंधी निदान प्रथम विचार तरी करावा लागेल. त्यांना एकदम ह्या निर्णयाप्रत येता येणार नाही.

तें कसेही असो, ब्रिटनमध्ये अधिक मुक्तहस्ताने लाभांशाच्या रकमा दिल्या जाव्यात या म्हणण्याला, लाभांशामधील वाढ आणि ईक्वीटीच्या स्वरूपांतील बाहेरील भांडवलाच्या मागणीत होणारे बदल यात प्रत्यक्षांत काही परस्परसंबंध आहे असे दृष्टोत्पत्तीस आले तर ब्रिटनमध्ये अधिक मुक्तहस्ताने लाभांशाच्या रकमा दिल्या जाव्यात या म्हणण्याला पुष्टी मिळेल. परंतु तसे दृष्टोत्पत्तीस येत नाही. उदाहरणार्थ १९५३ साली कंपन्यांच्या हातात भरपूर रोकड रक्कम आणि रोखे बाजारात आलेले सर्वच्यासर्व नवे शेअर्स (वस्तुतः त्यांची संख्या कमालीची थोडी होती) असूनही, खाजगी कारखानदारीत झालेल्या गुंतवणुकीत अजिबात वाढ झाली नाही. तरीदेखील त्यावर्षी लाभांशामध्ये फार मोठी वाढ झालेली होती. त्याचप्रमाणे १९५४ आणि ५५ साली लाभांशामध्ये जी आणखी वाढ झाली त्याचा संबंध-अर्थात ती वर्षे निश्चितपणे वाढत्या भांडवल गुंतवणुकीची होती तरीही-बाहेरून भांडवल उभारण्याच्या गरजेशी काही संबंध होता असे यथार्थतेने दाखवून देता येणार नाही. यावरून असे सूचित होते की, लाभांशासंबंधीच्या धोरणाबाबतचे निर्णय आणि भांडवलाची भावी गरज यातील संबंध अनेकदा समजूत करून घेतली जाते तितके घनिष्ठ मुळीच नसतात आणि इतर अनेक बाबींशीच (अनेकदा निम राजकीय) ते जास्त निगडित असतात. कंपन्यांच्या लाभांशासंबंधीच्या निर्णयाबाबत शहरी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होणारी टीका जो नियमितपणे वाचीत असेल तो यापेक्षा निराळी कल्पना करूच शकणार नाही.

## ५. नवे किंवा लहान प्रमाणावरील उद्योग

तथापी सबंध उद्योगात मिळून पुरेशी आर्थिक साधनसामुग्री उपलब्ध असली तरी तेवढयामुळे प्रत्येक उद्योगाबाबत तसे असेलच असे नाही. आणि स्वतःचा विस्तार करू पाहणाऱ्या नव्या किंवा लहान प्रमाणावरील कंपन्यांवर फार मोठ्या प्रमाणात कर बसवला तर त्याची तीव्रता त्यांना फार जाणवते असे अनेकदा सूचित केले जाते. व्यक्तिगत बचतीच्या स्वरूपात झालेल्या बदलामुळे-फार मोठ्या प्रमाणावर गुंतवणूक करून आपले नशीब अजमाविण्याची तयारी असलेल्या श्रीमंतांकडून आपला पैसा सुरक्षित राहावा आणि पुष्कळदा तो एखाद्या संस्थेच्यामार्फत गुंतवला जावा अशी इच्छा बाळगणाऱ्या छोट्या ठेवीदारांकडे होणारे हस्तांतर- अशा कारखान्यांना आधीच तडाखा बसलेला असतो. त्याचप्रमाणे मोठमोठ्या सुप्रतिष्ठित

कंपन्यांच्या संयुक्त बचतीत वाढ झाली तरी त्याचा फायदा अशा छोट्या कंपन्यांना मिळू शकत नाही. कारण अशी बचत धंद्याच्या गरजेपेक्षा जास्त असेल तर ती सोन्याच्या तारणात गुंतविली जाते किंवा बँकांचे कर्ज फेडण्यासाठीं वापरली जाते. इतर अधिक धोक्याच्या उद्योगांना ती कर्जाऊ दिली जात नाही.

आणि या सर्वांवर कळस म्हणजे जादा कर आकारणीमुळे असे उद्योग आधीच डबघाईला आलेले असतात. अशा करांचा एकूण बोजा जितका जास्त (त्यातील भेदजन्य बाब क्षणभर बाजूला ठेवली तरी) तितका होणारा नफा पुन्हा त्याच उद्योगात गुंतवून त्याचा विस्तार घडवून आणण्याची शक्यता कमी, आणि त्यासाठी बाह्य भांडवलाची जरुरी जास्त. परंतु बाहेरून भांडवल मिळविण्याच्या बाबतीत मोठ्या कंपन्यांना लहान कंपन्यांवर निश्चितपणे मात करता येते. मोठ्या कंपन्या ठेवीदारांना अधिक सुरक्षिततेची हमी देऊ शकतात.त्याचप्रमाणे बँकांकडून सवलतीही त्यांना सहजासहजी मिळू शकतात. स्वतःच्या भागधारकांकडून दीर्घ मुदतीचे भांडवल उभारण्याच्या बाबतीतही त्यांना फारशी अडचण येत नाही. कर्जासाठी बाजारात उभे राहण्याची त्यांच्यावर पाळी आलीच तरी त्यासाठी त्यांना फारच थोडा खर्च पडतो. याच्या उलट लहान कंपन्यांना भांडवल मिळवणे ज्याप्रमाणे कठीण जाते त्याचप्रमाणे त्यांना ते फार महाग पडते. त्यामुळे त्यांना स्वतःच्या फायद्यावरच विसंबून राहावे लागते. आणि नफा कमी झाला तर नफ्यावरील कर त्यामानाने त्यांना अधिकच नुकसानकारक ठरतात. आणि अशा कंपन्यांना आपला विकास झपाट्याने घडवून आणण्याची इच्छा असेल तर या अडचणींची झळ अधिकच बसते.

असे झाले तर भांडवल गुंतवणूक, भरपूर खेळती साधनसामुग्री आणि पत असलेल्या मोठमोठ्या सुप्रतिष्ठित कंपन्यांत केन्द्रीभूत होण्याची प्रवृत्ती बळावेल असे म्हटले जाते. त्यामुळे एकाधिकाराला उत्तेजन मिळेल, त्याचप्रमाणे आर्थिक विकासाच्या दृष्टीने अत्यंत मोक्याच्या असलेल्या व झपाट्याने विकसित होत असलेल्या उद्योगांच्या बाबतीतच नेमका मोडता घातला जाईल. त्यामुळे सर्व कंपन्यांच्या जवळ मिळून पुरेशी आर्थिक साधनसामुग्री असली तरी नव्या बचतीची विभागणी पुरेशा कार्यक्षमतेने होऊ शकणार नाही.

वस्तुस्थिती तशी असेलही. तथापी त्यापासून होणाऱ्या धोकादायक परिणामांच्या बाबतीत काही वेळा अतिशयोक्ती केली जाते अशी मला शंका येते. अशी परिस्थिती निर्माण होण्याच्या कारणांविषयी बोलावयाचे तर केवळ युद्धोत्तर काळातील कर आकारणीकडे बोट दाखवून चालणार नाही. कारण युद्धापूर्वीही तशीच परिस्थिती होती. टिकवून धरलेल्या फायद्याच्या द्वारा जितक्या वेगाने विस्तार घडवून आणता येणे शक्य आहे, त्यापेक्षा अधिक वेगाने आपल्या उद्योगांचा विस्तार करू इच्छिणाऱ्या अनेक छोट्या आणि मध्यम आकाराच्या कंपन्या एक तर

नव्या शेअर्सची विक्री करणाऱ्या बाजारात उतरू इच्छित नाहीत किंवा अवास्तव किंमत मोजल्याशिवाय त्यांना आपला हेतू साध्य करून घेता येत नाही. यालाच नव्या कर्ज उभारणीच्या बाबतीतील कुविख्यात ' मॅकमिलन गॅप ' असे म्हणतात.

परंतु कारणे काहीही जरी असली तरी, त्यामुळे घडून येणारे परिणाम कित-पत गंभीर स्वरूपाचे असतात ? पहिली गोष्ट अशी की, मोठाल्या कंपन्यांना आपला व्याप अधिक वाढविण्यास उत्तेजन देणे म्हणजे एकाधिकाराला नेहमीच उत्तेजन देण्यासारखे असते असे नाही. बाजारपेठेच्या आकारमानात कोणताही बदल घडून आला नाही तरच कंपनीच्या प्रमाणात होणारी वाढ एकाधिकारास कारणीभूत ठरते. परंतु उत्पादन आणि उत्पन्न यात सर्वसाधारणपणे जितकी वाढ होईल तितकाच आणि त्याच वेगाने बहुतेक सर्व उत्पादित वस्तूंच्या बाजारपेठेचाही विस्तार होत असतो. शिवाय गिऱ्हाईकांत नवी आवड निर्माण झाली आणि नव्या-नव्या वस्तूंचे उत्पादन होऊ लागले म्हणजे नव्या नव्या बाजारपेठाही सतत पुढे येवू लागतात. कंपन्यांच्या प्रमाणात होणारी वाढ आणि बाजारपेठांच्या आकार-मानातील वाढ यांचा आतापर्यंत तरी एकमेकांना जवळपास छेद जात असल्याचे आढळून येते. ज्या एका देशाची तपशीलवार आकडेवारी उपलब्ध आहे त्या अमेरिकेत केन्द्रीकरणाच्या प्रमाणात विशेष अशी वाढ घडून आलेली नाही एकूण अर्थव्यवहारात तर ती निश्चितच झालेली नाही. त्याप्रचमाणे व्यक्तिगत उद्योगांत-देखील तशी वाढ झालेली नाही. सर्वात मोठचा अशा १०० कंपन्यांच्या मिळून असलेल्या एकूण औद्योगिक जिंदगीचे प्रमाण १९०९ पासून सुमारे २५% वर कायम राहिले आहे.

लहान विकसनशील कंपन्यांवर फार मोठा बोजा टाकणाऱ्या करपद्धतीमुळे परिस्थितीत बदल घडून येईल व प्रत्येक उद्योगातील प्रचंड कंपन्यांची एकाधिकार बजावण्याची ताकद वाढीस लागेल हे समजण्यासारखे आहे यात शंका नाही. तथापी यासंबंधीदेखील निश्चित असे विधान करता येणार नाही. अशा प्रचंड कंपन्यांना मुख्यत: नव्या किंवा लहान कंपन्या स्पर्धात्मक आव्हान देऊ शकणार नाहीत. पुष्कळदा त्याच उद्योगातील तशाच मोठमोठ्या कंपन्याच ते आव्हान देऊ शकतात. कारण काही मोजक्या मोठचा कंपन्या अद्यापही स्पर्धेत टिकून राहिलेल्या असतात. **ऑलिगोपॉलिस्टिक** चढाओढीला किंमतीच्या लढाईचे स्वरूप क्वचितच येत असले तरीदेखील ती स्पर्धा अत्यन्त भयानक असू शकते हे अमेरिकेतील मोटार धंद्यावरून दिसून आले आहे. किंवा कित्येकदा ती चढाओढ आयात केलेला माल, सरकारने कंपन्यांच्या एकत्रीकरणाविरुद्ध योजलेले उपाय किंवा (अगदी नेहमी घडून येणारी) जुन्या वस्तूंऐवजी जवळजवळ तशाच स्वरूपाच्या किंवा सर्वस्वी नवीन वस्तू बाजारात येऊ लागल्यामुळे अशा तऱ्हेची चढाओढ निर्माण होते. किंवा शेवटी, दुसऱ्या उद्योगांतील सुप्रतिष्ठित कंपन्या, उद्योगातील धोका विखरून ठेवण्यासाठी

किंवा त्यांच्याजवळ असलेल्या अल्प साधनसामुग्रीचा दुसरीकडे किफायतशीर रीतीने फायदा करून घेता यावा म्हणूनच केवळ आपले कार्यक्षेत्र अधिक व्यापक करू लागतात तेंव्हाही चढाओढ सुरू होते. आणि टिकवून धरलेला फार मोठ्या प्रमाणावरील नफा आणि लाभांशाचे कमी प्रमाणावरील वितरण अशा प्रकारच्या स्पर्धेला निश्चितपणे सहाय्यभूत होते कारण कंपन्यांजवळ स्वतःच्या गरजेपेक्षाही जास्त पैसा (किंवा साधन सामुग्री) शिल्लक असेल तर तो दुसऱ्या एखाद्या उद्योगांत गुंतविण्याची संधी शोधणे त्यांना भाग पडते. त्यामुळे कंपन्यांची वाढ होण्यास उत्तेजन देणे आणि एकाधिकार निर्माण होऊ देण्यास उत्तेजन देणे यात आपण फरक केला पाहिजे.

आणि कंपनीचे आकारमान वाढविण्यास (निदान एका मर्यादेपर्यंत) उत्तेजन देणे हे आर्थिक विकासास नेहमीच विघातक असते असे नाही. विशेषतः ज्यांच्यावर आपले औद्योगिक भवितव्य प्रामुख्याने अवलंबून असते अशा तंत्रविज्ञानात पुढारलेल्या उद्योगांकडून भांडवली गुंतवणुकीचे प्रमाण, तंत्र आणि विज्ञानविषयक संशोधनावर करावा लागणारा खर्च या दोहोंची, अशा तऱ्हेच्या विकासासाठी अपेक्षा असते. परंतु मोठमोठ्या कंपन्यांव्यतिरिक्त इतर कोणाजवळही अशा प्रकारची मानवी, त्याचप्रमाणे आर्थिक साधनसामुग्री उपलब्ध असणे शक्य नसते. याचा अर्थ असा नव्हे की, नवे किंवा छोटे कारखाने कधी पुरोगामी किंवा कार्यक्षम होऊच शकणार नाहीत. सांगण्याचा मुद्दा इतकाच आहे की, मोठमोठ्या सुप्रतिष्ठित कंपन्यांना सवलत देणारी करपद्धती आर्थिक विकासाला निश्चितपणे विघातक असतेच असे नाही.

अर्थात अशा तऱ्हेच्या करपद्धतीमुळे वाईट परिणाम घडून आल्याचीही काही उदाहरणे दाखवता येतील. परंतु कोणतेही धोरण अंगिकारले तरी अशी काही उदाहरणे असतात. अशी उदाहरणे म्हणजे, टिकवून धरलेल्या जादा नफ्याचा संचय करून तो नव्या भौतिक जिंदगीमध्ये नव्हे तर केवळ सुवर्णाच्या स्वरूपातील ठेवीत गुंतविला जातो. अशा गुंतवणुकीमागे कंपनीच्या ज्येष्ठ संचालकांना त्यांच्या उतारवयात ऐषआराम करता यावा हाच हेतू असतो. शहरी लोकांचा असा एक सिद्धान्त आहे की, जर हा नफा जादा लाभांशाच्या रूपाने वाटण्यात आला तर तो निकोप गुंतवणुकीच्या बाजारपेठेच्या द्वारा पुन्हा भांडवलाची जरूर असलेल्या अधिक कार्यक्षम आणि विकसनशील अशा कंपन्यांच्याकडे जाईल आणि ते अशा उदाहरणात इष्ट ठरेल आणि करआकारणीची पद्धत निराळी असेल तर असे घडून येणे सोपे जाईल. परंतु हा दृष्टीकोण वास्तववादी नाही. बहुतेक भागधारकांचा कल शिल्लक कमी टाकण्याकडेच असल्याने लाभांश हा वाढत्या खर्चात समाविष्ट होऊन जाण्याची आणि त्यामुळे एकूण शिल्लक नव्याने विभागून दिली जाण्याच्या ऐवजी ती संपुष्टात येण्याची शक्यता अधिक संभवते. असे घडून येणार असेल तर मग निदान वाढत्या

खर्चाचा फायदा भागधारकांना मिळण्याच्या ऐवजी तो कमी किमतीच्या स्वरूपात ग्राहकांच्या पदरात पडावा किंवा ' वाया जाणारी ' शिल्लक सरकारकडे तरी वळवावी आणि मग जरूर तर नफ्यावर जादा कर बसवून देखील ती पुन्हा विभागून द्यावी हे चांगले.

अर्थात बाहेरच्या भांडवलाची गरज न भासता विस्तारयोजना हाती घेण्याची इच्छा सर्वत्र दिसून येते. त्यामानाने संचय करण्यामागे अशा तऱ्हेचा हेतू असल्याचे फारसे दिसून येत नाही. आणि दोन युद्धांच्या दरम्यान जे एक सावधगिरीचे आणि निराशावादी वातावरण पसरलेले असे त्यापेक्षा सध्याच्या विस्तारवादी वातावरणानंतर हे उद्दिष्ट आणखीच विरळ असणे संभावनीय आहे. काही अपवादात्मक बाबींना तोंड देण्यासाठी करआकारणीची संपूर्ण पद्धतीच बदलून टाकणे कोणालाही शक्य होणार नाही.

परंतु पुन्हा एकदा नव्या किंवा लहान कंपन्यांकडे वळावयाचे झाले तर सध्याच्या परिस्थितीत त्यांचे महत्त्व कमी होऊ लागले आहे असे म्हणणे काय किंवा त्याच्या बरोबर उलट युक्तिवाद करणे काय, ते केवळ आपले व्यक्तिगत मत व्यक्त करण्यासारखेच आहे. परंतु ते चुकीचेही असू शकेल. आणि ते बरोबर असले तरी देखील नव्या किंवा लहान कंपन्यांनाही निश्चित अशी काही कामगिरी बजवावयाची असते आणि त्या कामी त्यांना खूप उत्तेजन दिले पाहिजे. शिवाय मोठाल्या सार्वजनिक कंपन्यांचे तौलनिक आर्थिक महत्त्व जितके जास्त, तितके व्यापक सामाजिक कारणास्तव लहान कंपन्यांकडे अधिक लक्ष पुरविणेही आवश्यक ठरते. नव्या भांडवलाच्या बाबतीत अशा कंपन्यांना कदाचित अडचणींना तोंड द्यावे लागेल. परंतु तेवढ्यासाठी सबंध औद्योगिक क्षेत्रातील करआकारणी कमी करावी किंवा जादा लाभांशाला उत्तेजन द्यावे असे खासच म्हणता येणार नाही. लहान लहान कंपन्यांना मदत करण्यासाठी जगड्व्याळ अशा प्रत्येक औद्योगिक कंपन्यांच्या भागधारकांना मेहेरबानीखातर सवलती देण्यात काहीच अर्थ नाही. त्याचप्रमाणे त्यांच्यासमोर काही अडचणी आहेत येवढ्यासाठी खाजगी क्षेत्रातील संपूर्ण धोरणाचा फेरविचार करण्याचीही आपल्याला काही आवश्यकता नाही. म्हणून सार्वजनिक कंपन्यांच्या वितरणविषयक धोरणावर आपली पकड असली पाहिजे. परंतु त्याचबरोबर सर्वात जास्त झळ बसणाऱ्या लहान लहान कंपन्यांना सहाय्य करण्यासाठी जरूर तर, आणि वरील विवेचनामुळे लहान कंपन्यांचे महत्त्व कमी लेखले जात असेल तर, त्या क्षेत्रात भांडवल पुरवठ्याच्या योजनांचा सुकाळ करण्याच्या दृष्टीने खास उपायांचा देखील अवलंब केला पाहिजे. अर्थात मोठ्या कंपन्यांना सहाय्याची जरूर असेल तर यापैकी काही उपाय त्यांनाही सहाय्यभूत होऊ शकतील.

फक्त लहान कंपन्यांना मदत करण्याचा अगदी चटकन लक्षात येणारा मार्ग म्हणजे कंपन्यांवर बसविण्यात आलेला कर खालच्या टोकाला चढत्या प्रमाणात

बसविणे हा होय. हे चढते प्रमाण किरकोळ स्वरूपात आजही आस्तित्वात आहेच. नफ्यावरील कर हा नफ्याच्या पहिल्या २००० पौंडापर्यन्त आकारला जात नाही आणि १२,००० पौंडांपर्यन्त तो कमी दराने आकारला जातो. नफ्यावरील कराच्या प्रमाणात वाढ करता येईल किंवा पहिल्या 'क्ष' हजारापर्यंतच्या भांडवली खर्चावरील गुंतवणूक–सवलतीत वाढ करूनही हे साध्य करता येईल.

दुसरे असे की, सध्या आस्तित्वात असलेल्या भांडवलाचा पुरवठा करणाऱ्या संस्थांना त्यांच्याजवळील पैसा मोठ्या प्रमाणात उद्योगांत गुंतविण्यास उत्तेजन देता येईल किंवा त्यांच्यावर तशी सक्तीही करता येईल. काही अत्यंत प्रतिष्ठित अशा लोकांनी आता हे मान्य केले आहे की, विमा कंपन्या आणि निवृत्ती वेतन निधी यांनी आता सधन खाजगी ठेवीदारांची जागा घेतली असल्याने राष्ट्रीय दृष्टीने पाहता गुंतवणुकीच्या धोरणाबाबत अधिक धाडसाचे पाऊल उचलणे हे तर्कशुद्ध ठरेल. विमा कंपन्या-भांडवल गुंतवणारी सर्वात मोठी संस्था- सध्या त्यांच्याजवळील निधीपैकी १२% ते १५% रक्कम सर्वसाधारण शेअर्समध्ये गुंतवितात. त्यांनी यात वाढ केली पाहिजे असा आग्रह धरण्यात आला तर त्यांच्याकडून असे सांगितले जाते की, विमाधारकांकडे सर्वप्रथम लक्ष पुरविणे हे त्यांचे कर्तव्य आहे. आणि विमाधारक आर्थिक अडचणीत सापडलेल्या ब्रिटिश उद्योगांना मदत करण्यासाठी विमा उतरत नसून स्वतःच्या सुरक्षिततेसाठी ते विमा घेत असतात. विमा उतरण्यामागे विमेदारांचा हेतू भविष्याची तरतूद करून ठेवणे हा असतो. भिकेची झोळी हातात यावी म्हणून ते विमा उतरवीत नसतात असे विमा कंपन्या बजावीत असतात. त्यांचे हे म्हणणे अगदी संयुक्तिक आहे. परंतु अनेक तज्ञांचे मत असे आहे की, या विमा कंपन्यांच्या कक्षेत येवढे मोठे क्षेत्र असते की, विमेदारांच्या हक्काला जरासुद्धा धक्का लागू न देता त्यांना औद्योगिक क्षेत्रात अधिक व्यापक प्रमाणात सहभागी होता येईल. कोणत्याही परिस्थितीत, भांडवल पुरवठ्याला अनन्यसाधारण महत्त्व असलेल्या नियोजित अर्थव्यवस्थेत, कोणत्याही तऱ्हेचे सार्वजनिक पर्यवेक्षण असल्याशिवाय किंवा सरकारी धोरणाशी सक्तीने मिळतेजुळते घेण्यास भाग पाडल्याशिवाय एवढाल्या प्रचंड निधीची उलाढाल करण्याची परवानगी असावी हे तर्काला सोडून वाटते. औद्योगिक व्यवसायाचे राष्ट्रीयीकरण समाजकल्याण साधण्याच्या दृष्टीने तर समर्थनीय ठरतेच, परंतु त्यातही भांडवलाच्या बाजारपेठेवर नियंत्रण ठेवण्याचा प्रश्न उपस्थित होतो तेव्हा तर हे राष्ट्रीयीकरण अटळ होऊन बसते.

तिसरा मुद्दा असा की, ज्या कंपन्यांना नव्या भांडवलाची जरूर असेल, त्यांना ते पुरविण्यासाठी, किंवा त्याबाबतची त्यांची गरज कमी करण्यासाठी अथवा नव्या योजनातील काही धोका स्वतः पत्करण्यासाठी सरकार स्वतःच पदार्पण करू शकेल. दुर्मिळ उत्पादनापैकी सर्वच्या सर्व किंवा काही भाग विकला जाण्याची हमी घेणे ( विमानांच्या सांगाड्यांना लागणारे हैड्रॉलिक प्रेस किंवा टिटॅनियम यांच्या–

बाबतीत सरकारने अशी हमी घेतली होती ), विकासासंबंधीचे करार घडवून आणणे ( विमानाच्या धंद्यात अशा तऱ्हेचे करार फार मोठ्या प्रमाणावर करण्यात आले होते ), कारखाने बांधून देणे ( औद्योगिक विकासासाठी निवडलेल्या क्षेत्रा-प्रमाणे ), अशा तऱ्हेचे नानाविध उपाय सरकार सध्यादेखील योजीतच असते. त्याशिवाय एखाद्या धंद्यातील धोक्याचा सर्वच्या सर्व भार पत्करण्याची तयारी ठेऊन सबंध कारखाना स्वखर्चाने उभारून सार्वजनिक उद्योगाप्रमाणे तो स्वतःच चालविणेदेखील सरकारला शक्य आहे.

अशा तऱ्हेने इतक्या प्रत्यक्षपणे पदार्पण न करता, सुस्थितीत असलेल्या लहान आणि मध्यम आकाराच्या उद्योगांना नेहमीच्या मार्गांनी लांब मुदतीचे कर्ज मिळ-ण्यात अडचणी येत असतील तर ते मिळवून देण्यासाठी आर्थिक संस्थांच्या सहकार्याने 'इंडस्ट्रियल अॅण्ड कमर्शियल कॉर्पोरेशन' स्थापन करण्यासारखा उपक्रमही हाती घेण्यात आलेला आहे. या कॉर्पोरेशनचे कार्य अत्यंत कौतुकास्पद असले तरीदेखील ते अत्यंत लहान प्रमाणावर चालते आणि ते इतक्या सावधपणे वागत असते की, त्यामुळे-परिस्थितीत फारच थोडा फरक घडून येतो. (सुरुवातीच्या काळात, आणि विशे षतः कॉर्पोरेशनकडे जमा होणारा पैसा प्रामुख्याने खाजगी संस्थांमधूनच येत असल्या मुळे ते साहजिकही आहे. )

त्यामुळे अशी सूचना पुढे येते की, अर्थसंकल्पीय शिलकीतील रक्कम वर्ग करून सरकारने राष्ट्रीय भांडवल गुंतवणूक मंडळ स्थापन करावे ( गेल्या प्रकरणात सुचविलेल्या वारसाकर आयुक्तांच्या खात्याशीही ते जोडता येऊ शकेल) आणि खाजगी कंपन्यांच्या बरोबरीने, परंतु त्यांच्या कारभारात हस्तक्षेप न करता त्याचे कामकाज चालविण्यात यावे. याबाबत नमूद करण्यात आलेली अट महत्त्वाची आहे. नव्या भांडवलाची चणचण भासत असूनही अनेक कंपन्या आपल्या भागभांडवलापैकी काही भाग विमा कंपन्यांच्यादेखील हवाली करण्यास तयार नसतात आणि सर-कारच्या तर ते कधीच हवाली करणार नाहीत. कारण आपल्या कारभारात दुस-ऱ्याचे नियंत्रण आणि हस्तक्षेप होईल अशी त्यांना भीती वाटत असते. म्हणून या सूचनेला बळी पडण्यापेक्षा आपला नफा परत उद्योगात गुंतवून जेवढा विस्तार करता येण्यासारखा असेल तितकाच तो करण्यासाठी विकासाचा वेग मंदावू देणेच ते पसंत करतील. म्हणून सरकारच्या अशा कोठल्याही संस्थेने आपले नियंत्रण बस-विण्याचा प्रयत्न करता कामा नये आणि अगदी सामान्य भागधारकाइतक्या त्रयस्था-प्रमाणे वागले पाहिजे. असे झाले नाही तर कॉर्पोरेशनजवळ भरपूर पैसा आणि मनुष्यबळ असूनही कोणी अर्जदारच तिकडे फिरकणार नाही.

तसे पाहू जाता नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने कॉर्पोरेशन अजिबात सोयिस्कर ठरणार नाही. समाजवाद्यांनी ( या आणि इतर संदर्भातही ) हे लक्षात ठेवले पाहिजे की, एकाद्या उद्योगावर नियंत्रण ठेवणे आणि त्याला भांडवलाचा पुरवठा करणे

किंवा त्या उद्योगातील शेअर्सवर स्वत:ची मालकी असणे या अगदी स्वतंत्र बाबी आहेत. आणि त्यासाठी अगदी निरनिराळ्या प्रकारची प्रशासकीय आणि नोकर-वर्गाची यंत्रणा असावी लागते.

आणि शेवटी कर्ज पुरवठ्यासंबंधीच्या धोरणातही सुधारणा घडून येण्याची शक्यता आहे. ब्रिटनमधील बँका उद्योगांना ( प्रत्यक्ष किंवा ठेवीच्या स्वरूपात ) लांब मुदतीचे कर्ज नाकारतात आणि त्या दृष्टीने सर्व उद्योगप्रधान देशांत ब्रिटन हे एक अपवादात्मक राष्ट्र आहे हे आपण विसरतो. दुसऱ्या कित्येक देशांत नव्या भांडवलाचा पुरवठा करण्याच्या बाबतीत तेथील बँका कितीतरी अधिक आणि प्रत्यक्ष स्वरूपाची कामगिरी बजावतात आणि अशा परिस्थितीत बँकिंग आणि उद्योग यांची फारकत करण्याचा इतर कोठेही न आढळणारा प्रकार, सधन खाजगी ठेवीदारांच्या जमान्यांत तर्कदृष्टया अगदी संयुक्तिक असला तरी, आता मुळीच समर्थनीय ठरत नाही हे सहज दाखवून देता येण्यासारखे आहे. गेल्या दोन दशकात सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीत इतका बदल घडून आला असताना-देखील बँकांनी उद्योगांसंबंधीच्या आपल्या धोरणात जवळपास कसलाही बदल करू नये आणि शहरांतील प्रभावी व्यक्तींकडूनही क्वचितच तसा आवाज उठविला जावा हे खरोखरीच अतिशय विचित्र म्हटले पाहिजे. इतरत्र येणारा अनुभव जमेस धरता, नव्या भांडवल पुरवठ्याबाबत तीव्र टंचाई भासत असतांना आपले सध्याचे बँकिंगसंबंधीचे धोरण इतके पवित्र का मानावे किंवा बँकांच्या मार्फत उद्योगांना कर्जपुरवठा करण्याची योजना का आव्हेरावी ते समजू शकत नाही. तसे करण्याला कोणतेच कारण दिसत नाही.

ही सर्व शक्यता लक्षात घेता, छोट्या प्रमाणावरील उद्योगांतदेखील कंपन्यां-वरील जादा करआकारणीमुळे नव्या भांडवलाचा इतका तीव्र तुटवडा का भासावा, त्याचप्रमाणे आपल्या देशासारखी पुढारलेली आणि प्रगल्भ अर्थव्यवस्था असलेल्या देशाला भांडवल गुंतवणुकीची सारखीच आवश्यकता आणि मागणी असतानादेखील त्यासाठी पैशाच्या स्वरूपातील भांडवलपुरवठा करण्याची साधने आपल्याला का उपलब्ध होऊ नयेत, किंवा त्याबाबतीत आपल्याला असमर्थता का वाटावी ते समजू शकत नाही या बाबतीत प्रयोग करून पाहण्याची इच्छा असेल तर जादा कर आकारणीमुळे भांडवल पुरवठ्याच्या बाबतीत निर्माण होणाऱ्या अडचणी सबंध गुंतवणूकच स्थगित करण्यास भाग पाडतील किंवा त्याच्या वितरणात अतिशय गैरव्यवस्था निर्माण होण्यास त्या कारणीभूत होतील, अशी शक्यता मला तरी दिसत नाही.

## ६. समाजवाद्यांसमोरील पर्याय

यावरून मी असा निष्कर्ष काढतो की, जादा व्यापारी करामुळे होणाऱ्या

अनिष्ट परिणामांबाबत पूर्वी अतिशयोक्ती केली जात असे. आणि यापुढेही जर तसे परिणाम घडून येऊ लागले तर ते टाळण्यासाठी अनेक उपाय योजता येण्यासारखे आहेत. अशा तऱ्हेने झपाट्याने विकास होत गेला की, नफ्यातही अपरिहार्यपणे वाढ होते. भागधारकांना त्यामुळे अवास्तव फायदा होऊ देऊ नये यासाठी कोणता मार्ग अवलंबावयाचा ते कोठल्याही भयानक इशाऱ्याला न जुमानता निर्विकारपणे ठरविले पाहिजे.

याबाबत आणखीही दोन मार्ग संभवितात. त्यापैकी एक मार्ग असा की, भागधारकांकडून वसूल करण्यात येणारा सर्वच्या सर्व संयुक्त कर किंवा त्यापैकी काही भाग व्यक्तिगत स्वरूपाच्या करात रूपांतरित करण्यात यावा आणि दुसरा मार्ग म्हणजे लाभांशावर कायद्यानेच काही बंधने घालण्यात यावीत.

यापैकी दुसरा मार्ग हा सतराव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे इतर कोठल्याही मार्गापेक्षा अधिक गुंतागुंतीचा असेल आणि त्यामुळे अगदी शेवटचा उपाय म्हणूनच त्याचा विचार केला जावा. परंतु संयुक्त कराचा काही भाग व्यक्तिगत करात रूपांतरित करून घेण्याच्या बाजूने बरेच बोलता येण्यासारखे आहे मात्र असे करताना भांडवली नफ्यावर कर बसवताना नफ्यावरील करात कदाचित थोडी कपात करावी लागेल. आर्थिक दृष्ट्या भांडवली फायद्यावरील कर हा विशेष (कमी किंवा जास्त) कार्यक्षम असतो असे नाही. परंतु वितरणाच्या दृष्टीने तो निश्चितच जास्त न्याय्य आणि कार्यक्षम असतो. कारण एखाद्या व्यक्तीला प्रत्यक्ष मिळणाऱ्या फायद्यावरही तो आकारला जातो. (या उलट संयुक्त किंवा कंपन्यांवरील कर हा निरनिराळ्या व्यक्तींच्या फायद्याच्या मानाने अगदीच अनिश्चित स्वरूपाचा असतो.) ठेवींच्या व्यतिरिक्त इतर स्वरूपाच्या मालमत्तेमुळे मिळणाऱ्या फायद्यावरही तो बसतो. परंतु हा फक्त मर्यादित पर्याय आहे. हा कर चढत्या श्रेणीने न आकारता सरसकट दराने त्याची आकारणी करण्यासाठी तशीच काही आकर्षक कारणे आहेत. आणि त्यामुळे उद्योगांवरील कर संपूर्णपणे रद्द करण्यात आला तर त्यामुळे श्रीमंतांचा मात्र भरमसाठ फायदा होईल.

शेवटी कोणतेही मार्ग पत्करले तरी, रोजगाराची पातळी बरीच वरची ठेवून आणि विकासाची निकोप गती सांभाळून, परंतु इतर समाजाला झळ पोहोचत असतांना भागधारकाला मात्र अधिकाअधिक श्रीमंत बनू न देता, आपल्याला मिश्र अर्थव्यवस्था चालू ठेवता येणार नाही असे म्हणण्यासारखा कोणताही पुरावा दाखवता येणार नाही. आपला समाज ज्या तऱ्हेचा आहे त्याला अधिक बळकटी येण्यासाठी आणि ज्याच्यामुळे अंतिम मर्यादा पडू शकतात अशा राष्ट्रीय बचतीचा पुरवठा व्हावा यासाठी विस्तार घडून यावा म्हणून सामाजिक, आर्थिक आणि तंत्रविज्ञान विषयक दडपणे येत असतात. परंतु मोठ्या प्रमाणावरील नफा आणि फायद्यापासून मिळणारे कमी प्रमाणावरील उत्पन्न यांची

सांगड घालण्याचे धोरण अवलंबिले तरी नव्या भांडवलाच्या मागणीला किंवा पुरवठ्याला धोका निर्माण होण्याइतका प्रगतीचा वेग रोखून धरला जाईल असे मुळीच नाही.

डाव्या गटातील काही अर्थशास्त्रज्ञ हा निष्कर्ष मान्य करणार नाहीत हे खरे आणि हा सर्वच प्रयत्न प्रायोगिक स्वरूपाचा आहे याबद्दलही काही शंका नाही. परंतु इतर देशांचा अनुभव जो जो विचारात घेतला जातो तो तो नव्या औद्योगिक भांडवलाचा पुरवठा करण्याचा एकमेव असा दुसरा कोणताही मार्ग उपलब्ध नाही त्याचप्रमाणे भांडवलाच्या वृद्धीसाठी भागधारकांचे अमुकच एक स्थान असले पाहिजे मालमत्तेवरील उत्पन्नाची अशीच एकमेव पातळी असली पाहिजे असे नाही. याविषयी अधिकाधिक खात्री पटू लागते. या सर्व गोष्टी, सामाजिक, सांस्कृतिक आणि ऐतिहासिक बाबींवर अवलंबून असतात. मिश्र अर्थव्यवस्थेचे अनेक व्यवहार्य फायदे आहेत. त्याचप्रमाणे ब्रिटिश लोकांच्या स्वभाव-धर्माशी ती अधिक मिळतीजुळती आहे हे माझ्याप्रमाणेच मजूर पक्षालाही मान्य असेल तर हा प्रयोग यशस्वी होईल अशी परिस्थिती निर्माण करणे ही मजूर पक्षाची जबाबदारी ठरते.



# प्रकरण अेकविसावे

# वेतननिश्चिती

## १. वेतन आणि कामगारांचे अभिसरण

सरकारने व्यक्तिगत उत्पन्नासंबंधीच्या योजनाबद्ध धोरणाचा अेक भाग म्हणून वेतनासंबंधीही तपशीलवार धोरण जाहीर केले पाहिजे असे समाजवाद्यांना वाटते. तसेच सर्व राजकीय विचारसरणीवर भाष्य करणारांपैकी अनेकजण अनिर्बंध अर्थ-व्यवहाराबद्दल असमाधान व्यक्त करतात. अनिर्बंध अर्थव्यवहाराला आज समाजातील अेकाद्या गटाच्या वेतनाबाबतच्या सौद्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे.

वेतन निश्चित करण्याचा प्रश्न हा नेहमीच अत्यंत गुंतागुंतीचा होऊन बसतो. कारण वेतनाकडून अनेक कार्ये पार पडत असतात. किमतीच्या पातळीच्या संदर्भात वेतनावरून वेतनधारकांचे प्रत्यक्ष उत्पन्न किती ते निश्चित होते आणि म्हणून अेकूण उत्पन्नाचे वितरण योग्यप्रकारे होत आहे की नाही, या सामाजिक आणि नैतिक प्रश्नाशीही ते निगडित असते. निरनिराळ्या कामाचा पुरवठा करणाऱ्या बाबींचे जरूर ते पुरवठामूल्य निश्चित करण्याचे आर्थिक कार्यही वेतनाकडून पार पडत असते. उदाहरणार्थ :– विशिष्ट कारखान्याला किंवा उद्योगाला होणारा कामगार वर्गाचा आणि कामगारांचे विशिष्ट कौशल्य किंवा विशिष्ट प्रकारचे श्रम आणि स्वच्छेने केले जाणारे शारीरिक प्रयत्न यांचा पुरवठा. आणि सरतेशेवटी उत्पादन खर्चातील तो अेक महत्त्वाचा भाग असल्याने किमतपातळी, आंतरराष्ट्रीय देवघेवीचा ताळेबंद, उद्योगांतील स्पर्धात्मक कार्यक्षमता इत्यादींवरही त्याचा प्रभाव पडत असतो. काही अंशी आर्थिक आणि काही अंशी सामाजिक मूल्यांचे निदर्शक पैलू असलेल्या वेतनाच्या या बाबींवरून पैशाच्या स्वरूपातील वेतनाची असाधारण 'कमाल'पातळी किंवा वाटप कधीही सूचित केले जात नाही. आणि वेतननिश्चिती ही निरनिराळ्या परस्परविरोधी बाबींचा समतोल साधणारी काहीशी गोंधळाची आणि विचित्र अशी प्रक्रिया असते.

वेतनासंबंधीच्या ज्या दोन बाबींवर युद्धोत्तर काळांतील बहुतेक सर्व चर्चा केन्द्रित झाली होती आणि या प्रकरणातही ज्याचा सर्वात जास्त उहापोह करण्यात आला आहे त्या बाबी म्हणजे– एक : वेतनविषयक धोरणाचा श्रमाच्या वाटपावर घडून येणारा परिणाम आणि दोन : वेतन मूल्य वाढत जाण्यामुळे निर्माण होणारे धोके.

सामुदायिक सौदा घडवून आणण्याच्या बाबतीत येणाऱ्या 'विशिष्ट गटाच्या स्पर्धात्मक' सौद्याच्या स्वरूपामुळे वेतनाचा ढाचा अतिशय जथाबंद होणे अपरिहार्य ठरते, असे अनेकदा प्रतिपादन केले जाते. स्वतंत्रपणे काम करणारी संघटना, आपल्या मागणीचा राष्ट्रीय हितावर किंवा इतर कामगारांवर काय परिणाम घडून येईल याचा विचार न करता पगारासंबंधीच्या आपापल्या मागण्या स्वतंत्रपणे मांडीत असतात. वेतनासंबंधीचे परंपरागत संबंध कायम टिकावेत या फिकिरीत असलेल्या इतर कामगार संघटनाही मग तोच मार्ग अनुसरतात. त्याचा परिणाम असा होतो की, सगळ्याच वेतनात वाढ होते आणि त्यामुळे पातळी पुन्हा जिथल्या तिथेच राहाते. समाजात बेकारी असेल तर त्यामुळे फारसे गंभीर परिणाम घडून येत नाहीत कारण बेकारीच्या काळात पगारवाढीपेक्षा नोकऱ्यांची संधी उपलब्ध करून देणे हेच कामगार चळवळीचे मुख्य काम होऊन बसलेले असते. परंतु ज्यावेळी बेकारी नसेल आणि प्रत्येक उद्योगांत नवीन भरती होत असेल त्यावेळी कामगार वर्गाच्या अभिसरणाच्या दृष्टीने निरनिराळ्या उद्योगांतील तौलनिक वेतन प्रमाणात बदल घडून येणे आवश्यक असते. परंतु तसे तर घडून येत नाही.

आता कामगारवर्गाचे अभिसरण हे व्यवहारात मुख्यत: वेतनातील तफावतीमुळे घडून येते किंवा काय याविषयीच शंका आहे. ते कसेही असले तरी बेकारी अजिबात नसतानादेखील निरनिराळ्या वेतनप्रमाणावर मागणी आणि पुरवठा यामुळे येणाऱ्या दडपणाचा निश्चितच परिणाम घडून येतो; आणि गेल्या काही वर्षात ब्रिटनमधील वेतनरचनेत बरेच बदल घडून आले आहेत. बेकारीच्या काळात वेतनाच्या दरातील परस्परसंबंधात असलेली तौलनिक स्थिरता आणि भरपूर रोजगार उपलब्ध असते वेळी त्यात जाणवण्याइतके पडणारे स्थित्यंतर यातच खरी तफावत असते. यासंबंधी काही उदाहरणे द्यावयाची तर १९३८ ते १९४८ च्या दरम्यान सर्व उद्योगांतील आठवड्याच्या उत्पन्नात ११४ टक्के वाढ झालेली दिसते, परंतु कोळशाच्या बाबतीत ही वाढ २०६ टक्के होती तर शेतीच्या क्षेत्रात किमान वेतन जवळजवळ तिपटीने वाढले होते. १९४७ ते १९५५ च्या दरम्यान खाण कामगारांचे सरासरी उत्पन्न आठवड्याला जवळजवळ सहा पौंडांनी, गोदी कामगारांचे आणि जहाजबांधणी करणाऱ्यांचे चार पौंड दहा शिलिंगांनी, रेल्वे कामगारांचे चार पौंडांनी, कापड कामगारांचे तीन पौंड दहा शिलिंगांनी वाढले तर शेतमजुरांचे मात्र फक्त दोन पौंड दहा शिलिंगांनीच वाढले.

शिवाय सुरुवातीला वेतनामध्ये फेरबदल झाले त्यावेळी सर्वसाधारणपणे मागणीचे प्रमाण जास्त होते. कमी कामगार असलेल्या उद्योगांत वेतनवाढ मिळाली तर इतर उद्योगांनादेखील आपापल्या कामगारांच्या संख्येत घट होऊ नये म्हणून त्या प्रमाणात वेतनवाढ देण्याच्या दृष्टीने बाजारपेठ अजिबात प्रतिकूल नव्हती. विक्रीत घट होण्याचा फारसा धोका निर्माण न होता वेतनवाढीचा बोजा ग्राहकांकडे वळवणे सहज शक्य होई. परंतु चलनफुगावाची परिस्थिती नसतांना भरपूर रोजगार उपलब्ध असेल आणि क्रयवस्तूंची एकूण मागणी आणि पुरवठा यात साधारण समतोल असेल तर वरीलप्रमाणे वेतनवाढीचे ओझे ग्राहकांवर लादणे हे अगदी सहजासहजी शक्य होणार नाही. वेतनात फार मोठी वाढ करून ती ग्राहकांकडून वसूल करावयाची म्हटले तर खप कमी होण्याचा धोका निर्माण होईल आणि कामगारांची तीव्र टंचाई जाणवत नसलेल्या उद्योगांतील मालकवर्गाला इतरत्र दिल्या जाणाऱ्या वेतनविषयक सवलतींची दखल न घेऊन चालणार नाही. अशा तऱ्हेने मागणीत सर्वसाधारण वाढ दिसून येत नसेल तर त्यामानाने वेतनविषयक चळवळी होण्याचा जास्त संभव असतो. आणि १९३८ ते १९४८ च्या चलन फुगावाच्या दशकात वेतनात घडून आलेले बदल अधिक जाणवण्यासारखे होते.

विशेषत: मागणी जास्त नसेल तर भरपूर रोजगार उपलब्ध असतांनादेखील, कामधंदा मिळण्याच्या शक्यतेतील तफावत वेतनासंबंधीच्या चळवळीतील चढउतारावर आपला वरचष्मा प्रस्थापित करील. चलन फुगावाच्या काळांत ज्यावेळी जवळजवळ सर्वच उद्योगांना कामगार टंचाईची झळ बसत होती त्यावेळी हे दडपण काहीसे सुप्त होते. परंतु एकदा परदेशातील बाजारपेठ ग्राहकांपेक्षा विक्रेत्यांना अनुकूल झाल्याबरोबर आणि त्याच्या जोडीला देशातल्या देशात चलनवाढीचा रेटा बसू लागल्याबरोबर अंतिम मागणीतील चढउताराला नेहमीचे महत्त्व प्राप्त झाले. निरनिराळ्या उद्योगांतील मालाचा खप आता मर्यादित होऊ लागला तो त्यांना अधिक माल उत्पादन करणे अशक्य होते म्हणून नव्हे, तर बाजारपेठांचे आकारमान आणि इतर उत्पादकांच्या चढाओढीला तोंड द्यावे लागल्यामुळे, तसेच विशेषत: निर्यातीसाठी केल्या जाणाऱ्या उत्पादनाच्या बाबतीत मागणीत अचानक होणाऱ्या चढउतारामुळे, अनेकदा त्या कारखानदारांना कामगार कपात करणे भाग पडते. कापड उद्योगाला यामुळे गेली काही वर्षे तडाखा सहन करावा लागला आहे, आणि त्याचा परिणाम असा झाला की, कामगार बऱ्याच मोठ्या प्रमाणात कापड गिरण्यांच्या विभागात विखुरले गेले. स्पर्धेवर आधारलेल्या, आणि चलन फुगाव नसलेल्या अर्थव्यवस्थेत, विशेषत: ती अर्थव्यवस्था आपल्यासारखी निर्यातीवर भर असलेली असेल तर, कामगारांच्या मागणीबाबतच्या तौलनिक चढउतारामुळे सर्वांना कामधंदा मिळण्यासारखी परिस्थिती असूनही अभिसरणाला बऱ्याच मोठ्या प्रमाणात चालना मिळेल. विमा उतरलेल्या लोकसंख्येपैकी वेकारांचे प्रमाण दोन

टक्क्यांच्या वर न जाणाऱ्या अर्थव्यवस्थेत या अभिसरणाचे प्रमाण सामान्यत: लोकांना वाटते त्यापेक्षा खूपच जास्त असते. १९५० ते १९५३ च्या दरम्यान अभियांत्रिकी, जहाजबांधणी, वाहने आणि धातूंच्या वस्तूंच्या उद्योगांत गुंतलेल्या कामगारांच्या संख्येत २००,००० नी (सुमारे ६%) वाढ झाली. कामगारांच्या एकूण संख्येत वाढ झाल्यामुळेच काही प्रमाणात हे शक्य झाले, पण त्याचबरोबर इतर उद्योगांतील कामगारांच्या संख्येत जी निव्वळ घट झाली तीही या वाढीला कारणीभूत होती. कापड गिरण्या आणि कपडे शिवण्याचे कारखाने यांतील कामगारांची संख्या ३५,००० नी घटली तर वाहतूक धंद्यातील ३८००० कामगार कमी झाले. शेती आणि सार्वजनिक प्रशासन यातील कामगारांची घट अनुक्रमे ४८००० आणि २७,०००, इतकी होती. यावरून अभिसरण घडून येण्यासाठी 'बेकारीचा डोस' मिळण्याची किंवा वेतनाबाबत राष्ट्रव्यापी धोरण अवलंबिले जाण्याची आवश्यकता असल्याचे कोणतेही चिन्ह दिसून येत नाही. युद्धोत्तर काळांतील आर्थिक धोरणावर आक्षेप घेणाऱ्या एका नियतकालिकाच्या शब्दात सांगावयाचे तर भरपूर रोजगार मिळू लागला म्हणजे जे अनेक परिणाम घडून येतील अशी लोकांना धास्ती वाटत असे, त्यातील निदान एक तरी – म्हणजे कामगारांचे अभिसरण कमी प्रमाणात होऊ लागेल ही भीती प्रत्यक्ष व्यवहारात खरी ठरलेली नाही.

युद्धानंतरच्या वर्षात लोकांची याच्या उलट समजूत होती असे दिसून येते. तथाकथित कमी मजुरावर चालवाव्या लागणाऱ्या उद्योगांमुळे निर्माण झालेल्या रचनात्मक समस्येची ती प्रतिक्रिया होती. त्यावेळी ती इतकी गंभीर वाटत असे की, त्यामुळे निराशेचेच वातावरण निर्माण झाले होते. विशेषत: सर्वांना रोजगार मिळण्याजोगी परिस्थिती असली म्हणजे तर असे हमखास होणारच अशी लोकांची चुकीची समजूत असल्यामुळे ही निराशा पसरली होती.

परंतु आता अर्थव्यवस्था नेहमीच्या अवस्थेला येऊन पोहोचली असल्यामुळे चलनफुगाव नसेल तर कामगारांचे अभिसरण कार्यक्षमतेने घडून येण्यासाठी वेतनासंबंधी मध्यवर्ती धोरण असण्याची आवश्यकता नाही असे आपण पुरेशा विश्वासाने म्हणू शकतो. याचा अर्थ व्यक्तिगत स्वरूपाचे (उदा. कोळसा) सर्व प्रश्न मिटलेले असतात किंवा वेतनातील सर्व तफावत आणि त्यांचे परस्पर संबंध हे सामाजिक किंवा आर्थिक दृष्टया पूर्णपणे बुद्धीला पटण्यासारखे किंवा समर्थनीय असतात असेही नाही. त्याचा अर्थ इतकाच की, प्रमाणशीर वेतन मिळावे म्हणून चळवळी होतच असतात. आणि प्राय: त्या योग्य दिशेने चाललेल्या असतात. तसेच या आणि (मुख्यत:) इतर कारणास्तव सर्वसाधारणपणे समाधानकारक प्रमाणात कामगारांची चळवळही सुरू असते. अभिसरण घडवून आणण्याची समस्या पुढील काळात अधिकच बिकट झाल्याचे दिसून आले. उदा.:– स्वयंचलित यंत्रामुळे कामगारांची आवश्यकता न उरणारी स्थानिक क्षेत्रे निर्माण झाली किंवा आहे त्या कामाला

चिकटून राहण्याची प्रवृत्ती वाढीला लागली– वेतनासंबंधी राष्ट्रीय स्वरूपाचे धोरण आखल्याने ती समस्या सुटणार नाही तर त्यासाठी व्यावसायिक प्रशिक्षण, कामगारांना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठी लागणाऱ्या खर्चाची भरपाई करण्यासाठी अनुदाने देणे आणि नवे उद्योग कोठे सुरू करावयाचे त्यावर नियंत्रण ठेवणे याबाबत अधिक जोरदार धोरणाचा सरकारला अवलंब करावा लागेल.

## २. वेतन आणि किंमतवाढ

लोकांना वाटणारी दुसरी कायमची भीती म्हणजे एका गटाकडून वेतनाच्या बाबतीत घडवून आणलेल्या सौद्यामुळे वेतन किंमतवाढीचे घातचक्र सुरू होईल. कारण कामगारांच्या दृष्टीने विक्रेत्यांना अनुकूल असलेल्या बाजारपेठेमुळे मागण्या पदरात पाडून घेण्याची कामगारांची ताकद खूपच वाढलेली असेल व कामगार संघटना त्याचा नेमका लाभ उठवल्याशिवाय राहणार नाहीत. परिणामी वेतनात जी वाढ होईल ती अत्यंत घातक ठरेल. म्हणजे निर्यात, ठराविक उत्पन्न मिळविणारांची परिस्थिती, आणि सर्वसाधारण सामाजिक सुस्थिरता यांना धोका निर्माण होईल. सर्वांना रोजगार उपलब्ध होणे आणि वेतनाच्या बाबतीत सौदा करण्यावर निर्बंध नसणे या सर्व गोष्टींना शेवटी अंतरावे लागेल. अर्थव्यवस्थेच्या इतर सर्व बाबींचे नियोजन करावयाचे परंतु वेतनावर मात्र कोठल्याही प्रकारचे नियंत्रण ठेवावयाचे नाही हे धोरण कोठल्याही परिस्थितीत तर्काला धरून होणार नाही. त्याचप्रमाणे ते व्यवहार्यही ठरणार नाही.

अनेक अर्थशास्त्रज्ञ आणि बहुतेक सगळे डाव्या विचारसरणीचे बुद्धिजीवी एकेकाळी या मताचे होते. सर विल्यम बेव्हरीज (त्यावेळी ते याच नावाने प्रसिद्ध होते) यांनी असे म्हटले आहे की, वेतनासाठी होणाऱ्या स्पर्धात्मक विभागीय सौद्यामुळे सर्वांना रोजगार उपलब्ध असताना निर्माण होणारे किंमतवाढीचे घातुक चक्र टाळता येईल अशी कोणतीही यंत्रणा आपल्या अर्थव्यवस्थेत नाही. डाव्या गटातील विचारवंतांपैकी 'न्यू फेबियन अेसेज' या पुस्तकातील 'कीपिंग लेफ्ट'च्या लेखकांनी असे म्हटले आहे की, 'वेतन निश्चितीच्या बाबतीत मन मानेल त्याप्रमाणे वेतन गोठवू दिले किंवा तो प्रश्न कसलीही सुसूत्रता नसलेल्या विभागीय सौदेबाजी मध्ये जे घडेल त्यावर अवलंबून ठेवला तर, लोकशाही समाजवादी अर्थव्यवस्था चालूच शकणार नाही. 'नफा, वेतन आणि पगार अद्यापही राष्ट्रीय हित किंवा सामाजिक न्याय यावर दृष्टी ठेवून निश्चित केले जात नाहीत, तर अनिर्बंध अर्थव्यवहाराच्या परंपरागत सूत्रानुसारच ते ठरत असतात' असे सांगून क्रॉसमन आपल्या 'फेबियन एसे'त पुढे म्हणतात की, 'भरपूर रोजगार उपलब्ध असलेल्या परिस्थितीत याची परिणती चलन वाढीचे दडपण कायम राहण्यात झाल्याशिवाय राहणार नाही. याही पुढे जाऊन सदर लेखकाने असे निदान केले आहे की, ज्या तीन बाबतीत

समाजवादाच्या मानाने कल्याणकारी भांडवलशाही उणी पडते त्यापैकी हे एक क्षेत्र आहे. त्याचा निष्कर्ष असा होता की, वेतनाच्या बाबतीत राष्ट्रीय धोरण अत्यावश्यक असते.

या अनुषंगाने करण्यात आलेले प्रतिपादन काहीसे ठोकळेबाज होते. वाढत्या उत्पादन क्षमतेमुळे किमतीत त्या प्रमाणात वाढ न करता देखील वेतनवाढीला बराच वाव असतो हे काही वेळा लक्षातच घेतले जात नाही. परदेशातील वेतन परिस्थिती-कडे बहुधा नेहमीच दुर्लक्ष होते आणि आपल्याप्रमाणेच इतर देशांतही सर्वांना रोज-गार उपलब्ध असेल किंवा तेथील वेतनाचे प्रमाणही वाढते असेल याची जाणीव न बाळगता निर्यात बाजारपेठेत आपल्या मालाची स्पर्धात्मक परिस्थिती काय राहील या विषयीचे अंदाज व्यक्त केले जातात. किमतवाढीच्या चक्रावर कसलेही नियंत्रण राहू शकत नाही असे प्रतिपादन केले जाते पण त्यासंबंधीच्या दोन बाबी पुष्कळदा लक्षातच घेतल्या जात नाहीत. एक तर, किमती (कृत्रिमरित्या) मुद्दाम ठरवून दिलेल्या असल्या तर वेतन वाढीबरोबर त्यात आपोआप वाढ होत नाही. आणि दोन, नेहमीच्या व्यापारी किमतीवर देखील वेतनवाढीच्या काळात संख्यात्मक तफावत पडत असल्यामुळे जरासा सावकाश सावकाशच परिणाम घडून येतो. उदाहरणार्थ जीवनमानाच्या निर्देशांकात होणारा बदल आणि वेतनवाढीची मागणी यात काही कालावधी जातो. त्याचा परिणाम किमती आहे त्याच पातळी-वर चिकटून राहण्यात होतो व त्यामुळे वेतनातील सुरुवातीच्या थोड्याशा बदलानेही काबूत न राहण्यासारखे किमत वाढीचे चक्र सुरू होईल हे संभवत नाही.

शिवाय वेतनवाढीच्या काही विशिष्ट फायद्यांकडेही दुर्लक्ष केले जाते. एक तर असे की, वेतनाच्या दरात वाढ होत राहिली नाही, तर किमान वेळानुसार मजुरी मिळविणाऱ्या कामगारांच्या उत्पन्नाचे (या कामगारांची मजुरी कमी असते), कामाच्या उठावावर मजुरी अवलंबून असणाऱ्या म्हणजेच कामाचा उठाव जितका जास्त होईल तितकी आपोआपच उत्पन्नात भर पडणाऱ्या कामगारात फेरवाटप होईल. वेतनात होत जाणारी वाढ आणि व्यवस्थापकीय कार्यक्षमता यांत काही तरी परस्परसंबंध असावा असे दिसते. (परंतु हे बरेच संशयास्पद वाटते.) त्याच प्रमाणे वेतनाचे प्रमाण चढत्या स्वरूपाचे असेल तरच व्यवहारात वेतनाचे तौलनिक प्रमाण स्थिर न राहता त्यात हालचाल होऊ शकेल आणि काही क्षेत्रांतील वेतनात इतर क्षेत्रांतील वेतनापेक्षा जलद गतीने वाढ होत असेल. वेतनाची पातळी स्थिर राहिली तर त्याचा अर्थ असा होईल की, काही वेतनात घट करावी लागली असेल तर इतर क्षेत्रांतील वेतनात वाढ करावी लागली असेल. परंतु कामगार संघटनांची ताकद लक्षात घेता असे घडणे अर्थातच शक्य नाही. आणि (हळूहळू) वाढत जाणाऱ्या किमतीही व्यापार धंद्यात भांडवल गुंतवणूक करण्याचा निर्णय, करांपासून मिळ-णारे उत्पन्न, कर्जाचा बोजा, इतकेच नव्हे तर कमाल उत्पादन चालू ठेवणे, यांसारख्या

बाबतींत फायदेशीर ठरू शकतील. युद्धोत्तर काळातील यूरोपच्या अनुभवावरून असे दिसते की, किमती स्थिर ठेवावयाच्या असतील किंवा त्या खाली आणावयाच्या असतील तर त्यासाठी उत्पादनावर प्रतिकूल परिणाम घडून येण्याची तयारी ठेवावी लागेल. किमती खालच्या पातळीवर ठेवण्यासाठी आवश्यक असलेल्या चलन टंचाईचा परिणाम उत्पादन खालच्या पातळीवर ठेवण्यात होतो, म्हणजेच (वेतनाच्या) स्थिरतेसाठी मंदी पत्करावी लागते.

त्याचप्रमाणे किमतवाढीचा आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या समतोलांवर हमखास प्रतिकूलच परिणाम होतो असेही नाही. इतर देशांतील किमती वाढत असतांना आणि व्यापाराची परिस्थिती प्रतिकूल होऊ न देता पौंडाचे ऊर्ध्वमूल्यन घडवून आणावयाचा एकमेव उपाय म्हणजे ब्रिटनमधील किंमतीत देखील वाढ होऊ देणे. इतर ठिकाणच्या किंमती वाढत नसतांना देखील निराळ्या कारणास्तव पौंडाचे अवमूल्यन होऊ शकेल किंवा आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदासाठी ब्रिटनमध्ये किमत वाढ होणे आवश्यक होऊन बसेल. १९४९ साली झालेल्या अवमूल्यनानंतर काही दिवस परिस्थिती अशीच होती असे बहुतेक अर्थशास्त्रज्ञांचे मत आहे.

साहजिकच, तीव्र स्वरूपाच्या किमतवाढीमुळे खास उल्लेख करण्याची जरूर भासावी इतके धोकादायक परिणाम घडून येत नाहींत, किंवा वेतनासाठी होणाऱ्या चळवळीमुळे किंमतीत भरमसाठ वाढ होते असेही म्हणता येणार नाही असे कोणतेही निष्कर्ष वरील विवेचनावरून काढता येणार नाहीत. त्यातून फार तर इतकाच मतितार्थ काढता येईल की, याबाबत आपण जरा दूरवरचा विचार करण्याची भूमिका स्वीकारली पाहिजे आणि वेतन विषयक धोरणाबाबत विशेष उत्साही असलेले लोक समजतात त्यापेक्षा वेतनवाढीला बहुधा अधिक वाव असू शकतो.

## ३. युद्धोत्तर काळातील अनुभव

युद्ध होऊन गेल्याला दहा वर्षांचा काळ लोटला आहे. तरी देखील त्यासंबंधीचे निष्कर्ष अंतिम स्वरूपाचे असतीलच असे म्हणता येणार नाही. कारण त्या दशकापैकी पाच वर्षे हा तर युद्धोत्तर काळांतील किंवा कोरियन युद्धाच्या असाधारण परिणामांचा काळ होता. तरीदेखील १९४५ पासूनच्या किंमती आणि वेतन याबाबतच्या परिस्थितीवरून प्राथमिक स्वरूपाचे काही निष्कर्ष आपल्याला काढता येतील.

या सबंध कालखंडात ब्रिटन हे सतत आणि झपाट्याने वाढत जाणाऱ्या किमतवाढीच्या आवर्तात सापडले आहे असेच बहुतेक लोक धरून चाललेले असतात. परंतु वस्तुस्थिती तशी नाही. १९४५ पासून पैशाची किंमत खूप घसरली आहे हे खरे, परंतु पैशाच्या किंमतीतील ही घट विशिष्ट काळातच घडून आलेली दिसते. त्यामानाने बाकीच्या वर्षात तौलनिकदृष्ट्या किंमती स्थिर होत्या.

या कालखंडाचे बरेचसे सुस्पष्ट असे पाच विभाग पडतात. युद्ध समाप्ती-पासून १९४८ च्या मध्यापर्यंत किंमती काहीशा झपाट्याने वाढत गेल्या – आयात किंमतीत झालेल्या वाढीपेक्षाही (कारण अनुदानात वाढ करून या किंमतवाढीवर उतारा देण्यात येई.) अंतर्गत बाजारपेठेतील मागणीत झालेली सर्वसाधारण वाढ याला कारणीभूत होती. या उलट १९४८ च्या मध्यापासून १९५० च्या मध्यापर्यंत तौलनिक दृष्टया किमती आणि वेतन दोन्हीही स्थिर राहिली. या कालावधीत आयात किमती बऱ्याचशा स्थिर होत्या. अनुदानात बदल घडून आलेला नव्हता आणि मागणीतील वाढही बरीचशी आकसली होती. १९४९ साली किंमती फक्त २% नी वाढल्या तर १९५० साली त्या ३% नी वाढल्या आणि मार्च १९४८ ते सप्टेंबर १९५० च्या दरम्यान वेतनाच्या दरात ५% वाढ झाली.

त्यानंतर १९५० च्या अखेरीपासून तो १९५२ च्या मध्यापर्यंत अत्यंत झपा-ट्याने होणाऱ्या चलनफुगावाचा काळ सुरू झाला. हा अर्थातच मुख्यतः कोरियन युद्धाचा परिणाम होता. आयात किंमती जवळजवळ निम्म्याने वाढल्या आणि तो धक्का परतवून लावण्यासाठी अनुदानात वाढ करण्यात आली नाही. (तसे करणे शक्यही झाले नसते.) शिवाय शस्त्रास्त्रे निर्मितीच्या व्यापक कार्यक्रमामुळे वाढत्या मागणीचा ओघ पुन्हा मजुरांच्या बाजारपेठेकडे वळला आणि लाभांशांत भराभर वाढ होत जाऊन त्यामुळे रोखेबाजारात खूपच तेजी जाणवली. १९५२ च्या मध्याला आयात किंमतीतील वाढ ओसरू लागली, परंतु अन्नधान्याच्या अनुदानात कपात करून अंतर्गत किंमतीच्या पातळीचा मिळणारा फायदा बाद करून टाकण्यात आला.

त्यानंतर त्यातल्यात्यात स्थैर्याचा सुरू झालेला काळ १९५२ च्या मध्यापासून १९५४ च्या मध्यापर्यंत टिकला. आयात किंमती वाढत नव्हत्या, अनुदानातही फारसा चढउतार झालेला नव्हता. आणि कामगारांच्या बाजारपेठेतील जादा माग-णीही पुन्हा लुप्त झाली होती. किंमती १९५३ मध्ये अवघ्या १·५% नी वाढल्या तर १९५४ च्या पहिल्या सहा महिन्यांत त्या एक टक्क्याहूनही कमी वाढल्या. याच वर्षातील वेतनांचे प्रमाण अनुक्रमे ३·५% आणि २% इतके होते. सरतेशेवटी १९५४–५५ च्या हिवाळ्यात पुन्हा चलन फुगावाची लाट आली होती, आणि वेतन-वाढीलाही पुन्हा वेग आला होता. कामगारांच्या बाजारात पुन्हा पुन्हा सुरू झालेला मागणीचा फुगवटा आणि अनेक वस्तूंच्या किंमती निश्चित करताना त्यात जाणून बुजून करण्यात आलेली वाढ (उदा. :– भांडी, कोळसा) आणि त्याच्या जोडीला लाभांशात झालेली काहीशी भरमसाठ वाढ यामुळे असे घडून आले.

किरकोळ किंमतीच्या पातळीऐवजी वेतनखर्चाच्या परिस्थितीचे निरीक्षण केले तर आपल्याला हीच परिस्थिती आढळेल. निर्यात किंमतीच्या दृष्टीने सहा-जिकच हे एक महत्त्वाचे गमक ठरते. एकूण अर्थव्यवहारात मिळून कामगाराचा खर्च (म्हणजे उत्पादनाच्या दर घटकांमागे वेतन आणि पगार यासाठी होणारा

खर्च) १९४८ ते १९५४ च्या दरम्यान २७% नी वाढला, तर कारखानदारीच्या धंद्यात तो २०% नी वाढला. परंतु एकूण अर्थव्यवहारात झालेल्या वाढीपैकी दोन तृतियांश आणि कारखानदारीतील वाढीपैकी २०% वाढ ही 'कोरियन वर्षात' म्हणजे १९५० ते ५२ च्या दरम्यान झालेली होती. १९५२—५४ पासून एकूण अर्थव्यवहारात झालेली वाढ ४% होती. याच काळात एकूण उद्योगधंद्यातील वाढ २·५% आणि कारखानदारीच्या व्यवसायात झालेली वाढ १·७% होती. (१९५२ आणि १९५४ या साली संपूर्ण स्थैर्य होते.)

या आकडेवारीवरून मी असा निष्कर्ष काढतो की, वेतनासंबंधी राष्ट्रीय धोरण असले पाहिजे ही भूमिका, सर्वांना रोजगार उपलब्ध असला म्हणजे आपोआपच वेतनवाढ घडून येण्याची परिस्थिती निर्माण होते या कारणास्तव, निश्चितच समर्थनीय ठरू शकत नाही. कारण त्या कालखंडातील बराच काळपर्यंत वेतनातील वाढीचे प्रमाण (साधारणत: वर्षाला ३ ते ४%) उत्पादनक्षमतेत वाढ करून किमतीच्या पातळीत अगदी सौम्य वाढ करून उत्पादनक्षमतेत करण्यात आलेल्या वाढीत जिरवून टाकण्याइतपत होते. वस्तुत: मंदीच्या काळात उपयोगात आणला जाणारा हा एक ऐतिहासिक उपाय आहे. आणि वेतनवाढीत निश्चितच चलन फुगावाचा भाग होता, आणि पैशाच्या किंमतीत होणाऱ्या घटीचे प्रमाण सर्वस्वी अनिष्ट होते, अशी ती वर्षे मागणीतील सर्वसाधारण वाढ, आयात किंमतीतील खळबळजनक चढउतार, निश्चित करावयाच्या किंमतीतील महत्त्वाचे फेरफार किंवा लाभांशात भरमसाठ वाढ, यांची निदर्शक होती.

त्याचप्रमाणे वरील प्रभावी घटना घडत असताना आणि पैशाच्या किंमतीत झपाट्याने घट होत असतानादेखील वस्तुत: आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाच्या बाबतीत अपेक्षेप्रमाणे अनिष्ट परिणाम घडून यावयाचे ते आलेच. अशा तऱ्हेने जर्मनी किंवा अमेरिकेच्या मानाने वेतन खर्चात काहीशा वेगानेच वाढ झाली हे खरे, (अर्थात ती वाढ खळबळ उठवून देण्याइतकी नव्हती) पण त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. अमेरिकन अर्थव्यवस्थेवर अद्यापही मधूनमधून येणाऱ्या मंदीचा पगडा आहे हे दिसून आले. ऐतिहासिक पातळीच्या मानाने ही मंदी क्षुल्लक असली तरी किंमती आणि वेतन यांची पातळी मधूनमधून उतरविण्यास भाग पाडण्याला आणि त्यामुळे त्या सबंध कालखंडात किंमतवाढीचे सरासरी प्रमाण घसरविण्यास ती पुरेशी होती. जर्मनीत काम मागणारे कामगार भरपूर प्रमाणात उपलब्ध असल्यामुळे कामगार संघटनांची सौद्याची ताकद कमकुवत बनली होती. त्याचा परिणाम म्हणून कामगारांच्या बाजारपेठेची अवस्था अपवादात्मक बनली होती. उत्पादनातील दरडोई वाढीच्या मानाने वेतनवाढीचे प्रमाण कमी होते. एकूण अर्थव्यवस्थेने सर्वांना रोजगार उपलब्ध होण्याची मर्यादा गाठल्यामुळे (आणि त्यामुळे वेतनाच्या बाबतीतही) कामगार संघटना संपूर्ण रोजगार उपलब्ध असतांना

ज्या तऱ्हेने आपले कार्य चालवितात थेट तशा तऱ्हेने आपली चळवळ १९५५ सालापासून करू लागले होते.

तथापी ब्रिटनमधील काहीशा झपाट्याने वाढत जाणाऱ्या किंमती आणि वेतन खर्च यामुळे अगदी अलिकडेपर्यंत निर्यात बाजारपेठांत गंभीर स्वरूपाच्या अडचणी निर्माण झाल्या नाहीत. ( १९४९ साली डॉलरचे अवमूल्यन झाल्यामुळे जगातील सर्वच चलनांना आपल्या किंमती त्याच्याशी मिळत्या जुळत्या करून घ्याव्या लागल्या होत्या, तो अर्थातच अपवाद धरावयाचा. ) याचे एक कारण असे की, आपल्या निर्यात किंमतीत अंवीतेवी अंतर्गत किंमतीच्या मानाने खूपच कमी वाढ झाली होती ( १९५० पासून बहुतेक सर्व अंतर्गत किंमतवाढ ही अन्नधान्य, भाडी, आणि सरपण यासारख्या कारखानदारांच्या खर्चात प्राधान्येकरून न मोडणाऱ्या बाबतीत झालेली असल्याने ), त्याचप्रमाणे १९४९ च्या अवमूल्यनामुळे आपल्याला किंमतीच्या बाबतीत बराच वाव मिळू शकला आणि त्या काळांत एकूण जागतिक किंमतीच चढत होत्या. त्यामुळे पौंड पुन्हा अस्थिर बनू नये, किंवा व्यापाराची परिस्थिती खालावू नये येवढ्यासाठी ब्रिटनमधील किंमतीत देखील सहानुभूतीदर्शक वाढ करणे खरोखरी आवश्यकच होते. निर्यात बाजारपेठात आपल्या किंमती टिकाव धरू शकणार नाहीत ही सतत वाटत असणारी भीती खरी ठरली नाही आणि या सर्व वर्षात किंमतीमुळे आपल्या निर्यातीवर फारशा मर्यादा पडल्या नाहीत तर उलट कारखानदारांनी मालाचा खप होण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे प्रमाण आणि माल पोहोचता करावयास लागणारा कालावधी या गोष्टीच निर्यातीच्या आड येणाऱ्या होत्या. ( यावरून अंतर्गत बाजारपेठेत मागणीत झालेली वाढ आणि पुरेशी निर्यात करण्याची असमर्थता या दोहोंची त्यामुळे प्रचिती येते. )

## ४. मागणीतील वाढ आणि लाभांशातील वाढ

तथापी अशा प्रकारच्या 'हानीकारक नसलेल्या' वेतनवाढीला सतत वाव मिळत राहीलच यावर आपल्याला विसंबून चालणार नाही आणि ते कसेही असले तरी झपाट्याने वाढत गेलेल्या किंमतीच्या कालखंडात घडून आलेले अंतर्गत परिणाम निश्चितच अत्यंत अनिष्ट होते. त्यामुळे वरवर पाहता असे कालखंड ज्यामुळे निर्माण होतात त्या वर उल्लेखिलेल्या चार महत्त्वाच्या घटनांची आपल्याला पाहणी करावी लागेल आणि त्यांचा परिहार कसा करावयाचा त्याचा विचार करावा लागेल.

निरनिराळ्या वस्तूंसाठी येणारी जादा मागणी ( म्हणजे चालू किंमतीत होऊ शकणाऱ्या पुरवठ्यापेक्षा जास्त ) ही अंशतः वाढलेली आयात आणि / किंवा घटलेली निर्यात यामुळे परदेशी हुंडणावळीच्या खालावलेल्या परिस्थितीत प्रतिबिंबित होते. परंतु तशीच ती निदान काही क्रयवस्तूंच्या किंमतीत होणाऱ्या वाढीतही पाहावयास मिळते. या वाढीचा परिणाम वेतनाची मागणी पुढे येण्यात होऊ शकेल.

परंतु वेतनावर जास्तीत जास्त प्रत्यक्ष परिणाम जर कशामुळे घडून येत असेल तर खुद्द कामगारांच्या बाजारपेठेतच जादा मागणी होऊ लागल्यामुळे. या दोन्हीमुळे कामगार संघटनांचे वाटाघाटीचे सामर्थ्य आणखी वाढते ( आणि नफ्याच्या वाढलेल्या पातळीमुळे त्याला आणखी चालना मिळते) आणि त्याचबरोबर आपल्याकडचे कामगार टिकवून कसे ठेवावयाचे या विवंचनेत असलेले कारखानदार कामगार संघटनांच्या मागण्या मान्य करून टाकण्याइतकेच नव्हे तर आपले कामगार आपल्या प्रतिस्पर्ध्यांकडून पळविले जाऊ नयेत म्हणून स्वतःहूनच वेतनवाढ देण्यास उद्युक्त होतात.

याचा कितपत परिणाम घडून येतो ? डाव्या गटाच्या बाजूने असे सांगितले जात असे की, एका बाजूस अनुदान आणि किंमत नियंत्रण आणि दुसऱ्या बाजूला कामगार संघटनांकडून वेतनाबाबत सबुरीचे धोरण यांच्यायोगे परिस्थिती अंती काबूत ठेवता आली तर जादा मागणीमुळे फारसे काही बिघडणार नाही.

परंतु हा दृष्टीकोण फाजील आशावादी झाला. किंमतीच्या पातळीवर त्याचे काय परिणाम घडून येतील हा प्रश्न एकवेळ बाजूला ठेवला तरी जादा मागणीमुळे कारखानदारीतील कार्यक्षमता आणि निर्यातीची पातळी यावर निश्चितच प्रतिकूल परिणाम घडून येणार आणि कितीही जरी नियंत्रणे बसवली तरी ते परिणाम टाळता येणार नाहीत. शिवाय किंमत-नियंत्रण आणि अनुदाने ही अल्पकालीन आणीबाणीच्या काळात वापरता येण्यासारखी साधने असली तरी कायमच चलनफुगाव होण्याकडे कल असतो त्यावेळी त्यांचा काहीही परिणाम होऊ शकत नाही. त्यामुळे अनुदानात सतत वाढ करावी लागल्याने अंती अर्थमंत्र्यानी योजावयाच्या उपायांबाबत त्याला कसलेही स्वातंत्र्य राहात नाही. शिवाय इतरत्र चांगल्या प्रकारे वापरता आला असता अशा महसुलासही तो मुकतो. आणि नियंत्रणे, मग ती किंमतीवर असोत, वा भांडवल गुंतवणुकीवर असोत, ती अर्थव्यवहाराच्या मध्यवर्ती आणि म्हणूनच त्यातल्यात्तांत आवश्यक अशा विभागापुरतीच प्रभावी ठरू शकतात आणि त्यामुळे अखेरीला जादा नफा, वेतनवाढ आणि त्यातल्या त्यात अत्यावश्यक समजल्या जाणाऱ्या भांडवल गुंतवणुकीस प्रोत्साहनच मिळते.

कामगार संघटना वेतनाच्या बाबतीत जाणूनबुजून सबुरीचे पद्धतशीर धोरण स्वीकारतील अशी अपेक्षा करणेही योग्य होणार नाही. आपण किंमतवाढीच्या फेऱ्यात सापडलो आहोत की काय ते पाहण्याची जबाबदारी कामगार संघटनांची नाही. ती सरकारची जबाबदारी आहे. आणि आपल्या आर्थिक आणि चलनविषयक धोरणाच्या योगाने कामगार संघटना व मालक यांचे वर्तन इच्छित किंमतपातळी प्रस्थापित होण्यासारखी आर्थिक परिस्थिती निर्माण करण्यास पोषक ठरेल हे पहाणे हे सरकारचे काम आहे. ही जबाबदारी कामगार संघटनांवर टाकणे म्हणजे त्यांच्या आजवरच्या सगळ्या पारंपारिक कर्तव्यांनाच मुरड घालण्यासारखे किंवा तसा

प्रयत्न करण्यासारखे आहे. कामगार संघटनांनी कामगारवर्गाच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी वेतनासंबंधी वाटाघाटी करणाऱ्या संघटनांचे स्वरूप सोडून देऊन प्राधान्येकरून राष्ट्रीय स्वरूपाच्या आर्थिक धोरणांचा प्रपंच करीत बसावे असे म्हणण्यासारखेच ते होईल. त्याचा परिणाम इतकाच होईल की, कामगार संघटना आपल्या सभासदांचा विश्वास आणि निष्ठा गमावून बसतील आणि मग कामगारवर्ग निश्चितच कम्युनिस्ट पक्षाकडे आकृष्ट होईल. त्यामुळे कदाचित लोकशाहीच मुळात धोक्यात येईल. परंतु तसे झाले नाही तरी कामगारवर्गाच्या ऐक्यावर विपरित परिणाम घडून आल्याशिवाय खासच रहाणार नाही.

ते कसेही असो, वेतन मर्यादित ठेवण्याच्या अधिकृत धोरणाचा दूरवर दृष्टीने पहाता, जादा मागणी विरुद्ध काहीही परिणाम घडून येऊ शकणार नाही. कामगार संघटनांच्या नेत्यांना एक तर आपल्या सभासदांतील असंतोषामुळे किंवा कम्युनिस्टांच्या हालचालीमुळे काही काळानंतर ते धोरण तर सोडून द्यावे लागेलच, शिवाय वेतनवाढ थांबणार नाही ती नाहीच. नफ्याचे प्रमाण किंमतवाढीच्या पातळीवर असेल आणि सर्व कारखानदारांना कामगारांचा कमालीचा तुटवडा भासत असेल तर राष्ट्रीय पातळीवरील वेतनाची परिस्थिती कशीही असली तरी स्थानिक पातळीवर वेतनात वाढ होत राहिल्याने वेतनाची पातळी हळूहळू वर सरकत राहणारच आणि त्यामुळे अखेर वेतन मर्यादित ठेवण्याचे सारे धोरणच त्यात वाहून जाणार. म्हणून किंमतीच्या वाजवी स्थैर्यासाठी सर्वात आवश्यक गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे जादा मागणीला आळा बसणे. परंतु चौदाव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे अन्य कारणास्तव मागणीत वाढ होणे आवश्यकच असते.

भरमसाठ वेतन मागणीचे दुसरे एक कारण म्हणजे लाभांशात होणारी वाढ आणि अशा वाढीबाबत निर्माण होणारे मानसिक वातावरण. अशा तऱ्हेने १९५३–५४ साली किरकोळीच्या किंमती बऱ्याच प्रमाणात स्थिर राहिल्या असूनही वेतनाच्या बाबतीत आश्चर्यकारक असंतोष दिसून येत होता. उत्पन्नात वाढ व्हावी म्हणून जी झोंबाझोंबी चालते ती तटस्थपणाने नुसती पाहात राहणे एवढीच अर्थव्यवहारासंबंधीची आमची भूमिका असे. हुजूर सरकारकडून अनिर्बंध अर्थव्यवहाराच्या संबंधात पुन्हा पुन्हा जे सांगितले जाई त्याचा जनमानसावर झालेला परिणामही याला काही अंशी कारणीभूत होता. आणि राष्ट्रभक्ती आणि संयम यांचे क्रिप्सप्रणित युग मागे पडून असे सामाजिक वातावरण निर्माण झाले होते की, प्रत्येक जण जेवढे म्हणून आपल्या पदरात पाडून घेता येईल तेवढ्यासाठी झगडत होता.

लाभांशामध्ये सौम्य स्वरूपाची वाढ झाली तर त्याचा फारसा परिणाम घडून येणार नाही. परंतु १९५४ आणि १९५५ प्रमाणे त्यात २० टक्क्यांनी वाढ झाली तर ती मात्र भरमसाठ पगारवाढीच्या मागणीला एक प्रकारची चेतावणीच

ठरते. व्यापारी आणि आर्थिक विषयावर लिहिणाऱ्या लेखकांनी आपली जी समजूत करून घेतल्याचे दिसते त्याप्रमाणे ती असंयुक्तिक प्रतिक्रिया होती असेही म्हणता येणार नाही. अर्थात हे खरे की, वेतनवाढीच्या एकूण रकमा संख्येच्या दृष्टीने क्षुल्लक होत्या. म्हणजे असे की, वेतनवाढीची रक्कम वेतनाच्या एकूण उत्पन्नात विभागून टाकली तर काहीच फरक पडणार नाही. परंतु म्हणून कामगार संघटनांनी ती मुकाट्याने सहन करावी असे मुळीच नाही. कारण त्याचा अर्थ असाच होतो की, भागभांडवलदारांच्या प्रत्यक्ष उत्पन्नात प्रत्यक्ष वेतनापेक्षा झपाट्याने वाढ होत असली पाहिजे. म्हणजेच गरिबांपेक्षा श्रीमंतांना त्यामानाने अधिक प्राप्ती होत असली पाहिजे. ही परिस्थिती स्वागतार्ह मानण्याचे काहीच कारण नाही. ते कसेही असो, मानसशास्त्राच्या दृष्टीने उद्योग लाभांश देण्याइतके भरभराटीत असल्याचे आपणहून जाहीर करीत असतील तर कामगार संघटनांना संयम दाखविण्यास उद्युक्त करणे अशक्य होऊन बसेल.

गेल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे लाभांश आणि वितरण यामध्ये जवळ जवळ आपल्याला पाहिजे असेल ते प्रमाण बसवता येईल अशा तऱ्हेचे आर्थिक धोरण अंगिकारणे सहज शक्य आहे. भागभांडवलदारांना मिळणाऱ्या रकमांवर मर्यादा घालण्याचा आणखी एक मार्ग म्हणजे भांडवली नफ्यावर कर बसवणे. तथापी आतापेक्षा भागधारकांच्या एकूण करांत झालेली वाढ, व्यक्ती आणि संस्था यात विभागली गेली तरी देखील त्यामुळे बहुधा वेतनात वाढ न होण्यासारखी परिस्थिती निर्माण होऊ शकेल. हे पुरेसे होईल की, मानसशास्त्रीय कारणास्तव कायद्याच्या काही मर्यादा घालाव्या लागतील याबद्दल मात्र अद्यापही आपल्याला काहीच सांगता येत नाही. सर्वसाधारणपणे नेहमीच्या परिस्थितीत आणि किंमती स्थिर राहण्यासाठी आवश्यक असलेल्या इतर बाबी अस्तित्वात असतील तर हे होऊ शकेल किंवा नाही याबद्दल मी स्वतः साशंक आहे. परंतु त्या संबंधीचा निश्चित निर्णय घेण्यापूर्वी आपल्याला आणखी काय अनुभव येतो ते पाहिले पाहिजे.

या ठिकाणी याच्याशी संबंधीत असा आणखीही एक मुद्दा उपस्थित होतो. लाभांशाच्या तेजीमुळे जो संशय निर्माण होतो तो उत्पादन क्षमतेत होणाऱ्या वाढीचा न्याय्य वाटा वेतनाकडे जात नाही या समजुतीमुळे जे संशयाचे वातावरण निर्माण होते त्याचाच एक भाग असू शकेल. जादा उत्पादनक्षमतेमुळे मिळणारे सगळे फायदे कामगारांनी त्यासाठी खास प्रयत्न केलेले असतात म्हणूनच उपलब्ध होतात असे नव्हे तर व्यवस्थापनात घडून आलेली सुधारणा किंवा जादा भांडवल गुंतवणूकही त्याला कारणीभूत असू शकते. त्यामुळे उत्पादनक्षमतेच्या वाढीचे सर्वच्या सर्व फायदे आपल्याच पदरात पडले पाहिजेत असा दावा त्यांना करता येणार नाही. हे फायदे कशामुळेही मिळत असोत, कोणत्याही परिस्थितीत कमी

किंमत, निवृत्तीवेतन किंवा भांडवल गुंतवणूक या स्वरूपात ग्राहकांना त्याचा लाभ मिळाला पाहिजे असा मुद्दा उपस्थित करता येईल.

परंतु या मुद्यांवरून वेतनविषयक धोरणासंबंधी कोणताही निश्चित निष्कर्ष बांधता येणार नाही. एक तर याचे नक्की श्रेय कशाकडे जाते ते सांगता येत नाही, कारण उत्पादनातील वाढ ही अमुक एका कारणामुळेच होते असे दाखवून देता येत नाही. दुसरे असे की, जादा उत्पन्नाचे योग्य प्रकारे वाटप होणे आणि वेतनासाठी होणारी सौदेबाजी यांचा काही संबंध नाही. अर्थात सामाजिक धोरण (या उत्पादनवाढीतील बराचसा भाग सामाजिक सेवांचा लाभ मिळणाऱ्यांकडे गेला पाहिजे हे यात गृहीत धरलेले असते) आणि आर्थिक विकासासाठी आवश्यक असलेल्या बाबी (उत्पादनातील वाढीचा आणखी काही भाग हा शिलकीत जमा झाला पाहिजे) या दोन्ही गोष्टी वाढीव उत्पन्नाच्या वितरणाच्या संदर्भात अत्यंत महत्त्वाच्या ठरतात. आपल्या आर्थिक धोरणाच्या योगाने त्या साध्य करून घेण्याची जबाबदारी सरकारची आहे. ते ओझे व्यवस्थापन किंवा कामगार संघटना यांच्या खांद्यावर टाकता कामा नये.

उत्पादनक्षमतेत आणि त्या बरोबरच नफा आणि लाभांश यातही झपाट्याने वाढ होत असताना त्यातील महत्वाचा वाटा आपल्यालाही मिळाला पाहिजे असे कामगारांना वाटते ही वस्तुस्थिती शिल्लक उरतेच. अंगावर काम घेणारे किंवा जेवढे काम होईल त्यामानाने ज्यांना वेतन दिले जाते अशा कामगारांना त्यांच्या वाढलेल्या उत्पन्नाच्या स्वरूपात आपोआपच त्यातील वाटा मिळतो. परंतु तासावर काम करणारांना मात्र तो मिळू शकत नाही. आणि सर्वसाधारणपणे सर्व कामगारांत, त्यांना कमी वेतन मिळत असल्याने, सहाजिकच कमालीचा असंतोष पसरतो.

त्यामुळे सोळाव्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे वेतन प्रमाणाबरोबरच उत्पन्नाचीही उत्पादनक्षमतेच्या चढउताराशी सांगड घालणे कदाचित संयुक्तिक ठरेल. एकट्या दुकट्या कारखान्याने सुरू केलेल्या बोनस योजनेमुळे काही वेळा हे साध्य होऊ शकेल. परंतु राष्ट्रीय पातळीवरील वेतननिश्चितीच्या बाबतीत कामगार संघटनांना अधिक परिणामकारकपणे ही सांगड घालून पुढील काही वर्षांसाठी तो कायम करून घेणे शक्य आहे किंवा नाही याचा विचार झाला पाहिजे. जनरल मोटर्स आणि ऑटो यूनियन्स यांच्या दरम्यान 'डेट्रॉइट'चा करार या नावाने ओळखल्या जाणाऱ्या १९५० च्या कराराच्या धर्तीवर अमेरिकेत असे काही सामुदायिक करार यापूर्वीच झालेले आहेत. उदाहरणार्थ– अलिकडेच झालेल्या अशाच एका करारान्वये राहणीमानात होणाऱ्या वाढीबरोबर मिळणाऱ्या वेतनवाढी व्यतिरिक्त उत्पादन क्षमतेत झालेल्या वाढीच्या प्रमाणात ३% रक्कम आपोआपच कामगारांना मिळू लागण्याची तरतूद करण्यात आली आहे. उत्पादन क्षमतेत वाढ

झाल्याबरोबर त्या प्रमाणात आपल्या वेतनातही आपोआप वाढ होईल याची कामगारांना जाणीव होईल अशी काही औपचारिक योजना आखण्यात आली तर वेतनाच्या बाबतीतील आजची अस्वस्थता पुष्कळच कमी होईल.

## ५. मुद्दाम ठरविलेल्या किमती आणि आयात मालाच्या किमती

वेतनाच्या अस्थिरतेचे नेहमी आढळणारे शेवटचे कारण म्हणजे राहणीच्या खर्चात आधीच झालेली वाढ. राहणीच्या खर्चात झालेल्या या वाढीला दुसरी काही तरी बाह्य कारणे असली पाहिजेत. कारण पुरोगामी अर्थव्यवस्थेत उत्पादनक्षमतेतील वाढीबरोबर किमती खाली येतील अशीच साहजिक कोणाचीही अपेक्षा असणार. निदान किमतीत आपोआप वाढ होऊन प्रत्यक्ष वेतनाचे मूळचे मूल्य टिकवून धरण्यासाठी कामगारांना वेतन वाढीसाठी वाटाघाटी तरी कराव्या लागू नयेत, असेच कोणालाही वाटेल.

'मुद्दाम ठरवलेल्या' म्हणजे बाजारपेठ आणि व्यापार व्यवहार या व्यतिरिक्त इतर बाबी लक्षात घेऊन सरकारने नियंत्रित केलेल्या किमतीमधील वाढ हे ते बाह्य कारण असू शकेल. अनुदानातील कपात, अप्रत्यक्ष करातील वाढ, नियंत्रित भाड्यात झालेली वाढ किंवा पूर्वी फायदेशीर न ठरलेल्या किमतीत वाढ करून राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांकडून त्या वस्तूंच्या विक्रीच्या किमतीत करण्यात आलेली वाढ, यामुळे असे होऊ शकेल. यापैकी कशामुळेही वेतनवाढीची मागणी होऊ शकेल. त्याचप्रमाणे सरकार मनात आणील तर अर्थातच त्यापैकी कशाचीच झळ लागू शकणार नाही.

सर्वसामान्य समजूत आहे त्यापेक्षा मुद्दाम ठरवून दिलेल्या किमतीचे महत्त्व कितीतरी जास्त आहे. त्याचे कारण इतकेच आहे की, राहणीमानाच्या निर्देशांकाचा फार मोठा भाग या किमतींनी व्यापलेला असतो. कोरियन युद्धामुळे घडून आलेले परिणाम बाजूस ठेवले तर या किमतीतील चढउतारावरून अलिकडील काही वर्षातील किमतीच्या चढउतारासंबंधी फार मोठ्या प्रमाणात उलगडा होऊ शकतो. १९५० पर्यंत अनुदान, किमत व भाडे नियंत्रण आणि राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांवर असलेली सत्ता यांचा उपयोग करून घेऊन सरकार त्यावेळी असलेल्या जागतिक तेजीबरोबर ब्रिटनमधील राहणीमानाची जाणूनबुजून सांगड बसू देत नसे. १९५२ सालापासून मात्र त्या वेळेपर्यंत झालेली युद्धोत्तर किमतवाढ बाहेरच्या जगात खपून गेली होती. ब्रिटिश सरकारने किमतीच्या जागतिक पातळीच्या अनुषंगाने ब्रिटनमधील राहणीमानात जाणूनबुजून तितकीच वाढ होऊ दिली होती. यावरून १९५२ पासून इतर बहुतेक सर्व पाश्चात्य देशात राहिलेली किमतीतील स्थिरता ( त्या देशात युद्धोत्तर काळातील स्थिरस्थावर केव्हाच होऊन चुकले होते ) आणि ब्रिटनमध्ये सतत वाढत चाललेल्या किमती यात आढळणाऱ्या तफावतीचा उलगडा

होऊ शकतो. जगातील इतर देशांच्या मानाने आपल्याकडे ही स्थिरस्थावर पाच-वर्षानंतर आली. कारखानदारी मालाच्या किंमतीपेक्षाही मुद्दाम ठरवून दिलेल्या किंमतीच्या चढउतारामुळेच मुख्यतः ही किमतवाढ घडून येत होती. १९५२ पासून किरकोळ विक्रीच्या निर्देशांकात झालेली जवळजवळ सगळीच्या सगळी वाढ अन्न-धान्य (अन्नधान्याच्या बाबतीत काही अंशी अनुदानात कपात झाल्यामुळे घडून आली होती), सरपण आणि दिवाबत्ती ( कोळशाच्या किंमतीत जाणूनबुजून कर-ण्यात आलेली वाढ ), आणि भाडी ( भाड्यातील वाढ हीही जाणूनबुजूनच कर-ण्यात आली होती ) यांच्या किंमतीतीलच आहे हे यावरून स्पष्ट होईल.

परंतु भावी काळाच्या दृष्टीने थोड्याशा उत्साहवर्धक अशाही बाबी आहेत. नियंत्रित किंवा अनुदानित किंमती अगदी नेहमीच्या पातळीशी आता बऱ्याच प्रमाणात मिळत्याजुळत्या करून घेण्यात आल्या आहेत. त्यामुळे वेतनातील अस्थिर-तेचे हे विशिष्ट कारण तरी निदान यापुढे तितके प्रभावी ठरणार नाही.

तथापी किंमतवाढीचे वेतनाशी संबंधित नसलेले सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे १९५०–५१ सारखी आयात मालाच्या किंमतीत अचानक झालेली वाढ हे होय. सरतेशेवटी वेतनपातळीची बहुधा अशा वाढीशी आपोआपच सांगड घातली जाते. परंतु दरम्यानच्या काळात वेतन–किंमतवाढीचे आवर्त हाताबाहेर जात आहे असे वाटले तर ते काबूत आणण्यासाठी योजता येण्यासारखे काही तात्पुरते उपाय आहेत.

यापैकी सहज लक्षांत येण्यासारखा उपाय म्हणजे किरकोळ विक्रीचा निर्देशांक अनुदान देऊन सावरणे. परंतु आयात मालाच्या किंमती झपाट्याने वाढत असतील तर हे सहज साध्य होत नाही. कारण एक तर, ज्या करांमुळे किंमती वाढणार नाहीत अशा, म्हणजे प्रत्यक्ष करांतून अनुदानाचा खर्च भागवता येईल. दुसरे असे की, कामगारवर्गाचे राहणीमान टिकवून धरावयाचे त्याचप्रमाणे वेतनातील स्थैर्यही साधावयाचे हे आपले उद्दिष्ट असेल तर, वाढलेल्या प्रत्यक्ष करांचा बोजा हा संपूर्ण-पणे श्रीमंत वर्गावर टाकून त्यांना त्या प्रमाणात आपल्या खर्चात कपात करण्यास भाग पाडले पाहिजे. परंतु सध्याची करपातळी लक्षात घेता हेदेखील सोपे नाही. कारण कर वाढले तरीही व्यक्तिगत भांडवलातून पैसे काढून घेऊन त्यांचा खर्च चालू ठेवण्याची श्रीमंतवर्गाची तयारी असते आणि त्यांना ते शक्यही असते आणि ते ज्या प्रमाणात असे करतात, त्या प्रमाणात अनुदानामुळे कामगारांच्या क्रय-शक्तीत वाढ होते– इतर कोठल्याही क्षेत्रातील क्रयशक्तीत मात्र घट होत नाही. त्यामुळे अपरिहार्यपणे किंमतीतील तेजी सुरू होते.

परंतु तरीदेखील अनुदान हा वेतनाची मागणी मर्यादित ठेवण्याचा तात्पुरता उपाय होऊ शकेल; मात्र त्यामुळे खर्चाचा ओघ श्रीमंतांकडून गरीबांकडे वळू शक-णार नाही. इतकेच नव्हे तर कामगारवर्गाच्या एकूण राहणीमानालाही स्थैर्य प्राप्त

होऊ शकणार नाही. कामगार संघटना वेतनाच्या मागणीबाबत वाटाघाटी करताना सबंध कामगारवर्गांच्या राहणीमानापेक्षा किंवा कामगारवर्गाच्या खर्चाच्या प्रत्यक्ष प्रमाणापेक्षा अन्नधान्याच्या किंमतीतील चढउतारावर आपले लक्ष अधिक केन्द्रित करतील तरच हे घडून येऊ शकेल. कामगार संघटना मग वेतनवाढीची मागणी खाली आणून अन्नधान्यासाठी देण्यात येणाऱ्या अनुदानात वाढ करण्याचा ( नित्योपयोगी वस्तू कोणत्या ते ठरवून अनुदानाच्या रूपाने त्यांच्या किंमती मर्यादेत ठेवण्याचा ) आग्रह धरू शकतील. अर्थात ह्या अनुदानासाठी करवाढ करूनच पैसा उपलब्ध केला जाणार व त्याचा बोजा ( निदान काही प्रमाणात तरी ) पुन्हा कामगार वर्गावरच पडणार हे उघड आहे.

वस्तुत: कामगार संघटना, निम–चैनीच्या वस्तूंच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे किंवा प्राप्तीकराचे प्रमाण वाढल्यामुळे खर्च करता येण्यासारख्या प्रत्यक्ष वेतनात घट झालेली पसंत करतील की, अन्नधान्याच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे होणारी वेतन घट त्यांना चालेल, हे निश्चितपणे कोणीच सांगू शकणार नाही. पण ते यापैकी कशाला तयार झाले तर त्यांची ती भूमिका काही वेळा वाटते तितकी तर्कदुष्ट म्हणता येणार नाही. गेल्या प्रकरणात हे दाखवून दिले होते की, अन्न-धान्याच्या किंमतीत एकदम खूप वाढ झाली तर त्यामुळे सामाजिकदृष्टचा घातुक परिणाम घडून येतात. बायकामुलांपासून नवरा नोकरीधंद्यानिमित्त दूर राहात असलेल्या कुटुंबाचे उत्पन्न विभागले गेल्यामुळे एकूण प्रत्यक्ष वेतनाची पातळी कायम टिको वा न टिको, वर उल्लेखिलेले परिणाम घडून येतातच. शिवाय ( या दोन मुद्यांची सांगड घालता येणे शक्य आहे.) किंमतवाढीमुळे प्रत्यक्ष वेतनात होणारी घट लोकांना अजिबात आवडत नाही असे निश्चितच आढळून येते. केन्स याने आपल्या सुप्रसिद्ध लेखात एकदा असे म्हटले आहे आहे की, वेतनधारकांना पैशाबद्दल असा मोह वाटत असतो की, किंमतवाढ करून त्यांच्या प्रत्यक्ष वेतनात घट केली तर त्याला त्यांची तयारी असते. परंतु आज ब्रिटनमधील जनतेची धारणा याच्या उलट दिसते; म्हणजे त्यांना किंमतीचा मोह पडतो. पैशाच्या स्वरूपात मिळणारे वेतन आणि किंमती या समान पातळीवर असतील तर प्रत्यक्ष वेतन स्थिर असावयाला त्यांची हरकत दिसत नाही. परंतु पैशाच्या स्वरूपात मिळणारे वेतन आणि किंमती या दोहोंत सारख्या प्रमाणात वाढ होत असली तर ते मात्र त्यांना चालत नाही. तसेच वेतनधारकांचा एकूण प्रत्यक्ष खर्च जसाच्या तसा कायम राहिला तरी राहणीच्या वाढत्या खर्चामुळे तत्कालिन शासनाबद्दल त्यांच्या मनात तीव्र असंतोष दाटू लागतो.

आणि म्हणून आयात मालाच्या किंमतीत खूप वाढ होत असेल तर, अनु-दानाचे तात्पुरते धोरण अंगिकारण्यात यावे या म्हणण्यात काही अर्थ आहे असे म्हणावे लागेल. परंतु त्याच्या विरोधी असेही काही मुद्दे आहेत. अनुदानात वाढ

करणे सहज शक्य आहे, परंतु ती कमी करणे मात्र कठीण आहे. आणि विशेषत: मजूर पक्षाच्या अर्थमंत्र्याला दुसऱ्या अनेक तातडीच्या सामाजिक मागण्यांकडे लक्ष पुरविणे भाग असतांना दूरवरच्या स्वरूपातील सामाजिक मोबदला म्हणून तर असे अनुदान कधीच समाधानकारक ठरू शकत नाही. शिवाय ज्या प्रमाणात अनुदान-विषयक धोरण प्रभावी ठरेल तेवढ्या प्रमाणात व्यापाराची परिस्थिती खालावत जाईल आणि पौंडाची किंमत वाढू दिली नाही तर आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदावरच त्याचा प्रतिकूल परिणाम होईल म्हणून अनुदानातील वाढ हा अगदी शेवटचा उपाय आहे असेच मानले पाहिजे.

जीवनावश्यक वस्तूंच्या किंमतीवर नियंत्रण बसवणे हा दुसरा एक अल्प-कालीन उपाय होऊ शकेल. दीर्घकालीन उपाय म्हणून त्याविरुद्ध आक्षेप घेतले जात असले (त्या संबंधीची चर्चा चोविसाव्या प्रकरणात आलेली आहे) तरी, वेतन-किंमत वाढीच्या घातुक आवर्तावरील एक उपाय म्हणून त्यापासून काही चांगले परिणाम घडून येऊ शकतील. काही वेळा असे सांगण्यात येते की, किंमतवाढीवर हल्ला चढवावयाचा म्हणजे केवळ किंमतवाढीच्या लक्षणावर हल्ला चढवावयाचा. किंमतवाढीमुळे घडून येणाऱ्या अनिष्ट परिणामांविरुद्ध कारवाई करावयाची असा त्याचा अर्थ नव्हे. हे अनिष्ट परिणाम जादा मागणीमुळेच घडून येत असतात. काही लोक तर वस्तुत: असेही प्रतिपादन करीत असतात की, किंमती खालच्या पातळीवर रोखून धरल्यामुळे चलनफुगावाची दरी अधिकच रुंदावत जाईल. वाढलेली मागणी खाली आणण्याचे कोणतेही उपाय योजले जाणार नसतील तर उपलब्ध असलेल्या वस्तूंचे पैशाच्या स्वरूपातील मूल्य आणि एकूण मागणीचे पैशाच्या स्वरूपांतील मूल्य हे समान होईपर्यंत किंमती वाढू देणे हा ही दरी कमी करण्याचा एकमेव उपाय आहे.

हे खरे असले तरीही किंमतवाढ आटोक्यात ठेवण्याच्या दृष्टीने किंमत नियंत्रण उपयुक्त ठरू शकेल. मात्र ही किंमतवाढ मूलत: मागणी वाढल्यामुळे होण्याऐवजी आयात मालाच्या किंमती वाढल्यामुळे झालेली असली पाहिजे. परंतु वस्तुत: मागणी वाढल्यामुळे झालेल्या किंमतवाढीच्या बाबतीतही किंमत नियंत्रण उपयुक्त ठरू शकेल. कारण लोकांच्या अपेक्षाही पुष्कळ प्रमाणात मागणीवर आपला प्रभाव गाजवीत असतात. किंमतवाढ चालूच राहणार अशी सर्वसाधारण अपेक्षा ही चलनफुगाव घडून येण्याला अगदी नमुनेदार परिस्थिती होय. अशा वेळी पुर-वठा कमी होण्याच्या आधीच गिऱ्हाईक साठा करून ठेवण्याच्या मागे लागते आणि त्यामुळे मागणीची एकूण पातळी वाढते. परंतु किंमतीवर नियंत्रण बसविल्यामुळे किंमती आणखी वाढणार या अपेक्षेने होणारी मागणी कमी करता येईल आणि त्यामुळे किंमत नियंत्रण केवळ मागणीत वाढ होण्याच्या लक्षणावरच प्रहार करते असे नव्हे तर फुगवटयामागील एक कारणच त्यामुळे नष्ट होते. अमेरिकन संशो-

धकांनी केलेल्या पाहणीत असे आढळून आले आहे की, किमत नियंत्रण येणार असे जाहीर झाले आणि त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी झाली की, व्यवहारात हा परिणाम घडून आल्याचे दिसून येते आणि त्यामुळे फुगवटयामुळे येणारे दडपण खूप कमी होते.

आयात मालाच्या किमतीतील वाढीमुळे वेतन–किमतवाढीचे आवर्त खरोखरीच फार झपाटयाने सुरू होईल अशी भीती निर्माण झाली असेल तर किमत नियंत्रण, अनुदान, आणि वेतन तात्पुरते गोठवणे या तीन बाबतीत कामगार संघटनांशी वाटाघाटी करून करार घडवून आणणे हे तात्पुरते धोरण म्हणून उपयुक्त ठरू शकेल. परंतु ते केवळ तात्पुरतेच. जागतिक बाजारपेठेत मालाच्या किमती खूप वाढल्या असतील तर एक तर ब्रिटनमधील किमतीच्या पातळी किंवा हुंडणावळीचा दर यात त्या प्रमाणात बदल झाला पाहिजे. हुंडणावळीचे दर बदलते असले पाहिजेत आणि त्यामुळे निर्माण होणारे ताण सहन केले पाहिजेत हे म्हणणे सैद्धान्तिक दृष्टचा ठीक आहे. त्यामुळे आंतरराष्ट्रीय नाणे निधीच्या प्रांगणात चलबिचल होईल आणि बँक ऑफ इंग्लंडवर आगपाखड केली जाईल पण त्याचा फारसा परिणाम घडून येणार नाही हेही खरे. परंतु हुंडणावळीचे दर बदलते राहिल्यास गंभीर स्वरूपाच्या व्यवहार्य अडचणी निर्माण होतील आणि त्यामुळे मूळ प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने हा उपाय योग्य ठरणार नाही आणि पौंडाच्या किमतीत वाढ होऊ द्यावयाची नाही असे आपण एकदा कायमचे ठरवून टाकले तर व्यापाराची परिस्थिती खालावू नये म्हणून देशांतर्गत वेतन आणि किमतीच्या पातळी उंचावणे निश्चितच आवश्यक ठरेल. म्हणजे किमतवाढ योग्य त्या मर्यादेत ठेवण्यासाठी आणि प्रत्यक्ष उत्पन्नाचे अचानक आणि नको असलेले हस्तांतर टाळण्यासाठी–विशेषतः सामाजिक सेवांचा फायदा मिळणाऱ्यांच्या संदर्भात–आर्थिक आणि चलनविषयक धोरणाचा उपयोग करून घेणे एवढाच अर्थ होतो. परंतु पुन्हा एकदा युद्ध भडकले नाही तर १९५१ इतक्या गंभीर परिस्थितीला तोंड देण्याची आपल्यावर पाळी येण्याचा अजिबात संभव दिसत नाही.

## ६. राष्ट्रीय वेतनविषयक धोरणावरील व्यवहार्य आक्षेप

याच प्रकरणातील मागच्या विभागात उल्लेखिलेल्या इतर बाबींची सरकारकडून दखल घेतली गेली तर वेतन विषयक राष्ट्रीय धोरणाची आवश्यकता तरी आहे किंवा नाही या विषयी मी साशंक आहे. ते कसेही असले तरी, निदान ब्रिटनमध्ये तरी अशा धोरणाची अंमलबजावणी करतांना आपल्याला फार मोठ्या अडचणींना तोंड द्यावे लागेल असे मला वाटते.

हॉलण्ड किंवा स्कँडनेव्हियासारख्या इतर देशांत हे धोरण उत्तम प्रकारे अंमलात येऊ शकते असे सांगितले जाते. वस्तुतः ते तसे येऊ शकते किंवा नाही

याविषयीच फार मोठी शंका आहे. हॉलण्डमध्ये ते धोरण अयशस्वी ठरत आहे. आणि स्वीडनमध्ये तर वेतनावर योग्य ते नियंत्रण असे अजिबात राहिलेले नाही. परंतु जेवढ्या प्रमाणात ते धोरण चालू आहे त्याला देखील एक ऐतिहासिक पार्श्वभूमी असून ब्रिटनमध्ये तिचा मागमूसही सापडत नाही. ही पार्श्वभूमी म्हणजे कामगारांच्या आणि मालकांच्या कमालीच्या केन्द्रीभूत झालेल्या संघटना, समाजवादी सरकारांचे सातत्य, गुमास्त्यांच्या लढाऊ चळवळीचा अभाव किंवा सामाजिक ऐक्याची तीव्र जाणीव आणि ब्रिटनच्या मानाने कामगार–मालक अशा वर्गीय संघर्षातून सुटका ही होय इतर कोणतेही फरक नसते तरी देखील ब्रिटनमधील संघटना, दीर्घकालापासून प्रस्थापित झालेले वेतनासंबंधीचे निर्णय घेण्याचे त्यांचे अधिकार, टी. यू. सी.च्या (ट्रेड युनियन काँग्रेस) जनरल कौन्सिलच्या हाती सुपूर्द करण्यास तयार नाहीत. म्हणजेच कामगार संघटनांनी स्वतःच वेतनासंबंधीचे धोरण निश्चित करून त्याची अंमलबजावणी करण्याची शक्यता निदान नजिकच्या भविष्यात तरी दिसत नाही.

त्यामुळे वेतनविषयक धोरणाचे ब्रिटनमधील पुरस्कर्ते आपले उद्दिष्ट तडीस नेण्याचे उत्तम साधन म्हणून सरकारवरच भिस्त ठेवतात. याबाबत करण्यात आलेली सर्वात लोकप्रिय सूचना म्हणजे देशाला परवडेल अशी वेतन–खर्चात वाढ करण्याची एकूण रक्कम सरकारने प्रथमच जाहीर करून टाकावी आणि कायदे विषयक अधिकार असलेल्या नॅशनल वेज बॉडीकडे ती सुपूर्द करावी. सर्व प्रकारच्या सामुदायिक करारात सुसूत्रता राहण्याचे आणि त्यावर देखरेख ठेवण्याचे काम या मंडळाकडे सोपविण्यात यावे. राहणीमान, कामगारांचे स्थलांतर होण्याची आवश्यकता, उत्पादनक्षमतेत होणारा बदल इ. निकषांच्या आधारे याबाबतचे निर्णय घेण्याचे आदेश या मंडळाला देण्यात यावेत,

अशा तऱ्हेची ठोक रक्कम बाजूस काढणे फार अडचणीचे आहे असे मला वाटते. ही रक्कम प्रत्यक्ष स्वरूपातील असली पाहिजे हे उघड आहे. प्रत्यक्ष राष्ट्रीय उत्पादन 'क्ष' नी वाढेल, निर्यातीसाठी 'य' इतकी आणि भांडवल गुंतवणुकीसाठी 'ज्ञ' इतकी वाढ व्हावी लागेल. आंतरदेशीय खर्चातील वाढीसाठी क्ष, य, ज्ञ इतकी रक्कम बाजूस काढावी लागेल व त्यातीलच काही निश्चित भाग वेतनासाठी राखून ठेवला जाईल.

हा सर्व मामला इतका सोपा नाही. अशा तऱ्हेच्या ठोक रकमेचा हिशेब मांडून दाखवणे कदाचित शक्य होईल– अर्थात अंदाज बांधण्याच्या आपल्या सध्याच्या तंत्रामुळे त्यात अचानकता किंवा अनिश्चितता खूपच राहणार. व्यवहारात त्याची प्रत्यक्ष विभागणी करणे मात्र अतिशयच कठीण होऊन बसेल. पुढील वर्षासाठी निर्यात, भांडवल गुंतवणूक, सरकारी खर्च इ. बाबींवर किती रक्कम खर्च करणे शक्य आहे, आणि किती केली जावी या संबंधीचा निश्चित अंदाज वर्तविता येणे

शक्य आहे; असा याचा अर्थ होतो. त्याबरोबरच पगार, भाडे, लाभांश, शेतीचे उत्पन्न इ. बिगरवेतनाच्या बाबींसाठी किती रक्कम खर्च करणे शक्य किंवा आवश्यक आहे तेही ठरविता आले पाहिजे. आणि नंतर त्या रकमांची योग्य दिशेने प्रत्यक्ष विभागणी करता आली पाहिजे. यांत अंदाज वर्तविणे आणि त्याची अंमलबजावणी करणे यासंबंधीच्या तंत्रात एका विशिष्ट मर्यादेपर्यंत बिनचूकपणा गृहीत धरलेला असतो. परंतु तो बिनचूकपणा हा अजून फार दूरवरचा पल्ला आहे. याबाबत जुन्या काळात केलेल्या आर्थिक पहाणींच्या इतिहासाची पुनरावृत्ती होईल अशी धास्ती वाटते. संख्यात्मक लक्ष्ये निश्चित करणे आणि ती नियमितपणे चुकणे आणि त्यामुळे सबंध नियोजनाचीच बदनामी होणे असा प्रकार घडून येईल.

वेतनाची रक्कम निश्चित करण्यात आली तरी देखील तिचे वितरण सहजासहजी करता येणार नाही. त्यासंबंधीचे निकष अनेकदा परस्परविरोधी असतील आणि एका उद्योगापेक्षा दुसऱ्या उद्योगात कामगारांची आवश्यकता जास्त आहे किंवा या वेतनाच्या मानाने ते वेतनप्रमाण बरेच कमी आहे असे ठोकळ मानाने म्हणता आले तरी अत्यंत संयुक्तिकपणे त्यांची निश्चित विभागणी करणे मात्र आपल्याला इतक्यातच शक्य होणार नाही. प्रत्येक कामगार संघटनेकडून येणारे तीव्र दडपण आणि त्याच्या पाठीमागे त्या संघटना औद्योगिक क्षेत्रांत प्रत्यक्ष कृतीचे पाऊल उचलतील ही धास्ती असतांना राष्ट्रीय वेतन मंडळ, न्याय्य वाटा आणि भेदाभेदाला अवसर न देणे या कसोटीस उतरलेल्या सूत्राचाच तेवढा आश्रय घेईल आणि वेतनाचा ढाचा सध्याच्या अर्धवट, परंतु कदाचित अधिक लवचिक असलेल्या स्वतंत्रपणे वाटाघाटी करण्याच्या पद्धतीपेक्षाही अधिक साचेबंद बनेल.

त्याचप्रमाणे औद्योगिक क्षेत्रातील अस्वस्थता कमी होईल अशीही शाश्वती देता येत नाही. (वेतनवाढीसाठी काढून ठेवलेली) रक्कम शून्य असेल किंवा आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाच्या बाबतीत अरिष्ट ओढवले होते त्यावर्षी होती तशी ती शून्याच्याही खाली असेल तर त्याचा जाहीर परिस्फोट झाल्यास अधिकच आरडाओरडा होईल. रक्कम अधिक असेल तर कामगार संघटनांनी सामान्यतः मागणी केली असती त्यापेक्षाही अधिक मागणी करावयास ही चांगली संधी आहे असे त्यांना वाटेल. वेतनाच्या दरात करण्यात आलेली वाढ आणि उत्पन्नात आपोआप घडून आलेली वाढ यात रक्कम विभागली गेली तर कामगार संघटनांत अंतर्गत झगडे सुरू होतील आणि स्वतःचे हसे करून न घेता आंतरराष्ट्रीय व्यापार दरात सुधारणा घडवून आणण्यासाठी पैशाच्या स्वरूपातील वेतनात जाणून बुजून वाढ करणे परंतु प्रत्यक्ष वेतनात मात्र वाढ होऊ न देणे, हे जवळजवळ अशक्य होऊन बसेल.

ठोक रक्कम बाजूला काढण्यातील अडचणी बाजूला ठेवल्या तरी राष्ट्रीय वेतन मंडळाच्या स्थापनेमुळे औद्योगिक क्षेत्रांतील अस्वस्थता कमी होऊ शकेल का ?

पक्षनिरपेक्ष आणि सौम्य प्रकृतीचे लोक सर्वसाधारणपणे वेतन मंडळाच्या शिफारसी मानतील यात शंका नाही. परतु कामगार ? ते मानतील का ? जेव्हा जेव्हा संधी मिळेल तेव्हा तेव्हा कम्युनिस्ट तर कुरापत काढीतच आहेत; तशात सरकारने हस्तक्षेप केला आणि तोही कामगारांनी अधिक संयम पाळावा म्हणून केला तर कम्युनिस्टांच्या प्रचाराला चांगलीच धार चढेल– विशेषत: बहुतेक वेळी या मंडळाची नियुक्तीही शासनाकडूनच होणार असल्याने त्याबद्दल सुरुवातीपासूनच मने कलुषित झालेली असणार. शिवाय वेतनवाढीची मागणी रेंगाळत पडल्यामुळे आधीच असंतोष खदखदतो आहे. कामगार संघटनांबरोबर वाटाघाटी करण्याची सध्याची पद्धती या वेतनमंडळामुळे रद्द होणार नसून त्यात फक्त भर पडणार असल्याने वाटाघाटीची आणखी एक पायरी घुसडली जाणार आहे. त्यामुळे तर या असंतोषात भरच पडणार आहे. आणि कामगारांनी संपाची धमकी दिली असेल तर मंडळाच्या निर्णयाची अंमलबजावणी तरी कशी होणार हाही प्रश्नच आहे. हा काही केवळ पुस्तकी प्रश्न नाही. लवादाच्या निर्णयाविरुद्ध संपावर जाण्याची कामगारांनी धमकी दिल्याची उदाहरणे अलिकडेच घडली आहेत. मग मंडळाच्या निर्णयाविरुद्ध संप होणार नाही कशावरून ? संपामुळे उत्पादनाला फार मोठी खीळ बसणार असेल तर कोणतेही सरकार बोर्डाचे निर्णय कामगारांवर लादण्याचा प्रयत्न करणार नाही. परंतु सरकारने एकदा का माघार घेतली की, मंडळाचा सारा डोलाराच ढासळून पडेल.

या तऱ्हेच्या विचारसरणीमुळेच मध्यवर्ती मंडळ स्थापन करण्याच्या सूचनेबद्दल कामगार संघटना इतक्या उदासीन असतात. मंडळासंबंधीची त्यांची समजूत निराधार आहे असे मानले तरी देखील कामगार संघटनांकडून होणाऱ्या विरोधामुळे अनुल्लंघनीय अडचणी निर्माण होतील. टी. यु. सी. ने आपण होऊन मान्यता दिल्याशिवाय वेतनासंबंधीचे कोणतेही धोरण यशस्वी होण्याची शक्यता नाही. आणि राष्ट्रीय वेतन मंडळाची सूचना टी. यू. सी. ला मान्य नसल्याकारणाने ते स्थापन करणे व्यवहार्य ठरणार नाही

शेवटी मी असा निष्कर्ष काढीन की, वेतनाच्या बाबतीत राष्ट्रीय स्वरूपाचे मध्यवर्ती धोरण आखणे हे अव्यवहार्य आणि चुकीचे होणार आहे. कामगार संघटनांची स्वायतत्ता, आणि सरकारी नियंत्रणाच्या ससेमिऱ्यापासून मुक्तता या ब्रिटिश परंपरेच्या ते विरूद्ध आहे. तसेच तपशीलाबाबत त्यावर अनेक आक्षेप घेता येण्यासारखे आहेत. घटक संघटनांच्या संदर्भात टी यू. सी. अधिक बलवान करणे हे केव्हाही इष्ट हे उघड आहे. आणि वेतना संबंधीच्या आपल्या पुढील वर्षाच्या 'आदर्श' धोरणाचे अधिक स्पष्टीकरण करून सरकार त्याची अमलबजावणी करील तर त्यामुळे परिस्थिती काहीशी सुधारेल यात शंका नाही परंतु त्यापेक्षा अधिक रचनात्मक फेरबदल घडवून आणल्याने परिस्थिती सुधारण्याऐवजी ती बिघडण्याचाच बहुधा धोका अधिक.

परंतु माझा दुसरा निष्कर्ष असा आहे की, चलनफुगावाला विरोध म्हणून वेतनविषयक धोरण ठरविले जाते, हे तर कोणत्याही परिस्थितीत योग्य ठरत नाही. सर्वांना रोजगार उपलब्ध असताना सामुदायिक शक्तीच्या जोरावर करार घडवून आणण्याची जी पद्धती सध्या अस्तीत्वात आहे, तिच्यामुळेच घातुक स्वरूपाची वेतनवाढ घडून येते असे मानण्यास कोणताही निश्चित पुरावा उपलब्ध नाही. त्याप्रमाणे आयात मालाच्या किमतीत कल्पनातीत वाढ झालेली नसेल, लाभांशाच्या प्रमाणातही अशाच तऱ्हेची भरमसाठ वाढ झालेली नसेल आणि सर्वात महत्वाचे म्हणजे कामगारांच्या बाजारपेठेत कामगारांची मागणीही खूप वाढली नसेल तर वेतनवाढ घडून येईल असेही म्हणता येणार नाही. हा अर्थातच तात्पुरता निष्कर्ष आहे. कारण शांततेच्या काळात सर्वांना रोजगार उपलब्ध असलेल्या परिस्थितीचा आपला अनुभव अद्याप तोकडा आहे. परंतु चलनफुगाव होऊ द्यावयाचा नाही आणि त्याचबरोबर समतेला पोषक असे सामाजिक वातावरण निर्माण करावयाचे असा सरकारचा निर्धार असेल तर अंतर्गत स्थैर्य टिकवून धरण्याच्या कामी कामगार संघटनांच्या समजूतदारपणावर आणि नेमस्तपणावर विसंबून राहावयाला कसलीच हरकत नाही अशी माझी समजूत आहे

● ● ●

## प्रकरण बाविसावे

# राष्ट्रीयीकरणाचे अर्थशास्त्र

### १. युद्धपूर्व काळातील राष्ट्रीयीकरणाची कैफियत

१९३० च्या दशकांत राष्ट्रीयीकरणाचे मध्यवर्ती महत्त्व मजूर पक्षाकडून गृहीत धरले जात असे. अराजकवाद किंवा गिल्ड सोशॅलिझमच्या एकाकाळच्या पुरस्कर्त्यांकडून अधूनमधून त्याविरुद्ध आवाज उठविला जात असे. परंतु त्यांची संख्या फारच थोडी होती व विक्षिप्तांतच त्यांची गणना केली जात असे. आणि प्रमुख क्षेत्रातील सार्वजनिक मालकीची वाढ हे मजूर पक्षाच्या कार्यक्रमाचे मुख्य सूत्र राहील असे सर्वसाधारणपणे गृहित धरले जात असे.

विशिष्ट उद्योगाच्या संदर्भात, म्हणजेच ज्या उद्योगात विशिष्ट भांडवल गुंतवणूक झाली असेल त्याचा उपयोग करून घेण्यावर नियंत्रणे बसविता यावीत म्हणून आणि काही अंशी सर्व उद्योगांच्या संदर्भात तसेच सर्व (प्रमुख) भांडवल गुंतवणूक सार्वजनिक क्षेत्रात आणणे हेच अंती समाजवादाशी सुसंगत ठरते अशी समजूत असल्याने राष्ट्रीयीकरण करणे आवश्यक मानले जाते. उद्योगांचे राष्ट्रीयीकरण कोणत्या क्रमाने करावयाचे ते ठरविण्यामागील नेमकी कारणे कोणती ते खाली दिले आहे.

**एक, सार्वजनिक उपयुक्ततेचा मुद्दा** :— अत्यावश्यक सेवा पुरविणाऱ्या काही उद्योगांचे वैशिष्टय असे असते की, बाजारपेठेच्या मानाने त्याला (गॅस, वीज) लागणाऱ्या यंत्रसामुग्रीचा आकार मूलतःच फार मोठा असतो. किंवा त्याच्या वितरणाची (नळ घालणे, केबल आणि तारा टाकणे, आगगाडीचे रस्ते बांधणे इ.) पद्धती ‘अष्टविध’ स्वरूपाची आणि अगदी तपशिलवार असते. त्यामुळे त्यासाठी फार मोठी भांडवल गुंतवणूक लागते. अशा तऱ्हेच्या उद्योगांतील उत्पादनाची किंवा वितरणाची यंत्रणा पुन्हा पुन्हा निर्माण करणे म्हणजे पैशाची उधळपट्टी करण्यासारखे आहे हे उघड आहे. शिवाय त्यात गुंतविलेल्या भांडवलाचा पुरेपूर उपयोगही

करून घेतला जाणार नाही. त्यामुळे अशा तऱ्हेच्या सार्वजनिक उपयुक्ततेच्या उद्योगात चढाओढ किंवा स्पर्धा होऊ देणे योग्य नव्हे आणि त्यात एकाधिकाराला (स्थानिक किंवा राष्ट्रीय प्रमाणावर) परवानगी दिली पाहिजे हे फार पूर्वीपासून मान्य करण्यात आले आहे. परंतु पिळवणुकीला अवसर मिळू नये म्हणून अशा एकाधिकारावर विस्तृत प्रमाणावरील देखरेख असली पाहिजे असा बहुतेक सर्व सरकारांचा ग्रह असतो. आणि याबाबतीतील सरकारी कायदेकानूंची परंपरा इतक्या मर्यादेपर्यंत गेली आहे की, त्यापेक्षा ते उद्योग सरळ सार्वजनिक मालकीचे करून घेणे अधिक सोपे आणि तर्कशुद्ध वाटते.

**दोन, एकाधिकाराचा मुद्दा** :– जरूर ते कायदे करून उत्पादक संघाचा म्हणजे एकत्र आलेल्या उद्योगांचा बीमोड कदाचित करता येईल हे मान्य केले तरी मोठ्या प्रमाणावरील उत्पादनामुळे त्यांना खर्चामध्ये जी काटकसर करता येते तिच्यामुळे एकेकटे चालविले जाणारे मोठमोठे उद्योग उपयुक्त ठरतात. अशा उद्योगांमध्ये चढाओढीचा आग्रह धरणे ग्राहकांच्या दृष्टीने फायद्याचे नसते. बहुतेक सर्व अर्थशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ असे मानतात की, खाजगी एकाधिकारामुळे अपरिहार्यपणे पिळवणुकीचा (केवळ आर्थिकच नव्हे तर राजकीय आणि सामाजिकही) धोका निर्माण होतो. खाजगी एकाधिकाराऐवजी राष्ट्रीयीकरण करून सार्वजनिक एकाधिकार प्रस्थापित करणे हाच त्यावरील तोडगा होऊ शकतो.

**तीन, मूलभूत उद्योगांबाबत मुद्दाचा** :– काही क्रयवस्तू अशा असतात की, त्यांचा इतर अनेक उद्योगात सर्रास उपयोग केला जातो. आणि अशा उद्योगांवर समाजाची भरभराट फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असल्यामुळे त्यांच्या उत्पादनात खंड पडणे किंवा तुटवडा निर्माण होणे आणि सर्वसाधारणपणे त्या वस्तूंची एकूण निर्मिती किंवा त्यांच्या किंमती यांकडे समाजाला खूप लक्ष पुरवावे लागते. इतके की, त्यामुळे सार्वजनिक मालकीचा आत्यंतिक उपायच आवश्यक ठरतो.

हे तीनही मुद्दे उद्योगाचा अत्यावश्यक ढाचा किंवा अर्थव्यवहारांत त्याला असलेले मोक्याचे स्थान ह्यांच्याशी संबंधित असे आहेत. म्हणजेच ज्या खास वैशिष्ट्यामुळे सहाजिकच सरकारी एकाधिकार समर्थनीय ठरतो, त्याच्याशी ते संबंधित आहेत. त्यानंतर येणारा कार्यक्षमतेसंबंधीचा चौथा मुद्दा मात्र अधिक व्यापक आहे. सर्वसाधारणपणे तो मोठ्या प्रमाणावरील संस्थांच्या आर्थिक व्यवहारावर आधारलेला असतो. हे अर्थव्यवहार जवळपास सार्वत्रिक स्वरूपाचे असतात. ते कोणत्याही प्रकारे मर्यादित नसतात. त्यामुळे त्यांत सुसूत्रता आणि एकजिनसीपणा आणावयाचा असेल तर ते एकाच मालकीखाली आणणे हाच त्यावरील एकमेव उपाय होऊ शकतो, असा मुद्दा पुढे येतो. स्पर्धा म्हटली की, त्यात उधळपट्टी आलीच. त्याचप्रमाणे एकाधिकारी नियंत्रण असेल तरच कार्यक्षमता येऊ शकते असे मानले जाते.

विशेषत: काही उद्योग असे असतात की, ज्यांत एकजिनसीपणाचे फायदे फार मोठ्या प्रमाणावर आढळून येतात. उदाहरणार्थ : ज्या उद्योगांतील यंत्र-सामुग्रीचा कमाल आकार हा व्यवहारांत असलेल्या सर्वसाधारण आकाराच्या मानाने मोठा असतो (वीज, गॅस), किंवा कामगार मोठ्या प्रमाणावर अनावश्यक ठरल्यामुळे ज्यांची फेररचना करणे निकडीचे होऊन बसते ( १९३० सालच्या परिस्थितीत कोळसा, आणि पोलाद), किंवा कार्यक्षमतेतील फार मोठ्या तफावती-मुळे सर्वांत उत्तम आणि सर्वांत निकृष्ट यांमध्ये खूप अंतर पडते आणि त्यामुळे त्या उद्योगांतील उत्पादनाचे फेरवाटप करावे लागते. (पुन्हा कोळसा आणि पोलाद) किंवा व्यवस्थापन (ओव्हरहेड) खर्च बेसुमार होत असल्यामुळे स्पर्धेचा परिणाम असा होतो की, भांडवली सरंजामाचा पुरेपुर उपयोग होत नाही. ( रस्ते विरुद्ध आगगाडी) अशा उद्योगांतही एकत्रीकरण अत्यंत फायदेशीर ठरते. ज्यांच्याबाबतीत असे म्हणता येणार नाही, आणि केवळ स्पर्धात्मक मार्गानेही जे अत्यंत उपयुक्त ठरू शकतील, असे काही उद्योगधंदे असू शकतात, हे सैद्धान्तिकदृष्टया मान्य कर-ण्यात आले होते. परंतु भांडवलशाही उद्योगांत विस्तार पावण्याची आणि नियंत्रणे केन्द्रित करीत जाण्याची अनिवार्य प्रवृत्ती दिसत असल्यामुळे हे केवळ सिद्धान्त म्हणूनच शक्य आहे असे धरले जाते. मार्क्सवाद्यांनी हे बरोबर हेरले होते. आणि १९३० ते १९४० च्या दरम्यान त्याचे चांगलेच प्रत्यंतर आले.

अशा तऱ्हेने कार्यक्षमतेचा मुद्दा आणि एकाधिकार नियंत्रणाचे समर्थन यांची परस्परांना जोड मिळते. साहजिकच मोठे एकाधिकारी उद्योग ताब्यात घ्यावे लाग-तील ते अकार्यक्षम आहेत म्हणून नव्हे तर त्यांत सत्तेचे धोकादायक केन्द्रीकरण होत जाते म्हणून. वस्तुत: त्यांच्या संघटनेचा विचार केला तर मोठ्या प्रमाणा-वरील आदर्श उद्योग जसे असायला हवेत, तसेच ते असतात. आणि बाजारपेठांच्या दडपणामुळे ज्यावेळी ते तसे राहू शकत नाहीत, त्यावेळी सरकारी नियंत्रणाने त्यांना ते स्वरूप टिकवून धरण्यास भाग पाडले पाहिजे.

शेवटचा मुद्दा नियोजनासंबंधीचा. नफ्याची प्रवृत्ती आणि राष्ट्रीय हित यांत सदैव संघर्ष असलाच पाहिजे या समजुतीवर सर्वसाधारणपणे हा मुद्दा आधारलेला असतो. मोठी भांडवल गुंतवणूक लागणाऱ्या मूलभूत उद्योगांच्या बाबतीत, खास करून हा मुद्दा नेहमी पुढे मांडला जातो. जास्तीत जास्त नफा मिळविण्याच्या प्रवृत्तीमुळे अशा उद्योगातील भांडवल गुंतवणुकीची पातळी सर्वांना काम मिळवून देण्याची हमी देण्याच्या दृष्टीने अत्यन्त कमी असते. त्याचप्रमाणे ठराविक काळानंतर येणारी अस्थिरता टाळण्याच्या दृष्टीने अत्यंत अनियमित असते. या उद्योगात नवा कारखाना कोठे उभारावा किंवा जुना बंद करावा की नाही, असे प्रश्न उपस्थित झाले म्हणजे खाजगी आणि सार्वजनिक हितसंबंधात संघर्ष उद्भवण्याचा हमखास संभव निर्माण होतो. जॅरो आणि एब्व व्हेल हे अशा हितविरोधाचे कुविख्यात प्रतीक बनले आहे.

काही विशिष्ट उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या बाजूच्या या आर्थिक मुद्द्याव्यतिरिक्त सर्व प्रमुख उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करण्याची ( मग ते कोणत्याही क्रमाने करण्यात आलेले असो ) व्यापक सामाजिक ( आणि जुनी ) कारणे ही होती : पहिले असे की, काही समाजवाद्यांच्या मते नफा घेण्याची प्रवृत्तीच मूळात नैतिकदृष्टया चुकीची असून राष्ट्रीयीकरणामुळेच तिचे उच्चाटन होऊ शकेल. दुसरे असे की, उद्योग सरकारी मालकीचे झाले तरच कामगारांबरोबर सलोख्याचे संबंध प्रस्थापित करणे आणि औद्योगिक क्षेत्रात लोकशाही निर्माण करणे शक्य होईल अशी समजूत होती.

तिसरी गोष्ट अशी की, समतेच्या प्रस्थापनेसाठी मालमत्तेपासून मिळणारे खाजगी उत्पन्न बंद झाले पाहिजे आणि तसे ते बंद करावयाचे असेल तर भांडवलदारांची संपत्ती काढून घेणे आवश्यक आहे. मालकी बदलली की, हे आपोआपच घडून येईल, अशी मूळातली समजूत होती. परंतु नंतर असे आढळून आले की, राष्ट्रीयीकरण करून खाजगी मालकी संपूर्णपणे ताब्यात घेणे न्यायाचे ठरणार नाही. त्याचप्रमाणे ते संयुक्तिकही ठरणार नाही. म्हणून योग्य ती नुकसानभरपाई दिली पाहिजे. त्यासंबंधीचे प्रतिपादन असे होते की, राष्ट्रीयीकरणामूळे मालमत्तेपासून मिळणारे उत्पन्न संपूर्णपणे नष्ट झाले नाही तरी ते कमी होईल. खाजगी भांडवल गुंतवणूक आणि त्या अनुषंगाने लाभांश आणि भांडवली मूल्यात हळूहळू वाढ होण्याची शक्यता यांच्या जागी ठराविक दराने व्याज मिळणारे नुकसानभरपाईचे रोखे दिले जातील. या रोख्यांमुळे दीर्घकाळपर्यन्त जास्त पैसे मिळण्याची शक्यता उरत नाही आणि अल्पकाळपर्यन्त त्यामुळे उत्पन्न मिळू शकले तरी त्यात फारसा धोका पत्करावा लागणार नसल्याने त्या उत्पन्नाचे प्रमाणही कमीच राहील.

कोणत्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करावयाचे असा प्रश्न उत्पन्न झाला, त्यावेळी वरील सर्व मुद्द्यांचा निष्कर्ष सर्वसाधारणपणे सारखाच होता. व्यापक सामाजिक दृष्टीकोण असा होता की, उद्योगांचा आकार लक्षात घेऊन मोठ्या आकारांचे उद्योग प्रथम ताब्यात घ्यावेत. आणि सर्वांत मोठाले उद्योग हे वस्तुतः अेक तर सार्वजनिक उपयुक्ततेचे (गॅस, वीज, आगगाडी), परिणामकारक अेकाधिकार असलेले (कोळसा, पोलाद), मूलभूत स्वरूपाचे (कोळसा, वाहतूक, पोलाद, वीज), खाजगी मालकीचे असतांना विशेष अकार्यक्षम ठरलेले (कोळसा), उघड-उघड ज्यांचा विस्तार होणे आवश्यक आहे, किंवा ज्यांची मध्यवर्ती पुर्नघटना करावयास हवी आहे (कोळसा, गॅस), फार मोठे भांडवल लागणारे (वीज, पोलाद, वाहतूक) असे उद्योग किंवा ज्यांत कामगारांबरोबरचे संबंध अतिशय बिघडले आहेत (कोळसा) असे उद्योग होते त्यापेक्षा कमी महत्त्वाचे इतर उद्योग-युद्धोत्तर काळातील खास कारणामुळे त्यांत समाविष्ट करण्यात आले होते (असे

उद्योग म्हणजे कच्च्या कापसाची खरेदी, नागरी विमान वाहतूक, केबल आणि बिनतारी तारायंत्र). परंतु ठोकळमानाने पाहता १९४५ ते ५० च्या दरम्यान राष्ट्रीयीकरणाच्या यादीत जे उद्योग समाविष्ट करण्यात आले होते त्यांचे निकष यांसारखे निरनिराळे होते. सर्वसाधारण जनमत या गोष्टीला इतके अनुकूल होते की, अनेक वर्षे टोरी पक्षाची राजवट चालू असूनही त्यांतील बरेचसे उद्योग अद्यापही सार्वजनिक मालकीचेच आहेत.

## २. राष्ट्रीयीकरणाचा युद्धोत्तर काळातील अनुभव.

परंतु यापुढे आपण तोच क्रम चालू ठेवून अधिकारावर आल्यावर आणखी पाच सर्वात मोठे उद्योग सरकारी मालकीचे करावयाचे आणि अनंत काळपर्यन्त हे असेच चालू राहावयाचे काय ? या प्रश्नाचे निश्चितपणे होकारार्थी उत्तर द्यावयाला समाजवादी मोठ्या संख्येने पुढे येणार नाहीत. गेल्या शंभर वर्षांत प्रथमच राष्ट्रीयीकरणाच्या भवितव्याबद्दल डाव्या गटात संदेह निर्माण झाला आहे.

याची अनेक कारणे आहेत. पहिले आणि अगदी उघड असे कारण म्हटले म्हणजे प्रत्यक्षात जे घडले ते नीलप्रती (ब्ल्यू प्रिन्ट) पेक्षा वेगळे होते. अपेक्षिलेले काही फायदे पदरात पडले नाहीत, उलट काही तोटे मात्र अनपेक्षितपणे घडून आले.

उदाहरणार्थ नियोजनासंबंधीचा मुद्दा पूर्वीइतका आज स्पष्ट राहिलेला नाही. उपयोगासाठी म्हणून करण्यात आलेले सार्वजनिक क्षेत्रांतील उत्पादन आणि नफ्याची दृष्टी ठेवून झालेले खाजगी क्षेत्रांतील उत्पादन यांतील फरक हा नाही तरी सध्याच्या परिस्थितीत किंवा क्रयशक्तीच्या वाटपाच्या संदर्भात फारसा महत्त्वाचा राहिलेला नाही. तसेच सर्वांना रोजगार मिळण्यासाठी सार्वजनिक क्षेत्र खूप विस्तृत असणे ही अत्यावश्यक बाब आहे, असे गेल्या दहा वर्षांच्या अनुभवानंतर क्वचितच कोणी म्हणू शकेल. या दोन बाबीच तेवढ्या माझ्या डोळ्यापुढे आहेत असे नाही (या पुस्तकात इतरत्र त्यासंबंधींची चर्चा खूप आलेली आहे) तर नियोजनाची आवश्यकता मान्य करण्यात आली होती, त्याठिकाणीही खाजगी क्षेत्रापेक्षा सार्वजनिक क्षेत्रात नियोजन सोपे गेले नाही ही वस्तुस्थिती माझ्या नजरेसमोर आहे.

खाजगी आणि सार्वजनिक अशा दोन्ही क्षेत्रात घडून आलेल्या बदलामुळे ही परिस्थिती निर्माण झाली. खाजगी मालकीच्या बाबतीत युद्धापूर्वी अशी समजूत होती की, खरी सत्ता मालकांच्या हातात असते त्यामुळे सरकारी मालकी प्रस्थापित करण्यासाठी आधी मालकी बदलणे अत्यावश्यक आहे. नाझी राजवटीतील खाजगी मालकीच्या उद्योगांवरील सरकारचे संपूर्ण नियंत्रण पाहता ही समजूत कशी दृढ झाली याचे नवल वाटते. परंतु आता खाजगी क्षेत्रातही नियोजन परिणामकारक करून दाखविता येते याची जाणीव झालेली आहे. आर्थिक, भौतिक,

आणि चलनविषयक अशी अनेक प्रकारची नियंत्रणे सरकारच्या हाती असतात. आणि त्याबाबतीत कार्यक्षमतेचा अगदी आदर्श गाठला गेलेला नसला, आणि अनेकदा त्याबाबत फार मोठया अपेक्षा बाळगल्या जात असल्यातरी खाजगी उद्योगांवर सरकार त्या नियंत्रणाच्या जोरावर आपली इच्छा जरुर लादू शकते.

अशा तऱ्हेने खाजगी क्षेत्रावरील नियंत्रणे अपेक्षेपेक्षाही अधिक प्रभावी ठरली असली तरी सार्वजनिक क्षेत्राच्या बाबतीत मात्र नियंत्रणे अपेक्षा पुऱ्या करू शकत नाहीत. राष्ट्रीयीकरण झालेल्या काही मंडळांची स्वायत्तता आणि ती जनतेला जबाबदार नसणे याकडे पहिल्या प्रकरणातच लक्ष वेधण्यात आले आहे. त्यावेळी नेहमी असे म्हटले जात असे की, आय्. सी. आय्. (इंपीरियल केमिकल कंपनी) पेक्षा लॉर्ड सिट्रिनवर सरकारची सत्ता कमी चालते. आणि या शेऱ्यांत निश्चितच बराच सत्यांश आहे. उदाहरणार्थ बँक ऑफ इंग्लंड स्वतःच्या स्वतंत्र धोरणानुसारच आपले व्यवहार, विशेषतः परदेशी हुंडणावळीच्या बाबतीत, चालवीत असे. इंधन आणि वीज यासारख्या मोक्याच्या उद्योगांत नियंत्रणे जवळजवळ आस्तित्वातच नव्हती. त्या तिन्ही उद्योगांना आपापल्या मर्जीनुरूप कारभार चालविण्याची मुभा होती. त्यांची आपापसात स्पर्धा चाले. त्याचप्रमाणे एक-दुसऱ्याविरुद्ध जाहिरातबाजी करून प्रत्येकजण शक्य तेवढा कमी दर आकारी. (सरकारचेच त्याला प्रोत्साहन असे आणि कोळशाच्या उद्योगावर तर सरकारकडून अशा तऱ्हेची सक्तीच केली जाई.) यातील प्रत्येक उद्योगाची आपापला धंदा अधिकाधिक पुढे रेटण्याची अनिर्बंधपणे खटपट चाललेली असे. आणि कोळसा अत्यंत दुर्मिळ आहे. तसेच या तिन्ही उद्योगांत सुसूत्रता आणली गेली तर फार मोठी काटकसर करणे शक्य आहे, या अगदी सहज लक्षात येणाऱ्या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करण्यात येत असे. प्रत्यक्ष किंवा किंमतविषयक नियंत्रणे बसवून या उद्योगांत सुसूत्रता निर्माण करण्याची वास्तविक अत्यंत आवश्यकता होती परंतु त्या दृष्टीने कसलीही हालचाल झाली नाही.

भांडवल गुंतवणुकीच्या धोरणातही सुसूत्रतेचा असाच अभाव होता. युद्धपूर्व काळांत असे प्रतिपादन करण्यात येत असे की, मोठी भांडवल गुंतवणूक लागणाऱ्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करण्यात एक फायदा असा आहे की, मोठाल्या भांडवल गुंतवणुकीच्या योजनांमुळे व्यापारातील आवर्तनाला स्थिरता प्राप्त होईल. खाजगी भांडवल गुंतवणूक ज्यावेळी तेजीत असेल त्यावेळी सरकारी भांडवल गुंतवणूक आखडती घेता येईल तर खाजगी भांडवल गुंतवणुकीचा वेग वाढवता येईल. परंतु प्रत्यक्षात असे कधीच घडले नाही. आणि खाजगी भांडवल गुंतवणुकीतील चढउतारामुळे चलनवाढ मात्र कमी जास्त होत गेली आणि त्याला अटकाव कर-ण्याचा फारसा प्रयत्न झाला नाही.

असे होण्याची कारणे दोन होती. पहिले कारण असे की, नियोजनासंबंधी

जे प्रश्न उपस्थित झाले, त्याची योग्य अटकळ आधी बांधण्यात आली नव्हती. त्याचप्रमाणे वेळोवेळी ते सोडविण्याचा प्रयत्नही झाला नाही. त्यामुळे बोर्डांना कोणते धोरण स्वीकारावयास भाग पाडावयाचे आहे याबाबत खुद्द मंत्र्यांचेच धोरण स्पष्ट नसे. त्यामुळे ते शक्य तेवढी नरमाईची, म्हणजे बोर्डांना त्यांच्या मर्जीनुरूप वागण्याची मुभा देणारी भूमिका घेत.

दुसरे कारण म्हणजे मंत्र्यांच्या मनांत या प्रश्नाविषयी स्पष्टता असली तरी त्याबाबत सक्ती करण्याला ते काहीसे नाखूष असत. कारण सार्वजनिक महामंडळे स्वतंत्र असली पाहिजेत हा जो मॉरिसनप्रणित राष्ट्रीयीकरणाचा सिद्धांत होता त्यावर त्यांची एक प्रकारची ठोकळेबाज निष्ठा असे. या प्रवृत्तीमुळे पार्लमेन्टचे बारीकसारीक गोष्टींवरील निरीक्षण टळले व महामंडळे सरकारी खाती बनली नाहीत हे चांगले झाले. परंतु काही काही वेळेला मात्र ती प्रवृत्ती अगदी नको इतकी ताणली जाई. कारण युद्धपूर्व काळापेक्षा युद्धोत्तर काळातील तशाच त-हेच्या कायद्यांमुळे मंत्र्यांच्या हाती किती तरी अधिक सत्ता आली असूनही महामंडळाच्या कारभारात हस्तक्षेप करायला ते फार बिचकत आणि महामंडळांना स्पष्ट आदेश देण्याऐवजी, विशेषत: पार्लमेन्टमधील चर्चेच्या वेळी, एखाद्या आरोपीच्या वकीलासारखे ते बचावात्मक बोलत.

अर्थात मुख्यत्वेकरून हा राजकीय प्रश्न आहे. सत्य परिस्थिती अशी आहे की, सरकारची मुळात इच्छा असेल तर खाजगी किंवा सार्वजनिक क्षेत्रातील धंद्यावर ती लादण्याच्या बाबतीत अनुल्लंघनीय अशा आर्थिक अडचणी आता राहिलेल्या नाहीत. खरोखरीच १९४५ नंतरच्या नियोजनाच्या क्षेत्रांतील अनुभवाने पहिल्या भागात जे विवेचन केले आहे त्यातील एक मुद्दा अगदी स्पष्ट झाला आहे. आणि तो म्हणजे मालकी हक्क. आता आर्थिक सत्तेचे ते निर्णायक गमक राहिलेले नाही. सरकारजवळ जरूर ती सर्व आर्थिक सत्ता आहे पण प्रश्न असा आहे की, सरकारला ती वापरावयाची आहे की नाही? आणि या दृष्टीने केवळ मालकी बदलली म्हणजे निर्णायक स्वरूपाचे बदल हमखास घडून येतातच असे नाही.

ते कसेही असले तरी, राष्ट्रीयीकरणाबाबतच्या नियोजनाच्या मुद्याचा सध्या काहीसा दुर्लौकिक झाला आहे, मग त्याची कारणे काहीही असोत. १) नियोजनाच्या उद्दिष्टांसंबंधी मंत्र्यांना स्पष्ट कल्पना असणे २) ही उद्दिष्टे आर्थिक किंवा प्रत्यक्ष नियंत्रणाने साध्य होऊ शकणार नाहीत आणि ३) मंत्र्यांनी राष्ट्रीयीकरण झालेले असताना ती उद्दिष्टे तडीस नेण्यासाठी योजना आखण्याची तयारी ठेवणे या तीन अटी पुऱ्या होत असतील तरच आता तो मुद्दा लागू पडतो असे म्हणता येईल.

नियोजनाच्या बाबतीत आलेल्या अपयशाच्या जोडीला किंमतीबाबतच्या धोरणामुळे संपत्तीचा ओघ खाजगी व्यक्तींकडून सार्वजनिक क्षेत्राकडे वळविण्याचे

राष्ट्रीयीकरणाचे दुसरे उद्दिष्टही पूर्णांशाने तडीस जाऊ शकले नाही. यासंबंधीची चर्चा यापूर्वीच अन्यत्र येऊन गेली आहे. थोडक्यात सांगावयाचे झाले तर महामंडळांना जादा साठा करून ठेवण्यास परवानगी नाकारल्याने ( कोळशाच्या बाबतीत झाले त्याप्रमाणे त्यामुळे साधनसामुग्रीचे गैरवाटप तर होतेच पण त्याशिवाय) या सार्वजनिक क्षेत्रातील शिल्लक शून्यावर येऊन ठेपते इतकेच नव्हे तर ती शून्याच्याही खाली जाते ( म्हणजे तोटा येऊन कर्ज काढावे लागते ). आणि त्यामुळे खाजगी व्यक्तींच्या हाती उद्योग असतांना जरूर भासली नसेल इतके आता एकूण शिलकीचे अतोनात केन्द्रीकरण केले जाते. खाजगी भांडवलापेक्षा सार्वजनिक क्षेत्रातील भांडवल खूप वाढविण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी किंमतविषयक धोरण त्यापेक्षा अगदी निराळे असावयास हवे होते.

तत्वत: हे दोन्ही दोष सुधारता येण्यासारखे आहेत. म्हणजे असे की, सरकारने स्वेच्छेने स्वीकारलेल्या धोरणाचीच ती फलश्रुती आहे. ( आणि खरे बोलावयाचे तर त्यालाही काही व्यवहार्य बाजू होती.) परंतु इतर अडचणी अशा उत्पन्न झाल्या आहेत की, ज्या आजपर्यंतच्या राष्ट्रीयीकरणासंबंधीच्या कल्पनांतच अनुस्यूत आहेत म्हणजे त्या राष्ट्रीयीकरणात अभिप्रेत असलेला एकाधिकार आणि व्याप्ती ( कित्येकदा तर प्रचंड व्याप्ती ) यांच्याशी निगडीत झालेल्या असतात.

आता आपल्या हे चांगले लक्षात आले आहे की, एकाधिकारात, मग तो सार्वजनिक क्षेत्रातील असला तरी त्यातही, काही उणिवा निश्चितपणे असतातच. एखाद्या वस्तूचे उत्पादन करण्यास कायद्याने बंदी करण्यात येत असल्यामुळे तेवढ्यापुरती नागरिकांच्या स्वातंत्र्यावर खरीखुरी मर्यादा पडते आणि विशेष बौद्धिक पात्रता आवश्यक असलेल्या ( बी. बी. सी. सारख्या ) धंद्यात एकाच मालकाच्या हाताखाली नोकरी कराव्या लागणाऱ्यांच्या बाबतीतील निर्बंध तर अधिकच घातुक ठरतात. परंतु युद्धपूर्व काळातील समाजवाद्यांची समजूत होती त्यापेक्षा आळशीपणा घालवून उपक्रमशीलतेला उत्तेजन देण्याच्या बाबतीत आणि निरनिराळ्या वस्तू व विक्रेते यांची निवड करण्याची भरपूर मोकळीक देऊन ग्राहकांच्या हिताची जोपासना करण्याच्या बाबतीत ( शिधावाटप रद्द करण्याच्या बाबतीत जनतेची जी प्रतिक्रिया दिसून आली त्यावरून याची प्रचिती आली ) स्पर्धा अधिक फायदेशीर ठरते असे आढळून आले आहे. अर्थात एकाधिकारात कसलेही फायदे नाहीत किंवा स्पर्धा सर्वस्वी निर्दोष असते असा याचा अर्थ नाही. येथे अभिप्रेत आहे ते इतकेच की, या फायद्यांसंबंधीचे चित्र आता जरासे निराळे दिसू लागले आहे. त्याचप्रमाणे याचा अर्थ असाही नाही की, प्रत्येक वेळी चढाओढ प्रत्यक्षात शक्य असतेच असे नाही. उलट चढाओढ कमी कमी होत जाणे अटळ आहे हे युद्धपूर्व काळातील मार्क्सवाद्यांनी वर्तवलेले भाकित खरे ठरलेले नाही. आणि एकाधिकार आणि स्पर्धा यात निवड करण्यास भरपूर वाव असल्याचे आढळून येत आहे– पूर्वी कोणाला असे वाटत नसे.

तथापी सर्वात जास्त बदल जर कशात घडून आला असेल तर तो मोठ्या प्रमाणावरील उत्पादनाबाबत. मोठमोठ्या कारखान्यांतून होणाऱ्या सामुदायिक स्वरूपाच्या उत्पादनामध्ये जास्तीत जास्त कार्यक्षमता दृष्टीला पडते असे युद्धपूर्व काळात त्रिकालाबाधित सत्य म्हणून समजले जात असे. पण आज आपल्याला तशी खात्री देता येत नाही– निदान कारखाना एका विशिष्ट मर्यादेहून मोठा असेल तर. तांत्रिक बाबतीतील काटकसरीबाबत कोणाचे दुमत होईल असे नाही परंतु या काटकसरीला इतर क्षेत्रातील बिनकाटकसरीच्या खर्चामुळे छेद जाईल की काय अशी मात्र शंका निर्माण होते. अशा बाबी म्हणजे कामगारांचे नीतिधैर्य ( कामगारांचे नीतिधैर्य कमी झाले तर अपघातांचे आणि गैरहजर राहणारांचे प्रमाण वाढते आणि कामगारांतील मनापासून काम करण्याची प्रवृत्ती कमी होऊ लागते) किंवा व्यवस्थापकीय जबाबदारी आणि नियंत्रण– याचा परिणाम निर्णय घेण्याच्या प्रक्रियेचे फाजिल केंद्रीकरण होण्यात होतो व त्यामुळे त्यात शीथिलता येते– या होत. आतापर्यंत यापैकी कोणताच मुद्दा या किंवा त्या बाजूने सिद्ध झालेला नाही. परंतु इतके मात्र स्पष्ट दिसते की, प्रचंड आकार हे सर्वस्वी वरदानच आहे असे म्हणता येणार नाही. विशेषत: त्याबरोबर फाजील केंद्रीकरणाचा धोका निर्माण होतो हे तर नक्कीच !

व्यवहारात हा धोका नेहमी टाळता आलेला नाही. राष्ट्रीयीकरणाबरोबर कामगारांबरोबरच्या संबंधात झपाट्याने आणि मोठ्या प्रमाणात सुधारणा घडून येईल व मग साहजिकच औद्योगिक लोकशाहीच्या दिशेनेही हळूहळू प्रगती होत जाईल अशी राष्ट्रीयीकरणाबद्दल जी आणखी आशा बाळगली जात असे, त्याबाबत निराशा पदरी येण्याचे हे एक कारण आहे. ( तशी कारणे आणखीही आहेत. )

या मोठमोठ्या संस्था कशा चालवावयाच्या याविषयी आपल्या कल्पना अधिकाधिक स्पष्ट होत जातील, तसतशा यातील काही समस्या मागे पडत जातील. आता तरी निदान त्याबाबत मतभेदच पुष्कळ आहेत. पार्लमेन्टचे नियंत्रण कितपत असावे आणि सरकारला ते कितपत जबाबदार असावेत, ( १९५३ साली या संबंधात नेमलेल्या चिकित्सा समितीने असे दाखवून दिले आहे की, केवळ राजकारणी लोकांतच नव्हे तर निरनिराळ्या महामंडळांच्या सभासदांतही याबाबत आपआपसात तीव्र मतभेद होते.) व्यवस्थापकीय नियंत्रणाचे केन्द्रीकरण अथवा विकेन्द्रीकरण कितपत असावे आणि प्रत्यक्ष अंमलबजावणी करून घेण्याच्या बाबतीत व्यवस्थापनाला कितपत मुभा असावी, संयुक्त विचारविनिमय अधिक परिणाम कारक कसा करता येईल, ग्राहक समित्यांचे कार्य काय असावे, ( असावे किंवा नाही ) बढतीबाबतचे धोरण काय असावे ? ( याबाबत कामगार संघटना ज्येष्ठता सूचीनुसार बढती दिली जावी असा आग्रह धरतात तर गुणावगुण लक्षात घेऊन बढती द्यावी अशी व्यवस्थापनाची भूमिका असते), विश्वविद्यालयीन पदवीधर घेण्याबाबत कोणाचेच एकमत

होत नाही इत्यादी मतभेदाच्या बाबी आहेत. काही अत्यंत अवघड समजल्या जाणाऱ्या धंद्यातही राष्ट्रीयीकरण बऱ्याच प्रमाणात यशस्वी झालेले असले तरी सरकारी एकाधिकार असलेले राष्ट्रीयीकरण हे पूर्वीप्रमाणे आता रामबाण औषध समजले जात नाही, हे निदान सध्यापुरते तरी कोणीही नाकारू शकणार नाही.

## ३. सरकारी एकाधिकाराचे क्षेत्र वाढविण्याबरील आक्षेप

जरी या अडचणी उपस्थित झाल्या नसत्या तरीदेखील व्यापक सामाजिक निकषांऐवजी काही विशिष्ट आर्थिक निकषांवरून निःसंदिग्धपणे काही विशिष्ट उद्योगांचा नामोल्लेख होत नाही ही वस्तुस्थिती शिल्लक राहतेच. सार्वजनिक उपयुक्ततेच्या अशा बाबीच ( पाणी सोडून ) राहिलेल्या नाहीत. त्याचप्रमाणे कोळसा किंवा आगगाडी या उद्योगांना ज्या अर्थाने मूलभूत उद्योग असे म्हटले जाते त्या अर्थाने ( पोलाद सोडून ) कोणताही धंदा मूलभूत स्वरूपाचा राहिलेला नाही. आणि केवळ आकारमान लक्षात घेऊन धंदा हाताळावयाचा म्हटले तर आपल्याला असे आढळून येईल की, रासायनिक, मोटारगाड्या, विमाने, जहाज-बांधणी, रेडिओ, विद्युत उपकरणे इत्यादी ज्या उद्योगांचा ताबडतोब क्रम लागेल, त्यांचा बव्हंशी एकाधिकारात समावेश व्हावयाचा नाही इतकेच नव्हे तर राष्ट्रीय पायावर संघटित करण्याच्या दृष्टीनेही ते उद्योग सोयिस्कर ठरणार नाहीत. १९४५ ते १९५० च्या दरम्यान बनविण्यात आलेल्या यादीपेक्षा विशेषतः एकाधिकार नियंत्रण बसविण्याच्या आणि त्यांच्या कार्यक्षमतेच्या दर्जाच्या दृष्टीने ते अगदी निराळ्या प्रकारच्या उद्योगांत मोडतात.

यांपैकी पहिल्या मुद्याबाबत बोलावयाचे तर ( काही भारी रासायनिकांचा अपवाद वगळता ) ते उद्योग एकाधिकारांत मोडत नाहीत तर त्यांत स्पर्धात्मक अनेकाधिकार असतो. ( एकाधिकार अनेक धंद्यात असतात परंतु बव्हंशी ते एक तर छोट्या धंद्यातील ( उदा. काड्याच्या पेट्या ) असतात. किंवा उत्पादक संघाच्या ( कार्टेल ) स्वरूपातील असतात. या उत्पादन संघाच्या स्वरूपातील एकाधिकारा-बाबत मात्र एकाधिकार विरोधी कायदे करून उपाययोजना करणे शक्य आहे आणि तशी ती केली पाहिजे. ) ते उद्योग राष्ट्रीयीकरण करण्याच्या अवस्थेलाही पोहोचलेले नसतात. म्हणजे असे की, त्यात एकाधिकार निर्माण झालेला नसला तरी एकाधिकारामुळे त्यात सुधारणा घडून येण्यासारखी परिस्थिती असते. उलट बहुतेक उद्योगांची परिस्थिती अशी असते की, एकाधिकारामुळे त्यांना धोका पोहोचण्याचा संभव असतो. त्या उद्योगांतील कार्यक्षमता वाढण्यासाठी स्पर्धेला वाव असणे आवश्यक असते. त्यातील घटक कमाल मर्यादेपेक्षा अर्थातच लहान नसतात आणि त्यांचे उत्पादन आणि बाजारपेठ अशा प्रकारची असते की, केंद्रीभूत नियंत्रण गैरफायद्याचे ठरावे. जुन्या धाटणीचे राष्ट्रीयीकरण म्हणजे गैरसोयीच्या आणि

स्पर्धात्मक उद्योगांवर सरकारी एकाधिकार लादणे एवढाच त्याचा अर्थ होईल व त्यामुळे एकात्मक केंद्रीकरणाचे क्षेत्र मात्र खूप वाढेल.

दुसऱ्या काही कारणासाठीही जुन्या स्वरूपाचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या दृष्टीने ते उद्योग गैरसोयीचे आहेत. १९४५ ते ५० च्या दरम्यानच्या उद्योगात पुढील बाबींचे जवळजवळ स्पष्ट निरूपण करण्यात आलेले होते. उद्योगांच्या सुस्पष्ट मर्यादा, त्यामानाने साधे आणि एकाच प्रकारचे उत्पादन व त्यासाठी लागणारा एकाच प्रकारचा कच्चा माल व सेवा, बाजारपेठांबाबत तुरळक अडचणी आणि (अल्पमुदतीपर्यंत) मागणीसंबंधी बराचसा अचूक अंदाज. उलटपक्षी वरील उद्योगांच्या कक्षा सुस्पष्ट नसतात. उत्पादन विविध प्रकारचे असते आणि अखेरच्या मागणीतही बरीच अस्थिरता असते. अशा तऱ्हेने आपण मूलभूत उद्योगांतून कारखानदारीच्या उद्योगांत पदार्पण केले म्हणजे त्या उद्योगांची व्याख्या करणे अत्यंत अवघड होऊन बसते. विविधस्वरूपी उत्पादनात वाढ होऊ लागल्याने परस्परांना व्यापून टाकण्याचे प्रकार नित्याचे होऊन बसतात आणि आजचे बहुतेक सर्व मोठे कारखाने एकाच वेळी इतर अनेक उद्योगांतही पसरतात. निरनिराळे कारखाने आणि उद्योग यांच्या कक्षा मिळत्याजुळत्या नसल्याने त्यांची व्याख्या करतांना राष्ट्रीयीकरण करणारांपुढे पोलादासारख्या साध्या उद्योगांची व्याख्या करतांना जितक्या अडचणी उपस्थित होतात, त्यापेक्षा कितीतरी अधिक आणि गुंतागुंतीच्या अडचणी उत्पन्न होतात.

शिवाय सध्याच्या सार्वजनिक क्षेत्रांतील उद्योगांपेक्षा विविधस्वरूपी उत्पादनामुळे विक्री आणि बाजारपेठेसंबंधीचे धोरण याला किती तरी अधिक महत्त्व प्राप्त होते, मूलभूत सेवांच्या इतका कारखानदारी उत्पादनाच्या मागणीसंबंधी कोणत्याही परिस्थितीत निश्चित अंदाज करता येत नाही. त्याशिवाय उत्पादन जितके बहुविध स्वरूपाचे होत जाते (आणि जितक्या जास्त वस्तूंवर "शिक्के" मारले जातात ) तितके विक्रीसंबंधीच्या धोरणाचे अधिकाधिक केन्द्रीकरण होत जाते. केवळ देशांतर्गत बाजारपेठेतच ज्यांचा माल खपतो, अशा उद्योगांतही हीच परिस्थिती असते. परंतु धातू, अभियांत्रिकी आणि रासायनिक उद्योगही निर्यातीकरिता माल तयार करतात आणि त्या क्षेत्रात तर चढाओढ फार तीव्र स्वरूपाची असते, फार मोठे धोके पत्करावे लागतात आणि त्यांतील चढउतारही विशेष जाणवण्यासारखे असतात. याठिकाणी बाजारपेठेसंबंधीच्या समस्या आणि ग्राहकांना अनुकूल असणाऱ्या बाजारपेठेतील विविधतेशी सातत्याने झटपट जुळवून घेणे याला तर अतिशयच महत्त्व प्राप्त होते. तीव्र स्पर्धा असलेल्या बाजारपेठेत मोटारगाडी किंवा विद्युत् उपकरणे विकणे आणि एकाधिकार असलेल्या देशांतर्गत बाजारपेठेत कोळसा किंवा वीज विकणे यात महदंतर आहे. आणि मूलभूत उपयुक्ततेच्या उद्योगांसाठी नेहमीच्या स्वरूपाचे व्यवस्थापन सोयीचे असले तरी

केंद्रीभूत झालेल्या सार्वजनिक क्षेत्रातील महामंडळाचे वैशिष्टच बनलेले तशाच तऱ्हेचे व्यवस्थापन ही अगदी निराळ्या प्रकारची जबाबदारी पार पाडण्याच्या दृष्टीने पुरेसे लवचिक आणि गतीमान बनू शकेल की नाही ते नीटसे स्पष्ट होत नाही.

ते कसेही असले तरी तीव्र स्पर्धा असलेले निर्यातप्रधान उद्योग बहुधा निरनिराळ्या छापाच्या वस्तू तयार करतात आणि त्या मालाला येणारी मागणी अतिशय चंचल आणि अनिश्चित अशी असते. अशा उद्योगांचे स्वरूप ५० च्या दरम्यान राष्ट्रीयीकरण करण्यात आलेल्या उद्योगांपेक्षा अगदी निराळे असते. त्याचप्रमाणे अगदी निराळ्या प्रकारच्या समस्यांना त्यांना तोंड द्यावे लागते. मध्यवर्ती सरकारी महामंडळे स्थापन करण्यात आली तर या दुसऱ्या प्रकारच्या, म्हणजे १९४५ ते १९५० च्या दरम्यान राष्ट्रीयीकरण आलेल्या उद्योगांचा कारभार व्यवस्थितपणे चालू शकेल. परंतु पहिल्या प्रकारच्या उद्योगांची परिस्थिती मात्र तशी असेलच असे आपोआप सिद्ध होत नाही.

त्यांचा ढाचा राष्ट्रीयीकरणाला सोयिस्कर आहे किंवा नाही हा प्रश्न बाजूस ठेवला तरी हे उद्योग त्यांच्या मालकीत बदल केला पाहिजे अशी मागणी करण्याइतके उघडउघड अकार्यक्षम आणि अप्रगत (युद्धपूर्व काळांतील कोळशासंबंधी म्हणता आले असते त्याप्रमाणे) आहेत असे म्हणता येणार नाही. उत्पादन, उत्पादनक्षमता, निर्यात किंवा भांडवल गुंतवणूक यापैकी कोणताही निकष लावला तरी युद्धोत्तर काळातील त्यांचे कार्य किमानपक्षी बऱ्यापैकी तरी खासच होते. खरोखरी पाहता धातू, अभियांत्रिकी, आणि रासायनिक उद्योगच मुख्यत: युद्धानंतरच्या काळांतील उत्पादन आणि निर्यात यांच्या वाढीस कारणीभूत आहेत.

याचा अर्थ असा नव्हे की, त्या उद्योगांची कार्यक्षमता अगदी पूर्णत्वास पोहोचली आहे किंवा त्यांत गंभीर स्वरूपाचे दोष सापडणार नाहीत. ते देखील मानवनिर्मितच असल्यामुळे साहजिकच ते पूर्णत्वास पोहोचू शकत नाहीत. याचा अर्थ इतकाच की, कोठलाही समंजस माणूस त्यांचा आर्थिक लौकिक सरासरीपेक्षा चांगला आहे असा निष्कर्ष काढील आणि ते सार्वजनिक मालकीचे केले तर त्यांत सुधारणा होईल किंवा नाही, याबद्दल मात्र शंका व्यक्त करील.

उदाहरणार्थ, रासायनिक उद्योग. मजूर पक्षाच्या १९५५ च्या निवडणूक जाहीरनाम्यात (काहीशा दूरान्वयाने) या उद्योगाचा उल्लेख होता. आणि मजूर पक्षाच्या अधिवेशनातही त्याच्या राष्ट्रीयीकरणासंबंधी बहुधा ठराव केले जातील. एकूण उद्योगाच्या सरासरीपेक्षा युद्धोत्तर काळात या उद्योगातील उत्पादन दुपटीने वाढले असल्याचे दिसून येते. १९४८ पासून त्याची उत्पादनक्षमता जवळजवळ ५० टक्क्यांनी वाढली तर युद्ध संपल्यापासून या उद्योगांतील भांडवल गुंतवणुकीसाठी जवळजवळ ५०० दशलक्ष पौंड निराळे काढण्यात आले. आणि निर्यातीच्या बाबतीतही या उद्योगाने नेत्रदीपक कामगिरी बजावली. तसेच रासायनिक उद्योगाचे

मोठमोठे कारखाने असलेल्या शहरांतून झालेल्या मतदानावरून असे दिसून येते की, त्यातील कामगार वर्ग सर्वसाधारणपणे समाधानी असून त्याला उद्योगाचे राष्ट्रीयीकरण व्हावे असे तीव्रतेने वाटत नाही. उद्योगाच्या आकारमानामुळे उद्भवणाऱ्या काही अपरिहार्य कारणांमुळे काही मूलभूत रासायनिक वस्तूंच्या बाबतीत एकाधिकाराची परिस्थिती निर्माण झाली आहे हे मात्र खरे ! नव्या नव्या उत्पादनाच्या बाबतीत झपाटयाने विकास पावत असलेल्या या उद्योगातील अशा वस्तुस्थितीमुळे महत्वाचे परिणाम घडून येत असले तरी आवश्यकता वाटल्यास जरूर ते सरकारी आदेश काढून त्या परिस्थितीला तोंड देता येणे शक्य आहे. आणि ते कसेही असले तरी त्यासंबंधी उद्योगाचा विचार केला तर असे आढळून येईल की, आय्सीआय्ला अनेक मातब्बर स्पर्धकांना तोंड द्यावे लागते. त्याचप्रमाणे हेही खरे की, या उद्योगाच्या राष्ट्रीयीकरणाविरुद्ध त्याच्या प्रवक्त्यांकडून जे मुद्दे मांडले जातात (उदा. परदेशातील संलग्न संस्थांतील) ते अगदीच पोचट आहेत. तथापी सबंध रासायनिक उद्योगाचे किंवा विशेषतः आय्सीआय्चे राष्ट्रीयीकरण करणे आर्थिकदृष्टया अटळ आहे असे समंजस मतदारांना पटवून देता येणार नाही. या उद्योगाचे राष्ट्रीयीकरण करावयाचेच असे आपण ठरविले तर त्यापासून जवळजवळ कसलाच आर्थिक फायदा होणार नाही (उलट राजकीय किंवा कामगार संघटनांच्या दडपणामुळे वरिष्ठ आणि मध्यम श्रेणीतील वेतनाच्या पातळीत घट करावी लागली तर तोटा होण्याचाच संभव आहे ) हे आपल्याला कबूल करावे लागेल आणि दुसऱ्या कोणत्या तरी व्यापक सामाजिक कारणास्तव ते राष्ट्रीयीकरण आवश्यक आहे, असे त्याचे समर्थन करावे लागेल.

मोटार उद्योगाबाबत तर टीकेला अधिकच वाव आहे. निर्यातीच्या बाबतीत जर्मन स्पर्धकांबरोबर तो नेहमीच टिकाव धरू शकला आहे असे नाही. आणि त्या उद्योगात जास्तीत जास्त माल देशातल्या देशात खपविण्याचा प्रयत्न करून अत्यंत थोडा माल निर्यात केला जातो. ( शिवाय आपल्या कामगिरीचे जे समर्थन त्या उद्योगाकडून केले जाते, त्यात आत्मसंतुष्टता आणि जुनाट आर्थिक कल्पना यांचे घृणास्पद मिश्रण पाहावयास मिळते. ) तरीदेखील त्या उद्योगाची कामगिरी काही अगदीच टाकाऊ नाही. मोटार उद्योगातील निर्यात युद्धपूर्व काळापेक्षा कितीतरी पटीने वाढली आहे ( मोटारी सहापट, व्यापारी गाडया दहा पट ), त्याचप्रमाणे त्याच्या उत्पादनक्षमतेतही योग्य प्रमाणात वाढ झाली असल्याचे दिसून येते. शिवाय त्यात ज्या उणिवा आहेत, त्या राष्ट्रीयीकरण केल्याने दूर होऊ शकतील अशा प्रकारच्या नाहीत. मोटारींच्या निर्मितीपेक्षाही त्या उणिवा नमुना, विक्री आणि खप या प्रांतातल्याच आहेत. आणि आता निरनिराळया मोटार कंपन्यांचे एकत्रीकरण घडून आल्यानंतर मोटारनिर्मिती करणारे घटक कारखाने कमाल प्रमाणापेक्षा फारसे लहान वाटत नाहीत. खरोखरी पाहता घरगुती बाजारपेठेतील

वाढलेल्या मागणीवर फाजील लक्ष केन्द्रित केले जाते, हा या धंद्यातील मुख्य दोष असून राष्ट्रीयीकरण न करताही सरकार तो सहज दूर करू शकेल. त्यासाठी वाढलेली मागणी खाली आणून त्यातील स्पर्धेचे प्रमाण वाढीस लावले म्हणजे झाले.

विमान बांधणीच्या उद्योगातही काही ठळक दोष असले तरी त्यातही काही बाबतीत नेत्रदीपक यश मिळालेले आहे. आणि सर्वसाधारणपणे आता हे मान्य केले जाते की, त्यातील समस्या सोडविण्याचा राष्ट्रीयीकरण हा सर्वोत्तम मार्ग नव्हे! (अर्थात असे म्हणणे एकाएकी लोकांना मुळीच मान्य होण्यासारखे नव्हते.) "केन्द्रानुवर्ती नियंत्रणामुळे विकासाची गती गारठून जाईल.. उद्योग राष्ट्राच्या मालकीचा केला तरच तांत्रिक कार्यक्षमतेत वाढ होते असे सिद्ध करणारा कोणताही पुरावा पुढे आलेला नाही. फ्रान्समधील उद्योगांच्या बाबतीत तसे घडलेले नाही. त्याचप्रमाणे शॉर्ट ब्रदर्स या कंपनीचे बहुसंख्य शेअर्स सरकारने स्वतःकडेच घेतले म्हणून लगेच कार्यक्षमतेत वाढ झाली असेही म्हणता येणार नाही. ब्रिटनमधील खाजगी कंपन्यांपैकी ज्या सरकारला माल पुरवण्यावरच मुख्यतः अवलंबून असतात, त्यांची कार्यक्षमता सर्वात कमी असते.... कामगारवर्गाकडूनही राष्ट्रीयीकरण करावे म्हणून विशेष दडपण आल्याचे दिसत नाही.... एखाद्या उद्योगाचे राष्ट्रीयीकरण केल्याने होणारे फायदे तोटयाच्या मानाने कमीच असतात" वगैरे आक्षेप लक्षात घेण्यासारखे आहेत.

कोळसा आणि रेल्वे या उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणाबाबत लागू पडणारा आर्थिक युक्तिवाद इतर उद्योगांच्या गटाला तितका समर्थपणे लागू पडत नाही. वरील परिच्छेदात नामोल्लेख केलेल्या बाबीच त्याला सर्वस्वी जबाबदार आहेत असे नव्हे. ब्रिटनमधील उद्योगांची परिस्थिती अशी आहे की, येथे सर्वांना रोजगार उपलब्ध आहे त्याचप्रमाणे येथील सामाजिक वातावरणही अधिक निरोगी आहे. त्यामुळे युद्धपूर्व काळापेक्षा आता येथील उद्योगांतील कार्यक्षमता कितीतरी वाढली आहे. त्याचप्रमाणे स्पर्धेत ते इतरांबरोबर टिकू शकतात आणि त्यांची व्याप्तीही खूप वाढत आहे. ब्रिटनमधील ही सर्वसाधारण परिस्थितीच मुख्यतः याला जबाबदार आहे. याचे श्रेय काही अंशी मजूर सरकार स्वतःकडे घेऊ शकेल. परंतु त्यामुळे उद्योगांच्या घडणीत महत्त्वाचे बदल घडवून आणण्याची बाजू अपरिहार्यपणे लंगडी पडते.

## ४. यशस्वी राष्ट्रीयीकरणाचे निकष आणि अटी

एकूण सामाजिक हितसंबंधांच्या संदर्भात उद्योगांवरील मालकीचे महत्त्व कमी कसे झाले आहे ते तिसऱ्या प्रकरणात सांगितलेच आहे. आर्थिक कारणास्तव उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणाचे महत्त्व कमी झाले आहे, हा देखील त्याचा केवळ एक भाग आहे. समाजवादाकडे सामाजिक, नैतिक किंवा आर्थिक यापैकी कोणत्याही दृष्टीने जरी

पाहिले तरी विमानबांधणीच्या उद्योगाचे राष्ट्रीयीकरण केल्याने समाजवाद फारसा जवळ येणार आहे, असे मुळीच नाही. कामगारांच्या राहणीमानातील वाढ, अधिक परिणामकारक संयुक्त विचारविनिमय, कामगारांबरोबर अधिक चांगले संबंध, आर्थिक साधनांचा योग्य उपयोग, सत्तेचे व्यापक प्रमाणावर विकेंद्रीकरण किंवा सामाजिक–आर्थिक क्षेत्रांत अधिक समानता यापैकी कोणतीही गोष्ट साध्य करण्याकरता आता उद्योगांवरील मालकीत फार मोठ्या स्वरूपाचे फेरबदल घडवून आणण्याची आवश्यकता उरलेली नाही. किंवा अशा तऱ्हेचा बदल घडवून आणला तरच या गोष्टी साध्य होतील, अशी परिस्थिती तर अजिबातच राहिलेली नाही.

या सत्याची हळूहळू ( आणि कित्येकदा अभावितपणे ) जाणीव होत असल्याने शासनाचा एकाधिकार प्रस्थापित करणे हे मजूर पक्षाच्या धोरणाचे मुख्य सूत्र असावे याविरुद्ध मत बनू लागले आहे. फार जेवण झाल्यावर एखाद्याला सुस्ती यावी त्याप्रमाणे गेली पन्नास वर्षे ज्या उद्योगांबद्दल सतत अभ्यासपूर्वक निवेदने केली जात होती त्यांचे राष्ट्रीयीकरण होऊन सर्व स्थिरस्थावर झाल्यामुळे आता एक प्रकारची बौद्धिक पोकळी निर्माण झाली आहे आणि म्हणून राष्ट्रीयीकरणाबद्दल अशी प्रतिकूल प्रतिक्रिया व्यक्त केली जाते एवढे म्हणून भागणार नाही. त्याला यापेक्षा अधिक काहीतरी कारणे असली पाहिजेत. तथापि मजूर पक्षाचा प्रत्येक उमेदवार हे जाणून आहे की, जनमानसाची हीच प्रतिक्रिया आहे. त्याचप्रमाणे राष्ट्रीयीकरण झालेल्या ( उदा. रेल्वेसारखे काही उद्योग ) आणि ज्यांचे राष्ट्रीयीकरण होणार असे जाहीर झालेले आहे ( मुख्यत: रासायनिक ) अशा काही उद्योगांतील कामगारांतही अशीच प्रतिक्रिया असल्याचे उघडपणे दिसून येते.

परंतु खुद्द मजूर पक्षातर्फे अधिकृतपणे चालविल्या जाणाऱ्या चळवळीतही त्याचेच प्रत्यंतर पाहावयास मिळते–मग ती सहकारी चळवळ असो, कामगार संघटना असो, किंबहुना मजूर पक्षाची वार्षिक अधिवेशने असोत. या अधिवेशनांतून भरमसाठ राष्ट्रीयीकरणाच्या सर्व सूचना सतत फेटाळून लावण्यात आल्या आहेत. त्याचप्रमाणे मजूर पक्षाच्या निवडणूक कार्यक्रमांतील धरसोडीवरूनही हे लक्षात येईल. मजूर पक्षाने राष्ट्रीयीकरण करावयाच्या उद्योगांची म्हणून एक यादी १९५० साली प्रसिद्ध केली. १९५१ च्या यादीत कोणत्याच उद्योगांचा नामनिर्देश करण्यात आला नाही, तर १९५५ साली पुन्हा अगदी निराळ्याच उद्योगांचा त्या यादीत अंतर्भाव करण्यात आला.

राष्ट्रीयीकरणासंबंधीच्या शंका मजूर पक्षांतील केवळ 'उजव्या गटातच' आहेत असे नव्हे; सर्वसाधारणपणे 'डाव्या गटा'चे म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पार्लमेन्टच्या बारा सभासदांनी प्रसिद्ध केलेल्या 'कीपिंग लेफ्ट' या नावांच्या निवेदनांत त्यांनी अत्यंत परखडपणे हीच प्रतिक्रिया व्यक्त केली होती. "सुरुवातीच्या बहुतेक सर्व समाजवाद्यांची अशी धारणा होती की, समाजाचे स्वरूप

बदलावयाचे म्हणजे दुसरे तिसरे काही नसून उद्योगांची मालकी बदलावयाची. एकदा हे मालकी हक्क बदलले की, आपोआपच समाजपरिवर्तन होईल. त्यांच्या दृष्टीने समाज भांडवलशाही आहे की समाजवादी आहे, हे ठरविण्याचा एकमेव निकष, उत्पादन, विभाजन आणि विनिमय यांच्या साधनांवर मालकी, हाच असू शकतो. त्यामुळे सामुदायिक मालकी म्हणजेच समाजवाद असे समीकरण ते घेऊन बसले आणि राष्ट्रीयीकरणाच्या उपायाने जगांतील सर्व दुखणी दूर करता येतील अशी त्यांनी स्वतःची समजूत करून घेतली. गेल्या काही वर्षांत समाजवादाची साधने आणि साध्य यांत फरक करावयास आपण शिकलो आहोत. त्याचप्रमाणे सामाजिक क्रांतीचे हत्यार आणि त्याचा उपयोग यामधील फरकही आता आपल्याला समजू लागला आहे. एखादा कारखाना कोणाच्या मालकीचा आहे याचे आपल्याला आता विशेष महत्त्व वाटत नाही..... मजूर पक्ष प्रथम अधिकारावर आल्यानंतरच्या सुरुवातीच्या काळांत मुलभूत उद्योग आणि सेवा एका झपाट्यासरशी राष्ट्राच्या मालकीच्या करून टाकणे योग्यच होते. परंतु त्यापुढील पायऱ्या मात्र इतक्या सरळ किंवा स्पष्ट नाहीत. साहजिकपणेच मक्तेदारीचे स्वरूप प्राप्त झालेल्या उद्योगांची यादी आता संपत आली आहे. आणि त्यामुळे एकेकावेळी एकेका उद्योगाचे राष्ट्रीयीकरण करण्याचा कायदा पास करून सबंध उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करण्याच्या तंत्राच्या पुढचे पाऊल टाकावयास हरकत नाही.... राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांच्या बाबतीत समाजवाद्यांनी ज्या अपेक्षा बाळगल्या होत्या त्या आतापर्यंत तरी निदान सार्वजनिक क्षेत्रांतील महामंडळांकडून सर्वस्वी पुऱ्या झालेल्या नाहीत ही वस्तुस्थिती आपल्याला नाकारता येणार नाही."

हे सर्व विवेचन कदाचित जरा कठोर वाटेल, परंतु मजूर पक्षातर्फे चालणाऱ्या चळवळींतील सध्याची मनःप्रवृत्ती आणि बहुतेक समाजवाद्यांनी राष्ट्रीयीकरणाला दिलेले दुय्यम स्थान त्यातून निश्चितपणे व्यक्त होते. (कीपिंग लेफ्ट या पुस्तिकेत सरकारने ताब्यात घ्यावयाच्या कोणत्याही मोठ्या उद्योगांची यादी देण्यात आली नव्हती, किंबहुना कोणत्याच उद्योगाचा त्यांत स्वतंत्रपणे उल्लेख केलेला नव्हता. 'निष्कर्ष' दाखल खर्ची पडलेल्या एकूण ११४ ओळींपैकी अवघ्या पाच ओळींत सबंध राष्ट्रीयीकरणाच्या प्रश्नाची बोळवण करण्यात आली आहे.)

या नव्या परिस्थितीत दोन मुद्यांबाबत बहुतेक सर्व विचारी समाजवाद्यांचे बहुधा एकमत व्हावे. यापैकी पहिला मुद्दा असा की, सध्याचे जनमत विचारात घेता राष्ट्रीयीकरणासंबंधीच्या सूचना अशा असल्या पाहिजेत की, त्यामुळे आर्थिक परिस्थितीत सुधारणा घडून येतील असा मतदारांना विश्वास वाटला पाहिजे त्यामुळे राष्ट्रीयीकरण करण्यासाठी उद्योगांची निवड अत्यंत काटेकोरपणे आणि काळजीपूर्वक केलेली असली पाहिजे. उद्योगांच्या आकारमानानुसार किंवा एखादा उद्योग केवळ जनतेच्या नजरेपुढे आहे म्हणून त्यावरच याबाबतीत लक्ष केन्द्रित

करून चालणार नाही. ज्या उद्योगांच्या बाबतीत राष्ट्रीयीकरणाची खरीखुरी आर्थिक उपयुक्तता सिद्ध करून दाखवता येण्यासारखी असेल, असेच उद्योग त्यासाठी निवडले पाहिजेत. मतैक्याचा दुसरा मुद्दा हा की, सार्वजनिक उपयुक्ततेच्या क्षेत्राव्यतिरिक्त सरकारी एकाधिकार पद्धतीमुळे उद्योगाच्या प्रचंड व्यापामुळे जे तोटे स्पष्टपणे आढळून येतात, ते विचारात घेता सबंध उद्योग ताब्यात घ्यावे आणि बाकीचे तसेच खाजगी मालकांच्या ताब्यात राहू द्यावे, किंवा विद्यमान खाजगी कारखान्यांच्या जोडीला सरकारी मालकीचे नवे कारखाने उभारावेत. यालाच "स्पर्धात्मक सार्वजनिक उद्योगांचा" दृष्टीकोण असे म्हणता येईल. या दृष्टीकोणात क्वचित प्रसंगी सबंध उद्योगाचे राष्ट्रीयीकरण करणे, जर तसे करण्याला अनुकूल असे बिनतोड मुद्दे असतील तर, संपूर्णपणे बाद ठरवले जात नाही; परंतु जेथे जेथे अशी शक्यता असेल तेथेच त्याला अग्रक्रम मिळाला पाहिजे.

आस्तित्वात असलेले उद्योग जेथे अत्यंत डबघाईला आलेले असतील, स्पर्धेत टिकू शकत नसतील किंवा स्पर्धेमुळे त्यात सुधारणा घडवून आणता येत नसेल, भौतिक किंवा आर्थिक नियंत्रणांचा अवलंब करून परिस्थिती सुधारण्याची शक्यता नसेल आणि राष्ट्रीयीकरणामुळे तदनुषंगिक असे दोष त्यात शिरणार नसतील तर अशा उद्योगांच्या राष्ट्रीयीकरणामुळे आर्थिक सुधारणा घडून येऊ शकतील.

राष्ट्रीय गरजेनुसार एखाद्या उद्योगाचा विस्तार घडून येत नसेल तर त्या उद्योगाच्या बाबतीत वर दिलेल्या अटींपैकी पहिल्या तीन अटींची पूर्तता होऊ शकेल. उदाहरणार्थ पोलाद उद्योगात धातूचा वापर होत असलेल्या उत्पादनात होत असलेली वाढ लक्षात घेऊन उत्पादनक्षमतेत वाढ करण्याकडे सतत दुर्लक्ष केले जात आहे. त्यामुळे जरुरीपुरता माल परदेशातून आयात करावा लागत असल्यामुळे ( तोही फार भारी किंमत देऊन डॉलरमध्ये खरेदी करावा लागतो ) पुन्हा पुन्हा ताण पडण्याजोगी परिस्थिती निर्माण होण्यात त्याचे पर्यवसान घडून येत आहे आणि क्षमता असूनही पोलादाच्या निर्यातीत त्या मानाने कपात करावी लागत आहे. ब्रिटनमधील पोलाद उद्योगाच्या क्षमतेतील ही सततची कमतरता ( ब्रिटनमधील उद्योगांच्या मन:प्रवृत्तीतच या कमतरतेची बीजे असावीत. कारण जर्मनी, अमेरिका किंवा रशिया येथे ती आढळत नाहीत ) बाजारपेठेच्या नियंत्रणाने आपोआप दूर होऊ शकणार नाही. त्याचप्रमाणे सरकारी नियंत्रणेही ही कमतरता भरून काढण्यास पुरी पडत नाहीत. कारण सरकारी नियंत्रणे नेहमीच विशिष्ट प्रवृत्तीला उत्तेजन देण्यापेक्षा तिला अटकाव करण्याच्या बाबतीतच प्रभावी ठरतात. एखाद्या उद्योजकाला त्याच्या मर्जीविरुद्ध स्वत:च्या भांडवलाची उद्योगांमध्ये गुंतवणूक करण्यास भाग पाडणे शक्य नसते. आणि हाच मुद्दा सार्वजनिक मालकीच्या, म्हणजेच राष्ट्रीयीकरणाच्या दृष्टीने अत्यंत प्रभावी ठरतो.

बाजारपेठेच्या दडपणामुळे ज्यांचा पुरेसा विस्तार होऊ शकत नाही असे इतरही काही उद्योग असू शकतील. यांत्रिक हत्यारे तयार करणाऱ्या उद्योगांचा विस्तार कूर्मगतीने होत असल्याने युद्धसमाप्तीपासून औद्योगिक क्षेत्रातील भांडवल गुंतवणूक सतत आखडती घेण्यात येत आहे. ( आणि त्यामुळे आयातीची गरज वाढून आंतरराष्ट्रीय देवघेवीच्या ताळेबंदाची परिस्थिती पुन्हा बिघडत आहे.) त्यामुळे जराशी भांडवल गुंतवणूक झाल्याबरोबर माल घेणाऱ्यांना कमालीच्या लांबच्या तारखा दिल्या जातात. ही परिस्थिती झपाट्याने बदलण्यासाठी देखील काही प्रमाणात राष्ट्रीयीकरण घडवून आणणे समर्थनीय ठरते. औद्योगिक क्षेत्राच्या बाहेर, भाड्याने दिलेल्या खाजगी इमारती नगरपालिकांनी ताब्यात घेणे आवश्यक ठरते. कारण खाजगी इमारतींचे मालक भाडे नियंत्रणामुळे इमारतींची जरूर ती दुरुस्ती किंवा सुधारणा करण्यासाठी त्यांत पैसे गुंतविण्यास तयार नसतात. आणि सरकारही, सामाजिक कारणास्तव, इमारतींचे मालक भांडवल गुंतवणुकीस तयार होतील इतक्या मर्यादेपर्यंत, भाडेवाढ करू देण्यास तयार होत नाही. आणि त्याचा परिणाम म्हणून जुन्या आणि नव्या घरात राहणारांमध्ये डोळ्यात भरण्याइतकी सामाजिक विषमता निर्माण होत आहे.

खाजगी भांडवलदारांच्या दृष्टीने ज्यात अत्यंत धोका पत्करावा लागतो असे भांडवल गुंतवणुकीचे क्षेत्र म्हणजे अणुशक्तीची निर्मिती. सरकारने अत्यंत यशस्वीपणे केलेल्या पदार्पणाचे उदाहरण म्हणून या उद्योगाचा उल्लेख करावा लागेल. सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमशीलता, कार्यक्षमता आणि धोका पत्करण्याची तयारी या दृष्टीने हे उदाहरण अगदी नमुनेदार म्हणावे लागेल. ( अर्थात अणुशक्तीच्या विकासाभोवती गुप्ततेचे जे आवरण आहे त्यामुळे पार्लमेन्टमध्ये त्यावर प्रश्न विचारता येत नाहीत किंवा वृत्तपत्रातून मोहीम उघडता येत नाही म्हणूनही कदाचित या गुणांचा आढळ होत असेल. )

यापेक्षा जरासे निराळे उदाहरण म्हणजे विमा कंपन्यांचे. विमाकंपन्या किंवा त्यासारख्या अन्य आर्थिक संस्थांनी आता जुन्या सधन भांडवलदारांची जागा घेणे व आजच्यापेक्षा अधिक प्रमाणात धोका पत्करावा लागणाऱ्या भांडवलाचा पुरवठा करणाऱ्या संस्था म्हणून काम करणे योग्य ठरेल हा मुद्दा विसाव्या प्रकरणात विषद केलाच आहे. याच्या जोडीला निरनिराळ्या कंपन्यांची त्याच त्या क्षेत्रात भांडवल गुंतवणूक केल्यामुळे भांडवलाचा निष्कारण अपव्यय होतो ही वस्तुस्थिती लक्षात घेता हा उद्योग सार्वजनिक मालकीचा करण्याच्या प्रश्नाचा फेरविचार करणे मजूर पक्षाला योग्य वाटेल. या प्रश्नासंबंधी मजूर पक्षाने बराच काळपर्यंत घोळ चालवला आहे. एका बाजूला सहकारी चळवळीबाबतची साशंकता आणि दुसऱ्या बाजूला हा उपक्रम यशस्वी करण्याची जबाबदारी असलेल्या मध्यस्थांविषयीची संशयाची भावना यामुळे पक्षाची अशी स्थिती झाली. ' चॅलेंज टू ब्रिटन '

या प्रबंधात यावर हेतुपुरस्सर नुसतीच चर्पटपंजरी केलेली आहे. परंतु ठोस समाजवादी उपाय योजावयाचे असतील तर मोटार किंवा जहाजबांधणीच्या उद्योगांपेक्षा औद्योगिक विम्याचे क्षेत्र अधिक उपयुक्त ठरेल.

एकाधिकाराच्या समस्येवर सार्वजनिक मालकी हा सर्वांत सोपा तोडगा ठरू शकेल अशी आणखीही काही उदाहरणे दाखवता येतील. 'ट्रेड असोशिएशन' या नावाच्या संयुक्त संघाला ( कार्टेल ) हा तोडगा लागू पडणार नाही. त्या संघात समाविष्ट झालेल्या संस्था अलग अलग करणेच इष्ट ठरेल. पण क्वचित प्रसंगी एखाद्या कारखान्याकडे मक्तेदारी असते तेथे मात्र सार्वजनिक मालकीचा तोडगा उपयुक्त ठरू शकेल. उदाहरणार्थ एकाधिकार समितीला ( मोनॉपली कमिशन ) असे आढळून आले की, ब्रिटिश मॅच कॉर्पोरेशनकडे काडयाच्या पेटयांच्या उत्पादनाबाबतची सर्वंकष सत्ता असून त्याबाबत तिचा एकाधिकार प्रस्थापित झाला आहे आणि सार्वजनिक हिताला विघातक ठरेल अशा रीतीने त्याचा कारभार चाललेला आहे. परंतु एक तर बीएम्सीची ( ब्रिटिश मॅच कॉर्पोरेशन ) क्षमता खूप मोठी होती, त्याचप्रमाणे बहुतेक सर्वच देशांतून काडयाच्या पेटया बनविण्याबाबत निसर्गतःच एकाधिकार निर्माण झाल्याचे आढळत असल्यामुळे बीएम्सीशी स्पर्धा करील असा एखादा नवाच कारखाना सुरू करणे किंवा दुसऱ्या कोणाला तसा कारखाना काढण्यास उद्युक्त करणे निरर्थक ठरले असते. त्याचप्रमाणे बीएम्सीचे विभाजन घडवून आणून त्यांत सामील झालेले कारखाने पृथक् करून एकमेकांशी स्पर्धा करणाऱ्या स्वतंत्र कारखान्यांचे स्वरूप त्यांना प्राप्त करून देण्याने मोठया विस्तारामुळे जे महत्त्वाचे फायदे मिळतात, त्याला मुकावे लागले असते. त्यामुळेच त्या समितीच्या बहुसंख्य व अल्पसंख्य सभासदांच्या अहवालात अनुक्रमे सरकारने किंमत नियंत्रित करावी आणि सरकारने घाऊक विक्रीचे काम स्वतःकडे घ्यावे अशा शिफारशी करण्यात आल्या. परंतु बहुसंख्य किंवा अल्पसंख्य यांपैकी कोणालाच स्वतःच्या शिफारसी आवडलेल्या दिसल्या नाहीत. त्यापेक्षा राष्ट्रीयीकरण हा अधिक सोपा उपाय ठरला असता अशी काही उदाहरणे आढळतील, तथापी सामान्यतः सरकारी नियंत्रणाच्या द्वारा एकाधिकाराची समस्या व्यवस्थितपणे हाताळता येऊ शकते—अर्थात तशी इच्छा मात्र हवी. परंतु पूर्वी पुष्कळ वेळा तशी इच्छाच नसे.

कार्यक्षमतेबद्दल बोलावयाचे झाले तर सार्वजनिक विरुद्ध खाजगी क्षेत्रासंबंधी कोणतेही सर्वसाधारण असे विधान करता येणार नाही हे यापूर्वीच स्पष्ट झाले आहे. कार्यक्षम खाजगी उद्योगांची उदाहरणे जशी आहेत तसेच राष्ट्रीयीकरण झालेले कार्यक्षम उद्योगही दाखवता येतील. उदा:— नागरी विमान वाहतूक महामंडळ, ब्रिटिश रोड सर्व्हिसच्या ताब्यातील मालमोटारींचा ताफा किंवा विजेचा उद्योग ( त्याचे किंमत विषयक धोरण सोडून ).

या उलट सार्वजनिक क्षेत्रांतील कांही उद्योग तितके समाधानकारक नाहीत. रेल्वेच्या कारभाराबद्दल अनेक लोक असंतुष्ट आहेत आणि फ्लेक कमेटीने कोळशाच्या उद्योगातील व्यवस्थापनेच्या यंत्रणेवर बरीच टीका केली आहे. परंतु ज्यांचा कारभार विशेष कार्यक्षमतेने चाललेला नाही, असे खाजगी उद्योगही अनेक आहेत. युद्ध संपले तेव्हापासूनच खालील उद्योगाबाबतचे सरकारी अहवाल प्रतिकूल आहेत: खाद्यपदार्थांची विक्री, यांत्रिक हत्यारे, कापड कारखान्यांना लागणारी यंत्रसामुग्री, बांधकामाला लागणारे साहित्य, आणि बांधकाम. अनेकजण या यादीत इतर उद्योगांचाही समावेश करतील (वितरण आणि शेतीसारख्या औद्योगिक स्वरूपाच्या नसलेल्या बाबीही त्यात येतील).

कार्यक्षमता आणि मालकी यांचा तसा फारसा संबंध येत नाही. कारण आधुनिक उद्योगांच्या महामंडळांच्या बाबतीत मालकीचा नियंत्रणाशी कसलाही संबंध नसतो. म्हणून केवळ मालकी हक्कात बदल घडून आल्याने फारसा फरक पडत नाही. अलिकडच्या काही वर्षांत पोलादाच्या उद्योगांत अनेक बहुमूर्तीदर्शक (कॅलिडॉस्कोपिक) बदल घडून आले आहेत. प्रथम तो उद्योग खाजगी मालकीचा होता. नंतर आयर्न अॅण्ड स्टील कॉर्पोरेशन आले, त्यानंतर 'रिअलायझेशन अेजन्सीची' मालकी असलेला विचित्र कालखंड होऊन गेला आणि आता पुन्हा (निराळ्या तऱ्हेच्या) खाजगी मालकीचा जमाना सुरू झाला आहे. परंतु व्हाईट हॉलमधून असे अनेक बदल घडून आले तरी त्यांच्या व्यवस्थापनावर त्यामुळे जवळजवळ कसलाच परिणाम घडून आला नाही आणि उत्पादनात सतत वाढ होत राहिली. (अर्थात या-वाढीचा वेग पुरेसा कधीच नव्हता कारण तो सार्वजनिक मालकीचा झाल्यापासून दीर्घकालीन कमाल क्षमतेसंबंधी व्यवस्थापनाला अधिक चांगल्या तऱ्हेने विचार करावयास लावण्याइतका अवसरच मिळाला नाही.) जर्मनीतील मोटार उद्योगापैकी व्होल्क्स वॅगन कारखाना हा सर्वात कार्यक्षम म्हणून ओळखला जातो. पण त्या कारखान्यावर कायदेशीर मालकी अशी कोणाचीच नाही. १९४५ पासून हीच परिस्थिती आहे. शॉर्ट ब्रदर्स या नावाचा विमाने तयार करण्याचा कारखाना युद्धकाळात सरकारने आपल्या ताब्यात घेतला. परंतु त्यामुळे त्याचा कारभार सुधारला किंवा बिघडला असे काहीच झाले नाही.

याच्या मुळाशी असलेला मुख्य मुद्दा आहे तो हा की, मोठमोठ्या महामंडळांपुढे, मग ती सार्वजनिक क्षेत्रातील असोत की खाजगी क्षेत्रातील असोत, मूलत: सारख्याच समस्या असतात आणि त्यांची पावलेही मूलत: सारखीच पडत असतात. त्यातील कार्यक्षमता व्यवस्थापनातील वरिष्ठ अधिकारी कोणत्या दर्जाचे आहेत आणि तो उद्योग किंवा कारखाना तांत्रिक दृष्टया योग्य तऱ्हेने उभारला गेला आहे किंवा नाही, यावरच केवळ अवलंबून असते. अर्थात यालाही काही अपवाद आहेत. उदाहरणार्थ, ज्या कारखान्याच्या व्यवस्थापन क्षेत्रातील वरिष्ठ अधिकारी गतिमान

आणि पुरोगामी दृष्टीचे असतात (किंवा अत्यंत महत्त्व असलेला संशोधन कार्य करणाऱ्यांचा संच त्या कारखान्यात काम करीत असतो) त्यावेळी त्या कारखान्याचा दृष्टिकोण खाजगी उद्योगांसारखाच असल्याचे विशेषत्वाने नजरेत भरते आणि अशा कारखान्यांना व्हाईट हॉलची लुडबूड सहन होत नाही. किंवा काही उद्योग असे असतात की, ते फ्रँक व्हिटलसारख्या लोकोत्तर बुद्धीच्या व्यक्तीमत्वावरच जवळजवळ चाललेले असतात. उलट असेही प्रकार आढळतात की, त्या कारखान्यांतील कामगार मुळी खाजगी मालकांशी अजिबात सहकार्यच करीत नाहीत. परंतु हे अपवाद सोडले तर एकंदरीने मालकीमुळे तसा कसलाच परिणाम घडून येत नाही. (१) सरकारने व्यवस्थापनात सुधारणा घडवून आणली किंवा विद्यमान व्यवस्थापनाला दूरवरचे अधिक धोके पत्करण्यास भाग पाडले किंवा (२) उत्पादनातील कार्यक्षमतेच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या मार्गाने त्या त्या उद्योगांची जडण घडण सरकारला बदलता आली (उदा. – निरनिराळ्या कारखान्यांचे एकत्रीकरण करून) तरच उद्योग सरकारी मालकीत आणल्याने कार्यक्षमतेत सुधारणा घडून येईल. उलट घडले तर अर्थातच परिणाम उलट घडून येईल.

काही बाबतीत त्याच्या नेमके उलट घडून येण्याचाही संभव आहे. असे घडून आल्यास कार्यक्षम आणि स्पर्धेत टिकाव धरणाऱ्या उद्योगात केंद्रानुवर्ती एकाधिकार लादण्यात आला तर कार्यक्षमता ढासळण्यातच त्याचे पर्यवसान होऊ शकेल. या धोक्याची आता चांगली जाणीव झालेली आहे. परंतु राष्ट्रीयीकरणामुळे व्यवस्थापनाचा बकूबच प्रत्यक्षात कमी होण्याचा त्याही पुढचा जो धोका आहे त्याचे मात्र आकलन झालेले नाही. सार्वजनिक क्षेत्रातील कर्मचाऱ्यांना आपण असेच तुटपुंजे वेतन देत राहिलो तर असे घडून येईल. राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगात तथाकथित फार लठ्ठ पगार दिले जातात. परंतु तुलनेने वस्तुत: ते कमीच असतात हा आक्षेप आपण फार वेळा ऐकला आहे. विषमतेचे याहीपेक्षा ढळढळीत (आणि सामाजिक दृष्टया असमर्थनीय) प्रकार नष्ठ केल्यानंतर मग याचा विचार करता येईल. सध्याच्या परिस्थितीत राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांना खाजगी उद्योगांशी स्पर्धा करण्याच्या बाबतीत अत्यंत प्रतिकूल परिस्थितीला तोंड द्यावे लागते.

दुसरी गोष्ट म्हणजे राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगाची उभारणी आपण अधिक कार्यक्षमतेने केली पाहिजे. काही काही बाबी अशा आहेत की, जेथे तत्त्वत: किंवा सिद्धान्त म्हणून हे शक्य आहे. उदाहरणार्थ ज्या उद्योगांत त्यांचा विस्तार हा निश्चितपणे फायद्याचा ठरतो. विद्यमान व्याप्ती जास्तीत जास्त तांत्रिक कार्यक्षमता आणण्याच्या दृष्टीने अत्यंत अपुरी पडते किंवा उत्पादनाच्या बाबतीत विशेषज्ञता नसलेले सर्व कारखाने तोच तो वाण फार मोठ्या प्रमाणावर उत्पादन करतात व त्यामुळे त्या कारखान्याच्या आकारमानाचा त्यांना फायदा उठविता येत नाही आणि स्पर्धा अत्यंत अपूर्णावस्थेतील असल्याकारणाने अधिक केन्द्रीकरण करण्यास भाग

पाडणे शक्य होत नाही. असे कारखाने अशी परिस्थिती असेल तेथे निरनिराळे कारखाने ताब्यात घेऊन नंतर त्यांचे एकत्रीकरण करण्यात आल्यास त्यामुळे त्या उद्योगाची जडणघडण अधिक सुदृढ बनण्यास मदत होईल.

कोणकोणत्या उद्योगांत अशी सुधारणा घडून येऊ शकेल त्याची तपशीलवार यादी या ठिकाणी सादर करण्याचा माझा इरादा नाही. कारण हे काम एखाद्या सामान्य माणसाने करण्यापेक्षा औद्योगिक क्षेत्रातल्या तज्ज्ञाने करावयाचे आहे असे मी सतत मानत आलो आहे. पण या ठिकाणी सकृत्दर्शनीही दिसणारे उदाहरण देता येण्यासारखे आहे. ते म्हणजे यांत्रिकी हत्यारे तयार करणाऱ्या उद्योगांचे. दुसऱ्या संदर्भात त्याचा उल्लेख यापूर्वीच येऊन गेलेला आहे. या उद्योगाबाबतच्या इंग्लंड आणि अमेरिकेतील उत्पादनक्षमतेविषयीच्या अहवालात करण्यात आलेल्या सर्व शिफारसी हेच सूचित करतात की, खाली दिलेल्या बाबींच्या अनुरोधाने सरकारी हस्तक्षेप करणे अत्यावश्यक ठरते. निरनिराळ्या कंपन्यांत आणि प्रत्येक कंपनीच्या प्रत्येक अंतर्गत प्रमाणांकन, निरनिराळ्या कंपन्यांनी ठराविक गोष्टींत विशेषज्ञता मिळविणे आणि विलिनीकरण करून किंवा एखाद्या कंपनीत दुसरी कंपनी समाविष्ट करून घेऊन कंपन्यांची संख्या बरीचशी कमी करणे. अत्यंत स्पर्धा असलेल्या कार्यक्षम उद्योगांपेक्षा एकाधिकार असलेल्या कार्यक्षमतेचे मूल्य देशाच्या दृष्टीने अधिक आहे असा अभिप्राय व्यक्त करून त्या अहवालात पुढे असे दाखवून देण्यात आले आहे की, रशिया आणि जर्मनी या देशांत यांत्रिकी हत्यारांच्या उद्योगात प्रमाणीकरण येण्यासाठी हुकूमशहा सत्तेवर यावे लागले तर अमेरिकेत त्या हत्यारांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करणाऱ्या मूठभर ग्राहकांच्या दडपणामुळे ते घडून आले. स्पर्धेवर आधारलेला एखादा उद्योग उघडउघड श्रेष्ठ दर्जाच्या कार्यक्षम चौकटीत बसू शकत नसला तर सरकारी हस्तक्षेपाचे जे वैशिष्ट्यपूर्ण समर्थन करण्यात येते, तशाच तऱ्हेचा हा युक्तिवाद वाटतो.

ते काहीही असो, कोणत्याही जरी उद्योगाची राष्ट्रीयीकरणासाठी निवड करण्यात आली तरी सार्वजनिक क्षेत्रातील उद्योग स्पर्धेत टिकले पाहिजेत या दृष्टिकोणालाच आपण निश्चितपणे अग्रक्रम दिला पाहिजे. अर्थात ( पोलादासारखे ) क्वचित काही उद्योग असेही असतील की, सरकारी एकाधिकार हाच तोडगा त्यांच्या बाबतीत योग्य ठरू शकेल. सर्वसाधारणपणे नजरेपुढे येणाऱ्या स्पर्धात्मक सार्वजनिक उद्योगांचे स्वरूप कोणते असावे यासंबंधी काही अडचणी उपस्थित होतात हे खरे. परंतु त्यासंबंधी तपशीलवार विवेचन करण्यापूर्वी जलद आणि मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीयीकरण करण्याच्या बाजूने जो आणखी एक मुद्दा सर्वांच्याकडून पुढे मांडला जातो त्याचा विचार करू.

● ● ●

## प्रकरण तेविसावे

# सार्वजनिक मालकीचे प्रकार

### १ राष्ट्रीयीकरण आणि समानता

हा शेवटचा मुद्दा संपत्तीच्या वितरणासंबंधीचा असून सार्वजनिक मालकी-संबंधी फार पूर्वीपासून ( म्हणजे मार्क्सच्याही आधीपासून) जो युक्तिवाद केला जात असे त्याचा हा मुद्दा म्हणजे प्रतिध्वनी आहे. भांडवलदारांना मालमत्तेपासून मिळणारे उत्पन्न काढून घेण्याचे एक साधन म्हणून सार्वजनिक मालकीचा युक्तिवाद केला जात असे. भांडवलदारांचे उत्पन्न ताब्यात घेण्याबद्दल संपूर्ण नुकसान भरपाई द्यावयाची असे ठरले तर ते खालील तीन बाबींवर निर्भर केले जाते : (अ) सर्वसाधारण व अतिशय खात्रीच्या भाग भांडवलावरील उत्पन्नातील फरक (ब) राष्ट्रीयीकरणामुळे लाभांश आणि भागांची किंमत यात वाढ होऊ शकत नाही (क) काही ठिकाणी सार्वजनिक क्षेत्रात मिळणारे कमी वेतन.

'मोठमोठी अकष्टार्जित उत्पन्ने नष्ट करणे हा ( राष्ट्रीयीकरण करण्या-मागील) आपला उद्देश असतो. हे उत्पन्न या उत्पन्नधारकांनी त्यासाठी कसलेही कष्ट न करता केवळ त्यांच्या मालकीहक्कामुळे त्यांना मिळत असते.. निव्वळ राष्ट्रीय उत्पादनाचे योग्य वितरण ते निर्माण करणाऱ्यांमध्ये केले जावे, हा सामा-जीकरणाचा मुख्य उद्देश असतो ' असे स्ट्रॅचीने लिहिले आहे. हा दृष्टीकोण स्वीका-रला म्हणजे कोणत्या क्रमाने उद्योगांचे राष्ट्रीयीकरण होत गेले हा मुद्दा बराचसा गरलागू ठरतो. हा दृष्टीकोण संपूर्णपणे स्वतःसिद्ध आहे. राष्ट्रीयीकरणाच्या दृष्टीने निरनिराळ्या उद्योगांची घडण, त्यांचा कारभार किंवा राष्ट्रीयीकरण करण्याला ते सोयीस्कर आहेत की नाही या संबंधीच्या तपशिलात जाण्याचे कारण नाही. परंतु जे उद्योग किंवा सेवा हस्तांतरित करावयाच्या असतील, त्यांच्या राष्ट्रीयीकरणा-मागील विशिष्ट सामाजिक आणि आर्थिक उद्दिष्टांच्या परिपूर्तीवरच आपण आपले

लक्ष केन्द्रित केले पाहिजे. मात्र ती उद्दिष्टे काटेकोर व्याख्या करता येतील, या अर्थाने निश्चित स्वरूपाची असली पाहिजेत आणि त्या विशिष्ट उद्योगांपुरतीच ती मर्यादित असता कामा नयेत, तर त्या उद्योगाबाहेरही ती लागू पडतील अशी असली पाहिजेत या अर्थाने ती सर्वसाधारणही असली पाहिजेत.

समानतेच्या दृष्टीने अद्यापपर्यंत राष्ट्रीयीकरणाने फारशी प्रगती केलेली नाही, हे बहुदा कोणी नाकारणार नाही. १९४५ ते १९५१ च्या दरम्यान ज्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण झाले त्यांच्या नुकसानभरपाई दाखल सुमारे २१०० दशलक्ष पौंडाचे सरकारी रोखे देण्यात आले. अत्यंत आणीबाणीच्या वेळी सर्व साधारण भागांच्या व्याजाचा दर ४.५ टक्के होता तर या रोख्यांच्या व्याजाचा सरासरी दर ३% होता. अशा तऱ्हेने पूर्वीच्या मालकांच्या उत्पन्नात सुमारे ९५ दशलक्ष पौंडापासून ६३ दशलक्ष पौंडापर्यंत वार्षिक घट झाली. त्यातील काही रक्कम करापोटी जाईल हे जमेस धरता हस्तांतरित झालेल्या निव्वळ वार्षिक उत्पन्नाचा आकडा २० दशलक्ष पौंडाच्या घरात जाईल. त्यातून काही रक्कम स्वस्त दराच्या कर्जरोख्यात गुंतविली जाईल असे धरले तर (१९५१ सालच्या) १२००० पौंडापेक्षा बऱ्याच जास्त असलेल्या व्यक्तिगत वार्षिक उत्पन्नाच्याम नाने हस्तांतरित झालेल्या उत्पन्नाचे प्रमाण काहीसे कमीच होते. करवाढीचे परिणाम लक्षात घेता ही रक्कम निश्चितच अगदी क्षुल्लक वाटते.

नवी बचत किंवा भांडवली फायदा या दृष्टीनेही उत्पन्नाचे फारसे हस्तांतर घडून आलेले नाही. एकदा राष्ट्रीयीकरण झाले म्हणजे त्या उद्योगातून फार मोठ्या प्रमाणावर नफा कमावण्यास मनाई करण्यात येते. त्या ऐवजी (एक किंवा दोन अपवाद वगळता) अशा उद्योगांना आपल्या भांडवल उभारणीचा कार्यक्रम खुल्या बाजारात खाजगी गुंतवणूक करणारांकडून घेतलेल्या कर्जाऊ रकमांतून पार पाडावा लागतो आणि पूर्वीचे मालक आपल्या मोठमोठ्या फायद्यावर पाणी सोडण्यास क्वचितच तयार झाले असते. गॅस आणि वीज यांच्या बाबतीत किंमतीवर आधीच नियंत्रण आले होते. (आणि त्या उद्योगांची मालकी ज्यांच्याकडे होती त्या बहुतेक सर्व स्थानिक संस्थाच होत्या.) रेल्वेच्या बाबतीत (एकूण नुकसान भरपाईच्या रोख्यांपैकी जवळजवळ निम्मे रोखे रेल्वेच्या राष्ट्रीयीकरणासाठी द्यावे लागले होते.) पूर्वीच्या मालकांना भांडवली तोटा सहन करावा न लागता भांडवली फायदा मिळाला. परंतु पोलादाच्या उद्योगात मात्र अगदी थोड्या प्रमाणात पूर्वीच्या मालकांना बऱ्याचशा भांडवली नफ्याला मुकावे लागले असे राष्ट्रीयीकरण रद्द झाल्यानंतर पोलादाच्या भागात जो चढउतार झाला त्याच्याकडे पाहता दिसून येते.

परंतु १९४५ ते ५१ च्या काळात उद्योगांबाबत जो अनुभव आला तो भावी काळासाठी, निदान भांडवली नफ्याच्या बाबतीत तरी– उत्पन्नाची बाब ही बहुधा नगण्यच असेल– मार्गदर्शक ठरेलच असे नाही, असा युक्तिवाद सहज करता येईल.

उद्योगाच्या आकारमानाप्रमाणे राष्ट्रीयीकरण करीत जावयाचे असे ठरवले तर या नंतर येणाऱ्या गटातील (रासायनिक, धातुविषयक आणि अभियांत्रिकी उद्योग यात मोडतात) उद्योग हे यापूर्वी राष्ट्रीयीकरण केलेल्या उद्योगांपेक्षा निश्चितच अधिक फायदेशीर ठरतील. सर्वांना रोजगार उपलब्ध असेल आणि उद्योगाची झपाट्याने वाढ होत असेल तर औद्योगिक भांडवलाच्या मूल्यात होणारी वार्षिक वाढ पूर्वीपेक्षा अधिक असेल. अशा परिस्थितीत काही काळपर्यंत खाजगी भांडवलावरील फायद्याचे प्रमाण बरेच मोठे असणार आणि त्याला आळा घालण्याचा एकमेव प्रभावी मार्ग म्हणजे सार्वजनिक मालकी प्रस्थापित करणे हे होय असे म्हटले जाते.

या प्रश्नाचा उहापोह येथे अभिप्रेत नाही. मागच्या तीन प्रकरणांतील बराचसा भाग त्यानेच अडवला गेला आहे. परंतु त्या प्रकरणातील चर्चेवरून हे स्पष्ट झाले आहे की, राष्ट्रीयीकरणाव्यतिरिक्त अन्य मार्गांनी (विशेषत: भांडवली नफ्यावर कर बसवून, त्याचप्रमाणे नफा वाटून टाकण्यावर नियंत्रण पडेल अशा उद्योगांवरील कर आकारणीच्या पद्धतीचा अंगिकार करून) झपाट्याने विकास पावत असलेल्या अर्थव्यवस्थेतही भागभांडवलदारांचा निव्वळ मोबदला मर्यादित करणे अगदी शक्य आहे. समतेच्या बाबतीत आपल्यापेक्षा किती तरी पुढे असलेल्या नॉर्वे आणि स्वीडन या देशांतील अनुभवावरून देखील हे सिद्ध होते की, जास्त प्रमाणावर समानता प्रस्थापित करण्यासाठी सर्वंकष राष्ट्रीयीकरण घडून यावेच लागते अशी काही अट नाही.

मग या इतर मार्गांची निवड कशाकरिता करावयाची ? अशा निवडीचे काय काय परिणाम घडून येतील त्याचा आपण विचार करू. पक्षांतील लढाऊ विचारसरणीच्या लोकांच्या तोंडावर टाकावयाचा तुकडा म्हणून हा उपाय सुचविण्यात येत नसेल आणि संपत्तीच्या फेरवाटपाचे साधन म्हणूनच खरोखरी त्याकडे पाहिले जात असेल तर, राष्ट्रीयीकरण हे एक तर बऱ्याच झपाट्याने घडून आले पाहिजे. आणि दुसरे म्हणजे सर्वात जास्त भांडवली नफा देणाऱ्या व अत्यंत भरभराटीत असलेल्या उद्योगांवर प्रथम लक्ष केन्द्रित केले पाहिजे. यापैकी पहिली अट साध्य करावयाची तर एकदम सगळे उद्योग ताब्यात घ्यावयास हवेत. कारण तसे केले तरच काही निश्चित मुदतीत मालमत्तेच्या वितरणावर काही परिणाम घडवून आणता येईल. दुसरी अट पुरी होण्यासाठी ताब्यात घ्यावयाचे उद्योग सर्वांत मोठे आणि सर्वांत कार्यक्षम असले पाहिजेत आणि त्यांच्या उत्पादनक्षमतेच्या वाढीचे प्रमाण जास्तीत जास्त असले पाहिजे. त्याचप्रमाणे त्या उद्योगांचा विस्तारही अत्यंत द्रुतगतीने होण्याची शक्यता असली पाहिजे. यावरून हे ओघानेच येते की, तिसऱ्या प्रकरणात येऊन गेलेल्या राष्ट्रीयीकरण करावयाच्या उद्योगांची 'यादी' बनविण्याच्या आपल्या दृष्टीकोणाला उजाळा दिला पाहिजे आणि मजूर पक्षाच्या प्रत्येक कार्यक्रमात सरकारकडे घ्यावयाच्या एकाधिकाराचे लक्ष्य निश्चित करून

घेतले पाहिजे. आर्थिक निकषाऐवजी (नफ्याच्या शक्यतेचा विचार सोडून) त्यांच्या आकारमानानुसारच हे लक्ष्य निश्चित केले पाहिजे. ज्या उद्योगाचे हस्तांतर करावयाचे त्याच्याशी संबंधित असे राष्ट्रीयीकरणाचे उद्देश नसतात हे या भूमिकेत अनुस्यूत आहे.

माझ्यामते हे धोरण जसे चुकीचे आहे तसेच ते अव्यवहार्यही आहे. अव्यवहार्य अशाकरिता की, १९५५ सालच्या निवडणुकीत दिसून आल्याप्रमाणे आर्थिक कारणास्तव राष्ट्रीयीकरण करणे अत्यावश्यक आहे अशी खात्री पटवून दिल्याशिवाय कार्यक्षम असलेल्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करण्याची सूचना पुढे आली तर राष्ट्रीयीकरणाविषयी साशंक झालेल्या जनतेला ती पटणार नाही. आणि ते धोरण चुकीचे आहे असे मी म्हणतो ते अशाकरिता की, त्यामुळे उत्पादनाच्या कार्यक्षमतेवर अनिष्ट परिणाम घडून येणार नाही, अशी हमी देता येत नाही. गेल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे या दृष्टीकोणातून राष्ट्रीयीकरणासाठी निवडण्यात आलेले उद्योग ( रासायनिक, विमानबांधणी, वाहने, जहाजबांधणी इ.) हे बऱ्याच समाधानकारकपणे चाललेले आहेत. या सर्व उद्योगांची स्पर्धात्मक निर्यातबाजारपेठेत फार मोठी उलाढाल चाललेली असते. तसेच त्यांचे कामगारांबरोबरचे संबंध समजूतदारपणाचे असतात. या उद्योगांची उभारणी चांगल्या प्रकारे झालेली असून त्यांचा दृष्टीकोण विस्तारवादी आहे. अर्थातच संपूर्ण राष्ट्रीयीकरण करण्याच्या दृष्टीने ते सोयिस्कर ठरणार नाहीत. ज्या उद्योगांचे यापूर्वीच राष्ट्रीयीकरण झालेले आहे त्यात आढळणारी केंद्रीकरणाची प्रवृत्ती आणि व्यवस्थापकीय वेतनश्रेणीचा लोंबकळत पडलेला प्रश्न यासारख्या समस्या अद्याप सुटलेल्या नाहीत हे लक्षात घेता असे उद्योग तातडीने सार्वजनिक मालकीच्या क्षेत्रात घेतले तर त्यांचा कारभार खालावत जाईल अशी शंका येणे अगदी साहजिकच आहे. आपल्यापुढे आंतरराष्ट्रीय व्यापारातील समतोलाची समस्या उभी नसती, त्याचप्रमाणे उत्पादनवाढीची निकड नसती, तर वरीलपैकी कोणतीच गोष्ट इतकी महत्त्वाची ठरली नसती. परंतु या दोन्ही अडचणींना आपल्याला तोंड द्यावयाचे आहे आणि निर्यातीच्या क्षेत्रातील आपली कामगिरी मुख्यत: याच उद्योगांवर अवलंबून आहे. त्याचप्रमाणे आपल्या वार्षिक उत्पादनातील वाढीची मदारही मुख्यत: त्यांच्यावरच आहे. त्यामुळे उत्पन्नाच्या वितरणावर परिणाम घडून येईल, इतक्या मोठ्या प्रमाणावर आणि वेगाने त्यांचे राष्ट्रीयीकरण करण्याची सूचना थिल्लरपणाचीच म्हटली पाहिजे.

या उलट, या अडचणी टाळण्यासाठी म्हणूनच केवळ मजूर पक्षाने उद्योग स्पर्धात्मक सार्वजनिक क्षेत्राखाली आणले तर त्यामुळे उत्पन्नाच्या वितरणावर अगदी नाममात्र परिणाम घडून येईल. पहिली गोष्ट अशी की, आपण आपले लक्ष एकेका कारखान्यावर केंद्रित केले तर, विशेषत: अशा कारखान्यांची निवड

करण्यातील आणि ती निवड योग्य होती हे पटवून देण्याच्या बाबतीतील अडचणी लक्षात घेता— याची चर्चा पुढे आली आहे— एकूण औद्योगिक भांडवलापैकी या उद्योगात गुंतलेले भांडवल विचारात घेता, अपेक्षित प्रगती फारच हळू घडून येईल. दुसरी गोष्ट अशी की, स्पर्धात्मक सार्वजनिक क्षेत्राची कल्पना कार्यक्षमतेच्या मुद्यावर समर्थनीय ठरते असा समज असल्यामुळे ज्या उद्योगांत जास्तीत जास्त नव्हे तर कमीत कमी भांडवला फायदा होतो त्यांच्या बाबतीतच ही सूचना ( उद्योग स्पर्धात्मक सार्वजनिक क्षेत्रात आणावयाची ) लागू पडेल. अशा तऱ्हेने राष्ट्रीयीकरणाबाबतचे दोन प्रकारचे निकष हे परस्परविरोधी ठरतात आणि एका बाजूने समानतेचा आग्रह धरावयाचा आणि त्यासाठी राष्ट्रीयीकरणाबाबत अधिक जोरदार आणि दूरगामी स्वरूपाचे धोरण आखले जाणे आवश्यक आहे असे म्हणावयाचे आणि त्याचबरोबर सरकारी एकाधिकार तातडीने अंमलात आणण्याची कल्पना सोडून देऊन सुटेसुटे कारखाने त्यासाठी निवडत बसण्याच्या अपरिहार्यपणे कूर्मगती ठरणाऱ्या धोरणाचा आश्रय घ्यावयाचा हे विसंगत ठरते. ( परंतु तसाच प्रघात आहे. ) आपली फसवणूक करण्यात आली आणि उत्पन्नाच्या विभागणीच्या बाबतीत काहीही घडत नाही हे ध्यानात आले की, या धोरणामुळे सार्वजनिक असंतोष पसरेल.

साहजिकच, राष्ट्रीयीकरणाचे आर्थिक परिणाम काय घडून येतील त्याकडे लक्ष न देता राष्ट्रीयीकरणाच्या रोखाने आपल्याला एकदम मुसंडी मारता येणार नाही हे आपण मान्य केले ( मजूर पक्षातील बहुतेयांना आता ते मान्य झाले आहे ) तरी त्याचा अर्थ असा होत नाही की, खाजगी मालमत्तेच्या मूल्यात दरवर्षी जी भरमसाठ वाढ होत आहे ती निमूटपणे सहन करीत बसावे. याचा अर्थ इतकाच की, या ऐवजी आपण मागच्या प्रकरणात ज्या संबंधीचा ऊहापोह येऊन गेला आहे अशा इतर पर्यायी मार्गांचा अवलंब केला पाहिजे.

## २. स्पर्धात्मक सार्वजनिक उद्योग

आर्थिक विकासामुळे अधिकाधिक झपाट्याने होऊ लागलेली संपत्तीची अयोग्य विभागणी हे उपाय योजण्याने देखील बऱ्याच प्रमाणात थांबू शकेल. तरी-देखील या विकासामुळे खाजगी मालमत्तेच्या प्रत्यक्ष मूल्यांत काही प्रमाणात तरी वाढ होत जाणारच. आणि जोपर्यंत खाजगी मालमत्तेची विभागणी आजच्या सारखीच होत राहील तोपर्यंत अशा प्रकारची कोणतीही वाढ शोचनीयच म्हटली पाहिजे.

परंतु समस्या आहे ती मुळात मालमत्तेच्या विभागणीसंबंधीची. संपत्ती आहे तशीच न राहता ती विभागली जावी म्हणून, त्याचप्रमाणे तिच्या मूल्यात पुढे होणारी वाढ अधिक समानतेने विभागली जावी म्हणून विद्यमान मालमत्तेचे

फेरवाटप कशा तऱ्हेने केले जावे, त्याचप्रमाणे नवी बचत आणि त्यातून होणारी भांडवलाची निर्मिती यांचे देखील सध्यापेक्षा अधिक चांगल्या तऱ्हेने वाटप व्हावे म्हणून कोणती दक्षता घ्यावयाची हे त्या समस्येचे खरे स्वरूप आहे. हे साध्य करण्याचे राष्ट्रीयीकरणाव्यतिरिक्त इतर अनेक मार्ग आहेत हे स्पष्ट आहे. आणि राष्ट्रीयीकरण हा जरी एक उपाय असला तरी हे उद्दिष्ट गाठण्यासाठी त्याला एखादा कारखाना, उद्योग, किंवा उत्पादनाचा सगळाच्या सगळा घटक सक्तीने ताब्यात घेण्याचे स्वरूप देण्याचे कारण नाही. उत्पादनाच्या सबंधच्या सबंध घटकाशी आपल्याला काही कर्तव्य नसून व्यक्तिगत मालकीपुरताच आपल्या पुढील प्रश्न मर्यादित आहे किंवा भौतिक मिळकतीपेक्षा मालकी हक्कासंबंधीचे दस्तऐवज, आणि नियंत्रणापेक्षा केवळ मालकीच तेवढी आपल्या दृष्टीने महत्त्वाची आहे. या दृष्टीने पाहता नियंत्रणाच्या जंजाळात सापडणे म्हणजे खरोखरी एक वैताग निर्माण करून घेण्यासारखेच आहे.

मालमत्तेच्या फेरवाटपासंबंधीच्या इतर मार्गांची चर्चा यापूर्वी येऊन गेलीच आहे. मृत्यूकर, देणगीवरील कर आणि भांडवलीकर यांच्याद्वारा तो थेट सरकारकडे वळविता येईल. शिलकी अंदाजपत्रक, कंपन्यांना होणाऱ्या नफ्यावर खूप मोठा कर आणि राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांना शिल्लक साठविण्याची मुभा देणे, या उपायांनी सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रातील बचतीचे प्रमाण वाढविता येईल, त्याचप्रमाणे कामगारांना बचत करण्यास प्रोत्साहन मिळेल अशा प्रकारचे उपाय योजून छोटचा आणि मोठ्या संपत्तीधारकांच्या प्रमाणातही ही वाढ करता येईल. मृत्यूकरात 'वारसा' तत्वाचा अंतर्भाव करणे, नफ्यात सहभागी करून घेण्याच्या प्रभावी योजना अंमलात आणणे आणि (अप्रत्यक्षपणे) निवृत्तीवेतन किंवा धर्मादाय स्वरूपाच्या इतर निधीत वाढ करणे, यांसारख्या उपायांनी हे साध्य करता येईल. हे सर्व उपाय राष्ट्रीयीकरणाला पर्यायी असे असून आर्थिक विकासाचे फायदे विभागून टाकण्याच्या मोठ्या प्रमाणावरील राष्ट्रीयीकरण, हा एकमेव मार्ग आहे असे यापुढे समजण्याचे कारण नाही.

केवळ राष्ट्रीयीकरणापुरतेच बोलावयाचे म्हटले तरी देखील ज्यायोगे समाजाला (किंवा कामगार वर्गाला) आर्थिक विकासावर आपले हिताहित अवलंबून आहे असे वाटू लागेल असा कोणताही उपाय राष्ट्रीयीकरणा इतकाच इष्ट म्हणावा लागेल. ताबा मिळवणे हा आपला हेतू नसल्याने सबंध कारखाना सक्तीने विकत घेण्यापुरतेच आपले लक्ष मर्यादित असण्याचे कारण नाही. तथापी काही वेळा आर्थिक कारणास्तव तसे करणेही आवश्यक ठरते हे मागील प्रकरणात दाखवून दिले असल्यामुळे 'स्पर्धात्मक सार्वजनिक उद्योगांची कल्पना प्रत्यक्ष व्यवहारात कितपत लागू पडेल याचे प्रथम विवेचन करुन नंतर भांडवली मालमत्तेवरील समाजाची मालकी वाढविण्याच्या अन्य मार्गांचा विचार करू.'

स्पर्धेवर आधारलेला सार्वजनिक क्षेत्रांतील एखादा कारखाना निवडला की मग तो, चालवण्यात अनुल्लंघनीय अशा अडचणी येणार नाहीत. कार्यक्षमतेसाठी योग्य त्या तरतुदी सुरुवातीलाच करून घेणे ही मुख्य बाब आहे. यापैकी पहिली तरतूद म्हणजे व्यवस्थापकीय वेतनाची स्पर्धात्मक पातळी ही होय. दुसरी गोष्ट अशी की, पूर्वी दाखवली जात असे त्यापेक्षा उद्योगाबाबत अधिक उपक्रमशिलता हीच या कंपन्यांची सर्वात महत्त्वाची गरज असल्याने त्यांना दैनंदिन कारभारात जास्तीत जास्त स्वातंत्र्य आणि निरंकुशता उपभोगता आली पाहिजे. त्यांच्यावर बारिक-सारीक तपशिलाच्या बाबतीत पार्लमेंटचे नियंत्रण खासच असता कामा नये. आणि काही महत्त्वाच्या मुद्यांवर एखाद्या खाजगी कंपनीचे संचालक मंडळ श्रेष्ठ भागधारकांशी विचारविनिमय करते त्याप्रमाणे या कंपन्यांनीही संबंधित मंत्र्याचा सल्ला घ्यावा आणि धोरणविषयक महत्त्वाच्या बाबींत त्यांचे आदेश बंधनकारक मानावेत परंतु सगळेच निर्णय व्हाईट हाऊसमधून घेतले जातील इतका त्याचा अतिरेक होऊ देऊ नये. अशा कारखान्यांसाठी एखादे खास आणि त्याच्या दैनंदिन कारभारांत लक्ष घालणारे नियंत्रक मंडळ नेमण्यात यावे किंवा समान धोरण अंमलात आणण्याच्या दृष्टीने राष्ट्रीयीकरण झालेल्या निरनिराळ्या उद्योगां-तील शासकीय संचालकांच्या सतत बैठकी बोलावल्या जाव्यात ही सूचना सर्वथैव अयोग्य म्हटली पाहिजे. खाजगी उद्योगांइतकेच सरकारी उद्योगांनाही स्वतःची वाढ करण्याच्या बाबतीत स्वातंत्र्य असले पाहिजे. झालेला फायदा नव्या भांडवल गुंतवणुकीसाठी वापरावयाची त्यांना मुभा असली पाहिजे. त्याचप्रमाणे नेहमीच्या परिस्थितीत कामगारांचे वेतनमान किंवा कामाची परिस्थिती याबाबत कामगारां-बरोबर वाटाघाटी करणे, उत्पादन विषयक धोरण ठरविणे, किमती निश्चित करणे या गोष्टीही त्यांना करता आल्या पाहिजेत. याला एकच अपवाद असू शकतो आणि तो म्हणजे सबंध उद्योगसमूहाला लागू पडतील अशी नियोजन विषयक बंधने.

यात सार्वजनिक पैशाचा प्रश्न अंतर्भूत असल्यामुळे सहाजिकच सरकारला हिशेब सादर करण्याची थोडीफार जबाबदारी येणारच. परंतु रॉयल ऑर्डनन्स फॅक्टरींचे पार्लमेंटकडून जेवढ्या प्रमाणात पर्यवेक्षण केले जाते ते याबाबतीत जरुरी-पेक्षा संपूर्णपणे अतिरिक्त ठरेल. कारण सध्याप्रमाणे राष्ट्रीयीकरण झालेल्या प्रत्येक उद्योगावर दरवर्षी चर्चा घडवून आणण्यासाठी पार्लमेंटला वेळ मिळू शकणार नाही. म्हणून अशी सूचना पुढे आली आहे की, त्या त्या उद्योगातील दोन्ही बाजूचे व पार्ल-मेंटचे प्रतिनिधी असलेली एक नियंत्रक किंवा सूत्रधारी कंपनी (होल्डिंग कंपनी) सुरू करण्यात यावी. या कंपनीकडे सर्व कंपन्यांचे भाग राहतील आणि 'फिनॅन्स हाऊस किंवा आय्. सी. एफ्. सी. ज्याप्रमाणे आपले हितसंबंध खोलवर गुंतलेल्या कंपन्यांच्या कारभारावर देखरेख करण्यासाठी तज्ञांची नेमणूक करते त्याप्रमाणे या

कंपन्यांच्या कारभाराची तपासणी करण्यासाठी ती तज्ज्ञांची नेमणूक करील. त्यापेक्षा नव्या सार्वजनिक महामंडळाची स्थापना करावी आणि सर्व सरकारी कंपन्यांची जबाबदारी त्या महामंडळाकडे सोपवावी ही सूचना अधिक चांगली आहे. या सूचनेनुसार नव्या महामंडळाचे पार्लमेंटबरोबरचे संबंध सध्याच्या सरकारी कंपन्यांसारखेच रहावेत. परंतु इतर बाबींत मात्र या नव्या महामंडळाचे कार्य नियंत्रण–कंपनी सारखे रहावे. ते कसेही असले तरी, राष्ट्रीयीकरण करावयाच्या कारखान्यांना जास्तीत जास्त स्वातंत्र्य उपभोगता येईल आणि त्यांच्या कारभारात कमीत कमी हस्तक्षेप केला जाईल अशीच एकूण प्रवृत्ती असली पाहिजे.

परंतु ज्यावेळी एकाच उद्योगातील अनेक कारखाने ताब्यात घेतले जातात त्या वेळची परिस्थिती निराळी असते. त्या परिस्थितीत अशा सर्व कारखान्यांच्या कारभारात सुसूत्रता आणण्यासाठी एखादी सुसूत्रता समिती नेमणे अर्थातच आवश्यक होऊन बसते. विकास समित्या (डेव्हलपमेन्ट कौन्सिल्स) फारशा यशस्वी ठरलेल्या नाहीत. आणि आयर्न अँड स्टील कॉर्पोरेशनप्रमाणे सरकारी कंपन्यात शेअर्स असलेली आणि खाजगी कंपन्यांवर कडक नियंत्रण ठेवण्याचे अधिकार असलेली नियंत्रक कंपनी स्थापण्याचा उपाय कमी अडचणीचा आणि कमी त्रासदायक ठरेल. परंतु एकाच उद्योगातील निरनिराळ्या कारखान्यांचे एकदम राष्ट्रीयीकरण करण्याची आणि मालकी हक्काचा संबंध समतोलच बदलण्याची जेव्हा जेव्हा वेळ येईल तेव्हा तेव्हा त्यासाठी अर्थातच स्वतंत्र कायदा करावा लागेल. त्यामुळे अशा प्रत्येक बाबीचा विचार आलेला अनुभव लक्षात घेऊन आणि प्रसंगानुसार जरूर तर निरनिराळ्या प्रकारे करावा लागेल.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, सरकारी आणि खाजगी कारखान्यांतील स्पर्धा ही अत्यंत निर्दोष किंवा निर्मळ असली पाहिजे. आणि तशी ती राहील याकडे कटाक्षाने लक्ष पुरविले पाहिजे. काम देण्याच्या बाबतीत, त्याचप्रमाणे कच्चा माल किंवा मजूर पुरविण्याच्या बाबतीत यत्किंचितही पक्षपात होता कामा नये. निरनिराळ्या कारखान्यांचा बरा वाईट कारभार हा या बाबतीतील एकमेव निकष असला पाहिजे– सरकारी कंपन्या स्पर्धेत टिकू शकत नसतील तर त्या स्थापन करण्याच्याच लायकीच्या नाहीत असे म्हटले पाहिजे. यावरून आणखीही एक निष्कर्ष निघतो तो असा की, काही राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांना करण्यात येतो त्याप्रमाणे सरकारने आपल्या खजिन्यातून सवलतीच्या दरात पाणपोई उघडल्यासारखा भांडवलाचा वारेमाप पुरवठा यापुढे करता कामा नये. खाजगी कंपन्यांनी बाजारपेठेतून कर्ज उभारले पाहिजे. आणि सरकारी कंपन्यांनी सार्वजनिक आर्थिक महामंडळाकडून (या संबंधीची चर्चा पुढे येणार आहे) कर्ज मिळविले पाहिजे. अशा महामंडळाकडून बाजारा इतकेच व्याजाचे दर आकारले जावेत आणि इतरही नेहमीच्या व्यापारी अटी घालण्यात याव्यात.

सध्या अस्तित्वात असलेल्या आर. ओ. एफ्. (रॉयल ऑर्डनन्स फॅक्टरी) पेक्षा नियोजित सरकारी कंपन्यांचे स्वरूप किती वेगळे आहे त्याची यावरून कल्पना येईल. आर. ओ. एफ्. ना त्यांच्या नागरी उत्पादनात अनेकदा तोटा सहन करावा लागे. सरकारी कंपन्यांच्या बाबतीत असे होता कामा नये. त्यांना होणारा भांडवलाचा पुरवठा हा त्या त्या खात्याकडून मिळणाऱ्या अनुदानातून होत असतो. आणि त्यांच्या बाबतीत भांडवलाचे तेच एकमेव साधन असते. त्यावर योग्य ते व्याज आकारले जात नाही. कारण हे अनुदान किरकोळ रोखीच्या स्वरूपात दिलेले असते. त्यांची विक्रीची अशी यंत्रणा नसते. पुरवठा खात्याच्या संचालयाकडूनच त्यांनी उत्पादन केलेला माल घेतला जातो आणि त्याच्या विक्रीचीही व्यवस्था केली जाते. सरकारी कंपन्यांच्या व्यवहारासंबंधी हाऊस ऑफ कॉमन्समध्ये प्रश्न विचारता येतात (प्रत्यक्षात मात्र ते क्वचितच विचारले जातात). त्याच-प्रमाणे लोक लेखा समितीला व अंदाज समितीला अगदी तपशीलवार चौकशी करण्याचे संपूर्ण अधिकार आहेत. अलिकडेच सरकारी कंपन्यांना अधिक स्वाय-त्तता देण्याच्या सूचना पुढे येत असल्या तरी देखील संबंधित खात्यांचे अशा कंपन्यांवर अद्याप अत्यंत कडक नियंत्रण असते. उदाहरणार्थ कारखान्याचे अधीक्षक स्वतःच्या जबाबदारीवर भांडवली सामुग्रीसाठी २५० पौंडापेक्षा जास्त रक्कम खर्च करू शकत नाहीत, त्याचप्रमाणे संशोधन कार्यासाठी त्यांच्याजवळ अजिबात पैसा उपलब्ध नसतो. याउलट याबाबतीतील नव्या कंपन्यांची परिस्थिती वरीचशी शॉर्ट ब्रदर्स सारखी राहील. अशा कंपन्यांच्या साधारण शेअर्समध्ये सरकारचे नियंत्रण राहू शकेल इतके हितसंबंध गुंतलेले असले तरी, आणि संचालकांच्या नेमणुकांवर पुरवठा खात्याचेच नियंत्रण असले किंवा सरकारी अवर सचिव हा तिचा एक पदसिद्ध संचालक असला तरी, त्या कंपनीचा कारभार पूर्णपणे व्यापारी तत्त्वावर चालतो. त्यात वशिलेबाजीला कसलेही स्थान असत नाही आणि विमानाच्या ऊर्वरित उद्योगात सरकारची जेवढी नियंत्रणे आहेत त्यापेक्षा अधिक नियंत्रणेही नसतात.

## ३. अडचणी आणि पर्यायी मार्ग

खाजगी उद्योगाबरोबरच्या स्पर्धेत टिकाव धरून सरकारी कंपन्या चाल-विण्यात अनुल्लंघनीय अशा अडचणी आहेत असे दिसत नाही. इतकेच नव्हे तर, इतर देशांत (विशेषतः स्वीडन व फ्रान्स) अशा अनेक कंपन्या आज अस्तित्वांत असून त्या अत्यंत यशस्वीपणाने आपला कारभार चालवीत आहेत. खरी अडचण आहे ती वेगळीच. आणि ती म्हणजे, मुळात त्यांची निवड कशी करावयाची व त्या उभ्या कशा करावयाच्या ? आणि जी कंपनी निवडली जाईल तिचे समर्थन कसे करावयाचे ? परंतु अद्यापपर्यंत तरी अशी अडचण सहसा उद्‌भवली नाही. फ्रान्समध्यें बहुतेक सर्व कंपन्या युद्धानंतर ताबडतोब ताब्यात घेतल्या गेल्या होत्या.

आणि युद्धकाळात निर्माण झालेल्या विशिष्ट परिस्थितीमुळे (शत्रूपक्षाशी संगनमत करणारे मालक) त्या कंपनीची निवड करावी लागली असे त्याचे समर्थन केले गेले. स्वीडनमध्ये (जेथे बहुतेक सर्व कंपन्या वस्तुतः हुजूर पक्षीय सरकारने सुरू केलेल्या आहेत) त्या त्या उद्योगाव्यतिरिक्त इतर बाबींवरूनच कंपन्यांची राष्ट्रीयीकरणासाठी निवड करण्यात आलेली आहे. त्या बाबी म्हणजे सरकारी महसूल वाढविण्याची आवश्यकता, स्थानिक पातळीवरील बेकारी किंवा सामाजिक-नैतिक स्वरूपाची इतर कारणे, या होत. ब्रिटनमधील शॉर्ट ब्रदर्सचा उद्योग समूह ताब्यात घेण्यात आला त्याचे समर्थनदेखील युद्धकाळातील एक निकडीची गरज म्हणूनच केले गेले तर अमेरिकेत टी. व्ही. ए. (टेनेसी व्हॅली ॲथॉरिटी) निर्माण करण्यात आली तिचे देखील मंदीचा मुकाबला करण्याच्या भूमिकेवरूनच समर्थन करण्यात येत असे.

पहिली अडचण अशी की, एकादी कंपनी ताब्यात घ्यावयाची असेल किंवा नव्या कंपनीची उभारणी करावयाची असेल तर ती कोठल्या कायद्याच्या आधारावर करावयाची ? एकाद्या उद्योगांतील बहुतेक सर्व कंपन्या ताब्यात घेण्यात आल्या तर त्यासाठी प्रत्येक वेळी स्वतंत्र विधेयक आणावे लागेल हे उघड आहे. परंतु एखादीच कंपनी ताब्यात घ्यावयाची असेल (किंवा नव्याने सुरू करावयाची असेल) तर त्यासाठी प्रत्येक वेळी पार्लमेंट समोर नवे विधेयक आणायचे म्हणजे पार्लमेंटच्या वेळेचा तो भरमसाठ अपव्यय ठरेल आणि उद्योगातील उपक्रमशीलतेवर पाणी पडेल. म्हणून याबाबतची सर्वसाधारण तरतूद असलेले एखादे विधेयक मंजूर करून घेण्याची आवश्यकता आहे हे स्पष्टपणे लक्षात येते.

याबाबत पूर्वीचे काही दाखले दाखवता येण्यासारखे आहेत. अर्थात ते जसेच्या तसे लागू पडणारे नाहीत. उदाहरणार्थ रॉयल ऑर्डनन्स फॅक्टरी या मुळात दारूगोळा तयार करण्याच्या विशिष्ट हेतूने स्थापन करण्यात आल्या असल्या तरी आता त्यांच्या उत्पादनावर व संख्येवर नियंत्रण नाही. इतर वस्तू त्या हव्या तेवढ्या बनवू शकतात. त्याचप्रमाणे न्यू टाऊन्स ॲक्ट हा कायदा देखील एका परीने पूरक स्वरूपाचा कायदा म्हणून आस्तित्वात आला. तो कायदा एका विशिष्ट उद्दिष्टासाठी करण्यात आला असला तरी नव्याने स्थापन करावयाच्या महामंडळांच्या संख्येवर त्या कायद्यान्वये कसलेही निर्बंध घालण्यात आलेले नाहीत, उलट संबंधित मंत्र्याला त्याबाबत व्यापक अधिकार देण्यात आले आहेत. त्या कायद्यात असे म्हटले आहे की, 'या कायद्याने प्रस्थापित करण्यात आलेल्या महामंडळाकरवी एकाद्या विशिष्ट भूभागाचा नवे शहर म्हणून विकास करणे अत्यावश्यक आहे.... अशी मंत्र्याची खात्री पटल्यास तो.... नियोजित नव्या शहराची जागा म्हणून त्या भूभागाचा निर्देश करणारा हुकूम काढील.' 'मोनॉपोलीज ॲक्ट' अन्वये नेमण्यात आलेल्या समितीला प्रथम चौकशी करण्याचे व्यापक अधिकार देण्यात आले व नंतर सरकारलाच विशिष्ट उद्योगाला एखादी गोष्ट करण्याच्या किंवा ती करण्यापासून अलिप्त राहण्याच्या

सूचना देण्याचा आदेश काढून तो पार्लमेंटच्या सभागृहासमोर ठेवण्याचे अधिकार देण्यात आले. या उदाहरणांवरून कोणत्याही विशिष्ट उद्योगाचा किंवा विशिष्ट कसोटीचा नामनिर्देश न करता सर्वसाधारण कायद्याखाली निःपक्षपाती समितीकडून ज्या उद्योगाबाबत प्रतिकूल अहवाल आला असेल त्याच्या व्यवहारात हस्तक्षेप करण्याला सरकारला पूर्वीचा आधार सापडतो. वस्तुतः 'स्टेट कंपनीज अँक्ट' कर-तांनाच त्यात व्यापक सार्वजनिक हिताची व्याख्या अंतर्भूत करणे (मोनॉपोलिज अॅक्ट मध्ये तशी ती अंतर्भूत करण्यात आली आहे) आणि पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांनी तसा ठराव करून मंजुरी दिल्यास किंवा नव्या निःपक्षपाती समितीने तशी शिफारस केल्यास, अस्तित्वांत असलेला उद्योग ताब्यात घेण्याचा किंवा नव्याने सुरू करण्याचा सरकारला अधिकार देणे बहुधा कठीण जाऊ नये.

खरी अडचण योग्य तो कायदा करण्याची नसून ताब्यात घ्यावयाच्या कंप-न्यांची निवड कशी करावयाची आणि ती निवड बरोबर होती हे जनतेला पटवून कसे द्यावयाचे हीच आहे. ही अडचण तरी निर्माण का होते ? तर जी कंपनी ताब्यात घ्यावयाची ती सक्तीने घ्यावी लागते आणि तिला कायद्याचे पाठबळ असते. त्याच-प्रमाणे एकाच उद्योगातील निरनिराळ्या कारखान्यात भेदाभेद करून ही निवड करावी लागते. आपल्या कायद्यासंबंधीच्या ज्या परंपरा आहेत त्यांच्याशी हे विसंगत ठरते. मजूरपक्षाला प्रचंड बहुमत असूनही कच्च्या मालाचे वाटप किंवा प्रत्यक्ष नियं-त्रणे बसविण्याच्या बाबतीत निरनिराळ्या कारखान्यांत भेदभाव करावयाला ते सरकार किती नाराज होते ते आपण अनुभवलेच आहे. या रासायनिक कारखान्या-ऐवजी त्या रासायनिक कारखान्याचे किंवा या विमान बांधणीच्या कारखान्यापेक्षा त्या विमान कारखान्याचे आम्ही सक्तीने राष्ट्रीयीकरण करू असे म्हटल्यावरोबर आपल्यावर पक्षपात केल्याचा किंवा मनमानेल त्याप्रमाणे वागल्याचा आक्षेप घेतला जाईल त्याचप्रमाणे आर्थिक कारणाऐवजी राजकीय कारणास्तव आपण तसे कर-ण्यास प्रवृत्त झालो आहोत अशी टीका केली जाईल.

म्हणून कारखाने ताब्यात घेताना त्यांतील एखाद्यावरच सक्ती केल्याचा किंवा बिगर व्यापारी हेतूने तो ताब्यात घेतल्याचा ठपका येऊ नये असे वाटत असेल तर उत्तम मार्ग म्हणजे सरकारी भांडवल गुंतवणूक मंडळ स्थापन करणे. या मंडळा-कडे सरकारी पैसा सुपूर्द करण्यात आला तरी त्याचा व्यवहार सरकारच्या अख-त्याराबाहेर, स्वतंत्रपणे चालला पाहिजे. आणि उत्पादनक्षम कारखाने खरेदी करून, विकून टाकून किंवा असे नवे उद्योग स्थापन करून नफा मिळवावा एवढ्याच फक्त सूचना त्या मंडळाला देण्यात याव्यात. म्हणजे परिणामतः ते मंडळ लिलाव घेणाऱ्या-प्रमाणे अकार्यक्षम कारखाने कोणते, कोणत्या कारखान्याची माल-मिळकत पुरेशी उपयोगात आणली जात आहे किंवा चुकीच्या मार्गाने खर्च केली जात आहे, कुणाचे व्यवस्थापन सुस्त आणि आळशी बनले आहे आणि नवीन उत्पादनाची संधी कोणत्या

कारखान्यात आहे ते शोधून काढील. म्हणजे वस्तुतः मेसर्स ड्रायटन, वूल्फसन, सॅम्युअल आणि क्लोर यांच्यासारखे एक समग्र चित्र सरकारने उभे केल्यासारखेच होईल. आणि मग ज्या कंपन्या ताब्यात घेण्यासाठी निवडल्या जातील त्या सर्वस्वी व्यापारी तत्त्वावर निवडल्या गेल्या असून कोणावर सक्ती केल्याचा किंवा भेदाभेद किंवा पक्षपात केल्याचा प्रश्नच उद्‌भवणार नाही.

बाविसाव्या प्रकरणात सुचविण्यात आलेल्या धर्तीवर सरकारी भांडवल-गुंतवणूक महामंडळाची स्थापना करण्यात आली तर हे उद्दिष्ट काही प्रमाणात साध्य करून घेता येईल. त्याचप्रमाणे वर दिग्दर्शित केलेल्या अडचणींचेही निरा-करण करता येईल. या महामंडळाचे उद्दिष्ट स्वतःच उत्पादनाच्या क्षेत्रात पदार्पण करण्याचे, इतकेच नव्हे तर नियंत्रणे बसविण्याचे राहणार नाही तर खाजगी स्वरूपातील भांडवल जेथे उपलब्ध होऊ शकत नसेल तेथे भांडवलाचा पुरवठा करणे एवढेच राहील आणि त्यामुळे साहजिकच ज्या उद्योगांची व्याप्ती वाढण्याची शक्यता नसेल किंवा ज्यांची कार्यक्षमता कमी असेल अशा उद्योगांकडे आपोआपच या भांडवलाचा कल झुकेल. अशा उद्योगांत पडण्याचे धाडस करू इच्छिणाऱ्या नव्या गटांना किंवा व्यक्तींना भांडवलाचा पुरवठा करण्याचे कामही हे मंडळ करील आणि अशा तऱ्हेने निदान काही प्रमाणात तरी स्पर्धात्मक सरकारी व्यवसाय सुरू कर-ण्याचा मार्ग मोकळा होईल.

सक्तीचा भाग नसलेला आणि व्यापारी तत्त्वावर ज्याचे समर्थन करता येईल असा दुसरा पर्यायी मार्ग म्हणजे सध्याच्या बिनसरकारी परंतु सामाजिक मालकी असलेल्या उद्योगांची एकाच पातळीवर वाढ करणे. उदाहरणार्थ राष्ट्रीयीकरण झालेल्या सध्याच्या उद्योगांत या दृष्टीने निश्चितच वाव आहे. त्यांच्या उत्पादन-क्षेत्रात न मोडणाऱ्या परंतु त्यांच्याशी संलग्न असलेल्या, जमीन, कोळशाच्या भट्ट्या, विटा तयार करण्याची क्षमता, दुय्यम उत्पादन करू शकणारी यंत्रसामुग्री, हॉटेल्स, रेल्वेची एंजिने किंवा वाहिनी तयार करण्याचे कारखाने इत्यादी बाबतीतील त्यांची उत्पादन क्षमता चांगली भरीव असते. त्यांच्यापेक्षा आकाराने खूपच लहान असलेले कारखाने आपले हितसंबंध वाढविण्याचा आणि उत्पादनात विविधता आणण्याचा सतत प्रयत्न करीत असतात. स्वीडनमध्ये सरकारी रेल्वे खात्याने बस कंपन्या आपल्या ताब्यात घेतल्या असून सरकारी वनोद्योगखात्याने कागदासाठी लागणारा लगदा तयार करण्याचे कारखाने आणि लाकूड कापण्याच्या गिरण्या आपल्या ताब्यात घेतल्या आहेत. त्यासाठी त्यांना नवा कायदा करून घेण्याची आवश्यकता वाटली नाही. ब्रिटनमधील आतापर्यंतची प्रवृत्ती जी कामे मध्यवर्ती स्वरूपाची नस-तील ती अंगाबाहेर टाकण्याची, निदानपक्षी त्याकडे काही प्रमाणात दुर्लक्ष करण्याची होती (उदाहरणार्थ कोळसा मंडळाचा विटा तयार करण्याबाबतचा दृष्टीकोण) आणि सुरुवातीच्या उद्योगाची पुनर्रचना करण्यातील अडचणींच्या अवस्थेत ते समजण्या-

सारखेही होते. परंतु आता परिस्थिती बरीच निवळलेली असल्यामुळे राष्ट्रीयीकरण झालेल्या उद्योगांतील महामंडळांना एका खाजगी कंपनीप्रमाणेच, दुय्यम किंवा सहाय्यक स्वरूपाचे उद्योग विकत घेऊन किंवा नव्याने उभारून समस्तरीय क्षेत्र वाढविण्याची मुभा देणे समर्थनीय ठरेल. ( मात्र असे करताना विकेंद्रीकरणाबाबत निश्चित हमी मिळाली पाहिजे. ) नेहमीच्या व्यापारी तत्त्वानुसार आपले क्षेत्र वाढविण्याचा किंवा निरनिराळ्या बाबींचा त्यात अंतर्भाव करण्याचा अधिकार सार्वजनिक क्षेत्रातील उद्योगांनाच तेवढा का नाकारला जावा याला तर्कसंगत असे कोणतेही कारण दाखवता येणार नाही.

सहकारी चळवळ हेही प्रगती घडवून आणण्याचे एक साधन होऊ शकते. स्वीडनमध्ये स्पर्धात्मक सामाजिक व्यवसायाचे नेत्रदीपक उदाहरण सरकारी क्षेत्रा-पेक्षा सहकारी क्षेत्रातच पहावयास सापडते. त्यामानाने ब्रिटनमधील सहकारी चळ-वळ इतके धाडस करताना दिसत नाही. परंतु तेथील सहकारी चळवळीला अनेक साधने उपलब्ध असून धोका पत्करण्याच्या बाबतीत धिटाईचा पवित्रा घेण्यात आला तरी विविध क्षेत्रात स्पर्धात्मक सामाजिक व्यवसायाचे क्षेत्र वाढविण्याच्या बाबतीत खूप मोठी प्रगती करता येईल. तथापी आता एका स्वतंत्र समितीकडून सहकारी क्षेत्रात व्यापारी धोरणाचा अवलंब कितपत करता येईल यासंबंधीचा विचार चालू असून त्यासंबंधीची स्पष्ट कल्पना येण्यासाठी त्या समितीचा अहवाल प्रसिद्ध होईपर्यंत थांबले पाहिजे.

इतर काही देशांत तर, कामगार संघटनादेखील स्पर्धात्मक व्यवसायांच्या क्षेत्रात उतरलेल्या आहेत. स्वीडनमधील कामगार संघटनेमार्फत स्टॉकहोममध्ये एक अत्यंत अलिशान आणि अद्यावत विश्रामगृह चालवले जाते. त्याचप्रमाणे तेथील नव्या घर बांधणीचे बरेच श्रेय बांधकाम संघटनेकडेच जाते. अमेरिकेतदेखील अनेक कामगार संघटनांनी (विशेषत: कपडा (गार्मेंट) कामगारांनी) राहण्याची अनेक नवी घरे ( सर्वस्वी नसली तरी बव्हंशी आपल्या सभासदासाठी) बांधली आहेत. ब्रिटनमधील कामगार चळवळीतील सहकारी उत्पादनाचा अनुभव फारसा सुखद नाही हे खरे, तथापी आता आर्थिक परिस्थिती अधिक अनुकूल असल्यामुळे आणि बांधकामाचा उद्योग सरसकट राष्ट्रीयीकरण करण्याच्या दृष्टीने अत्यंत गैरसोयीचा असल्याने पुन्हा एकदा तो प्रयोग करून पाहणे आता कदाचित सोयीचे ठरेल.

स्थानिक स्वराज्य संस्थांकडून गॅस आणि विद्युत्व्यवसाय काढून घेतला जाण्यापूर्वी त्या संस्थांनादेखील एक प्रकारे व्यापारी तत्त्वावर चालणाऱ्या व्यव-सायाचेच स्वरूप प्राप्त झाले होते हे आपण अनेकदा विसरून जातो. नव्या नव्या क्षेत्रांत पदार्पण करण्याची त्यांची इच्छा दिसत नाही ही गोष्ट अत्यंत कीव करण्या-सारखी आहे. कारण काही बाबी ( कारखान्याच्या स्वरूपातील नव्हे तर सेवाच्या स्वरूपातील ) या स्थानिक व्यवसायाच्या दृष्टीने, उदाहरणार्थ जिल्ह्यातील

सर्पणाचा प्रश्न, भूमिगत तबेले, गृहोपयोगी इंधनाच्या वस्तू, सिनेमा, लाँड्री, उपहारगृहे किंवा निवासस्थाने इ. स्थानिक स्वराज्य संस्थांनी चालविण्याच्या दृष्टीने सोयिस्कर आहेत. अर्थात भाड्याने दिलेल्या इमारती स्थानिक स्वराज्य संस्थांच्या ताब्यात घेण्याचा समावेश यात करण्यात आलेला नाही. ते क्षेत्र तर स्थानिक स्वराज्य संस्थांना मोकळे आहेच आहे. या दिशेने झालेली कोणतीही प्रगती—अर्थात ती कार्यक्षमतेने झाली पाहिजे—केव्हाही इष्टच ठरेल. परंतु तशी ती फार मोठ्याप्रमाणावर घडून येण्याचा मात्र संभव दिसत नाही— जासेफ चेंबरलेन आणि वेब्स यांनी या प्रश्नाला एकदा चालना दिली होती परंतु ते काम आता थंडावलेले दिसते.

त्याचप्रमाणे आपण हेही लक्षात घेत नाही की, सामाजिक मालकीच्या जमिनीत जी वाढ होत आहे ती मध्यवर्ती सरकारने परस्पर केलेल्या जमीन खरेदीमुळे होत नसून इतर सार्वजनिक संस्थांच्या–दि फॉरेस्ट्री कमिशन, दि न्यू टाऊन्स, दि क्राऊन लँड कमिशनर्स, स्थानिक स्वराज्य संस्था, दि नॅशनल ट्रस्ट, कृषी सहकारी संस्था इत्यादींच्या मार्फत जी विकेंद्रित स्वरूपाची कामे चालू आहेत त्यामुळे अशा जमिनीत वाढ होत आहे. सरकारी एकाधिकारामुळे होणारे गैरफायदे टाळूनही सामाजिक मालकीचे क्षेत्र कसे वाढविता येईल त्याचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे.

सामाजिक उद्योगांच्या बाबतीत सरकारने प्रत्यक्ष पाऊल उचलण्यापेक्षा वर सुचविलेले हे सर्व अप्रत्यक्ष उपाय अगदी नमुनेदार असून त्यांचा अवलंब करणे केव्हाही अधिक इष्ट ठरेल. त्या मार्गात नोकरशाहीचे किंवा व्हाईट हॉलचे नियंत्रण येण्याचा संभव कमी असतो. मनमानेल तसा भेदाभेद करण्यात आला असाही आरोप त्यामुळे कोणाला करता येत नाही. अर्थात काही बाबी अशा असतात की; सरकारनेच प्रत्यक्षपणे काही हालचाल करणे त्यावेळी इष्ट ठरते. यासंबंधीच्या काही सूचना मागील प्रकरणात केल्या आहेत. अर्थात अस्तित्वात असलेला एखादा उद्योग सक्तीने ताब्यात घेण्यापेक्षा त्यात नव्याने पदार्पण करणे याही बाबतीत अधिक श्रेयस्कर ठरेल. तथापी सर्वसाधारणपणे सार्वजनिक क्षेत्रांतील स्पर्धात्मक उद्योगांच्या बाबतीत व्हाईट हाऊसच्या मालकी इतका तरी निदान वर दिलेल्या सामाजिक मालकीच्या निरनिराळ्या मार्गांचा अवलंब करावा हे चांगले

## ४. अंतिम उद्दिष्ट

सार्वजनिक क्षेत्रातील स्पर्धात्मक उद्योगांच्या कल्पनेत त्यांच्या भौतिक मालमत्तेच्या उपभोगांवर नियंत्रण ठेवण्याची इच्छा अनुस्यूत आहे. परंतु संपत्तीचे वाटप आणि नवी बचत या दोन्ही दृष्टीने नियंत्रणाचा सवाल अगदीच गैर लागू ठरतो. त्याऐवजी नुसते भाग (शेअर्स) खरेदी केले तरी देखील हे उद्दिष्ट सहज साध्य होऊ शकेल. मग ते भाग निरनिराळ्या कारखान्यात कसेही जरी विभागलेले असले तरी काही बिघडत नाही.

भागांवरची ही सार्वजनिक मालकी अनेक मार्गांनी प्रस्थापित करता येईल. त्यापैकी बहुतेकांची चर्चा यापूर्वी येऊन गेली आहे. इतर कोठेही भांडवल मिळू शकले नाही तर सरतेशेवटी सरकारी भांडवल गुंतवणूक महामंडळ हे सबंध अर्थ-व्यवस्थेच्या दृष्टीने धनकोचे काम करीत असल्यामुळे त्या मंडळाकडे हळूहळू रोख्यांचा (त्याचप्रमाणे कर्जाचा देखील) खूप मोठा साठा होत असतो. मृत्यूकरांत वाढ करण्यात आली तर चौदाव्या प्रकरणात सुचविण्यात आल्याप्रमाणे मृत्यूकर आयुक्त हे हळू हळू एक अत्यंत किफायतशीर असा गुंतवणूक निधी निर्माण करू शकतील. त्यांचे उद्दिष्ट उत्पन्न आणि भांडवली फायदे यात जास्तीत जास्त वाढ करणे हे राहील व ते पार पाडीत असतांना सरकारला नुसताच तोटा आणि जबाब-दारीचा बोजा सहन करण्याचा जो धोका निर्माण होतो तो या महामंडळाचे बाबतीत रहात नाही. राष्ट्रीयीकरण झालेल्या विमा कंपन्यांमुळे समाजाला त्या उद्योगांत फार मोठी जवळीक निर्माण होईल त्याचप्रमाणे भांडवली फायद्यातही सहभागी होता येईल. सरतेशेवटी असाही प्रकार असू शकेल की, विमाने तयार करण्याच्या कारखा-न्यांसारख्या एखाद्या उद्योगात सरकार स्वतःच सार्वजनिक पैसा गुंतवील. त्यामुळे त्यातील भांडवली माल–मिळकतीत वाढ होण्यास मदत होईल आणि कर्जाची परतफेड करण्यासाठी त्या कारखान्याचे साधारण शेअर्स मिळावेत अशी मागणी करता येईल.

परंतु आपल्याला केवळ सरकारचे हितसंबंध एखाद्या उद्योगात गुंतवावेत एवढेच नको आहे तर मालमत्तेचे निरनिराळ्या व्यक्तींत विभाजन व्हावे हे आपल्याला अभिप्रेत आहे. त्यामुळे समाजातील जास्तीत जास्त व्यक्तींना नफ्यात हिस्सा मिळाला आणि निवृत्तीवेतन निधी, कामगारांचा भागभांडवल निधी, मोठ-मोठ्या शैक्षणिक विश्वस्त संस्था आणि धर्मादाय संस्था यांच्या मालमत्तेत होणाऱ्या वाढीमुळे अप्रत्यक्षपणे ही विभागणी होत गेली तर ती स्वागतार्हच मानली पाहिजे. खाजगी मालकी अजिबात नष्ट करणे हे आपले उद्दिष्ट नसून आपल्याला फक्त त्या मालकीच्या विभागणीत बदल घडवून आणावयाचा आहे.

आदर्श कोणता असेल (निदान माझ्या दृष्टीने) तर तो म्हणजे मालकी-हक्कांची संपूर्णपणे सरमिसळ झालेली असणे. म्हणजेच समाजात विविधप्रकारची, विकीर्ण, अनेकाधिकारी आणि वैधसिक अशी अनेक प्रकारची मालकी असलेला समाज हा आदर्श होय. अशा समाजात शासन संस्था, राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग, सहकारी संस्था, कामगार संघटना, सरकारी अर्थविषयक संस्था, निवृत्ती वेतन निधी, मोठमोठ्या विश्वस्त संस्था आणि त्याचबरोबर लक्षावधी खाजगी कुटुंबे या सर्वांमध्ये मालकीहक्क विभागला पाहिजे. हे ध्येय फार दूरवरचे असल्यामुळे नफा आणि लाभांश मर्यादित करण्यासाठी भारी कर आकारणी करणे आवश्यक होऊन बसते. परंपरावादी डाव्या गटातील लोकांना हा उपाय पसंत पडत नाही कारण

त्यांना अद्यापही हळूहळू सरकारी एकाधिकार प्रस्थापित झाला पाहिजे असेच वाटत असते (किंवा त्यांच्या कानाशी सतत तशा प्रकारच्या भाषणाचा मारा करून त्यांना तसे वाटायला लावले जाते).

परंतु केर हार्डीच्या प्रेरणेच्या आधाराने हे प्रश्न सोडवण्याची वेळ कधीच मागे पडली आहे. सध्या आहे त्यापेक्षा अधिक उद्योगांचे राष्ट्रीयीकरण आपल्याला निश्चित हवे आहे. परंतु निदान मला तरी हळू हळू वाढत जाणारी सरकारी एकाधिकाराची मालीका नको आहे. कारण स्वातंत्र्याच्या दृष्टीने ती अत्यंत अनिष्ट ठरते आणि या पुस्तकात वर्णिलेल्या समाजवादाच्या संदर्भात तर ती अजिबातच अप्रस्तुत ठरते. समाजवादी समाजरचना, सामाजिक समता, वाढत्या प्रमाणावरील समाज-कल्याण, यापैकी कशासाठी देखील प्रथम सर्व औद्योगिक भांडवलाचे सरकारीकरण ही आता अत्यावश्यक बाब राहीलेली नाही. वर्गीय भेदाभेद देखील अशा प्रकारच्या सरकारीकरणावाचून नष्ट करता येतो. सध्याच्या समाजव्यवस्थेत अन्यायकारक बाब जर कोणती असेल तर ती म्हणजे खाजगी संपत्तीची विभागणी. आणि सर्वस्वी सरकारी मालकी असलेल्या अर्थव्यवस्थेमुळे ज्याप्रमाणे हा दोष नष्ट करता येईल त्याचप्रमाणे अनेकाधिकार असूनही तो दूर करता येईल. उलट सामाजिक समाधान आणि सत्तेचे विभाजन या दृष्टीने अनेकाधिकार पद्धती अधिक लाभदायक ठरेल.

● ● ●

प्रकरण चोवीसावे

# नियोजनाचे स्थान

## १. मतभेदाचे क्षेत्र कमी होऊ लागले

युद्धपूर्व, त्याचप्रमाणे युद्धोत्तर लगतच्या काळांतील समाजवाद्यांची पिढी नियोजन हा समाजवादाचा गाभा समजत असे. अर्थात त्यासाठी ते जी कारणे देत ती निरनिराळी असत. त्यांच्या मते समाजवाद आणि भांडवलशाही या दोघांमधील नियोजन ही प्रत्यक्ष प्रतिस्थिती ( antithesis ) होती. या उलट १९२० ते १९३० च्या कालखंडापूर्वी नियोजन हा शब्द क्वचितच उच्चारला जाई आणि समाजवादी विचाराच्या इतिहासांत नियोजनाच्या कल्पनेला कसलेच महत्त्व प्राप्त झालेले नव्हते. आज आपल्याला त्याबाबत तडजोड करावयाला हरकत नाही— म्हणजे नियोजनासंबंधी चर्चा निश्चितपणे करता येईल परंतु दहा वर्षांपूर्वी नियोजनाला जो अग्रहक्क मिळत होता त्यामानाने आज त्याला तितके महत्त्व राहिलेले नाही.

हे महत्त्व कमी होण्याचे कारण असे की, त्या विषयावर सर्वसाधारण म्हणजे निदान ते बोलणे अगदी निष्फळ ठरणार नाही इतपत तरी बोलण्यासारखे आता फारसे राहिलेले नाही याची बहुतेक लोकांना जाणीव झालेली आहे. तसेच आर्थिक व्यवहार कशा तऱ्हेने चालत असतात किंवा त्यासंबंधीचा विचार करीत असताना किती विविध बाजू लक्षांत घ्यावयाच्या असतात त्याविषयीचे आपले मर्यादित ज्ञान त्यावेळी आपल्याला किती आश्वासक वाटे. परंतु आता तितके ते आश्वासक वाटत नाही. त्यामुळे नियोजनासंबंधी उपयुक्त असे जे काही आपण बोलू त्यावरून सर्व साधारण सिद्धांत बसवता यावयाचे नाहीत तर त्या त्या विशिष्ट परिस्थितीपुरतेच ते मर्यादित असतील.

दुसरे असे की, या मुद्यासंबंधी अद्यापही केवळ सर्वसाधारण चर्चाच होत असल्याने त्या चर्चेतील सारा जोम नष्ट होऊन गेला आहे. कारण प्रत्यक्षांत आलेल्या

अनुभवाने या चर्चेतील दोनही एकांतिक बाजूंवर हळूहळू बोळा फिरवला जात आहे. त्यामुळे बहुतेक लोक आता मध्यम मार्ग पसंत करू लागले आहेत आणि ही चर्चा आता केवळ मूलभूत तत्त्वांच्या आधारे होत नसून तिला अनुभवाचा आधार असतो आणि विशिष्ट परिस्थितीत कोणते तत्त्व किती प्रमाणात लागू करावयाचे इतकेच तिचे स्वरूप मर्यादित राहिले आहे.

अशा तऱ्हेने नियोजनासंबंधीच्या उजव्या गटाच्या दृष्टिकोणात कमालीचा बदल घडून आला आहे. तात्त्विक पातळीवर आता फारच थोडे विचारी अर्थ-शास्त्रज्ञ असे मानतात की, व्यवहारात जास्तीत जास्त आर्थिक कल्याण साधण्याच्या दृष्टीने किंमतीवर कसलीही बंधने नसणे हेच उपयुक्त ठरेल. तत्वतः उत्पादनाच्या आणि वितरणाच्या परिस्थितीवरच जास्तीत जास्त समाजकल्याण अवलंबून असते. औद्योगिक दृष्ट्या अत्यंत पुढारलेल्या अर्थव्यवस्थेत या परिस्थितीची अगदी परमावधी गाठली जाणे अशक्य आहे इतकेच नव्हे तर कोणत्याही परिस्थितीत त्याचा परिणाम उत्पादनाच्या विशिष्ट वितरणाची कमालमर्यादा गाठण्यातच फक्त होऊ शकेल. आणि जर लोकांनी या वितरणावर आक्षेप घेतला—– समाजवादी तसा तो घेतातच– तर वरील परिस्थितीची पूर्तता झाली असली तरीही जास्तीत जास्त समाजकल्याण साध्य झाले असे ते मानणार नाहीत.

अनिर्बंध अर्थव्यवस्थेविषयी व्यापारी जगाला वाटणारी वैचारिक आस्था आता खूपच कमी झाली आहे आणि पुन्हा १९३० च्या दशकात जाण्याची त्यांची इच्छा राहिलेली नाही. भारी दर किंवा दारीकसारीक नियंत्रणे ही जरी त्यांना पसंत नसली तरी सर्वांना रोजगार उपलब्ध व्हावा म्हणून (अर्थात भरमसाठ नफेबाजी करता येऊ नये म्हणूनही) वाटेल त्या मर्यादेपर्यंतहस्तक्षेप करणे ही सरकारची जबाबदारी ठरते हे तेही आता मान्य करतात. अनेक उद्योगांत तर सरकारची जबाबदारी याहीपेक्षा व्यापक असते हेही आता मान्य झाले आहे. पोलाद उद्योगाची क्षमता किती आहे यात सरकारने लक्ष घालावे किंवा एखादा धंदा निर्यातीच्या बाबतीत अडचणीत आला असेल तर सरकारला त्याला मदत पुरविण्यास सांगावे यात काही विचित्र-पणा आहे असे आता कोणी मानीत नाही. उदाहरणार्थ—कापडउद्योगाच्या मालकांना आपल्या सर्वच्या सर्व उत्पादनाची जबाबदारी उचलण्यास सरकार नकार देते हेच अत्यंत निंदास्पद वाटते. पहिल्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे सरकारकडून आता अर्थव्यवस्थेत जो हस्तक्षेप केला जातो तो खाजगी उद्योजकांना सर्वसाधारण-पणे अगदी नैसर्गिक वाटतो. परंतु मागच्या पिढीत मात्र त्यांना तो सरकारचा अत्याचार वाटत असे.

वस्तुतः डाव्या गटाने मिळविलेला हा फार मोठा विजय आहे. परंतु अधू स्मरणशक्तीचे लोक त्याचे महत्त्व अगदी नगण्य आहे असे समजतात. (१) रोज-

गाराची पातळी (२) चलन संकोचाच्या मार्गाव्यतिरिक्त इतर उपायांनी परदेशातील आपल्या गंगाजळीला संरक्षण देणे (३) भांडवल गुंतवणुकीची पातळी आणि त्याच्या वाढीचे प्रमाण (४) समाजकल्याणाच्या किमान बाबी टिकवून धरणे आणि (५) मक्तेदारीच्या व्यवहारावरील नियंत्रणे ही सर्व जबाबदारी आपली आहे असे सरकारने मानले पाहिजे इतकेच नव्हे तर ते सरकारचे कर्तव्यच आहे असे बहुसंख्य हुजूरपक्षीय आज मानीत असतात हा डाव्या गटाचा विजयच नव्हे काय? वीस वर्षांपूर्वीच्या टोरी पक्षाच्या आडमुठेपणापेक्षा ही भूमिका अगदी निराळी आहे.

शेवटचा मुद्दा असा की, बाजारपेठांच्या यंत्रणेत हस्तक्षेप केला तर त्याची परिणती अखेर आपले पाऊल हुकूमशाहीकडे घरंगळत जाणाऱ्या निसरड्या पायवाटेवर पडण्यातच होणार या हेकच्या सिद्धांतावर समाजात ज्याला काही स्थान आहे अशा कोणत्याही व्यक्तीचा आज विश्वास राहिलेला नाही. ज्यावेळी हा विचार प्रथम मांडला गेला त्यावेळी देखील ब्रिटनच्या संदर्भात तो असंभाव्य कोटीतलाच होता. आणि गेल्या दहा वर्षांत कमी जास्त प्रमाणातील सरकारी नियंत्रणानंतरही आपल्या लोकशाहीला कसलाही धक्का लागलेला नाही असा अनुभव आल्याने तर हा विचार पुरताच बदनाम झाला आहे.

त्याचप्रमाणे नियोजनासंबंधीच्या समाजवाद्यांच्या विचारातही खूप बदल झाला आहे. युद्धपूर्वकाळात, १९३० च्या दशकात भांडवलशाहीत आढळणारी उघड उघड अकार्यक्षमता आणि त्याच्या जोडीला डोळ्यात भरण्याइतकी विषमता हे नियोजनाच्या समर्थनाचे मुख्य कारण होते. परंतु १९५० च्या दशकात सर्वांना रोजगार पुरविणारी विस्तारवादी (Expansionist) अर्थव्यवस्था आणि कल्याणकारी शासनसंस्था रूढ झालेली असतांना त्या मुद्याला आता फारसा अर्थ राहिलेला नाही. त्याचप्रमाणे युद्धोत्तर काळात नियोजनासंबंधी जी एकांतिक भूमिका घेतली जात असे तीही आता तितकीशी लोकप्रिय राहिलेली नाही. मुख्यत: डॉलर्सची टंचाई आणि आतंरराष्ट्रीय व्यापारातील समतोलाच्या बाबतीतील अडचण, त्याचबरोबर संकटात सापडलेल्या अर्थव्यवस्थेला सामाजिक न्याय आणि बाह्य प्रतिष्ठा यांची जोड द्यावयाची असेल तर तपशीलवार नियंत्रणाच्याद्वारे साधन सामुग्रीचे वाटप करणे आवश्यक ठरते इ. मुद्दे या भूमिकेच्या समर्थनार्थ पुढे केले जात असत. परंतु युद्धानंतरची आणिबाणीची परिस्थिती मागे पडून बऱ्याच अंशी नेहमी सारखी परिस्थिती निर्माण झाल्यामुळे जगातील आर्थिक स्थिती बरीचशी सुधारली. विशेषत: युद्धसमाप्तीनंतरच्या लगेचच्या काळात जी भीती व्यक्त केली जात असे ती खोटी असल्याचे अमेरिकेतील आर्थिक परिस्थितीवरून प्रत्ययास आल्यामुळे हे मतपरिवर्तन घडून आले. परंतु त्याचे मुख्य कारण उत्पादनाचे तपशीलवार अंदाजपत्रक तयार करून त्यामार्फत व्हॉइट हॉलला उत्पादनासंबंधीच्या तात्पुरत्या निर्णयावर नियंत्रण ठेवता येईल ही

कल्पनाच मुळात भ्रममूलक आहेअशी खात्री पटली हे आहे. यात अर्थातच परवाना पद्धती, शिधावाटप, आणि नियंत्रणाची विभागणी या अत्यंत गुंतागुंतीच्या बाबींचा अपरिहार्य-पणे समावेश होतो आणि त्यात फार मोठ्या उणीवा आहेत असे उत्तरोत्तर नजरेस येऊ लागले. त्यामुळे, गिऱ्हाईकांना मालाची किंवा त्याचा पुरवठा करणारांची निवड करण्याचे स्वातंत्र्य रहात नाही. शिधावाटप रद्द केल्यावर जनतेच्या ज्या प्रतिक्रिया व्यक्त झाल्या त्यावरून लोकांना ते मुळीच पसंत नव्हते हे स्पष्ट झाले. त्याचप्रमाणे अशा बाबींमुळे नोकरशाहीत भरमसाठ वाढ होते आणि त्याला अनुषंगिक अशी लहान प्रमाणावरील जुलूम, लाचलुचपत आणि भ्रष्टाचार यांचा धोका निर्माण होतो.

आणि अनेकदा आर्थिक दृष्टयाही ती अकार्यक्षम असतात. नियोजनकार अनेकदा चुका करीत असतात. या चुकांमुळे अंदाजपत्रकात अंतर्गत सुसंगती राखली जात नाही व त्यामुळे साठे तुंबून राहतात. परंतु प्रत्यक्ष व्यवहारात यापेक्षाही अधिक उणीवा अनुभवास येतात. उदाहरणार्थ कच्च्या मालाचा पुरवठा करतांना राजकीय कारणास्तव पक्षपात करणे शक्यच नसते त्यामुळे मागील कामगिरी बघूनच तो करावा लागतो. नव्यांना त्यात प्रवेश मिळत नाही आणि विशेष कार्यक्षम नसलेल्या कारखान्यांना अधिक कार्यक्षम कारखान्यांच्या चढाओढीपासून संरक्षण मिळते. किंमत आणि भांडवल गुंतवणूक यावरील नियंत्रणे (त्यापैकी किंमतीमुळे मालाचा दर्जा खालवत नसला तरी) वस्तू जितक्या साध्या आणि जास्त जीवनाव श्यक असतील त्या प्रमाणात अधिकाधिक कार्यक्षम बनत जातात. त्यामुळे अशी एक परिस्थिती निर्माण होते की, ज्यावेळी आर्थिक व्यवहारातील अधिक महत्वाच्या क्षेत्रापेक्षा कमी महत्वाच्या क्षेत्रातील पगार आणि नफा यांचे प्रमाण जास्त असते. आणि साधन सामुग्रीचा वापरही अगदी चुकीच्या दिशेने होत असतो. म्हणजे ती नवीन घरबांधणीसाठी वापरली जाण्याऐवजी फुटकळ स्वरूपाच्या दुरुस्तीवरच खर्च होते. किंवा उपयुक्त बाबीपेक्षा अनुपयुक्त अशा कापड धंद्यावर खर्च होते. शिवाय पुरवठ्यात सुबलक वाढ झाली म्हणजे अनेक नियंत्रणे कार्यक्षमतेने अंमलात आणता येत नाहीत; त्यातून सहजासहजी पळवाटा काढल्या जातात आणि मग 'करडा' बाजार ('Gray' Market) वाढू लागतो (निरनिराळ्या वेळी पोलादापासून तो अंड्यापर्यंत अगदी भिन्न भिन्न वस्तूंच्या बाबतीत हेच घडून आले आहे.) आणि अखेरीस निर-निराळ्या उद्योगांतील उत्पादनाची तपशीलवार आखणी करण्याचा प्रयत्न, काम-गारांकडून सहकार्य मिळाले नाही तर अयशस्वी ठरणे अपरिहार्य होऊन बसते. परंतु निस्वार्थी बाब म्हणून हे सहन करायची कोणाचीही तयारी नसते.

अशा तऱ्हेने दोन्ही बाजूंकडून एकांतिक भूमिका स्वीकारण्याची प्रवृत्ती कमी कमी होत चालली आहे आणि नियोजनाचा प्रश्न (नियोजनाच्या उद्दिष्टांबाबतची परिस्थिती याच्या नेमकी उलट आहे) हा आता डाव्या आणि उजव्या गटातील मूलभूत फरकासंबंधीचा राहिलेला नाही. सहाजिकच मुख्य भर कशावर द्यावयाचा

यासंबंधी महत्त्वाचे मतभेद कायमच आहेत व त्यातूनच वरीचशी राजकीय वादावादी सुरू होते. परंतु सर्वसाधारणपणे आता नियोजन असावे की नाही हा प्रश्नच राहिलेला नसून ते किती प्रमाणात असावे आणि त्याचे उद्दिष्ट काय असावे एवढाच प्रश्न आहे.

## २. कार्यक्षम नियोजनाच्या राजकीय मर्यादा

नियोजनासंबंधी मला जे काही सांगावयाचे आहे त्यापैकी बहुतेक सर्व पूर्वीच्या प्रकरणांतून या आधीच सांगून झाले आहे. आर्थिक व्यवहाराच्या प्रत्यक्ष विभागाला साधन सामुग्रीतील योग्य तो वाटा ठरवून दिला जाईल आणि त्यामुळे सर्वांना रोजगार उपलब्ध होण्यास मदतच होईल, परंतु मागणीच्या पातळीत मात्र फुगोटा येणार नाही अशी दक्षता घेणे हे नियोजनाचे मुख्य कार्य असते. पुढील वर्षाची निर्यात, भांडवल गुंतवणूक आणि वितरण इ. साठी राष्ट्रीय उत्पन्नापैकी किती भाग राखून ठेवावयाचा यावर सरकार नेमके नियंत्रण ठेवू शकेल असे मला सुचवावयाचे नाही. आणि सरकार हेच ज्यावेळी ग्राहक असते किंवा सरकारकडूनच जेव्हा पैसा उपलब्ध होणार असतो अशा काही प्रसंगी सरकार बऱ्याचशा निश्चित स्वरूपात ते प्रमाण किती असावे ते ठरवू शकते.

तेव्हा या पुस्तकात नियोजनाचे मुख्य हेतू म्हणून जे दिले आहेत ते म्हणजे भांडवल गुंतवणुकीची हळू हळू वाढत जाणारी पातळी, त्याच्याशी मिळता जुळता असा शिलकीचा पुरेसा साठा आणि धोका पत्करावा लागणारे भांडवल, निर्यातीला बाध येणार नाही अशा तऱ्हेची वस्तूंची अंतर्गत मागणी, वेतन – किंमत आवर्त सुरू होणार नाही अशा तऱ्हेची कामगारांच्या बाजारपेठेतील परिस्थिती आणि सामाजिक खर्चासाठी वापरावयाच्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या प्रमाणात वाढ–आणि हे सर्व वाढत्या सामाजिक समतेच्या पार्श्वभूमिवर घडवून आणणे हे होते. अर्थात यापैकी कोणतीही गोष्ट आपोआप साध्य होणार नाही. त्यासाठी नियोजनाची निरनिराळी धोरणे अवलंबावी लागतील. निरनिराळ्या विषयाखाली त्याची चर्चा येऊन गेली आहे. परंतु त्या सर्वांपेक्षाही कौशल्यपूर्ण आणि खंबीर आर्थिक धोरणाची, त्याचप्रमाणे जरूर तेथे त्याला अनुषंगिक अशी नियंत्रणे यांची जास्त आवश्यकता असते. कारण राजकोषीय नीती (Fiscal Policy) मंद गतीची असेल, कर अगदी कमी असतील आणि सरकारी नियोजनही फारसे नसेल तर, वर दिलेल्या या बाबींच्या ऐवजी साधनसामुग्रीचा बराच मोठा भाग व्यक्तिगत उपभोगासाठी खर्च करण्याची प्रवृत्ती वाढते.

नियोजन यशस्वी होण्याच्या दृष्टीने या उद्दिष्टांच्या (आणि पुढच्या विभागात आलेल्या इतरही उद्दिष्टांच्या) आड येणाऱ्या गोष्टी कोणत्या ? युद्धोत्तर काळातील मजूर सरकारांनी नियोजनाच्या क्षेत्रात बजावलेल्या कामगिरीबद्दल लोक काही वेळा फार टीका करतात. आणि मजूर सरकार ज्यावेळी पुन्हा

अधिकारावर येईल त्यावेळी त्याने आपल्या धोरणात महत्त्वाचे बदल घडवून आणले पाहिजेत असे ते सुचवितात. खरोखरीच युद्धोत्तर काळात काही उणीवा होत्या. परंतु त्या नेमक्या काय होत्या ते ठरविणे महत्वाचे आहे.

नियोजनांतील मुख्य त्रुटी जर कोणती असेल तर ती म्हणजे आकडेवारीचा अभाव असे अनेकदा म्हटले जाते. आकडेवारी किंवा आर्थिक घटपट, नियोजन खात्यातील सरकारी कर्मचाऱ्यांचा दृष्टीकोण, नियोजनाची प्रशासन यंत्रणा (म्हणजेच सरकारची निरनिराळी खाती) किंवा प्रत्यक्ष नियंत्रणे उपलब्ध असलेले नियोजन विषयक तंत्र या बार्बी नियोजनातील उणीवांना जबाबदार असू शकतात. यापैकी कांही किंवा सर्वच बाबतीत उणीवा होत्या यात शंकाच नाही. भविष्यकाळात त्यांत उपयुक्त सुधारणा घडवून आणणे शक्य आहे.

परंतु यापैकी कुठलीही बाब नियोजनाचे यश मर्यादित करण्याच्या दृष्टीने निर्णायक ठरली होती किंवा पुढे ठरू शकेल किंवा काय या विषयी मी साशंक आहे. अनुभव असे सांगतो की, ज्या मंत्र्यांची नियोजन घडवून आणण्याची तयारी होती ते या सर्व उणीवा असूनही, नियोजन आमलात आणू शकले परंतु ज्यांची तशी तयारीच नाही ते या सर्व उणीवा दूर करून दिल्या तरीही काही करू शकणार नाहीत. नियोजनात सगळ्यात महत्वाची कमतरता जर कोणती असेल तर ती म्हणजे, दहा पैकी नऊ उदाहरणांत इच्छाशक्ती आणि निर्धार यांचा अभाव हीच होय. मजूर सरकारपेक्षाही हुजूर सरकारच्या बाबतीत तर याची अधीकच प्रचीती येते. निरनिराळे हितसंबंध, सरकारवर दडपण आणणारे गट, उदासीनता, मतदादारांची प्रतिक्रिया आणि पक्षातील मागे राहून नुसतीच टीका करणाऱ्यांकडून होणारा विरोध, या सर्वांना तोंड द्यावे लागत असल्यामुळे नियोजनाचा आग्रह धरला जात नाही. म्हणजेच नियोजनाचे अपयश हे मुख्यत: राजकीय स्वरूपाचे असून त्यावरून लोकशाही समाजात नियोजन यशस्वी करून दाखवणे किती कठीण आहे ते स्पष्ट होते. समाजवाद्यांना नियोजनाच्या बाबतीत अधिक धाडशी पाऊल टाकावयाचे असेल तर त्यांनी तसेच धाडशी मंत्री निवडले पाहिजेत. आणि दुसरी तितकीच महत्वाची गोष्ट म्हणजे मजूरपक्षातील सभासदांनी जेव्हा त्यांच्या मतदारांवर किंवा ते विशेष रस घेत असलेल्या क्षेत्रात नियोजनांमुळे अप्रिय असा परिणाम घडून येतो, आणि तसा तो बराच वेळा येण्याचा संभव आहे, त्यावेळी अधिक आत्मसंयम दाखवला पाहिजे.

या ठिकाणी एक अत्यंत समर्पक उदाहरण देता येण्यासारखे आहे. युद्धोत्तर काळानंतर पूर्वपरिस्थितीवर येण्याच्या बाबतीत सर्वात मोठी अडचण कोळशाच्या टंचाईची होती. आपण असे धरून चालू (पुढच्या विभागात येणारी चर्चा गृहीत धरून) की, मजूर सरकारने इंधन आणि विद्युत्शक्ती यांच्या नियोजनाचा जोरदार कार्यक्रम हाती घेण्याचे ठरविले असते तर त्याबाबत पक्षाला असे आढळून आले असते

की, पुरेशी आकडेवारी, तंत्र. योग्य सल्ला, यापैकी कशाही पेक्षा खरी अडचण भासली असती ती मुख्यत: राजकीय स्वरूपाचीच. (१) सेंट्रल इलेक्ट्रिसिटी ॲथॉरिटीला लॉर्ड सिट्रीन यांचा असलेला विरोध (२) (मतदार तर सोडाच), खुद्द पक्षातीलच टीकाखोर सभासदांचा कोळशाची किंमत वाढविण्यास असलेला विरोध (३) कोल-बोर्डाने व्यवस्थापन खात्यातील कर्मचाऱ्यांच्या पगारात वरीच वाढ करावी असे म्हटल्याबरोबर त्याला विरोध करणारे स्वत: खाणमालक आणि त्यांनी निवडून दिलेले पार्लमेंटचे सभासद (४) इंधन वाचविणारे यंत्र बसविल्याबद्दल करात भेदजन्य सूट देण्याच्या सूचनेस विरोध करणारे अर्थखाते (५) इतर सर्व क्षेत्रांतील पगार-वाढ निष्फळ ठरू नये म्हणून खाण कामगारांना आणखी पगारवाढ मिळता कामा-नये अशी भूमिका घेणाऱ्या कामगार संघटना (अर्थात खाण कामगारांची वगळून) या सर्वांविरूद्ध संबंधित मंत्र्यांना यशस्वीरित्या लढा द्यावा लागेल.

किंवा दुसरे उदाहरण घ्यावयाचे तर, भांडवली गुंतवणूक अधिक प्रमाणात करता यावी म्हणून 'बिन आवश्यक' क्रयवस्तूंच्या उद्योगांतील पोलादाचा वापर कमी करावयाचा निर्णय मजूर सरकारने घेतला तर त्यासाठी कोणते तंत्र वापरा-वयाचे ? पोलादाच्या वाटपावर नियंत्रण बसवावयाचे की काही आर्थिक उपाय योजा-वयाचे, नाणेविषयक धोरणात बदल करावयाचा की, हप्तेबंदीच्या खरेदी विक्रीवर निर्बंध लादावयाचे या विषयी मोठीशी समस्या निर्माण होणार नाही. खरी समस्या निर्माण होईल ती मुळात ही योजना लागू करावयाची का आणि करावयाची झाल्यास कशी करावयाची हीच. कारण कामगार, पार्लमेंटचे सभासद आणि या योजनेची सर्वांत जास्त झळ बसणाऱ्या कामगार संघटनांकडून होणाऱ्या अत्यंत तीव्र (आणि नैसर्गिक) विरोधाला तोंड देऊनच ती योजना पार पाडावी लागेल. त्याच-प्रमाणे हुजूर पक्षाच्या अलिकडच्या धोरणाविरुद्ध खरा आक्षेप आहे तो भौतिक किंवा साधनाधिष्ठित नियंत्रणाऐवजी ( Physical Controles ), बिगरभौतिक (Nonphysical) नियंत्रणाचा अवलंब केला जातो हा नसून (अर्थात तेही दाखवून देता येण्यासारखे आहे) प्रथम दीर्घकाल टिकणाऱ्या क्रयवस्तू निर्माण करणाऱ्या उद्योगांच्या विस्ताराला प्रोत्साहन देणे (कर कमी करून आणि हप्तेबंदीवरील नियं-त्रणे काढून घेऊन) आणि नंतर वर्षभराने या धोरणात संपूर्ण बदल करून त्या उद्योगांना आपला कारभार आखडता घेण्याची सक्ती करणे असे एका पाठोपाठ जे राजकीय निर्णय घेतले जातात त्या विरुद्ध आहे.

म्हणून नियोजनापुढे ज्या समस्या आहेत त्या मुख्यत: राजकीय स्वरूपाच्या आहेत आणि आपण लोकशाहीवादी आहोत म्हणूनच मूलत: त्या निर्माण होतात. नियोजनाची यंत्रणा व त्यातील कर्मचारी आणि आकडेवारी पुरविणाऱ्यांची योजना या बाबतीत तज्ज्ञांनी जरूर सल्ला द्यावा. परंतु याच बाबी सर्वात महत्त्वाच्या आहेत असे आपण धरून चालू तर ती आपली चूक ठरेल. नियोजनासंबंधीचे आजचे तंत्र

आणि त्याबाबतचे ज्ञान तोकडे असले तरी नियोजन अधिक निर्धारयुक्त आणि प्रभावी करण्याच्या दृष्टीने ते पूर्वीच्या मानाने आज निश्चितच पुरेसे आहे. आज जर कशाची जरूर असेल तर ती राजकीय जोम, तीव्र इच्छाशक्ती आणि लोकांना न आवडणारे निर्णय घेण्याची तयारी यांची. त्यामुळे आर्थिक नियोजनापुढील सम-स्यांचा तपशीलवार उहापोह करणे म्हणजे काळाचा अपव्यय करण्यासारखे आहे— तंत्रविषयक अडचणींवर ज्यावेळी इच्छाशक्ती मात करील त्यावेळी असा उहापोह करण्याची वेळ येईल. आणि म्हणूनच डाव्या गटातील जे लोक नियोजन अधिक जोरदार झाले पाहिजे असे तावातावाने सांगत असतात तेच अनेकदा पक्षातील तळच्या कार्यकर्त्यांना अप्रिय आर्थिक वस्तुस्थिती समजावून सांगण्यास अजिबात तयार नसतात हीच तर यातील शोकांतिका आहे.

## ३. नियोजन किती असावे ?

चलनवाढ होऊ न देता सर्वांना रोजगार उपलब्ध होईल अशा चौकटीत राहून आर्थिक क्षेत्रातील सर्व प्रमुख विभागात साधनसामुग्रीचे योग्य वितरण करून देणे हे यशस्वी नियोजनाचे मुख्य उद्दिष्ट जर आपण तडीस नेऊ शकलो तर अशा प्रत्येक विभागात अगदी तपशीलवार नियोजनाची तरी कितपत आवश्यकता राहील या विषयी पण शंकाच आहे. उत्पादन आणि भांडवल गुंतवणुकीसंबंधीचे निर्णय यांचे अगदी तपशीलवार नियोजन करण्याचे युद्धोत्तर काळात जे प्रयत्न झाले ते फारसे यशस्वी होऊ शकले नाहीत. त्याची कारणे वर दिलीच आहेत. ते कसेही असले तरी याच पुस्तकात स्पष्ट केल्याप्रमाणे नफ्यासाठी करण्यात येणारे उत्पादन आणि उपभोगास्तव करण्यात आलेले उत्पादन यात फार मोठी तफावत असते हे गृहीत धरून परंपरागत समाजवादी अशा नियोजनाची जी कैफियत मांडतात ती भौतिक कल्याणाची सध्याची पातळी लक्षात घेता अजिबात टिकाव धरू शकत नाही.

उपभोग आणि औद्योगिक भांडवल गुंतवणूक यासाठी उपलब्ध असलेली सर्व साधन सामुग्री लक्षात घेता क्रयवस्तू आणि औद्योगिक भांडवली-वस्तूंच्या मोठ्या भागाचे वितरण करण्याचे भाव यंत्रणा हे एक बरेच समाधानकारक साधन बनलेले आहे. आपला पैसा कसा खर्च करावयाचा ते ग्राहक बरोबर ठरवीत असतात. आणि समजा तसे त्यांना ठरविता नाही आले तरी देखील व्यक्तिगत स्वातंत्र्याच्या तत्वा-नुसार त्याला वाटेल तसा खर्च करण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे.— त्याला अपवाद फक्त एकच; आणि तो म्हणजे सातव्या प्रकरणांत वर्णन केलेले सामाजिक सेवा संबंधीचे नियम. याचा अर्थ असा नव्हे की, व्यक्तीव्यक्तीत होणारे क्रयवस्तूंचे वित-रण हे आदर्श असेल. उलट ते मुळीच तसे असणार नाही. कारण अद्यापही क्रय-शक्तीची विभागणी अत्यंत विषमतेने झालेली आहे. तथापी संपत्तीच्या विभागणीला हात घालून क्रयशक्तीतील ही विषमता दूर केली पाहिजे. अपवादात्मक अशी

आणीबाणीची परिस्थिती किंवा तीव्र टंचाईचा काळ सोडला तर झालेल्या विशिष्ट विभागणी नंतर लोकांना आपल्या वाट्याला आलेले उत्पन्न मर्जीनुरूप खर्च करण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. कामगार वर्गाची क्रयशक्ती ज्यावेळी खूप वाढलेली असते त्यावेळी उपभोगाकरता केले जाणारे उत्पादन आणि नफा मिळविण्यासाठी केले जाणारे उत्पादन यात तसा फारसा फरक राहत नाही. ग्राहकांना जे उपयुक्त वाटते ते फायदेशीर असते आणि कारखानदार व ग्राहक या दोघांनाही साधनसामुग्रीची विभागणी सर्वसाधारणपणे सारखीच अभिप्रेत असते. स्वतःला पितृस्थानी समजून मोठेपणाचा आव आणणारांना मद्यपान, जुगार किंवा टेलिव्हिजन सेट यावर कमी खर्च व्हावा असे वाटत असल्याने ही विभागणी मनातून पसंत नसली तरी व्यक्तिगत स्वातंत्र्यासाठी त्यांना ती नापसंती मनातल्या मनात गिळून टाकावी लागते.

तथापी अशीही काही उदाहरणे आढळतील की, एकाद्या विशिष्ट विभागासाठी राखून ठेवलेल्या एकूण साधन सामुग्रीपैकी बाजारपेठांच्या बाबतीत हस्तक्षेप करणे सरकारला आवश्यक वाटेल. म्हणजेच एकादी विशिष्ट उपभोग्य वस्तू कमी मिळेल किंवा दुसरी एकादी जास्त मिळेल. तसेच एकाद्या उद्योगात कमी (बहुधा जास्तच) तर दुसऱ्या उद्योगात जास्त भांडवल गुंतवणूक झाली पाहिजे असे सरकारी हुकूम काढले जातात. केवळ अनुमानावर आधारलेल्या तत्वानुसार अशा उदाहरणांची यादी देता येणार नाही. याबाबत अनुभवावर भिस्त ठेवणे हा सर्वोत्कृष्ट मार्ग ठरेल. कारण त्यात एका बाजूने हे स्पष्ट दिसत असते की, आपल्या हस्तक्षेपामुळे भावावर नियंत्रण ठेवण्याची नाजुक यंत्रणा किंवा काही इष्टतम (Optimum) बाबी यांना धक्का पोहोचू शकेल अशी धास्ती बाळगण्याचे कारण नाही. कारण समाजकल्याणाची कमाल मर्यादा गाठण्याइतक्या आश्चर्यकारकपणे भावयंत्रणा काम करीत नसते. त्याचबरोबर दुसऱ्या बाजूने ग्राहक किंवा भांडवलाची गुंतवणूक करणारे यांना हव्या असलेल्या वस्तू निर्माण करण्यास सहाय्यभूत ठरण्याइतपत सर्वसाधारण परिणाम तिच्यामुळे घडून येत असल्याने असा हस्तक्षेप करणे समर्थनीय ठरते. कारण सध्याचे उत्पादन हे एक तर उघड उघड सार्वजनिक हिताच्या विरोधी तरी असते किंवा उत्पादकाला भावी काळातील मागणीचे स्वरूप काय राहणार आहे याची अचूक कल्पना तरी आलेली नसते असे अनुभवास येते.

भांडवल गुंतवणुकीचे नियोजन व्हाईट हॉलमधूनच झाले पाहिजे (म्हणजे निरनिराळ्या उद्योगांत किती भांडवल गुंतवावयाचे ते व्हाईट हॉलने ठरविले पाहिजे) अशी समाजवाद्यांची धारणा असते. त्याचे कारण ते असे देतात की, पुढे येणाऱ्या मागणीविषयी सरकारी नियोजकांच्या जवळ अधिक चांगली माहिती उपलब्ध असते किंवा त्यांच्याजवळ अधिक व्यापक दूरदृष्टी असते. म्हणून एकादे उदाहरण घेऊन सांगावयाचे तर अलिकडच्या समाजवाद्यांपैकी अनेकांना मोटार

धंद्यातील गुंतवणुकीची सध्याची योजना सरकारने रद्द करून टाकणे अधिक पसंत पडले असते. कारण ती योजना फाजील आशावादी असून याबाबतचे त्यांचे स्वतःचे मत अधिक बरोबर असण्याचा संभव आहे अशी त्यांची समजूत आहे.

राजकारणी मंडळींना जरी नाही तरी नियोजनकारांना एकूण अर्थव्यवस्थेच्या वाढीचे प्रमाण काय राहणार आहे त्याची खाजगी उद्योगजकांपेक्षा निश्चित अधिक चांगली अटकळ असणार असे धरून चालावयाला हरकत नाही. यावरून असा निष्कर्ष निघतो की, ज्या वस्तूंची मागणी उत्पन्न आणि उत्पादन यांच्या अनुषंगाने प्रत्यक्षपणे कमी जास्त होत असते- म्हणजेच ज्या वस्तूंच्या मागणीत फारसा चढ-उतार होत नाही किंवा ज्यांच्या ऐवजी दुसऱ्या एखाद्या वस्तूचा वापर करता येत नाही (उदा. एकंदर सरपण किंवा वाहतूक किंवा पोलाद) त्यांच्या संबंधी सरकार सामान्यतः आधिक चांगला दृष्टीकोण स्विकारू शकेल.

परंतु पुढील काळातील मागणीत उत्पादनानुसार प्रत्यक्ष चढउतार होत नसेल आणि दुसऱ्या वस्तूंचा पर्याय उपलब्ध असेल, त्याचप्रमाणे ग्राहकांच्या निवडीत बदल घडून येत असेल किंवा निर्यातीत वटघट होत असेल तर परिस्थिती नेमकी कशी राहील ते तितकेसे स्पष्ट होत नाही. एकतर ज्या उद्योगांना ग्राहकांच्या व निर्यातदारांच्या निवडीबाबतच्या लहरीपणावर विसंबून रहावे लागते त्यांच्या बाबतीत खाजगी उद्योगजकांपेक्षा सरकारचा दृष्टीकोण अधिक चांगला असेल असे मानण्याला कोणतीही जागा नाही. उदाहरणादाखल आपण मोटार उद्योगांतील विस्तार योजना घेऊ. भावी काळात मोटार गाड्यांना किती मागणी राहील त्याचे भविष्य वर्तविणे कठीण आहे. निर्यातीच्या मागणीबाबत भरपूर आकडेवारी हाताशी असली तरी परदेशातून किती मोटारींची मागणी येईल यासंबंधी अंदाजच काय तो व्यक्त करणे शक्य आहे. विशेष निरनिराळ्या पातळीवरील उत्पन्नाच्या संदर्भात निरनिराळ्या देशांतील ग्राहकांची निवड काय राहील त्याचा ढोबळ मानाने अंदाज बांधून त्या आधारावरच निर्यातीच्या योजना आखाव्या लागतील. आंतरदेशीय मागणीबाबतही अशीच अनिश्चितता असते. बाजारपेठांसंबंधीच्या संशोधनाची साधने सामान्यतः इंग्लंडमध्ये असतात त्यापेक्षा अमेरिकेतील सरकार आणि मोटार उत्पादकांपाशी अधिक असूनही युद्धोत्तर काळातील मोटारींची मागणी वर्षाला कित्येक दशलक्षांनी कमी धरली गेली होती. इतकी अनिश्चितता असतांना केवळ काही वेळच या प्रश्नाकडे लक्ष देणारे मंत्री, राजकारणी किंवहुना व्हाईट हाऊस मधील मूठभर नियोजनकार ही सर्व वेळ काम करणारा नोकर वर्ग व परदेशात असलेल्या आपल्या प्रतिनिधींशी सतत संपर्क ठेवणाऱ्या मोटार कारखानदारांपेक्षा अधिक चांगली कामगिरी कशी बजावू शकतील? मोटार कारखानदारांचा याबाबतचा अंदाज चुकीचा होता हे सिद्ध झाले तरी इतरांचा अंदाज त्यांच्यापेक्षा अधिक बरोबर असेल असे मानावयाला तरी कोणते सबळ कारण दाखवता येण्यासारखे आहे ?

दुसरे असे की, जेथे पर्यायाला फारसा वाव नसतो (उदा. रस्ता विरुद्ध आगगाडी किंवा इंधनाचे,निरनिराळे प्रकार) आणि त्यामुळे मध्यवर्ती कचेरीतील नियोजनकारांचा भावी मागणीसंबंधीचा दृष्टीकोण अगदी अचूक असण्याचा संभव असतो तेथे देखील त्यामानाने अगदी साध्या बाबतीतही प्रभावी नियोजनात बाधा येवू शकते. याची कारणे दोन असू शकतात. एक तर मंत्री, इतर शासकीय खाती किंवा राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग या दृष्टीकोणाकडे दुर्लक्ष करतात किंवा मागच्या विभागात उल्लेखिलेल्या राजकीय कारणास्तव सरकारकडून त्याबाबत जरूर ती पावले उचलली जात नाहीत.

अशी अनेक उदाहरणे उदाहरणे दाखविता येतील. मध्यवर्ती नियोजनकारांचे मत काहीही पडले तरी नॅशनल कोल बोर्डाने कोळशाविषयीच्या मसूद्यांत (Plan for coal) कोळशाची मागणी किती राहील त्या संबंधीचे दोन आकडे दिले होते ते अनेक टीकास्पद गृहीतांवर आधारलेले होते. आणि त्या दोन आकड्यांच्या दरम्यान कोठेतरी ती असेल असा अंदाज धरला होता. म्हणजे वर जो मुद्दा मांडला आहे त्यावरच सूक्ष्म प्रमाणात ही मागणी आधारलेली आहे असे म्हणावयास हरकत नाही. त्यानंतर दोन वर्षांनी नेमलेल्या रिडले समितीने यापेक्षा अगदी निराळा अंदाज वर्तविला आणि कोळशाचे उत्पादन अगदी किमान मागणी देखील कधीच पुरी करू शकणार नाही हे लवकरच स्पष्ट झाले.

विस्ताराबाबत इतकी बेभरवशाची परिस्थिती असून देखील इंधन आणि वीज यांच्या नियोजनाची अल्पकालीन उद्दीष्टांबाबत बरीच स्पष्टता होती. तरी देखील राष्ट्रीयीकरण झालेल्या निरनिराळ्या उद्योगांतील नियोजनांत सुसूत्रता निर्माण करून ती उद्दिष्टे तडीस नेण्याच्या बाबतीत सरकार अयशस्वी ठरेल. राजकीय कारणेच त्याला बव्हंशी जबाबदार आहेत. रस्त्यांविषयीच्या निरनिराळ्या योजना– जर त्यांना योजना म्हणावयाचे असेल तर– हे तर याचे आणखीनच विदारक उदाहरण आहे. भावी काळातील मागणी आणि त्यासाठी येणारा खर्च यांचा दीर्घ मुदतीचा अंदाज लक्षात घेऊन अशा योजना आखल्या गेल्या नाहीत हे तर झालेच परंतु त्यात कसलीही सुसूत्रता नव्हती. निरनिराळ्या योजनांची ती नुसती खिचडी होती. आणि त्यांचा जो क्रम ठरवून दिला होता तोही एक सरकार जाऊन दुसरे अधिकारावर आले की प्रत्येक वेळी बदलला जात होता. सेव्हर्न पुलाचा दुःखदायक इतिहास डोळ्यासमोर आणण्या सारखा आहे. सध्याची आगगाडीसंबंधीची योजना अंतर्गत दृष्टया अगदी संयुक्तिक दिसत असली तरी ती देखील रस्ते आणि आगगाडी यांचे परस्परातील योजनाबद्ध आर्थिक संबंध लक्षात घेऊन त्या आधारावर आखण्यात आलेली नाही. आणि सरकारच्या नियोजन खात्यातील कर्मचाऱ्यांचा आगगाडी किंवा रस्ते यापैकी कशाच्याच योजनावर काही प्रभाव आहे असे दिसत नाही.

यावरून '–श्रेष्ठप्रतीचे ज्ञान' आहे या कारणास्तव नियोजनांतील हस्तक्षेप

समर्थनीय ठरतो असे म्हणावयाचे असेल तर त्यासाठी प्रथम खालील दोन शर्ती पुऱ्या झाल्या पाहिजेत असे म्हणणे ओघानेच येते. त्या शर्ती म्हणजे १) भावी काळातील मागणीसंबंधी खाजगी उद्योगांपेक्षा सरकारला अर्थातच आधिक स्पष्ट जाणीव असली पाहिजे. कसलीही बंधने नसलेल्या ग्राहकांसाठी किंवा निर्यातीसाठीच अंती उत्पादन करणाऱ्या बहुतेक उद्योगांना देखील सामान्यतः हे लागू का पडू नये याला कोणतेही संयुक्तित कारण देता येणार नाही २) जेथे ही अट पुरी होत असेल (म्हणजे ज्या मूलभूत क्रयवस्तूंची अपेक्षित वाढ स्थूलमानाने एकूण वाढीशी संबंधित आहे अशा उदाहरणांच्या बाबतीत) तेथे देखील मंत्र्यांनी वस्तुतः मध्यवर्ती नियोजनकारांचा दृष्टिकोण मान्य करून दुसऱ्या विभागात दिलेल्या राजकीय अडथळ्यांना न जुमानता (इतर सरकारी खाती, आणि राष्ट्रीयीकरण केलेले उद्योग त्याचप्रमाणे पार्लमेंट यांनाही) त्याची अंमलवजावणी करून घेणे अत्यावश्यक आहे.

परंतु खाजगी क्षेत्रातील उद्योगांना नियोजन लागू करण्याच्या प्रश्नापेक्षा सार्वजनिक क्षेत्रांतर्गत नियोजनाच्या दृष्टीने ही दुसरी शर्त अधिकच सुसंबद्ध ठरते. कारण कोळसा, गॅस, वीज आगगाडी आणि रस्ते यासारख्या सर्वात महत्वाच्या क्रयवस्तू किंवा त्यांचे कारखाने याआधीच संपूर्णपणे सार्वजनिक मालकीखाली आलेले आहेत.

## ४. नियोजनाची उचित उद्दिष्टे

खाजगी क्षेत्रात याहूनही जास्त हस्तक्षेप करण्याची कारणे सामान्यत निराळी असतात. एकतर उद्योगांची व्याप्ती वाढविण्याचा धोका पत्करावयास खाजगी उद्योगांचे प्रवर्तक तयार नसतील परंतु सरकारची तशी तयारी असेल आणि दुसरे म्हणजे खाजगी आणि सार्वजनिक क्षेत्रांतील किमतीत तफावत पडत असेल तर सरकारी हस्तक्षेपाची शक्यता संभवते.

यापैकी पहिल्या बाबी संबंधी बोलावयाचे तर काही उद्योग असे असतात की ज्यांना उत्पादनाच्या प्रत्येक घटकामागे कमालीच्या मोठ्या भांडवलाची आवश्यकता असते (त्यामानाने कौशल्य मात्र अगदी बेताचे लागते). सामान्यतः असे उद्योग हे मूलभूत उद्योगांपैकी असतात आणि त्यांच्या विस्तारावरच इतर अर्थव्यवहारातील वाढ अवलंबून असते. स्थिर (fixed) भांडवल आणि उत्पादन त्यांच्यात अशा तऱ्हेचे वाढते प्रमाण असणे याचा अर्थ अचानक वाढलेली मागणी पुरी करण्यासाठी आपल्या उत्पादनांत चटकन वाढ करणे त्यांना कठीण जाते हे एक आणि दुसरे म्हणजे जादा क्षमतेसाठी कराव्या लागलेल्या फार मोठ्या खर्चांमुळे दीर्घ मुदतीच्या विस्तार योजनात असलेल्या धोक्यामुळे त्या अधिकच खर्चाच्या वाटतात. अशा तऱ्हेने संपूर्णपणे एकत्रीकरण करण्यात आलेला पोलादाचा कारखाना उभारण्यासाठी मध्यम आकाराच्या कारखान्यापेक्षा ६०० पट जास्त खर्च येतो. आणि अशा कार-

खान्याची जवळ जवळ सर्व क्षमता उपयोगात आणून तो सतत चालू ठेवता नवीन
कारखान्यासाठी करावा लागणारा वरकड (ओव्हर हेड) खर्च [illegible] [illegible].
सहाजिकच भांडवल गुंतवणुकीच्या मोठाल्या नव्या योजना हाती घेण्यापूर्वी भावी
मागणीबाबत फार मोठ्या प्रमाणावर हमी मिळविली पाहिजे अशी उद्योगाची
अपेक्षा असणार. ब्रिटनमधील पोलादाच्या बड्या कारखानदारांनी [illegible]
म्हणून हेच केले आणि मागणीत होणाऱ्या वाढीच्या मानाने त्यांनी [illegible] [illegible] एक
पाऊल मागेच ठेवले. या दिशेने काही चुका झाल्या तरी ते [illegible] [illegible] [illegible].
आणि त्याचा परिणाम असा होतो की, क्षमतेचा पुरेपूर उपयोग करून न घेण्याची
प्रवृत्ती बळावते. सरकार आणि त्या उद्योगाचे प्रतिनिधी यांनी भावी मागणीच्या
संदर्भात आपापल्या कारखान्याच्या वाढीसंबंधी [illegible] [illegible] [illegible]
निर्णय घेतले असले तरी त्याकडे दुर्लक्ष केले जाते.

काहीवेळा एकूण अर्थव्यवस्थेच्या दृष्टीने अशा प्रकारांना फार मोठे महत्त्व
प्राप्त होते आणि अशावेळी एकूण उत्पादनातील अपेक्षित वाढीला सहाय्यभूत
होण्याच्या दृष्टीने मुख्यत्वे करून अशा प्रकारच्या उद्योगावर आधारलेल्या औद्यो-
गीकरणचा पाया, जरूर तर त्यांचे राष्ट्रीयीकरण करूनही, झपाट्याने विस्तृत केला
जाईल अशी हमी देणे ही सरकारची जबाबदारी ठरते. परंतु सरकारी हस्तक्षेप
हा केवळ मूलभूत उद्योगांपुरताच मर्यादित ठेवण्याचे कारण नाही. एखाद्या उद्यो-
गाचा विस्तार करणे अत्यावश्यक असूनही खाजगी उद्योजक त्यासाठी जरूर
तो धोका पत्करावयास तयार नसतील तर अशा ठिकाणी सरकारने अनुदान, हमी,
ठोक खरेदी किंवा इतर अन्य मार्गांनी त्यापैकी काही किंवा सगळी जबाबदारी
स्वीकारण्याची तयारी ठेवली पाहिजे. युद्ध संपल्यापासून विमाने, [illegible], [illegible]
पाणदाब यंत्रे (हायड्रॉलिक प्रेस) आणि टिटॅनिअम यांच्या उत्पादनाला [illegible]
तऱ्हेने प्रोत्साहन देण्यात आले आहे. आणि [illegible] आर्थिक नियोजनाच्या
दृष्टीने ज्या ज्या उद्योगांची वाढ करणे विशेष अत्यावश्यक [illegible] [illegible] ही
पद्धत अत्यंत उपयुक्त ठरते.

खाजगी आणि सामाजिक क्षेत्रांतील किंमतीत फार मोठी तफावत [illegible]
अशा वेळीही अनेकदा सरकारी हस्तक्षेप आवश्यक ठरतो. म्हणजे [illegible] [illegible]
कृतीमुळे समाजाला सोसावा लागणारा खर्च किंवा मिळणारा नफा खाजगी (किंवा
राष्ट्रीयीकरण झालेल्या) उद्योगाच्या ताळेबंदात संपूर्णपणे प्रतिबिंबित होत नाही
अशावेळी सरकारी हस्तक्षेप योग्य ठरतो. सरकारी हस्तक्षेपाचे [illegible]
समर्थन होण्याचा हा सर्वात जुना प्रकार आहे.

या तफावतीचे अगदी ठळक उदाहरण म्हणजे नव्या कारखान्यांची [illegible]-
ज्यावेळी एखादा कारखाना पहिली जागा बदलून दुसऱ्या ठिकाणी [illegible] [illegible]
त्यावेळी समाजाला निरनिराळ्या प्रकारे त्याची झळ लागते आणि [illegible] होतो.

(कारखाना जेथून हलवला गेला असेल अशा) एका विभागांत कदाचित बेकारी निर्माण होईल किंवा कामगारांच्या संख्येत असमतोल निर्माण होईल अगर भांडवलाची क्षमता वाया जाऊ लागेल (सामाजिक भांडवल किंवा सार्वजनिक उपयुक्ततेच्या दृष्टीने) तर दुसऱ्या विभागात (म्हणजे जेथे नवा कारखाना उभारला गेला असेल तेथे) कामगारांचा तीव्र तुटवडा भासेल, वाहतूक वाढून त्यांत अडथळे निर्माण होतील किंवा त्या भागाचे नागरीकरण होईल. म्हणून अशा बाबतीत कृतिशील नियोजन अत्यंत आवश्यक ठरते.– वस्तुतः युद्धोत्तर काळांत लगेच नियोजनाचा जो अवलंब करण्यांत आला तो जर केला गेला नसता तर विकास क्षेत्रात बेकारीची फार गंभीर समस्या निर्माण झाली असती. आणि नियोजनाचा अवलंब न केल्यामुळेच लंडन किंवा बर्मिंगहॅमसारख्या शहरांतील वाहतूक हळू हळू पूर्णपणे कुंठित होण्याच्या मार्गाला लागली आहे.

खाजगी उद्योगांतील खर्च राष्ट्रीय हिताशी मिळते जुळते नसणारे आणखी एक क्षेत्र म्हणजे गुंतविलेल्या 'अत्यावश्यक' भांडवलाच्या मानाने अपेक्षित नफ्याचे प्रमाण अत्यल्प असते असे उद्योग. ती भांडवल गुंतवणूक इतकी माफक असते की, त्याची दखल घेण्याचेही कारण पडत नाही. तथापी सबंध उद्योगांचा एकत्रितपणे विचार केला तर त्यात गुंतविलेल्या भांडवलाचा एकूण परिणाम फार महत्त्वपूर्ण ठरत असतो. उदा. कोळशाच्या उद्योगातील अर्थव्यवस्था ही अशा प्रकारची आहे. त्यांच्या एकूण खर्चात इंधनाचा खर्च हा सामान्यतः अगदी अत्यल्प असतो. आणि इंधन वाचविणारी यंत्रसामुग्री बसवून खर्च कमी करण्याचा आणि निवळ नफ्यांत वाढ करण्याचा प्रयत्न हा एखाद्या कारखान्याच्या मानाने अगदी नगण्य ठरतो. त्यामुळे त्या कामात भांडवल गुंतवणूक होत नाही. परंतु त्यांत सर्वत्र अशी यंत्रसामुग्री बसविण्यात आली तर त्यामुळे कोळशाची जी एकूण बचत होईल ती राष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्या दृष्टीने बरीच महत्त्वाची ठरेल. अशा ठिकाणी सरकारने हस्तक्षेप केला तर तो खासच सर्वस्वी समर्थनीय ठरतो.

आंतरराष्ट्रीय व्यापारांतील समतोलामुळे देखील खाजगी आणि सामाजिक क्षेत्रातील खर्चात तफावत पडू शकेल. विशिष्ट प्रकारच्या वस्तूंची आयात किंवा निर्यात करावी किंवा नाही, करावयाची झाल्यास किती करावी, तसेच आयातीची जरूर नसलेल्या वस्तूंचे उत्पादन यावर द्विदेशीय (Bilateral) व्यापाराचा परिणाम घडून येऊ शकतो. त्याचप्रमाणे परराष्ट्रीय धोरण, वासाहतिक धोरण (उदा- कृत्रिम रबरासंबंधीचे), हुंडणावळीचा विशिष्ट दर टिकून राहण्याची शक्यता, किंवा विशिष्ट चलनाचा तुटवडा, या बाबींचाही ह्यावर परिणाम घडून येत असतो. आणि शेवटी सधूळ धुके (Smog) नद्यांचे पाणी, दूषित होणे, इत्यादी बाबींमुळे जो 'सामाजिक खर्च' होतो त्यासंबंधी मी येथे कसलाही उहापोह करीत नाही कारण आता त्यासंबंधीं फारसा मतभेद राहिलेला नाही.

सर्वसाधारण स्वरूपाचे असे फारसे कांही सांगता येण्यासारखे नाही हे सहज लक्षात येऊ शकेल. कांहीवेळा सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रातील खर्चात इतकी विलक्षण तफावत असते की, त्या बाबीविषयी सर्वजण सहमत असतात. त्याचप्रमाणे काहीवेळा स्वत: त्या उद्योगाची विस्तार करण्याची तयारी नसली तरी तशी आवश्यकता निश्चितच असते. त्याचप्रमाणे काही प्रसंगी खाजगी उद्योगवाल्यांपेक्षा सरकार अधिक सुस्पष्ट आणि समंजसपणाची भूमिका घेऊ शकते.

परंतु त्यामुळे प्रत्येक उद्योगासाठी सरकारने सर्वकष असा नियोजनाचा आराखडा तयार करावा—विशेषत: आपल्यासारख्या निर्यातीवर भर असलेल्या अर्थव्यवस्थेत या युक्तिवादाला मात्र खासच बळकटी येत नाही. अनुभवजन्य ज्ञानावर कटाक्षाने विसंबून सरकारने एखाद्या उद्योगाकडून सार्वजनिक हिताच्या विरुद्ध काही घडत असेल तर त्याला आळा घालण्यासाठी प्रथम नकारात्मक हस्तक्षेप करण्याची तयारी ठेवली पाहिजे. परंतु त्याहीपेक्षा अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे उद्योगाचा विस्तार घडवून आणण्यासाठी सकरणात्मक हस्तक्षेपही केला पाहिजे. त्यासाठी विशेषत: मूलभूत उद्योगांतील कमकुवत जागा शोधून काढून त्यावर आपली सर्व शक्ती शक्य तितक्या जोरदारपणे केंद्रित केली पाहिजे. औद्योगीकरणाचा पाया रुंदाविण्याची ही सकरणात्मक भूमिका सरकार यशस्वीपणे पार पाडू शकले— वस्तुत: कोळसा आणि पोलाद पुरेशा प्रमाणात उपलब्ध करून देण्याचे मध्यवर्ती आणि सर्वोपरी उद्दिष्ट सरकारला साध्य करता आले— तरी उरलेली ९० टक्के अर्थव्यवस्था सरकारच्या हस्तक्षेपाशिवाय आपली आपण व्यवस्थितपणे चालू शकेल. कारण आपला समाज जो इतकेदिवस अगदीच हातातोंडाशी गाठ असलेला होता त्यात आता बरीच सुबत्ता येऊ लागली आहे.

परंतु विनिमय, औद्योगिक भांडवल गुंतवणूक, सरकारी खर्च इत्यादी मागणीच्या महत्त्वाच्या घटकांत उत्पादनाचे वाटप कसे करावयाचे हा प्रश्न दुसऱ्या विभागांत चर्चिलेल्या प्रश्नाच्या मानाने अगदीच क्षुल्लक आहे. या निरनिराळ्या घटकांना उत्पादनांतील योग्य तो संपूर्ण वाटा कसा ठरवून द्यावयाचा, म्हणजेच चलनवाढ होऊ न देता मोठ्या प्रमाणावरील गुंतवणूक, निर्यात आणि सामाजिक बाबींवरील खर्च, यांची हमी कशी घ्यावयाची हा खरा प्रश्न आहे. नियोजनाचे मुख्य काम तेच आहे. आणि ही कामगिरी आपण यशस्वीपणे पार पडू शकलो तर चलनवाढीच्या एका आरिष्टापासून दुसऱ्या अरिष्टाकडे हेलकावे खाणाऱ्या असह्य परिस्थितीतून आपण स्वत:ची सोडवणूक करून घेऊ शकू. अशा परिस्थितीला तोंड देण्यासाठी घावरटपणाने काही तरी अर्धवट आणि धोकादायक उपाय योजले जातात त्यालाही मग आळा बसू शकेल. परंतु नियोजनावर एखादे प्रकरणच नव्हे तर सबंध पुस्तक लिहूनही याबाबतीत नियोजनात सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने फारसे सहाय्य होवू शकणार नाही. त्यासाठी खरी आवश्यकता जर कशाची

असेल तर सर्व मंत्र्यांनी स्टॅफोर्ड क्रिप्ससारखी दुर्दम्य इच्छाशक्ती आणि वज्रनिर्धार बाळगण्याची त्याचप्रमाणे पार्लमेन्टमध्ये आणि पार्लमेन्टच्या बाहेर अशा मंत्र्यांच्या पाठीशी खंबीरपणे उभे राहणाऱ्या राजकीय पक्षाचीही तितकीच आवश्यकता आहे.



# प्रकरण पंचविसावे

# उपसंहार

## १. आर्थिक सूचनांचा सारांश

मागच्या काही प्रकरणांत विकास आणि कार्यक्षमता यावर बराच भर देण्यात आला असला तरी समाजवादाच्या दृष्टीने त्या प्रश्नाला विशेष महत्त्व आहे असे दूरवर विचार करता आता मला वाटत नाही. ब्रिटनमध्ये आज आपण सामुदायिक समृद्धीच्या उंबरठ्यावर उभे आहोत. आणि एका दशकाच्या आंत सरासरी कुटुंबाचा राहणीमानाचा दर्जा इतका वाढलेला असेल की, तो त्या कुटुंबाच्या साऱ्या आशा आकांक्षा पुऱ्या करो वा न करो, परंतु समाज परिवर्तनासाठी झटणाऱ्यांना मात्र निश्चितपणे असे वाटू लागेल की आपण आपले मुख्य लक्ष, आजवर देत होतो त्या गोष्टीपेक्षा, दुसरीकडे वळवले पाहिजे.

अर्थात, तरी देखील मजूर सरकारला स्वतःचा असा आर्थिक कार्यक्रम ठेवावाच लागेल. कारण त्यावाचून आर्थिक विकासाच्या प्रमाणाबाबत पुढच्या दशकाविषयी ज्या आशा बाळगल्या आहेत त्या फलद्रुप होण्याची खात्री वाटू शकणार नाही. त्यादृष्टीने तो आर्थिक कार्यक्रम कशा प्रकारचा असावा त्याची रूपरेषा देण्याचा प्रयत्न मी या पुस्तकाच्या पाचव्या भागात केला आहे. खालील सूचनांच्या द्वारा त्याचा थोडक्यांत आढावा घेता येईल.

एक : आर्थिक धोरण. सर्वांना रोजगार उपलब्ध करून देणे आणि चलन फुगाव टाळणे यासाठी करावयाच्या नियोजनाचा भर नाणेविषयक नियंत्रणापेक्षाही अंदाजपत्रकांतील तरतुदींवर अधिक असला पाहिजे. म्हणजे असे समजा की, चलनवाढीचा धोका सर्वांत जास्त आहे असे धरले— आणि तसा तो सामान्यपणे असतोही— तर व्याजाच्या भारी दरापेक्षाही अंदाजपत्रकांतील शिलकीवर अधिक भर दिला पाहिजे. कारण त्यामुळे सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रांतील शिलकीच्या

प्रमाणात सुधारणा होते, उपभोगाच्या मानाने गुंतवणुकीला प्रोत्साहन मिळते आणि उपभोगाचे निरनिराळ्या सामाजिक वर्गात अधिक समान असे वितरण होते.

दोन : सार्वजनिक क्षेत्रांतील उद्योगांना जास्त शिल्लक टाकण्यासाठी आधिक धाडशी पावले उचलण्यास उद्युक्त करावे आणि भांडवलाच्या खाजगी बाजारपेठेतून कमीत कमी रक्कम कर्ज म्हणून उभारावी. असे करण्यामागे एकूण बचत वाढवणे व त्याच बरोबर सार्वजनिक आणि खाजगी मालमत्तेच्या प्रमाणात सुधारणा घडवून आणणे असे दुहेरी उद्दिष्ट असले पाहिजे.

तीन : उत्पन्नांतून केलेली बचत विशिष्ट मर्यादेपर्यंत करमुक्त करून, त्याचप्रमाणे सरकार पुरस्कृत अतिवयस्कता–बचतीची व्याप्ती वाढवून अल्प आणि मध्यम स्वरूपांतील व्यक्तिगत बचतीत वाढ करण्यास सक्रीय उत्तेजन देण्यात यावे.

चार : भांडवलाचा संचय करण्यासाठी खाजगी उद्योगांना जास्त नफा मिळवून बचत करण्यास उत्तेजन देणे आवश्यक असले तरी त्याचबरोबर नफ्यावरील कर आणि भांडवल गुंतवणुकीवरील आकारणी या दोन उपायांच्या योगाने लाभांश म्हणून वाटण्यात येणाऱ्या रकमेवर मर्यादा घालणे त्यास भाग पडले पाहिजे. कारण तसे केले म्हणजे भागधारक उत्तरोत्तर आधिक श्रीमंत होण्यातच आर्थिक विकास झिरपून जाणार नाही.

पाच : अधिक प्रमाणावरील समानता किंवा उद्योगांवरील करपद्धतीमुळे धोका पत्करावा लागेल अशा उद्योगांतील भांडवल गुंतवणुकीला बाध येतो असे दिसून आले तर जरूर त्या प्रमाणावर सरकारने त्याची बेगमी करण्याची जबाबदारी स्वीकारली पाहिजे, आणि त्यासाठी नव्या संस्था निर्माण केल्या पाहिजेत.

सहा : वेतन-भाव आवर्ताला आळा घालण्यासाठी शासनाने वेतनाच्या बाबतीत सबंध राष्ट्राला लागू पडेल असे धोरण अंगिकारण्याचे टाळले तरी मजुरांच्या बाजार पेठेतील मागणी अवाच्यासवा वर जाणे टाळले पाहिजे. करआकारणीबाबत आधिक कडक धोरणाचा अवलंब करून लाभांशात व भागांच्या मूल्यांत मर्यादित वाढच होईल अशी काळजी घेतली पाहिजे आणि आयात किंमतीत अचानक वाढ होऊन किंमत वाढीचा धोका निर्माण झाला तर अल्पकालीन तातडीचे उपाय म्हणून भाव नियंत्रण किंवा अनुदान या मार्गाचा अवलंब करण्याची तयारी ठेवली पाहिजे.

सात : सार्वजनिक मालकीच्या क्षेत्रांत सर्वात महत्त्वाचा अग्रक्रम जर कशाला द्यावा लागणार असेल तर तो म्हणजे लोखंड आणि पोलाद उद्योगांचे पुन्हा राष्ट्रीयीकरण करण्याला. त्यानंतर कोणकोणत्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण करावयाचे ते अर्थातच त्यावेळच्या परिस्थितीचा तपशीलवार अभ्यास करून ठरवावे लागेल औद्योगिक विमा, यांत्रिक अवजारे, रस्त्यावरील वाहतूक आणि भाड्याने दिलेली

घरे यांसारख्या उद्योगांकडे आणि सेवांकडे विशेष लक्ष पुरवावे लागेल. परंतु सरकारी एकाधिकारापेक्षाही स्पर्धेत टिकू शकतील अशा सरकारी कंपन्यांवर यापुढे अधिक भर द्यावा लागेल. त्याचप्रमाणे सरकारनेच एखादी कृती करण्याऐवजी सध्याचे राष्ट्रीयीकरणाखाली आलेले उद्योग, सहकारी आणि स्थानिक स्वराज्य संस्था यांसारख्या सार्वजनिक क्षेत्रांतील संघटनांनी जरूर ती कारवायी करावी हे चांगले. त्याचप्रमाणे विद्यमान उद्योग ताब्यात घेण्याऐवजी नवे उभारण्यावरच लक्ष अधिक केंद्रित केले पाहिजे. कोणत्याही परिस्थितीत यापुढे समाजवादाच्या यशस्वीतेच्या दृष्टीने निरनिराळ्या उद्योगांचे आणखी राष्ट्रीयीकरण करणे याला फारसे महत्त्व उरलेले नाही. कारण सामाजिक आणि आर्थिक संबंध निश्चित करणारा एक घटक या नात्याने राष्ट्रीयीकरणालापूर्वी जितके महत्त्व होते तितके आज उरलेले नाही. उलट ते कमी कमी होत आहे.

आणि शेवटचा मुद्दा म्हणजे तपशीलवार नियोजनाच्या बाबतीत यापुढे अकरणात्मक बाबींपेक्षा प्रत्यक्ष किंवा सकरणात्मक बाबींवर अधिक भर द्यावा लागेल. म्हणजे असे की, एखाद्या उद्योगातील दररोजच्या व्यवहारावर बंधने घालण्यासाठी प्रत्यक्ष नियंत्रणे बसविण्याऐवजी त्या उद्योगाचा विस्तार कसा होईल, मालाचे पडून राहिलेले साठे मोकळे कसे होतील किंवा कुचंबणा कशी थांबेल आणि महत्वपूर्ण ठरणाऱ्या भांडवल गुंतवणुकीला उत्तेजन कसे मिळेल याकडे अधिक लक्ष पुरवावे लागेल.

या पुस्तकात विस्ताराने न दिलेल्या परंतु डाव्या गटात आता विवाद्य न राहिलेल्या उत्पादन वाढीच्या आड येणाऱ्या व्यवहाराविरुद्ध कडक उपाय, तंत्रविज्ञानाच्या शिक्षणाला प्रोत्साहन, शास्त्रशुद्ध संशोधनासाठी जादा खर्चाची तरतूद इत्यादी अन्य धोरणांपेक्षा वर दिलेल्या या बाबी अगदी निराळ्या आहेत.

अर्थात आर्थिक विकासासाठी हाती घ्यावयाचा कार्यक्रमही तितकाच महत्वाचा असतो. तथापी समाजवादाच्या दृष्टीने यावरही तिसऱ्या आणि चवथ्या भागात दिग्दर्शित केलेल्या 'सामाजिक' दृष्टीकोणाचा वाढत्या प्रमाणात प्रभाव पडला पाहिजे आणि यापुढे आपल्याला मजूर सरकारच्या कामगिरीचे मूल्यमापन मुख्यतः त्याने आर्थिक क्षेत्रात बजावलेल्या कामगिरीवरून करून चालणार नाही. परंतु यासाठी डाव्या गटांतील अनेकांना आपल्या मनोवृत्तीत जरूर तो बदल घडवून आणावा लागेल. याचे कारण असे की, दारिद्र्य, मोठ्या प्रमाणावरील बेकारी, ओंगळ किंवा हिडीसपणा, अस्थिरता, इतकेच नव्हेतर सबंध व्यवस्थाच कोसळून पडण्याची शक्यता, यासारख्या भांडवलशाहीने निर्माण केलेल्या आर्थिक प्रश्नांनीच परंपरागत समाजवाद्यांची मने, निदान मार्क्सच्या वेळेपासून तरी एकाग्र झालेली आहेत. हे प्रश्न अत्यंत निकडीचे आणि तीव्र स्वरूपाचे असत. त्यामुळे इतर क्षेत्रांत समाजवादी मार्गांचा अवलंब होण्यापूर्वी प्रथम महत्वाचे आर्थिक बदल घडवून आणले पाहिजेत असे कोणी प्रतिपादन केले असेल तर ते त्यावेळी योग्यच होते.

परंतु आता हळूहळू ते योग्य ठरेनासे झाले आहे. भांडवलशाहीत इतकी सुधारणा घडून आली आहे की, आता तिचे पहिले स्वरूप ओळखता देखील येणार नाही. अधून मधून थोडीशी पीछेहाट होत असली किंवा आंतरराष्ट्रीय व्यापारातील समतोल ढळण्यासारखी अरिष्टे उद्‌भवत असली तरी सर्वांना रोजगार आणि निदान काही प्रमाणात तरी स्थैर्य प्राप्त झाले असून ते टिकून राहील असे दिसते. आणि स्वयंचलित यंत्रामुळे कमी उत्पादनाच्या उरल्या सुरल्या समस्याही हळूहळू सुटू शकतील अशी अपेक्षा करावयास हरकत नाही. पुढील काळाचा विचार करता आपल्या सध्याच्या विकासाच्या गतीने पुढील पन्नास वर्षात आपले राष्ट्रीय उत्पन्न तिपटीने वाढेल– म्हणजे राहणीमानात होणाऱ्या भरपूर वाढीला तर ते पुरेसे होईलच पण त्याशिवाय अविकसित भागांत भौतिक दृष्टया आवश्यक तेवढी भांडवल गुंतवणूक करण्यासही ते पुरे पडेल. म्हणून युद्धपूर्व काळात आर्थिक बाबीवरच जास्तीतजास्त भर देण्याची जी आवश्यकता वाटत होती तितकी ती यापुढे हळूहळू वाटेनाशी होईल. आणि आपल्या शक्ती आता आधिकाधिक प्रमाणात उपयुक्त आणि आदर्शवादी बाबींवर केंद्रित करता येतील व समाजवादाच्या जुन्या व अधिक मलभूत आकांक्षा पुऱ्या करून घेता येतील.

## २. जास्त प्रमाणावरील समाजकल्याण व समानता याविषयीच्या सूचनांचा गोषवारा

सामाजकल्याण आणि सामाजिक समता यांच्या संदर्भातच मुख्यतः या सूचनांचा या पुस्तकात उहापोह करण्यात आलेला आहे.

सामाजिक समतेच्या उद्दिष्टांसाठी शैक्षणिक सुधारणांना पहिला अग्रक्रम द्यावा लागतो. यानंतर अधिकारावर येण्याऱ्या मजूर सरकारला पब्लिक स्कूलमधून विद्यार्थ्यांना प्रवेश मिळवून देण्याच्या बाबतीत लोकशाहीचे तत्व लागू करण्यासाठी काय काय करावे लागेल त्याची सुस्पष्ट, निश्चित आणि दूरगामी जाणीव असली पाहिजे व ती ठेवून न कचरता त्या सरकारने आपले धोरण अमलात आणले पाहिजे. त्याच बरोबर एकत्रित शाळांचे तत्व मान्य करून त्याचा प्रसार केला पाहिजे आणि या बाबतीत वैयक्तिक आवडीनिवडीवर जेवढ्या प्रमाणात निर्बंध पडू शकतात तेवढ्या प्रमाणात आधुनिक माध्यमिक विभागातील गुणात्मक दर्जा सुधारण्यासाठी आणि निरनिराळ्या प्रकारच्या शाळांतील प्रतिष्ठेच्या बाबतीतील तफावत कमी करण्यासाठी राष्ट्रीय साधनसामुग्रीतील आधिकाधिक भाग स्वतः ठरवून दिला पाहिजे. समाजवाद म्हणजे 'वर्गविहीन समाज' असा अर्थ अभिप्रेत असेल तर याच आघाडीवर आपल्याला आता मुख्य हल्ला चढवावा लागेल.

दुसरे असे की, 'जाणवणाऱ्या' राहणीमानातील वाढता उपभोग आणि समानता यात दुवा असतो हे समाजवाद्यांनी निःसंदिग्धपणे मान्य केले पाहिजे.

आणि शिधावाटप, निर्बंध आणि साध्या राहणीतील सर्वांचा सहभाग यापेक्षा क्रयवस्तूंचा अधिक प्रमाणावर आणि विस्तृत क्षेत्रात फैलाव करणे हा सामाजिक समता प्रस्थापित करण्याचा अधिक चांगला मार्ग आहे यावर विश्वास ठेवून आपला कारभार चालविला पाहिजे. यामागे वैयक्तिक स्वार्थ साधण्याची वृत्ती असता कामा नये तर आजवर समाजातील विशेषाधिकार उपभोगणाऱ्या मूठभर लोकांची मिरासदारी होऊन बसलेल्या भौतिक सोयी सवलतींचा लाभ आता तरी निदान कामगार वर्गालाही घेता आला पाहिजे अशी दृष्टी त्याच्या मुळाशी असली पाहिजे.

तीन : मालमत्तेचे फेरवाटप घडवून आणण्यासाठी देणग्यांवर कर बसवणे अत्यावश्यक ठरते. त्याच्याच जोडीला 'वारसा' तत्त्वाचा अंतर्भाव करण्याचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून मृत्यू करात सुधारणा घडवून आणली पाहिजे आणि मोठ-मोठ्या स्थावर मिळकतीवरील करांचे प्रमाण आधिकाधिक कडक करीत गेले पाहिजे. त्याचप्रमाणे सरकारकडे भरावयाची रक्कम पैशाऐवजी वस्तूंच्या रूपात भरण्याचीही तरतूद करण्यात आली पाहिजे. कारण या निधीत जसजशी वाढ होत जाईल आणि सरकारी खजिन्याला जास्तीत जास्त उपयोग व्हावा ही दृष्टी ठेवून त्याचा विनियोग होऊ लागेल तसतशी समाजाच्या मालकीच्या एकूण मालमत्तेच्या प्रमाणातही वाढ होईल.

चार : उत्पन्न आणि भांडवली फायदे यांच्याबाबतीत दोन गोष्टी तातडीने करता येण्यासारख्या आहेत. लाभांशाच्या वितरणावर मर्यादा घालण्याच्या उद्दि-ष्टाने करावयाच्या उद्योगांवरील कर आकारणीपेक्षा निराळे असे हे दोन उपाय म्हणजे भांडवली फायद्यांवरील कर आणि धनिक वर्गाकडून होणाऱ्या कर चुकवे-पणाविरुद्ध कडक उपाय योजणे हे होत. या उलट स्वकष्टार्जित उत्पन्नावर सध्या असलेल्या अगदी काठावरील करांत फार मोठी वाढ होऊ देण्याचेही टाळले पाहिजे.

पाच : औद्योगिक धोरण : लोकशाही समाजवादाला अधिक अनुकूल असे वातावरण निर्माण करण्यासाठी सार्वजनिक आणि खाजगी उद्योगांत बदल घडवून आणण्याचे जे कार्य करावयाचे ते कायद्यापेक्षाही कामगार संघटनांच्या क्षेत्रांतच मोडते. अर्थात त्यासाठी सरकारी दडपणाची मदत होऊ शकते. हे बदल म्हणजे बिगर वेतनविषयक विशेषाधिकार आणि कामाचा मोबदला यांच्याबाबतीत कामगार आणि कर्मचारी यांच्यात सध्या असलेली तफावत निश्चितपणे कमी करणे, उत्पा-दनाच्या पातळीवर कामगारांशी अधिक प्रभावीपणे विचारविनिमय करण्याची आणि कामगारांचा प्रभाव पडेल अशी यंत्रणा निर्माण करणे आणि उच्च पातळीवरील 'औद्योगिक लोकशाही'च्या उद्दिष्टाला कामगार संघटनांची मान्यता मिळवणे हे होत. यासाठी कामगार संघटनेचे कार्यक्षेत्र केवळ सामुदायिक सौदा-पुरतेच मर्यादित न ठेवता त्याच्या कक्षा अधिक वाढवून त्या त्या उद्योगांशी संलग्न असलेल्या सर्व आर्थिक प्रश्नांचा त्यांत समावेश करणे आवश्यक ठरते.

औद्योगिक सत्तेचे आणखी महत्त्वपूर्ण हस्तांतर घडून येण्यात त्याची परिणती होईल.

समाजकल्याणासंबंधीच्या उद्दिष्टांबद्दल बोलावयाचे तर त्यासंबंधीचे अग्रक्रम ठरवून देण्याचा प्रयत्न मी केलेला नाही. कारण तो प्रांत मुख्यतः विशेषज्ञांचा असल्यामुळे, तेच या बाबतीतील अग्रक्रम ठरवू शकतात. सर्वसामान्यपणे याबाबतीतील महत्त्वाचा अग्रक्रम एकंदर सामाजिक खर्चाला द्यावा लागेल. म्हणजेच भांडवली खर्चावर सध्यापेक्षाही आधिक भर द्यावा लागेल. समाजकल्याणासाठीच बाजूस काढून ठेवलेल्या राष्ट्रीय साधनसंपत्तीच्या प्रमाणात वाढ करण्याचे बंधन मजूर सरकारने स्वतःवर घालून घेतले पाहिजे. या एकंदर अग्रक्रमांत म्हातारे, आजारी आणि मोठी कुटुंबे असलेले यांचा काही अंशी समावेश करावा लागेल तर काही अंशी सातव्या प्रकरणात दिलेल्या परंतु अलिकडे काही वर्षांपासून ज्याकडे अतिशय दुर्लक्ष होत आहे अशा काही 'खास बाबीं' चाही समावेश करावा लागेल. याशिवाय आणखी एक खास सूचनाही विशेष महत्त्वाची आहे– ती म्हणजे सध्याच्या व्यावसायिक योजनांत ज्यांचा समावेश होऊ शकत नाही अशा लोकांसाठी नवी राष्ट्रीय अतिवयस्कता योजना लागू करणे.

सामाजिक खर्च आणि सामाजिक समता यांच्यातील प्रत्यक्ष आणि घनिष्ट संबंधांवर मी विशेष भर दिलेला आहे. सामाजिक खर्चामुळे सामाजिक समता दोन प्रकारे सिद्ध होऊ शकते : एक–– आजारपण, म्हातारपण आणि कौटुंबिक जबाबदाऱ्या सर्वात जास्त असतात अशावेळी श्रीमंतांच्या मानाने गरीब कुटुंबांना ज्या अडचणी सहन कराव्या लागतात त्या दूर करणे आणि दोन–– आरोग्य, शिक्षण आणि निवासस्थान इत्यादी सोयी खाजगीरित्या जितक्या प्रमाणात आणि ज्या दर्जाच्या उपलब्ध करून देणे शक्य आहे तितक्या त्या सार्वजनिक क्षेत्रात उपलब्ध करून देणे.

समाजकल्याणचे संपूर्ण क्षेत्र असे आहे की ज्यात कायदे आणि प्रशासन या दोहोंनाही वाव असतो. मजूर सरकारातील या खात्याच्या मंत्र्यांना समाजवादाच्या मूलभूत उद्दिष्टांना चालना देण्याच्या दृष्टीने त्यांच्या इतर सहकाऱ्यांइतकी कामगिरी बजावता येईल– अर्थात सबंध पक्षाची तशी इच्छा असेल तर.

## ३. डावे व उजवे यातील विवाद म्हणजे समाजवादी व भांडवलशाहीवादी यांतील विवाद नव्हे

हळू हळू ही उद्दिष्टे जसजशी सफल होत जातील आणि जुन्या सामाजिक तक्रारी आणि अन्याय कमी कमी होत जाऊन सजाज आधिकाधिक सामाजवादी– लोकशाही बनत जाईल (आणि स्वयंचलित यंत्रांमुळे तर कदाचित तीस किंवहुना वीस तासांच्या आठवड्यापर्यंत आपली मजल जाईल) त्यावेळी व्यक्तिगत स्वातंत्र्य सौख्य आणि फुरसदीचा सदुपयोग, सौंदर्य, आनंद आणि उल्हास यासारख्या सांस्कृतिक

हालचाली किंबहुना व्यक्तीच्या सर्वस्वी खाजगी किंवा कौटुंबिक आयुष्यांतील इतरही सर्व व्यवहार– मग ते उच्च प्रकारचे असोत, हीन प्रकारचे असोत, किंवा विक्षिप्तपणाचे असोत याकडे आधिकाधिक लक्ष पुरविणे आपल्याला शक्य होईल.

अखेर डाव्या विचारसरणीचा अंगीकार करून सुधारणांचा पुरस्कार करण्याची एक नव्हे तर दोन समर्थ कारणे दाखवता येतील. त्यापैकी पहिले कारण म्हणजे समाजवाद हितकारी असल्याबद्दलची खात्री. परंतु सुधारणांचा आदर्शवादी पुरस्कर्ता समाजात असे अनेक बदल घडवून आणू इच्छित असतो की, ज्यांचा समाजवादाच्या विश्वसनीय व्याख्यांमध्ये अंतर्भाव करता येत नाही. त्याचप्रमाणे अशा सुधारणांचा पुरस्कार करणारे बहुतेक जण डाव्या गटात असतात, तर त्याला विरोध करणारे बहुधा उजव्या गटात असतात हे अनुभवाने माहीत झाले असल्यामुळे काही जण स्वतःला डावे आणि मजूर सरकारचे पाठिराखे म्हणवून घेऊ लागतात.

सार्वजनिक हिताचा प्रत्येक महत्वाचा प्रश्न समाजवादी विरूद्ध भांडवलशाहीवादी यांच्यातील संघर्ष किंवा या ना त्या स्वरूपातील समाजवाद यांत बसवून दाखविण्याचा प्रयत्न होऊ लागला तर त्याचे कुणालाही आश्चर्य वाटेल. मी पाचव्या प्रकरणात दाखवून दिल्याप्रमाणे समाजवादी आकांक्षाची मांडणी प्रथम करण्यात आली त्याला शंभरावर वर्षांचा काळ उलटून गेला आहे. त्यापैकी काही बाबी आजही तितक्याच निकडीच्या राहिलेल्या असून त्यांचाच या पुस्तकात मुख्यतः उहापोह करण्यात आलेला आहे. परंतु त्यांपैकी इतर काही आकांक्षा फलद्रूप झालेल्या असल्यामुळे आता त्या गैरलागू ठरतात. अर्थात त्यावेळी नजरेच्या टप्प्यात न आलेल्या परंतु जुन्या तक्रारी व दुःखे यावर मात केल्यामुळे ज्या आधिकाधिक महत्वपूर्ण बनू पहात आहेत अशा नव्या नव्या आकांक्षा निर्माण होऊ लागल्या आहेत आणि समाजकल्याण, स्वातंत्र्य आणि सामाजिक न्याय यांच्या दृष्टीने जरी त्या पूर्वीच्या समाजवादी किंवा भांडवलशाहीवादी चौकटीत समाविष्ट करता येण्यासारख्या नसल्या तरीही त्या अत्यंत महत्वपूर्ण ठरू शकतील.

अमेरिका किंवा सोव्हियट रशिया यांच्या उदाहरणावरून वरील विधानांचा पडताळा येऊ शकेल. अमेरिकेतील डाव्या विचारसरणीचा माणूस म्हणजेच ब्रिटन मधला समाजवादी, सामाजिक समता अधिक प्रमाणात प्रस्थापित व्हावी किंवा भौतिक सुखसोयीत वाढ व्हावी म्हणून फारसा आटापीटा करणार नाही. कारण तेथील समाजात त्या गोष्टींची आधीच सुबत्ता आहे. परंतु त्याऐवजी समाजवादी व भांडवलशाही यांच्यातील परस्पर विरोधाच्या क्षेत्रात न मोडणाऱ्या परंतु तरीही डाव्या–उजव्या गटातील वादाचा विषय बनलेल्या नागरिक हक्क, निग्रोंची समस्या परराष्ट्रीय धोरण, गुन्हेगारी, सामुदायिक समाजपद्धतीतील (Mass society) समाजशास्त्रीय समस्या, यांसारख्या बाबींकडे अधिक लक्ष पुरवील. त्याचप्रमाणे

रशियातील डाव्या विचारसरणीचा नागरीक, जो इंग्लडमध्ये अगदी जुन्या पठडी-तील समाजवादी म्हणून ओळखला जाईल, राष्ट्रीयीकरण आणि नियोजन यांची एकदा परिसीमा गाठली गेल्यानंतर तातडीचे असे काही प्रश्न उरतच नाहीत असे सहसा मानणार नाही. उलट व्यक्तिगत स्वातंत्र्य आणि मतभेद व्यक्त करण्याचा अधिकार यांसारखी मूल्ये प्रसृत करण्यात त्याला विशेष रस वाटेल. परंतु इंग्लंड-मध्ये ही बाब समाजवादी किंवा भांडवलशाहीवादी यांच्यातील वादाचा विषय राहिलेली नाही.

म्हणून वर दिलेली समाजवादी उद्दिष्टे जसजशी साध्य होत जातील, तसतसा सुधारणा घडवून आणू इच्छिणारा समाजवादी आपल्या सर्व शक्ती समाजवादी आणि बिगर समाजवादी अशा खास वर्गीकरणात न बसणाऱ्या बाबींवरच केन्द्रित करील. या बाबी या दोन क्षेत्रांपेक्षा अगदी निराळ्याच क्षेत्रातील असतील. ताबडतोब काहीतरी सामाजिक प्रयत्न व्हावयास हवेत अशा या प्रकारात मोडणाऱ्या खालील दोन बाबींचा उल्लेख करता येईल: व्यक्तीगत जीवन आणि फुरसदीचा वेळ मनाप्रमाणे घालविण्याचे स्वातंत्र्य आणि सांस्कृतिक मूल्यांसंबंधीची सामाजिक जबाबदारी.

## ४ खाजगी जीवनातील स्वातंत्र्य आणि आनंद; फेबियन परंपरेविरुद्ध प्रतिक्रियेची आवश्यकता

समाजाचे काही निर्णय लोकांच्या खाजगी जीवनावर त्याचप्रमाणे त्यांच्या सामाजिक आणि आर्थिक स्वार्थावर फार मोठा आघात करतात. आणि माझ्यामते सध्या तो आघात निर्बंधात्मक आणि कर्मठ स्वरूपात होत असतो. व्यक्तिगत स्वातं-त्र्यावर सध्या जे निर्बंध आहेत ते कमी करण्यासाठी आणि जीवनाचा उपभोग घेण्याची आणि मनोविनोदाची जास्तीत जास्त संधी उपलब्ध करून देण्यासाठी काही तरी प्रयत्न केले जावेत असे मला वाटते.

अर्थात अशी व्यापक संधी मिळविण्यासाठी सरकारी कायद्यांपेक्षाही सांस्कृतिक दृष्टीकोणांत बदल घडून येणे आवश्यक आहे हे खरे. असा बदल घडून येऊ शकला तर ब्रिटन हे अधिक सुसंस्कृत आणि आकर्षक राष्ट्र बनविण्याच्या दृष्टीने बरेच काही करता येण्यासारखे आहे. केवळ निर्यातीत किंवा निवृत्तीवेतनात वाढ करून भागणार नाही तर खुली उपहार गृहे, रात्रीच्यावेळी अधिक लखलखीत उजेड आणि आनंदी वातावरण असलेले रस्ते, सार्वजनिक गृहे अधिक वेळपर्यंत उघडी ठेवण्याची मुभा, स्थानिक कलावंतांना वाव देणारी मुबलक नाटयगृहे, चांगले आदरातिथ्य करणारी उच्च दर्जाची आणखी उपहार गृहे आणि निवासस्थाने, अधिक स्वच्छ आणि प्रसन्न खानावळी, व्यापक प्रमाणावर नदी तीरावरील चहापान गृहे, बॅटर्सिआच्या धर्तीवरील सुखोद्याने, सार्वजनिक ठिकाणी अधिकाधिक कलावस्तू, फर्निचर, चिनी मातीच्या वस्तू, आणि स्त्रियांचे पोषाख यांचे नवेनवे चांगले प्रकार, घरांच्या नव्या वसाहतीत

निरनिराळे पुतळे, रस्त्यावरील दिव्याच्या पद्धतीत सुधारणा, जास्त प्रमाणावरील सार्वजनिक दूरध्वनींची सोय अशा कितीतरी गोष्टी उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न करावा लागेल. या सर्व गोष्टींना अनेकदा अगदी अनपेक्षितपणे विरोध होईल. या म्हणजे काहीतरी सैतानी गोष्टी आहेत आणि नव्या जेरुसलेमकडे जाणारे रस्ते अड-वून बसले आहेत अशातला काही भाग असून मुख्यतः आरोग्यसंपन्न सन्माननीय व सद्भाव मूलक गोष्टी त्याचप्रमाणे सौंदर्य व आनंद याची दृष्टी नसलेले लोक यांच्या रूपाने देखील तो विरोध होऊ शकेल.

व्यक्तीच्या खाजगी जीवनावर आणि स्वातंत्र्यावर समाजाने लादलेल्या निर्बंधांमुळे निर्माण होणाऱ्या गंभीर समस्येचा विचार करता या विरोधाची उत्कटतेने प्रचीती येऊ लागते. घटस्फोट, परवाना (लायसेन्स) किंवा गर्भपातासंबं-धीचे इतिहासपूर्व काळातील (आणि कमालीचे अन्यायी) कायदे, आता कालबाह्य ठरलेली लैंगिक विकृती करता दिली जाणारी शिक्षा, पुस्तके किंवा नाटके यांची अडाणीपणाची पूर्व तपासणी आणि स्त्रियांच्या समान हक्कांवरील उरलेले निर्बंध अशा गोष्टी चटकन नजरेसमोर येतात. यापैकी बहुतेक गोष्टी असह्य वाटण्या-सारख्या असून– आणि समाजवाद्यांना तर त्या अपमानास्पदच वाटल्या पाहिजेत कारण त्यांच्या नसांतून अराजकवादी आणि स्वातंत्र्यवादी रक्त थोडे फार तरी खेळत असते; ते काही अगदीच शेंदाड शिपाई नसतात– 'मानवी प्रतिष्ठेला' आपण खरोखरीच महत्त्व देत असू तर आपल्याला याची जाणीव असावयास हवी की घटस्फोटाच्या दांभिक कायद्यासारख्याच या बाबीही अपमानास्पद आहेत. मॅथ्यू अरनॉल्डने एकेठिकाणी असे म्हटले आहे की, अशा कायद्यामुळे घटस्फोट मिळणे धड अशक्यही होऊन बसत नाही आणि धड तो प्रतिष्ठितपणे घेताही येत नाही. कारखान्यांतून संयुक्त उत्पादन समित्या स्थापन करण्यास नकार देण्यापैकीच हा प्रकार आहे. भौतिक दर्जा वाढता वाढता एक काळ असा येईल की, त्यावेळी खाद्य-पदार्थावरील अनुदानातील वाढीपेक्षाही घटस्फोटाच्या कायद्यांतील सुधारणांमुळे एकूण मानवी कल्याणात अधिक भर पडेल (अर्थात पक्षाचे शास्त्रे याबाबत इतके उत्साही असणार नाहीत). मानवी सौख्य आणि अन्यायाचे उच्चाटन याचीच-सारखी जपमाळ ओढीत बसावयाचे, परंतु नंतर कार्यक्रमाची प्रत्यक्ष आखणी करताना मात्र आरडा ओरड करणाऱ्या काही गटांकडून येणाऱ्या दडपणाला भिऊन राष्ट्रीय कार्यकारिणीला मठांतील भिक्षूंच्या पेक्षादेखील अधिक सनातनी वृत्ती धारण करण्यास परवानगी द्यावयाची असे समाजवाद्यांना करून चालणार नाही.

निदान एका तरी प्रमुख समाजवादी विचारधारेला याबाबतीत बरेचसे श्रेय दिले पाहिजे. विल्यम मॉरिस हे या विचारसरणीचे प्रवर्तक होते. फेबियन आणि नॉन कन्फॉर्मिस्ट म्हणजे प्रस्थापिताला न मानणारे इतर समाजवादी विचारवंत यांचा दृष्टीकोण मात्र अधिक कठोर व निग्रही होता. मी स्वतः फेबियन विचारसरणीत

वाढल्यामुळे ती विचारसरणी मला वेब परंपरेच्या प्रतिक्रियेसारखी वाटते. परंतु मी जे लिहिले आहे त्याने गैरसमज होऊ नयेत म्हणून मला हे सांगितले पाहिजे की, ज्यांचा ज्यांचा वेब पतिपत्नींशी परिचय झाला असेल त्यांना त्यांना व्यक्तिशः ते अतिशय दयाळू, सभ्य, सहिष्णु आणि विनोदप्रिय असल्याचा अनुभव आलेला आहे आणि ज्यांनी त्यांचे 'आमचे सहजीवन' (Our Partnership) हे पुस्तक वाचले असेल त्यांना त्यांचे परस्परांवरील निरतिशय प्रेम बघून कमालीचा आनंद झाल्यावाचून राहिला नसेल. परंतु सार्वजनिक क्षेत्रांतील त्याचे अनेक गुण, त्यावेळी ते आवश्यक असले तरी, आज तितके योग्य ठरतीलच असे नाही. वेब यांची मते ही डाव्या गटाच्या अव्यवहार्य, स्वप्नदर्शी, भावनात्मक, अद्भूत आणि जवळ जवळ अराजकवादी परंपरांवरील प्रतिक्रिया असल्यामुळे भरपूर परिश्रम, स्वतःला लावून घेतलेली शिस्त, कार्यक्षमता, संशोधन आणि मनोनिग्रह यांसारख्या सज्जड गुणांवर ते भर देत असतात ते निःसंशय योग्यच होते. सार्वजनिक कर्तव्यासाठी स्वतः खाजगी सुखाचा त्याग करणे आणि इतरांकडूनही तशीच अपेक्षा करणे, संस्कृतीपेक्षा सरकारी प्रकाशनावर अधिक भर देणे आणि इतर कोणत्याही गुणांपेक्षा शारीरिक दौर्बल्य टाळण्याला जास्त महत्व देणे या गोष्टी वेब पतिपत्नींना जिव्हाळ्याच्या वाटत व ते योग्यच होते.

सहाजिकच त्यांनी आपला मधुचंद्राच्या काळ डब्लिममधील व्यावसायिक संस्थांची (ट्रेड सोसायटी) पहाणी करण्यात घालवला. आणि त्यामुळेच बिॲट्रिस वेबने असे लिहिले आहे की, 'संशोधन, नगरपालिकेचा कारभार आणि फेबियन विचारसरणीचा प्रसार यावरच आम्ही आमचे सारे लक्ष केंद्रित केले असल्यामुळे संगीत आणि नाटच यात रस घ्यावयाला, अभिजात वाङ्‌यात डोके खुपसून बसावयाला, निरनिराळी कलाप्रदर्शने पहात हिंडायला किंवा वास्तुशिल्पांतील अद्भूततेचा आस्वाद घ्यावयाला आम्हाला वेळही नसे आणि तितका उत्साहही नसे. शिवाय त्यासाठी लागणारी साधनेही आमच्यापाशी नसत.' त्यामुळेच सो. युनियनमधील कामगारांचे नियंत्रण रद्द होईपर्यंत सिडनेने त्या प्रयोगाबद्दलची आपली पसंती व्यक्त करणे लांबणीवर टाकले आणि बिॲट्रिसनेदेखील गर्भपातविरोधी कायदा असे तोपर्यंत सो. युनियनची प्रशस्ती करण्याचे नाकारले. कॉमसोमोल या युवकांच्या संघटनेत दिसून येणारी स्वतःहून शिस्त लावून घेण्याची आणि आत्मोद्धाराची तळमळ, तसेच स्वतःच्या मनावरील ताबा आणि व्यक्तिगत आरोग्यपालन याविषयीची त्यांची आस्था, याबद्दलही तिने खूप लिहिले आहे. ती एकेठिकाणी म्हणते, 'करमणूक आणि विश्रांती यासाठी बांधलेल्या उद्यानांत कोठेही लैंगिक अनाचार आढळत नाही.' आणि ऐतिहासिक दृष्टीने पाहता साध्या राहणीवर जो एवढा भर दिला गेला तो नव्याने सुरू झालेल्या वाढत्या विरोधी आंदोलनाच्या दृष्टीने अत्यावश्यक असाच होता.

परंतु आता मात्र आपल्याला निश्चितच निराळ्या स्वरूपाच्या मूल्यांची जरूर आहे. समाजवादी विचारांची पाळमुळे आता बरीच खोलवर रुजली आहेत. आज आपली सर्वांची अवस्था होऊ घातलेले नोकरशहा आणि व्यवहारी प्रशासक असल्यासारखी झाली आहे. जणू काही आपणा सर्वांना एल्. एस्. ई. त प्रशिक्षण मिळाले आहे, सरकारी अहवाल आणि श्वेत पत्रिका यांची आपल्याला चांगली माहिती आहे आणि व्हाईट हॉलशीही आपण परिचित झालो आहोत. अद्भूत किंवा स्वप्नदर्शी समजुतींपासून आपण सावध राहिले पाहिजे याची आपल्याला जाणीव आहे. सतत परिश्रम आणि संशोधन हे मोठे सद्गुण असून मूर्खपणाने किंवा भावनेच्या भरात आपण काहीही करून बसता कामा नये आणि फेबियन वाङमयाचा कसोशीने अभ्यास केला पाहिजे हेही आपल्याला माहीत आहे. या सर्व गोष्टी आपल्याला चांगल्या माहीत आहेत. वेब पतिपत्नींनी आपल्या मरणोत्तर लढाई जिंकली असून एका सबंध पिढीला त्यांनी आपली मूल्ये स्वीकारावयास भाग पाडले आहे. आता त्याची प्रतिक्रिया घडून येण्याची वेळ येऊन ठेपली आहे. खाजगी जीवन, स्वातंत्र्य आणि मतभेद व्यक्त करण्याचा अधिकार, संस्कृती, सौंदर्य, मोकळा वेळ इतकेच नव्हे तर छछोरपणे वागण्याची मुभा यावरील भर या स्वरूपातील ती प्रतिक्रिया असणार. आता कागदपत्रे लावण्याची उत्तम पद्धती आणि संपूर्ण आत्मसंयमन ही समाजवादातील काल्पनिक सुराज्याची ठळक वैशिष्टये राहिलेली नाहीत. आणि तशी ती आहेत असे मानले तरी आपल्यापैकी काहीजण तरी त्याबाबत बाजूला पडतील.

## ५. सांस्कृतिक आणि रंजक नियोजन आणि आर्थिक समस्यांचे घटत जाणारे महत्त्व

सांस्कृतिक मूल्यांच्या बाबतीत जर मुख्यतः कशाची अत्यंत तीव्रतेने गरज असेल तर ती सरकारच्या खंबीर नियोजनाची– ब्रिटनमध्ये जे काही उरले सुरले सौंदर्य अद्याप टिकून राहिलेले असेल त्याचे जतन करणे आणि त्यात थोडी फार भर टाकणे यासाठी अशा नियोजनाची आवश्यकता आहे. वैयक्तिक खर्चात प्रति-वर्षी २ ते ४ टक्के वाढ होत असताना आणि येत्या वीस वर्षांत तर तो खर्च दुप्पट होण्याची शक्यता असल्याने आणखी दहा बारा वर्षांनी एखाद्या वस्तूचे कमी जास्त उत्पादन करण्याची योजना आखली किंवा वस्तूंच्या किंमती नेमक्या किती ठरवून दिल्या हा प्रश्न फारसा महत्वाचा ठरत नाही. थोड्याच दिवसात भौतिक कल्या-णाची पातळी इतकी वाढलेली असेल की, साधन सामुग्रीच्या वाटपात काही किर-कोळ बदल करण्यात आला तरी त्यामुळे कोणाच्या सुखी समाधानी जीवनाला जवळपास कसलीच झळ पोहोचणार नाही. आर्थिक नियोजनाचा हिरीरीने पुर-स्कार करणारे आणि त्याला विरोध करणारे यांना हवे तर या प्रश्नावर भांडून

काय तो सोक्षमोक्ष लावू द्या. उरलेले आपण लोक मात्र त्याबाबत अधिकाधिक उदासीन बनत जाणार.

तथापी शहरे आणि ग्रामीण भाग तसेच वास्तुविषयक नियोजनाबद्दलची आपली उदासिनता हळू हळू कमी होत जाईल, निदान आपण तशी आशा करू या. खिन्नपणाचा लवलेशही येऊ न देता यासंबंधीचे विवेचन करणे कठीण आहे. जास्तीत जास्त नफा करण्याची प्रवृत्ती आणि बाजारपेठांतील उलथापालथी सौंदर्याचे रक्षण करण्याच्या दृष्टीने सर्वस्वी प्रतिकूल ठरतात हे केव्हाच स्पष्ट झालेले आहे– १९३० च्या दशकांतील रस्त्याच्या दुतर्फा घरे बांधण्याची पद्धत (ribbon building), किंमती वाढतील या कल्पनेने बांधलेले घरांचे समूह, लंडनमधील जॉर्ज कालीन चौकांचा हळू हळू होत चाललेला विनाश, यामुळे वरील गोष्टींची आपल्याला पुरती जाणीव झालेली आहे. आणि याबाबतीतील आपल्या जुन्या स्मृतींना उजाळा द्यावयाचा असेल तर नव्याने बांधल्या जाणाऱ्या शिल्प–सौंदर्याशी कसलाही संबंध नसलेल्या केवळ व्यापारी इमारतींकडे नजर टाकावी. या प्रचंड इमारतीपुढे शहरांतील प्रार्थनामंदिर ठेंगू वाटू लागली आहेत, आणि लवकरच अशा एखाद्या इमारतीपुढे सेंट पॉलचे चर्चदेखील थिटे दिसू लागेल. त्याचप्रमाणे दरवर्षी लक्षावधी पौंडाचा नफा मिळविणाऱ्या इंग्लिश इलेक्ट्रिक कंपनीने आपल्या मुख्य कचेरीकरता स्पर्धेत अतिशय नावाजला गेलेला नमूना नाकारून एका अगदी सामान्य परंतु व्यापारी दृष्टीने अधिक सोयिस्कर ठरणाऱ्या नमुन्याची निवड केली असल्याचे छापून आले होते ते वाचले तरी याचा पडताळा येऊ शकेल.

सार्वजनिक क्षेत्रांतील नियोजनाबद्दल युद्धोत्तर काळांत ज्या आशा निर्माण झाल्या होत्या त्या हळू हळू अस्तंगत होऊ लागल्या आहेत हे पाहून विषाद वाटू लागतो. याबाबतीत युद्धोत्तर युग हे नव्या शूर जगाचे प्रवर्तक ठरेल असे वाटले होते. अत्यंत कल्पक आणि लखलखीत अशा शहर रचनेच्या योजनांच्याद्वारा देशांतील मोठमोठ्या शहराची पुनर्रचना व्हावयाची होती. नव्या शहरांच्या उभारणीमुळे लंडनसारख्या शहरांच्या विस्ताराला आळा बसणार होता. आणि गेल्या कित्येक वर्षांत झाले नसतील अशा महान सामाजिक आणि स्थापत्य विषयक प्रयोगांना त्यामुळे चालना मिळणार होती. राष्ट्रीय उद्याने, जमिनीच्या स्वरूपांतील निधी (लँड फंड), आणि निरनिराळ्या क्षेत्रांतील कलामंडळे हे सौंदर्य आणि संस्कृती याकडे नव्याने लक्ष वेधले जात असल्याचेच द्योतक होते. आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे 'टाऊन अँड कंट्री प्लॅनिंग' कायद्यामुळे गतकाळातील अडाणीपणा आणि दुष्टता यापासून हमखास संरक्षण मिळण्याचे साधन प्राप्त झाले होते.

सार्वजनिक क्षेत्रांतील नियोजनाने वस्तुतः बरीच मोठी कामगिरी बजावलेली आहे. शहरांसंबंधीचे प्रयत्न हे खूप धाडसी आणि उपयुक्त ठरलेले आहेत. युद्धोत्तर

काळातील गृहनिर्माण वसाहती या पहिल्यापेक्षा स्थापत्य शास्त्राच्या दृष्टीने पुष्कळच वरच्या दर्जाच्या आहेत. (अर्थात हा दर्जा फार वरचा आहे असे नाही.) बाँब वर्षा-वात उध्वस्त झालेली शहरे नुसतीच कशी तरी वेडीवाकडी वाढलेली नाहीत तर त्यामागे विशिष्ट रचनेची आणि प्रशस्ततेची निश्चित अशी दृष्टी आहे. राष्ट्रीय उद्याने हा आता नुसताच सिद्धांत राहिलेला नाही तर हळू हळू ती प्रत्यक्ष साकार होवू लागली आहेत (अर्थात अतिशयच हळू हळू). 'टाऊन अँड कंट्री प्लॅनिंग' कायद्यामुळे जुन्या काळांतील काही दुष्ट प्रकारांना आता आळा बसला आहे. विशेषत: किल्डर याने दाखवून दिल्याप्रमाणे 'फॉरेस्ट्री कमिशन' या सार्वजनिक क्षेत्रातील उद्योगामुळे ब्रिटिश जीवनांत नवी आणि कल्पक भर पडली आहे. त्यामुळे केवळ इंग्लडच्या रम्य वनश्रींतच केवळ नव्हे तर वनग्रामांच्या रचनेतही अशीच भर पडली आहे. ब्रिटनच्या उत्सवाने (Festival of Britain) हेही दाखवून दिले आहे की, कलांना प्रत्यक्ष आश्रय देण्याच्या बाबतीतही सरकार मागे राहिलेले नाही.

परंतु या दिशेने जी प्रगती घडून येत आहे ती अतिशय मंदगतीने होत आहे. आणि त्यामुळे घडून येणारे परिणामही अर्धवट स्वरूपाचेच आहेत. आता सबंध आंदोलनातील जोमही ओसरू लागलेला असून एक प्रकारची मध्ययुगीन औदासिन्य-पूर्ण भ्रमनिरासाची वृत्ती मूळ धरू लागली आहे. कोल्सहिल ( Coles hill ) वाचवता येणे शक्य आहे असे सर्व तज्ञ सांगत असतानाही हुजूर मंत्रिमंडळातील संबंधित ( बांधकाम खात्याच्या ) मंत्र्याला ती वाचविण्याची तसदी घ्यावीशी वाटली नाही. हाय पॅडिंग्टन योजना ही फार खर्चाची म्हणून रद्द ठरविण्यात आली. १९५१ पासून नगरपालिकेच्या घरांची रचना पार बिघडू लागली असून रहि-वाशांच्या दृष्टीने ती अत्यंत अपुरी पडू लागली आहे. सरकारने स्वत:च कॉल-कटच्या इंपीरियल इन्स्टिटयूटचा घुमट जवळजवळ नेस्तनाबूद करून टाकला. लंडन शहराला अगदी दुय्यम दर्जाचे सामान्य स्वरूप येऊ नये म्हणून चाललेली धडपड जवळजवळ अयशस्वी ठरली आहे. मर्यादित स्वरूपाचा न्यू बार्बिकन प्रकल्पदेखील त्या शहराच्या पालिकेकडून पुन्हा पुन्हा फेटाळण्यात येतो. नव्या शहरांना पैशाअभावी समाज मंदिराच्या बांधणीत काटछूट करण्यास भाग पाडण्यात येत आहे. सामाजिक आणि आर्थिक बाबतीत पुरोगामी दृष्टिकोणाशी जणू फारकत घेतलेल्या बोर्ड ऑफ ट्रेडने परवान्यावरील निर्बंध सैल करून लंडन आणि बर्मिंगहॅम या शहरांतून उद्योगधंद्यांना स्वत:चा विस्तार करण्याची परवानगी देण्यास पुन्हा एकदा सुरुवात केली आहे. त्यामुळे युद्धोत्तर बाळगलेल्या आशांचा चक्काचूर करून या शहरांचा पुन्हा ग्रामीण भागात हवा तसा विस्तार होणे अपरिहार्य करून ठेवले आहे. या क्षेत्रातील इतर सर्व समस्यांच्या मुळाशी असलेल्या समस्येची ही केवळ एक झलक आहे. ग्रामीण भागावर एकसारखे होत असलेले अतिक्रमण आणि शहर व ग्रामीण

विभाग यातील हळूहळू नष्ट होत चाललेला फरक हे त्या समस्येचे खरे स्वरूप आहे.

वास्तुशास्त्र किंवा नागरी आणि ग्रामीण नियोजन हा या पुस्तकाचा विषय नाही, किंवा त्यासंबंधीच्या तपशीलात जाण्याइतका मी त्या विषयांचा तज्ञही नाही. परंतु तपशीलाची खरे म्हणजे तशी जरूरही नाही. कारण ज्या शत्रूवर मात करावयाची तो शत्रू म्हणजे विशिष्ट मनोवृत्ती आहे. एकदा त्या मनोवृत्तीवर काबू मिळविला म्हणजे तपशीलवार धोरण सहजच आखता येईल. आपले शत्रू जर कोणते असतील तर ते म्हणजे एक कंजूषपणा, दोन उदासीनता आणि तीन अराजकाला शोभणारा कमालीचा स्वार्थीपणा. अशा कामासाठी लागणारा एकूण खर्च ग्राहकांच्या उपभोगावरील खर्चाच्या, इतकेच नव्हे तर अंदाजपत्रकातील एकूण खर्चाच्या मानाने अगदीच नगण्य असतो याची जाणीव ठेवली तर कंजूषपणाला फाटा देता येईल. ३००० दशलक्ष पौंडाच्या वर असलेल्या अंदाजपत्रकात व दरवर्षी उत्पादनात ३०० दशलक्ष पौंडाची वाढ होणार असताना सांस्कृतिक बाबींवर मात्र त्यापैकी अवघे ३० दशलक्ष पौंड पुढील १० वर्षात मिळून खर्च होणार आहेत. 'सांस्कृतिक' बाबीवर होणाऱ्या या खर्चामुळे परिस्थितीला क्रांतिकारक कलाटणी मिळणार आहे हे अक्षरशः खरे आहे. बीव्हरब्रुक गटाची वृत्तपत्रे काहीही म्हणत असली तरी त्यासाठी खरी गरज कशाची असेल तर या वृत्तपत्रांच्या विरोधाला तोंड देऊन जरासा– म्हणजे खरोखरीच अत्यल्प खंबीरपणा दाखविण्याची.

या प्रश्नाचे महत्त्व पटलेल्या अल्पसंख्य गटाने उग्र स्वरूप धारण केले की, उदासीनता पार झटकून टाकता येईल– अर्थात शक्यता अशीही आहे की, प्रश्नाचे स्वरूप समजावून दिले आणि त्याबाबतची जनतेची मते अजमावून पाहिली तर शेवटी तो गट अल्पसंख्य मुळी राहणारच नाही. खंबीर नेतृत्व लाभले तर या क्षेत्रात भरीव कामगिरी करून दाखवता येण्यासारखी आहे. नोकरशाहीच्या विरुद्ध केल्या जाणाऱ्या तक्रारी किंवा सक्तीची खरेदी, अपुरी नुकसानभरपाई याविषयीच्या कुरकुरीच्या मुळाशी खरे म्हणजे स्वार्थीपणाच दडलेला असतो. फक्त अशा तक्रारींचे सोज्वळ रूप घेऊन तो वावरत असतो इतकेच. आणि क्षुद्र स्वार्थी बुद्धीने मांडलेल्या या तक्रारींनाच पार्लमेंटमध्ये आणि वृत्तपत्रातून वाचा फोडली जाते. कितीही युक्तिवाद किंवा चर्चा केली तरी हा स्वार्थीपणा समूळ नष्ट करता येणार नाही. या बाबतीतील साधी परंतु ठळक अशी लक्ष्मणरेषा म्हणजे तत्त्व आणि प्रकृतीस्वभाव यांतील अंतर ही होय. मूल्यांसंबंधी संघर्ष उद्भवतो त्यावेळी तो तोंडदेखल्या तडजोडीने सोडवता येत नाही. त्यासाठी लढ्याचाच पवित्रा घ्यावा लागतो.

संस्कृतीसंबंधीचा हा आग्रह किंवा मागच्या विभागात वैयक्तिक स्वातंत्र्यावर देण्यात आलेला भर येवढ्यामुळे केवळ एखाद्याला समाजवादी असे बिरुद लावून घेता येणार नाही. परंतु हुजूर पक्षापेक्षा मजूर पक्षाला पाठिंबा देणे मात्र तेवढ्यामुळे निश्चितच समर्थनीय ठरेल. सांस्कृतिक किंवा स्वातंत्र्यविषयक समस्यांबाबत

समाजवादी अगदी निष्कलंक आहेत असे नाही– वस्तुस्थिती त्यापेक्षा अगदी निराळी आहे. परंतु हुजूरपक्षीयांपेक्षा त्याबाबतीत ते पुष्कळ बरे आहेत इतकेच. फेस्टिव्हल ऑफ ब्रिटन, शहरी आणि ग्रामीण नियोजन, घटस्फोटाच्या कायद्यातील सुधारणा, पुस्तके किंवा नाटके यांची पूर्वतपासणी, फाशी देण्याची प्रथा बंद करणे, आणि आर्ट कौन्सिल, यासारख्या प्रश्नांवर सतत पुरोगामी भूमिका घेणारांत पार्लमेंट-मधील टोरी पक्षाच्या सभासदांपेक्षा मजूर पक्षाच्या सभासदांचे प्रमाण कितीतरी जास्त असते. इतिहासप्रसिद्ध खाजगी इमारतींचे जतन करण्याच्या बाबतीत समाजवाद्यांनी प्रत्यक्षात अधिक रस घेतलेला आहे. युद्धोत्तर काळातील मजूर-पक्षीय मंत्र्यांनी डाल्टन यांच्या मार्गदर्शनाखाली 'लँड फंड' सुरू करण्याच्या बाब-तीत पुढाकार घेतलेला आहे आणि विद्यापीठांच्या बाबत कमालीचे औदार्य दाखविले आहे. त्यामुळे मजूर पक्षाची मन:स्थिती किंचितशी उत्साहवर्धक आहे असे म्हणावयास हरकत नाही. परंतु तेवढ्याने फाजील आशा बाळगण्याचे कारण नाही. कारण आपण पुन्हा सत्तेवर येई तोपर्यंत आपण कितीतरी संधी कायमच्या गमावून बसलेल्या असणार. हा मजकूर लिहिला जात असतांना देखील यापूर्वी फक्त रेन (Wren) यालाच उपभोगावयाला मिळालेली संधी प्राप्त झालेली असताना देखील अनेकानेक क्षुद्र व्यक्ती सबंध लंडन शहरभर अत्यंत विद्रूप दिसणाऱ्या इमारती उभारण्यातच गुंग झाल्या आहेत.

तथापी मला अशी आशा आहे आणि माझा असा विश्वासही आहे की, मजूर-पक्ष या लढ्यात पुढाकार घेईल. इतिहासाच्या दृष्टीने बोलावयाचे तर रासायनिक उद्योगाचे नियोजन करण्यापेक्षाही मजूरपक्ष लंडन शहराचे नियोजन घडवून आणील तर इंग्लंडसाठी त्या पक्षाने खूप भरीव कामगिरी केली असे होईल. आणि कच्च्या झोपड्या पाडून टाकण्याऐवजी फाशीची शिक्षा रद्द करून टाकली तर ती मजूर पक्षाची फारच मोठी कामगिरी ठरेल. ही जबाबदारी स्वीकारण्याच्या दृष्टीने या पक्षाला अनुकूल अशी पार्श्वभूमी आणि परंपरा आहे – विल्यम मॉरिस यांचा पक्षावर असलेला प्रभाव, खाजगी मूल्यांपेक्षा सामाजिक मूल्यांवर पक्षाचा दीर्घ-काळापासून असलेला विश्वास आणि शिक्षित कामगार वर्गाचे वैशिष्ट्य बनलेल्या संस्कृतीबद्दल पक्षाला वाटत असलेले महत्त्व आणि आदराची भावना ही ती अनु-कूल पार्श्वभूमी आणि परंपरा होय. पक्षाला जरूर ती संधी निश्चित प्राप्त झाली आहे. निकडीची गरज निर्माण झाली आहे म्हणून नव्हे तर, सौंदर्य आणि संस्कृती यांच्या संवर्धनासाठी जादा शक्ती आणि साधने यांचा आपण उपयोग करू शक इतका भौतिक दर्जा वाढलेला असल्यामुळेच पक्षाला ही संधी प्राप्त झाली आहे.

वस्तुत: हे क्षेत्र असे आहे की, जेथे मूळचे सहकार्याचे ध्येय नेमके लागू पडते. यासंबंधीचा विचार आपण पाचव्या प्रकरणात केला असून त्याबाबतीत अशा निष्कर्षाप्रत आलो आहोत की, ते ध्येय अद्यापपर्यंत फलद्रूप झालेले नाही हे उघड

असले आणि ऐतिहासिक दृष्टया समाजवादाचाच तो एक भाग असला तरी व्यक्तिगत हेतूंच्या किंवा औद्योगिक संबंधाच्या संदर्भात ते ध्येय राष्ट्रीय पातळीवर व्यवहारात कसे उतरविता येईल ते सांगणे कठीण आहे. परंतु सांस्कृतिक क्षेत्रात मात्र अशा प्रकारचे ध्येय व्यवहारात उतरवणे शक्य असते त्याचप्रमाणे ते त्या क्षेत्राला लागू पडण्यासारखेही असते. याबाबत अपेक्षा एवढीच असते की, खाजगी हितसंबंधांपेक्षा सामाजिक हितसंबंधांना प्राधान्य दिले गेले पाहिजे. अर्थात अलीकडील अनुभवावरून हे स्पष्ट झाले आहे की, या ठिकाणी 'खाजगी' याचा अर्थ खाजगी नफा असा घ्यावयाचा नाही तर खाजगी म्हणजे विशिष्ट विभागापुरता मर्यादित असा अर्थ घ्यावयाचा; म्हणजे त्यांत महानगरपालिका, स्थानिक पंचायती, राष्ट्रीयीकरण झालेले उद्योग, इतकेच नव्हे तर सरकारी खाती आणि खाजगी उद्योग यांचाही समावेश होतो. आपण जर जोराने या ध्येयाच्या पाठीमागे लागलो, त्याचा अगदी पिच्छा पुरवावयाचे ठरवले तर आपल्याला इंग्लंड अधिक समृद्ध आणि समाधानी बनवता येईल व न्यायाची व समतेची प्रस्थापना करता येईल इतकेच नव्हे तर ते आपल्याला अधिक सुंदर आणि सुसंस्कृतही बनवता येईल.

हे करीत असतांना, वाढत्या भौतिक राहणीमानाच्या सहाय्याने वैयक्तिक नफा मिळविण्याच्या हेतूला मुरड घालणे ही जी त्याच ध्येयाची दुसरी बाजू ती अभावितपणे आणि नजरेत न भरता आपोआपच साध्य होत असते. केन्सने एके ठिकाणी असे म्हटले आहे की, संपत्ती संचयाला सामाजिक दृष्टया महत्त्व उरले नाही म्हणजे नीतिनियमात फार मोठे बदल घडून येतील . . काही निश्चित स्वरूपाची धर्मतत्त्वे आणि परंपरागत सद्गुण यांचा पुनरपी अंगिकार करावयास आपल्याला मोकळीक मिळेल हे मला दिसत आहे– धनलोभ हे पाप आहे. चोपून व्याज उकळणे हा दुराचार आहे, पैशाचा हव्यास घृणास्पद आहे आणि जे उद्याची फिकीर करीत नाहीत तेच खरोखर सन्मार्गाने जात असतात याची आपणास जाणीव होईल. पुन्हा एकदा आपण साध्यापेक्षा साधन महत्त्वाचे आहे असे मानावयाला लागू आणि उपयुक्त आणि उचित यात जे उचित असेल त्याचीच निवड करू. दिवसाचे चोवीस तास सदाचाराने आणि उत्तम प्रकारे कसे व्यतीत करावयाचे हे जे कोणी आपल्याला शिकवू शकतील त्यांना आपण मान देवू. जीवनाच्या निरनिराळ्या अंगोपांगातून जे प्रत्यक्ष आस्वाद घेऊ शकतात तेच खरोखरी आनंददायी होत.'

अर्थात या अधिक मानवी मार्गावर पदार्पण करण्याची वेळ येण्यास अद्याप फार अवकाश आहे. कारण आपण अद्यापही दारिद्र्य आणि विपत्तीतच अडकून पडलो आहोत. निकृष्ट जीवन जगणाऱ्या इतर देशांतील परिस्थिती तर याबाबतीत अधिकच विकट आहे. शीतयुद्ध म्हणून ओळखले जाणारे स्पर्धात्मक संघर्ष मिटविण्यात अपयश आल्यामुळे तर याबाबतीतील साऱ्या आशांचा चुराडा होऊन जाण्याचीच शक्यता अधिक आहे. परंतु अशा परिस्थितीतही केन्स पुढे म्हणतो की, 'आपले

भवितव्य घडविण्यासाठी आजपासूनच हळूहळू तयारी करायला लागण्यास काहीच हरकत नाही. कलात्मक जीवन व हेतुमूलक कार्य यांना वाहून घेण्याने आणि मनात सतत ती प्रेरणा बाळगल्याने त्याला मदतच होणार आहे.' समृद्ध जीवनाचा आस्वाद कसा घ्यावयाचा त्याची जाणीव करून देणारी मूल्येच हरवून बसल्यानंतर समृद्धीचे युग अवतरले असा प्रकार घडू नये.

● ● ●

# महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाची प्रकाशने

१. **इस्लामची जीवनपद्धती** — रु. २८-००
(जफर शरिफ लिखित "कानून-इ-इस्लाम"चा अनुवाद)
प्रा. अ. प. सूर्यवंशी.

२. **भूमिका शिल्प** — रु. २५-००
(स्मानिस्लाव्स्की लिखित
"Building a Character" चा अनुवाद)
कै. के. नारायण काळे.

३. **इस्लामची सामाजिक रचना** — रु. २८-५०
(रुवेन लेव्ही लिखित "Social structure of Islam"
चा अनुवाद)
श्री. श्रीपाद केळकर.

४. **"खड्गहस्त की संन्यस्त"** — रु. १७-००
(स्तांदाल लिखित 'Scarlet & Black'चा अनुवाद)
श्री. गो. वि. वैद्य.

५. **'युद्ध आणि शांती'** — रु. ४८-००
(टॉलस्टॉयच्या "War and Peace" या कादंबरीचा
अनुवाद)
प्रा. आ. ना. पेडणेकर.

६. **माताजी** (द्वितीयावृत्ती) — रु. २५-००
(स्वामी निखिलानंद लिखित
"Holy Mother"चा अनुवाद)
श्री. वि. य. कुलकर्णी.

७. **मी इझाडोरा** — रु. २६-००
(इझाडोरा डंकन लिखित "My Life"चा अनुवाद)
श्रीमती रोहिणी भाटे.

८. **स्ट्रॅविन्स्कीचे सांगीतिक सौंदर्यशास्त्र** — रु. ३-७०
(इगॉर स्ट्रॅविन्स्की लिखित "Poetics of Music"चा
अनुवाद)
प्रा. अशोक दा. रानडे.